श्रीमद्भगवत्पतञ्जलिकृत

# व्याकरणमहाभाष्य

[MAHĀBHĀṢYA OF PATAÑJALI]

(म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं तयार केलेल्या मराठी अनुवादासह भाग १ ते ६)

## प्रस्तावना खंड

भाग सातवा

लेखक

म. म. प्राध्यापक, काशीनाथ वासुदेव अभ्यंकर, एम्.ए.,

माननीय प्राध्यापक, गुजरात विद्यासभा अहमदाबाद; सभासद, पुणें विद्यापीठ; अध्यक्ष, संस्कृत विद्या-मंडळ टि. म. विद्यापीठ पुणें; अध्यक्ष, संस्कृत-विद्यामन्दिर, गुजरात विद्यासभा, अहमदाबाद इ. इ.

भूमिका : व्याकरणशास्त्राचें परंपरागत अध्ययनाध्यापन व प्रसिद्ध वैयाकरणांचा अल्प परिचय.

प्रस्तावना : व्याकरणविषयक मुख्यमुख्य सिद्धांतांचें परीक्षण.

उपोद्घात : पाणिनिपूर्व वैयाकरणांच्या कार्यांचा परामर्श; पाणिनीच्या अष्टाध्यायीचें समालोचन; वार्तिककारांच्या कार्यांचें विवेचन; महाभाष्याचें चिकित्सात्मक अवलोकन; भर्तृहरीचें व्याकरणविषयक कार्य व व्याकरणशास्त्राचा संक्षिप्त इतिहास.

परिशिष्टें : उद्धृत वाक्यें, परिभाषा व न्याय, महत्त्वाचे शब्द, विषयानुक्रमणी.

डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणें.

# प्रास्ताविक निवेदन

श्रीपतंजलीनें लिहिलेल्या व्याकरणमहाभाष्य या अत्यंत श्रेष्ठ अशा ग्रंथाचें मराठी भाषांतरासहित प्रसिद्धीकरण केल्यानंतर आज प्रस्तावनाखंड हा सातवा भाग प्रसिद्ध करण्यास आम्हांस फार आनंद वाटत आहे. या संपूर्ण ग्रंथाचे ७ भाग असून पानें ३५०० पेक्षां जास्त आहेत. इ. स. १९३८ सालींच म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं समग्र ग्रंथाचें मराठी भाषांतर पूर्ण केलें व फर्ग्युसन कॉलेजाबद्दल वाटणाऱ्या प्रेमळ भावनेनें प्रेरित होऊन त्यांनीं तें देणगी म्हणून डे. ए. सोसायटीला अर्पण केलें.

वयाच्या २० व्या वर्षाच्या आंतच शास्त्रीबोवांनीं सर्व महाभाष्य आत्मसात् केलें होतें. निरनिराळ्या दर्शनांत त्यांनीं प्रावीण्य मिळवून त्यावेळच्या गाढ विद्वानांच्या युगांत विद्वानांचे अग्रणी व श्रेष्ठ विद्वद्रत्न म्हणून सर्व भरतखंडांत ते चमकले. संस्कृतांतील निरनिराळ्या दर्शनांतील असामान्य पंडितांची अलौकिक बुद्धिमत्ता व परंपरागत ज्ञान यांचा लाभ होण्याचें भाग्य शास्त्रीबोवांना मिळालें होतें. व्याकरण, मीमांसा, वेदांत वगैरे शास्त्रांतील प्रमुख ग्रंथांवर ज्यांनीं पहिल्या प्रतीच्या टीका लिहिल्या त्या विद्वद्रत्न शास्त्रीबोवांनीं पातंजलमहाभाष्यासारख्या सर्वमान्य श्रेष्ठ ग्रंथाचें अधिकृतवाणीनें स्पष्टीकरण करणारें मराठी भाषांतर केलें आणि निःस्वार्थीपणानें तें आम्हांस दिलें हें आमचें परमभाग्य आम्ही समजतों.

इ. स. १९३८ सालीं शास्त्रीबोवांच्या ७५ व्या वाढदिवशीं या ग्रंथाचा पहिला भाग प्रसिद्ध झाला. दुसरा भाग इ. स. १९४१ मध्यें बाहेर पडला. नंतर मात्र दुसऱ्या महायुद्धामुळें भाषांतर प्रसिद्धीकरण बंद ठेवावें लागलें. दुर्दैवानें शास्त्रीबोवा इ. स. १९४२ मध्यें दिवंगत झाले. संपूर्ण भाषांतर त्यांच्या हयातींत आम्हांस प्रसिद्ध करतां आलें नाहीं, याबद्दल आम्हांस अत्यंत खेद वाटतो. प्रसिद्धीकरण लांबणीवर पडत चाललें व सोसायटीच्या चालकांना या पवित्र कार्याची पूर्तता करतां येईना म्हणून तळमळ लागून राहिली. शेवटीं १०,००० रुपयांचें कर्ज मंजूर करून, लढाई संपतांच सोसायटीनें कामास पुन्हां नेटानें सुरवात केली.

महाभाष्यासारख्या असामान्य व विद्वत्ताप्रचुर ग्रंथाच्या मराठी भाषांतराची प्रत अधिकृतरीत्या संपादन करण्याचें काम शास्त्रीबोवांच्या पश्चात् फार कठीण अशक्यप्रायच झालें असतें; परंतु शास्त्रीबोवांच्या ज्येष्ठ चिरंजीवांनीं प्रो.-काशीनाथपंतांनीं—निःस्वार्थीपणानें आपल्या अंगावर घेतल्यामुळें तें काम सुलभ झालें. प्रो. काशीनाथपंतांनीं ग्रंथसंपादनाचें काम तर उत्तम केलेंच; शिवाय, हा प्रस्तावनाखंड ( भाग ७ वा ) त्यांनीं लिहून दिला. या खंडांत व्याकरणशास्त्रावरील उपलब्ध ग्रंथांचा ऐतिहासिक व चिकित्सक पद्धतीनें परामर्श घेण्यांत आला असून, पाणिनि, कात्यायन, पतञ्जली, भर्तृहरि वगैरे श्रेष्ठ विद्वद्रत्नांनीं लिहिलेल्या असामान्य ग्रंथांचीं चिकित्सक बुद्धीनें केलेली छाननी आढळून येते. शास्त्रीबोवांनीं प्रस्तावनेसंबंधीं

केलेली रूपरेषा व इतर तुटक टांचणें यांवर प्रो. काशीनाथपंत यांनीं रचिलेली प्रचंड इमारत म्हणजेच प्रस्तावना-खंड होय. वडिलांबद्दल वाटणाऱ्या पवित्र श्रद्धेनेंच वरील प्रचंड काम करण्यास प्रो. काशीनाथपंत यांना स्फूर्ति दिली व त्यांतून त्यांना निभावून नेलें अशा रीतीनें पूर्ण झालेला हा ग्रंथ कार्यपूर्ती झाल्यामुळें अभिमानानें व आनंदानें आपणांपुढें आम्ही आज ठेवीत आहों.

तत्त्वज्ञान, वाङ्मय, समाजशास्त्र, छंदःशास्त्र वगैरे शास्त्रांच्या चिकित्सक अभ्यासकांना व्याकरणशास्त्राच्या सखोल अभ्यासाची अत्यंत जरुरी असते; परंतु त्या त्या विशिष्ट व क्लिष्ट रचना-प्रकारांनीं संस्कृतव्याकरणशास्त्र फार कठीण जातें. यामुळेंच महाभाष्याचें अधिकृत सुगम व पूर्ण भाषांतर भारत व युरोपखंड यांतील कोणत्याही भाषेंत आजपर्यंत झालें नाहीं. फक्त २ आन्हिकें (सुमारें ५० पानें) जर्मन भाषेंत भाषांतरित आढळतात. जुन्या परंपरा झपाट्यानें नाहींशा होत चाललेल्या सध्याच्या घटिकेला, जुन्या परंपरेंत तयार झालेल्या व जुन्या वळणाच्या गाढ पंडितानें केलेल्या महाभाष्यासारख्या श्रेष्ठ ग्रंथाच्या भाषांतराची अत्यंत जरुरी आहे; आणि याच वेळीं आम्ही प्रस्तावनाखंडासहित हा पूर्णग्रंथ आपल्यापुढें ठेवीत आहों.

कोणत्याही संस्कृतशास्त्रांतील सखोल अभ्यासकास व्याकरणशास्त्रांतील महाभाष्याची अत्यंत जरुरी आहे. पुष्कळ वर्षांपूर्वी बॉंबे संस्कृत सेरीजमध्यें संपूर्ण महाभाष्य डॉ. कीलहॉर्न ह्यांनीं संपादन केलें होतें. परंतु हा ग्रंथमुद्रा आज कित्येक वर्षें दुर्मिळ झाला आहे. मराठी भाषांतर, टीपा, विस्तृत प्रस्तावना व परिशिष्टें यांसह ३५०० च्या वर पृष्ठें असलेल्या या ग्रंथाच्या सात भागांची किंमत अवघी ८० रु. ठेवली आहे. विद्वज्जनांना शक्य तितक्या स्वल्प किंमतींत हा ग्रंथ मिळावा या एकस्याच सद्हेतूनें लेखक व प्रकाशक यांनीं अत्यंत निःस्वार्थीपणानें हें कार्य केल्यामुळें व पुणें विद्यापीठानें याही भागाला १००० रु. देणगी देऊन आम्हांस उपकृत केल्यामुळें इतकी स्वल्प किंमत ठेवणें शक्य झालें. संस्कृताभिमानी व्यक्ती व संस्था हे याचा पूर्ण फायदा घेतील अशी खात्री आहे.

या कामीं आर्यसंस्कृति छापखान्याचे व्यवस्थापक श्री. मधुकर नारायण चापेकर यांनीं अत्यन्त परिश्रम घेऊन व वेळोवेळीं मुद्रणासंबंधीं उपयुक्त सूचना देऊन जी बहुमोल मदत केली त्याबद्दल संस्थेतर्फे मी त्यांचे आभार मानितों.

पौष कृष्ण ७ शके १८७५
प्रजासत्ताकदिन २६-१-१९५४

गोपाळ लक्ष्मण चंद्रात्रेय
सेक्रेटरी, डे. ए. सोसायटी, पुणें.

# विषयानुक्रमणिका

## भूमिका

## प्रस्तावना.

## उपोद्घात

### व्याकरणशास्त्राच्या विकासाचे नऊ कालखंड



### पार्षदकालखंड

## पाणिनिकालखंड.

## वार्तिककालखंड.

## महाभाष्यकालखंड

### आन्हिकविवेचन—पहिला अध्याय

---



श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचित

# व्याकरणमहाभाष्य

# भूमिका

## व्याकरणग्रंथांची सामान्य माहिती. (१–१२)

### १. संस्कृत ग्रंथांमध्यें व्याकरणमहाभाष्याचें स्थान.

पतञ्जलिकृत व्याकरणमहाभाष्य हा ग्रंथ संस्कृत व्याकरणशास्त्राच्या मूळ ग्रंथांतील अत्यंत प्रमाणभूत असा समजला जातो इतकेंच नव्हे, तर संस्कृत भाषेंतील गद्यपद्यात्मक प्रचंड ग्रंथसमूहामध्यें ब्राह्मणग्रंथ व आरण्यकग्रंथ सोडल्यास व्याकरणमहाभाष्य हा सर्वांत श्रेष्ठ असा प्राचीन गद्यग्रंथ गणला जातो. संस्कृत वाङ्मयामध्यें प्रत्येक शास्त्रावर साधारणतः पांच[1] प्रकारचे ग्रंथ लिहिलेले सांपडतात. त्यांपैकीं सूत्रग्रंथ हे सर्वांत जुने. प्राचीनकालीं ज्यावेळीं सूत्रें रचिलीं गेलीं त्यावेळीं निरनिराळ्या शास्त्रांतील निरनिराळे सिद्धांत व त्याविषयींचे पूर्वपक्ष तसेच उत्तरपक्ष यांचें सुसंगत रीतीनें स्मरण व्हावें हा हेतु सूत्रकारांच्या मनांत प्रामुख्यानें होता. सूत्रें रचिलीं गेलीं त्या काळीं त्या त्या शास्त्रांतील सूत्रांचें परंपरागत व्याख्यान व विवरण गुरुजींकडून शिष्यवर्गास यथासांग उपलब्ध होत असे. परंतु सूत्रांची भाषा साधारणतः अतिशयच त्रोटक असल्यामुळें सूत्रकारांना अभिप्रेत असलेल्या अर्थाविषयींही कालांतरानें संशय उत्पन्न होऊं लागला. पाणिनिसूत्रांची रचना अत्यंत शास्त्रशुद्ध असल्यामुळें व अध्याहृत शब्द कोणते व कसे घ्यावयाचे याविषयीं नियमबद्ध पद्धति अनुसरली गेली असल्यामुळें त्यांचे अर्थाविषयीं संशयास जागाच राहिली नसली तरी पण वेळोवेळीं भाषेंत फेरबदल होणें नवे शब्द प्रचारांत येणें व शब्दांच्या अर्थांतही फेरफार होणें या गोष्टी अपरिहार्य असल्यामुळें कांहीं काल गेल्यावर पाणिनिसूत्रांवरही परिशिष्टरूप, विवरणरूप व व्याख्यानरूप ग्रंथांची जरूर उत्पन्न झाली व तसे ग्रंथ लिहिले गेले.

### २. शास्त्रीय ग्रंथांचे पांच प्रकार

परंपरागत अर्थ कायम रहावा ह्या बुद्धीनें कालांतरानें प्रत्येक शास्त्रांतील सूत्रांवर वृत्ति, वार्तिक, भाष्य, व टीका अशा चार प्रकारचे ग्रंथ प्रामुख्यानें लिहिले गेले. कांहीं शास्त्रां-

---

१ सूत्र, वृत्ति, भाष्य, वार्तिक व टीका हे पांच प्रकार साधारणतः घेतले जातात.

मध्यें वार्तिकांच्या तऱ्हेच्या ग्रंथांना निर्युक्ति नांव आहे व टीकाग्रंथांना चूर्णि नांव आहे. त्यांपैकीं सूत्रें हीं अतिशय संक्षिप्त रीतीनें लिहिलेलीं असलीं तरी तीं अत्यंत अधिकृत वाणीनें लिहिलेलीं व गंभीर अर्थानें भरलेलीं असतात. त्यांचें लक्षण पुढें दिल्याप्रमाणें आहे. " अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद् विश्वतोमुखम् । अस्तोभमनवद्यं च सूत्रं सूत्रकृतो विदुः " हें लक्षण पाणिनीच्या सूत्रांना पूर्णपणें लागू पडतें. जणूं काय पाणिनीचीं सूत्रें पाहून तींच नमुनेदार सूत्रें असें मनांत ठरवून सूत्र शब्दाची व्याख्या वरतीं दिल्याप्रमाणें केली गेली असावी असें वाटतें. " उक्तानुक्तदुरुक्तानां[1] चिन्ता यत्र प्रवर्तते । तं ग्रन्थं वार्तिकं प्राहुर्वार्तिकज्ञा मनीषिणः " हें वार्तिकांचें लक्षणही पाणिनिसूत्रावरील वार्तिकांना चांगलें लागूं पडतें. हीं वार्तिकें कात्यायनानें रचिलीं असें समजलें जातें. या वार्तिकांच्या कर्त्याविषयीं ज्यास्त विचार पुढें करण्यांत येईल. तसेंच भाष्याचेंही लक्षण " सूत्रार्थो वर्ण्यते यत्र पदैः सूत्रानुकारिभिः । स्वपदानि च वर्ण्यन्ते भाष्यं भाष्यविदो विदुः " हें महाभाष्याला लागू पडतें इतकेंच नव्हे तर महाभाष्यकारांनीं त्याहूनही मोठी कामगिरी केली आहे हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल. पूर्वपक्ष उत्तरपक्ष वगैरे न मांडतां सूत्रांचा सरळ अर्थ थोडक्यांत मांडणें हें वृत्तिग्रंथांचें काम आहे. सूत्रें फारच संक्षिप्त असल्यामुळें त्यांचा अर्थ एकदम मनांत येत नाहीं. त्याकरितां मागील संदर्भ अनुवृत्ति व अध्याहृत शब्द इतकेंच घालून व एकादें उदाहरण देऊन वृत्तिकार सूत्रांचे अर्थ स्पष्ट मांडतात. टीकाग्रंथांची मुख्य कामगिरी म्हणजे सूत्रांच्या अर्थावर व प्रतिपाद्य विषयावर जे आक्षेप घेतले जाणें शक्य असतें ते आक्षेप दूर करणें. याशिवाय सूत्रांचें पांडित्यपूर्ण विवेचन व प्रतिपाद्य विषयाचें स्पष्टीकरण हेंही टीकाग्रंथांतच मिळतें.

## ३. पाणिनीय व्याकरणावरील ग्रंथसंपत्ति

पाणिनीनें लिहिलेल्या सूत्रग्रंथाचे आठ अध्याय असल्यामुळें तो अष्टाध्यायीसूत्रपाठ किंवा पाणिनीय अष्टक या नांवानें प्रसिद्ध आहे. या सूत्रपाठावर कात्यायनाचीं म्हणून समजलीं गेलेलीं सर्व वार्तिकें मिळून एकच वार्तिकग्रंथ, पतञ्जलीचा एकच भाष्यग्रंथ, काशिका हा एकच वृत्तिग्रंथ, मध्यमकौमुदी, लघुकौमुदी, प्रक्रियाकौमुदी, व सिद्धान्तकौमुदी हे चार प्रकरणात्मक टीकाग्रंथ, तसाच शब्दकौस्तुभ हाही टीकाग्रन्थ इतके सुंदर ग्रंथ उपलब्ध आहेत. यांशिवाय सूत्रांच्या स्पष्टीकरणार्थ सूत्रांवरून अनुमानानें काढलेले, व लोकव्यवहारांत प्रचलित असलेले व शास्त्रामध्यें परिभाषा नांवानें प्रसिद्ध असे जे न्याय त्यांचा ज्यांत संग्रह केला आहे असे परिभाषाभास्कर, परिभाषेंदुशेखर वगैरे परिभाषाग्रंथ तसेच शब्दांच्या अर्थाचा ज्यांत विचार केला आहे असे वाक्यपदीय, वैयाकरणभूषण, मंजूषा वगैरे अर्थग्रंथही अनेक आहेत. यांपैकीं बहुतेक ग्रंथांवर टीकाग्रंथ व त्यांपैकीं कांहीं टीकांवर आणखी टीकाग्रंथ असे जवळजवळ शंभर टीकाग्रंथ आज उपलब्ध आहेत. यांशिवाय आजपर्यंत न छापलेल्या, पण हस्तलिखित-रूपानें विद्यमान, अशा पुष्कळच टीका आहेत. व्याकरणशास्त्रावरील हल्लीं उपलब्ध असलेल्या ग्रंथांत ज्यांचा उल्लेख[2] आला आहे असेही अनेक ग्रंथ लिहिले गेले. त्यांपैकीं व्याडीचा 'संग्रह' नांवाचा ग्रंथ व कुणीची 'सूत्रवृत्ति' हे विद्वत्तापूर्ण प्राचीन ग्रंथ पूर्वीच्या टीकाकारांना

---

१ येथें ' द्विरुक्तानां ' असा पाठ कांहीं ग्रंथांमध्यें आढळतो.

२ सर्वदर्शनसंग्रह ( गव्ह० ओरि० सीरीज ) पृष्ठें ५२९–५३५ पहावीं. तसेंच व्याकरणमहाभाष्य ( निर्णयसागर प्रत ) प्रथम भाग, प्रस्तावना पृष्ठें २१–२८ पहावीं.

उपलब्ध असले तरी दुर्दैवानें आज आपणाला उपलब्ध नाहींत. नागोजीभट्टांनीं उद्योतामध्यें ज्यांतून उतारे घेतले आहेत अशी भर्तृहरीची महाभाष्यावरील टीका हल्लीं उपलब्ध झाली आहे पण ती सात आन्हिकांपर्यंतच सांपडली आहे.

## ४. व्याकरण व शब्दानुशासन या संज्ञांविषयीं विचार.

व्याकरणशास्त्राला 'शब्दानुशासन' हें नांव महाभाष्याच्या काळीं रूढ असावें. पाणिनीनें आपल्या सूत्रांना व्याकरण हा शब्द स्वतः कोठें लाविला नाहीं व आपल्या सूत्रांचा प्रतिपाद्य विषय कोणता तेंही पण सांगितलें नाहीं. त्याच्या एका सूत्रामध्यें वैयाकरण हा शब्द आढळतो. तसेंच पाणिनिकृत म्हणून प्रसिद्ध जी शिक्षा आहे तिच्यामध्यें व्याकरणशब्द आढळतो. पण ज्या श्लोकांत तो शब्द आला आहे तो श्लोक मागाहून घातलेला असावा असें कांहीं लोक म्हणतात. व्याकरण शब्दाचा प्रयोग वेदांगांपैकीं एक अंग या अर्थी उपनिषदांत आढळतो व जैन आगमग्रंथांपैकीं एका आगमग्रंथाचें प्रश्नव्याकरणसूत्र असें नांव आहे. महाभाष्यांतही पाणिनीच्या सूत्राला व्याकरणसूत्र हा शब्द लावला असतां त्याचें स्पष्टीकरण कसें करावें याबद्दल उद्बोधक विवेचन केलें आहे. या सर्व उल्लेखांवरून व्याकरणशब्दाचा जुना अर्थ व्याख्यान अथवा स्पष्टीकरण असा असला पाहिजे. पाणिनीनें सूत्रें लिहिल्यानंतर मात्र त्या सूत्रांना शब्दानुशासन हा शब्द लावला गेला हें महाभाष्याच्या आरंभींच्या 'अथ शब्दानुशासनम्' या वार्तिकावरून सिद्ध होतें. कैयटानें व्याख्या करतांना व्याकरणाचेंच शब्दानुशासन हें दुसरें अन्वर्थ नांव आहे असें म्हटलें आहे. पण उद्योतकारांनीं शब्दानुशासन शब्दाचा अर्थ ज्यामुळें फोड करून शब्द समजाविले जातात तें शास्त्र अशी अनुशासन शब्दाची करणसाधनव्युत्पत्ति देऊन आपलें मत प्रतिपादन केलें आहे. एकंदरींत असें दिसून येतें कीं, व्याकरण हा शब्द स्पष्टीकरण या ज्यास्त व्यापक अर्थी वापरण्यांत होता व शब्दाची अर्थासहित प्रकृतिप्रत्ययविभाग कल्पून उपपत्ति करणें या मर्यादित अर्थी शब्दानुशासन हा शब्द उपयोगांत असावा. पाणिनीनें सूत्ररूपानें रचिलेल्या व्याकरणशास्त्राला शब्दानुशासन हें नांव पतंजलीच्या पूर्वीं दिलें गेलें. हें नांव कोणीं दिलें तें 'अथ शब्दानुशासनम्' हें वार्तिक कोणीं लिहिलें—कात्यायनानें, व्याडीनें, किंवा दुसऱ्या कोणीं, किंवा पतंजलीनें स्वतः— या निर्णयावर अवलंबून राहील.

## ५. पाणिनीच्या कालाविषयीं विचार.

पाणिनीच्या कालाविषयीं जरी पुष्कळ मतभेद असला, व कांहीं विद्वानांचे मतानें त्याचा काल इसवी सनापूर्वीं २००० वर्षें इतका जुना जरी असला, तरी बहिर्गत व अंतर्गत पुराव्यांवरून त्याचा काल इसवी सनापूर्वीं ८०० ते ५०० वर्षें या मुदतींत असावा असें पुष्कळ विद्वानांचें मत आहे. बाह्य पुरावे म्हणजे इतर ग्रंथांत आलेले पाणिनीचे उल्लेख हे

१. पाणिनिसूत्र "वैयाकरणाख्यायां चतुर्थ्याः" (६. ३. ७) पहा.

२. पाणिनीयशिक्षा (श्लोक ५७) पहा.

३. व्याकरणमहाभाष्य पस्पशाह्निक वार्तिक १० "सूत्रे व्याकरणे षष्ठ्यर्थोनुपपन्नः" पहा.

४. "अथ शब्दानुशासनम्" (१।१।१ वा. १) वरील कैयटकृत प्रदीप पहा.

५. "अथ शब्दानुशासनम्" (१।१।१ वा.) नागेशभट्टकृत उद्योत पहा.

जरी अनेक असले व पाणीनीचीं सूत्रें जरी अनेक ग्रंथांत उद्धृत केलेलीं असलीं तरी त्यांतील पुष्कळसे ग्रंथ अर्वाचीन आहेत. जुन्यांत जुने उपलब्ध ग्रंथ म्हणजे कात्यायन व इतर वार्तिककारांनीं केलेलीं म्हणून प्रसिद्ध असलेलीं वार्तिकें व त्यांवर उभारलेला प्रस्तुत महाभाष्य ग्रंथ हे होत. यांपैकीं महाभाष्याचा काल अंतर्गत पुराव्यांवरून इसवी सनापूर्वीं दुसरें शतक निश्चित होतो. त्यावरून त्यापूर्वीं शेदोनशें वर्षे वार्तिककारांचा काल व त्यापूर्वीं कात्यायन वगैरे वार्तिककारांना वार्तिकें लिहिण्याजोगी संस्कृत भाषेची परिस्थिति निर्माण होण्यास पुरेसा असा तीन चार शतकें काल यावरून पाणिनीचा काल इसवी सनापूर्वीं निदान पांच शतकें असला पाहिजे असें म्हणतां येईल. काव्यमीमांसा ग्रंथांत राजशेखर कवीनें वर्ष, उपवर्ष, पाणिनि, वररुचि, पिंगल व व्याडि या सर्वांच्या विद्येची पारख पाटलिपुत्र राजधानींत झाली असें वर्णन केलें आहे. त्यावरून हे सर्व विद्वान जरी समकालीन नसले व समकालीन असणें शक्यही नसलें तरी पण त्या सर्वांना नंद राजघराण्याचा आश्रय असावा व कदाचित् पाणिनीचा आश्रयदाता नंद हा त्या घराण्याचा आद्यसंस्थापक होता येवढें म्हणतां येईल. पाणिनि, जैमिनि, व पिंगल यांच्या मरणाला अनुक्रमें सिंह, हत्ती, व मगर कारणीभूत झाले अशा वर्णनाचा पंचतंत्रांतील श्लोक हा निव्वळ दंतकथामूलक असावा असें वाटतें.

## ६. अंतर्गत पुरावा.

अंतर्गत पुराव्यासंबंधीं विचार केल्यास पाणिनीनें कांहीं सूत्रांमध्यें ‘छन्दसि याच्यापेक्षां भिन्न’ या अर्थीं ‘भाषायाम्’ असा शब्द घातला आहे. ‘भाषायाम्’ हा शब्द ज्यांमध्यें आहे तीं सर्व सूत्रें पाहिल्यास भाषा शब्द हा त्या वेळीं लोकामध्यें प्रचारांत असलेली जी संस्कृत भाषा तिला उद्देशून घातलेला आहे असें निश्चित होतें. संस्कृत भाषा बोलली जात असलेला हा काल, पाली व प्राकृत भाषांचा लोकांमध्यें व ग्रंथांमध्यें फैलाव होण्यापूर्वींचा, म्हणजे बुद्ध व महावीर यांच्या कालापूर्वींचा स्वाभाविकपणेंच ठरतो; व त्याप्रमाणें तो इसवी सनापूर्वीं पांच सहा शतकें मानिल्यासच भाषेमध्यें साधारण बराच फेरफार झाल्यावर कात्यायन वगैरे वार्तिककारांचा व त्यानंतर तितक्याच अंतरानें पतंजलीचा इतर बळकट प्रमाणांवरून निश्चित झालेला इसवी सनापूर्वीं दुसरें शतक हा काल जमतो. पाणिनीच्या सूत्रांत अत्रि, वसिष्ठ, गोतम, आंगिरस वगैरे

---

१. विशेषत: इह पुष्यमित्रं याजयाम: ( ३।२।१२३ वा. १ भाष्य ) तसंच अरुणद्यवन: साकेतम् ( सू. ३।२।१११ वा २ भाष्य ) पहा.

२. “ अत्रोपवर्षवर्षाविह पाणिनिपिङ्गलाविह व्याडि: । वररुचिपतञ्जली इह ( पाटलिपुत्रे) परीक्षिता: ख्यातिमुपजग्मु: ॥ काव्यमीमांसा.

३. “ सिंहो व्याकरणस्य कर्तुरहरत् प्राणान् प्रियान्पाणिने:
मीमांसाकृतमुन्ममाथ सहसा हस्ती मुनिं जैमिनिम् ।
छन्दोज्ञाननिधिं जघान मकरो वेलातटे पिङ्गलम्
अज्ञानावृतचेतसामतिरुषां कोऽर्थस्तिरश्चां गुणै: ॥

४. पाणिनिसूत्रें “ भाषायां सदवसश्रुव: ” ( ३।२।१०८ ) “ सख्यशिश्वीति भाषायाम् ” ( ४।१।६२ ), “ विभाषा भाषायाम् ” ( ६।१।१७७ ) “ प्रथमायाश्च द्विवचने भाषायाम् ” (७।२।८८), “ पूर्वं तु भाषायाम् ” ( ८।२।९८ ) पहा.

मंत्रद्रष्टया ऋषींचा तसेंच अंधक, वृष्णि, कुरु वगैरे प्राचीन कुलांचा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आलेला आहे. त्यावरून त्या फार प्राचीन ऋषींच्या नंतर पाणिनी होऊन गेला एवढेंच सिद्ध होईल; पण तें निर्विवाद सिद्धच आहे. त्याप्रमाणेंच गार्ग्य, आपिशलि, चाक्रवर्मण, शाकटायन, शाकल्य, भारद्वाज, सेनक, स्फोटायन वगैरे वैयाकरणांच्या मतभेदाचा उल्लेख आल्यावरून पाणिनीच्या पूर्वींचे ते वैयाकरण असावे असें सिद्ध होतें. परंतु त्यांपैकीं कोणाचाही ग्रंथ हल्लीं उपलब्ध नसल्यामुळें पाणिनीच्या कालासंबंधीं त्या उल्लेखांवरून कांहींही ठरवितां येणें शक्य नाहीं. शाकटायनाचें व्याकरण म्हणून हल्लीं दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. पण पाणिनीनें उल्लेख केलेल्या शाकटायनाचे ते ग्रंथ नाहींत; ते पाणिनीनंतर लिहिले गेले असावे असें विद्वानांचें मत आहे. पाणिनीच्या सूत्रांत यवन, यस्क, व मनु हे शब्द आले आहेत. यवन शब्द हा त्या वेळीं आयोनियन् नांवानें ओळखल्या जाणाऱ्या लोकांना लावला जात असेल तर त्यावरून आयोनियन् लोकांचा भारताशीं संबंध आल्यानंतर पाणिनी होऊन गेला एवढेंच सिद्ध होईल. परंतु असा संबंध इसवी सनापूर्वीं कित्येक शतकें आला होता असें विद्वानांचें मत आहे. म्हणून फक्त यवन शब्दावरून अलेक्झांडरच्या स्वारीनंतर ( इ. स. पूर्व ३२१ ) पाणिनीचा काल ठरवणें बरोबर होणार नाहीं. तसेंच यस्क व मनु या शब्दांवरून यास्काचार्यांच्या व स्मृतिकार मनूच्या नंतर पाणिनीचा काल ठरवणेंही बरोबर होणार नाहीं. कारण यस्क व मनु हीं गोत्रनांवें असल्यानें तीं यास्क व मनु या ग्रंथकारांपूर्वीं कित्येक शतकें प्रचारांत असणें संभवनीय आहे.

## ७. पाणिनीचा देश व काल ठरविण्यास उपयुक्त सूत्रें.

सूत्रपाठांत उशीनर, गौड, प्राच्य-भरत वगैरे देशांचीं नांवें आलीं आहेत. त्यावरून येवढेंच सिद्ध होईल कीं, पाणिनीचा काल अत्यंत प्राचीन नसून ज्या वेळीं अंग कलिंग व प्राच्य-भरत या शब्दांनीं उल्लेख केलेल्या देशांपर्यंत आर्य संस्कृतीचा व संस्कृत भाषेचा फैलाव झाला होता असा काल म्हणजे ब्राह्मण व उपनिषद् ग्रंथांच्या कालानंतर कांहीं शतकें असावा असें सिद्ध होतें. हा काल साधारणपणें पाली व प्राकृत भाषांचा लोकांत फैलाव होण्यापूर्वींचा असावा असें दिसतें. पाणिनीनें 'उदक् च विपाशः' (४।२।७४) वगैरे सूत्रांमध्यें स्वरयुक्त उच्चारणाचे बाबतींत निरनिराळ्या ठिकाणीं आढळून येणारे फरक इतके काळजीपूर्वक व कौशल्यानें नमुद केले आहेत कीं, वृत्तिकार काशिकाकर्ते यांनीं " महती सूक्ष्मेक्षिका वर्तते सूत्रकारस्य " ( ४।२।७४ काशिकावृत्ति ) अशा शब्दांत सूत्रकारांचें कौतुक केलें आहे. या गोष्टीवरूनही उदात्तादि स्वरांनीं युक्त असा शब्दोच्चार जिच्यामध्यें होत असे अशी संस्कृतभाषा ज्या कालीं होती तोच पाणिनीचा काल असावा असें सिद्ध होतें. तसेंच " भिध्योध्यौ नदे " " पुष्यसिध्यौ नक्षत्रे " ( ३।१।११५–११६ ) या सूत्रांतील भिध्य व उध्य हे दोन नद व सिध्य हें नक्षत्र हीं ज्या वेळीं लोकांना ठाऊक असून पूर्ण प्रचारांत होतीं असा काल म्हणजे इसवी सनापूर्वीं बरींच शतकें असावा असें असल्यानें वरील विधानांना पुष्टि मिळते. " तूदी-

---

१. ऋष्यन्धकवृष्णिकुरुभ्यश्च ( ४।१।११४ ) अत्रिभृगुकुत्सवसिष्ठगोतमाङ्गिरोभ्यश्च ( २।४।६५ ) वगैरे सूत्रें पहा.

२. इन्द्रवरुणभव० ( ४।१।४९ ); यस्कादिभ्यो गोत्रे ( २।४।६३ ) मनोरौ वा ( ४।१।३८ ) मनोर्जाता० ( ४।१।१६१ ) पहा.

शलातुरवर्मती०" (४।३।९४) या सूत्रांत पाणिनीनें 'शलातुर देश ज्यांचा वाडवडिलांचा राहण्याचा देश आहे असे लोक' या अर्थी शलातुर शब्दाहून छण् प्रत्यय सांगितला आहे. हा शलातुर देश गांधार प्रांतांत पेशावरचे पूर्व बाजूस होता असें विद्वानांचें मत आहे. 'सिन्धुतक्षशिलादिभ्योऽणञौ,' 'कच्छादिभ्यश्च' वगैरे सूत्रांत आढळून येणारे सिन्धु, तक्षशिला, कच्छ वगैरे पश्चिम हिंदुस्थानांतल्या प्रांतांचे उल्लेखही पाणिनी हा हिंदुस्थानच्या वायव्य प्रांतांत इसवी सनापूर्वी बरींच शतकें शलातुर गांवीं होऊन गेला असावा व त्याचें शिक्षण तक्षशिला विद्यापीठांत झालें असावें या अनुमानास पुष्टी देतात.

## ८. पाणिनिसूत्रावरील वार्तिकें.

कात्यायनानें पाणिनीच्या सूत्रांवर कालांतरानें प्राप्त झालेली त्यांतील न्यूनता भरून काढण्याकरितां व योग्य ते फेरफार सुचविण्याकरितां वार्तिकें लिहिलीं असें लोकांत प्रसिद्धच आहे. या कात्यायनाचें दुसरें नांव वररुचि असें होतें अशी समजूत आहे. कात्यायन हें गोत्रनांवही असूं शकेल किंवा वररुचि हें टोपणनांवही असूं शकेल. भाष्यकारांनीं महाभाष्यांत हीं वार्तिकें घेतलीं आहेत व त्यांवर चर्चा केली आहे. कात्यायनाचा वार्तिकपाठ जसा होता तसा परंपरागत उपलब्ध नाहीं असें जुन्या वैयाकरणांचेंही म्हणणें आहे. ज्याप्रमाणें भाष्यकारांनीं पाणिनीच्या सूत्रांपैकीं कांहीं सूत्रें घेऊन त्यांवर विवेचन करण्याजोगें कांहीं नसल्यामुळें वगळलीं आहेत तशींच कांहीं वार्तिकेंही वगळलीं असण्याचा संभव आहे. कांहीं ठिकाणीं भाष्यकारांनींच कांहीं वार्तिकांचे कर्ते कात्यायनापेक्षां निराळे असल्याबद्दल प्रत्यक्षच 'भारद्वाजीयाः', 'क्रोष्ट्रीयाः' वगैरे शब्दांनीं उल्लेख केला आहे. कांहीं ठिकाणीं वार्तिककारांनीं पाणिनीचे दोष दाखविले आहेत हें भाष्यकारांना संमत नसल्यामुळें त्यांनीं वार्तिककारांची हजेरी घेऊन पाणिनीचें समर्थन केलें आहे असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे पण त्यांत तथ्यता दिसत नाहीं. कारण वार्तिककार हे पाणिनीचा 'भगवान् पाणिनि' असा आदरपूर्वक उल्लेख करीत असल्यामुळें त्यांची पाणिनीचे दोष काढण्याकडे दृष्टि असेल हें शक्य दिसत नाहीं. त्यांनीं फक्त कालांतरानें भाषेंत बदल झाल्यामुळें घडून आलेले फरक पुरवणी व मतभेद म्हणून प्रदर्शित केले आहेत. कात्यायनाचीं वार्तिकें कोणतीं, संग्रहकारांचीं वचनें कोणतीं व भाष्यकारांचीं स्वतःचीं वार्तिकें कोणतीं याबद्दल कांहीं आडाखे बांधून निर्णय करणें फार कठीण आहे. कांहीं विद्वानांनीं या बाबतींत प्रयत्न केले आहेत. परंतु अद्यापपर्यंत त्यांत म्हणावें तसें यश आलें नाहीं. खोल अभ्यासपूर्वक विचार केल्यास व टीकाकारांचीं मतें विचारांत घेतल्यास हें काम अगदींच अशक्य असें आढळून येणार नाहीं.

---

१. शलातुर शब्दाचा प्राकृत भाषेंत उच्चार सलाउर हा प्राकृत नियमांप्रमाणें होतो. 'स' च्या ऐवजीं 'ह' अनेक प्रांतांत उच्चारला जातो. त्याप्रमाणें हलाउर शब्द होऊन ह व ल यांमध्यें नेहमीं आढळून येणाऱ्या वर्णव्यत्ययानें लहाउर होऊन लाहोर असेंही रूप होऊं शकत असल्यामुळें शलातुर हें लाहोरचेंच जुनें नांव असणें शक्य आहे.

२. "कथं पुनरिदं भगवतः पाणिनेराचार्यस्य लक्षणं प्रवृत्तम्" (पस्पशाह्निक) "प्रातिपदिकविज्ञानाच्च भगवतः पाणिनेराचार्यस्य सिद्धम्" (७।१।२ वा ५) तसेंच "एकशेष ... भगवतः पाणिनेः ..." (८।४।६८ वा. ४) पहा.

## ९. व्याडीचा ' संग्रह ' व कुणीची ' वृत्ति '.

कात्यायनानें संग्रहकार व्याडींचा नांवानें उल्लेख केल्यामुळें व्याडि कात्यायनाचे पूर्वी होऊन गेला असला पाहिजे. व्याडीला दाक्षायण हें उपपद असल्यामुळें व पाणिनीला दाक्षीपुत्र ही संज्ञा असल्यामुळें व्याडि हा पाणिनीचा नातलग पाणिनीनंतर लवकरच होऊन गेला असावा. व्याडीनें रचिलेला संग्रह नांवाचा ग्रंथ लक्षश्लोकात्मक होता हें म्हणणें जरी अक्षरशः खरें नसलें तरी अतिशय लाघवयुक्त जीं पाणिनीचीं सूत्रें त्यांचा अर्थ स्पष्ट करणारा व त्या सूत्रांचें स्पष्ट विवेचन करणारा असा तो विस्तृत गद्यात्मक ग्रंथ असावा असें टीकाकारांच्या त्या ग्रंथासंबंधींच्या उद्गारांवरून दिसून येतें. भाष्यकारांना व्याडीच्या ग्रंथाचा पुष्कळ उपयोग झाला व त्यामुळेंच महाभाष्याला " व्याडिसंग्रह-विवृति " असेंही म्हणण्यांत येतें. व्याडीच्या ग्रंथाचें "शब्दविवेचनसंग्रह" असेंही नांव ऐकण्यांत आहे. महाभाष्यासारखा प्रसादयुक्त प्रतिभासंपन्न व विद्वत्तापूर्ण ग्रंथ निर्माण झाल्यानंतर व्याडीच्या ग्रंथाचें प्रयोजन कमी झाल्यामुळें तो लुप्त झाला असावा असें दिसतें. कुणि नांवाच्या वैयाकरणानें रचिलेल्या पाणिनिसूत्रवृत्तीची तीच गति झाली असावी. हा वृत्तिग्रंथ पाणिनीनंतर थोड्याच कालावधींत पाणिनिसूत्रांचा थोडक्यांत अर्थ देणारा असा रचिला गेला असावा किंवा संग्रह या ग्रंथानंतर संग्रहाचा संक्षेपार्थ घेऊन केलेला व दरएक सूत्राचा अर्थ देणारा असा हा लहान ग्रंथ असावा. पाणिनीचा काल इसवी सनापूर्वी पांचसहा शतकें मानिल्यास हे सर्व ग्रंथ त्यानंतर दोन तीनशें वर्षांत रचिले गेले असावे.

## १० पातञ्जल महाभाष्याचा काल.

प्रस्तुत महाभाष्य हें पाणिनीचीं सूत्रें, कात्यायन वगैरे वार्तिककारांचीं वार्तिकें, व्याडीचा संग्रह, व कुणीची वृत्ति हे ग्रंथ झाल्यानंतर त्या सर्व ग्रंथांवर अधिकृत व्याख्यान म्हणून रचिलें गेलें हें त्यांतील उल्लेखांवरून स्पष्ट होतें. महाभाष्यकर्ता पतंजलि हा गोनर्द ऋषींच्या ओंजळींत पडला म्हणून त्यास पतंजलि म्हणूं लागले अशी आख्यायिका सांगण्यांत येते. 'पुष्यमित्रं याजयामः' ( ३।२।१२३ भाष्य ) या महाभाष्यांत आलेल्या पुष्यमित्र राजाच्या उल्लेखावरून पुष्यमित्रानें केलेल्या यज्ञांत पतंजलीनें ऋत्विजाचें कर्म पतकरिलें असावें व पुष्यमित्र आणि पतंजलि हे समकालीन असावे असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. तसेंच 'अरुणद् यवनः साकेतान्' ( ३।२।१११ भाष्य ) या वाक्यांत मीनॅण्डर नांवाच्या पंजाब व काबूल या प्रांतांवर राज्य करणाऱ्या आयोनियन ( यवन ) राजानें इसवी सनापूर्वीं सुमारें १५० वर्षांचे[४] सुमारास अयोध्येला वेढा घातला या ऐतिहासिक गोष्टीचा उल्लेख असल्यामुळें पतंजलीचा काल इसवी सनापूर्वीं दुसरें शतक असावें असें विद्वानांचें मत आहे. "मौर्यैर्हिरण्यार्थिभिरर्चाः प्रकल्पिताः" या वाक्यांत आलेल्या मौर्य राजांच्या गरिबीच्या कालाच्या उल्लेखावरूनही वरील

---

१. " शोभना खलु दाक्षायणस्य संग्रहस्य कृतिः ... दाक्षायणेन संग्रहस्य कृतिः " ( २।३।६६ भाष्य) पहा.

२. " सर्वे सर्वपदादेशा दाक्षीपुत्रस्य पाणिनेः " ( १।१।२० वा. ५ भाष्य) तसेंच (७।१।२७ वा. २ भाष्य ) पहा.

३. " इह पुरा पाणिनीयेस्मिन् व्याकरणे व्याड्युपरचितं ग्रन्थलक्षपरिमाणं संग्रहाभिधानं निबन्धनमासीत् तच्च कालवशात्सुकुमारबुद्धीन्वैयाकरणान्प्राप्यास्तमुपागतम् " (वाक्यपदीय ग्रन्थावर पुण्यराजकृत टीका पहा.)

४. व्हिन्सेंट स्मिथ प्राचीन हिन्दुस्थानचा इतिहास. (पृष्ठें २०४–२०५ पहा)

महाभाष्याच्या कालाला एक अनुकूल पुरावा मिळतो. गोनर्दीय[1] शब्द महाभाष्यांत अनेक वेळां आला आहे तसाच गोणिकापुत्र[2] हाही शब्द आला आहे. हे दोनही शब्द भाष्यकार पतंजलींनीं स्वतःला उद्देशून वापरले असावे असें टीकाकारांचें मत आहे. त्यांच्या मतें गोनर्द हा भाष्यकारांचा राहण्याचा देश असावा व गोणिका हें त्यांच्या मातुःश्रींचें नांव असावें. गोनर्द हा अयोध्या प्रांतांतील एक देश असावा असें कांहीं विद्वानांचें मत आहे. भाष्यकारांनीं कात्यायनाचा दाक्षिणात्य वैयाकरण[3] असा उल्लेख केला आहे त्यावरून भाष्यकार हे उत्तरेकडील प्रदेशांत राहणारे असावे. महाभाष्यांत महाभारत, रामायण व हल्लीं उपलब्ध नसलेलीं पण त्या वेळीं अस्तित्वांत असलेलीं काव्यें व नाटकें यांतून सुंदर सुंदर उतारे घेतलेले आहेत. यावरूनही कालिदास भास वगैरे कवींच्या पूर्वीं पण रामायण व महाभारत हे ग्रंथ प्रचारांत आल्यानंतर महाभाष्यकार होऊन गेले असें निश्चित होतें.

## ११ महाभाष्यावरील भर्तृहरीची टीका.

या बहुमोल महाभाष्यग्रंथाचा कांहीं कालानें लोप झाला असें कल्हणानें आपल्या राजतरङ्गिणी ग्रंथांत विधान केलें आहे व त्याला भर्तृहरीच्या वाक्यपदीयांत भर्तृहरीनें पुष्टि दिली आहे. व्याकरणाध्यापकांमध्यें परंपरागत प्रचलित प्रवाद प्रसिद्धच आहे कीं म. म. कैयटभट्टांच्या प्रदीपानेंच महाभाष्य टिकविलें. नाहीं तर लोकांच्या अज्ञानांधकारांत तें लुप्त झालें असतें. या सर्व विधानांचें तात्पर्य इतकेंच दिसतें कीं महाभाष्य हा विद्वत्तापूर्ण ग्रंथ कितीही प्रसादयुक्त भाषेंत सुंदर रीतीनें लिहिला गेला असला तरी प्रतिपाद्य विषयाच्या अर्थगांभीर्यामुळें व व्याख्यानाची परंपरा तुटल्यामुळें तो दुर्बोध झाला. भर्तृहरीच्या व कल्हणाच्या म्हणण्याप्रमाणें चंद्र वगैरे वैयाकरणांनीं पाणिनीच्या व्याकरणाच्या अभ्यासास मदत केली व व्याख्यानग्रंथ रचिले. भर्तृहरीनें स्वतः व्याकरणमहाभाष्यावर टीका लिहिली परंतु दुर्दैवानें ती लुप्त झाली आहे, तिच्या फक्त पहिल्या थोड्या भागाची बर्लिनमध्यें एक हस्तलिखित प्रत व अडयार येथें एक अशा दोनच प्रती उपलब्ध आहेत. लघुशब्देन्दुशेखरामध्यें नागेशभट्टांनीं "सोयमक्षरसमाम्नायः पुष्पितः ... भाष्यमुपादायोक्तं भर्तृहरिणा" असा हरीचा उल्लेख करून "यथैवेदमव्युच्छिन्नं चन्द्रतारकादि एवमस्याक्षरसमाम्नायस्य न कश्चिदाधुनिकः कर्तास्ति एवमेव वेदपारम्पर्येण स्मर्यमाण०" असें एक वाक्य उद्धृत केलें आहे. तें अड्यारच्या हस्तलिखितांत फारच अशुद्ध कां होईना पण सापडतें. उपलब्ध अललेली ही भर्तृहरीची टीका पाहिली असतां ती बरीचशी विस्तृत लिहिली असावी असें दिसून येतें. त्यावरून भर्तृहरीनें महाभाष्याचें पुनरुज्जीवन केलें या म्हणण्याला पुष्टि मिळते. कांहीं शतकांनीं हीही टीका लुप्त झाली असावी किंवा पांडित्यपूर्ण असल्यामुळें अर्थबोधाला कांहीं ठिकाणीं अपुरी पडली असावी म्हणून बाराव्या शतकांत म. म. कैयटभट्टांनीं भाष्याच्या प्रत्येक पङ्क्तीचें स्वारस्य पूर्णपणें कळेल अशी पांडित्यपूर्ण "प्रदीप" नांवाची टीका लिहिली व त्यावर नागेशांनीं "उद्द्योत" नांवाची मुद्देसूद टीका लिहिली.

---

१. सूत्रें १।१।१२, १।१।२९, २।१।९२, ३।१।९२ ७।२।१०१ वरील भाष्य पहा.

२. सूत्र १।१।१५ वरील भाष्य पहा.

३. "प्रियतद्धिता दाक्षिणात्याः" ( पस्पशाह्निक "यथा लौकिकवैदिकेषु" वार्तिकावरील भाष्य ) पहा

## १२ महाभाष्यलोपासंबंधीं विवेचन.

भर्तृहरी व कल्हण यांनीं महाभाष्यलोपासंबंधीं केलेल्या विधानांचें स्पष्टीकरण करण्याचा आणखीही एक मार्ग आहे. तो म्हणजे—महाभाष्यरचनेनंतर थोडक्याच कालांत बौद्ध व जैन सूत्रग्रंथांवर अश्वघोष, असङ्ग, वसुबन्धु, नागार्जुन, उमास्वाति, कुन्दकुन्द वगैरे मोठमोठ्या विद्वानांनीं तत्त्वज्ञानाचा ऊहापोह करणारे पांडित्यपूर्ण ग्रंथ लिहिण्याचा उपक्रम केला व त्याच वेळीं मीमांसा, न्याय वगैरे शास्त्रांतील सूत्रांवर शबरस्वामि, वात्स्यायन, प्रशस्तपाद वगैरे पंडितांनीं भाष्यग्रंथ लिहिले. त्यामुळें साहजिकच या शास्त्रग्रंथांच्या अध्ययनाध्यापनाकडे त्या वेळच्या ( इ. स. १००–६०० ) विद्वानांची प्रवृत्ति झाल्यामुळें त्यांचें व्याकरणमहाभाष्याकडील लक्ष कमी झालें व मुद्रणकला अस्तित्वांत नसल्यामुळें हस्तलिखित प्रतीही दुर्मिळ झाल्या. याच गोष्टीचा उल्लेख कल्हण व भर्तृहरि यांनीं महाभाष्यलोप या शब्दानें केला आहे व भर्तृहरीनें सातव्या शतकांत महाभाष्यावर महाभाष्यप्रदीपिका नांवाची सुंदर टीका लिहून व वाक्यपदी-यासारखा उत्तम अर्थग्रंथ लिहून महाभाष्याचेंच नव्हे तर व्याकरणशास्त्राचें पुनरुज्जीवन केलें. व्याकरणशास्त्रांतील आपाततः नीरस व दुर्बोध ग्रंथांपेक्षां मीमांसा वेदान्त वगैरे शास्त्रांतील तत्त्वज्ञानपर ग्रंथांकडे लोकांचा कल साहजिकच ज्यास्त असल्यामुळें थोडक्याच कालांत कुमा-रिलभट्ट, शंकराचार्य, वाचस्पतिमिश्र, उदयनाचार्य, समन्तभद्र, अकलङ्कदेव वगैरे विद्वानांनीं लिहिलेल्या ग्रंथांकडे ( इ. स. ६००–११०० ) लोकांची प्रवृत्ति होऊन पुन्हां व्याकरणशा-स्त्राचें अध्ययनाध्यापन मागें पडलें व त्याचें पुनरुज्जीवनाचें काम महाविद्वान् कैयटभट्ट यांनीं बाराव्या शतकांत महाभाष्यप्रदीप लिहून केलें. त्यानंतर मात्र, पाणिनिसूत्रांवर काशिकेसारखी उत्तम वृत्ति व तिच्यावर पदमञ्जरी आणि न्यास या टीका तसेंच महाभाष्यावर भर्तृहरीची टीका व कैयटांचा प्रदीप इत्यादि ग्रंथ लिहिले गेल्यामुळें व्याकरणशास्त्राची दुर्बोधता कमी झाली आणि अध्ययनाध्यापनाला स्थिरता आली आणि भरतखंडांत सर्वत्र व्याकरणग्रंथांचें अध्ययन सुरू झालें इतकेंच नव्हे तर मीमांसा, न्याय, वेदान्त वगैरे शास्त्रांचा गाढ अभ्यास ज्या रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, मम्मट, जगन्नाथ वगैरे महापंडितांनीं केला त्यांनींही " मुखं व्याकरणं प्रोक्तं " या न्यायाचा अवलंब करून प्रथमतः व्याकरणशास्त्राचें उत्तम अध्ययन केलें. याचा पुरावा त्यांच्या ग्रंथांत ठिकठिकाणीं आढळतो. व्याकरण शास्त्रावर प्रक्रियाकौमुदी, सिद्धान्तकौमुदी वगैरे प्रकरणग्रंथ लिहिले गेले तसेंच वैयाकरणभूषण वगैरे अर्थग्रंथही लिहिले गेले; तरी पण कांहीं जी उणीव राहिली ती भरून काढण्याची कामगिरी अठराव्या शतकाचे आरंभीं नागे-शभट्टांनीं शेखर मंजूषा व उद्द्योत यांसारखे ग्रंथ लिहून उत्तम प्रकारें बजावली.

# भारतांतील शास्त्राध्ययन व शास्त्रग्रंथनिर्मिति ( १३–१८ )

## १३. नागेशभट्टांचे पूर्वींची उपलब्ध गुरुशिष्यपरंपरा.

या नागेशभट्टांचा गुरुशिष्यपरंपरेनें प्रतिष्ठान ( पैठण ) येथील विद्यापीठाचे कुलगुरु रामेश्वरभट्ट यांच्याशीं संबंध येतो. रामेश्वरभट्ट यांचा विजयानगर राज्यांतील १४ व्या शतकांतील युगपुरुष सायणमाधव यांच्याशींही शिष्यपरंपरेनें संबंध येतो असें ऐकिवांत आहे. या रामेश्वर-भट्टांचे एक शिष्य महेश ठक्कुर हे दरभंगा संस्थानचे आद्य अधिपति होत. तसेंच अद्वैतसिद्धि,

सिद्धांतबिन्दु वगैरे ग्रंथांचे कर्ते मधुसूदनसरस्वती हे रामेश्वरभट्टांचे प्रशिष्य म्हणून समजले जातात. वैशेषिकसूत्रोपस्कारकर्ते शंकरमिश्र हे रामेश्वरभट्टांचे शिष्य गणिले जातात. रामेश्वर-भट्टांचे चिरंजीव नारायणभट्ट हेही वडिलांच्या बरोबरीचे महाविद्वान् धर्म व मीमांसा या शास्त्रांत पारंगत होते. त्यांचा प्रयोगरत्न हा ग्रंथ नारायणभट्टी या नांवानें प्रसिद्ध व सर्वमान्य आहे. नारायणभट्टांचीही शिष्यपरंपरा मोठी होती. त्यांचेच वंशज महामीमांसक गागाभट्ट हे राजे शिवाजी यांच्या वेळीं सर्वप्रसिद्धच होते. भट्टोजी दीक्षित हे नारायणभट्टांचे प्रशिष्य समजले जातात. भट्टोजी दीक्षितांचे नातू हरिदीक्षित हे नागेशभट्टांचे गुरुजी होत. हे नागेशभट्ट मूळचे तासगांवचे राहणारे काळे उपनांवाचे देशस्थ ब्राह्मण. त्यांचा काल साधारणपणें इसवी शतक सतरावें समजला जातो. त्यांच्या लोकोत्तर प्रतिभेच्या पुष्कळ आख्यायिका सांगण्यांत येतात. काशीमध्यें त्यांनीं विद्याभ्यास केला. त्यांना प्रतापगड ( अयोध्याप्रांत ) व शृंगबेरपुर येथील राजांचा आश्रय होता. नागेशभट्टांनी निरनिराळ्या शास्त्रांत मार्मिक टीकाग्रंथ लिहिले व लघुमञ्जूषेसारखे उत्तम निबंध लिहिले. थोडक्यांत पण मुद्देसूद लिहिणें हा त्यांच्या ग्रंथांचा विशेष गुण दृष्टीस पडतो. त्यांनीं एकंदर बारा शेखर व बारा उद्द्योत लिहिले अशी आख्यायिका आहे. नागेशांनीं आपल्या गाढ विद्वत्तेनें व प्रतिभेनें कांहीं ठिकाणीं हरदत्त, भट्टोजी दीक्षित वगैरे विद्वानांशीं मतभेद प्रदर्शित करून आपले सिद्धान्त असे निर्विवादपणें मांडले कीं त्यांचा व्याकरणांतील नव्यमतसंस्थापक या संज्ञेनें पुढील वैयाकरण उल्लेख करूं लागले.

## १४. नागेशभट्टांनंतरची गुरुशिष्यपरंपरा.

नागेशभट्टांच्या शिष्यवर्गापैकीं वैद्यनाथ पायगुंडे हे प्रमुख शिष्य होते. नागेशांच्या परिभाषेन्दुशेखरावर वैद्यनाथ पायगुंडे यांनीं “ गदा ” नांवाची टीका लिहिली. शब्देन्दुशे-खरावरही “ चिदस्थिमाला ” नांवाची त्यांनीं उत्तम टीका लिहिलेली प्रसिद्ध आहे. पुण्यांतील पेशवे दरबारचे प्रख्यात पंडित नीळकंठशास्त्री थत्ते हे पायगुंडे यांचे शिष्य होते. नीळकंठशास्त्री थत्ते यांचा शिष्यपरिवार फार मोठा होता. दूरदूरच्या ठिकाणाहून त्यांचेकडे येऊन पुष्कळ लोकांनीं शास्त्राभ्यास केला. त्यांपैकीं पुण्याचे मोरशास्त्री साठे, मेरुशास्त्री गोडबोले, कुप्पाशास्त्री द्रवीड व विष्णुशास्त्री भट, वाईचे गोविंदाचार्य अष्टपुत्रे आणि साताऱ्याचे राघवेन्द्राचार्य गजेंद्रगडकर व भास्करशास्त्री अभ्यंकर हे प्रसिद्ध होते. या सर्वांचाही शिष्यपरिवार मोठा होता. राघवेन्द्राचार्यांच्या शिष्यांमध्यें नारायणाचार्य, रामाचार्य, अनंताचार्य व अनंतशास्त्री पेंढारकर ( इ. स. १८००–१८७५ ) हे येतात. डॉ. कीलहॉर्न हे पेंढारकरांचे शिष्य होते. तसेंच कृष्णशास्त्री चिपळुणकर हे मोरशास्त्री साठे यांचे शिष्य होते. भास्करशास्त्री अभ्यंकर ( इ. स. १७८३–१८७१ ) यांच्या शिष्यांपैकीं नाणावलेले शिष्य म्हणजे काशी-नाथशास्त्री अष्टपुत्रे, नारायणशास्त्री गोडबोले, अनंतशास्त्री पेंढारकर, रामशास्त्री गोडबोले व बाबाशास्त्री काळे हे होते. यांपैकीं काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे यांनीं काशी येथें जाऊन शिष्य-परंपरा स्थापन केली. त्यांचे शिष्य राजारामशास्त्री कार्लेकर व त्यांचे शिष्य बाळशास्त्री रानडे. बाळशास्त्री रानडे यांच्या शिष्यवर्गांत प्रत्यक्ष शिष्य या नात्यानें काशीच्या गंगाधरशास्त्री मानवल्ली ( तेलंग ), शिवकुमारशास्त्री, दामोदरशास्त्री भारद्वाज, तात्याशास्त्री पटवर्धन, विश्व-नाथ दण्डिभट्ट, स्नेहिरामशास्त्री या महावैयाकरणांची व प्रशिष्य म्हणून शिवनारायणशास्त्री, गुरुप्रसादशास्त्री, गणपतिशास्त्री मुकाटे यांची गणना होते. नेपाळचे महाविद्वान् राजपंडित हेमराज हे गंगाधरशास्त्री मानवल्ली यांचे शिष्य होतात. महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री हे

रामशास्त्री यांचे शिष्य होत. सांगावयाचें तात्पर्य इतकेंच कीं, गेल्यां पांच शतकांतील विद्वद्वंशाच निरीक्षण केल्यास इसवी सनाच्या चवदाव्या व पंधराव्या शतकांत विजयानगर, सोळाव्या शतकांत प्रतिष्ठान ( पैठण ), सतराव्या शतकांत अकबर तोरडमल्ल वगैरे राज्यकर्त्यांच्या सहानुभूतीनें व विद्याप्रेमानें काशी, अठराव्या शतकात पेशव्याच्या आश्रयानें पुणें व त्यानंतर १९ व २० या शतकांत पुणें, वाई, सातारा, काशी, दरभंगा, इंदूर, नागपुर, धार, म्हैसूर इत्यादि अनेक ठिकाणें त्या त्या ठिकाणीं मिळालेल्या राजाश्रयानुरूप संस्कृतविद्येचीं केंद्रें होत गेलीं.

## १५. भारतांतील विद्येचें वैशिष्टय.

याप्रमाणें रामेश्वरभट्टांपासून ते थेट आजपर्यंत शास्त्रांचें अध्ययनाध्यापन करणाऱ्यांची गुरुशिष्यपरंपरा देण्यांत येते व त्यावरून भारतांत निरनिराळ्या बोलभाषा निरनिराळीं राज्यें व राज्यकर्ते असूनही संस्कृताध्ययनाचे बाबतींत सर्व भारताचें अविभाज्यत्व कसें होतें याची स्पष्ट कल्पना पूर्णपणें येऊं शकते. या अविभाज्यत्वाचें कारण विद्वानांची बोधभाषा सर्वत्र संस्कृत हीच होती व सर्व देशभर आगमग्रंथांप्रमाणें आचार, स्मृतिग्रंथांप्रमाणें व्यवहार व शास्त्रग्रंथांप्रमाणें विचार चालू होते. जरी निरनिराळ्या शास्त्रग्रंथांमध्यें विचारांची पुष्कळ भिन्नता दिसली तरी तत्त्वज्ञाननिरूपण हा सर्व शास्त्रांचा व दर्शनांचा एकच विषय होता. तसेंच तें तत्वज्ञान मिळविण्याचें साधन आचार व त्या तत्वज्ञानाचें फल मोक्ष हें सर्व शास्त्रांना सारखेंच असल्यामुळें सर्व शास्त्रांमध्यें एक प्रकारचें ऐक्य होतें व म्हणून युगप्रवर्तक महाविद्वानही अनेक शास्त्रांचा समन्वित अभ्यास करीत व अध्यापन व ग्रंथनिर्मितीही करीत. अशा रीतीनें पाहिलें असतां इसवी सनापूर्वी दुसऱ्या शतकांत झालेल्या पतंजलीपासून आजतागायत २२०० वर्षांमध्यें युगप्रवर्तक विद्वानांनीं शास्त्राध्ययनाची परंपरा भारतांत जशी राखली तशी दुसऱ्या कोणत्याही देशांत राखलेली सांपडणें कठीण आहे.

## १६. पतंजलीपासून शंकराचार्यांपर्यंत युगप्रवर्तक विद्वान्

इसवी सनापूर्वी दुसऱ्या शतकांत भगवान् पतंजलींनीं "व्याकरणमहाभाष्य" रचिलें. त्यानंतर इसवी सनापूर्वीच्या पहिल्या शतकांत शबरस्वामींनीं पूर्वमीमांसासूत्रांवर "शाबरभाष्य" लिहिलें. इसवी सनाच्या पहिल्या शतकांत ईश्वरकृष्णांनीं "सांख्यकारिका" लिहिल्या व व्यासांनीं "योगसूत्रभाष्य" लिहिलें. याच वेळीं उमास्वातींनीं जैनतत्त्वज्ञान थोडक्यांत समजावून देणारें सभाष्य "तत्वार्थसूत्र" लिहिलें. दुसऱ्या शतकांत नागार्जुनांनीं बौद्धतत्त्वज्ञानावर "माध्यमिककारिका" व "माध्यमिकवृत्ति" हे ग्रंथ लिहिले. तिसऱ्या शतकांत वात्स्यायनानें "न्यायसूत्रभाष्य" लिहिलें. चवथ्या शतकांत असंग व वसुबंधु यांनीं बौद्ध विज्ञानवादाचें निरूपण करणारे "योगाचारभूमिशास्त्र", "प्रज्ञापारमिता" वगैरे ग्रंथ लिहिले. पांचव्या शतकांत प्रशस्तपादांनीं कणादाच्या वैशेषिक सूत्रांवर भाष्य लिहिलें. सहाव्या शतकांत दिङ्नागाचार्य यांनीं बौद्ध न्यायावर व सिद्धसेनदिवाकर यांनीं जैन न्यायावर व उद्द्योतकारांनीं न्यायशास्त्रावर मार्मिक ग्रंथ लिहिले. सातव्या शतकांत भर्तृहरीनें "वाक्यपदीय" व "व्याकरण-महाभाष्य-प्रदीपिका" हे ग्रंथ लिहिले. आठव्या शतकांत कुमारिलभट्टांनीं सामाजिक व धार्मिक प्रश्नांचा ऊहापोह करणारें "तन्त्रवार्तिक" लिहिलें व पूर्वमीमांसाशास्त्राचें पुनरुज्जीवन केलें. याच सुमारास पूज्यपाद अकलङ्कदेव व विद्यानन्दिन् यांनीं जैनदर्शनावर व धर्मकीर्ति व धर्मोत्तर यांनीं बौद्धदर्शनावर पांडित्यपूर्ण ग्रंथ लिहिले.

## १७. शंकराचार्यांपासून माधवाचार्यांपर्यंत युगप्रवर्तक विद्वान्.

आठव्या शतकाचे शेवटीं व नवव्या शतकाचे आरंभीं श्रीशंकराचार्यांनीं उपनिषत्प्रतिपादित तत्त्वज्ञानाचें पूर्ण विवेचन करून व भिन्न भिन्न वेदान्तवाक्यांचा समन्वय करून अल्प कालावधींत " ब्रह्मसूत्रभाष्य ", " गीताभाष्य ", " उपनिषद्भाष्य " यांसारख्या उत्कृष्ट ग्रंथांची बहुमोल संपत्ति भरतखंडास अर्पण केली हें सर्वविश्रुत आहे, व हेंच तत्त्वज्ञान स्थिर करण्याची कामगिरी आचार्यांचे शिष्य वाचस्पतिमिश्र यांनी विद्वत्तापूर्ण ग्रंथ लिहून उत्तम प्रकारें बजावली. दहाव्या शतकांत व्याकरणसूत्रांवर जयादित्य व वामन यांनीं " काशिकावृत्ति " लिहिली व पार्थसारथिमिश्रांनीं मीमांसाभाष्यावर " शास्त्रदीपिका " लिहिली. याच वेळीं हरिभद्रसूरींनीं जैनदर्शनाचें विवेचन करणारे अनेक ग्रंथ लिहिले व श्रीधरानें न्यायकन्दली तशीच उदयनानें " न्यायकुसुमांजलि " यासारखे ग्रंथ लिहून न्यायशास्त्राच्या ग्रंथांत चांगली भर घातली. अकराव्या शतकांत श्रीरामानुजाचार्यांनीं उपनिषदांतील अद्वैताचें भक्तिप्रधान लोकांना लवकर पटेल अशा रीतीनें वास्तववादास अनुसरून विशिष्टाद्वैत नांवानें निरूपण केलें व त्यानंतर लागलींच बाराव्या शतकांत पूर्णप्रज्ञ आनंदतीर्थांनीं उपनिषदांतील तत्त्वज्ञानाचें भक्तिरसप्रधान व विष्णुभक्तांना पूर्णपणें रुचेल अशा रीतीनें निरूपण केलें. याच वेळीं म. म. कैयटभट्टांनीं व्याकरण-महाभाष्यावर " प्रदीप " लिहून महाभाष्यांतील प्रत्येक पङ्क्तीचें पूर्ण स्पष्टीकरण केलें. तसेंच हेमचन्द्र आचार्यांनींही अनेक विषयावर ग्रंथ लिहून जैन तत्त्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथांत चांगली भर घातली. याच नवव्या ते बाराव्या अशा चार शतकांत अभिनवगुप्त, वसुगुप्त, कल्लट, उत्पल व क्षेमराज यांनीं शैवतत्त्वज्ञानपर असे अनेक ग्रंथ लिहिले. तेराव्या शतकांत गंगेशोपाध्यायांनीं न्यायशास्त्राला एक विशिष्ट प्रकारची दृष्टि देऊन चालना दिली व " तत्त्वचिंतामणि " ग्रंथ लिहून नव्य न्यायाची स्थापना केली. या नव्य न्यायाचा प्रसार बंगालमध्यें नवद्वीप येथें म म. रघुनाथपंडित, म. म. वासुदेव सार्वभौम व म. म. गदाधर यांनीं पांडित्यपूर्ण ग्रंथ लिहून केला व त्यांचा परिणाम इतर शास्त्रग्रंथांवर होऊन त्यांमधील विषयांचें विवेचन व प्रतिपादन परिष्कारपद्धतीनें होऊं लागलें हें सर्वश्रुतच आहे.

## १८. माधवाचार्यांनंतरचे युगप्रवर्तक विद्वान्.

याप्रमाणें अव्याहत १५ शतकें वृद्धिंगत होत असलेल्या दर्शनग्रंथांच्या भांडाराचें सूक्ष्म अवलोकन करून सोळा दर्शनांचा समन्वययुक्त संग्रह करण्याचें अवघड पण बहुमोल असें काम माधवाचार्यांनीं चवदाव्या शतकांत " सर्वदर्शनसंग्रह " नांवाचा ग्रंथ लिहून केलें. या ग्रंथाचें, व ज्या मूळ ग्रंथांचा आधार घेऊन हा ग्रंथ रचिला त्या ग्रंथांचें, पूर्ण परिशीलन केलें असतां भारत देशांतील तत्त्वज्ञान व धर्म यांचे प्रवाह जरी निरनिराळे असले तरी त्या सर्वांचें मूळ एकच आहे व त्यांचा अंत म्हणजे फल एकच आहे हें विद्वानांच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. पंधराव्या शतकांत वल्लभाचार्यांनीं "अणुभाष्य" लिहून शुद्धाद्वैत संप्रदाय निर्माण केला तर सोळाव्या शतकांत जगन्नाथरायांनीं भाषासौष्ठवयुक्त काव्यें व रसगंगाधरासारखा साहित्यशास्त्रावर विद्वत्तापूर्ण ग्रंथ लिहून लोकांमध्यें साहित्यशास्त्राभिरुचि निर्माण केली. याच सुमारास विद्वानांची प्रवृत्ति अनेक शास्त्रांचें समन्वित अध्ययन व अध्यापन करण्याकडे झाली व पंधराव्या शतकांत दक्षिणेंतील प्रतिष्ठान ( पैठण ) येथील पुरातन विद्यापीठाचे कुलगुरु रामेश्वरभट्ट यांनीं

मीमांसा, व्याकरण, न्याय, व वेदान्त या शास्त्रांचें अनेक छात्रांना विद्यादान करून सर्व देशभर निरनिराळ्या ठिकाणीं शास्त्राध्ययनाचें काम चालू केलें. या कामाला मदत अनेक शास्त्रांवर टीका व निबंधग्रंथ लिहून अप्पयदीक्षित व विज्ञानभिक्षु यांनीं सोळाव्या शतकांत, मधुसूदन-सरस्वती व गदाधर पंडित यांनीं सतराव्या, व नागेशभट्टांनीं अठराव्या शतकांत केली. एकोणिसाव्या शतकांत दक्षिणेंत सातारा येथें राघवेन्द्राचार्य व भास्करशास्त्री यांनीं आणि काशी येथें भास्करशास्त्री यांचे प्रशिष्य बालसरस्वती यांनीं अनेक शिष्यांना पढवून शास्त्राध्ययनाला चालना दिली. सांप्रत सर्व भारत देशभर ठिकठिकाणचे प्रसिद्ध शास्त्री व पंडित हे राघवेन्द्राचार्य, भास्करशास्त्री व बालसरस्वती या त्रयीच्या शिष्यपरंपरेंत येतात. विद्वद्वर्य वासुदेवशास्त्री यांनीं या विसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत शास्त्रग्रंथांचें अध्यापन व ग्रंथनिर्मिति हीं दोनही कामें वरतीं निर्दिष्ट केलेल्या विद्वत्परंपरेला साजतील अशा रीतीनें पार पाडलीं.

## व्याकरणमहाभाष्याचें भाषांतर (१९-२४)

### १९. महाभाष्याचें भाषांतर करण्याची आवश्यकता.

या व्याकरणशास्त्रांतील नव्यमतप्रवर्तक नागेशभट्टांच्या विशाल शिष्यपरंपरेंत जरी व्याकरणशास्त्राचें अध्ययनाध्यापन अनेक ठिकाणीं चालू असलें तरी प्रचलित देशभाषा व इंग्रजी भाषा यांमध्यें लिहिलेल्या ग्रंथांचें अध्ययन करण्याकडे विद्वान् व विद्याप्रेमी लोकांचीं विशेषतः प्रवृत्ति असल्यामुळें, व द्रव्यार्जनाचें साधन म्हणून भौतिक शास्त्राध्ययनाची प्रत्यक्ष उपयुक्तता दिसून येत असल्यामुळें या विसाव्या शतकांत शास्त्राध्ययनाकडे लोकांची प्रवृत्ति दिवसानुदिवस कमी होत आहे व व्याकरणशास्त्राकडे तर जवळजवळ नाहींशीच होत आहे. कैयटभट्टांचा महाभाष्यप्रदीप व नागेशभट्टांचा उद्द्योत यांसारखे उत्तम विवेचन करणारे ग्रंथ असूनही महाभाष्याचें अध्ययन वरील कारणांमुळें अत्यंत कमी झालें. हा वरील महाभाष्याचा एक प्रकारचा लोपच झाला असें मानून त्याचें तिसऱ्यानदां पुनरुज्जीवन करण्याकरितांच कीं काय विद्वद्वर्य म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं आजपर्यंत कोणत्याही भाषेंत अनुवाद न झालेल्या या व्याकरण महाभाष्याचा मराठी भाषेंत अनुवाद करण्यास इसवी सन १९३० सालीं सुरवात केली व १९४८ सालीं तें काम संपविलें. बहुमोल व सर्व भाष्यांमध्यें श्रेष्ठ अशा या महाभाष्याचें इतर भाषांमध्यें भाषांतर न होण्याचें मुख्य कारण म्हणजे भाष्याच्या प्रत्येक पङ्क्तीच्या अर्थावर प्रकाश पाडणारा प्रदीप, व उजळा देणारा उद्द्योत हे ग्रंथ संस्कृतज्ञांच्या नजरेपुढें असल्यामुळें त्यांना भाषांतराची जरूरच भासली नाहीं. दुसरें कारण म्हणजे व्याकरणाध्ययन करणाऱ्या लोकांची संख्या अगदींचे कमी व भाष्यग्रंथाच्या प्रतिपाद्य विषयाचें पूर्ण आकलन होऊन त्याचें बिनचूक भाषांतर करणें हें काम अत्यंत अवघड अशी स्थिति असल्यानें कोणी साधारण विद्वान तें अंगावर घेऊं शकले नाहींत. शिवाय, व्याकरण हें सहा वेदांगांमध्यें प्रधान वेदांग समजलें गेल्यामुळें पाणिनि, कात्यायन व पतंजलि या तीन महर्षींनीं रचिलेले ग्रंथ हे सर्व प्रकारें वेदासारखेच पवित्र समजले गेल्यामुळें वेदाप्रमाणेंच त्यांच्या दर एक शब्दाला व अक्षराला पावित्र्य आलें व भाषांतर केल्यास मूळ ग्रंथ सोडून भाषांतर वाचण्याकडेच प्रवृत्ति होऊन मूळ ग्रंथाचें शब्दशः पठण लुप्त होईल ही भीतीही आजपर्यंत या ग्रंथाचें भाषांतर न होण्याचें कारण असू शकेल. भाषांतराचा उपयोग व महर्षि शब्दाचा अर्थ यांविषयीं गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांनीं लिहिलेले विचार खालीं देत आहे.—

## २०. भाषांतर वाचणाऱ्याची पूर्व तयारी.

" साधारणपणें कोणतेंही पुस्तक वाचणें झाल्यास ज्या वाचकाला त्या पुस्तकासंबंधीं सामान्य माहिती असेल त्याला त्या पुस्तक वाचण्यापासून जसा फायदा होईल तसा सामान्य माहिती नसलेल्या वाचकाला होणार नाहीं. सामान्य माहिती म्हणजे ' या पुस्तकामध्यें अमुक शास्त्रांतील अमुक विषयाचें अमुक दिशेनें प्रतिपादन केलें आहे ' ही होय. कारण, सामान्य माहिती असलेला मनुष्य त्या विषयाची विशेष माहिती व्हावी या उद्देशानेंच तें पुस्तक वाचण्यास प्रवृत्त होतो. त्यामुळें विशेष माहितीकडेच त्याचें लक्ष असतें. सामान्य माहिती नसलेल्या एखाद्या मनुष्यानें जर तें पुस्तक वाचावयास घेतलें तर ' त्या पुस्तकाचा कर्ता अमुक आहे ', ' मोठे मोठे लोक त्या पुस्तकाची थोरवी गातात ' इत्यादि बाह्य गोष्टी पाहूनच त्याची प्रवृत्ति झालेली दृष्टीस पडते. तात्पर्य, वाचकाची जशी भावना असेल तसें त्याचें लक्ष असतें व जसें लक्ष असेल तसा त्याचे मनांत ठसा उमटतो.

## २१. भाषांतर वाचणाऱ्याची योग्यता.

" आतां भाषांतर वाचतांना तें वाचण्याचे पूर्वीं वाचकाला जें सामान्य ज्ञान पाहिजे तें ज्याचें भाषांतर केलें असेल त्या मूळ ग्रंथासंबंधानें असलें पाहिजे. आतां येथें अशी शंका उत्पन्न होते कीं मूळ ग्रंथासंबंधानें सामान्य ज्ञान असलेल्या मनुष्याला मूळ ग्रंथाची भाषा अवगत असलेलीच पाहिजे, त्याशिवाय त्याला सामान्य ज्ञान होणारच नाहीं; आणि ज्याला मूळ ग्रंथाची भाषा अवगत आहे तो भाषांतर पाहणारच नाहीं, कारण मूळ ग्रंथाची भाषा अवगत नसेल तोच मनुष्य भाषांतर पाहात असतो; पण ही शंका बरोबर नाहीं. कारण, ज्याला मूळ ग्रंथाची भाषा अवगत असेल त्याला जसा भाषांतराचा उपयोग होतो तसा ती भाषा अवगत नसलेल्या मनुष्याला त्या भाषांतरापासून होत नाहीं. आतां ज्याला मूळ ग्रंथाची भाषा अवगत आहे त्याची जी भाषांतरवाचनाकडे प्रवृत्ति होते तिचा उपयोग काय असें जर कोणी म्हणेल तर उपयोग सांगतों—

दुर्बोधमूलग्रन्थस्य यत्रार्थो न प्रकाशते ।
तत्र भाषान्तरे दृष्टे शीघ्रमर्थः प्रकाशते ॥ १ ॥

मूलग्रन्थस्य यत्रार्थे मतिः संशयिता भवेत् ।
तत्र भाषान्तरे दृष्टे निश्चितार्था भवेन्मतिः ॥ २ ॥

मूलग्रन्थात्प्रथमतो मिथ्यार्थश्चेत्प्रकाशते ।
तत्र भाषान्तरे दृष्टे शीघ्रं सत्यार्थबोधनम् ॥ ३ ॥

मूलग्रन्थार्थ आक्षिप्तो यत्र बुद्धौ समुद्भवेत् ।
क्वचिदाक्षेपशून्या स्यात्तत्र भाषान्तरान्मतिः ॥ ४ ॥

## २२. भाषांतराचा उपयोग.

" ज्या मनुष्याला मूळ ग्रंथाची भाषा उत्तम अवगत असून ज्याची बुद्धीही उत्तम आहे व म्हणून मूळ ग्रंथ पाहिल्याबरोबर त्याचा खरा अर्थ निश्चयानें ज्याच्या मनांत

येतो त्याला भाषांतराची कांहींही जरूर नाहीं हें खरें. पण मूळ ग्रंथाच्या भाषेचें साधारणच ज्ञान ज्याला आहे व जो उत्तम बुद्धिमान् नाहीं त्याला दुर्बोध स्थलीं मूळ ग्रंथाचा अर्थ मनांत येणार नाहीं; त्याला भाषांतराची जरूर लागते. तसेंच ज्याला मूळ ग्रंथाचा अर्थ मनांत उतरला तरी त्यानंतर संशय उत्पन्न होतो तो मनुष्यही भाषांतर पाहण्याकडे प्रवृत्त होतो. कारण कीं, दुर्बोध स्थलीं सुद्धां भाषांतरामुळें मूळ ग्रंथाचा अर्थ चटदिशीं मनांत येतो व त्यासंबंधीं निश्चय होतो. तसेंच, भाषांतरावरून मूळ ग्रंथाचा सरळ अर्थच प्रथमतः मनुष्याच्या मनामध्यें येतो. त्यामुळें कांहींतरी शुष्क व भलतेसलते आक्षेप उद्भवत नाहींत. एकंदरीत, भाषांतराच्या वाचकाला मूळ ग्रंथाच्या भाषेचें साधारण ज्ञान असावेंच लागतें. ग्रंथाच्या भाषेचें ज्ञान ज्याला मुळींच नाहीं त्यानें भाषांतर न पाहतां भाषेंतील त्या विषयाचें स्वतत्र ग्रंथ पहावे. त्याला स्वतंत्र ग्रंथांपासून जसा उपयोग होईल तसा भाषांतरापासून होणार नाहीं. कारण, भाषांतर-कर्त्याला वाचकाला उपयोगीं पडण्यासारखें असें आपल्या कल्पनेनें वाटेल तें लिहितां येत नाहीं. भाषान्तरकर्ता हा एक प्रकारें मूळ ग्रंथाच्या अधीनच असतो.

## २३. भाषांतर व टीकाग्रंथ यांमधील भेद.

“ भाषांतर आणि टीकाग्रंथ या दोहोंची स्थिति सारखीच आहे. भाषांतराकडे भाषांतर या दृष्टीनें जो पाहतो तोच खरा भाषांतराचा वाचक होय. तेव्हां अर्थातच त्याला दोन्ही भाषांचें ज्ञान असलें पाहिजे. टीकाग्रंथाचीही तशीच स्थिति आहे. टीकाग्रंथ वाचणारा मनुष्य टीका या रूपानें जो पहातो तोच खरा टीका वाचणारा मनुष्य होय. तेव्हां अर्थातच त्याला मूळ आणि त्याची टीका या दोहोंची भाषा यावी लागते. आतां जरी मूळ ग्रंथ ज्या भाषेमध्यें असतो त्याच भाषेमध्यें त्याची टीका लिहिलेली प्रायः दृष्टीस पडते तरी कांहीं टीका-ग्रंथ मूळापेक्षां निराळ्या भाषेमध्यें लिहिलेलेही असतात; आणि केव्हां केव्हां जरी मूळ ग्रंथ आणि त्याची टीका या दोहोंची भाषा एकच असली तरी त्या दोहोंच्या भाषेमध्यें फरक आढळून येतो. कारण, कांहीं काल मध्यें गेला म्हणजे भाषेमध्यें फरक हा होतोच. ज्यास्त काल गेला म्हणजे ज्यास्तच फरक होतो. तो इतका कीं त्यामुळें केव्हां केव्हां तर तीच भाषा असली तरी निराळ्या भाषेसारखी वाटूं लागते. याला उदाहरण म्हणजे वेदाची भाषा आणि त्याच्या टीकेची म्हणजे सायणाचार्योनीं केलेल्या भाष्याची भाषा. या दोनही जरी एकच म्हणजे संस्कृतच आहेत तरी त्या दोहोंमध्यें फरक किती आहे तें संस्कृतभाषेचें व्याकरण लिहिणारा जो पाणिनि त्यालासुद्धां वेदाचें व्याकरण लिहितांना वेदाच्या संस्कृत भाषेचे निराळेच कांहीं नियम ‘ छन्दसि ’ असें म्हणून द्यावे लागले एवढ्यावरून सहज ध्यानांत येईल. कांहीं ठिकाणीं मूळ आणि टीका या दोहोंच्या भाषेमध्यें इतका फरक जरी दृष्टीस पडत नाहीं तरी थोडा तरी फरक असतोच. अनादिसिद्ध वेद हे पाणिनीच्या पूर्वींचे असल्यामुळें त्यांतील प्रयोगांना अनुसरून वेदापुरते कांहीं ठिकाणीं निराळे नियम पाणिनीला करावे लागले. वेदानंतर पाणि-नीपर्यंत पुष्कळच काल गेला असल्यामुळें स्वभावतःच जो भाषेमध्यें फरक झाला होता तो पाहून त्याप्रमाणें व्याकरणाची कल्पना पाणिनीनें केली. एकंदरींत पाणिनीच्या पूर्वींचे जे ग्रंथकार त्यांनीं कालामुळें फरक झालेल्या भाषेला अनुसरून ग्रंथ लिहिले. जे ग्रंथकार पाणिनीनंतर झाले त्यांनीं तर पाणिनीनें केलेल्या व्याकरणाला अनुसरूनच ग्रंथ लिहिले. तेव्हां पाणिनीच्या पूर्वींचे आणि पाणिनीच्या नंतरचे असे दोन्ही प्रकारचे जे पाणिनीच्या जवळचे ग्रंथकार त्यांची भाषा सारखीच असली पाहिजे.

## आचार्य व महर्षि शब्दांचें विवेचन ( २४–२९ )

### २४. महर्षि शब्दाचा अर्थ.

"ह्या व्याकरणशास्त्रावर विवेचन करणारे मूळचे तीन लोकोत्तर प्रतिभाशाली ऋषि पाणिनि, कात्यायन आणि पतञ्जलि हे लोकांत प्रसिद्धच आहेत. सूत्र, वार्तिक, भाष्य, संग्रह, वृत्ति, वाक्यपदीय व प्रदीप ह्या ग्रंथांना व्याकरण शास्त्रांतील आकरग्रंथ म्हणतात. नंतर झालेले काशिका, तिच्यावरील टीका पदमञ्जरी व न्यास, प्रक्रियाकौमुदी, सिद्धान्तकौमुदी, तत्त्वबोधिनी, मनोरमा, शब्दकौस्तुभ, वैयाकरणभूषण, परिभाषेन्दुशेखर, लघुशब्देन्दुशेखर, आणि मञ्जूषा हे ग्रन्थ आहेत. ह्या तीन ऋषींनां आचार्य असेंही म्हणतात. ( आचार्याचें लक्षण पुढें येईलच ). हे तीन ऋषी "महर्षि" या पदानें संबोधिले जातात. या महर्षि शब्दाविषयीं अभियुक्तांनीं असें म्हटलें आहेः—

नेशसृष्ट्या जीवसृष्टिरनुवर्त्या कदाचन ।
नारीवेषधरस्यापि नैव पुंसः स्तनोद्गमः ॥ १ ॥
महर्षिरपवादोऽत्र स हि जीवोऽपि तत्कृतिः ।
ईशसृष्ट्याऽनुगन्तव्या भवत्येवेति कल्पये ॥ २ ॥
सत्या भवति लोके वाङ् मुखाद्यस्य विनिर्गता ।
तमेतमृषिशार्दूलं महर्षिं कवयो विदुः ॥ ३ ॥

याचा अर्थः—ईशसृष्टीनें जीवसृष्टि ही अनुवर्तनीय कधींही होत नाहीं. असें पहा कीं, स्त्रीचा वेष घेतला म्हणून त्या पुरुषाला स्तनोद्गम होईल काय ? स्तनोद्गम ही ईशसृष्टि होय; आणि स्त्रीवेष धारण करणें ही जीवसृष्टि होय. ह्या नियमाला महर्षि अपवाद आहेत. जीव असून सुद्धां ज्याच्या कृतीला ईश्वर अनुसरत असतो तसेंच ज्याच्या तोंडांतून निघालेले शब्द लोकामध्यें खरेच होतात त्या मुनिश्रेष्ठाला महर्षि असें कवी म्हणतात.

### २५. महर्षि रामशास्त्री यांची गुरुभक्ति.

"या लक्षणावरून गुरुवर्य रामशास्त्री गोडबोले यांची आठवण झाल्याशिवाय व त्यांच्या संबंधानें चार शब्द लिहिल्याशिवाय राहवत नाहीं. म्हणून वाचकवर्गाची परवानगी आहे असें समजून त्यांच्या संबंधानें व त्यांच्या विद्यागुरूंच्या संबंधानें चार शब्द लिहितों. शिवाय, पुण्यश्लोक गुरुचरणाचे स्मरणानें वाचकवर्गाचें कल्याणच होणार आहे. हेंही विसरतां येत नाहीं.

"कै. रामशास्त्री गोडबोले हे आमचे गुरु होत. त्यांचें घर सातारा शहरानजीक सुमारें दोन कोसांवर पूर्वेला कृष्णाकाठीं संगममाहुली येथें होतें. त्यांचें घराणें वैदिकांचें होतें. रामशास्त्री हे विद्याभ्यासाकरितां सातारा येथें कै. भास्करशास्त्री अभ्यंकर यांचेपाशीं येऊन राहिले. श्री. भास्करशास्त्री हे पुणें येथील श्री. कै. नीलकण्ठशास्त्री थत्ते यांचे शिष्य होत. भास्करशास्त्री आणि त्यांचे सहाध्यायी राघवाचार्य गजेंद्रगडकर यांना राजाश्रय मिळाल्यामुळें त्या दोघांचीही वस्ती सातारा येथें झाली. भास्करशास्त्री यांचेकडे न्यायालयांत न्यायाधीशाला मदत करणें हें काम होतें. पुढें सरकारनें सातारा संस्थान खालसा केल्यावर भास्करशास्त्री यांना भरपगारी पेन्शन झाल्यामुळें महिना रु. ५० मिळत असत आणि तेवढ्यांत त्यांचा प्रपंच मोठा असूनही

सर्व खर्च भागत असे. भास्करशास्त्री यांचे हयातींतच त्यांचे दोघेही चिरंजीव निवर्तले. त्यामुळें नातवांना कोण शिकवील अशी त्यांना पंचाईत पडली. तेव्हां रामशास्त्री यांनीं गुरुजींच्या ( भास्करशास्त्र्यांच्या ) पायाला हात लावून असें सांगितलें कीं मी प्रपंच न करतां फक्त येथें राहून या मुलांना शिकवीन. पुढें कसल्याही अडचणी आल्या तरी दूर करून ते सातारा येथेंच राहिले व त्यांनीं आपल्या गुरुजींच्या नातवांना विद्या शिकविली. ते नातू म्हणजे मी व आमचे बन्धू ( सातारा येथें राहणारे श्री. रघुनाथशास्त्री ) हे होत. आम्हांला विद्याभ्यासाकरितां घर सोडावें लागलें नाहीं.

## २६. महर्षि रामशास्त्री यांचा स्वार्थत्याग.

“ एकदां मी व माझे बंधू रघुनाथशास्त्री सातारा येथें आमचे घरांतील ओटीवर गुरुवर्य रामशास्त्री यांजकडे कौस्तुभ, शेखर वगैरेंवरील ग्रन्थांचा पाठ घेत असतां श्रीमंत सरकार पंत प्रतिनिधि संस्थान औन्ध यांचेकडून रा. अण्णासाहेब गोडबोले ( संस्थानचे त्या वेळचे अधिकारी कारभारी) हे गुरुवर्य रामशास्त्री यांच्याकडे आले आणि त्यांनीं श्रीमन्तांचा निरोप सांगितला. तो असा—‘ श्रीमन्त पंत प्रतिनिधि सा. यांचे मनांत आपली आजन्म सेवा करावी अशी इच्छा आहे. आपल्या स्नानसंध्यादि अनुष्ठान, अध्ययनाध्यापन, छात्रवर्ग, आणि प्रपंच यांसंबन्धीं योगक्षेमाची आपल्या इतमामाप्रमाणें योग्य ती सर्व व्यवस्था संस्थानांतून होईल. तेव्हां आपण औंधास राहण्यास यावें आणि आपल्या सेवेचा लाभ आम्हांला घडवावा’. आपल्याला ही विनंती करण्यासाठीं श्रीमन्तांनीं मला आपणांकडे पाठविलें आहे व आपणांला नेण्यासाठीं श्रीमन्तांनीं आपली खास घोड्याची गाडीही मजबरोबर दिली आहे. गुरुवर्य रामशास्त्री यांनीं हें सर्व स्वस्थ चित्तानें ऐकून घेतलें व नंतर कांहीं कुशल प्रश्न व शिष्टसंभाषणें झाल्यावर, ‘ विचार करून उद्यां काय तें मी आपल्याला कळवितों ’ असें रा. आण्णासाहेब यांस सांगितलें. त्याचप्रमाणें विद्याखात्यांतील एक अधिकारी रा. नारायण विष्णु बापट यांनीं समक्ष साताऱ्यास जाऊन गुरुवर्य रामशास्त्री यांना मुंबई येथील एलफिन्स्टन कॉलेजांतील रिकाम्या झालेल्या जागेवर येण्याविषयीं विनंती केली. आणि आपणाकडे घरींच विद्यार्थी वगैरे येत जातील. त्यामुळें आपल्याला कॉलेजांत जाण्यायेण्याची तसदी न पडून आपल्या स्नानसंध्यादि अनुष्ठानालाही व्यत्यय येणार नाहीं असें सांगितलें. त्यांनाही वरीलप्रमाणेंच, ‘ विचार करून उद्यां काय तें कळवितों ’ असें उत्तर दिलें. परंतु तेथें ते गेले नाहींत. वे. शा. सं. राजारामशास्त्री बोडस ह्यांना त्या जागेवर नंतर नेमलें गेलें. याप्रमाणें आणखीही एक दोन उदाहरणें सांगतां येतील; परंतु विस्तार होईल म्हणून आटोपतें घेतों.

## २७. महर्षि रामशास्त्री यांची विरक्ति.

“आतां वरील अण्णासाहेब वगैरेंना उत्तर काय द्यावयाचें हें गुरुवर्य रामशास्त्री यांच्यापाशीं निश्चित होतेंच. पण शिष्टव्यवहाराप्रमाणें ‘ विचार करून सांगतों ’ असें त्यांनीं सांगितलें. गुरुवर्य शास्त्रीबुवांनीं सर्वांना नाहीं असेंच नकारार्थी उत्तर दिलें. वाचकहो, आपण विचार करा कीं, पंतप्रतिनिधींसारख्या संस्थानिकानें ऋण्याचारानें वागण्याची व योगक्षेमाची सर्व व्यवस्था करून

अत्यन्त पूज्य भावनेनें व मानानें बोलाविलें असतां ज्या वेळीं ब्राह्मणांचा व विशेषत: प्राचीन वेद-शास्त्रांचा वाली कोणीही नाहीं अशा जीवनकलहमय कालामध्यें त्यांना नकारार्थी उत्तर देणें किती कठीण आहे व कशाचें द्योतक आहे ? आतां गुरुवर्य शास्त्रीबोवांनीं नकारार्थी जें उत्तर दिलें त्याचें कारण त्यांची वैराग्यशील वृत्ति हें एक आहेच. पण त्याहीपेक्षां गुरूंना दिलेल्या वचनाचा भंग न होऊं देणें याबद्दलचा निश्चय आणि गुरुवचनावर अत्यन्त विश्वास हें मुख्य कारण होतें. याबद्दल प्रत्यक्ष गुरुवर्य शास्त्रीबोवांनीं जी हकीकत सांगितली तीच मी येथें वाचकांसाठीं देतों. ' पूर्वी सांगितल्याप्रमाणें ज्या ज्या वेळीं मला मानानें बोलावणें आलें त्याच दिवशीं स्वप्नामध्यें कै. भास्करशास्त्री हे येऊन सांगत की सावध राहा; आणि एवढाच इषारा देऊन ते गुप्त होत. आणि मीही जागा होऊन अरुणोदयापासूनच्या कार्यक्रमाला लागत असें. प्रकृत एक दोन प्रसंगांशिवाय माझें स्वप्नांत कै. भास्करशास्त्री आलेले मला केव्हांही आठवत नाहीं. यावरून मानाच्या मोहाला बळी पडून माझ्या मनाची कदाचित् चलबिचल होईल असें जाणूनच कीं काय मला गुरुजींनीं हा सावधगिरीचा इषारा दिला असा माझा दृढ विश्वास आहे आणि म्हणूनच अशा मानापासून अलिप्त राहण्याचा माझा निश्चय आहे असें मीं त्यांना कळविलें.'

## २८. महर्षि रामशास्त्री यांची दिनचर्या.

"गुरुवर्य रामशास्त्री यांचें दररोजचें जीवनचरित्र पाहिलें म्हणजे कोणालाही रामशास्त्री हे हल्लींच्या काळांतील ऋषीच होते असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. सन १९१३ सालीं निधनसमयीं गु. शास्त्रीबुवांचें वय ७६ पेक्षां अधिक होतें. त्यांची शरीरयष्टि फार उंच नव्हती वें स्थूलही नव्हती. मध्यम मानानें लहानशीच मूर्ति होती; मात्र ती अत्यन्त बळकट, काटक, निरोगी आणि तेजस्वी होती. वर्ण निमगोरा होता. आमरणान्त शीतजलाचें स्नान असे. प्रथम प्रथम दररोज व नंतर एक दिवसाआड ते सातार्‍याहून दोन कोस पायीं माहुलीस जाऊन कृष्णास्नान करून विद्यार्थ्यांना पढविण्यासाठीं सातार्‍यास परत येत असत व दररोज तीनशें नमस्कार घालून संध्यावन्दन, देवपूजा, सप्तशतीपाठ वगैरे नित्य आन्हिकक्रमाला सुरुवात करीत असत. त्यांचे जवळ नेहमीं २५ पेक्षां अधिक विद्यार्थी शास्त्राध्ययनासाठीं रहात असत. त्या सर्वांना योग्यतेप्रमाणें मुळापासून भाष्यान्त ग्रन्थांचे पाठ ते सांगत असत. ज्यांनीं जन्मांत आगगाडीला पाय लावला नाहीं असे जर कोणी असतील तर ते एक गुरुवर्य शास्त्रीबोवाच होत- अशा रीतीनें दररोज अहोरात्र मिळून कमींतकमीं ७ पासून ८ तासपर्यन्त आन्हिक कर्मानु. ष्ठान, व कांहीं कमी पण तितकेच तास वेदान्तव्याकरणादि शास्त्रांचें अध्यापन, याप्रमाणें अविच्छिन्न जवळ जवळ ४ तपेंपर्यन्त ज्यांची खडतर तपश्चर्या झाली, ते महर्षिसमान नव्हेत, तर महर्षीच आहेत अशी कोणाचीही भावना झाल्यास त्यांत काय वावगें आहे ? न्यायमूर्ति रानडे हे रामशास्त्र्यांना महर्षि असें म्हणत असत हें लोकप्रसिद्ध आहे.

## २९. महर्षि रामशास्त्री यांचें तपःसामर्थ्य.

"जे कांहीं लोक माझ्या मुलाचें लग्न केव्हां होईल व नोकरी केव्हां लागेल वगैरे विचार-ण्यासाठीं पूज्य भावनेनें गुरुवर्य शास्त्रीबुवांच्याकडे जात त्यांना गुरुवर्य शास्त्रीबुवा कांहीं एक विशेष विचार न करतां स्वयंस्फूर्तीनें ' तुझें अमुक दिवसांत कार्य होईल ' असें सांगत, आणि त्यांचें तें म्हणणें खरें होत असे व त्याप्रमाणें तें ' शास्त्रीबोवा, आपल्या सांगण्याप्रमाणें माझें कार्य झालें'

असें गुरुवर्य शास्त्रीबोवांना अत्यन्त आदरानें कळविण्यासाटीं येत असत हें मीं पुष्कळ वेळां पाहिलें आहे. त्यांचेकडे जे जे लोक विचारावयास येत होते त्या सर्वांचें कल्याण होत होतें असें दृष्टीस पडत असे. ज्यांचें कल्याण होणार नसेल त्यांना गुरुवर्य शास्त्रीबोवांकडे जाण्याची बुद्धीच परमेश्वर देत नसावा. यावरून अभियुक्तांनीं सांगितलेलें महर्षींचें लक्षण गुरुवर्य शास्त्रीबोवांचे ठिकाणीं दिसून येत होतें. अशा प्रकारच्या ऋषींना आचार्यही म्हणतात असें मागें सांगितलें आहे. तेव्हां आचार्यांचे ठिकाणीं अवश्य असावे लागणारे गुण गुरुवर्य शास्त्रीबोवांमध्येंही पूर्णपणें वसत होते, हें लक्षणावरून दिसून येईल; म्हणून आचार्य शब्दाचें लक्षण अभियुक्तांच्या शब्दांत सांगतों.

निशम्य यद्गिरं प्राज्ञा अविचार्यैव तत्क्षणम् ।
संभावयन्ति शिरसा तमाचार्यं प्रचक्षते ।। "

## आधुनिक मुख्यमुख्य वैयाकरणांचा अल्प परिचय ( ३०–६२ )

### ३०. भट्टोजी दीक्षितांच्या पूर्वींच्या वैयाकरणांची कामगिरी.

शास्त्रीबोवांनीं ज्याप्रमाणें आपले गुरुजी महर्षि रामशास्त्री यांचेविषयीं थोडक्यांत माहिती दिली त्याप्रमाणें महर्षितुल्य स्वतः शास्त्रीबुवा, त्यांचे पितामह, प्रपितामह व वृद्धप्रपितामह यांची, त्यांच्या गुरुशिष्यपरंपरेची तसेंच इसवीसनाच्या अठरा व एकोणीस या शतकांतील प्रमुख वैयाकरणांची संप्रदायामध्यें बोलली जाणारी गुरुशिष्यपरंपरागत आलेली माहिती शास्त्रीबोवांच्या अध्यापन व ग्रंथलेखन या बाबतींतील बहुमोल कामगिरीची पार्श्वभूमिका समजण्यास उपयुक्त होईल या दृष्टीनें थोडक्यांत पुढें देत आहें. महाभाष्यकारांनीं विद्वत्तापूर्ण ऊहापोह करून पाणिनीच्या सूत्रांचा योग्य अर्थ समजावून देण्याचें महत्त्वाचें कार्य केलें. त्यानंतर म. म. कैयटभट्टांनीं भाष्याच्या अर्थाचें सुंदर स्पष्टीकरण करून शंकास्थानें पार नाहींशीं केलीं. जरी भाष्याचें अध्ययन हें व्याकरणशास्त्रात योग्य प्रवेश झाल्याशिवाय शक्य नसलें तरी जोंपर्यंत संस्कृतभाषा ही बोधभाषा होती तोंपर्यंत पदांचें व त्यांच्या अर्थांचें ज्ञान लोकव्यवहारावरून सहजच मिळत असे व सामान्य व्याकरणज्ञान झाल्यावर महाभाष्याचें अध्ययन करणें शक्य होत असे. परंतु प्राकृत व प्राकृतोद्भव हिंदी, मराठी, गुजराती वगैरे बोधभाषा लोकांत प्रचलित झाल्यानंतर संस्कृत भाषेचेंच अध्ययन प्रथमतः करणें जरूर झालें व त्याकरितां जयादित्य व वामन यांनीं दरेक सूत्रावर सोदाहरण अर्थ थोडक्यांत देणारी काशिकावृत्ति लिहिली. या काशिकावृत्तीचें व्याख्यान हरदत्तांनीं पदमञ्जरी व जिनेन्द्रबुद्धींनीं न्यास लिहून केलें. काशिकावृत्तींत पाणिनीचाच सूत्रक्रम घेतला असल्यामुळें अगदीं नवख्या शिष्याला काशिकेचें अध्ययन करणें कठीण वाटूं लागलें; म्हणून गुरुजी व शिष्य या दोघांनाही उपयुक्त होईल अशा रीतीनें सूत्रांचा क्रम बदलून रामचंद्र शेष यांनीं प्रक्रियाकौमुदी हा प्रकरणग्रंथ लिहिला व शेषकृष्णांनीं त्यावर टीका लिहिली. तसेंच भट्टोजी दीक्षितांनीं सिद्धांतकौमुदी हा प्रकरणग्रंथ लिहिला.

### ३१. भट्टोजी दीक्षितांचा अल्प परिचय.

भट्टोजी दीक्षितांचा सिद्धांतकौमुदी हा ग्रंथ जरी संस्कृत भाषेमध्यें लिहिला असला तरी भाषा सुलभ असल्यामुळें त्याचें अध्ययन व अध्यापन करणें सुलभ व सोयीचें झालें. त्यांतूनही

एवढ्या विस्तृत व्याकरणग्रंथाची जरूर नसल्यास वरदराज यांचे मध्यमकौमुदी व लघुकौमुदी हेही संक्षिप्त ग्रंथ लोकांत प्रसृत झाले. बहुजनसमाजास संस्कृत शिकणें सुलभ व्हावें या हेतूनेंच भट्टोजी दीक्षितांनीं सिद्धांतकौमुदी हा ग्रंथ लिहिला. गुरुवर्य डॉक्टर भांडारकर यांनीं आपली संस्कृतप्रवेशिका लिहून आज जें काम केलें आहे तेंच काम भट्टोजी दीक्षित यांनीं सिद्धांत-कौमुदी लिहून त्या काळीं केलें असें म्हटलें तरी चालेल. भट्टोजी दीक्षित यांनीं सिद्धांतकौमुदींत सूत्रांचा क्रम बदलला व कांहीं ठिकाणीं प्रक्रियाकौमुदीकार रामचंद्रशेष व प्रक्रियाकौमुदीवर व्याख्या लिहिणारे स्वतःचे गुरु शेषकृष्ण यांचें मत आपल्या ग्रंथामध्यें बाजूस सारलें हा एक प्रकारचा गुरुद्रोह त्यांनीं केला असा लोकप्रवाद आहे. शेषकृष्णांचे प्रतिभासंपन्न प्रशिष्य जग-न्नाथ पंडित यांना हें खपलें नाहीं व त्यांनीं रागानें भट्टोजी दीक्षितांच्या मनोरमा ग्रंथाचें खंडन करणारा ग्रंथ लिहिला. परंतु त्या ग्रंथामध्यें जगन्नाथरायांच्या प्रसादयुक्त वाणीपलीकडे दुसरें कांहीं वैशिष्ट्य नसल्याकारणानें त्यामुळें सिद्धांतकौमुदीचें स्थान किंचित्सुद्धां कमी झालें नाहीं; इतकेंच नव्हे तर प्रक्रियाकौमुदीचाही प्रचार लोकांमध्यें कमी झाला. पंडितराय जगन्नाथ यांची अहंमन्यता व दर्पोक्ती लोकात प्रसिद्धच आहेत. असें सांगण्यांत येतें कीं भट्टोजी दीक्षितांनीं आपलें "णेरणौ०" या सूत्रावरील विवेचन पंडितरायांकडे अवलोकनाकरितां पाठविलें असतां पंडितरायांनीं "णेरणाविति सूत्रार्थे भगवान् वेत्ति पाणिनिः। अहं च भाष्यकृद् वेत्ति वृत्तिकृद् वेत्ति वा न वा" असे उद्गार काढले. भट्टोजी दीक्षित हे जातीनें देशस्थ ब्राह्मण होते असें कांहीं लोक म्हणतात, इतर कांहीं विद्वान् ते तेलंग ब्राह्मण होते असें म्हणतात तर इतर कांहीं लोक ते सारस्वत ब्राह्मण होते असेंही म्हणतात. त्यांचें निवासस्थान क्षेत्र काशी हें होतें व तेथें त्यांनीं अनेक शिष्यांना पढविलें. त्यांनीं केलेल्या गुरुद्रोहाबद्दल त्यांना गुरुजींनीं शाप दिला व त्यायोगें मृत्यूनंतर त्यांना पिशाचयोनि प्राप्त झाली आणि ते आपल्या घरांतच ब्रह्मसमंध होऊन राहिले अशी आख्यायिका आहे. पिशाच योनींत असूनही त्यांनीं आपले पट्टशिष्य ज्ञानेन्द्रसरस्वती यांना दर्शन देऊन व्याकरणशास्त्र पढविलें व त्यांचेकडून आपल्या सिद्धांतकौमुदीवर तत्त्वबोधिनी नांवाची सुंदर टीका करविली अशी दन्तकथा आहे.

## ३२. हरि दीक्षित आणि त्यांचा बृहच्छब्दरत्न व लघुशब्दरत्न.

मनोरमाग्रंथावर भट्टोजी दीक्षित यांचे नातू हरि दीक्षित यांनीं शब्दरत्न नांवानें हल्लीं प्रसिद्ध असलेली लघुशब्दरत्न नांवाची टीका लिहिली. प्रसिद्ध वैयाकरणकेसरी नागोजीभट्ट यांनीं हरि दीक्षित यांचेजवळ व्याकरणशास्त्राचें उत्तम अध्ययन केलें. गुरुदक्षिणा म्हणूनच कीं काय, स्वतः मनोरमाग्रंथावर त्यांनीं लघुशब्दरत्न नांवाची व्याख्या लिहून गुरुजींना ती अर्पण करून गुरुजींच्याच नांवानें ती प्रसिद्ध केली असा वैयाकरणामध्यें एक प्रवाद आहे; व या प्रवादाला नागोजीभट्टांचे इतर ग्रंथ व लघुशब्दरत्न यांमध्यें दिसून येणारें विचारसाम्य कांहीं अंशीं पुष्टीही देतें. बृहच्छब्दरत्न नांवाची विस्तृत टीकाही हरि दीक्षित यांनीं लिहिली पण ती उपलब्ध नाहीं अशी बऱ्याच वैयाकरणांची समजूत होती; परंतु लेखकाजवळ भास्करशास्त्री अभ्यंकर यांचे संग्रहीं असलेल्या या ग्रंथाची संपूर्ण हस्तलिखित प्रत आहे व इतरत्रही कांहीं प्रती आहेत. या बृहच्छब्दरत्नाशीं प्रसिद्ध असलेल्या लघुशब्दरत्नाची तुलना केल्यास भाषासाम्य प्रतीकसाम्य व विचारसाम्य यांवरून दोनही ग्रंथांचे हरि दीक्षित हेच कर्ते असावेत इतकेंच नव्हे तर "विस्तरस्तु अस्मत्कृते बृहच्छब्दरत्ने मदन्तेवासिकृतलघुशब्देन्दुशेखरमञ्जूषयोश्च द्रष्टव्यः" या लघुशब्दरत्नांत दोन ठिकाणीं आलेल्या वाक्यावरून हरि दीक्षित यांनींच प्रथम बृहच्छब्दरत्न

ग्रंथ लिहिला व त्याचा संक्षेप म्हणून मागाहून लघुशब्दरत्न लिहिला व त्यामध्यें बुद्धिवैभव-शाली स्वशिष्य नागोजीभट्ट यांच्या विचारांना व निर्णयांनाही बृहच्छब्दरत्नाशीं त्यांचा जरी थोडा विरोध आला तरी तिकडे दुर्लक्ष करून आनंदानें जागा दिली असें निःसंशय सिद्ध होतें. ( याविषयीं जास्त विवेचन भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूट ऍनल्स भाग ३२ पानें २५८–२६० पहा ). लघुशब्दरत्नालाच मनोरमाशब्दरत्न किंवा नुसतें शब्दरत्न म्हणून संबोधण्याचा प्रघात आहे व सिद्धान्तकौमुदीच्या अध्ययनानंतर प्रौढमनोरमेबरोबर या ग्रंथाचें कारकान्त अध्ययन करण्याचा प्रघात आहे.

## ३३. नागेशभट्टांचा अल्प परिचय.

हरि दीक्षित यांचेनंतर त्यांचे शिष्य नागेशभट्ट यांनीं केवळ व्याकरणशास्त्रांतच नव्हे तर इतरही शास्त्रांत अनेक मार्मिक ग्रंथ लिहून व अनेक शिष्यगणांना विद्यादान देऊन जी राष्ट्राची व विद्येची सेवा केली ती सर्वविश्रुतच आहे. नागेशभट्ट हे मूळचे सातारा जिल्ह्यांतील तासगांवचे राहणारे देशस्थ ब्राह्मण. त्यांचा काल साधारणपणें इ. स. १६५०–१७३० समजला जातो. त्यांचें उपनांव काळे; पण स्वतः लिहिलेल्या ग्रंथामध्यें त्यांनीं उपाध्याय हें उपनांव धारण केलें आहे व काशीक्षेत्रामध्यें ते उपाध्याय उपनांवानें ओळखिले जात असत. त्यांच्या लोकोत्तर बुद्धिमत्तेच्या पुष्कळच आख्यायिका सांगण्यांत येतात. त्यांचे वडील व मातुःश्री यांची त्यांनीं शिव-भट्ट व सती अशीं नांवें आपल्या ग्रंथांत दिलीं आहेत. तसेंच स्वतःला सतीगर्भज असें संबोधिलें आहे. यासंबंधीं अशी आख्यायिका सांगण्यांत येते कीं, त्यांच्या मातुःश्री गरोदरस्थितींतच वारल्या व उदरांतून मुलाला बाहेर काढण्यांत आलें. हें मूल म्हणजेच नागेशभट्ट. उदरांतून बाहेर काढले गेल्यामुळें नागेशांच्या मेंदूवर प्रसूतिवेदनांचा कांहींही परिणाम झाला नाहीं व त्यामुळेंच त्यांना लोकोत्तर बुद्धि व प्रतिभा लाभली अशी समजूत आहे. लहानपणीं त्यांचे आंगीं फार अल्लडपणा होता. एकदां सभापति येण्याचे पूर्वीं सभापतींच्या गादीवर हे जाऊन व्यवस्थेशीर बसले व इतर सहाध्यायांना त्यांनीं आपणापुढें बोलाविलें. सहाध्यायांनीं याबद्दल त्यांची फार निर्भर्त्सना केली. ती त्यांना सहन झाली नाहीं व त्यांनीं सतत एक तप वाग्देवीची उपासना केली व मन लावून शास्त्राभ्यास केला आणि मानानें तसेंच योग्यतेनें ज्या सभा-पतींच्या गादीवरून त्यांना .ओढून काढण्यांत आलें होतें त्या गादीवर ते आरूढ झाले. त्यांना पुत्रसंतान नव्हतें; फक्त एक कन्याच होती व ती देव घराण्यांत दिली होती. त्यांना प्रतापगड ( अयोध्याप्रांत ) व शृङ्गबेरपुर येथील राजांचा आश्रय होता. अध्यापनाचें व ग्रंथनिर्मितीचें आजन्म त्यांनीं काम केलें. मार्मिक व मुद्देसूद लिहिणें हा त्यांच्या ग्रंथांचा विशेष गुण आढळून येतो. त्यांनीं निरनिराळ्या शास्त्रांवर बारा शेखर व बारा उद्द्योत लिहिले अशी आख्यायिका आहे. लहानमोठे मिळून त्यांच्या ग्रंथांची व निबंधांची संख्या चाळीसच्या वर जाते. त्यांपैकीं महाभाष्यप्रदीप व काव्यप्रदीप यांवरील उद्योत आणि सिद्धांतकौमुदीवरील लघुशब्देन्दुशेखर हे टीकाग्रंथ व परिभाषेन्दुशेखर आणि लघमञ्जूषा हे स्वतंत्र ग्रंथ हे त्या त्या विषयावरील शेवटचें प्रमाणभूत व्याख्यान म्हणून वाखाणले जातात.

## ३४. नागेशभट्टांचा स्वभाव.

नागेशांचा स्वभाव जरा विचित्रच होता असें म्हटलें तरी चालेल. त्यांच्या अंगीं गाढ-विद्वत्ता, सभापांडित्य, ग्रन्थलेखनशक्ति या बौद्धिक गुणांबरोबरच स्वतंत्र बाणेदार वृत्ति, प्रसि-

द्धिपराङ्मुखत्व व निःस्पृहता या गुणांचा मिलाफ झाल्यामुळें त्यांचे हातून कोणतीही हुद्द्याची नोकरी होणें अशक्य होतें. त्याप्रमाणेंच धानिकवर्गाकडून मदत किंवा संस्थानिकांकडून द्रव्यप्राप्ति होणेंही तितकेंच अशक्य होतें. निर्धन स्थितींतच काशीस विद्याभ्यासास गेल्यामुळें व घरचें उत्पन्न कांहींही नसल्यामुळें सर्व आयुष्य दारिद्र्यांतच कंठावें लागलें. रात्रंदिवस शास्त्रव्यासंग व ग्रंथनिर्मितीचें काम अखंड चालू असल्यामुळें, पुत्रसंतती नसल्यामुळें व कुटुंबांत दुसरा कोणी मिळवता नसल्यामुळें त्यांच्या गृहिणीला अतिशय कष्टानें दिवस काढावे लागले व तिनें एका प्रसंगीं यासंबंधीं आपले दुःखोद्गार काढले असतां नागेशांनीं 'शेखर तुझा मुलगा, मंजूषा तुझी मुलगी; हे जवळ असतांना तुला कसली काळजी' '(शब्देन्दुशेखरः पुत्रः, मञ्जूषा दुहिता तव । एतयोः संनिधाने हि कीदृशी मनसो रुजा) असें म्हणून तिचें सांत्वन केलें अशी आख्यायिका आहे. त्यांच्या विद्वत्तमुळें व पांडित्यामुळें त्यांचें नांव विद्वानांतच नव्हे;तर बहुजनसमाजामध्यें जरी सर्वतोमुखी होतें तरी पण त्यांच्या प्रसिद्धिपराङ्मुखते-मुळें लोकांमध्यें व्यक्ति म्हणून त्यांना फारच थोडे लोक ओळखत. याबद्दल एक मनोरंजक कथा सांगण्यांत येते ती अशी :–नावेंतून नदीपार जाण्याचा एकदां प्रसंग आला असतां जवळ मुळींच द्रव्य नसल्यामुळें नावाड्याला 'मी दरिद्री विद्वान् ब्राह्मण आहे मला फुकट घेऊन जा' असें म्हटलें असतां नावाड्यानें त्यांना 'तुम्ही कोण मोठे नागेश पंडित आहां कीं, मी तुम्हाला फुकट घेऊन जावें ?' असें उत्तर दिलें. नागेशांचेविषयीं विशेष नमूद करावयाची गोष्ट म्हणजे नागेशांना आपल्या विद्वत्तेचा अतिशय गर्व होता व त्यामुळें पंडित जगन्नाथरायांच्या सारखे जरी इतर विद्वानांच्या विद्वत्तेविषयीं त्यांचेकडून तुच्छतेचे उद्गार निघाले नसले तरी पण गाढ विद्वत्तेमुळें प्राप्त झालेल्या सभापतिपदावर असतांना वाद करणाऱ्या पंडितांची इतरांदेखत मानहानि होईल असे उद्गार ते काढीत व आपल्याइतका विद्वान् जगांत नाहीं असें दर्शवीत. याबद्दल पुढील एक अख्यायिका सांगण्यांत येते:–अशाच एका प्रसङ्गीं एका पंडितानें अनपेक्षित रीतीनें पंडितसभे-मध्यें येऊन नागेशांना निरुत्तर केलें व नागेशांनीं ही अशक्य गोष्ट शक्य कशी झाली याचा विचार करून प्रत्यक्ष विश्वेश्वरानें आपणास पंडिताच्या रूपानें दर्शन देऊन धडा शिकविला असें जाणून काशी सोडण्याचा बेत केला.

### ३५. नागेशभट्टांची प्रसिद्धिपराङ्मुखता व विद्वत्ता.

वरील कारणामुळें म्हणा, किंवा दारिद्र्यामुळें उपजीविकेकरितां अन्य ठिकाणीं जावें या विचारानें म्हणा किंवा शृङ्गबेरपुरामध्यें राजाचे घरीं अज्ञातवासांत राहून विद्वज्जनांचे वाद-विवाद ऐकण्याकरितां म्हणा—नागेशांनीं कांहीं दिवस काशी सोडली व शृङ्गबेरपुराच्या राम राजाच्या देवघरांत नोकर म्हणून ते राहिले. त्यांनीं तेथें सकाळचे वेळीं देवघरामध्यें मोठमोठ्या पंडितांची राजाच्या पुढें चाललेली विद्वच्चर्चा ऐकून जेवणखाण करून घरीं गेल्यावर दुपारीं सायंकाळीं व रात्रीं लेखनाचें कार्य सतत चालू ठेविलें. एके दिवशीं विद्वत्सभेमध्यें एका पंडितानें 'अत्र विषये नागेशभट्टानां संमतिः' असें म्हटलें असतां प्रतिस्पर्ध्यानें 'कोयं भारवाहो नागेशः' असें उत्तर दिलें. नागेशांना हे शब्द ऐकल्यावर स्वस्थ राहवेना. ते एकदम पुढें सरले व 'सोहमेव' (मीच तो) असें म्हणून त्यांनीं प्रतिस्पर्धी पंडिताशीं वाद करून त्याला निरुत्तर केलें. राजाच्या देखत हें झाल्यावर 'न जाणतां माझेकडून नोकर म्हणून ठेवण्याचा प्रमाद घडला' असें म्हणून राजानें पंडित नागेशांचें तात्बडतोब शिष्यत्व पतकरिलें व

त्यांचा उत्तम प्रकारें परामर्श घेतला. नागेशांनीं आपल्या अनेक ग्रंथांपैकीं पुष्कळसे ग्रंथ या रामराजाच्या आश्रयाखालीं असतांना लिहिले असावे असें ' शृङ्गबेरपुराधीशाद्रामतो लब्धजीविकः ' या ओळीवरून ध्यानांत येण्याजोगें आहे. नागेशांनीं मध्यंतरीं कांहींही कारणामुळें काशी सोडिली असली तरी श्रीविश्वेश्वराचे सान्निध्यांत क्षेत्रनिवास करून राहावें येवढेंच नाहीं, तर शेवटपर्यंत काशी सोडावयाची नाहीं अशा तऱ्हेचें क्षेत्रनिवासव्रत त्यांनीं घेतलें व आमरण शिष्यांना पढविणें व ग्रंथ लिहिणें हीं कामें केलीं. असें सांगतात कीं, वृद्धापकाळीं पाठीला कुबड आलें तेव्हां एका जमिनीसखल कोनाड्यांत कुबडाला टेकण देऊन त्यांनीं अखंड ग्रंथलेखन केलें व अत्यंत वृद्ध होऊन त्यांनीं काशी क्षेत्रीं देह ठेविला. जयपुरच्या राजा जयसिंहानें इ. स. १७१४ सालीं अश्वमेध यज्ञ केला त्यावेळीं नागेशांनाही काशी क्षेत्रीं बहुमानानें आमंत्रण दिलें होतें; परंतु क्षेत्रनिवासव्रत त्यांनीं घेतलें असल्यामुळें त्यांना काशी सोडून जातां आलें नाहीं.

## ३६. नागेशभट्टांचें व्याकरणशास्त्रांतील नव्यमतप्रवर्तकत्व.

नागेशांनीं आपल्या गाढ विद्वत्तेनें व प्रतिभेनें कांहीं ठिकाणीं भट्टोजी दीक्षित वगैरे विद्वानांशीं मतभेद प्रदर्शित करून आपले सिद्धान्त असे निर्विवादपणें मांडले कीं, त्यांचा व्याकरणांतील नवीनमतसंस्थापक या संज्ञेनें पुढील वैयाकरण उल्लेख करूं लागले. नागेशांच्या पूर्वी काशिकाकार व त्यांचे टीकाकार हरदत्त व जिनेन्द्रबुद्धि यांना प्राचीन वैयाकरण ही संज्ञा दिली जात असे व प्रक्रियाकौमुदीकार व भट्टोजी दीक्षित तसेच त्यांचे टीकाकार यांना नव्य वैयाकरण म्हणण्याचा प्रघात असे. नागोजीभट्टांनीं शब्देन्दुशेखरासारखे विद्वत्तापूर्ण ग्रन्थ लिहून सिद्धांतकौमुदीचें स्थान अढळ केल्यावर प्राचीन व नव्य या संज्ञांना नवीन अर्थ आले. व भट्टोजी दीक्षित व त्यांचे अनुयायी यांना प्राचीन वैयाकरण हें नांव देण्यांत आलें व नागेश व त्यांचे अनुयायी यांना नवीन हें नांव देण्यांत आलें. पाणिनीचीं सूत्रें, कात्यायनाचीं वार्तिकें व पतञ्जलीचें महाभाष्य हीं सर्वांनीं सारखींच प्रमाणभूत मानिलीं असल्यामुळें मतभेद किरकोळ बाबतींतच होता. पण तो मतभेद नागेशभट्टानंतरच्या वैयाकरणांमध्यें इतक्या तीव्र स्वरूपाचा होत गेला कीं, ज्या ठिकाणीं एका विशिष्ट संप्रदायाला राजकीय अथवा सामाजिक पाठिंबा मिळत असे तेथें दुसऱ्या संप्रदायाला आपल्या मतांविषयीं स्पष्ट बोलण्याची अडचण पडत असे.

## ३७. भट्टोजी दीक्षितांचें प्राचीन मत व नागेशांचें नव्य मत.

भट्टोजी दीक्षित यांचा जुना संप्रदाय व नागेशांचा नवा संप्रदाय यांमध्यें मतभेदाचीं महत्त्वाचीं स्थानें पांचसहाच आहेत. किरकोळ मतभेद अनेक ठिकाणीं आहेत. या सर्व मतभेदांचें परिशीलन करून आणि आपल्या सूक्ष्म बुद्धीनें सर्व टीकाग्रंथांचें अवलोकन करून गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांनीं आपल्या शिष्यवर्गाला ते ते ग्रंथ शिकवीत असतांना टांचण करून ठेवलें आहे. परिभाषेन्दुशेखरावर 'तत्त्वादर्श' म्हणून त्यांनीं जी टीका लिहिली तीमध्यें हे सर्व मतभेद ठिकठिकाणीं प्रदर्शित केले आहेत व एके ठिकाणीं त्यांनीं आपला स्वतःचा कल नव्य मताकडे आहे असें स्पष्ट विधानही केलें आहे. १८८९ सालीं आपण परिभाषेन्दुशेखरावर ' तत्त्वादर्श ' टीका लिहिण्यास आरंभ केला आहे असें त्यांनीं नमूद केलें असल्यामुळें परिभाषेन्दुशेखरावरील टिप्पणींना ' तत्त्वादर्श ' हें नांव देऊन ती टीका बॉम्बे संस्कृत सीरिजमध्यें परिभाषेन्दुशेखराचें

द्वितीय संस्करण लवकरच होईल त्यामध्यें देण्यांत येणार आहे. पुढें दिलेल्या संग्रहश्लोकांवरून जुना व नवा संप्रदाय यांचेमधील मतभेद थोडक्यांत ध्यानांत येईलः

भाष्ये सिद्धान्तकौमुद्यां वैयाकरणभूषणे ।
मनोरमाकौस्तुभयोः सर्वं शास्त्रं प्रतिष्ठितम् ।। १ ।।
एतैर्विरुद्धा ये केचिद् बुद्धिवैभवशालिभिः ।
शेखरादिग्रन्थकृद्भिः स्वसिद्धान्ताः प्रदर्शिताः ।। २ ।।
भाष्यस्वारस्यहानेस्ते नैव प्रामाण्यभाजिनः ।
इति ये ब्रुवते ते स्युः प्राचीनमतवादिनः ।। ३ ।।
भट्टोजीहरदत्तादिग्रन्थाः प्रामाणिकाः खलु ।
तथापि कुत्रचिद्भाष्यगूढार्थस्यावलोकने ।। ४ ।।
नागेशभट्टैर्विद्वद्भिर्मतभेदाः प्रदर्शिताः ।
यथोद्देशाकृतव्यूहान्तरङ्गत्वादिवर्णने ।। ५ ।।
अभ्यासस्यासवर्णेति सूत्रस्थज्ञापने तथा ।
यस्मान्न स्खलेद् बुद्धिस्तं नव्यं विबुधा विदुः ।। ६ ।।

## २८. वैद्यनाथ पायगुंडे यांचा अल्प परिचय.

नागेशभट्टांनंतर त्यांचे पट्टशिष्य वैद्यनाथ पायगुंडे यांनीं काशी येथें राहून अनेक शिष्य तयार केले व गुरुजींच्या शेखर मञ्जूषा वगैरे ग्रंथांचें अध्ययन प्रामुख्यानें चालू करून शेखरकारांचा नव्यव्याकरणसंप्रदाय निर्माण केला. भरतखंडांतील निरनिराळ्या प्रांतांतून अनेक वैयाकरण काशी क्षेत्रीं जाऊन नागेशांच्या ग्रंथांचें अध्ययन करूं लागले व स्वप्रांतांत परत जाऊन लोकांमध्यें नागेशांच्या ग्रंथांचा जोरांत पुरस्कार करूं लागले. वैद्यनाथ यांनींही शब्देन्दुशेखरावर चिदस्थिमाला व परिभाषेन्दुशेखरावर गदा या नांवाच्या उत्तम टीका लिहिल्या. पायगुंडे यांनाही दीर्घायुष्य लाभलें. त्यांचा काल साधारणपणें १६९०–१७८० समजला जातो. पुण्याहून पेशवे सरकार यांनींही नीळकंठशास्त्री थत्ते यांना काशी येथें अध्ययन पुरें करण्यास पाठविलें होतें अशी आख्यायिका आहे. याज्ञवल्क्यस्मृति मिताक्षरेवर बाळंभट्टी या नांवानें प्रख्यात असलेली मार्मिक टीका आहे व तिचा कर्ता बाळंभट्ट पायगुंडे या नांवानें दिला आहे. बाळंभट्ट हे वैद्यनाथ यांचेंच दुसरें नांव असावें असा विद्वानांचा समज आहे. वैद्यनाथांच्या चिरंजीवांचें बाळंभट्ट हें नांव असावें असेंही कांहीं लोक मानतात. इतर कांहीं विद्वानांचे बाळंभट हे प्रयोगरत्नकर्ते नारायणभट्ट यांचे वंशज होते असें मत आहे.

## २९. भैरवमिश्र यांचा अल्प परिचय

या वेळचे एक अत्यंत प्रसिद्ध वैयाकरण भैरवमिश्र नांवाचे होऊन गेले. त्यांचें निवासस्थान प्रयागक्षेत्र होतें. त्यानीं लघुशब्देन्दुशेखरावर चन्द्रकला व परिभाषेन्दुशेखरावर भैरवी नांवाच्या मार्मिक टीका लिहिल्या. न्यायशास्त्राचेंही त्यानीं उत्तम अध्ययन केलें होतें हें त्यांच्या टीकाग्रंथांवरून स्पष्ट दिसून येतें. त्यांनीं आपल्या ग्रंथांचे शेवटीं आपल्या पूर्वजांचा व निवासस्थानाचा उल्लेख केला आहे; पण गुरुजींचा उल्लेख कोठेंही केला नाहीं. स्वतः ते शाक्तसंप्रदायी होते व मंत्रशास्त्रांत निष्णात होते. तसेंच त्यांना उपासनेमुळें कांहीं सिद्धीही उपलब्ध झाल्या होत्या. असें सांगण्यात येतें कीं त्यामध्यें श्रीमन्त पेशवे यांचे दरबारांत कोणत्या

विशिष्ट शास्त्रांत आपण निष्णात आहां असें विचारलें असतां त्यांनीं आपण स्वतः व्याकरण व न्याय या दोन्ही शास्त्रांमध्यें सारखेच पूर्ण निष्णात आहों असें सांगितलें. नंतर दरबारांतील पंडितांनीं त्यांचेबरोबर एक महिनाभर मधूनमधून वाद करून 'दरबारांतील सर्व पंडितांपेक्षांही व्याकरण व न्याय या दोन्ही शास्त्रांत त्यांचें प्रावीण्य सर्वांपेक्षां ज्यास्त आहे' असें श्रीमंतांस सांगितलें. नंतर श्रीमंतांनीं त्यांचा मोठा सन्मान करून त्यांना प्रयाग येथें परत जाण्यास निरोप दिला व मार्गावर शिंदे, होळकर, गायकवाड यांनाही सन्मान करण्यास कळविलें. पुण्यांत रामशास्त्री प्रभुणे यांनीं त्यांची योग्यता जाणली व त्यांना आपला सन्मान कसा करावा याबद्दल मोकळेपणानें सांगण्याची विनंति केली. भैरवमिश्रांनीं आपण चाळीस वर्षें शास्त्रसेवा केली असल्यामुळें आपल्या सांप्रदायिक वस्तू चाळीस चाळीस मागितल्या; परंतु वस्तू देण्याची वहिवाट नसल्यामुळें रोख रक्कम व वस्त्रें त्यांना देण्यांत आलीं असाही प्रवाद आहे. पुण्यामध्यें पर्वती टेकडीवर देवदेवेश्वराचे दर्शनास ते जात असत. परंतु, देवतेला ते केव्हांही नमस्कार करीत नसत व त्याचें कारण ते अत्यंत धर्मनिष्ठ असले तरी उपासनेनें त्यांना महान्यासपूजेचा अधिकार प्राप्त झाला असल्यामुळें मूर्तीला नमस्कार केल्यास मूर्तीला त्रास होईल असें त्यांनीं सांगितलें व त्याप्रमाणें टेकडीच्या पायथ्याशीं असलेल्या एका शिलेला त्यांनीं नमस्कार केला असतां तिचा भंग झाला असें दृष्टोत्पत्तीस आलें. मंत्रशास्त्रांतील गुरुजींशिवाय इतरांना गुरु म्हणावयाचें नाहीं असा संप्रदाय मंत्रशास्त्रज्ञांमध्यें असल्यामुळें त्यांनीं आपल्या ग्रंथांत गुरुजींचें नांव दिलें नसावें. भैरवमिश्र हे वैद्यनाथांच्या बरोबरीचे नागेशांचेच एक शिष्य होते असें कांहीं विद्वान सांगतात व रामशास्त्री प्रभुणे यांनीं पेशवे दरबारांत त्यांची पारख केली या लोकवार्तेस त्यामुळें पुष्टि येते. पण त्यांच्या ग्रंथांचे शेवटीं छापील व हस्तलिखित प्रतींत असलेली "नेत्राष्टभूतिचन्द्राब्दे (१८८२) वत्सरे०" ही ओळ या लोकवार्तेच्या आड येते. कारण, १८८२ विक्रम संवत् म्हणजे इ. स. १८२५ हा काल पेशवाईच्या अस्तानंतरचा असल्यामुळें भैरवमिश्र हे नागेशांचे शिष्य होते व रामशास्त्री प्रभुणे यांचे वेळीं पेशवेसरकारकडून त्यांचा सत्कार झाला असें म्हणण्यास अडचण येते. येथें "नेत्राक्षिभूतिचन्द्राब्दे (१८२२) वत्सरे" असा खरा पाठ असल्यास सर्व गोष्टी साधतील.

## ४०. नीलकंठशास्त्री थत्ते यांचा अल्प परिचय.

वैद्यनाथ पायगुंडे व भैरवमिश्र यांच्यानंतरचे जाडे वैयाकरण म्हणजे पुण्याचे नीलकंठ शास्त्री थत्ते. वैद्यनाथ पायगुंडे यांचेकडे काशी क्षेत्रीं जे अनेक शिष्य व्याकरणशास्त्रांत तयार झाले त्यांमध्यें नीलकंठशास्त्री हे अग्रेसर समजले जातात. कांहीं विद्वानांच्या मतें नीलकंठशास्त्री हे प्रत्यक्ष वैद्यनाथांचे शिष्य नव्हते; तर वैद्यनाथाचे शिष्य रामचंद्रभट्ट तारे यांचे ते शिष्य होते. ते कोणाचेही प्रत्यक्ष शिष्य असोत त्यांना वैद्यनाथांच्या सहवासाचा लाभ झाला होता इतकेंच नव्हे तर असें सांगण्यांत येतें कीं वैद्यनाथ पायगुंडे यांचे बरोबर त्यांचे शिष्य नीलकंठशास्त्री यांनीं १८ दिवस व्याकरणशास्त्रांतील विषयावर चर्चा केली व गुरुजींना त्यामुळें इतकें समाधान झालें कीं गुरुजींनीं त्यांना पाणिनीचे प्रत्यक्ष अवतार म्हणून संबोधिलें. नीलकंठशास्त्री यांचा काल साधारणपणें इ.स. १७५०–१८३४असा देण्यांत येतो. त्यांना पेशवेदरबारांत फार मोठा मान होता व दक्षिणेमध्यें त्या वेळीं त्यांच्या तोडीचा विद्वान नव्हता. घरची सुस्थिति असल्यामुळें म्हणा, किंवा रामशास्त्री प्रभुणे यांनीं पुणें सोडल्यानंतर पेशवे सरकारच्या राज्यकारभाराला सुव्यवस्थितपणा नसल्यामुळें

म्हणा, नीलकंठशास्त्री यांनीं सरकारी मोठ्या दर्जाची नोकरी पतकरिली नाहीं. आयुष्यभर अनेक शिष्यांना विद्यादान करणें व निरनिराळ्या प्रांतांतून श्रावणमासदक्षिणेकरितां व सन्माना-करितां आलेल्या महाविद्वानांशीं वादविवाद व चर्चा करणें यांतच त्यांनीं आपला काल घालविला. असें सांगण्यांत येतें कीं ते आपल्या घराच्या माजघरांत आपल्या चारही बाजूस चार जळत्या समया ठेवून व त्यांचे जवळ पोथ्या ठेऊन बसत असत. हेतु हा कीं कोणत्याही बाजूस बसलेल्या पंडितांबरोबर चर्चा करण्यास सुलभ व्हावें व जरूर वाटल्यास ताबडतोब ग्रंथ पाहून उत्तर देतां यावें. नीलकंठशास्त्री यांनीं साहजिकच प्रगुरूंच्या नव्यमताचा पुरस्कार केला व दोन्ही शेखरांचें अध्ययन सुरू करून अनेक शिष्य निर्माण केले. त्यांमधील प्रमुख शिष्यांचीं नांवें वर देण्यांत आलींच आहेत.

## ४१. नीलकंठशास्त्री यांचे पुण्यांतील शिष्य व पुण्यांतील सरकारी पाठशाला.

नीलकंठशास्त्री हे व्याकरणाच्या नव्या संप्रदायाचे पूर्ण पुरस्कर्ते होते. पुण्यामध्यें त्यांचे पुष्कळच शिष्य होते इतकेंच नव्हे तर गांवोगांवाहूनही त्यांचेकडे व्याकरणाचे मुख्य ग्रंथ शिकण्यास लोक येत असत दरबारांत त्यांची योग्यता मोठी असल्यामुळें व विद्वत्ताही असामान्य असल्या-मुळें प्रत्यक्ष त्यांचे शिष्य नसलेलेही पुण्यांतील कांहीं विद्वान् शास्त्री आपणांला त्यांचे शिष्य म्हणवून घेणें हा मोठा मान समजत. यांपैकींच एक मेरुशास्त्री गोडबोले म्हणून होते. मेरुशास्त्री यांची बुद्धि जरी तीव्र होती तरी आर्थिक परिस्थिति वाईट असल्यामुळें त्यांना जकातनाक्यावर कारकुनाची जागा उपजीविकेकरितां धरावी लागली. एके दिवशीं जकातीच्या बद्दल कांहीं कुरबुर झाल्यामुळें त्यांचेकडून त्या दिवशीं गेलेल्या गाड्यांची लेखी केलेली नोंद मागण्यांत आली असतां आपले ध्यानांत सर्व असतें आपणाला नोंद करण्याची जरूर पडत नाहीं असें त्यांनीं उत्तर दिलें व हिशेब बरोबर असल्याबद्दल वरच्या अधिकाऱ्याची खात्री करून दिली. वरच्या अधिकाऱ्याला त्यांच्या स्मरणशक्तीचें कौतुक वाटलें व त्यानें मेरुशास्त्री यांना न्यायशास्त्राचें अध्ययन करण्यास पाठविलें. गुरुजींनीं त्यांना प्रथम तर्कसंग्रहाचा पाठ सांगितला. पोथी वगैरे कांहीं न घेतां दुसरे दिवशीं गुरुजींनीं सांगितलेलें सर्व मेरुशास्त्री यांनीं पाठ म्हणून दाखविलें. नंतर मेरुशास्त्री यांनीं न्यायाचें उत्तम अध्ययन केलें व दरबारांत उत्तम नैयायिक म्हणून ते प्रसिद्धि पावले. नीलकंठशास्त्री थत्ते यांचे शिष्य राघवाचार्य ओक हे प्रसिद्ध वैयाकरण पुण्याच्या सरकारी पाठशाळेचे कांहीं दिवस मुख्याध्यापक होते. १८३८ सालीं त्यांचे निधनानंतर विष्णुशास्त्री बापट यांची तेथें नेमणूक झाली. बापट यांचेनंतर इ. स. १८४० सालीं मोरशास्त्री साठे यांची नेमणूक झाली. मोरशास्त्री हे नीलकंठशास्त्र्यांच्या शिष्यांतील नांवाजलेले शिष्य होते व ते चतुःशास्त्रनिष्णात होते. त्यांनीं मुख्याध्यापकाचें काम दहा वर्षें केलें. मोरशास्त्री यांच्या हाताखालीं व्याकरण, न्याय, धर्मशास्त्र, साहित्य व ज्योतिष या विषयांचें सर्व मिळून १०।१२ गुरुजी होते. मुख्याध्यापकाला त्या वेळीं मासिक रु. १०० वेतन असे. शास्त्राध्यापकांना रु. ५६ मिळत व त्यांच्या मदतनीसांना रु. २८ मिळत व त्यांच्याही मदतनीसांना दरमहा रु. १० मिळत. या गुरुजींमध्यें न्यायाचार्य रघुनाथशास्त्री पर्वते व त्यांचे मदतनीस नरसिंहाचार्य ओक होते. व्याकरणाचार्य धोंडशास्त्री डेंगवेकर व त्यांचे मदतनीस गोपाळाचार्य कऱ्हाडकर होते. धर्म-शास्त्राचार्य नीळकंठशास्त्री भट व त्यांचे मदतनीस गणेशशास्त्री मराठे हे होते व ज्योतिषाचार्य विष्णुशास्त्री जोशी व त्यांचे मदतनीस शंकरशास्त्री व्यवहारे हे होते. या सर्व आचार्यांची

गणना नीलकंठशास्त्री यांच्या शिष्य व प्रशिष्यांत होती. यांशिवाय परशुरामपंत गोडबोले व रघुनाथशास्त्री तळेकर यांनींही अध्यापकाचें काम कांहीं दिवस केलें.

## ४२. राघवेन्द्राचार्य गजेन्द्रगडकर यांचा अल्प परिचय—

नीलकंठशास्त्री थत्ते यांचे जरी अनेक शिष्य होते तरी व्याकरणशास्त्राच्या उच्च ग्रंथांच्या अध्ययनाध्यापनाची व ग्रंथनिर्मितीची परंपरा त्यांचे बुद्धिमान् शिष्य राघवेन्द्राचार्य गजेन्द्रगडकर व भास्करशास्त्री अभ्यंकर यांनीं राखिली. दोघेही आपलें अध्ययन इ. स. १८१२ च्या सुमारास संपवून सातारा येथें गेले व तेथें त्यांनीं आपआपल्या घरीं अनेक विद्यार्थ्यांना विनावेतन शास्त्र-ग्रंथ शिकवून सरस्वतीची उत्तम प्रकारें आमरणान्त सेवा केली. या दोघांमध्यें राघवेन्द्राचार्य वयानें मोठे होते. दोघेही गुरुबन्धू एकमेकांशीं अत्यंत प्रेमानें वागत. दोघांपैकीं राघवेन्द्राचार्य यांना घरची सुस्थिति असल्यामुळें नोकरीची जरूर लागली नाहीं; परंतु त्यांना प्रतापसिंह राजाचा आश्रय होता. भास्करशास्त्री यांची न्यायाधीशाचे मदतनीस म्हणून सातारा दरबारांत रुपये ५० वर नियुक्ति होती व राज्य खालसा झाल्यावर तेवढेंच पेन्शन तहाहयात त्यांना मिळत होतें. राघवेन्द्राचार्य हे मध्वपीठावरील सुधीन्द्रस्वामी यांचे नातू. त्यांनीं अध्ययन प्रथमतः आपले चुलत्यांचेजवळ, नंतर पंढरपुरीं विठ्ठलोपाध्यायांजवळ व नंतर पुणें येथें नीलकंठशास्त्री थत्ते यांचेजवळ केलें. त्यांनीं परिभाषेन्दुशेखरावर त्रिपथगा, शब्देन्दुशेखरावर विषमी व वैयाकरण-भूषणसारावर प्रभा असे तीन उत्तम टीकाग्रंथ लिहिले. त्यांनीं अनेक शिष्यांना विद्यादान दिलें; पैकीं अनंतशास्त्री पेंढारकर, विष्णुशास्त्री पंडित व पुत्र नारायणाचार्य हे प्रसिद्धीस आले. वृद्धापकाळीं पौत्र अनंताचार्य यांनींही त्यांचेजवळ ब्रह्मावर्त येथें अध्ययन केलें. नारायणाचार्य यांनींही धर्मशास्त्र व वेदान्तशास्त्र यांवर ग्रंथ लिहिले. अनन्ताचार्य हेही व्याकरणनिष्णात होते व वेळोवेळीं ते पितामहसमान भास्करशास्त्री यांचेकडे शास्त्रीय विषयांवर चर्चा करण्यास जात असत. अनंताचार्यांचे चिरंजीव बाळाचार्य हेही चांगले वैयाकरण होते व त्यांनींही अध्यापनाचें काम शेवटपर्यंत चालविलें. बाळाचार्यांचे पांचही पुत्र उत्तम प्रकारचे संस्कृतज्ञ झाले. त्यांपैकीं नरसिंहाचार्य यांनीं पिढीजाद अध्यापनाचें काम चालविलें. सेतुमाधवाचार्य व अश्वत्थामाचार्य यांनींही अध्यापन व ग्रंथनिर्मिति दोनही कार्यें केलीं.

## ४३. भास्करशास्त्री अभ्यंकर यांचा अल्प परिचय.

भास्करशास्त्री (इ. स. १७८३–१८७०) यांचें शिक्षण प्रथम वाई येथें गोपीनाथशास्त्री आगाशे यांजकडे झालें. पुणें येथें अनेक बुद्धिमान् शिष्यांमध्यें त्यांच्या तीव्र बुद्धीची चमक गुरु-जींना दिसून आली. व्याकरणशास्त्रांत त्यांचें विशेष प्रभुत्व पाहून गुरुजी त्यांना पाणिनि या नांवानें संबोधीत असत. भास्करशास्त्री यांनीं शेखर मंजूषा वगैरे ग्रंथांचें अध्ययन स्वतः हस्तलिखित प्रती लिहून केलें. त्यांचे गुरुजी नीलकंठशास्त्री ह्यांनीं काशी येथें नागोजीभट्टांच्याच पट्टशिष्यांकडे (पायगुंडे यांजकडे) अध्ययन केलेलें असल्यामुळें भास्करशास्त्री यांच्या हस्तलिखित परिभाषेन्दु-शेखर, शब्देन्दुशेखर वगैरे ग्रंथांच्या प्रती नागोजीभट्टांच्या लिखाणास पूर्णपणें धरून आहेत व अशा कांहीं प्रती लेखकाजवळ आहेत. भास्करशास्त्री यांनीं आपला सर्व काल आपल्या घरीं आपल्या शिष्यांना पढविण्यांत घालविला. काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे हे त्यांचे प्रथम शिष्य होत. काशी-नाथशास्त्री यांनीं व्याकरणशास्त्राचें समग्र अध्ययन करून, काशीस जाऊन, तेथें न्यायशास्त्राची

परिष्कारपद्धती स्वीकारूनही पंडितांमध्यें अग्रस्थान मिळविलें व मोठा शिष्यगण निर्माण केला. भास्करशास्त्री यांच्या दक्षिणेतील शिष्यांत नारायणशास्त्री गोडबोले व रामशास्त्री गोडबोले हे प्रमुख होते. राघवेन्द्राचार्य वारल्यानंतर अनंतशास्त्री पेंढारकर यांनींही भास्करशास्त्री यांचेजवळ व्याकरणशास्त्राच्या आकर ग्रंथांचें अध्ययन केलें. मुंबई येथील एल्फिन्स्टन कॉलेजमधील व्याकरणनिष्णात प्राध्यापक डॉ. कीलहॉर्न हे सातारा येथें व्याकरणशास्त्रांतील आपल्या कांहीं शंका विचारण्यास भास्करशास्त्री यांचेकडे गेले व तेथें निरनिराळ्या मुद्यांवर चर्चा करून परत गेले. विशेषतः अन्तरङ्ग-परिभाषेचे भास्करशास्त्री यांनीं केलेल्या विवरणानें त्यांचें पूर्ण समाधान झालें. 'अन्तरङ्ग' परिभाषेचें महत्त्व 'पाणिनीयस्य तन्त्रस्य भाष्यस्थं वेत्ति मर्म कः । नागेशोक्तान्तरङ्गस्यान्तरङ्गज्ञो हि मर्मवित्' या उक्तीवरून सहज ध्यानांत येईल. नंतर एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें व्याकरण शास्त्री म्हणून येण्याविषयीं कीलहॉर्न यांनीं भास्करशास्त्री यांनाच विनन्ति केली; पण वार्धक्यानें तिचा स्वीकार करणें शक्य झालें नाहीं. तेव्हां एकाद्या शिष्याची शिफारस करण्यासंबंधीं त्यांना सांगण्यांत आलें असतां त्यांच्या उत्तम शिष्यांपैकीं इतरांनीं जाण्याचें नाकारलें; परंतु अनंतशास्त्री पेंढारकर जाण्यास तयार झाले व त्याप्रमाणें अनंतशास्त्री यांची एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें शास्त्री म्हणून नेमणूक झाली. डॉ. कीलहॉर्न यांनीं व्याकरणाशास्त्राचें अध्ययन अनंतशास्त्री यांचेजवळ केलें. येथें नमूद करण्याजोगी गोष्ट अशी आहे कीं, कीलहॉर्न साहेबांनीं अनंतशास्त्री यांचे गुरुजी म्हणून भास्करशास्त्री यांचा केव्हांही उल्लेख केला नाहीं. राघवेन्द्राचार्यांचाच निर्देश गुरुजी म्हणून केला आहे. याचें कारण असें सांगण्यांत येतें कीं राघवेन्द्राचार्यांच्या निधनानंतर अनंतशास्त्री यांनीं आपलें अपुरें राहिलेलें अध्ययन भास्करशास्त्री यांचेकडे पुरें करण्यास परवानगी द्यावी म्हणून राघवेन्द्राचार्यांच्या चिरंजीवांस विचारलें असतां, त्यांनीं "गुरु म्हणून सदा मी राघवेन्द्राचार्यांचाच उल्लेख करीन" अशी शपथ अनंतशास्त्री यांजकडून कृष्णा व वेण्णा या नद्यांच्या संगमांत उभें राहून घेवविली. भास्करशास्त्री यांनीं ही सर्व हकीगत ऐकूनही अनंतशास्त्री यांना आपलेजवळ अध्ययन करण्यास परवानगी दिली इतकेंच नव्हे तर एल्फिन्स्टन कॉलेजमधील शास्त्री म्हणून नियुक्ति होण्यास योग्य अशी त्यांची शिफारस केली. अनंतशास्त्रीही आपण घेतलेल्या शपथेस अनुसरूनच कीं काय भास्करशास्त्री यांचेकडे अध्ययन करतांना पुस्तक पुढें ठेवीत नसत व पाठ चालू असतां शिष्य या नात्यानें कांहींही शंका विचारीत नसत.

## ४४. भास्करशास्त्री यांची काशींतील शिष्यपरंपरा

नीळकंठशास्त्री यांचे समकालीन महाराष्ट्रांत कऱ्हाड, वाई, नाशीक, पंढरपुर इत्यादि ठिकाणीं जुन्या व्याकरणपरंपरेनें शिकलेले व तिचेच अभिमानी वैयाकरण होऊन गेले. गोपीनाथशास्त्री आगाशे हे त्यांपैकीं प्रमुख होते. जोंपर्यंत नीळकंठशास्त्री थत्ते हयात होते तोंपर्यंत विद्वानांना जरी या प्राचीन मताच्या अभिमानी वैयाकरणांच्या विद्वत्तेची जाणीव होती तरी केवळ शास्त्रीय मतभेदानें योग्य स्थान व राजाश्रय त्यांना मिळाले नाहींत इतकेंच नव्हे तर त्यांना कांहीं वेळां सामाजिक त्रासही सोसावा लागला. गोपीनाथशास्त्री यांचेवरही अशाच प्रकारचें संकट आलें व सातारा राज्यांत राहणें अशक्य झालें. तेव्हां कांहीं विद्वान लोकांनीं ही गोष्ट वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या कानावर घालून त्यांना सातारा राज्याच्या सीमेपलीकडे पोंचते केले. भास्करशास्त्री यांचाही कल जुन्या मताकडे होता व त्यांचे शिष्य काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे यांना उघडपणें जुन्या मताचा अभिमान बाळगून मानाचें स्थान मिळवणें अशक्य झाल्यामुळेंच ते आपलें अध्ययन संपूर्ण झाल्यावर काशी येथें गेले. काशीमध्यें त्या वेळीं जरी वैद्यनाथ पायगुंडे

किंवा भैरवमिश्र यांसारखीं विद्वद्रत्नें नसलीं तरी तेथील वैयाकरण हे नैयायिकांच्या परिष्कार-पद्धतीनें वाद करण्यांत निष्णात असल्यामुळें काशीनाथशास्त्री यांच्या पाण्डित्याला वाव मिळेना म्हणून ते प्रथम परत आले व नंतर भास्करशास्त्री यांचेजवळ नव्यन्यायाचें व परिष्कारपद्धतीचें अध्ययन करून पुन्हां काशी येथें गेले व तेथें वैयाकरणांमध्यें त्यांनीं उच्च स्थान मिळविलें. 'काश्यामेकः काशीनाथः' असे त्यांचे संबंधानें विद्वान लोकांत उद्गार निघत असत. त्यांनीं उत्तम शिष्य तयार केले. त्यांपैकीं राजारामशास्त्री कार्लेकर हे प्रमुख होते. राजारामशास्त्री यांचे शिष्य बाळशास्त्री रानडे यांचें नांव काशीमध्यें सर्वतोमुखीं होतें इतकेंच नव्हे तर उत्तर हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणांहून त्यांचेकडे अध्ययनास लोक जात असत. त्यांची स्मरणशक्ति, पाठांतर, वाक्पटुत्व व अध्यापनचातुर्य याचें लोक कौतुक करीत. त्यांना काशी येथें बालसरस्वती नांवानें संबोधीत असत. ही बालसरस्वती संज्ञा त्यांना कां दिली गेली यासंबंधींचा एक गंमतीचा श्लोक काशीमध्यें विद्वान लोकांच्या मुखीं आहे. तो पुढीलप्रमाणें—"यद् द्वादशान्यिकतयापि (बारा चुक्या करून सुद्धां) न पारयन्ति शस्त्रं बुधा निगदितुं किल बालखिल्यम् । ऐकान्यिकोपि न बभूव यतोत्र तेन प्रापाभिधानमिह बालसरस्वतीति". विद्वद्वर्य गंगाधरशास्त्री तेलंग, शिवकुमारशास्त्री, तात्याशास्त्री पटवर्धन, दामोदरशास्त्री भारद्वाज, नेपाळचे हेमराज पंडित, नित्यानंद पर्वतीय, केशवशास्त्री मराठे वगैरे अनेक विद्वान शिष्य त्यांनीं तयार केले. सांप्रत काशी येथील प्रमुख वैयाकरण हे त्यांच्याच शिष्यपरंपरेंत येतात.

### ४५. भारतांतील संस्कृतविद्येचीं निवासस्थानें.

भास्करशास्त्री यांच्या काशींतील विशाल शिष्यपरंपरेंतील ठळक विद्वानांचा अल्प परिचय देण्यापूर्वीं भास्करशास्त्री यांच्या कार्यकालीं म्हणजे इ. स. १८१०-१८७० या कालखंडांत व तत्पूर्वीं काशी व पुणें या प्रांतांत विद्यावृद्धीचीं जीं आंदोलनें झालीं त्यांचें थोडें निरीक्षण करणें जरूर आहे. प्राचीन कालापासून भारतांतील संस्कृत विद्येचीं निवासस्थानें पाहिल्यास पाणिनिकालीं व त्यानंतर सुमारें १०।१२ शतकें तक्षशिला व नालंदा हीं विद्यास्थानें होतीं. मुस्लिम धर्माच्या उदयानंतर पंजाब व गांधार प्रांतांत परधर्मीयांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या तेव्हां रजपुतांच्या शौर्यामुळें संरक्षण मिळालेलें उज्जयिनी शहर हें विद्येचें निवासस्थान झालें. कांहीं काळानंतर त्याहूनही सुरक्षित अशीं दक्षिणेंतील कुंभकोण, विजयानगर, तंजावर व प्रतिष्ठान (पैठण) येथेंही संस्कृत विद्येनें आपलीं निवासस्थानें बनविलीं. विजयानगरचें राज्य लयास गेल्यानंतर वरील ठिकाणींही परधर्मीयांकडून उपसर्ग पोंचूं लागला. परंतु शिवाजी महाराजांनीं स्वराज्याची स्थापना केल्यानंतर वाई, नाशीक, कऱ्हाड व पंढरपूर येथें कांहीं काळ विद्येनें आपलें घर केलें. पेशवाईच्या स्थापनेनंतर पुणें येथें विद्येनें आपलें निवासस्थान केलें व तेथें संस्कृत विद्येचा बराच उत्कर्ष झाला. काशी हें पुण्यक्षेत्र मानण्यांत आल्यानंतर राजे लोकांनीं तेथें-आपलीं घरें बांधिलीं व विद्याभिवृद्ध्यर्थ पाठशाळांना आश्रय दिला. परधर्मीयांची जरी काशीक्षेत्रीं वेळोवेळीं आक्रमणें झालीं तरी आक्रमकांचें लक्ष मुख्यतः देवालयें व धनिक लोकांचीं घरें यांवर असल्यामुळें पवित्र गंगातीरीं विरक्त वृत्तीनें फक्त विद्याभिवृद्धीकडे लक्ष देणाऱ्या विद्वानांना विशेष झळ पोंचली नाहीं व त्यांनीं आपलें विद्यादानाचें व्रत अव्याहत चालविलें हें भट्टोजीदीक्षित, मधुसूदनसरस्वती, नागेशभट्ट वगैरे विद्वानांच्या कामगिरीवरून सहज ध्यानांत येईल. अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत राजकीय घडामोडीमुळें जरी विद्याभिवृद्धीला वेळोवेळीं उपसर्ग पोंचला व कधीं वाढ तर कधीं ऱ्हास झाले तरी पण काशीक्षेत्रानें विद्यादेवीची जोपा-

सना आजपर्यंत अखंड चालविली आहे व आतां स्वराज्यप्राप्तीनंतर या पुण्यक्षेत्राला संस्कृत विद्येचें अग्रस्थान मिळेल अशी अपेक्षा आहे.

## ४६. काशीक्षेत्रांत संस्कृत विद्येचे उत्कर्षापकर्ष.

भारतांतील इतर प्रांतांतही वेळोवेळीं उत्तम विद्वद्रत्नें निर्माण झालीं तरी पण गेलीं पांच सहा शतकें संस्कृताध्ययनाचें अखंडितत्व कायम ठेवण्याचें श्रेय काशीक्षेत्रालाच दिलें पाहिजे. बंगालमध्यें नवद्वीपानें उत्तमोत्तम नैयायिक निर्माण केले; तर मिथिला प्रांतांत उत्तमोत्तम मीमांसक झाले. काशीमध्यें प्रसिद्ध धर्मशास्त्रज्ञ होऊन गेले; तर भारताच्या दक्षिण भागांत वेदान्तशास्त्राचा पुरस्कार झाला. माळवा व गुजरात यांनीं साहित्याची उपासना केली; तर महाराष्ट्रानें व्याकरणशास्त्राचा पुरस्कार केला. श्रीक्षेत्र काशी येथें अठराव्या शतकाच्या पूर्वार्धांत पंडितवर्य नागेश यांच्या निधनानंतर साधारणपणें शंभर वर्षें विद्याभिवृद्धीला प्रतिकूलच गेलीं. याला कारण निरनिराळ्या राजांचे परस्परांमध्यें व कंपनीसरकारशीं चाललेल्या कलहामुळें सर्वत्र पसरलेलें अशांततेचें वातावरण हेंच होय. या काळीं दक्षिणेमध्यें पेशव्यांचे आमदानींत श्रावणमासपरीक्षा व दक्षिणा त्याप्रमाणेंच महापंडितांचा गौरव व सत्कार हे चालू असल्यामुळें विद्येचा उत्कर्ष झाला. परंतु दुर्दैवानें एकोणिसाव्या शतकाचे आरंभीं ही स्थिति बदलली. अनेक वेळां पुणें शहर लुटलें गेलें व केव्हां केव्हां शहरांत राहणेंही धोक्याचें झालें. अर्थात विद्याभिवृद्धीला धक्का पोंचला. परंतु १८१८ सालीं पेशवाई लयाला गेल्यानंतर वातावरण शांत झालें व इंग्रजी राज्यकर्त्यांनींही आपली सत्ता स्थापिल्यानंतर राज्यकारभार व शिक्षण हीं पूर्वीप्रमाणेंच सुरू ठेवल्यामुळें इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर संस्कृतविद्येचा थोडासा उत्कर्षच झाला असें म्हटलें तरी चालेल. इंग्रजी राज्यकर्त्यांनीं संस्कृत पाठशाळांची स्थिति सुधारली, तेथें उत्तम विद्वानांची नेमणूक केली व अध्ययनाध्यापनाची परंपरा कायम राखली.

## ४७. काशी येथील राजकीय संस्कृत-विद्यालय.

इ. स. १७९१ सालीं काशी येथें कंपनी सरकारनें संस्कृत विद्येचें, संस्कृतग्रंथांचें व अध्ययनाध्यापनपरंपरेचें रक्षण व्हावें याकरितां संस्कृत कॉलेज स्थापन केलें व तेथें परंपरागत पद्धतीनें वेदवेदाङ्गांचें, दर्शनांचें व शास्त्रांचें अध्यापन चालू केलें. विद्वान शास्त्री व वैदिक यांची तेथें नेमणूक केली व विद्यार्थ्यांनाही शिष्यवृत्त्या चालू केल्या. प्रथमपासूनच काशी येथें धर्मशास्त्र व व्याकरण यांच्या अभ्यासाला प्राधान्य होतें व तेंच संस्कृत कॉलेजांतही कायम राहिलें. सुमारें ५० वर्षांनीं इंग्रजी शिक्षण सर्वत्र चालू झाल्यानंतर संस्कृत कॉलेजांतही इंग्रजी विभाग चालू झाला व पहिले प्रिन्सिपाल म्हणून जॉन मूर साहेबांची इ. स. १८४४ मध्यें नेमणूक झाली. त्यानंतर रेव्हरंड वॉलिस ( १८४५–४६ ), बॅलंटाईन ( १८४६–६१ ), ग्रिफिथ ( १८६१–१८७८ ), नेस्फील्ड ( १८७८–७९ ), थिबो ( १८७९–८८ ) व व्हेनिस (१८८८–१९१८) यांची क्रमानें त्या जागीं नेमणूक झाली. मूर साहेबांनीं राजारामशास्त्री कार्लेकर यांचेजवळ संस्कृतचें उत्तम अध्ययन केलें, व स्वतःही इंग्रजींत संस्कृत विषयांवर पुस्तकें लिहिलीं. प्रिन्सिपाल बॅलन्टाईन यांनीं शास्त्री लोकांकडून उत्तम इंग्रजी ग्रंथांचीं संस्कृतमध्यें भाषांतरें करविलीं व विद्वानांकडून ग्रंथसंस्करणाचें काम करवून घेतलें. त्यांनीं प्रथम काशीनाथशास्त्री

अष्टपुत्रे यांजकडे व नंतर राजारामशास्त्री कार्लेकर यांजपाशीं व्याकरणशास्त्राचा काळजीपूर्वक अभ्यास केला व स्वतः व्याकरणमहाभाष्याचें संस्करण केलें. ग्रिफिथसाहेबांनीं वेदविद्येकडे विशेष लक्ष दिलें व वेदविद्येच्या पुरस्काराचे बाबतींत उत्तम कामगिरी केली हें त्यांनीं केलेल्या वेदांच्या काव्यबद्ध भाषांतरावरून सहज ध्यानांत येईल. प्रिन्सिपाल थीबो यांनीं वेदान्तशास्त्राचा उत्तम अभ्यास केला व शंकराचार्य व रामानुजाचार्य यांच्या वेदान्तसूत्रभाष्यांच इंग्रजी भाषेंत सुंदर अनुवाद केला व मार्मिक प्रस्तावना लिहिली. थीबो साहेबांचे नंतर प्रिन्सिपाल व्हेनिस यांनींही संस्कृतविद्येचा पुरस्कार चांगल्या रीतीनें केला, व उत्तम ग्रंथांचें पंडितांकडून संस्करण केलें. डॉ. व्हेनिस यांनीं गंगाधरशास्त्री यांचेजवळ अध्ययन केलें. गंगाधरशास्त्र्यांचा ते गुरुजी म्हणून सदा उल्लेख करीत. काशी येथील संस्कृतविद्यालयाचा १८५०ते१९१० हा मोठ्या उत्कर्षाचा काल होता असें म्हटलें तरी चालेल. या कालांत विद्यालयाला बापूदेवशास्त्री, राजारामशास्त्री कार्लेकर व बालसरस्वती हे अध्यापक प्रथमतः, व त्यानंतर त्यांचेच कैलासचंद्र शिरोमणि (१८६८–१९०७), शिवकुमारशास्त्री (१८७५–७९) गंगाधरशास्त्री तेलङ्ग (१८७९–१९०९) दामोदरशास्त्री भारद्वाज (१८७९–१९०८) तात्याशास्त्री पटवर्धन (१८८०–१९१९) रामशास्त्री तेलङ्ग (१८८२–१९२२) व सुधाकर द्विवेदी यांच्यासारखे नांवाजलेले शिष्य संस्कृत विद्यालयाला लाभले. या सर्वांचेकडून निरनिराळ्या विषयांत उत्तम ग्रंथनिर्मिति झाली व उत्तम शिष्यही निर्माण झाले व अध्ययनाध्यापनपरंपरा कायम राहिली. इंग्रजी राज्यकर्त्यांनीं १८८७ सालीं महाराणी व्हिक्टोरियाच्या राज्याच्या ज्युबिली उत्सवाच्या निमित्तानें महामहोपाध्याय पदवी देण्याचा उपक्रम केला व या सर्व विद्वानांना क्रमाक्रमानें ती पदवी अर्पण केली. रामशास्त्री व बालसरस्वती हे या पदवीदानाच्या उपक्रमापूर्वींच निवर्तले असल्यामुळें त्यांना ही पदवी विभूषित करतां आली नाहीं. इ. स. १८१८ नंतर म. म. गंगानाथ झा, म. म. गोपीनाथ कविराज व म. म. मंगलदेवशास्त्री हे संस्कृत कॉलेजचे प्रिन्सिपाल झाले. त्यांनींही उत्तम प्रकारें विद्यालयाची जोपासना केली, उत्तम ग्रंथांचें संस्करण करविलें व स्वतःही चांगल्या प्रकारची ग्रंथनिर्मिति केली.

## ४८. काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे यांचा अल्प परिचय.

काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे, (१८००–१८५०) हे पुणें येथील सरकारी पाठशाळेंतील गुरुजी गोविंदाचार्य अष्टपुत्रे यांचे चिरंजीव. अष्टपुत्रे हे मूळचे वाईचे राहणारे. वाई येथें त्यावेळीं आगाशे, भारद्वाज,वळे,रड्डी, अष्टपुत्रे वगैरे घराणीं शास्त्राभ्यासाकरितां प्रसिद्ध होतीं. वाई येथें गोपीनाथशास्त्री आगाशे यांचेजवळ प्रथम अध्ययन करून नंतर काशीनाथशास्त्री हे पुणें येथें गेले. अध्ययनास तेथेंही कांहीं दिवस राहिल्यानंतर व्याकरणशास्त्राचें अध्ययन सुपूर्त करण्याकरितां गोविन्दाचार्यांनीं त्यांना सातारा येथें भास्करशास्त्री यांचेकडे पाठविलें. सातारा येथें अध्ययन संपूर्ण झाल्यानंतर पुणें येथील राजकीय पाठशाळेंत त्यांची नियुक्ति होणें जरी शक्य होतें तरी पुणें येथें पूर्वीइतका शास्त्रीय विद्वत्तेला मान राहिला नसल्यामुळें त्यांच्या विद्वत्तेचें चीज परप्रान्तात ज्यास्त होईल या हेतूनें गोविन्दाचार्यांनीं काशीनाथशास्त्री यांना काशी येथें पाठविलें. तेथें त्यांची विद्वत्ता व सभापांडित्य पाहून लोकांनीं त्यांचेबद्दल ‘ पण्डितेषु काश्यामेकः काशीनाथः’ असे उद्गार काढले. काशी येथील राजकीय विद्यालयांत त्यांनीं अध्यापक म्हणून काम केलें व अनेक शिष्यांना विद्यादान दिलें.

## ४९ राजारामशास्त्री कार्लेकर यांचा अल्प परिचय.

राजारामशास्त्री कार्लेकर (इ. स. १८१०–१८७५) हे काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे यांच्या शिष्यांपैकीं प्रमुख शिष्य होते. काशीनाथशास्त्री यांचेजवळ व्याकरणाध्ययन संपूर्ण करून राजारामशास्त्री हे चित्रकूट येथें पेशव्यांचे आश्रयानें राहिले. लहान लहान संस्थानांवर देखरेख करण्याकरितां रेसिडेंट म्हणून तसेंच जिल्ह्याचे प्रमुख अधिकारी म्हणून त्यावेळीं अनेक युरोपियन अधिकारी असत व त्यांपैकीं पुष्कळ जण संस्कृत व प्रांतीय भाषांचा अभ्यास पंडितांचे जवळ करीत. त्यांपैकीं कांहीं जण एतद्देशीय विद्वानांची मदत घेऊन संस्कृत शास्त्रांचाही उत्तम प्रकारें अभ्यास करीत. त्या काळचे एतद्देशीय विद्वान हे वेदपठनामध्यें किती जरी निष्णात असले तरी वेदाच्या अर्थाचा विचार करण्याचे बाबतींत त्यांच्यामध्यें अतिशय उदासीनता दिसून येई. वेद हे अपौरुषेय असल्यामुळें त्यांचेबद्दल चिकित्सा करणें हे एक प्रकारचें पातक आहे अशी समजूतही या उदासीनतेचें कारण असेल. परदेशीय विद्वानांनीं वेदाकडे ज्यास्त लक्ष घातलें व भाषांतर टिप्पण्या व निबंध लिहून वेदाभ्यासाला चालना दिली. डॉ. मूर हे अशाच विद्वानांपैकीं एक होते. राजारामशास्त्री यांची विद्वत्ता पाहून डॉ. मूर यांनीं त्यांना आपले जवळ राहण्याची विनंति केली व त्यांचे जवळ धर्मशास्त्राचें अध्ययन केलें. ग्वाल्हेरच्या महाराजांनीं राजारामशास्त्री यांची कीर्ति ऐकून त्यांना ग्वाल्हेर येथें बोलाविलें व त्यांचा उत्तम सन्मान करून आपलेजवळ राहण्याची विनंति केली. पण राजारामशास्त्री हे अत्यंत धार्मिक वृत्तीचे असल्यामुळें त्यांना काशीक्षेत्रींच राहणें योग्य वाटलें. ते काशी येथें रहावयास गेले व त्यांनीं शिष्यांना पढवण्याचें काम चालू केलें. लवकरच त्यांची धर्मशास्त्राध्यापक म्हणून नियुक्ति झाली तेथें सुमारें २० वर्षे (१८५४–१८७४) अध्यापनाचें काम करून व बालशास्त्री रानडे यांच्यासारख्या तयार शिष्यांना श्रेष्ठ ग्रंथ पढवून त्यांनीं चतुर्थाश्रमाचा स्वीकार केला व कांहीं महिन्यांनंतरच गंगातटाकीं आपला देह ठेविला.

## ५०. बालसरस्वती यांचा अल्प परिचय.

बालशास्त्री रानडे अथवा बालसरस्वती (१८३९–१८८२) यांचा जन्म इ. स. १८३९ सालीं झाला. त्यांचे वडील गोविंदभट्ट हे परमधार्मिक व व्रतानुष्ठानपर कर्मठ ब्राह्मण होते. पुत्रप्राप्तीकरितां त्यांनीं शरभानुष्ठान केलें व ईशकृपेनें लवकरच त्यांना पुत्र झाला. त्याचे नांव त्यांनीं विश्वनाथ असें ठेविलें. पुत्रजन्मानंतर लवकरच गोविंदभट्ट निवर्तले. मरणसमयीं त्यांनीं मुलाला आपले परमस्नेही रामकृष्णभट्ट दीक्षित यांचे स्वाधीन करून त्याच्या विद्याभ्यासाची काळजी घ्या असें सांगितलें होतें. मुलाची कुशाग्रबुद्धि व अलौकिक स्मरणशक्ति ही कौतुक करण्याजोगीं होतीं उपनयनापूर्वींच संस्कृत स्तोत्रें सुभाषितें व काव्यांतील श्लोक एकदां ऐकून त्यांनीं मुखोद्गत केले. उपनयनानंतर फारच अल्पावधींत त्यांनीं कृष्णयजुर्वेद मुखोद्गत केला इतकेंच नव्हे तर चारही वेदांच्या संहिता व उपनिषदें हीं मुखोद्गत केलीं. सामगायन तर ते अत्यंत सुंदर व शास्त्रशुद्ध करीत. श्रौतकर्मांतही ते अत्यंत निपुण होते. वयाचे नवव्या वर्षीं संक्रांतीच्या उत्सवाच्या निमित्तानें रामकृष्णभट्टांच्या बरोबर ते चित्रकूट येथें गेले असतां पेशव्यांनीं 'या लहान मुलाला वेद मुखोद्गत आहेत' असें ऐकून त्यांना बालखिल्य सूक्त म्हणावयास सांगितलें व तें त्यांनीं बिनचूक म्हणून दाखविलें. उत्सवास आलेल्या सर्व विद्वानांनीं त्यांच्या बुद्धीचें कौतुक केलें. एवढ्या लहानशा बालकानें बिनचूक बालखिल्य म्हटलें

म्हणून त्यांचें विश्वनाथ नांव बदलून त्यांना बालसरस्वती म्हणावयाचें त्या विद्वानांनीं ठरविलें व तेव्हांपासून बालसरस्वती हें त्यांचें नांव प्रचारांत आलें. ग्वाल्हेर येथें पुण्याहून मोरशास्त्री साठे व कुप्पाशास्त्री द्रवीड आले असतां बालसरस्वती यांनीं त्यांचेजवळ न्याय व मीमांसा या शास्त्रांचें अध्ययन केलें. त्यांचा पहिला विवाह इ.स.१८५५सालीं झाला. त्यानंतर ते आपलें राहिलेलें अध्ययन पुरें करण्यास काशी येथें गेले आणि प्रथम काशीनाथशास्त्री व नंतर राजारामशास्त्री यांचेजवळ त्यांनीं संपूर्ण व्याकरणशास्त्र म्हटलें. त्यांनी आपले गुरुजी राजारामशास्त्री यांचेबरोबर तीर्थयात्रा केल्या. यज्ञामध्यें तें सामगायन उत्तम करीत व आपल्या देखरेखीखालीं यज्ञाचा विधि यथासांग करवून घेत. त्यांचे मनांत स्वतः ज्योतिष्टोम यज्ञ करावा असें आलें व त्याकरितां त्यांनीं विधुरावस्था सोडून तिसरा विवाह केला व पत्नीकडे मन्त्रपठन व रामकृष्णभट्टांकडे अध्वर्युकर्म देऊन स्वतः यजमान होऊन ज्योतिष्टोम यज्ञ उत्कृष्ट रीतीनें पार पाडला त्यानंतर लवकरच मूळव्याधीनें ते आजारी पडले. त्यांच्या तरुण पत्नीच्या मनाला रोग दुःसाध्य आहे हें आढळून येतांच धक्का बसला व ती निवर्तली. नंतर थोडक्याच दिवसांत बाळशास्त्री यांनींही काशी क्षेत्रीं देह ठेविला

ग्रिफिथ व गफ या पाश्चात्य पंडितांनीं बालशास्त्री यांजेजवळ कांहीं शास्त्रीय ग्रंथ वाचले व त्यांचेकडून भामतीसह वेदान्तसूत्रभाष्य, व्याकरणमहाभाष्य वगैरे ग्रंथांचें संस्करण करून घेतलें. बालसरस्वती यांनीं परिभाषेन्दुशेखरावर पाण्डित्यपूर्ण टीका लिहिली व सारासारविवेक आणि विधवोद्वाहशङ्कासमाधि हे निबंध लिहिले. पण एकंदरींत त्यांचें लक्ष ग्रंथलेखनापेक्षां तीर्थयात्रा, यागानुष्ठान व विद्यादान यांजकडे ज्यास्त होतें व त्यांनीं काशीमध्यें सर्व शास्त्रांतील उच्चतम ग्रंथांचें अध्यापन करून मोठा शिष्यगण निर्माण केला. काशीमधील विद्यमान शास्त्री व पंडित यांमध्यें गुरूजी अथवा प्रगुरूजी या नात्यानें त्यांचें नांव सर्वतोमुखी आहे. आपल्या गुरूजींच्या नंतर त्यांनीं संस्कृत कॉलेजमध्यें कांहीं वर्षें अध्यापकाचें काम केलें. पण धार्मिक व्रतानुष्ठानें व तीर्थयात्रा यांच्यांत त्यामुळें व्यत्यय येतो असें आढळून येतांच प्रिन्सिपाल नेस्फील्ड यांच्या कळकळीच्या विनंतीलाही बाजूला सारून त्यांनीं नोकरी सोडली. त्यांचें वर्णन वेदपाठी, कर्मकाण्डी, वक्ता, सभाध्यक्ष, शास्त्रनिष्णात धर्मशास्त्रज्ञ मुनि असें करण्यांत येत असे. अवघ्या त्रेचाळीस वर्षांच्या आयुष्यांत त्यांनीं पुष्कळ शास्त्रीय ग्रंथांचें संशोधन केलें व अनेक विद्वान शिष्य निर्माण केले. त्यांच्या शिष्यांमध्यें पंडित शिवकुमार, नित्यानंद पर्वतीय, गंगाधरशास्त्री तेलङ्ग, तात्याशास्त्री पटवर्धन, दामोदरशास्त्री भारद्वाज, केशवशास्त्री मराठे, रामशास्त्री तेलंग, स्नेहिरामशास्त्री, हेमराजपंडित, विश्वनाथ दण्डिभट्ट यांची प्रामुख्यानें गणना होते.

### ५१. म. म. गंगाधरशास्त्री मानवल्ली ( तेलङ्ग ) यांचा अल्प परिचय.

गंगाधरशास्त्री हे बालसरस्वती यांचे प्रमुख शिष्य होते. त्यांचा जन्म इ. स. १८५२ मध्यें झाला. त्यांचें मूळचें नांव सुब्रह्मण्य होतें; पण गङ्गादशहरा पर्वामध्यें जन्म झाल्यामुळें लोक त्यांना गंगाधर म्हणूं लागले. उपनयनानंतर ८ वर्षें त्यांनीं संपूर्ण वेदाध्ययन केलें व त्याबरोबरच वेदाङ्गांचा, कर्मकाण्डाचा व साहित्यशास्त्राचाही त्यांनीं उत्तम अभ्यास केला. त्यानंतर राजारामशास्त्री यांचेजवळ व्याकरण, धर्म, सांख्य, योग व वेदान्त या शास्त्रांचें अध्ययन केलें व

त्यानंतर बालसरस्वती यांचेजवळ व्याकरण वगैरे शास्त्रांतील वरच्या ग्रंथांचें अध्ययन करून त्यांतही पारंगतता मिळविली. सन १८७९ मध्यें डॉ. थीबो यांनीं त्यांची संस्कृत कॉलेजमध्यें नेमणूक केली. सर्व व्यंजनें क्रमानें घालून समस्यापूरण करण्यास सांगितलें असतां त्यांनीं केलेला "अनेकवर्णक्रमरीतियुक्तः कखौ गघौ ङच्छजझा ञटौ ठः । अडंढणस्तोथ दधौ न पम्फं बभौ मयूरो लवशेषसिंहः" हा श्लोक लोकांमध्यें प्रसिद्ध आहे. थीबो साहेबांनीं त्यांचेकडून पदमञ्जरी, वाक्यपदीय, तन्त्रवार्तिक, रसगंगाधर वगैरे ग्रंथांचें उत्तम संस्करण करून घेतलें. इ.स. १८८७ सालीं राणीच्या राज्याच्या ज्युबिलीनिमित्त पदवीदान झालें त्यावेळीं इंग्रजी राज्यकर्त्यांनीं महामहोपाध्याय पदवीचा उपक्रम करून प्रथमच चार मोठ्या पंडितांना ती दिली त्यांमध्यें गंगाधर शास्त्री हे वयानें सर्वांत लहान होते. ही आख्यायिका पुढील श्लोकांत नमूद केली आहे:—

यल्लब्धुं शतशो बुधाः प्रतिदिनं कुर्वन्ति यत्नान् बहून्
केचित्तेषु कथंचिदेव सुकृतैर्विन्दन्ति तद्वार्धके ।
लब्धं तत्त्रिदशात्मकाल्पवयसा यूनामुना शास्त्रिणा
साकं वार्धकदुर्बलैस्त्रिभिरतिप्रख्यैः पुराणैर्बुधैः ॥

डॉ. व्हेनिस यांनीं गंगाधरशास्त्री यांचे जवळ शास्त्रग्रंथांचें अध्ययन केलें व गुरुजी म्हणून वेळोवेळीं ते शास्त्रीबुवांचा उल्लेख करीत. काशी येथें रस्तारुंदीकरितां राममंदिरांतील मूर्ती हलवून दुसरीकडे नेण्याचा सरकारचा आग्रह 'मूर्तिचालन हें शास्त्रविरुद्ध आहे' याबद्दल ग्रंथांतील प्रमाणें देऊन शास्त्रीबोवांनीं थांबविला व लोकांमधील क्षुब्धता दूर केली. यज्ञाचे प्रसंगीं ते पुढाकार घेत असत व यथासांग यज्ञ करवून घेत असत. इ. स. १९०३ सालीं सरकारनें सी. आय. ई. ही बहुमानाची पदवी त्यांना दिली. इ. स. १९०९ सालीं ते सेवानिवृत्त झाले व नंतर चार वर्षांनीं वारले. इ. स. १९१२ सालीं तीर्थरूपांबरोबर त्रिस्थली यात्रा करीत असतांना काशी क्षेत्रीं गंगाधरशास्त्री तेलंग, बाबाशास्त्री काळे व इतर वैयाकरण यांच्या भेटीचा लेखकाला सुयोग घडून आला. काशी येथील विद्याभिवृद्धीचा व गुरुशिष्यपरंपरेचा जो वृत्तांत येथें दिला आहे त्यासंबंधीं पुष्कळशी माहिती त्याप्रसंगीं मिळालेली आहे. गंगाधरशास्त्री यांच्या आंगीं असलेल्या विनय, विद्याप्रेम व गुरुभक्ति या गुणांच्या सुंदर मीलनाची कल्पना येण्याकरितां त्या वेळीं घडलेल्या एका प्रसंगाचें थोडक्यांत वर्णन पुढें देत आहें: सायंकाळीं गंगाधरशास्त्री दहा बारा प्रौढ शिष्यांना पाठ देत असतां त्यांना 'पुणें येथून वासुदेवशास्त्री अभ्यंकर हे आपल्या भेटीस आले आहेत' असें सांगतांच गंगाधरशास्त्री यांनीं आपलें आसन सोडलें व झटकन् दाराशीं येऊन अभिवंदनाकरितां तयार झालेल्या वासुदेवशास्त्री यांना स्वतः अभिवंदन केलें. वासुदेवशास्त्री यांनीं 'हा प्रकार उलटा होत आहे' असें म्हणतांच गंगाधरशास्त्री यांनीं "भास्करशास्त्री अभ्यंकरांपासून शिष्यपरंपरेनें आपण स्वतः पांचवे आहों व वासुदेवशास्त्री हे प्रत्यक्ष पौत्र व शिष्यपरंपरेनें तिसरे आहेत म्हणून वासुदेवशास्त्री यांनाच प्रणिपात करणें हेंच शास्त्रोक्त आहे व तसेंच आपण केलें हें लक्षांत ठेवा" असें आम्हां सर्वांना अधिकृत वाणीनें बजावून सांगितलें.

## ५२. म. म. शिवकुमारशास्त्री यांचा अल्प परिचय.

पंडित शिवकुमार यांचा जन्म काशीजवळच एका खेडेगांवीं झाला. जन्मतःच शिवकुमार यांच्या मस्तकावर चंद्र व जिभेवर त्रिशूळ यांसारखीं चिन्हें होतीं. तीं पाहून सर्व

नातलगांची हें अत्यंत दुष्ट लक्षणाचें राक्षसी मूल जन्माला आलें आहे अशी समजूत होऊन सर्व- जण मुलाचा तिटकारा करूं लागले. त्यांचें नामाभिधानही कोणीं केलें नाहीं. परंतु देहावरील चिन्हांवरून त्यांना शिवकुमार असें लोक म्हणूं लागले. लवकरच त्यांचे वडील निवर्तले. तेव्हां- पासून तर चुलते व इतर नातलग हे त्यांचा जास्तीच तिरस्कार करूं लागले व त्यांनीं उपनयना- नंतर शिवकुमारांना घराचे बाहेर घालवून दिलें. शिवकुमार पायीं चालत चालत काशीक्षेत्रीं गेले व तेथें त्यांनीं निरनिराळ्या विद्वानांचे जवळ राहून न्याय, वेदान्त व व्याकरण या शास्त्रांचें संपूर्ण अध्ययन केलें. बालसरस्वती यांचे जवळ त्यांनीं व्याकरणांतील वरच्या ग्रंथांचा अभ्यास केला. शिवचिन्हांनीं सूचित असो वा नसो त्यांची बुद्धि तशीच ग्रहणशक्ति असामान्य होती. राजकीय संस्कृत विद्यालयांत अध्यापक म्हणून त्यांनीं कांहीं वर्षें काम केलें; पण कांहीं कारणानें त्यांनीं राजीनामा दिला. नंतर त्यांच्या पांडित्याची कीर्ति ऐकून त्यांना दरभंगा नरेशानें काशीमध्यें आपल्या पाठशाळेंत नेमलें. ते अत्यंत निःस्पृह होते व बाणेदार वृत्तीचे होते. त्यांनीं उत्तमो- त्तम शिष्य तयार केले. अध्यापनाचें त्यांना एक प्रकारचें व्यसनच होतें. त्यांना सर्वतन्त्रस्वतन्त्र, पंडितरत्न व विद्यामार्तंड या पदव्या मिळाल्या होत्या व सरकारनेंही त्यांना महामहोपाध्याय ही पदवी दिली. त्यांनीं अनेक शिष्य तयार केले. त्यांमध्यें गंगानाथ झा, मधुसूदन झा वगैरे मैथिली- यांचा भरणा विशेषेंकरून होता. परिभाषेन्दुशेखरावर त्यांनीं टीका लिहिलेली प्रसिद्ध आहे.

## ५३. म. म. दामोदरशास्त्री भारद्वाज यांचा अल्प परिचय.

भारद्वाज हे मूळचे वाईचे राहणारे. दामोदरशास्त्री यांचे पूर्वज काशीस जाऊन स्थायिक झाले. ग्वाल्हेर संस्थानामध्यें त्यांना एक गांव इनाम मिळालें होतें. तेथें दामोदरशास्त्री यांचे वडील रहात असत. दामोदरशास्त्री व त्यांचे दोन बंधू काशी येथें अध्ययनाकरितां राहिले. बालशास्त्री रानडे यांचेकडे दामोदरशास्त्री यांनीं व्याकरणाध्ययन केलें व नंतर त्यांनीं अनेक मैथिल शिष्य तयार केले. आपल्या वृद्ध पित्यांना भेटण्याकरितां चालले असतां ग्वाल्हेर येथें ते उतरले व अचानक पंडित- सभेंत पंडितांचे पूर्वपक्ष व उत्तरपक्ष चालूं असतांना गेले. तेथें चाललेला पंडितांचा वाद ऐकून त्यांना त्यांत भाग घेतल्याशिवाय राहवेना. त्यांनीं सभेंत भाग घेतला. त्यांची सभेमध्यें सर्वांत श्रेष्ठ विद्वत्ता दिसून आली व शिंदे सरकारनीं खूष होऊन त्यांना पांचशें रुपये व शाल दिली. इ. स. १८७९ सालीं नेस्फील्ड साहेबांनीं त्यांची व्याकरणाध्यापक म्हणून नेमणूक केली. १९०६ सालीं शंकराचार्यांनीं त्यांना अशेषवाङ्मयपारगवैयाकरणकेसरी ही पदवी व रौप्यपदक दिलें; व सर- कारनें १९०८ सालीं त्यांना महामहोपाध्याय पदवी दिली. १९०९ सालीं ते निवर्तले.

## ५४. बालसरस्वती यांचे इतर शिष्य.

म. म. रामकृष्णशास्त्री अथवा तात्याशास्त्री पटवर्धन यांचें आरंभींचें शिक्षण नागपूर येथें झालें. नंतर ते काशी येथें गेले व बालशास्त्री रानडे यांचेकडे त्यांनीं संपूर्ण व्याकरणशास्त्राचें अवघ्या सहा वर्षांत अध्ययन केलें. व्याकरणाबरोबर इतरही शास्त्रांचा त्यांनीं अभ्यास करून त्यांतही पांडित्य संपादन केलें. प्रथमतः ते दरभंगा पाठशाळेंत अध्यापक होते व नंतर त्यांची राजकीय संस्कृत विद्यालयांत नेमणूक झाली. तेथें त्यांनी आपलें अध्यापनकौशल्य दाखविलें. इ. स. १९०९ मध्यें सरकारनें त्यांना महामहोपाध्याय पदवी दिली. इ. स. १९१९ मध्यें ते निवर्तले. त्यांनीं परिभाषेन्दुशेखरावर 'भूति' नांवाची टीका लिहिली आहे.

म. म. केशवशास्त्री मराठे हे बालशास्त्री यांचे दुसरे प्रसिद्ध शिष्य होत. बालपणींच केशवशास्त्री यांना त्यांचे वडील बाळंभट्ट यांनीं राजारामशास्त्री यांच्या हवाली केलें व राजारामशास्त्री यांनींही मरणापूर्वी त्यांना बालसरस्वती यांचे स्वाधीन केलें. केशवशास्त्री यांचीं अध्यापनापेक्षां ग्रंथसंशोधनाकडे प्रवृत्ति जास्त होती. डॉ. थीबो यांना त्यांचे कामांत केशवशास्त्री यांची चांगलीच मदत झाली. इ. स. १८७५ मध्यें त्यांची राजकीय पाठशाळेमध्यें नियुक्ति झाली. तेथें २५ वर्षे काम करून ते सेवानिवृत्त झाले. सरकारनें त्यांना इ. स. १९१२ मध्यें महामहोपाध्याय पदवी दिली. १९२१ सालीं ते निवर्तले.

म. म. नित्यानंद पर्वतीय हेही बालसरस्वती यांचे एक प्रसिद्ध शिष्य होते. जन्मापासून त्यांची शरीरप्रकृति चांगली नव्हती; तरी पण त्यांचे आंगची हुषारी व तरतरीत बुद्धि पाहून गंगाधरशास्त्री यांच्या सांनिध्यानें व तपःसामर्थ्यानें शरीरव्याधि दूर व्हावी व आंगीं विद्वत्ताही यावी या हेतूनें त्यांचे वडिलांनीं त्यांना गंगाधरशास्त्री यांचे स्वाधीन केलें. तेथें त्यानीं उत्तम अध्ययन केलें व व्याकरणाचार्य होऊन राजकीय संस्कृत पाठशाळेंत ते अध्यापक झाले त्यांचे आंगीं स्वभावतःच संसारविरक्ति होती व ते सदासर्वदा अध्यापनांत व ईश्वरचिंतनांत निमग्न असत. त्यांची विद्वत्ता व योग्यता जाणून सरकारनें त्यांना महामहोपाध्याय ही पदवी दिली. ते १९३१ सालीं निवर्तलें. त्यांनीं लघुशब्देन्दुशेखरावर दीपक नांवाची टीका लिहिली आहे.

विश्वनाथ दण्डिभट्ट हेही बालसरस्वतींच्या शिष्यांपैकीं एक विद्वान् विरक्त शिष्य होते. त्यांनींही परिभाषेन्दुशेखर व बृहच्छब्देन्दुशेखर यांवर टीका लिहिलेल्या प्रसिद्ध आहेत.

## ५५. नवद्वीपस्थ नैयायिकांची काशींतील गुरुशिष्यपरंपरा.

बालसरस्वतींचे समकालीनच म. म. कैलासचन्द्र शिरोमणि नांवाचे मोठे विद्वान नैयायिक काशींत होऊन गेले. कैलासचन्द्र हे नवद्वीपांतील महानैयायिक भवनाथतर्कपंचानन यांचे नातू. कैलासचन्द्रांनीं न्यायशास्त्राचें अध्ययन न्यायरत्न गोलोकनाथ याचेकडे केलें. त्यांनीं अच्युतानन्द परिव्राजक यांना न्यायशास्त्र शिकविलें व स्वतः वेदान्तशास्त्राचें अध्ययन अच्युतानन्दांकडे केलें. कैलासचन्द्रांनीं राजकीय संस्कृतपाठशाळेंत न्यायाध्यापकाचें काम केलें. डॉ. व्हेनिस यांनीं कैलासचन्द्रांचे जवळ न्यायाध्ययन केलें. कैलासचन्द्र हे अत्यन्त धार्मिक व विरक्त वृत्तीचे होते. न्यायशास्त्रांत त्यांच्या तोडीचे विद्वान काशीमध्यें त्यावेळीं कोणीही नव्हते. त्यांनीं न्यायशास्त्राचे अनेक ग्रंथ उत्तम प्रकारें शिकविले. त्यांची शिष्यपरंपरा फार मोठी होती व ते अतिशय लोकप्रिय होते. असें सांगतात कीं कर्झनसाहेब काशीविद्यालयांत गेले असतां जराजर्जरतनू कैलासचन्द्र यांना इतरांप्रमाणें झटकन उठून उभे राहतां आलें नाहीं. कर्झनसाहेबांच्या हें लक्षांत आलें व त्यांनीं प्रिन्सिपालसाहेबांना ' या पंडितांना पेनशनांत कां काढीत नाहीं ' असा प्रश्न केला. प्रिन्सिपालसाहेबांनीं त्यांना पेनशनांत काढल्यास विद्यालयाची न्यायशाखा ओसाड पडेल असें उत्तर देऊन कैलासचंद्रांच्या विद्वत्तेचें व लोकप्रियतेचें वर्णन केलें. त्यांची विद्वत्ता जाणून त्यांना सरकारनें महामहोपाध्याय ही पदवी दिली. त्यांच्या शिष्यवर्गांत वामाचरणभट्टाचार्य व लक्ष्मणशास्त्री यांची प्रामुख्यानें गणना होते. वामाचरण यांनीं राजकीय पाठशाळेंत न्यायाध्यापक म्हणून उत्तम काम केलें हें लक्षांत घेऊन सरकारनें त्यांना महामहोपाध्याय पदवी दिली. लक्ष्मणशास्त्र्यांनींही महानैयायिक म्हणून कीर्ति मिळवली. लक्ष्मणशास्त्री यांचे वेदांतेंही अध्ययन उत्तम होतें व त्यांचें सभापांडित्यही वाखाणण्याजोगें होतें.

लक्ष्मणशास्त्री हे अतिशय धर्मनिष्ठ होतें. रणवीर पाठशाळेंत ते मुख्याध्यापक होते. त्यांनीं परोपकारार्थ अनेक कार्यें केली व अनेक धार्मिक संस्था स्थापिल्या. काशींतील साङ्गवेदविद्यालयस्थापना त्यांचेच प्रयत्नानें झाली. हें सर्व लक्षांत घेऊन सरकारनें महामहोपाध्याय हीं पदवी देऊन त्यांचा सन्मान केला. इ.स. १९२६ सालीं ते सेवानिवृत्त झाले व त्यानंतर लवकरच ते निवर्तले. त्यांचे अनेक शिष्य व अनेक संस्था आज त्यांच्या विद्वत्तेची व परोपकारपरत्वाची साक्ष देत आहेत.

### ५६. पाश्चात्य विद्वानांची कामगिरी.

याच वेळीं पुणें व मुंबई येथील शास्त्राध्ययनाध्यापनाकडे पाहिल्यास इंग्रजांचें राज्य स्थिर होऊन पुणें येथें १८३३ सालीं इंग्रजी शाळा, मुंबई येथें १८३४ सालीं—पुढें १८५७ मध्यें युनिव्हर्सिटीस्थापनेनंतर जिला एल्फिन्स्टन कॉलेज नांव देण्यांत आलें ती - इंग्रजी शिक्षणसंस्था, व १८६६ मध्यें पुणें येथें डेक्कन कॉलेज हीं इंग्रजी विद्यालयें स्थापन झालीं. या विद्यालयांतील शिक्षणाचें माध्यम इंग्रजी असल्यामुळें इंग्रजी, इतिहास, तत्त्वज्ञान, गणित वगैरे विषयांबरोबर संस्कृत व मराठी हे विषय शिकविण्याकरितांही इंग्रजी जाणणाऱ्या परदेशीय प्राध्यापकांची प्रथमतः नेमणूक झाली. कांहीं वर्षांनीं डॉ. भांडारकर, केरुनाना छत्रे यांच्यासारखे एतद्देशीय विद्वानही विश्वविद्यालयाची पदवी मिळविल्यानंतर कॉलेजमध्यें प्राध्यापक झाले. विश्वविद्यालयामधील अभ्यासक्रमांत संस्कृत व मराठी या भाषांमधील उत्तम शास्त्रीय ग्रंथांनाही स्थान असल्यामुळें कॉलेजांतील प्राध्यापकांचेंच नव्हे तर पाश्चात्य जिल्हाधिकारी आणि प्रांताधिकारी यांचेंही त्या त्या ग्रंथांकडे लक्ष गेलें व त्यांपैकीं कांहीं हुषार लोकांनीं भारतीय तत्त्वज्ञान, वैदिक वाङ्मय, संस्कृत साहित्य, संस्कृत व्याकरण इत्यादि विषयांचा एतद्देशीय पंडितांच्या साहाय्यानें अभ्यास करून त्यांमध्यें प्रावीण्य मिळविलें. तसेंच त्या त्या विषयांतील ग्रंथांचे इंग्रजीमध्यें अनुवाद व त्यांवर चर्चात्मक निबंध लिहून इतर पाश्चात्य विद्वानांचेंही हजारों वर्षांपूर्वीं भारतांतील ऋषींनीं निर्माण केलेल्या व त्यानंतरच्या विद्वानांनीं वाढविलेल्या ग्रंथ-संपत्तीकडे लक्ष वेधलें. डॉ.मॅक्समुल्लर वेबर, व्हिटने, गोल्डस्टूकर, बर्नेल, ब्यूलर व थिबो यांसारख्या विद्वानांनीं आपल्या आवडीच्या शास्त्रग्रंथांचें सूक्ष्म अवलोकन करून व अनुवादात्मक, टीकात्मक व चिकित्सात्मक ग्रंथ व निबंध लिहून त्या त्या विषयावरील ग्रंथांत भर घातली इतकेंच नव्हे तर ग्रंथाभ्यासाच्या पाश्चात्य पद्धतीचें ज्ञान एतद्देशीय विद्वानांना करून दिलें. या सर्वांमध्यें डॉ. कीलहॉर्न यांच्या व्याकरणविषयक अध्ययनाचा व विद्वत्तेचा उल्लेख करणें अत्यंत जरूर आहे.

### ५७. मुंबई विश्वविद्यालयाच्या स्थापनेचा संस्कृताध्ययनावर परिणाम.

मुंबई व पुणें येथें उच्च शिक्षणाकरितां कॉलेजें उघडलीं गेल्यानंतर जुन्या तऱ्हेनें शास्त्राध्ययन करण्याकडे लोकांची प्रवृत्ति साधारणतः कमी होऊं लागली. उच्च अभ्यासक्रमांत व्याकरण वगैरे शास्त्रांतील निवडक थोड्याशा ग्रंथांना स्थान दिलें गेल्यामुळें शास्त्रांचें साधारण अध्ययन करणें झाल्यास तें कॉलेजांमधून होऊं लागलें; इतकेंच नव्हे तर असें साधारण अध्ययन केलेल्या पदवीधराला समाजामध्यें मानाचें स्थान व हुद्याच्या जागा मिळूं लागल्यामुळें व द्रव्यलाभही समाधानकारक होऊं लागल्यामुळें बुद्धिमान् मुलांची विश्वविद्यालयांतील अध्ययनाकडे प्रवृत्ति ज्यास्त होऊं लागली व पाठशाळांतील विद्यार्थ्यांची संख्या कमी झाली. दळणवळणाचीं साधनें कमी असल्यामुळें कॉलेजच्या ठिकाणापासून दूर असलेल्या शहरांतील व गांवांतील विद्यार्थ्यांना कॉलेजमधील शिक्षणाचा फायदा घेणें शक्य नव्हतें व त्यामुळें तेथील पाठशाळा

पूर्वीसारख्या चालू राहिल्या; एवढेंच नव्हे तर पुण्यांतील शास्त्रपारंगत विद्वानही आंग्लविद्या-विभूषित पंडितांच्या मानानें आपलें स्थान कमी झाल्यामुळें परप्रांतांत, दूरदूरच्या गांवीं धनिकांच्या व संस्थानिकांच्या आश्रयाखालीं राहण्यास गेले व तेथें त्यांनीं विद्यादानाचें परंपरागत काम चालविलें.

## ५८. पुणें येथील पंडितांचें अध्यापनाकरितां इतर ठिकाणीं गमन.

अशा विद्वानांपैकीं विष्णुशास्त्री भट यांनीं धार येथें जाऊन शिष्यपरंपरा स्थापन केली. आज त्यांचे नातू बाबूशास्त्री ती परंपरा चालवीत आहेत. पुणें येथील नीलकंठशास्त्री भट यांचे पुत्र धोंडशास्त्री व त्यांचे नंतर शिष्य दामोदरशास्त्री साठे यांनीं तीच शिष्यपरंपरा चालविली व त्यांचे पुत्र महादेवशास्त्री साठे सध्यां चालवीत आहेत. गोपाळाचार्य कऱ्हाडकर हे स्वत: पुणें सोडून ग्वाल्हेर येथें गेले व तेथें गजेन्द्रगडकर घराण्यांतील मंडळींनीं व इतर शिष्यांनींही त्यांची परंपरा चालविली. गोपाळाचार्य कऱ्हाडकर यांचे शिष्य दत्तशास्त्री निगुडकर यांनीं राजापुर येथें व व्यंकटरमणाचार्य यांनीं सांगली येथें व्याकरणपाठशाळा चालविल्या. पुणें येथील प्रसिद्ध नैयायिक मेरुशास्त्री गोडबोले यांचे शिष्य व पुतणे भिकुशास्त्री गोडबोले हेही नैयायिक गुरुजी म्हणून सांगली येथें गेले व तेथें त्यांनीं न्यायशास्त्राचें अध्यापन चालविलें. म. म. भीमाचार्य व त्यांचे बन्धु पंडित वामनाचार्य झळकीकर हे त्यांचेच शिष्य होत. पुणें येथें शास्त्राध्ययन पुरें करून विठ्ठलेशोपाध्याय हे पंढरपुर येथें गेले; भट्टजीशास्त्री घाटे नागपुर येथें गेले व तसेंच कृष्णशास्त्री घुले यांचे वडील सदाशिवभट्ट घुले हे नागपुर येथें गेले व त्यांनीं त्या त्या ठिकाणीं संस्कृताध्यापन चालविलें. पंडितांच्या घरीं अथवा पाठशाळेमध्यें हें सर्व अध्ययन दिवसभर चालत असे. विद्यार्थ्यांची संख्याही साधारणत: प्रत्येक ठिकाणीं पंचवीस ते पन्नास असे. तयार झालेले शिष्य उपगुरु म्हणून नवीन शिष्यांना मदत करीत. या सर्व शिष्यांचा योगक्षेम विद्याप्रेमी धनिकांकडून चाले. कोठें कोठें संस्थानिकांचीही भरपूर मदत असे. सातारा येथें भास्करशास्त्री 'अभ्यंकर यांनीं इ. स. १८७० पर्यंत, त्यानंतर रामशास्त्री गोडबोले यांनीं १९०६ पर्यंत व त्यानंतर रघुनाथशास्त्री अभ्यंकर यांनी आजन्म (१९४८) विद्यादानाचें व्रत पाळिलें. त्याप्रमाणेंच राघवेन्द्राचार्य यांनीं १८५० पर्यंत, त्यानंतर अनंताचार्य व त्यानंतर बाळाचार्य यांनींही आजन्म अनेक शिष्यांना विद्यादान केलें. पुणें येथील सरकारी पाठशाळा बंद झाल्यावर न्यायमूर्ति रानडे, जिनसीवाले वगैरे संस्कृतप्रेमी थोर लोकांनीं लोकाश्रयावर खाजगी पाठशाळा सुरू केली व त्या ठिकाणीं प्रथम थोडीं वर्षें नारायणशास्त्री गोडबोले यांनीं अध्यापन केलें. त्यानंतर ५२ वर्षें (१८९०–१९४२) म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं व त्यानंतर त्यांचे शिष्य गणेशशास्त्री गोडबोले यांनीं आजन्म (इ. स. १९५२ पर्यंत) अध्यापकाचें काम केलें. गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचे दुसरे शिष्य शंकरशास्त्री मारुलकर हे गुरुजींचेंच विद्यादानाचें व्रत पाळीत आहेत. प्रस्तुत लेखकालाही व्याकरण, न्याय, मीमांसा वगैरे शास्त्रांचें अध्ययन तीर्थरूप वासुदेवशास्त्री यांचेजवळ करण्याचा सुयोग आला इतकेंच नव्हे तर सुदैवानें कॉलेजमध्यें व पाठशाळेमध्यें त्या शास्त्रांची अध्यापन करण्याची संधीही मिळाली.

## ५९. रामशास्त्री गोडबोले यांची अध्यापनपद्धति व शिष्यप्रेम.

भास्करशास्त्री यांच्या शिष्यवर्गापैकीं वृद्धपणचे उत्तम शिष्य रामशास्त्री गोडबोले. तपश्चरण व विद्यादान हीं दोन व्रतें स्वीकारून जन्मभर गुरुघरीं राहून गुरुजींच्या पौत्रांना व

इतरांना त्यांनीं कसें पढविलें व त्यांचें वर्तन महर्षितुल्य कसें होतें हें वरतीं (पॅरेग्राफ २५–२९) शास्त्रीबोवांनीं सांगितलेंच आहे. त्यांच्याबद्दलची एकच आठवण पुढें देतों. वृद्धपणीं ते सायंकाळीं देवदर्शनास जात असतां त्यांचेबरोबर नेहमीं एकदोन शिष्य असत व त्यांना वाटेमध्यें रामशास्त्री हे पढविलेल्या विषयाची चिंतनिका देत. लेखकाला लहानपणीं पंधरा दिवस रामशास्त्री यांचेबरोबर संध्याकाळीं जाण्याचा योग आला असतां रामशास्त्री यांनीं लेखकाकडून तोंडीं सूत्रवृत्ती-सहित राम शब्दाचीं सर्व विभक्तींचीं रूपें व भू धातूचीं सर्व लकारांचीं रूपें तयार करून घेतलीं. रूपावलि समासचक्र व रघुवंशाच्या दुसऱ्या सर्गांतील कांहीं श्लोक येवढेंच संस्कृत ज्ञान असतांना वयाचे नवव्या वर्षीं पुस्तकांशिवाय व्याकरणशास्त्राचा हा पहिला धडा महर्षि रामशास्त्री यांचेकडून मिळण्याचें भाग्य आपणास अशा रीतीनें लाभलें याची वारंवार लेखकास आठवण येते. रूपावलि समासचक्र व रघुवंशांतील श्लोक हे संस्कृतपाठशाळेमध्यें गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांच्या शिष्यांपैकीं कोणीं व केव्हां शिकविले याची आठवणही येत नाहीं. रामशास्त्री आपल्या शिष्यवर्गाना व्याकरणासारख्या गहन विषयाचेही पाठ देतांना आपल्या विनोदपटुत्वामुळें हसवीत व विषयही सुलभ करून समजावून देत. गुरुजींकडून व्याकरण न्याय वगैरे शास्त्रांचें अध्ययन रामशास्त्री यांनीं इतकें पूर्णत्वानें केलें होतें कीं शिष्यांना पढवितांना ते कधींही आपणांजवळ पोथी घेत नसत. रात्रीचे वेळीं शिष्यांना बोलावून त्यांचेकडून ते पूर्वपक्ष उत्तरपक्ष वगैरे स्वरूपानें एकमेकांशीं चर्चा करून विषय तयार करवून घेत असत.

## ६०. आचार्यांची दूषकरदोद्धेदिनी टीका व विष्णुशास्त्री भट यांची चिच्चन्द्रिका टीका.

ज्याप्रमाणें रामशास्त्री यांनीं आपले गुरुजी भास्करशास्त्री यांचे पश्चात् त्यांचें अध्यापनाचें काम गुरुघरीं इ. स. १८७०पासून चालविलें त्याचप्रमाणें आचार्य घराण्यांत राघवेंद्राचार्यांचे नातू व वार्धक्यावस्थेंतील शिष्य अनंताचार्य गजेंद्रगडकर यांनींही आपल्या घरीं आपल्या आजोबांचें काम इ. स. १८६० पासून अव्याहत चालविलें. भास्करशास्त्री यांचे हयातींत पितामहतुल्य भास्करशास्त्री यांचेकडे अनंताचार्य अनेक वेळां जाऊन उच्च व्याकरणग्रंथांतील कठिण विषय समजावून घेत असत; तरी पण भास्करशास्त्री यांचेनंतर आपणांपेक्षां दोनतीन वर्षे वयानें लहान रामशास्त्री यांच्याशीं अनंताचार्यांचें वर्तन तुटकपणाचें झालें व त्यांत मत्सराची छटा निर्माण झाली असें ऐकण्यांत आहे. याला कारण आचार्य हे धर्मशास्त्राचे निवाडे देण्यांत सातारा प्रांतांत शंकराचार्यांचे पिढीजात अधिकृत प्रतिनिधि होते व रामशास्त्री हे स्वतः धर्मरत व व्रतानुष्ठानपर असले तरी त्या वेळीं सुधारक म्हणून गणण्यांत आलेले न्यायमूर्ति रानडे यांचे अत्यंत जवळचे नात्यानें संबद्ध होते व धर्मशास्त्राचे निवाडे करण्यांत त्यांची अतिशय संग्राहक प्रवृत्ति होती हें असेल; किंवा त्या वेळीं शैववैष्णवविरोधाकडे लोकांची ज्यास्त प्रवृत्ति झाली व राम-शास्त्री हे महाशैव व अनंताचार्य हे वीरवैष्णव होते हें असेल. यांमध्यें दुसरेंच कारण ज्यास्त प्रबल असावें हें पुढील वृत्तांतावरून ध्यानांत येण्याजोगें आहे. याच वेळीं विष्णुशास्त्री भट या नांवाचे मोठे वैयाकरण पुणें येथें अध्ययन संपवून धार दरबारच्या आश्रयाला गेले होते. विष्णुशास्त्री यांची ग्रंथोपस्थिति वाखाणण्यासारखी होती. त्यांनीं परिभाषेन्दुशेखरावर चिच्चन्द्रिका नांवाची टीका लिहिली व ती अवलोकनाकरितां सातारा येथें रामशास्त्री यांचेकडे पाठविली. परंतु रामशास्त्र्यांना ती मिळण्यापूर्वींच आचार्यांनीं ती हस्तगत केली व तिचें खंडन करणारी टीका गोपाळाचार्य कऱ्हाडकर यांचेकडून लिहवून रामाचार्य गजेंद्रगडकरांच्या

नांवानें तिला दूषकरदोद्भेदिनी हें नांव देऊन प्रसिद्ध केली. नंतर विष्णुशास्त्री भट यांनीं या दूषकरदो-द्भेदिनीचें खण्डन करणारी विस्तृत चिच्चन्द्रिका लिहून प्रसिद्ध केली. लेखकाजवळ या दोनही चिच्चन्द्रिकांचीं हस्तलिखितें आज आहेत. आचार्यांच्या टीकेमध्यें पहिल्या मंगलश्लोकांत शेषशायी विष्णूला नमन आहे व टीकेचें नांव (दूषक-) रदोद्भेदिनी असें दिलें आहे. 'श्रीमच्छेषगिरौ विराज-दमरैराराध्यमाद्यं प्रभुं नत्वाहं वितनोमि दूषकरदोद्भेदं मुदे श्रीगुरोः' या शब्दांनीं व दुसऱ्या श्लोकांत "मायावादिमहाटवीपरिसरन्मत्तेभपञ्चाननान्" (शाङ्करवेदान्तहस्तीशीं लढणारा सिंह) या शब्दानीं आचार्योनीं आपल्या गुरुजींचा उल्लेख केला आहे. त्याला उद्देशून चिच्चन्द्रिकेमध्यें पहिल्या श्लोकार्धांत आपले तीर्थरूप व गुरुजी नीलकण्ठशास्त्री भट यांचा उल्लेख करून "ध्वान्तोद्भूतविरुद्धकल्पन-परीहारैकबद्धादरां सद्व्याख्यान्तरसंग्रहैः सुललितां ग्रथ्नामि चिच्चन्द्रिकाम्" या श्लोकार्धांत 'ध्वान्त' या श्लिष्ट शब्दानें माध्व टीकाकारांचें खंडन करणारी स्वतःची टीका आहे असें विष्णुशास्त्री यांनीं सुचविलें आहे.

## ६१. डॉ. कीलहॉर्न यांचा अल्प परिचय.

डॉ. कीलहॉर्न यांनीं मुंबई येथील एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें संस्कृत विषयाचे मुख्या-ध्यापक म्हणून अनेक वर्षें काम केलें. स्थानिक व इतर ठिकाणच्या संस्कृतपाठशाळांमध्यें एतद्देशीय विद्वान् पंडितांचे जवळ अध्ययन केलेल्या हुषार विद्यार्थ्यांना शास्त्रीय ग्रंथ शिकवितांना त्यांचें पूर्ण समाधान विद्वान् शास्त्रनिष्णात पंडितांचे जवळ स्वतः अध्ययन केल्याशिवाय आपणांस करतां येणें शक्य नाहीं, तसेंच उत्तम शास्त्रग्रंथांचें मर्मही पण कळणें शक्य नाहीं, हें जाणून प्राध्यापक कीलहॉर्न यांनीं स्थानिक पंडितांचे जवळ स्वतःअध्ययन चालू केलें व व्याकरणशास्त्रांतील प्रसिद्ध ग्रंथांचा मन लावून अभ्यास केला. व्याकरणशास्त्रांतील ग्रंथांमध्यें समजण्यास कठीण पण अत्यंत उपयुक्त अशा परिभाषेन्दुशेखरांतील अन्तरङ्गपरिभाषा प्रकरणांतील पंक्तींचें स्पष्टीकरण समाधानकारक न झाल्यामुळें प्राध्यापक कीलहॉर्न हे सातारा येथें आपल्या शंकांचें निराकरण व्हावें या हेतूनें त्या वेळीं मुंबई प्रांतांतील महावैयाकरण म्हणून गाजत असलेले जे भास्करशास्त्री अभ्यंकर त्यांचेकडे गेले व त्यांनीं अन्तरङ्गपरिभाषाप्रकरणाचें भास्करशास्त्री यांचेकडे संपूर्ण अध्ययन केलें. लेखकालाही आपले तीर्थरूप महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री यांचेकडे दोन वेळां अन्तरङ्गपरिभाषा वाचावी लागली. "पाणिनीयस्य तन्त्रस्य भाष्यस्थं वेत्ति मर्म कः। नागेशोक्तान्तरङ्गस्यान्तरङ्गज्ञो हि मर्मवित्" असा एक या अन्तरङ्गप्रकरणासंबंधीं प्रवादही आहे. प्राध्यापक कीलहॉर्न यांनीं भास्करशास्त्री यांचे शिष्य अनंतशास्त्री पेंढारकर यांचेजवळ उच्च शास्त्रीय ग्रंथांचें अध्ययन केलें. प्राध्यापक कीलहॉर्न यांनीं परिभाषेन्दुशेखराचा इंग्रजी भाषेंत सुंदर अनुवाद केला आहे व त्या ग्रंथांतील कठिण ओळी समजण्याकरितां विद्वत्तापूर्ण टीपा लिहिल्या आहेत. महाभाष्याचेंही त्यांनीं अत्यंत काळजी घेऊन त्यांतील वार्तिकांचें निदर्शन करून व सूत्रांचा संदर्भ देऊन शुद्ध संपादन केलें आहे. पतञ्जलि व कात्यायन या विषयावर त्यांनीं एक विचारपरिप्लुत निबन्धही लिहिला आहे. त्यांनीं केलेलें टीपा अनुवाद व निबन्ध लिहिण्याचें कार्य पाहिल्यास एतद्देशीय पंडितांचेबरोबर त्यांची वैयाकरणपंडितांमध्यें गणना करणें हें योग्यच आहे.

## ६२. डॉ० भांडारकर यांचा अल्प परिचय.

कीलहॉर्न यांचेनंतर त्यांचेच जागीं विराजमान होणारे डॉ. भांडारकर ( इ. स. १८३७–१९२५ ) यांनींही व्याकरणशास्त्राची सेवा उत्तमप्रकारें बजावली. त्यांनीं आपलें सर्व आयुष्य

निरनिराळ्या शास्त्रांवरील—विशेषतः व्युत्पत्तिशास्त्र व व्याकरणशास्त्र यांवरील एतद्देशीय तसेंच परदेशीय विद्वानांनीं लिहिलेले—ग्रंथ वाचून त्यांवर मनन करण्यांत घालविलें. त्यांचें व्याकरणाध्ययन पुणें येथील बाळशास्त्री देव यांचेकडे झालें होतें. मुंबई-विश्वविद्यालयांतील संस्कृत विषय घेऊन उत्तीर्ण होणारे ते पहिलेच विद्यार्थी होते. त्यांचा ग्रंथसंग्रहालय फार मोठा होता व विद्याव्यासंगही दांडगा होता. त्यांच्या ग्रंथसंग्रहालयामध्यें त्यांनीं बरेच दुर्लभ ग्रंथही आणून ठेवले होते. लेखकाला बालपणीं व तरुणपणीं आपले तीर्थरूप वासुदेवशास्त्री यांचेबरोबर डॉक्टर भांडारकर यांचेकडे जाण्याची अनेक वेळां संधि मिळाली. ज्या ज्या वेळीं त्यांचेकडे जावें त्या त्या वेळीं डॉ. भांडारकर हे आपल्या ग्रंथालयामध्यें ग्रंथ वाचीत बसलेले दिसत असत. अनेक वेळां ते शास्त्रीबुवांच्या बरोबर व्याकरणविषयक उद्बोधक चर्चा करीत व चर्चेमध्यें अनेक तऱ्हेचे प्रश्न उपस्थित करीत. लेखकालाही बालपणीं वेळोवेळीं कुतूहलानें त्यांनीं सिद्धान्तकौमुदीमधील कांहीं रूपें साधण्याचें सांगितल्याची वारंवार आठवण येते. रामशास्त्री यांनीं प्रारंभ करून दिलेलें व वडिलांचेजवळ चालू ठेवलेलें लेखकाचें व्याकरणशास्त्राध्ययन डॉ. भांडारकर यांचे स्फूर्तीनें वृद्धिंगत होत गेलें. ज्याची सिद्धांतकौमुदी तयार आहे त्याला जगन्नाथ शंकरशेट स्कालरशिप मिळालीच पाहिजे व जो व्याकरणशास्त्र घेऊन एम्. ए. परीक्षेंत उत्तम रीतीनें उत्तीर्ण होतो त्याचें ज्ञान जुन्या तऱ्हेनें अध्ययन केलेल्या वैयाकरणाच्या तोडीचें होतें असें ते अनेक वेळां म्हणत. लेखकाला मॅट्रिक्युलेशन-पासून पदवीपरीक्षांपर्यंत संस्कृत विषयांत पहिला क्रमांक मिळत गेला याचें कारण व्याकरणशास्त्रा-ध्ययन हेंच होय असें डॉ. भांडारकर म्हणाले व त्यांचेच सांगण्यावरून लेखकानें एम्.ए.परीक्षे-करितां व्याकरणशास्त्र हा विषय घेतला. डॉ. भांडारकरांनीं व्याकरणशास्त्राची व व्युत्पत्तिशास्त्राची अनेक निबंध व लेख लिहून सेवा केली तसेंच देशांतील विश्वविद्यालयांच्या उच्च पदवीपरीक्षांच्या अभ्यासक्रमामध्यें शास्त्रीय ग्रंथ नेमून निरनिराळ्या शास्त्रांच्या अभ्यासाला स्थान दिलें हे सर्वविश्रुतच आहे. आपल्या स्वतःच्या उत्तम ग्रंथसंग्रहालयामध्यें सर्व काल ग्रंथांचें परिशीलन करीत व भेटावयास येणाऱ्या विद्वानांबरोबर आनंदानें चर्चा करीत बसलेले डॉ. भांडारकर यांजकडे पाहणाऱ्यांना डॉ. भांडारकर हे हल्लींच्या काळांतील महर्षीच होते असें वाटावें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. अशाच तऱ्हेचे डॉ. भांडारकरांचा कित्ता गिरविणारे महाव्यासंगी प्रौढवयामध्यें अष्टाध्यायी तोंडपाठ करणारे व व्युत्पत्तिशास्त्राचा खोल अभ्यास केलेले दुसरे महर्षि प्राध्यापक नानासाहेब राजवाडे यांची आठवण या वेळीं झाल्याशिवाय रहात नाहीं.

## गुरुवर्य महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री यांचा जीवनवृत्तान्त ( ६३-७३ )

### ६३. गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचे पूर्वज.

शास्त्रीबुवांचें घराणें मूळचें कोंकणांतलें. रत्नागिरी जिल्ह्यांत गणपतीपुळें गांवाजवळ मालगुंड हें त्यांच्या पूर्वजांचें निवासस्थान. तेथून सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं त्यांचे ( वासुदेवशास्त्री यांचे) प्रपितामह काशीनाथभट्ट नाना यांना घेऊन त्याचे (नानांचे) वडील रामभट्टबाबा व चुलते लक्ष्मणभट्ट व महादेवभट्ट हे कोंकणांतून येऊन वाई येथें राहिले. रामभट्टबाबा हे उत्तम वैदिक व श्रौतकर्मनिष्णात याज्ञिक होते, व त्याबरोबरच ते अत्यंत निःस्पृह व निर्मल चारित्र्यसंपन्न होते. वार्धक्यावस्थेंत पत्नीसमवेत बाबा हे भोराजवळ आंबवडे गांवीं

शिवमंदिरांत धारामि घेऊन राहिले होते. व्रतानुष्ठान, तपश्चर्या व निर्मल चारित्र्य यांच्या प्रभावानें त्यांच्या वाणींत एक प्रकारचें सामर्थ्य आलें होते व त्यांच्या तोंडचे शब्द खरे झाल्याशिवाय रहात नसत अशी ख्याति होती. याचें उदाहरण म्हणून पुढील वृत्तान्त ऐकिवांत आहे: एके दिवशीं सायंकाळीं त्या वेळच्या पंत सचिवांच्या पत्नी बाबांच्या दर्शनास गेल्या असतां व त्यांनीं बाबांना आमच्यावरचें सरकारच्या अवकृपेनें आलेलें गंडांतर केव्हां टळेल असें विचारलें असतांना त्यांना " सौभाग्यवती भव " असा आशीर्वाद बाबांनीं दिला आणि अग्निनारायणाच्या कृपेनें पंधरावीस दिवसांत आपण निर्धास्त व्हाल असें सांगितलें. तेव्हां अश्रुपूर्ण नयनांनीं राणीसाहेबांनीं आपले पती राजद्रोहाच्या संशयावरून पुणें येथें पेशवे सरकारच्या कैदेंत असल्यामुळें ही गोष्ट कठीण आहे असें म्हटलें असतां बाबांनीं ' जगदंबेच्या कृपेनें स्वत:चे शब्द खरे होतील ' येवढेंच सांगितलें व त्याप्रमाणें मुदतीचे आंतच सरकारची अवकृपा दूर झाली व लवकरच सचिवांची पुण्याहून सुटका होऊन ते भोर येथें परत आले. बाबांच्या नि:स्पृहतेची कल्पना असलेल्या राणीसाहेबांनीं बाबांच्या पत्नींना बोलावून त्यांना सुवर्णालंकार व भूमिदान देण्याची आपली इच्छा व्यक्त केली. परंतु बाबांना हें पसंत पडणार नाहीं असें त्यांनीं सांगितलें. लवकरच आपल्या तीन चिरंजीवांसह बाबा हे वाई येथें श्रीमंत सरदार रास्ते यांचे आश्रयाखालीं जाऊन राहिले. त्यांच्या निधनानंतर राणीसाहेबांनीं बाबांचे विद्वान चिरंजीव वे. काशीनाथभट्टनाना यांना वाई गांवाजवळ इनाम जमीन दिली. ती त्यांचे वंशांत आज चालू आहे. काशीनाथभट्टनाना श्रौतकर्मांत अत्यंत निष्णात होते. गुजरातेंत डाकोर येथें श्री रणछोडजींच्या मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेचे वेळीं त्यांना आदरानें निमंत्रण देऊन नेण्यांत आलें होतें असें ऐकिवांत आहे.

## ६४. पितामह भास्करशास्त्री यांचा जीवनवृत्तान्त.

नानांच्या सात पुत्रांपैकीं भास्करशास्त्री हे सर्वांत धाकटे. त्यांचा जन्म इ. स. १७८३ सालीं झाला. भास्करशास्त्री यांची देहयष्टि उंच, वर्ण गोरा, डोळे लाल, कानावर तीळ, व कपाळ उंच असें वर्णन देण्यांत येतें. त्यांचें वर्तन अत्यंत पवित्र, नि:स्पृह व निरुपद्रवी होतें. संसारांत राहूनही ते विरक्त असत. त्यांचे परमशिष्य रामशास्त्री गोडबोले यांनीं श्लोकाष्टकांत

---

थत्ते इत्युपनामकनीलकण्ठसुधीपदपङ्कजभृङ्गम् ।
वैयाकरणं पण्डितवर्यं वन्दे सद्‌गुरुभास्कररायम् ॥ १ ॥

ईषद्रक्ते नयने विमलं भालं दीर्घं बिभ्रतमजरम् ।
कर्णेतिलकं पण्डितवर्यं वन्दे सद्‌गुरुभास्कररायम् ॥ २ ॥

उन्नतकायं जानुविलम्बिपाणिं पाटलवर्णमयं च ।
साररसज्ञं पण्डितवर्यं वन्दे सद्‌गुरुभास्कररायम् ॥ ३ ॥

अनुकुर्वाणं शिवरूपं तं परमात्मानं सज्जनमित्रम् ।
शान्तिसमुद्रं पण्डितवर्यं वन्दे सद्‌गुरुभास्कररायम् ॥ ४ ॥

विद्यापीठं जितरिपुषट्कं संसारार्णवभयहीनं तम् ।
शुद्धाचरणं पण्डितवर्यं वन्दे सद्‌गुरुभास्कररायम् ॥ ५ ॥

त्यांचें थोडक्यांत सुंदर वर्णन केलें आहे. त्यांची प्राप्ति रुपये ५० ही त्या वेळच्या राहणीच्या मानानें जरी पुष्कळच असली तरी आश्रितांचें व अतिथि अभ्यागतांचें पोषण करण्यांतच तिचा सर्व विनियोग होत असे. त्यांना तीन कन्या व दोन पुत्र होते. वार्धक्यामध्यें जरी पुत्र-वियोगाचें दुःख झालें तरी तें सहन करून त्यांनीं आपल्या दिनचर्येंत, अध्यापनांत व अनुष्ठानांत कांहींही खंड पडूं दिला नाहीं. त्यांनीं परिभाषेन्दुशेखर व शब्देन्दुशेखर यांवर टीका लिहिल्या व धर्मशास्त्रावर संस्कारपद्धति या नांवाचा ग्रंथ लिहिला. आंगच्या विरक्तीमुळें त्यांना संन्यासदीक्षा घ्या म्हटलें असतां त्यांनीं "माझीं नातवंडें लहान आहेत; त्यांचा विद्याभ्यास व्हावयाचा आहे; मला संन्यास घेतां येणार नाहीं" असें स्पष्ट सांगितलें. १३ जानेवारी १८७१ रोजीं ( शके १७९२ उत्तरायणारंभ झाल्याबरोबर पौष वद्य सप्तमीस, ) पूर्ण शुद्धीवर असतांना, 'अतिसारेण मरणं साधूनामपि दुर्लभम्' असें आप्तेष्टांना सांगून ईश्वराचें नामस्मरण करतां करतां त्यांनीं देहत्याग केला. येथें नमूद करण्याजोगी गोष्ट म्हणजे श्वशुरांचे हयातींत आप्तेष्ट व आश्रित यांनीं गज-बजलेल्या पंचवीस माणसांचा श्रीमंतीचा प्रपंच श्वशुरांच्या वेतनाचे जोरावर त्यांच्या सूनबाई दुर्गाकाकू ( वासुदेवशास्त्री यांच्या मातुःश्री ) यांनीं जसा अत्यंत दक्षतेनें केला तितक्याच दक्ष-तेनें व स्वाभिमानपूर्वक त्यांनीं श्वशुरांच्या औदार्यामुळें त्यांच्या पश्चात् प्राप्त झालेल्या धनहीन स्थितींत गरीबीचा प्रपंचही करून दाखविला व मुलांना प्रेमानें वागवून घराण्याला शोभेल अशी योग्य शिकवणूक दिली. याबरोबर दुसरीही तितकीच महत्वाची गोष्ट नमूद करावयाची म्हणजे विद्वद्वर्य रामशास्त्री गोडबोले यांनींही गुरुजींच्या घरीं राहून गुरुजींना वचन दिल्या-प्रमाणें गुरुजींच्या नातवांचें म्हणजे रघुनाथशास्त्री व वासुदेवशास्त्री यांचें शिक्षण संपूर्ण केलें व त्यांना व्याकरणशास्त्रांत पारंगत केलें इतकेंच नव्हे तर वेदान्त, न्याय मीमांसा इत्यादि शास्त्रांतही त्यांचा योग्य प्रवेश करून दिला. याप्रमाणें वासुदेवशास्त्री यांच्या पूर्वजांचें व गुरुप-रंपरेचें वर दिलेलें अत्यंत त्रोटक वर्णन देण्याचा मुख्य हेतु म्हणजे शास्त्रीबोवांचे आंगीं गाढ विद्वत्तेबरोबर सत्यप्रियता, निर्मल चारित्र्य, अहिंसा, अध्ययनशीलता व अध्यापनप्रीति इत्यादि गुणांची वाढ मातुःश्रींच्या व गुरुजींच्या शिकवणुकीमुळें कशी स्वाभाविकच होत गेली हें दाखविणें हा होय.

---

यत्सेवाकरणात्कुशाग्रमतयः शाब्दं समग्रं मतं  
संप्रापुश्च कणादजैमिनिमतास्वादं मतं चाद्वयम् ।  
सन्मार्गाभिनिवेशमातरमिमामीशस्य भक्तिं परां  
श्रीमद्भास्करपादपङ्कजमहं ध्यायामि नित्यं हृदि ॥ ६ ॥  
यद्दृष्टीकरणाद्भवन्ति सफलाः कार्योत्सुका भावुका  
यन्मध्योद्गतपीयुषोदकगणस्पर्शाद्विचारास्पदाः ।  
पाणिन्यादिमुनित्रयालयमिदं वाग्देवताराधितं  
श्रीमद्भास्करवक्त्रपङ्कजमहं ध्यायामि नित्यं हृदि ॥ ७ ॥  
यत्स्पर्शादपयान्ति पातकगणा लक्ष्मीः परं चैधते ।  
श्रीमद्भाष्यवचांसि कृष्णमषिकालक्ष्याणि भृङ्गा इव ।  
यत्र स्वार्थमवापुरेकममृतं नक्तंदिवं राजितं  
श्रीमद्भास्करपाणिपङ्कजमहं ध्यायामि नित्यं हृदि ॥ ८ ॥

हें श्लोकाष्टक गुरुवर्य रामशास्त्री गोडबोले रोज म्हणत असत; आणि व त्यांच्या शिष्यसंप्रदायांत प्रसंगविशेषीं तें म्हणण्याचा प्रघात आहे.

## ६५. गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचें अध्ययन.

गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचा जन्म इ. स. १८६३ ऑगस्ट ता. ४ ( शके १७८५ अधिक श्रावण कृ. ६ ) रोजीं सातारा मुक्कामीं झाला. वयाचे तिसऱ्याच वर्षी त्यांना पितृवियोग झाला व वयाचे आठवे वर्षीच आजोबा भास्करशास्त्री हे कालवश झाले. शास्त्रीबुवांचे वडील महादेवभट्ट हे वैदिक होते व चुलते वैजनाथ ( भाऊशास्त्री ) हे शास्त्री होते. दोघांनाही श्रीमंत पेशवे सरकारकडून दरवर्षी श्रावणमास दक्षिणा मिळत असे. भास्करशास्त्री यांचे दोघेही चिरंजीव त्यांचे हयातींतच निवर्तले. त्यामुळें शास्त्रीबुवा व त्यांचे वडीलबंधु रघुनाथशास्त्री यांचें पालनपोषणाचें काम त्यांच्या मातुःश्री दुर्गाकाकू यांचेवरच पडलें व त्यांच्या विद्याभ्यासाचें काम आजोबा भास्करशास्त्री यांचे निःसीम गुरुभक्त शिष्य रामशास्त्री गोडबोले यांनीं केलें. लहानपणींच शास्त्रीबुवांची कुशाग्रबुद्धि व प्रतिभासंपन्नता हीं दिसून आली. शाळेंत एक दिवसही न जातां व घरीं संस्कृतशास्त्रांचें अध्ययन करतांकरतांच त्यांनीं गणित, भूगोल, इतिहास व भाषा यांचें उत्तम ज्ञान मिळवलें. व्याकरणशास्त्राचें महाभाष्यान्त संपूर्ण अध्ययन त्यांनीं खरोखरच बारा वर्षांत संपविलें. व्याकरणाच्या अध्ययनाबरोबरच त्यांनीं न्याय, अलंकार, मीमांसा, वेदान्त व धर्मशास्त्र यांचेंही साधारण अध्ययन केलें. अध्ययन चालू असतांनाच त्यांनीं सहाध्यायी लोकांबरोबर चिंतनिका व शिष्यगणांना पढवणें या दोनही गोष्टी अंगावर घेऊन गुरुजींचा विद्यादानाचा भार हलका केला. वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या व्याकरणाच्या तीन वर्षांच्या तीनही परीक्षा त्यांनीं एकदम दिल्या व बडोद्याच्या श्रावणमास दक्षिणापरीक्षेंतही व्याकरणशास्त्रांतील उच्चतम परीक्षा देऊन पञ्चवार्षिक दक्षिणा मिळविणाऱ्या लोकांमध्यें त्यांनीं उच्चांक मिळविला. अध्ययन व अध्यापन यांबरोबरच आपल्या तीव्र बुद्धीच्या जोरावर त्यांनीं शास्त्रीय ग्रंथांवर मार्मिक टांचणें व टीका लिहिण्यास सुरुवात केली व पंचविसावें वर्ष पुरें होण्याचे आंतच परिभाषेन्दुशेखरावर "तत्त्वादर्श" व लघुशब्देन्दुशेखरावर "गूढार्थप्रकाश" या नांवाच्या टीका लिहिल्या. ज्या वेळीं शंकराचार्यांची स्वारी सातारा येथें येई, आणि विद्याप्रेमी गृहस्थ विद्वांनाना बोलावून शास्त्रचर्चा ऐकत, त्यावेळीं शास्त्रीबुवांचें वाक्चातुर्य व पांडित्य यांचें सर्वजण कौतुक करीत. मंत्रशास्त्र व फलज्योतिष यांचेंही ज्ञान त्यांनीं मिळविलें व त्याबरोबरच थोडें वेदाध्ययनही केलें. सातारा येथें योगक्षेमाचें साधन नसल्यामुळें त्यांनीं १८९० सालीं सातारा सोडला व गुरुजींच्या आज्ञेनें ते पुणें येथें न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांचेकडे जाऊन त्यांचे आश्रयानें राहिले.

## ६६. शास्त्रीबुवांची धर्मावरील श्रद्धा व शुद्ध वर्तन.

पुणें येथें आल्याबरोबर शास्त्रीबुवांना संस्कृतपाठशाळेंत महिना रुपये दहाप्रमाणें पगार मिळूं लागला व कांहीं महिन्यांनंतर फर्ग्युसन कॉलेजमध्यें शास्त्री म्हणून त्यांची नेमणूक होऊन दरमहा ४० रुपयेप्रमाणें पगार मिळूं लागला. त्या वेळीं हल्लींच्या मानानें पुष्कळ स्वस्ताई होती हें खरें; तरी पण त्यांची रहाणी अत्यंत साधी असल्यामुळें प्राप्तींतून खर्च भागवून सातारा येथें बंधूंच्या प्रपंचासाठीं ते नियमित मदत करीत असत व थोडा संग्रहही त्यांना करतां येत असे. त्यांचेबरोबर सातारा येथून तेव्हां चार पांच समवयस्क सहाध्यायी शिष्य म्हणून आले होते. त्यांनाही ते वेळोवेळी आर्थिक मदत करीत. शास्त्रीबुवांनीं कोणताही जिन्नस कधींही उधार आणला नाहीं व कोणाचें कर्जही घेतलें नाहीं. ज्या वेळीं एखादें कृत्य करण्यास पुरेसा पैसा

त्यांचे जवळ नसे त्यावेळीं तें कृत्य ते करीत नसत. यात्रा व दानधर्म यांकरितां सर्व प्राप्तींतील आठवा हिस्सा ते बाजूला काढून ठेवीत असत. धर्मावर त्यांची दृढ श्रद्धा असे व त्यामुळें आचरण अत्यंत पवित्र असे. यात्रेच्या पवित्र ठिकाणीं जाऊन त्यांनीं मुख्य मुख्य सर्व तीर्थयात्रा केल्या. १९०४ सालीं प्रथम त्यांनीं प्रपंचांतील सर्व मंडळी व शिष्य मिळून २० मंडळींसमवेत बैलगाडीनें प्रवास करून चिपळूणजवळ क्षेत्र परशुराम येथें जाऊन कुलदैवत परशुरामाचें दर्शन घेतलें. त्यानंतर १९१२ सालीं त्यांनीं त्रिस्थली यात्रा केली व विश्वेश्वराचें दर्शन घेतलें. त्यानंतर बारा ज्योतिर्लिंगांपैकीं बदरीकेदार व श्रीशैल्यमल्लिकार्जुन या यात्रा कठीण व आपणांस असाध्य म्हणून सोडून देऊन सोमेश्वर रामेश्वर, ममलेश्वर, महाकालेश्वर, त्र्यंबकेश्वर, भीमाशंकर, नागेश्वर, घृसृणेश्वर, वैद्यनाथ या ज्योतिर्लिंगांचें दर्शन घेतलें. यांशिवाय द्वारका, हरिद्वार, मथुरा, वृंदावन, गोकर्णमहाबळेश्वर, डाकोर, पंढरपुर, व क्षेत्र महाबळेश्वर या ठिकाणीं जाऊनही देवदर्शन घेतलें. सर्व धार्मिक कृत्यांत व प्रपंचांत त्यांना त्यांच्या पत्नी सौ. उमाबाई यांची मदत असे. सौ. उमाबाईंनीं पतींची एकनिष्ठतेनें ६० वर्षें सेवा केली इतकेंच नव्हे तर परलोकींसुद्धां पतीची सेवा व्हावी म्हणूनच कीं काय शास्त्रीबुवांचे पूर्वी आठ महिने (२६ जानेवारी १९४२) त्या इहलोक सोडून गेल्या. शास्त्रीबुवांचे तोंडून पत्नी गेल्या त्या वेळीं "पदन्यासो गेहाद् बहिरहिफणारोपणसमः पुमानन्यः कान्ताद् विधुरिव चतुर्थीसमुदितः" हें श्लोकार्ध ऐकण्यांत आलें. त्यांच्या स्वतःच्या अत्यंत शुद्ध आचरणानें, साध्या राहणीनें व त्याबरोबर विचारनैर्मल्यानें त्यांच्या कुटुंबांतील मंडळींच्या व शिष्यगणाच्या ठिकाणीं साहजिकच ते गुण उत्पन्न झाले.

### ६७. शास्त्रीबुवांची रहाणी.

शास्त्रीबुवांची रहाणी अत्यंत साधी होती. सरकारी दरबार, मंगलकार्य, विद्वत्सभा वगैरे सर्व प्रसंगीं त्यांच्या विद्वत्तेला साजेसा असा त्यांचा बंडी आंगरखा व पागोटें असा पोषाख सर्वदा दिसून येई. आहार अत्यंत सात्विक असे. दिनचर्येंत अत्यंत नियमितपणा असे. तो इतका कीं, ते प्रातःकाळीं उठून स्नान, संध्यावंदन व पार्थिवपूजा करून पाठशाळेंत जातांना दिसले कीं, लोकांनीं सात वाजले म्हणून घड्याळाची वेळ बरोबर करावी. पाठशाळेंतील काम संपवून ते नऊ वाजतां घरीं परत येत व त्यानंतर कॉलेजच्या कामाकडे लक्ष्य देत. जेवण नियमानें दहा वाजतां घेत व त्यानंतर कॉलेजमध्यें जेव्हां काम असेल त्याप्रमाणें घोडागाडी आल्यावर जात. गाडीचा खोळंबा त्यांचेकडून कधींही होत नसे. हें जाणूनच इतर अध्यापकांना घेऊन नंतर शेवटीं त्यांना घेण्याकरितां गाडी येई. कॉलेजचें काम संपवून परत आल्यावर सायंकाळीं सूर्यास्तापर्यंत ग्रंथसंपादनाचा व टीका वगैरे लिहिण्याचा व्यवसाय करीत. शरीरप्रकृति नाजूकच होती पण नियमितपणामुळें, मिताहारामुळें व प्रकृतीला मानवेल अशा योग्य व्यायामामुळें त्यांनीं आपल्या प्रकृतीची निगा उत्तम प्रकारें राखली. त्यांचा व्यायाम म्हणजे दररोज विशिष्ट देवदर्शनाच्या निमित्तानें एक दोन मैल चालून येणें हा होता. फिरावयास ते एकटेच जात असत व त्या वेळीं लिखाण चालू असलेल्या विषयांबद्दल मनामध्यें विभावना करीत असत व परत येतांच सुचलेले विचार टिपून ठेवीत. सायंकाळीं सूर्यास्ताचे वेळीं सायंसंध्या व स्तोत्रपाठ साधारणपणें अर्धा तास झाल्यावर जेवीत असत व पहाटे पांच वाजतां नियमितपणें उठण्याचा त्यांचा परिपाठ असल्यामुळें जेवणानंतर लवकरच झोपीं जात. कांहीं कामानिमित्तानें किंवा अन्य कांहीं कारणामुळें अथवा शास्त्रविषयक शंका विचारण्याकरितां कोणीही केव्हांही त्यांना येऊन भेटूं शके. अशा लोकां-

पाशीं ते अत्यंत आदरानें वागत, आणि त्यांचा व आपला दोघांचाही वेळ ज्यास्त न जाईल येवढेंच कामापुरतें बोलत व बोलणें झाल्यावर आपल्या व्यवसायाला लागत. त्यांच्या शरीर-स्वास्थ्याचें व मनःस्वास्थ्याचें विशेष चिन्ह म्हणजे सुट्टीच्या दिवशीं दुपारीं किंवा अन्य दिवशीं रात्रीं, हातांतील लेखणी बाजूला ठेवली कीं, लागलींच त्यांना झोंप लागे व ठरावीक वेळीं ते जागे होत. बौद्धिक विषयांमध्यें मनाची सर्वदा व्याप्टतता हेंच निरोगीपणाचें लक्षण असें ते समजत. त्यांना शरीरस्वास्थ्य नसतांना विश्रान्ति घ्या म्हणून लोकांनीं सांगितल्यास, " शारीरिक विश्रांति घेतों, मनाची विश्रांति शक्य नाहीं " असें ते म्हणत व बसल्याबसल्या कांहीं लिहीत असत किंवा दुसऱ्याला आपले विचार लिहावयास सांगत असत.

## ६८. शास्त्रव्यासंगाशिवाय इतर कामांत शास्त्रीबुवांचें लक्ष व कौशल्य.

शास्त्रव्यासंगाशिवाय इतर व्यवसायांतहि जेथें जेथें ते लक्ष्य घालीत तेथें तेथें त्यांच्या बुद्धीची तीव्रता दिसून येई. कार्यप्रसंगीं ते बुद्धिबळें, फासेसोंगट्या, गंजिफा वगैरे खेळत असत पण त्या वेळींही प्यादी करणें, दुरंगी करणें, अखेर धरणें वगैरेंमध्यें त्यांचें कौशल्य उत्तम तऱ्हेनें दिसून येई व खेळाची अखेर बोलल्याप्रमाणें ते हटकून करून दाखवीत असत. प्रसंग-विशेषीं कांहीं संस्कृत कविताही ते करीत असत व त्यांमध्यें भाषासौष्ठवाबरोबर कल्पनासौन्दर्यही दिसून येई. सभेमध्यें व्याकरण, वेदान्त वगैरे विषयांमध्यें पूर्वपक्ष उत्तरपक्ष वगैरे जुन्या तऱ्हेनें विषयाचें प्रतिपादन चाले तेव्हां शेवटचें निर्णायक उत्तर त्यांचेकडून येई व कित्येक वेळां तें ग्रंथांत न सांपडणारें पण स्वतःच्या प्रतिभेनें त्यांनीं दिलेलें दिसून येई. त्यांना अष्टाध्यायी मुखोद्गत असे व अधूनमधून त्यांना कामाची मोकळीक असतां ते दरएक सूत्र म्हणत व त्यावरचें भाष्यान्त विवेचन ध्यानांत आणल्यानंतर दुसरें, अशा रीतीनें सर्व सूत्रें म्हणून सावकाश अष्टा-ध्यायीपाठ पुरा करीत. सर्व व्याकरणशास्त्र प्रज्वलित राहण्याचें आपल्या आजोबांनीं आंगीकारलेलें हें उत्तम साधन आहे असें ते म्हणत. एकदां पंडितांच्या सभेंत त्यांचे गुरुजी, ते व इतर शिष्य बसले असतां दूरदेशच्या पंडितांनीं " स एवायं नागः सहति कलभेभ्यः परिभवम् " ही ओळ कोणत्या ग्रंथांत आहे तें सांगा नाहींतर समस्यापूरण करा असें म्हटलें असतां शास्त्रीबोवांनीं तत्काल

"पुरा योसौ कण्ठीरवनिनदमाकर्ण्य पुरतः स्फुरन् कोपः साक्षादिव सपदि जेतुं स्म यतते ।
स एवायं नागः सहति कलभेभ्यः परिभवं दशामेतां प्रायोनुभवति हि लोको गतवयाः"

याप्रमाणें समस्यापूरण करून श्लोक म्हणून दाखविला. संकेश्वर येथील शंकराचार्य यांनीं त्यांना अनेक वेळां, उत्तरादिमठाधिपतींनीं एकदां, गोव्यांतील प्रभुदेसाई यांनीं एकदां बहुमानानें नेऊन त्यांचा योग्य सन्मान केला. दत्तक व विवाह, वगैरे अनेक धार्मिक बाबतींत संस्थानिकां-कडून व मोठमोठ्या लोकांकडून त्यांना अनेक वेळां पृच्छा येई व त्या वेळीं जें शास्त्रशुद्ध असेल तेंच ते सडेतोडपणानें सांगत . परिस्थिति, काल व समाजाचा कल इकडे लक्ष देऊन बऱ्याच स्मृतींचा विरोध असूनही कांहीं स्मृतींत जर कमीजास्त अनुकूल असा निर्णय मिळाला तर ते तसा देत असत. याचें ठळक उदाहरण म्हणजे काशी, नागपूर वगैरे बऱ्याच ठिकाणीं जाऊन धर्मान्तर केलेल्या लोकांच्या शुद्धीकरणाविषयीं चौकशी करून मोपला प्रांतांत शुद्धीकरण करण्याकरितां चाललेल्या त्यांच्या प्रयत्नाला शास्त्रीय आधार मिळाला नसतां श्री. डॉ. मुंजे हे शास्त्रीबुवांकडे आले व शास्त्रीबुवांना त्यांनीं सर्व परिस्थिति समजावून सांगितली तेव्हां शास्त्रीबुवांनीं त्यांना विचार करून सांगतों असें म्हणून दोन दिवसांनीं बोलाविलें. त्या

अवधींत एका स्मृतीचा आधार काढून शास्त्रीबुवांनीं ' सात पिढ्यांपर्यंत धर्मांतर केलेल्या लोकांचें शुद्धीकरण होऊं शकतें, त्याला अट एकच—धर्मांतर झालेल्या व्यक्तीला खरा पश्चाताप झाला असला पाहिजे ही—व प्रायश्चित्ताची रक्कम विष्णवे नमः म्हणून यथाशक्ति कांहींही द्रव्योत्सर्ग करावा ' असें सांगितलें. अशौच निर्णयांत निरनिराळीं मतें प्रतिपादिलीं असतां ज्या मताप्रमाणें कमी दिवस अशौच तें मत ग्राह्य असतें त्याचप्रमाणें धर्मपरिपालनाच्या दृष्टीनें कांहीं स्मृतींचा विरोध असतांनाही एकाद्या स्मृतींत अनुकूल प्रतिपादन मिळालें तरी तें घ्यावें या न्यायाचा ते सदा अवलंब करीत असत. फलज्योतिष पाहून आपल्या बुद्धिवैभवानें जीं कांहीं फलें व योग ग्रहयोगामुळें प्राप्त होणें शक्य आहेत ते पृच्छा केली असतां कधीं कधीं आपल्या स्नेह्यांना सांगत. तसेंच नष्ट वस्तूसंबंधींही सांगत असत. बहुतेक वेळां या सर्व गोष्टींचा बिनचूक प्रत्यय आल्याचें दिसून येई व मित्रमंडळीही तसा प्रत्यय आल्याबद्दल सांगावयास येत. याही बाबतींत त्यांनीं आपल्या गुरुजींविषयीं ' खरोखरच ते महर्षि ' होते म्हणून काढलेले उद्गार त्यांना स्वतःलाही योग्य लागू होतात.

## ६९. भविष्यकालांत घडणाऱ्या गोष्टींचें त्यांना पूर्वसूचन.

प्रसंगविशेषीं कांहीं महत्त्वाचें काम करावें किंवा न करावें असा प्रश्न उपस्थित होऊन त्यांचे-कडून जेव्हां निर्णय केला जात नसे त्या वेळीं त्यांनाही पितामहाची मूर्ति स्वप्नांत येऊन योग्य निर्णय सांगे व आशीर्वाद देई. क्वचित् प्रसंगीं त्यांना कांहीं दृष्टान्त म्हणतात किंवा साक्षात्कार म्हणतात तशा प्रकारचे अनुभव स्वप्नामध्यें येत. याचें ठळक उदाहरण म्हणजे त्यांच्या वयाच्या अडतिसाव्या वर्षीं दिवाळीचे सुमारास त्यांना अपमृत्यु येणार असा दृष्टान्त झाला. त्याच वेळीं त्यांचे पत्नींनाही तशाच प्रकारचें स्वप्न पडलें. दिवाळीच्या पाडव्याच्या दिवशीं सकाळीं उठतांनाच त्यांना पाठींत उसण भरली. तशांतच त्यांनीं स्नान वगैरे सर्व उरकलें पण प्रकृतीला आराम न वाटल्यामुळें ते पडूनच राहिले. दुपारीं दुखणें असह्यच झालें व ते व पत्नी दोघेही घाबरून गेले. शिष्यमंडळींकडून नेहमीं येणारे कृष्णशास्त्री माटे वैद्य यांना बोलावून आणलें व त्यांनी औषधोपचार करून पडून राहण्यास सांगितलें. दुसरे दिवसापासून प्रकृतीस आराम पडूं लागला. शास्त्रीबुवांचे परमस्नेही व विष्णुशास्त्री भट्ट यांच्या शिष्यपरंपरेंत येणारे मंत्रशास्त्रज्ञ दामोदरशास्त्री साठे यांनीं आपल्यावर झालेला माटे वैद्य यांचा उपकारभार हलका करण्या-करितां माटे वैद्य यांना त्यांच्या हाताला गुण यावा अशा प्रकारची कांहीं सिद्धि दिली होती असें ऐकण्यांत आहे. या अपमृत्युयोगांतून ३८ व्या वर्षीं पार पडल्यानंतर कांहीं दिवसांनीं त्यांना वयाच्या चौऱ्याहत्तरावे वर्षीं मृत्युयोग आहे असा दृष्टान्त झाला. व तेव्हांपासून वयाचे ७३ वर्षेपर्यंत साधारणपणें त्यांची प्रकृती चांगली राहिली. चौऱ्याहत्तरावें वर्ष चालूं असतांना मात्र त्यांना विशिष्ट कांहीं कारण नसतांना एकदम गैरशुद्धि यावी असें पांच वेळां घडून आलें; पण त्यांतूनही अंगीकृत काम पुरें झालें नव्हतें म्हणूनच कीं काय ते निभावले व ७५ वें वर्ष संपण्याचे दिवशीं त्यांचें अभिनंदन व सत्कारसमारंभ हे दोनही त्यांच्या स्नेहिवर्गानें व शिष्य-वर्गानें केले व त्यांना दीर्घायुष्य चिंतिलें.

## ७०. पूर्वसूचनांप्रमाणें घटना.

मृत्युपूर्वी कित्येक वर्षे त्यांच्या पत्नीनें पृच्छा केली असतांना शास्त्रीबुवांनीं एकदांच सांगितलें कीं " तिला मृत्यु त्यांचे स्वतःचे पूर्वी येईल ही गोष्ट तिनें निश्चितपणें लक्षांत

ठेवावी." त्यानंतर कांहीं वेळां ते स्वत: बरेच आजारी पडले म्हणजे तिनें पृच्छा केली असतां पुन्हां त्यांनीं तिला तेंच सांगावें. असा प्रकार पुष्कळ वेळां झाला. त्यांच्या अठ्याहत्तराव्या वर्षी ते एकदां (जानेवारी १९४२ मध्यें) फारच आजारी पडले ते इतके कीं एक दिवस ताप फार वाढल्यामुळें कांहींएक न खातां मधून मधून ते गैरशुद्धींतच होते. डॉक्टर येऊन औषध देत असतां स्वभावत: स्पष्टवक्त्या त्यांच्या पत्नींनीं डॉक्टरांना स्पष्ट प्रश्न केला कीं, हे मला नेहमीं अश्वासन देतात कीं माझा मृत्यु याचे पूर्वी आहे; पण आजचा प्रकार काय ? शास्त्रीबुवांनीं यावर माझें बोलणें खरें झाल्याशिवाय राहणार नाहीं असें एकच वाक्य स्पष्टपणें उच्चारलें व डॉक्टरांना पत्नीची प्रकृति पहाण्यास सांगितलें. डॉक्टरांनीं तपासून सौ. उमाबाईंना त्यांच्या म्हणण्याप्रमाणें होईल असें सांगितलें व घराबाहेर फारसें पडूं नका, जिन्याची चढउतार करूं नका म्हणून सूचना दिली. सांगावयाचें कारण इतकेंच कीं, त्यानंतर चारच दिवसांनीं ता. २६ जानेवारी रोजीं पहाटें ५ वाजतां अंथरुणावरून उभ्या राहिल्या असतां त्या एकदम खालीं पडल्या व त्यांचें प्राणोत्क्रमण झालें. शास्त्रीबुवांच्या प्रकृतीला आराम पडूं लागला; परंतु आपलाही काळ जवळ आला हें त्यांनीं जाणलें असावें.

## ७१. समाधानवृत्तीनें कष्टरहित देहावसान.

त्यांनीं महाभाष्यप्रस्तावनेचा खंड पुरा केला व त्याच्या शेवटीं "भाष्यस्यार्थबुभुत्सूनां सौलभ्येनार्थबुद्धये। अदो भाषान्तरं श्रीशो मया समुदपादयत्" असा श्लोक त्यांनीं लिहिला. त्यांनीं योजिलेल्या कायपरिशुद्धि, साधनपरिशुद्धि व मोक्षपरिशुद्धि या तीन ग्रंथांपैकीं कायपरिशुद्धि हा पुरा होऊन छापूनही झाला होता. त्यांनीं साधनपरिशुद्धि ग्रंथ लिहावयास घेतला, व मोक्षपरिशुद्धीची ते विभावना करूं लागले; पण तें काम आपल्या हातून पुरें व्हावयाचें नाहीं असें वाटल्यामुळेंच कीं काय आपण लिहिलेल्या व संपादन केलेल्या अशा ग्रंथाची यादी तयार करून त्यांपैकीं तेरा ग्रंथांना आमोद नांव देऊन सर्वांचे खालीं—

---

शास्त्रीबुवांनीं लिहिलेल्या अथवा संपादन केलेल्या ग्रंथांची यादी. ग्रंथाचें नांवापुढें प्रकाशनाचा अथवा लेखनाचा काळ इसवी शकाप्रमाणें कंसांत दिला आहे.

१. परिभाषेन्दुशेखर–टीका (१८८६) २. लघुशब्देन्दुशेखर–टीका (१८८८). ३. ब्रह्मसूत्र–शांकर भाष्याचें मराठी भाषांतर (१९०२–८). ४. श्रीभाष्य–चतुःसूत्री–स्वकृत टीकेसहित (१९०४) ५. यतीन्द्रमतदीपिका—स्वकृत टीकेसहित (१९०६). ६. श्रीभाष्य–स्वकृत टिप्पणीसहित (१९१४–१६) ७. श्रीभाष्य प्रथमसूत्र–स्वकृत टिप्पणीसहित (१९१५) ८. विशिष्टाद्वैतमत (१९१५) ९. पातञ्जल योगसूत्र–भाष्य व टीका यांसहित (१९१७) १० अद्वैतामोद (१९१८) ११. काव्यप्रकाश–संकेत टीकेसहित (१९२१) १२. सूत्रान्तरपरिग्रहविचार (१९२२) १३. सर्वदर्शनसंग्रह—स्वकृतटीकेसहित (१९२४). १४. संस्कारपद्धति (१९२४) १५. न्यायकोश (१९२४). १६. धर्मतत्त्वनिर्णय (१९२९). १७. कुण्डार्क–स्वकृतटीकेसह (१९३१). १८. ब्रह्मसूत्रशांकरभाष्य–अध्याय २ पाद १ व २ (१९३३). १९. मीमांसान्यायप्रकाश–स्वकृतटीकेसह (१९३८). २०. श्रीमद्भगवद्गीता–अध्याय १ व २ स्वकृतटीकेसह (१९३८). २१. सिद्धान्तबिन्दु–स्वकृतटीकेसह (१९३८). २२. व्याकरणमहाभाष्याचा अनुवाद (१९३०–३८). २३. कायपरिशुद्धि (१९३९). २४. साधनामोद–अपूर्ण (१९४२). २५. मोक्षामोद–अपूर्ण (१९४२).

विषय, प्रकाशनस्थळ, विस्तार व किंमत यांसह ही यादी सर्वदर्शनसंग्रहप्रस्तावना पान ८ व ९ मध्यें दिली आहे.

" समर्प्य गौरीरमणे कृत्वामोदांस्त्रयोदश । श्रीवासुदेवो जनुषः साफल्यं लब्धुमीहते "
अस श्लोक लिहून ठेवला. या श्लोकांत लिहिल्याप्रमाणें जणूं काय पूर्वयोजनेनुसार जन्माचें सार्थक करून व परमेश्वरानें आपणांकडे सोंपविलेली कामगिरी संपवून समाधानयुक्त अन्तःकरणानें ते कालक्रमण करूं लागले. लवकरच आश्विन महिन्याचे शुक्ल चतुर्थी दिवशीं रात्रीपर्यंत सर्व दैनिक व्यवहार रोजचेप्रमाणें करून, इतकेंच नव्हे तर जेवणानंतर रात्रीं वेदान्तविषयक चर्चा करून, ते झोंपीं गेले. पहांटे चार वाजण्याचे सुमारास जागे होऊन खोकला आला म्हणून नेहमीं-प्रमाणें खडीसाखर खाल्ली व पाणी प्याले. त्यानंतर सूर्योदयापूर्वींच त्यांच्या इच्छेप्रमाणें शरीराला कांहींएक पीडा न होतां अत्यंत समाधानयुक्त अंतःकरणवृत्तीनें त्यांचा आत्मा शिवस्वरूपीं विलीन झाला. खरोखरच शास्त्रीबुवा स्वतः, त्यांचे पितामह व त्यांचे प्रपितामह या सर्वांना महर्षि शब्द पूर्णपणें लागू पडतो.

## ७२. पूर्वसूचनांबद्दल कारणविवेचन.

शास्त्रीबुवांना व त्यांच्या गुरूजींना स्वप्नामध्यें महत्वाचे प्रसंगीं पवित्र व्यक्तींचें दर्शन होऊन त्यांचेकडून त्यांना योग्य मार्गदर्शन झालें व तसेंच अन्तःस्फूर्तीनें म्हणा, किंवा अन्य कांहीं कारणांमुळें म्हणा, त्यांना पुढें घडून येणाऱ्या प्रसंगांची सूचना मिळाली. या तऱ्हेचा अनुभव लेखकालाही केव्हां केव्हां आला आहे. त्याप्रमाणेंच, जें काम सिद्धीस जाणारें नसतें किंवा गेल्यास त्यांचा परिणाम हितकारक व्हावयाचा नसतो असें कांहीं काम करूं गेलें असतां कांहीं विघ्न येऊन किंवा विस्मरणानें तें काम करावयाचें राहावें व नंतर झालें तें बरेंच झालें असें वाटावें या प्रकारचेही अनुभव लेखकाला आले आहेत. या गोष्टींचा उलगडा ज्यांची आध्यात्मिक पुष्कळ प्रगति झाली आहे तेच योगी करूं शकतील. न जाणों, हल्लीं चालू आहे तशीच आध्यात्मिक व भौतिक या दोन्ही शास्त्रांची प्रगति चांगल्या प्रमाणानें होत गेल्यास शास्त्रीय रीत्या या गोष्टींचा खुलासा होणें शक्य आहे. शास्त्रीबुवांनीं योजिलेले साधनपरिशुद्धि व मोक्षपरिशुद्धि हे ग्रंथ त्यांचे हातून लिहून झाले असते तर त्यावरून कांहीं खुलासा झाला असता. असें दिसतें कीं, सर्व ब्रह्माण्ड ' निगूढ देवात्मशक्ती- ' नें भरलें आहे, या शक्तीला पंचमहाभूतात्मक उपाधि लागल्यामुळें ठिकठिकाणीं तिचें नियंत्रण झालें आहे, व कमीज्यास्त नियंत्रणास अनुरूप असे तिचे अनंत प्रकार व रूपें दृष्टोत्पत्तीस येत आहेत. ही आत्मशक्ति या अनंत रूपांमध्यें जरी नियंत्रित झाली असली तरी तिच्या योगानें त्या रूपांमधील भौतिक उपाधीचें, क्रियाशक्तीचें, इच्छाशक्तीचें, व ज्ञानशक्तीचें परिपोषण होत असतें. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे, ही आत्मशक्ती म्हणजेच तैत्तिरीय व इतर उपनिषदांमध्यें वर्णिलेला आनंदमय कोश होय. अन्नमयकोश ( पांच महाभूतें ), प्राणमयकोष ( क्रियाशक्ति ), मनोमयकोष ( इच्छाशक्ति ) व विज्ञानमयकोष ( ज्ञानशक्ति ) या चार कोषांना हा आनंदमयकोषच वृद्धिंगत होण्यास मदत करीत असतो. अन्नमयकोषापासून बाकीच्या चार कोषांचा वियोग म्हणजेच मृत्यु. मृत्यूनंतर चतुष्कोषात्मक शरीर राहूं शकतें; तसेंच प्राणमयकोषही कमी होऊन त्रिकोषात्मकही राहूं शकतें; त्याप्रमाणेंच प्राणमयकोष व मनोमयकोष कमी होऊन द्विकोषात्मकही होऊं शकतें. एककोषात्मक म्हणजे आनन्दमयकोषात्मक स्वरूप म्हणजेच मुक्ति. तसेंच, एका अन्नमयकोषाचा वियोग झाल्यानंतर पुन्हां दुसऱ्या निराळ्या अन्नमयकोषाशीं

चतुष्कोषात्मक शरीराचें संलग्न होणें हाच पुनर्जन्म. बौद्ध तत्त्वज्ञानांत वर्णिलेल्या रूप विज्ञान, वेदना, संज्ञा व संस्कार या पांच स्कंधांची अन्नमय वगैरे पांच कोषांशीं तुलना करणें शक्य व उद्बोधकही आहे.

### ७३. पूर्वसूचनाकारणांना आधार.

या चतुष्कोषात्मक, त्रिकोषात्मक, व द्विकोषात्मक रूपांना अनुक्रमें वसुरूप, रुद्ररूप आणि आदित्यरूप अशीं नांवें दिलीं असावीं. पिता, पितामह व प्रपितामह हे अनुक्रमें या तीन स्वरूपांत असतात असें वर्णन केलेलें आहे व श्राद्धसंकल्पांत त्यांना क्रमानें वसुस्वरूप, रुद्रस्वरूप, व आदित्यस्वरूप मानून तसा उल्लेख करण्याचा प्रघातही आहे. त्यामुळें ज्याचीं मुलें, किंवा मुलांसमान शिष्य वगैरे मंडळी जिवंत आहेत अशी व्यक्ति मृत्यूनंतर वसुस्वरूप होऊन म्हणजे पृथ्वीवरील देवतेचें स्वरूप धारण करून प्राणरूपानें संचार करीत राहूं शकते व त्यामुळें प्राण जसा इंद्रियांकडून श्रम करवूं शकतो त्याप्रमाणें या पितृदेवतेची प्राणशक्ति मुलांच्या व मुलासारख्यांच्या प्राणशक्तीवर संधि मिळाल्यास, किंवा संधि साधून, अधिकार चालविते व त्यांचेकडून आपणाला आवडेल तसें काम करवून घेऊं शकते. दुसऱ्याकडून काम करवून घेण्याची ही पितृदेवतेची प्रवृत्ति कालांतरानें कमी होत जाते व साधारणत: एक पिढी गेल्यानंतर म्हणजे मुलाच्या दर्जाचीं माणसें नाहींशीं झाल्यानंतर या पितृदेवतेचें वसुस्वरूप जाऊन तिला रुद्रस्वरूप प्राप्त होतें व त्या रुद्रस्वरूप अंतरिक्षांतील देवतेचा प्रभाव नातवंडें व त्यांसारख्या व्यक्तींच्या मनोमयकोषावर म्हणजे इच्छाशक्तीवर चालूं शकतो. आणखी एक पिढी गेल्यावर याच न्यायानें या रुद्रस्वरूपाला आदित्यस्वरूप प्राप्त होतें व या स्वर्गांतील आदित्यस्वरूप देवतेचा प्रभाव आपले पणतू व त्यासमान व्यक्ती यांच्या विज्ञानमय कोषावर म्हणजे ज्ञानशक्तीवर होऊं शकतो. शरीरांत असणाऱ्या अन्नमय व प्राणमय कोषांच्या क्रिया झोपेमुळें किंवा अन्य कारणामुळें तात्पुरत्या थांबल्या असतांना त्यांतील जी मनोमय कोषाची क्रिया किंवा इच्छाशक्ति तिच्यावर बाहेरील मनोमयकोषांचा परिणाम होऊं शकतो व तिचाही प्रसंगविशेषीं बाहेरील मनोमयकोषांवर परिणाम किंवा प्रभाव होऊं शकतो. त्याप्रमाणेंच अन्नमय, प्राणमय, व मनोमय या तीनही कोषांच्या क्रिया योगामुळें, तप:सामर्थ्यामुळें किंवा अन्य कारणामुळें तात्पुरत्या थांबल्या म्हणजे शरीरांतील विज्ञानमयकोषावर म्हणजे ज्ञानशक्तीवर बाहेरील विज्ञानमयकोषांचे परिणाम किंवा प्रभाव होऊं शकतात व आंतील ज्ञानशक्तीचेही प्रसंगविशेषीं बाहेरील विज्ञानमयकोषांवर परिणाम होतात. थोडक्यांत इतकेंच म्हणावयाचें कीं, ज्याप्रमाणें शरीररूपी अन्नमय कोषाचा विकास अन्नानें होतो व त्यामुळें प्राणमय, मनोमय व विज्ञानमय कोषांकडून होणाऱ्या कार्याला मदत मिळते त्याप्रमाणेंच मृत्यूनंतरही कांहीं व्यक्तींचे प्राणमय, मनोमय, व विज्ञानमय कोष कायम रहात असावे व ते त्यांना अभिप्रेत अशा व्यक्तीच्या कोषत्रयाला प्रेरणारूपीं अन्न पुरवून त्यांचें पोषण करीत असावे.

## गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचे सहाध्यायी व शिष्यवर्ग (७४–९२)

### ७४. भारतांतील ग्रंथनिर्मिति आणि शिष्यनिर्मिति यांचें स्वरूप.

गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांनीं इ. स. १८८० पासून १९४२ पर्यंत साधारणपणें ६२ वर्षें अखंड अध्यापनकार्य केलें व तें करीत असतांना उच्च शास्त्रग्रंथांचे अनुवाद, त्यांवर टीका

व स्वतंत्र निबन्ध लिहिण्याचें कामही चालूं ठेविलें. भारतांतील विद्वानांच्या शिष्यपरंपरेकडे व ग्रंथनिर्मितीकडे पाहिल्यास शिष्यनिर्मिति व ग्रंथलेखन हीं दोनही कार्ये यशस्वी रीतीनें पार पाडणारे फारच थोडे विद्वान होऊन गेले. व्याकरणशास्त्राचे बाबतींतच विचार केल्यास गेल्या तीनशें वर्षांत नागेशोपाध्याय, त्यानंतर बालसरस्वती व त्यानंतर वासुदेवशास्त्री यांचेकडूनच ही दुहेरी कामगिरी झाली. उत्तम शिष्यवर्ग निर्माण करण्याचें काम मात्र नीलकंठशास्त्री थत्ते, भास्करशास्त्री अभ्यंकर, शिवकुमारशास्त्री, गंगाधरशास्त्री तेलङ्ग, रामशास्त्री गोडबोले वगैरे अनेक विद्वानांकडून झालें. याचा अर्थ केवल उत्तम शिष्य तयार करणें हें कमी योग्यता दाखवितें असा मुळींच नव्हे; उलट, आपले देशांत ग्रंथानिर्मितीपेक्षां शिष्यनिर्मिति हें काम ज्यास्त कठीण, ज्यास्त महत्वाचें व ज्यास्त योग्यतेचें समजलें जात असे व कांहीं वेळां वृद्ध गुरुजींना उत्साही विद्वान शिष्यानें ' आजन्म मी शिष्यनिर्मिति करून विद्यादेवीची उपासना करीन ' असें वचन दिल्यानंतर सुखानें मृत्यु येई अशा कथाही आपलेकडे प्रचलित आहेत. शिवाय, ग्रंथनिर्मिति हें काम कांहीं सोपें नसे. आजच्यासारखे सारांशात्मक, निबंधात्मक किंवा वर्णनात्मक चार दोन ग्रंथांवर आधारलेले ग्रंथ लिहून पूर्वीच्या काळीं ग्रंथकर्तृत्व लाभत नसे; तर ज्ञानामध्यें ज्या ग्रंथानें खरी भर पडेल असे किंवा दुर्बोध सूत्रात्मक सर्वमान्य ग्रंथांचें पाण्डित्यपूर्ण विवेचन करणारे असेच ग्रंथ विद्वन्मान्य होत असत. अर्थात् असे ग्रंथ लिहिण्याची योग्यता येण्यास गाढ अभ्यास, दृढतर व्यासंग, व निर्मल प्रतिभा यांचें मीलन अत्यंत आवश्यक असे व असें मीलन ज्याचे ठिकाणीं आहे अशा विद्वानाकडून ज्या विषयांत ग्रंथनिर्मिति व्हावयाची तोच विषय बुद्धिमान व योग्य विद्यार्थ्याला शिकविला गेल्यास असा ग्रंथ लिहितांना त्याला एक प्रकारचा आत्मविश्वास येत असे. गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचे ठिकाणीं प्रतिभा, अखंड वाचन व दीर्घ परिश्रम यांचें सुंदर मीलन झालें होतें.

## ७५. गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचे सहाध्यायी.

गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांनीं आपले गुरुजींचेजवळ व्याकरणशास्त्राचे उच्च ग्रंथ वाचावयास सुरुवात केल्याबरोबर त्या ग्रंथांचे, तसेच त्यांसारख्या इतर ग्रंथांचे, पाठ सामान्य बुद्धीच्या शिष्यांना ते देऊं लागले व स्वतःही त्या ग्रंथांवर महत्वाचीं टांचणें ते लिहूं लागले. गुरुजींचा सर्व काल सामान्य ग्रंथांपासून तों उच्चतम ग्रंथांपर्यंत निरनिराळ्या श्रेणींच्या व दर्जाच्या शिष्यांना पढवण्यांत जाई, तर शास्त्रीबुवा आपला आवश्यक तेवढा काल उच्च ग्रंथांच्या अध्ययनाकडे घालवून बाकीचा काल इतर शास्त्रांच्या ग्रंथांचें आपण स्वतः अध्ययन करून आपल्या सहाध्यायी

---

१ या विधानाच्या खुलाशाकरितां पुढें दिलेले श्लोक पहा—

नैसर्गिकी च प्रतिभा श्रुतं च बहुनिर्मलम् ।
अमन्दश्चाभियोगोऽस्याः कारणं काव्यसंपदः ॥ १ ॥
न विद्यते यद्यपि पूर्ववासनागुणानुबन्धि प्रतिभानमुत्तमम् ।
श्रुतेन यत्नेन च वागुपासिता ध्रुवं करोत्येव कमप्यनुग्रहम् ॥ २ ॥
देवीं वाचमुपासते हि बहवः सारं तु सारस्वतं
जानीते नितरामसौ गुरुकुलक्लिष्टो मुरारिः कविः ।
अब्धिर्लङ्घित एव वानरभटैः किंत्वस्य गम्भीरता—
मापातालनिमग्नपीवरतनुर्जानाति मन्थाचलः ॥ ३ ॥

मंडळींना ते ग्रंथ शिकविण्याकडे घालवीत. अशा रीतीनें शास्त्रीबुवांनीं सातारा मुक्कामीं असतांना इ. स. १८९० सालापर्यंत सहाध्यायी मंडळींबरोबर चिंतनिका करून आपलें अध्ययन दृढ केलें, कांहीं सहाध्यायी मंडळींना पढविलें, कांहीं स्वतंत्र शिष्य तयार केले, अध्ययन केलेल्या ग्रंथांवर क्रोडपत्रासारखीं टांचणें लिहिलीं व धर्मशास्त्र, ज्योतिषशास्त्र व मंत्रशास्त्र यांचाही गुरुजींचे साहाय्यानें स्वत: अभ्यास करून शिष्य तयार केले. त्यांच्या सहाध्यायी मंडळींपैकीं सीतारामशास्त्री आठल्ये व रामभाऊ लेले यांनीं आपआपल्या गांवीं जाऊन अध्यापनाचें काम चालविलें. बाबाशास्त्री काळे हे क्षेत्र काशी येथें गेले व तेथें त्यांनीं जमखिंडी संस्थानाधिपतींच्या वाड्यांत राहून जन्मभर विद्यादानाचें व्रत चालविलें. त्यांच्या अनेक शिष्यांपैकीं म. म. नारायणशास्त्री खिस्ते यांनीं गुरुसेवा करून उत्तम व्याकरणशास्त्राध्ययन केलें; व त्यानंतर सरकारी पाठशाळेंत पुष्कळ वर्षें प्राध्यापकाचें काम करून गुरुजींची परंपरा ते व त्यांचे दोघे चिरंजीव हल्लीं चालवीत आहेत. शास्त्रीबुवांचे दुसरे सहाध्यायी त्रिंबकशास्त्री लेले यांनीं पुणें येथील संस्कृत पाठशाळेंत कांहीं वर्षें अध्यापकाचें काम केलें. ते अत्यंत धर्मनिष्ठ होते. अध्यापनाव्यतिरिक्त राहिलेला सर्व काल ते धर्मानुष्ठान व व्रताचरण यांत घालवीत असत. पाठशाळेंतील अध्यापनाचें काम व्रतानुष्ठानाच्या आड येऊं लागल्याचें दृष्टोत्पत्तीस येतांच त्यांनीं अध्यापकपदाचा राजीनामा दिला व वाई येथें जाऊन आमरणान्त व्रतानुष्ठान संभाळून राहिलेला काल अध्यापनांत घालविला.

## ७६. रघुनाथशास्त्री अभ्यंकर यांचा अल्प परिचय.

शास्त्रीबुवांचे थोरले बंधू रघुनाथशास्त्री यांनीं गुरुजी रामशास्त्री यांचेजवळ शास्त्रीबुवांचे बरोबर संपूर्ण शास्त्राध्ययन केलें. पितामह भास्करशास्त्री यांचेनंतर रामशास्त्री यांनीं चालविलेल्या विद्यादानव्रताला मदत करावी व रामशास्त्री यांचेनंतर तें व्रत आजन्म चालवावें या मन:-संकल्पानें रघुनाथशास्त्री यांनीं दुसरीकडे योगक्षेमाची ज्यास्ती चांगली व्यवस्था होत असतांनाही सातारा शहर सोडलें नाहीं. आपल्या गुरुजींप्रमाणें धर्मानुष्ठान संभाळून राहिलेला सर्व काल घरींच त्यांनीं अध्यापनकार्यांत घालविला. कांहीं वर्षें सातारा येथील संस्कृतपाठशाळेंत ते मुख्या-ध्यापक होते. लहानपणापासून एकत्र पढलेले आपले धाकटे बंधू वासुदेवशास्त्री हे १९४२ सालीं निवर्तल्याचा त्यांचे मनाला मोठा धक्का बसला व त्यानंतर त्यांनीं आपला सर्व काल आह्निक धर्मा-नुष्ठान, होम–हवन, जप वगैरे कृत्यांत घालवून सुप्रसन्न चित्तानें इ. स. १९४८ सालीं भाद्रपद कृष्ण द्वितीया शके १८७० रोजीं सप्तशतीजप मुखानें करतां करतां देहत्याग केला. सातारा येथें त्यांनीं अनेक शिष्य तयार केले. त्यांमध्यें दत्तुशास्त्री वैद्य व गोपाळशास्त्री करंबेळकर हे सातारा येथें, व वै. भू. गणेशशास्त्री जोशी व सदाशिवशास्त्री काशीकर हे पुणें येथें, व सखारामशास्त्री गळसाशी हे कऱ्हाड येथें, अध्यापन-कार्य करीत आहेत. शहरांतील विद्याप्रेमी गृहस्थांनींही त्यांच्या विद्वत्तेचा लाभ घेतला. त्यांमध्यें श्रीयुत राजोपाध्ये, मामा कोल्हटकर व बाबा कोल्हटकर यांचा उल्लेख प्रामु-ख्यानें करतां येईल. त्यांचे मागें त्यांचे वडील चिरंजीव गोविंदशास्त्री यांनीं फलज्योतिष शास्त्राचा अभ्यास केला आहे. वडिलांच्या व पूर्वजांच्या तप:सामर्थ्यानें त्यांना वाक्सिद्धीही झाली आहे व त्यांनीं सांगितल्याप्रमाणें व्रतानुष्ठान केल्यानें कार्यसिद्धी होते असा लोकांना अनुभव येत आहे. रघुनाथशास्त्री यांचे दुसरे चिरंजीव श्री. दिगंबरपंत सरकारी हायस्कूलमध्यें संस्कृत शिक्षकाचें काम करीत आहेत.

## ७७. विठ्ठलशास्त्री धारूरकर यांचा अल्प परिचय.

विठ्ठलशास्त्री यांचा जन्म इ. स. १८५३ साली झाला. त्यांनीं सातारा येथें विद्वद्वर्य रामशास्त्री गोडबोले यांचेकडे व्याकरण व वेदान्त या शास्त्रांचें अध्ययन केलें. व्याकरणाचें अध्ययन चालूं असतांनाच धर्मशास्त्र व साहित्यशास्त्रांतील प्रमुख ग्रंथ त्यांनीं व गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांनीं बरोबरच वाचले. वासुदेवशास्त्री यांचेवर स्वत: ज्येष्ठ सहाध्यायी या नात्यानें त्यांचा फार लोभ असे. पंढरपूर येथें त्यांनीं इ. स. १८९८ सालीं आपले घरींच संस्कृतपाठशाळा स्थापिली व तेथें चारही वेदांच्या व प्रमुख शास्त्रांच्या शिक्षणाची सोय केली. त्यांनीं पंढरपुर येथें गेल्यावर लोकांना उपयुक्त होईल इतकें वैद्यकाचेंही अध्ययन केलें व सर्व आयुष्य विद्यादान व परोपकार यांत घालविलें. त्यांनीं धर्मशास्त्रावर अनेक निबंध लिहिले व क्षेत्र पंढरपुर येथें सर्वकाल विवाह करण्याची प्रथा पाडिली. त्यांचे विद्वान चिरंजीव भगवानशास्त्री हे वडिलांचे विद्यादानाचें व रुग्णपरिचर्येचें व्रत हल्लीं पाळीत आहेत.

## ७८. काशीनाथशास्त्री पुराणीक यांचा अल्प परिचय.

काशीनाथशास्त्री हे मूळचे प्रतापगडचे राहणारे. त्यांचें घराणें पौराणिकांचें होतें व देवीच्या देवळांत पुराण सांगण्याचें काम वंशपरंपरा त्यांचे घराण्याकडे चालूं होतें. काशीनाथशास्त्री यांनीं सातारा येथें गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेजवळ संपूर्ण व्याकरणशास्त्राध्ययन आपल्या बुद्धिसामर्थ्यानें अत्यंत अल्प कालावधींत केलें इतकेंच नव्हे तर मंत्रशास्त्र व धर्मशास्त्र यांचाही अभ्यास गुरुजींना करावयास लावून आपण त्या शास्त्रांचें त्यांचेजवळ अध्ययन केलें. काशीनाथशास्त्री यांच्या दृढ व्यासंगाचें गुरुजी कौतुक करीत व पितामहांचे पट्टशिष्य काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे यांनीं जशी काशी येथें शिष्यपरंपरा स्थापन केली तशीच सातारा येथें काशीनाथशास्त्री हे आपली शिष्यपरंपरा कायम राखतील असे ते उद्गार काढीत असत. काशीनाथशास्त्री हे सुद्धां गुरुजींच्या ठिकाणीं असलेल्या गाढ विद्वत्तेचा व शिष्यप्रेमाचा अभिमानपूर्वक उल्लेख करून जन्मोजन्मीं वासुदेवशास्त्री यांचेसारख्या गुरुजींचा लाभ घडो असें म्हणत. दुर्दैवानें काशीनाथशास्त्री हे अल्पायुषीच द्रव्यहानीचा धक्का बसून निवर्तले. त्यानंतर अल्पावधींतच लेखकाचा जन्म श्रावण कृ. ८ शके १८१० रोजीं झाला. जन्मत:च लागलेली उचकी लवकर थांबेना म्हणून शास्त्रीबुवांच्या मातु:श्रींनीं काशीनाथशास्त्री यांची आठवण करून लेखकाचें नांव कृष्ण ठेवण्याऐवजीं काशीनाथ ठेवीन असें म्हटलें व नंतर उचकी थांबली अशी हकीगत ऐकण्यांत आहे.

## ७९. न्यायरत्न नारायणशास्त्री वाडीकर यांचा अल्प परिचय.

न्यायरत्न नारायणशास्त्री हे गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचे सहाध्यायी जरी नव्हते तरी पुण्याचे नीळकंठशास्त्री थत्ते यांचे शिष्य दिनकरशास्त्री खांबेटे यांचे ते प्रशिष्य असल्यामुळें त्यांचा शास्त्रीबुवांशीं एकप्रकारें बरोबरीचे नात्याचा संबंध येतो; इतकेंच नव्हे, तर शास्त्रीबुवांचा व त्यांचा पुण्यांत अत्यंत निकटचा संबंध आला त्या वेळीं वेदान्त व धर्मशास्त्र यांतील अनेक महत्त्वाच्या स्थळीं उद्भवलेल्या शंकांचें समाधानकारक निरसन शास्त्रीबुवांचेकडून झाल्यामुळें शास्त्रीबुवांना ते प्रत्यक्ष गुरुस्थानींच मानतात. नारायणशास्त्री यांचें प्रत्यक्ष शिक्षण पुणें येथें झालें नसलें तरी पुणें येथें गीर्वाणमहाविद्यालय इ. स. १९२९ सालीं स्थापन झालें

त्या वेळीं त्यांची न्याय, धर्म, व वेदान्त या शास्त्रांचे अध्यापक म्हणून नेमणूक झाली. कांहीं वर्षें गीर्वाणमहाविद्यालयांत काम केल्यानंतर ते अहमदाबाद येथें ब्रह्मचारीवाडी संस्कृत पाठशाळेंत धर्म व वेदान्त या शास्त्रांचे मुख्याध्यापक म्हणून गेले. पुणें येथें असतांना अत्यन्त श्रम घेऊन व कळकळीनें शिकवून त्यांनीं मोठा शिष्यगण निर्माण केला. त्यांचेजवळ पंडित महेश्वरशास्त्री जोशी यांनीं धर्म व वेदान्त या शास्त्रांचें संपूर्ण अध्ययन केलें व त्यांचेनंतर महेश्वरशास्त्री हे त्यांचे जागीं अध्यापक झाले. व्याख्यानवाचस्पति गोविंदशास्त्री पंढरपुरे, कोल्हटकरबुवा, उपनिषत्तीर्थ जोग वगैरे विद्वानांची त्यांच्या शिष्यगणांत गणना होते. अध्यापनाचे बाबतींत नारायणशास्त्री यांची उत्सुकता व निरलसपणा हे गुण वाखाणण्यासारखे आहेत. यांशिवाय वक्तृत्व, वादनैपुण्य व निःपक्षपातीपणाचें धोरण याही गुणांचें सुंदर मीलन त्यांचे ठिकाणीं असल्यामुळें अनेक उत्सवप्रसंगीं त्यांना व्याख्यानें व प्रवचनें देण्याची विनंति करण्यांत येते. पुणें येथील वेदशास्त्रोत्तेजक सभेचे ते उपाध्यक्ष आहेत. अनेक संस्थांकडून परीक्षा घेण्याचीही त्यांना विनंति करण्यांत येते. त्यांनीं फलज्योतिषाचेंही उत्तम अध्ययन केलें आहे व त्या बाबतींतहीं पृच्छा केल्यास ग्रथांतील मुखोद्गत पंक्तींचा आधार देऊन ते जीं फलें वर्तवितात त्यांचा अनेक वेळां अनुभव आलेला आढळून येतो. अहमदाबाद येथें पाठशाळेंत त्यांचें अध्यापनाचें कार्य चालूं आहे.

## ८०. संस्कृत पाठशाळेचा संक्षिप्त वृत्तान्त.

इ. स. १८३४ सालच्या सुमारास पुणें व मुंबई येथें इंग्रजी शाळांतून इंग्रजी शिक्षण सुरू झाल्यानंतर लोकांची प्रवृत्ति बहुतांशीं इंग्रजी शिक्षणाकडे झाल्यामुळें थोडक्याच वर्षांत पुणें येथील सरकारी पाठशाळा बंद करण्यांत आली व तिचे जागीं विश्रामबाग वाड्यांत सरकारी इंग्रजी शाळा सुरू करण्यांत आली. पेशवे सरकारनीं वेदविद्या व संस्कृतविद्या यांचे रक्षणाकरितां चालूं केलेली श्रावणमास दक्षिणाही कांहीं वर्षांनीं बंद करण्यांत आली व दक्षिणेकडे खर्च होणाऱ्या पैशांचा विनियोग डेक्कन कॉलेज, डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटी व दक्षिणा फेलो यांचेकडे करण्यांत आला. इंग्रजी शिक्षणामुळें संस्कृत शिकावयास येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या पुष्कळच कमी झाली तसेंच ब्रिटिश अधिकाऱ्यांचें संस्कृतविद्येकडे स्वभावतःच दुर्लक्ष असे हीं जरी कारणें खरीं असलीं तरी पुणें येथील संस्कृत पाठशाळा सरकारनें बंद केली यास मुख्यत्वानें कारण इंग्रजी शिकून तयार झालेल्या विद्वानांचें परंपरागत आलेल्या संस्कृताध्ययनाध्यापनाचे बाबतींत औदासीन्य हेंच होतें. पुणें येथें संस्कृत पाठशाळा चालू होती तेव्हां जुन्या पद्धतीनें व्याकरण, न्याय, धर्मशास्त्र, मीमांसा, ज्योतिष, वैद्यक, अलंकार आणि वेदांत हीं शास्त्रें चांगलीं शिकलेले असे उत्तम पंडित काशीपासून रामेश्वरपर्यंत नामांकित होऊन गेले. त्यांची परंपरा कालगतीनें व राजाश्रय नसल्यामुळें अगदींच बुडत चालली व तेणेंकरून संस्कृत विद्येस जबरदस्त धक्का बसण्याचा दुर्धर प्रसंग आला. काशीक्षेत्राचे खालोखाल विद्येचें केंद्र म्हणून गाजलेल्या पुणें शहरामध्यें झालेला हा विद्येचा ह्रास आपल्या उच्च वैदिक संस्कृतीलाही अपायकारक आहे हें कांहीं वर्षांनीं युनिव्हर्सिटीच्या उच्चतम पदवी धारण करणाऱ्या विद्वानांच्याही लक्षांत आलें. पुण्यांतील विद्वान शास्त्री नरसिंहशास्त्री शेजवलकर, वासुदेवशास्त्री देडगांवकर, चिंतामणशास्त्री वरुडकर व दामोदरशास्त्री साठे यांनीं पुण्यामध्यें पुन्हां संस्कृत पाठशाळा सुरू करण्याचें मनांत आणलें व न्यायमूर्ति रानडे, डॉ. भांडारकर, प्राध्यापक काथवटे वगैरे विद्वान व विद्या-

प्रेमी मंडळींना या बाबतींत पुढाकार घेण्याची त्यांनीं विनंति केली. सर वुइलियम वेडरबर्न यांच्या-सारख्या परकीय विद्वानांनींही या बाबतींत पूर्ण सहानुभूति दाखविली. त्यानंतर लवकरच सन १८८५ मध्यें ( शके १८०६ माघ महिन्यांत वसंत पंचमीस ) पुण्यामध्यें विश्रामबागेजवळच नगरकर यांचे वाड्यांत ही पाठशाळा स्थापन करण्यांत आली व मुख्याध्यापक म्हणून प्रथमतः विद्वद्वर्य नारायणशास्त्री गोडबोले यांची नेमणूक करण्यांत आली. कांहीं सद्‌गृहस्थांनीं या पाठशाळेस देणग्या दिल्या, कांहींनीं विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या दिल्या तर इतर कांहीं गृहस्थांनीं विद्यार्थ्यांची रहाण्याची व भोजनाची सोय आपलेकडे केली.

## ८१. संस्कृतपाठशाळेंत शास्त्रीबुवांनीं केलेलें अध्यापन व शिष्यवर्ग.

संस्कृतपाठशाळा पुणें येथें प्रधानाध्यापकाचें काम शास्त्रीबुवांनीं सन १८९० सालीं पुण्यांत आल्या दिवसापासून १९४२ सालापर्यंत सतत ५२ वर्षें केलें. प्रथम त्यांना महिना पगार रु. १० मिळत होता व शेवटीं त्यांना संस्था रु. ३५ प्रमाणें पगार देऊं लागली. शेवटचीं ५ वर्षें त्यांनीं काम विनावेतनच केलें. कारण वार्धक्यामुळें ते शाळेच्या जागेंत जाऊं शकले नाहींत व घरीं काम करून पगार घेणें त्यांना रुचलें नाहीं. सदरहू पाठशाळेचा सर्व भार त्यांचेवरच होता व त्यांनीं पाठशाळेचा सर्व खर्च व्याजाचे व देणग्यांचे उत्पन्नांतून भागवून पाठशाळेची सांपत्तिक स्थिति पुष्कळ सुधारली पाठशाळेमधील त्यांचेकडून शिकून गेलेल्या विद्यार्थ्यांत प्रामुख्यानें विनायकशास्त्री साखरेबुवा, कान्हेरेबुवा, रंगाचार्य रड्डी, दत्तुशास्त्री आगाशे, सदाशिवशास्त्री गोरे, कृष्णशास्त्री कल्लोळकर, शिवरामशास्त्री शिंत्रे, लक्ष्मणशास्त्री जोशी ( मुरगुटकर ), बाळाचार्य खुपेरकर, महादेव दामोदर साठे, व शास्त्रीबुवांचे पुत्र गंगाधर वासुदेव अभ्यंकर यांची प्रामुख्यानें गणना होते. यांपैकीं साखरेबुवा व कान्हेरे यांनीं उत्तम प्रवचनें देऊन विद्याभिवृद्धीचें कार्य चालविलें. श्री. कान्हेरे यांनीं परदेशांतही अध्यापकाचें काम करून व व्याख्यानें देऊन वैदिक-तत्वज्ञानाचें स्वरूप व माहात्म्य परद्वीपस्थ लोकांना समजावून दिलें श्री. रड्डी, आगाशे, गोरे, कल्लोळकर, शिंत्रे व मुरगुटकर या विद्वान शास्त्र्यांनीं सरकारी अथवा खाजगी विद्यालयामध्यें संस्कृत विषयाचें अध्यापन केलें. माधवराव साठे व गंगाधरपंत अभ्यंकर यांनींही सरकारी विद्यालयांत व घरीं संस्कृतचें अध्यापन केलें यांच्या अध्यापनाचा विशेष म्हणजे गुरुमुखांतून शास्त्रीय विषयांचे स्पष्टीकरणाचा लाभ झाल्यामुळें व्याकरणशुद्ध लिहिणें व व्याकरणाच्या अनु-रोधानें कठिण श्लोकांचा योग्य अर्थ लावणें हीं कामें त्यांच्याकडून इतर पदवीधरांच्या मानानें ज्यास्त चांगल्या रीतीनें पार पडलीं. गुरुवर्य शास्त्रीबुवांच्या अध्यापनकौशल्याचा मुख्य विशेष म्हणजे किरात, माघ, नैषध, वगैरे काव्यें असोत अगर कुवलयानंद काव्यप्रकाश रसगंगाधर वगैरे अलंकारग्रंथ असोत किंवा आपोदेवीन्यायप्रकाशासारखे मीमांसाग्रंथ असोत अथवा शारीरभाष्य, अद्वैतसिद्धि, सर्वदर्शनसंग्रह यांसारखे दर्शनग्रंथ असोत त्यां सर्वांमध्यें विद्यार्थ्यांची योग्यता बघून, निरर्थक म्हणजे वाजवीपेक्षां ज्यास्त कांहींएक न सांगतां, मुद्देसूद विवेचन करून विद्यार्थ्यांना पाठ देणें हा होता. व्याकरणशास्त्राचें तर हातखंडाच काम; त्यामध्यें सिद्धान्तकौमुदी, परिभाषेन्दुशेखर, शब्देन्दुशेखर व महाभाष्य यांतील पाठ सांगतांना तर त्यांनीं आपण स्वतः पुस्तक कधींही पुढें धरलें नाहीं. पाङ्क्त अध्यापन करतां करतांच ग्रंथाचा रहस्यार्थ सांगणें हा त्यांच्या अध्यापनाचा विशेष असे. त्यांचेपाशीं अध्ययन केलेले शंकरशास्त्री मारुलकर, गणेशशास्त्री गोडबोले, दिगंबर-शास्त्री जोशी, भगवान्‌शास्त्री धारुरकर, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव वगैरे नाणावलेले विद्वान् आज

त्यांच्या चतुरस्र विद्वत्तेची, पांडित्याची व निःसंदिग्ध रीतीनें अर्थबोध करून देण्याच्या हातोटीची साक्ष देत आहेत व त्यांची अध्यापनपरंपरा पुढें चालवीत आहेत. त्यांचे एक परमशिष्य वे. शा. सं. दिगंबरशास्त्री जोशी ( रत्नागिरी पाठशाळेचे माजी प्रधानाध्यापक व सध्यां विद्याशंकर-भारती नांव धारण करणारे चतुर्थाश्रमस्थ संकेश्वरपीठावरील अधिकृत-शिष्य-शंकराचार्य) हे वेळोवेळीं पाठाचे वेळीं आपण केलेलीं टिप्पणें ग्रंथाच्या पङ्क्तीच्या अर्थाबद्दल संशय आल्यास अत्यंत उपयुक्त होतात असें मोठ्या अभिमानानें सांगत असतात.

## ८२. गणेशशास्त्री गोडबोले यांचा अल्प परिचय.

गणेशशास्त्री गोडबोले हे रामशास्त्री गोडबोले यांचे ज्येष्ठ चिरंजीव. त्यांचा जन्म संगम-माहुली येथें इ. स. १८७८ सालीं झाला. कांहीं वर्षें सातारा येथें वडिलांचेजवळ अध्ययन करून गणेशशास्त्री हे पुणें येथें गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेजवळ अध्ययनाकरितां राहिले. व्याकरण व न्याय या दोन शास्त्रांचें अध्ययन संपूर्ण झाल्यावर त्यांनीं संस्कृतपाठशाळेंतच अध्यापक म्हणून काम करण्यास सुरवात केली व शास्त्रीबुवांच्या नंतर ते पाठशाळेंत मुख्याध्यापक म्हणून राहिले. त्यांनीं अध्यापनाचें काम सतत ३९ वर्षें (१९१३–१९५२) केलें. गणेशशास्त्री यांनीं गुरुसेवा उत्तम प्रकारें बजावली. सभा व इतर प्रसंगीं परगांवीं जाणें झाल्यास ते शास्त्रीबुवांचे बरोबर नेहमीं जात असत. व्यावहारिक बाबतींत शास्त्रीबुवा त्यांचा विचार अनेक वेळां घेत असत. शरीरप्रकृतीनें ते आपल्या वडिलांप्रमाणें सुदृढ व निरोगी होते. त्यांची प्रवृत्ति अत्यंत धार्मिक असून ते रोज कांहीं वेळ नियमितपणें व्रतानुष्ठानांत घालवीत. त्यांची ग्रंथोपस्थिति उत्तम होती. व्याकरणांतील व न्यायांतील कांहीं विषय त्यांना विचारला असतां त्यासंबंधीं कोणत्या ग्रंथांत कोठें विवेचन केलें आहे तें ते लागलीच सांगत. अनेक वेळां लेखकानें अशा बाबतींत पृच्छा केली असतां ते दोन चार तासांत त्या विषयाचें विवेचन ज्या ठिकाणीं केलें आहे ते ग्रंथ घेऊन येत व तीं स्थळें पहावयास सांगत. अध्ययनाचें व अध्यापनाचें त्यांना एक प्रकारचें व्यसनच होतें. दिवसभर ते पाठशाळेंतच बसत असत व शिष्यगणांच्या सवडीप्रमाणें ते त्यांना केव्हांही पाठ देत असत. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, गणेशशास्त्री शेंडे, नारायणशास्त्री गुर्जर, मोरेश्वरशास्त्री नवरे वगैरे अनेक शिष्यांनीं त्यांचेजवळ शास्त्राध्ययन केलें. बी. ए. व एम. ए. या परीक्षांचा अभ्यास करणाऱ्या अनेक बुद्धिमान विद्यार्थ्यांनीं व शाळेंतील शिक्षकांनीं व्याकरण, न्याय व साहित्य या शास्त्रांतील निवडक ग्रंथांचें अध्ययन त्यांचेपाशीं केलें व त्यांच्या विद्वत्तेचा फायदा प्राध्यापक डॉ. प. ल. वैद्य व वसंतराव परांजपे यांच्या सारख्या अनेक पदवीधरांनीं घेतला. गणेशशास्त्री गोडबोले व शंकरशास्त्री मारुलकर यांनीं पुणें येथें, दिगंबरशास्त्री काशीकर यांनीं रत्नागिरी येथें, व भगवानशास्त्री धारुरकर यांनीं पंढरपूर येथें, आपलें परंपरागत आलेलें अध्यापनाचें कार्य उत्तम प्रकारें चालविलेलें पाहून गुरुवर्य वासु-देवशास्त्री हे आपल्या मनाला झालेलें समाधान नेहमीं व्यक्त करीत असत.

## ८३. विद्वद्रत्न शंकरशास्त्री मारुलकर यांचा अल्प परिचय.

शंकरशास्त्री यांचा जन्म इ. स. १८७८ सालीं झाला. त्यांचें प्रारंभिक अध्ययन त्यांचे वडील बंधु नरहरशास्त्री यांजकडे झालें व त्यानंतर ते व्याकरणशास्त्राच्या अध्ययना-करितां विद्वद्वर्य रामशास्त्री गोडबोले यांचेपाशीं जाऊन राहिले. गुरुजींपाशीं पंधरा वर्षें राहून

त्यांनीं व्याकरण, मीमांसा व धर्मशास्त्र यांचें साधारणपणें संपूर्ण अध्ययन केलें. त्याच वेळीं आकस्मिक त्यांच्या प्रकृतींत बराच बिघाड झाला. लहानपणापासूनच त्यांची धार्मिक प्रवृत्ति असल्यामुळें व स्नानसंध्यादि आह्निक कृत्यें व व्रतानुष्ठानें यांमध्यें ते निरत असल्यामुळें क्षेत्र औदुंबर येथें जाऊन ईश्वरोपासनेंत त्यांनीं दोन वर्षे घालविलीं व शरीरस्वास्थ्य मिळविलें. परंतु त्याबरोबरच विरक्त वृत्तीनें राहून फक्त उपजीविकेपुरती द्रव्यप्राप्ति होण्यास जरूर तेवढाच व्यवसाय करून बाकीचा वेळ अध्ययन व अध्यापन यांत घालविण्याचा त्यांनीं निश्चय केला. ते पुणें येथें गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेकडे गेले व तेथें उच्च ग्रंथांचे अध्ययनास त्यांनीं सुरुवात केली. लवकरच त्यांची आनन्दाश्रम संस्थेमध्यें मुख्य शास्त्री म्हणून नेमणूक झाली. संस्थेतर्फे प्रकाशित होणाऱ्या ग्रंथांचें संशोधन करण्यांत आवश्यक तेवढा वेळ खर्च करून बाकीचा सर्व काल ते संस्कृतपाठशाळेंत संस्थेकडून कांहींही वेतन न घेतां अध्यापनाचे कार्यांत गुरुजींना मदत करण्यांत घालवीत. कांहीं वर्षें ते संस्थान भोर येथें श्रीमंतांच्या विनंतीवरून व आग्रहावरून राजपंडित म्हणून राहिले. श्रीमंतांनीं त्यांचेविषयीं गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेजवळ प्रशंसोद्गार काढले व त्यांनीं आपलें सांनिध्य सोडूं नये असें म्हटलें तरी भोर येथें अध्ययनाध्यापनकार्य शक्य नसल्यामुळें शंकरशास्त्री यांनीं पुणें येथें परत येण्याची इच्छा दर्शविली व गुरुजींनीं पुणें येथें परत येण्यास त्यांना संमति दिली. पुणें येथें परत आल्यावर पुन्हां ते आनंदाश्रमांत काम करूं लागले. शास्त्रीबुवांचे जवळ त्यांनीं व्याकरणशास्त्रांतील अर्थग्रंथ व न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र यांतील महत्त्वाचे ग्रंथ यांचें पाङ्क्त अध्ययन करून त्यांत पारंगतता मिळविली. धर्मशास्त्राला आवश्यक म्हणून ज्योतिष-शास्त्राचेंही त्यांनीं अध्ययन केलें. सुमारें पंचवीस वर्षांपूर्वीं इ. स. १९२९ सालीं पुण्यामध्यें गीर्वाणमहाविद्यालय स्थापन झालें त्या वेळीं मुख्याध्यापक म्हणून त्यांची तेथें नेमणूक झाली. व तेथेंही त्यांनीं उत्तम शिष्य तयार केले. आपले शिष्य महेश्वरशास्त्री जोशी हे अध्यापक म्हणून काम करण्यास योग्य झाले हें पाहून शंकरशास्त्री यांनीं इ. स. १९३५ सालीं महेश्वरशास्त्री यांना अध्यापक-पद दिलें व त्यानंतर स्वतः विनावेतन अध्यापनाचें काम चालवून विद्यालयावर देखरेख ठेवण्याचें काम ते आजपर्यंत करीत आहेत. गेल्या वर्षीं त्यांचे परमनिष्ठ गुरुबंधू गणेशशास्त्री हे निवर्तल्यानंतर संस्थेच्या चालकांची विनंति मान्य करून ते संस्कृतपाठशाळेंत मुख्याध्यापक म्हणून काम करीत आहेत. कांहीं दिवसांपूर्वीं त्यांना पंचाहत्तरावें वर्ष लागल्याबद्दल आनन्द व्यक्त करून विद्याप्रेमी व्यक्तींनीं व संस्थांनीं त्यांना मानपत्र दिलें व त्यांचा सन्मान करून थैली अर्पण केली व योग्य प्रशंसोद्गार काढले. श्रीजगद्गुरु शंकराचार्य संकेश्वरमठ यांनींही त्यांचा गौरव करून त्यांना 'विद्वद्रत्न' ही पदवी दिली. गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांना त्यांच्या व्याकरणमहाभाष्यानुवादाच्या कामीं शंकर-शास्त्री यांची बहुमोल मदत झाली. विद्वद्रत्न शंकरशास्त्री यांनीं शास्त्रीबुवांनंतर त्यांचें अध्यापन-कार्य उत्तम रीतीनें चालविलें आहे. त्यांनीं वैयाकरणभूषणसार, दत्तकमीमांसा व दत्तकचन्द्रिका या ग्रंथांवर विद्वत्तापूर्ण टीका लिहिल्या आहेत.

### ८४. दिगंबरशास्त्री जोशी काशीकर यांचा अल्प परिचय.

दिगंबरशास्त्री हे मूळचे कोळेंनरसिंगपूर येथील राहणारे. कांहीं दिवस सातारा येथें विद्वद्वर्य रामशास्त्री यांचे जवळ अध्ययन करून रामशास्त्री यांचे बरोबरच ते पुण्यास आले व पुण्यांत गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेजवळ त्यांनीं आपलें अध्ययन पुरें केलें. व्याकरणशास्त्राचें अध्ययन

करतेवेळीं त्यांनीं अष्टाध्यायी, सिद्धान्तकौमुदी वगैरे सर्व ग्रंथ मुखोद्गत केले. शास्त्रीबुवांचेजवळ त्यांनीं न्यायशास्त्र, अलंकारशास्त्र, धर्मशास्त्र, मीमांसाशास्त्र व वेदान्तशास्त्र यांतील मुख्य मुख्य ग्रंथांचें पाङ्क्त अध्ययन केलें. अध्ययन करतेवेळीं त्यांनीं कठीण पङ्क्तींचें स्पष्टीकरण गुरुमुखां-तून ऐकल्याबरोबर त्यांचें टांचण करून ठेवलें आहे. अशा टाचणांनीं त्यांच्या चाळीस वह्या भरल्या आहेत. त्या आज जर छापल्या गेल्या तर त्या त्या ग्रंथांवर मार्मिक टिप्पण्या आज छापल्या जातील. कांहींही शंका उपस्थित झाल्यास वहीमधील मजकूर वाचून गुरुवर्य शास्त्री-बुवांनीं असा अर्थ सांगितला होता म्हणून ते छातीठोकपणानें सांगतात. आधुनिक चिकित्सा-पद्धतीनें व विवेचनपद्धतीनें कोणीं निराळा अर्थ सांगितल्यास किंवा जुन्या ग्रंथकारांचा येथें प्रमाद आहे असें म्हटल्यास त्यांना तें मुळींच खपत नाहीं. दिव्यदृष्टि असलेल्या जुन्या ऋषींच्या हातून चुकीचें विधान कधींही व्हावयाचें नाहीं, आपणाला निराळा अर्थ दिसतो त्याला कारण आपलें अपूर्ण अध्ययन अशी त्यांची दृढ निष्ठा आहे. त्यांनीं अध्ययन चालू असतांनाच शास्त्री-बुवांना त्यांच्या ग्रंथलेखनाचे तसेंच ग्रंथसंपादनाचे कामांत उत्तम मदत केली. न्यायकोशाच्या सुधा-रून वाढविलेल्या प्रस्तुत आवृत्तीचे बाबतींत शास्त्रीबुवांना त्यांची बहुमोल मदत झाली. रत्नागिरी येथील संस्कृतपाठशाळेंत मुख्याध्यापकाचें काम त्यांनीं तीस वर्षें केलें व बाळकृष्णशास्त्री हर्डीकर व पुरुषोत्तमशास्त्री फडके यांसारखे उत्तम विद्वान शिष्य निर्माण केले. हल्लीं बडोदा येथें संस्कृतचे प्राध्यापक असलेले डॉ. भावे यांनीं व्याकरणशास्त्राच्या मुख्य मुख्य ग्रंथांचें अध्ययन त्यांचेजवळ केलें. अनेक प्रसंगीं आलेल्या शंकांचें अधिकारयुक्त वाणीनें निराकरण करून त्यांनीं दिलेले निर्णय जनतेनें मान्य केले आहेत. अध्यापनकार्य अखंड तीन तपें करून पत्नी निवर्तल्यानंतर घरांतील सर्व वस्तू मुलींचे स्वाधीन करून त्यांनीं तीन वर्षांपूर्वी चतुर्थाश्रम स्वीकारला व दीक्षा-गुरु वृद्ध-स्वामी शंकराचार्य संकेश्वरपीठ यांचे अधिकृत शिष्य म्हणून अधिकारनिवृत्त गुरु-स्वामींच्या आज्ञेनें ते संकेश्वर येथें 'विद्याशंकरभारती' या उपाधीनें युक्त संकेश्वर पीठावर अधिष्ठित आहेत. रत्नागिरी येथील पाठशाळेंत हल्लीं त्यांचे शिष्य पुरुषोत्तमशास्त्री फडके हे गुरुजींच्या सारखेच निरलसपणानें अध्यापनकार्य चालवीत आहेत.

## ८५. धर्मप्राण भगवानशास्त्री धारुरकर यांचा अल्प परिचय.

भगवानशास्त्री यांचा जन्म इ. स. १८९५ मध्यें झाला. पंढरपूर येथें आपले वडील विठ्ठलशास्त्री यांचेजवळ व्युत्पत्ति व व्याकरणशास्त्र यांचा साधारण अभ्यास करून वयाचे सोळावे वर्षी इ. स. १९११ सालीं ते पुणें येथें व्याकरण व इतर शास्त्रांचें संपूर्ण अध्ययन करण्याकरितां गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेकडे गेले. तेथें संस्कृतपाठशाळेंत शास्त्रीबुवांचे जवळ त्यांनीं सर्व शास्त्रांतील उच्च ग्रंथांचें अध्ययन केलें व वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या व्याकरण, वेदान्त, धर्मशास्त्र, मीमांसा व व्युत्पत्ति या विषयांच्या परीक्षांमध्यें उच्च श्रेणीमध्यें उत्तीर्ण होऊन विशिष्ट प्रावीण्य दाखविल्यामुळें वेदान्तविषयांत 'कोविद' व आयुर्वेद, काव्य व धर्मशास्त्र यांमध्यें 'चूडामणि' ही पदवी मिळविली व काशी येथील 'साहित्यशास्त्री' याही पदवीचा लाभ करून घेतला. कांहीं दिवस त्यांनीं हायस्कूलमध्यें शिक्षक म्हणून काम केलें; परंतु शास्त्राध्यापन करणें हेंच आपलें खरें कर्तव्य आहे हें मनांत आणून पंढरपूर येथें वेद व शास्त्रें यांचें त्यांनीं आपल्या घरीं असलेल्या पाठशाळेंत उत्तम अध्यापन केलें व अनेक विद्यार्थ्यांना निरनिराळ्या शास्त्रांत निष्णात केलें. पंढरपूर येथें त्यांनीं वेदशास्त्रांचा उत्कर्ष व्हावा या हेतूनें 'गर्गे-विद्यापीठ' स्थापन केलें व तेथें निरनिराळ्या शास्त्रांतील अभ्यास केलेल्या विद्यार्थ्यांची परीक्षा घेण्यास सुरवात केली.

मद्रास येथें भरलेल्या अखिल भारतीय विद्वत्परिषदेंत त्यांना मध्यस्थ नेमिलें होतें. अस्पृश्यतेला शास्त्राधार आहे किंवा नाहीं या विषयीं इ. स. १९३२ सालीं महात्मा गांधी यांचे देखत चर्चा झाली तीमध्यें डॉ. भगवानदास, आचार्य ध्रुव, रा. ब. चिंतामणराव वैद्य, पंडित नारायणशास्त्री मराठे, पंडित लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्याशीं वाद करण्यांत त्यांनीं मोठें नैपुण्य दाखविलें. त्यांनी आपले विचार 'अस्पृश्यतामीमांसाखण्डन' या निबंधांत संग्रथित केले आहेत. धर्मशास्त्रोक्त आचार व संस्कार यांसंबंधीं ते जुन्या मताचे पूर्ण पुरस्कर्ते आहेत व अनेक प्रसंगीं परिवर्तनवादी पंडितांशीं वादविवाद करून आपलें वादनैपुण्य त्यांनीं दाखविलें आहे.

## ८६. व्याकरणकोविद गणेशशास्त्री शेंडये यांचा अल्प परिचय.

गणेशशास्त्री शेंडये यांचा जन्म इ. स. १८९८सालीं रत्नागिरी जिल्ह्यांत गणपतीपुळें येथें झाला. वैयाकरणांची कोकणांत दोन प्रसिद्ध घराणीं आहेत. एक आगाशे यांचें व दुसरें शेंड्ये यांचें. शेंडये यांचे घराण्यांत सात पिढ्या व्याकरणशास्त्राध्ययन चालू आहे. गणेशशास्त्री यांचे पितामह गंगाधरशास्त्री आणि त्यांचे बंधू हरिशास्त्री यांनीं सातारा येथें विद्वद्वर्य भास्करशास्त्री यांचेजवळ व्याकरणशास्त्राचें संपूर्ण अध्ययन केलें. तसेंच गणेशशास्त्री यांचे वडील वासुदेवशास्त्री यांनी पुणें येथें सदाशिवशास्त्री थत्ते यांचेकडे व्याकरणशास्त्राचें संपूर्ण अध्ययन केलें. गणेशशास्त्री यांनीं पुणें येथें गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेजवळ व्याकरणशास्त्राचें संपूर्ण अध्ययन केलें व वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या व्याकरणशास्त्राच्या तीनही परीक्षा देऊन 'व्याकरणकोविद' ही पदवी मिळविली. आयुर्वेदाचाही अभ्यास त्यांनीं वै. भू. गणेशशास्त्री जोशी यांचेजवळ केला व हल्लीं ते रुग्णपरिचर्याही करीत असतात. ज्योतिषशास्त्राचेंही त्यांनीं अध्ययन केलें आहे. पुण्यामध्यें गीर्वाणवाग्वर्धिनी सभा काढून कित्येक वर्षें दर पंधरवड्यास संस्कृतामध्यें व्याख्यान घडवून आणून अनेक वक्त्यांना व उपवक्त्यांना संस्कृतामध्यें भाषण करण्यास लावून त्यांनीं संस्कृतभाषा ही बोधभाषाच नव्हे तर बोलभाषाही होऊं शकते हें सप्रमाण सिद्ध केलें आहे. ते स्वतः संस्कृतमध्यें तासचे तास कोणत्याही लौकिक विषयावरसुद्धां अस्खलित बोलूं शकतात. इ. स. १९३२ सालापासून संस्कृतपाठशाळेंत ते अध्यापकाचें काम करीत आहेत. त्यांचे भ्रात्रीय लक्ष्मणशास्त्री यांनींही संस्कृतपाठशाळेंत व्याकरणशास्त्राचें अध्ययन गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांजकडे केलें आहे व त्यांचे पुत्र माधवशास्त्री यांनीं आयुर्वेदाचें अध्ययन करून रुग्णपरिचर्या चालविली आहे.

## ८७. विद्यानिधि म. म. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचा अल्प परिचय.

विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री यांनीं काव्य, साहित्य व व्याकरण यांचें प्रारंभिक अध्ययन संस्कृतपाठशाळेमध्यें गणेशशास्त्री गोडबोले यांचेजवळ केलें व त्यानंतर उच्च व्याकरण ग्रंथांचें अध्ययन गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेजवळ केलें. शास्त्राध्ययन पूर्ण झाल्यानंतर सिद्धेश्वरशास्त्री यांचा कल अध्यापनापेक्षां ग्रंथनिर्मितीकडे ज्यास्त दिसून आला. मराठी ज्ञानकोशाचे संपादनांत त्यांनीं चांगलें काम केलें व त्यानंतर चरित्रकोशांचेंही त्यांनीं संपादन केलें. समग्र ऋग्वेदाचें मराठींत भाषांतर हें तर त्यांचें फारच महत्त्वाचें प्रकाशन आहे. याशिवाय त्यांनीं आणि म. म. पाठकशास्त्री यांनीं तयार केलेले अष्टाध्यायी वगैरे ग्रंथांची शब्दसूची व महाभाष्याची शब्दसूची हे उपयुक्त ग्रंथ भांडारकर इन्स्टिट्यूटतर्फे प्रकाशित झाले आहेत. त्यांनीं अनेक निबंधही लिहिले आहेत. हल्लीं ते डेक्कन कॉलेज संशोधन संस्थेंत संस्कृत कोशाचें काम करीत आहेत. त्यांचें ग्रंथ-

संपादनाचें व ग्रंथलेखनाचें कार्य लक्षांत घेऊन त्यांना गेल्या वर्षी श्रीजगद्गुरु शंकराचार्य गोवर्धन पीठ यांनीं 'महामहोपाध्याय' ही पदवी दिली. धार्मिक व सामाजिक बाबतींत ते प्रागतिक मताचे असले तरी शास्त्रीबुवांचे विषयीं त्यांचा आदर व गुरुभक्ति किंचितही कमी झाली नाहीं व त्यांचेविषयीं असलेल्या शास्त्रीबोवांच्याही शिष्यप्रेमांत कधीं अंतर दिसून आलें नाहीं.

## ८८. महेश्वरशास्त्री जोशी यांचा अल्प परिचय.

महेश्वरशास्त्री जोशी यांचा जन्म इ. स. १९०७ सालीं झाला. त्यांचे वडील पिलंभट्ट हे कोकणांत प्रसिद्ध दशग्रन्थी वैदिक होते; महेश्वरशास्त्री यांनी वयाच्या सोळावे वर्षापर्यंत वडिलाचे जवळ वेदाध्ययन केलें, व त्यानंतर उदरनिर्वाहाकरितां ते आपल्या बंधूंचे जवळ पुणें येथें येऊन राहिले. पुणें येथें आल्यावर त्यांना संस्कृतशिक्षणाची फार इच्छा झाली. त्यांनीं व्याकरण, न्याय, मीमांसा व वेदान्त या शास्त्रांचें अध्ययन शंकरशास्त्री मारुलकर, गणेशशास्त्री गोडबोले, व नारायणशास्त्री वाडीकर यांचेजवळ केलें. धर्मशास्त्र व व्याकरणशास्त्र यांतील उच्च ग्रंथांचें अध्ययन गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेपाशीं केलें. वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या उच्च परीक्षांमध्यें प्रथम श्रेणींत उत्तीर्ण होऊन 'व्याकरणचूडामणि' व धर्मशास्त्रचूडामणि' या पदवींचा त्यांना लाभ झाला. इ. स. १९३६ सालीं ते गीर्वाणमहाविद्यालयांत मुख्याध्यापक झाले व तेथें त्यांनीं व्याकरण, धर्म, मीमांसा, न्याय व वेदान्त या शास्त्रांचें अध्यापन विद्यार्थ्यांच्या सवडीप्रमाणें कालमर्यादेकडेच नव्हे तर शरीररक्षणाकडेही दुर्लक्ष करून अखंड चालविलें. दुर्दैवानें जलोदरासारख्या असाध्य रोगानें त्यांना पछाडलें व त्यांतच त्यांचें १९४७ सालीं देहावसान झालें. त्यांनीं अनेक शिष्य तयार केले. त्यांपैकीं शिवरामशास्त्री जोशी हे गीर्वाणमहाविद्यालयांत त्यांचेनंतर अध्यापनकार्य करीत आहेत. शिवरामशास्त्री यांनीं महाविद्यालयांतील उच्च परीक्षेंत उत्तीर्ण होऊन आचार्य पदवी मिळविली आहे व वेदशास्त्रोत्तेजक सभेचीही व्याकरणचूडामणि ही पदवी मिळविली आहे.

## ८९. लेखकाचा ( म. म. काशीनाथ वासुदेव अभ्यंकर यांचा ) अल्प परिचय.

लेखकाचा जन्म इ. स. १८९० सालीं सातारा मुक्कामीं झाला. त्यानंतर एक वर्षांतच पुण्यांत आल्यावर सर्व शिक्षण पुण्यांतच झालें. उपनयनापूर्वींच रूपावलि, अमरकोश व काव्यें यांचें शिक्षण शास्त्रीबुवांच्या शिष्यवर्गाकडून, तसेंच अंकगणित, भाषा वगैरे विषयांचें शिक्षण घरींच शास्त्रीबुवांचेकडून न कळतां सहजगत्याच झालें. उपनयनानंतर व्याकरणशास्त्राचा पहिला धडा विद्वद्वर्य रामशास्त्री यांनीं तोंडींच सिद्धान्तकौमुदींतील कांहीं भाग पढवून दिला. त्यानंतर संस्कृतपाठशाळेंत इ. स. १९०६ पर्यंत सर्व सिद्धान्तकौमुदी, मनोरमाशब्दरत्नाचा थोडा भाग व काव्यें यांचें अध्ययन उपगुरुजींजवळ झालें. मॅट्रिक्युलेशनपर्यंत इंग्रजी अध्ययन न्यू इंग्लिशस्कूल, पुणें येथें झालें. त्यानंतर युनिव्हर्सिटीच्या एम्. ए. पदवीपरीक्षेपर्यंतचें सर्व शिक्षण फर्ग्युसन कॉलेजमध्यें झालें. युनिव्हर्सिटीच्या सर्व परीक्षांमध्यें संस्कृत विषयांत प्रथम क्रमाङ्क मिळून संस्कृत विषयाकरितां असलेल्या सर्व शिष्यवृत्त्या व पारितोषिकें मिळालीं. कॉलेजचें शिक्षण चालू असतांना घरींच गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेजवळ व्याकरण, न्याय, धर्मशास्त्र, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या शास्त्रांतील उच्च ग्रंथांचें अध्ययन झालें आणि इ. स. १९१२ सालीं एम्. ए.

परीक्षेला बसण्यापूर्वींच गुजरात कॉलेज, अहमदाबाद येथें संस्कृताध्यापक म्हणून नेमणूक झाली. गुजरात कॉलेज येथील संस्कृतचे मुख्य अध्यापक आनंदशंकर ध्रुव यांनीं लेखकाविषयीं विद्यार्थ्यांना 'तरुण शास्त्री तुम्हांस शिकवावयास मिळाला आहे त्याच्या विद्वत्तेचा पूर्ण लाभ घ्या ' असा उपदेश केला. आचार्य ध्रुव इ.स.१९१९ सालीं काशी हिंदुविश्वविद्यालयांत उपकुलगुरु झाल्यानंतर त्यांचे जागीं संस्कृतच्या मुख्याध्यापकपदावर लेखकाची नेमणूक झाली. त्या जागीं सतत २६ वर्षें अध्यापन करून १९४५ मध्यें सेवानिवृत्तीनंतर गुजरात विद्यासभेच्या अध्यापन संस्थेंत सन्मान्य संस्कृत-प्राध्यापक म्हणून संस्कृत विषयाच्या एम्. ए. व पीएच् डी. या उच्च पदवींकरितां अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना अध्यापनाचें व मार्गदर्शनाचें लेखकाचें काम चालू आहे. सेवानिवृत्तीचे वेळीं गुजरात कॉलेजमध्यें लेखकानें प्रदीर्घकाल ( ३२ वर्षे ) केलेल्या अध्यापनकार्याचा गौरव करून विद्यार्थिवर्गानें लेखकाला मानपत्र अर्पण केलें व आठवण रहावी म्हणून कॉलेजच्या सभागृहांत तैलचित्र ठेविलें. अर्धमागधी विषयाच्या शिक्षणाचा उपक्रम करून मुंबई विश्व-विद्यालयानें १९२३ सालीं त्या विषयांत प्रथमच एम ए. ची परीक्षा चालू केली त्या वेळीं लेखकाला परीक्षक म्हणून नेमण्यांत आलें व त्यानंतर गुजराथ कॉलेजमध्यें त्या विषयाच्या अध्यापनाचा लेखकानें उपक्रम केला व अध्यापनाचें काम अंगावर घेतलें. व्याकरणशास्त्राच्या अध्ययनानें बुद्धीमध्यें एक प्रकारची तीव्रता येते असें गुजराथ कॉलेजच्या प्रिन्सिपाल साहेबांनीं सर आशुतोष मुखर्जी यांचे तोंडून ऐकलें होतें व ते ( प्रिन्सिपाल ) प्रसंगविशेषीं अनुभवांत आलेल्या लेखकाच्या बुद्धीच्या सूक्ष्मतेचें कौतुक करून त्याला ' पॉणिनि ' म्हणत. टिळक-महाराष्ट्र विद्यापीठ संस्कृत मंडळाचे अध्यक्ष, अहमदाबाद गुजरात विद्यासभेच्या संस्कृत विद्या-मंडळाचे अध्यक्ष तसेंच पुणें युनिव्हर्सिटीच्या कोर्टावर सरकारतर्फे सभासद म्हणून लेखकाची नियुक्ति झाली आहे. गेल्या वर्षीं गोवर्धनपीठाचे श्रीमच्छंकराचार्य ( योगेश्वरानन्द ) यांचेकडून लेखकाला ' महामहोपाध्याय ' पदवी अर्पण करण्यांत आली. व्याकरणमहाभाष्यानुवादाचें संपादन व प्रस्तावनालेखन या कार्याबरोबरच लेखकाचें परिभाषेन्दुशेखराच्या द्वितीयावृत्तीच्या व बृहद्यवनजातकाच्या संस्करणाचें व संपादनाचें कार्य चालू आहे.

## १०. लेखकाचें शास्त्राध्ययन.

विद्वद्वर्य रामशास्त्री गोडबोले यांचेकडून लेखकाला व्याकरणशास्त्राचा पहिला धडा मिळाला. त्यानंतर त्याचें सिद्धान्तकौमुदीचें अध्ययन संस्कृतपाठशाळेंतील उपगुरूंचे जवळ झालें. व व्याकरणांतील परिभाषेन्दुशेखर व महाभाष्य यांचें अध्ययन गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचेपाशीं झालें; व तें चालू असतांनाच इतर शास्त्रांतील मुख्य मुख्य ग्रंथ म्हणजे आपोदेवीन्यायप्रकाश, श्रीभाष्य, सिद्धान्तबिन्दु, काव्यप्रकाश, मिताक्षरा, इत्यादि ग्रंथही पाङ्क्त पढण्यांत आले. संस्कृतपाठशाळेंत व्याकरणग्रंथ मुखोद्गत करण्याचा प्रघात असे. इतर शास्त्रांचें अध्यापन करते-वेळीं शास्त्रीबुवा दरएक पङ्क्तीचा अर्थ सांगून टीकेंतील मुद्दे सांगून प्रतिपाद्य विषयाचें विवरण करीत असत. व्याकरणशास्त्राच्या अध्ययनाबरोबर इतर शास्त्रांचाही योग्य परिचय होणें आव-श्यक आहे असें ते म्हणत असत आणि काव्यप्रकाश शिकवितांना दररोज माघ किंवा नैषध यांतील दोन चार श्लोक विद्यार्थ्यांना देऊन टीका वाचल्याशिवाय शास्त्रीय व्युत्पत्तीचे जोरावर त्यांचा अर्थ कसा लावावा तें समजावून देत असत आणि एकंदरींत पाहतां शास्त्रीबुवांनीं पाठशाळेंतील अध्यापनकार्याचें धोरण अशा तऱ्हेनें ठेविलें होतें कीं बारा वर्षें उत्तम रीतीनें व्याकरणशास्त्राचें

संपूर्ण अध्ययन करून विद्यार्थी जेव्हां बाहेर पडे तेव्हां इतर शास्त्रांतही त्याचा योग्य प्रवेश असल्यामुळें शाळांमध्यें, कॉलेजांमध्यें, समाजामध्यें, व सभांमध्येंही त्याची उपयुक्तता लोकांचे प्रत्ययास येत असे व त्याला उपजीविकेस अडचण पडत नसे. लेखकाला मात्र या पाठशाळेंतील चतुरस्त्र अध्ययनाबरोबर त्याचें उच्च युनिव्हर्सिटी शिक्षण चालू असल्यामुळें पाश्चात्य चिकित्सापद्धति व संशोधनपद्धति यांचें ज्ञान झालें व त्यामुळें उच्च शास्त्रीय ग्रंथ शिकवितांना त्याचेकडून प्रतिपाद्य विषयाचे ऐतिहासिक व तौलनिक दृष्टीनें विवेचन केलें जात असें. कठीण ग्रंथांची उत्तम रीतीनें फोड करून ग्रंथकर्त्याचा आभिप्राय स्पष्ट समजावून देण्याची हातोटी असलेल्या गुरुजींजवळ अध्ययन झाल्यानें लेखकाला निरनिराळे विषय व त्यावरील कठिण ग्रंथ वाचण्याची अभिरुचि उत्पन्न झाली व परीक्षक म्हणून किंवा अध्यापक म्हणून ते ते ग्रंथ वाचण्याची संधि आली असतां त्यांतील कठिण विषयही त्यानें शास्त्रीबुवांकडून समजावून घेतले. जैनदर्शन व मंत्रशास्त्र यांतील ग्रंथांचें अध्ययन लेखकानें शास्त्रीबुवांजवळ केलें व बौद्ध दर्शनावरील कांहीं पाली ग्रंथांचें अध्ययनही विद्वद्वर्य धर्मानन्द कोसंबी यांचेजवळ केलें. हें सर्व येथें वर्णन करण्याचा हेतु येवढाच कीं संस्कृत प्राध्यापकाला आचार्यांची खरी योग्यता येण्यास गुरुवर्य भांडारकर म्हणत त्याप्रमाणे व्याकरणशास्त्राच्या अध्ययनाची जरूर तर खरीच; पण त्याबरोबर श्रीभाष्यासारख्या भाष्यग्रंथांचें पूर्ण आकलन होण्यास इतर शास्त्रांच्याही अध्ययनाची जरूर तितकीच असते हें सांगणें हा होय.

## ९१. लेखकाचें अध्यापनकार्य.

लेखकाच्या अध्यापनकार्याला गुजरात कॉलेजमध्यें इ.स.१९१२ सालीं आरंभ झाला. प्रथमतः सहा सात वर्षें काव्य नाटकें व सुलभ शास्त्रीय ग्रंथ यांचें अध्यापन दीडशे ते दोनशे विद्यार्थी असलेल्या खालच्या वर्गांना व्याख्यानरूपानें करावें लागलें. हें कार्य करतांना दोन फायदे झाले: खालच्या वर्गांतील विद्यार्थ्यांच्या मानानें लेखकाचें ज्ञान कित्येक पटीनें ज्यास्त असल्यामुळें व त्याकरितां पूर्व तयारी किंवा ग्रंथावलोकन यांची फारशी गरज नसल्यामुळें पूर्ण आत्मविश्वासानें त्याला तें कार्य करतां आलें व इतर शास्त्रांच्या अध्ययनास भरपूर वेळ मिळाला. आत्मविश्वासानें कार्य करणारा शिक्षक कोठेंही अडखळत नाहीं व वक्तृत्व अंगीं नसलें तरी त्याचे जवळ भरपूर माहिती असल्यामुळें श्रोत्यांच्यावर त्याची छाप पडते. प्राचार्य ध्रुवांचे जागीं मुख्याध्यापक झाल्यानंतर लेखकाला पदवीपरीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थ्यांना तसेंच पदव्युत्तर उच्च पदवीकरितां अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना उच्च शास्त्रीय ग्रंथांचें अध्यापन करावें लागलें. या कामांतही जे ग्रंथ शिकवावयाचे त्यांवरील टिप्पण्या व भाषांतरें न वाचतां उच्च ग्रंथ वाचून आपलें ज्ञान वाढवून आत्मविश्वासानें अध्यापन करणें या शास्त्रीबुवांनीं दिलेल्या गुरुकिल्लीचा उपयोग लेखक करीत असे व विद्यार्थ्यांनीं स्वतः वाटल्यास टांचणें व भाषांतरें वाचून मतभेदाच्या स्थळाविषयीं लेखकाजवळ विचारविनिमय करून खुलासा करून घ्यावा असें सांगत असे. वर्गामध्यें व्याख्यानाचे वेळीं जरी शिकवावयाच्या विषयाचें पूर्वावलोकन पूर्ण केलें असलें तरी व्याख्यानाचीं टांचणें करण्याचा किंवा स्वतः टिप्पण्या लिहून आणून विद्यार्थ्यांना त्या लिहून घ्यावयास सांगण्याचा लेखकाचा कधींही परिपाठ नसे. त्यामुळें विषयप्रतिपादन करतांना स्वयंस्फूर्तीनें पूर्वी न योजिलेलींही कित्येक उपयुक्त स्पष्टीकरणें व विवेचनें विद्यार्थ्यांना त्याला सांगतां येत असत. या बाबतींत 'अध्यापक हा जन्मतःच अध्यापक असावा लागतो तो तयार करून होत नसतो' असें सहाध्यापकाशीं उच्च शास्त्रीय अध्यापना-

विषयीं चर्चा करतांना लेखकानें काढलेल्या उद्गारांबद्दल कॉलेजच्या प्रिन्सिपाल साहेबांनीं आपली पूर्ण संमति असलेली सांगितल्याचें लेखकाला स्मरतें. लेखकाचेपाशीं उच्च शास्त्रीय ग्रंथांचें अध्ययन करून हल्लीं कॉलेजांमध्यें व इतरत्र ठिकाणीं अनेक पदवीधर विद्वान अध्यापनाचें काम करीत आहेत. त्यांमध्यें प्रामुख्यानें प्राध्यापक डॉ. प्रतापराय मोदी (भावनगर), प्रा. कमळाशंकर त्रिवेदी, प्रा. विष्णुप्रसाद त्रिवेदी व प्रा. जसवंत परीख (सुरत) प्रा. रतिलाल त्रिवेदी, प्रा. अनूपराम भट्ट, प्रा. डॉ. प्रबोध पंडित, प्राध्यापक नागरदास बंभाणिया, डॉ. प्रा. वामनराव कुलकर्णी, विष्णुदेव पंडित व जयदेव शुक्ल हे आपआपल्या संस्थांमध्यें परंपरागत आलेलें अध्यापनाचें कार्य पुढें चालवीत आहेत.

## ९२. लेखकाची ग्रंथनिर्मिति.

गुजरात कॉलेजमध्यें अध्यापनाचें कार्य सुरू केल्यानंतर थोडक्याच कालांत खालच्या वर्गांकरितां नियोजित पुस्तकांवर टिप्पण्या लिहून विद्यार्थ्यांना उपयुक्त अशीं काव्यें व नाटकें संपादन करण्याचें काम लेखकानें सुरू केलें. व उत्तररामचरित, मुद्राराक्षस व स्वप्नवासवदत्त या तीन नाटकांचें टिप्पणीसहित प्रकाशन केलें. पण त्याचे संमाननीय गुरु प्राध्यापक पानशे यांनीं त्याला ‘ विषयाचें पूर्ण अध्ययन झाल्याशिवाय पुस्तकें लिहिणें योग्य नव्हे ’ असें सांगून अशा कामापासून परावृत्त केलें. त्यानंतर त्यानें स्वखुषीनें अंगीकारलेल्या अर्धमागधी ग्रंथाध्यापनाला आवश्यक म्हणून जैन आगमग्रन्थांचें अध्ययन करून कुम्मापुत्तचरिय, दसवेआलियसुत्त व विंशतिविंशतिका या तीन अर्धमागधी पुस्तकांचें तीं केवळ दुर्मिळ असल्यामुळेंच संशोधन करून संपादन केलें. त्यानंतर त्यानें कांहीं वर्षांनीं एका जैन मित्राच्या आग्रहावरून जैनमंत्रशास्त्रावरील ‘ भैरवपद्मावतीकल्प ’ या पुस्तकाचें संशोधन करून सटीक संपादन केलें. जैनांमध्ये या ग्रंथाचें संशोधन करण्याला योग्य असे कांहीं साधूच होते. पण साधूंनीं मंत्रशास्त्राचा अभ्यास करूं नये हा दण्डक असल्यामुळें या पुस्तकाचें संशोधन साधूंना करतां येईना हें या आग्रहाचें कारण होतें. शिवाय, या भैरवपद्मावतीकल्प पुस्तकाच्या टिप्पणीचें त्रुटित असें एकच हस्तलिखित होतें. तें शुद्ध करावयाचें होतें इतकेंच नव्हे तर कित्येक ठिकाणीं नष्ट झालेलीं अक्षरें व शब्दही घालून टिप्पणी तयार करणेंही आवश्यक होतें. त्यानंतर कांहीं वर्षांनीं एका फलज्योतिषाच्या अभ्यासू मित्राच्या विनंतीस मान देऊन लेखकानें जैमिनीच्या उपदेशसूत्र नांवाच्या फलज्योतिष ग्रंथावर संस्कृत टीका लिहून, व त्याला प्रस्तावना जोडून तो ग्रंथ संपादित केला. यांशिवाय अध्यापनाचें कार्य चालूं असतांनाच लेखकानें मधून मधून कांहीं लेखही लिहिले. त्यांमध्यें कौटिलीय अर्थशास्त्राचा काल, आचाराङ्गसूत्रांतील वैतालीय वृत्त, लघुभाष्याविषयीं विवेचन, भारतीय पंचागाविषयीं विचार, जैनपर्वतिथिविचार, ज्योतिषविषयक पुराव्यांवरून महाभारताचा कालनिर्णय, वैदिकनक्षत्रचक्रारम्भस्थान, बृहच्छब्दरत्न व लघुशब्दरत्न यांविषयीं विचार आणि कर्मधारय संज्ञेचें विवेचन हे लेख निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. यांशिवाय लेखकानें गुरुवर्य शास्त्रीबुवांनीं संपादित केलेल्या ‘ सिद्धान्तबिन्दु ’ व ‘श्रीभाष्य’ या ग्रंथांना प्रस्तावना लिहिली आणि सर्वदर्शनसंग्रहाला सूच्या तयार केल्या. लेखकानें महाभाष्याचें इंग्रजींत भाषांतर करण्यास कित्येक वर्षांपूर्वी सुरवात केली; परंतु कॉलेजमध्यें अध्यापनाचें काम चालूं असतां पुरेसा वेळ मिळेना म्हणून त्या कामांत फारशी प्रगति झाली नाहीं. मात्र प्रस्तुत महाभाष्याचे मराठी भाषांतराचे कामीं कांहीं मदत लेखकाकडून झाली. महाभाष्याचें इंग्रजींत भाषांतर करण्याचे दोघांतिघांनीं आजपर्यंत प्रयत्न केले; पण ग्रंथाचा विषय कठिण

असल्यामुळें म्हणा, किंवा कांहीं विघ्न आलें म्हणून म्हणा किंवा वेळ पुरेसा मिळाला नाहीं म्हणून म्हणा, आतांपर्यंत "केचिद् भग्नाः सुध्युपास्यप्रयोगे" या वैयाकरणकुलांमध्ये प्रसिद्ध असलेल्या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें सर्वांची प्रगति पांचसहा आन्हिकांपलीकडे झाली नाहीं. प्रस्तुत उपोद्घात लिहिल्यानंतर कित्येक वर्षांपूर्वी आरंभिलेलें इंग्रजी भाषांतर पुरे करण्याचा लेखकाचा मानस आहे.

गेल्या शेंदोनशें वर्षांतील विद्वानांचीं वर्णनें विषयान्तर करूनही येथें देण्याचें मुख्य प्रयोजन म्हणजे ज्या उच्च भारतीय संस्कृतीची हल्लीं मुक्त कंठानें स्तुति करण्यांत येते व ती जतन करणें अत्यंत आवश्यक आहे असें म्हटलें जातें ती भारतीय संस्कृति म्हणजे काय व ती आजपर्यंत कोणीं व कशी जतन केली तें कळावें हें होय. विद्या, शील व चारित्र्य यांवर आधारलेल्या या संस्कृतीचें स्वरूप केवळ व्याख्यानरूपानें केलेल्या तिच्या वर्णनावरून यथार्थ कळणें शक्य नाहीं. त्याप्रमाणेंच हल्लीं विश्वविद्यालयांनीं उच्च परीक्षांकरितां ठेवलेल्या 'प्राचीन भारतीय संस्कृति' या विषयाच्या अभ्यासक्रमांतील इंग्रजी किंवा प्रचलित भाषेंतील पुस्तकें वाचून किंवा परीक्षेंत उत्तीर्ण होऊनही तिचा बोध होणें कठीण आहे. त्याकरितां मूळ संस्कृत ग्रंथांचेंच अध्ययन करणें जरूर आहे. गाढ विद्वत्ता, निर्मल चारित्र्य व निःस्वार्थ शिष्य-प्रेम अंगीं असलेले गुरुजी तसेच आदरभाव, विनय व गुरुभक्ति या गुणांनीं युक्त असे शिष्य यांच्या अखंड परंपरेनें भारतांत शेंकडों वर्षें आपल्या संस्कृतीचें जतन केलें आहे. विद्याप्रेमी वाचकवर्गास वरील वर्णनावरून त्या संस्कृतीची साधारणतः कल्पना येईल व ते आपल्याकडून तिचें यथायोग्य रक्षण करतील अशी आशा आहे. शिवाय, भविष्यकालांत भावी पिढ्यांना आजच्या परिस्थितीचें ज्ञान व्हावें व त्यांनीं आपल्या कालाची आजच्या कालाशीं तुलना करून प्राचीन विद्या व संस्कृति यांच्या रक्षणाचे कामीं त्यांचे वेळीं किती प्रगति झाली आहे हें पहावें हाही हें वर्णन करण्यांत लेखकाचा एक हेतु आहे.

## गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांचें अध्यापनकार्य व ग्रंथनिर्मिति (९३–१००)

### ९३. फर्ग्युसन कॉलेजमध्यें अध्यापन.

फर्ग्युसन कॉलेजमध्यें शास्त्रीबुवांनीं १८९२ सालापासून १९२९ सालापर्यंत तीन तपें अध्यापनाचें काम केलें. १८९२ सालीं फर्ग्युसन कॉलेजला बी. ए. चें शिक्षण देण्यास परवानगी मिळाली. त्याच वेळीं दुर्दैवानें प्रसिद्ध विद्वान् वामनराव आपटे कालवश झाले. शास्त्रीबुवा त्या वेळीं पुण्यांत नुकतेच आले असले तरी संस्कृतज्ञांमध्यें त्यांची संस्कृत पंडित म्हणून ख्याति झाली होती. त्यामुळें न्यायमूर्ती रानडे यांच्या सल्ल्यानें नामदार गोपाळराव गोखले यांनीं त्यांची फर्ग्युसन कॉलेजमध्यें शास्त्री म्हणून नेमणूक केली. प्रथमतः त्यांना पगार महिना रु.४०मिळत होता. त्यानंतर तो रु. ५०, ६० व ७५ असा वाढत गेला व ते सेवानिवृत्त झाले त्या वेळीं त्यांना पगार रुपये ७५ व भत्ता रु. ३० मिळून १०५ रुपये महिना मिळत होते. सेवानिवृत्त झालां तरी आपण अध्यापकांना व उच्च परीक्षेचा अभ्यास करणाऱ्या शिष्यांना घरींच मदत करावी व आपलें वेतन रु.१०५चालू रहावें अशी आमची इच्छा आहे असें प्रिन्सिपाल व संस्कृत प्रोफेसर यांनीं सांगितलें असतां त्यांनीं 'अध्यापकांना व विद्यार्थ्यांना माझी मदत केव्हांही आहे पण संपूर्ण वेतन मात्र मी घेणार नाहीं' असें सांगितलें व कॉलेजच्या चालकांनीं आजीव प्राध्यापकांप्रमाणें त्यांना

निम्में वेतन पेनशन म्हणून दिलें. कॉलेजमध्यें वरच्या वर्गांतील विद्यार्थ्यांना काव्यप्रकाश, शारीरभाष्य, श्रीभाष्य, मीमांसान्यायप्रकाश, सिद्धांतबिन्दु इत्यादि ग्रंथांचें जितक्या उत्तम रीतीनें आपल्या खणखणीत आवाजांत स्पष्ट व मार्मिक रीतीनें विद्यार्थ्यांची योग्यता जाणून त्यांनीं अध्यापन केलें तितक्याच उत्तम रीतीनें खालच्या वर्गांतील विद्यार्थ्यांना कादंबरी, तर्कसंग्रह वगैरे ग्रंथ त्यांनीं शिकविले. त्यांच्या कॉलेजच्या व्याख्यानपद्धतींत खडा आवाज, निःसंदिग्ध प्रतिपादन व विषयप्रतिपादनाची शैली या सर्व गोष्टी वाखाणण्यासारख्या होत्या; व त्यांची साक्ष आजचे पुष्कळ विद्वान् शिष्य, म्हणजे गांवोगांवीं महाराष्ट्र व वऱ्हाडांत पसरलेले पुष्कळ वकील, न्यायाधीश, अध्यापक वगैरे लोक देत आहेत. मुंबई विश्वविद्यालयानें सन १८९८ सालीं त्यांची एम्.ए.परीक्षेच्या 'वेदान्त प्राइझ पेपर' करितां परीक्षक म्हणून नेमणूक केली व सतत १६ वर्षें ते त्या विषयाचे परीक्षक होते. जुन्या तऱ्हेनें प्राच्य विद्या शिकविणाऱ्या पंडित व मौलवी यांना वार्षिक वेतन देण्याचें सरकारनें कांहीं वर्षें चालू केलें होतें त्यांत शास्त्रीबुवांचा क्रमांक पहिला होता.

## ९४. 'महामहोपाध्याय' पदवीचा लाभ.

भरतखंडांत महामहोपाध्याय ही सर्वमान्य पदवी उत्तम दर्जाचा जो संस्कृत विद्वान शास्त्रीयग्रंथनिर्मिति करणारा अथवा अध्यापन करणारा अथवा दोनही कार्यें करणारा असेल त्याला आचार्यपीठांकडून अथवा राज्यकर्त्यांकडून देण्याची वहिवाट अनेक शतकें चालू आहे. मुंबई इलाख्यांत हा मान शास्त्रीबुवांचे वेळीं म्हणजे साधारणपणें एकोणिसाव्या शतकाचे शेवटीं व विसाव्या शतकाचे आरंभीं बाळशास्त्री आगाशे, भीमाचार्य झळकीकर, जामनगरचे हाथीभाई शास्त्री अशा फार थोड्याच विद्वानांना मिळालेला होता. याचें कारण असें ऐकण्यांत आहे कीं प्राचीन तऱ्हेनें संस्कृतशास्त्रांचें अध्ययनाध्यापन करण्यांत ज्याची कामगिरी सर्वश्रेष्ठ असेल तोच या पदवीस योग्य होय असें डॉ. भांडारकरांचें मत असल्यामुळें व त्यांना या तऱ्हेचा जुना पंडित शास्त्रीबुवांचे पूर्वी कांहीं वर्षें न मिळाल्यामुळें कित्येक वर्षांत मुंबई प्रांताच्या राज्यपालाकडून ही पदवी देण्यांत आली नव्हती. राज्यपाल मोठ्या अधिकाऱ्यांनीं डॉक्टर भांडारकरांना स्वतःला ही पदवी देऊं केली असतां 'जुन्या तऱ्हेचेच अध्ययनाध्यापनपरंपरा व शिष्यपरंपरा चालू ठेवणारे गाढे विद्वान् महामहोपाध्याय पदास योग्य' असें स्वच्छ आपलें मत त्यांनीं सांगितलें व डॉ. भांडारकरांना सरकारनें 'सर' ही बहुमानाची पदवी त्या वेळीं दिली. शास्त्रीबुवांना ही महामहोपाध्याय पदवी सरकारनें १९२१ सालीं दिली व त्यांनींही त्या पदवीस योग्य असें अध्ययनाध्यापनाचें काम पदवीपूर्वीं जसें ३० वर्षें केलें तसेंच पुढेंही आजन्म चालू ठेविलें.

## ९५. 'महामहोपाध्याय' पदवीची योग्यता व उपलब्ध इतिहास.

डॉक्टर भांडारकर यांनीं 'महामहोपाध्याय' या पदवीबद्दल काढलेल्या उद्गारांतील रहस्याची कल्पना येण्याकरितां या पदवीचा उपलब्ध पूर्वेतिहास थोडक्यांत देणें जरूर आहे. या पदवीचा जुन्यांत जुना उल्लेख बाराव्या शतकांतील महावैयाकरण कैयटभट्ट यांचे संबंधानें आढळतो. यापूर्वीं व्याकरणशास्त्रांत महर्षि पाणिनि, कात्यायन, पतञ्जलि तसेच इतर शास्त्रांतील सूत्रकार, वार्तिककार व भाष्यकार जरी सोडले तरी त्यानंतरचे भर्तृहरि, जयादित्य, वामन, हरदत्त, वाचस्पतिमिश्र, श्रीधर, उदयन, गङ्गेशोपाध्याय यांच्यासारख्या विद्वानांविषयीं या पदवीचा

उल्लेख मिळत नाहीं. कैयटभट्टांचे बंधू मम्मटाचार्य हे जरी साहित्य व व्याकरणशास्त्रांत पारंगत असले तरी त्यांना ही पदवी लाभलेली दिसत नाहीं. कैयटानंतर या पदवीचा उल्लेख चवदाव्या शतकांत न्यायलीलावतीकार वल्लभाचार्य यांचेसंबंधीं मिळतो व पंधराव्या शतकांत काव्यप्रदीपकर्ते गोविंद ठक्कुर या साहित्यशास्त्रज्ञांबद्दल मिळतो. दक्षिणेंतही महाविद्वान् मल्लिनाथ यांचेसंबंधीही उल्लेख आढळतो. ही पदवी त्या वेळीं आचार्यपीठांकडून देण्यांत येत असावी. पंधराव्या शतकाच्या आरंभीं महानैयायिक जयदेवमिश्र (पक्षधर) यांनीं मिथिला-विद्यापीठाधिपति यांचेकडून आपले सहाध्यायी वासुदेव सार्वभौम यांना ही पदवी देवविली व नवद्वीप विद्यापीठाकडूनही ही पदवी देण्याचा उपक्रम केला. त्यानंतर ही पदवी रघुनाथपंडित, शंकरमिश्र, जगदीश, गदाधर वगैरे अप्रतिम विद्वांनाना मिळाली इतकेंच नव्हे तर त्या पंडितांचे मानानें सामान्य अशा त्रिलोचन, गुणानन्द, भवानन्द गोकुलनाथ, रघुपति वगैरे अनेक नैयायिकांना ही पदवी देण्यांत आली. सतराव्या शतकांत नागेशभट्टांनीं ही पदवी विभूषित केली व त्यांना ती आचार्यपीठाकडून अथवा मिथिलाधिपतींकडून मिळाली असावी. मीमांसा, वेदान्त, सांख्य, योग वगैरे शास्त्रांमध्यें निष्णात पंडितांना या पदवीचा लाभ झालेला दिसत नाहीं. त्याला कारण कदाचित् व्याकरण व न्याय या सर्वशास्त्रप्रवेशोपयोगी शास्त्रांचेंच अध्यापन प्रामुख्यानें पाठशाळांमध्यें होत असल्यामुळें निष्णात अध्यापक म्हणून वैयाकरण व नैयायिक यांनाच ही पदवी दिली जात असावी, अथवा मीमांसक व वेदान्ती आपल्या अंगच्या संन्यस्त वृत्तीमुळें या पदवीचा स्वीकार करण्याला पराङ्मुख असावे. व्याकरण व न्याय या विषयांतही अत्यंत निष्णात पंडित भट्टोजी दीक्षित, हरिदीक्षित, शेषकृष्ण, कोण्डभट्ट व त्यानंतर रामशास्त्री प्रभुणे, नीलकंठशास्त्री थत्ते, मेरुशास्त्री गोडबोले, बालसरस्वती वगैरे प्रसिद्ध विद्वानांना या पदवीचा लाभ झाला नाहीं. त्याला कारण ते ज्या देशांत रहात होते तेथील राज्यकर्त्यांची ही पदवी देण्याची प्रथा नव्हती हेंच दिसतें. नागेशभट्टांनंतर प्रसिद्ध वैयाकरण भैरवमिश्र यांना ही पदवी मिथिलाधिपतींकडून अथवा आचार्यपीठाकडून मिळाली असावी. इ. स. १८८७ सालीं महाराणी व्हिक्टोरियाच्या राज्याच्या जुबिलीच्या निमित्तानें ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं ही पदवी देण्यास सुरवात केली व ती विद्वद्वर्य गंगाधरशास्त्री तेलंग यांना दिली. व त्यानंतर नित्यानन्द-पर्वतीय, दामोदरशास्त्री भारद्वाज, गंगानाथ झा, तात्याशास्त्री पटवर्धन, तसेच सौराष्ट्रांतील हाथीभाईशास्त्री व पुण्यांतील भीमाचार्य झळकीकर व वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांना ही पदवी योग्य प्रकारें देण्यांत आली. त्यानंतर मात्र निरनिराळ्या प्रांतांमध्यें इंग्रजी राज्यकर्त्यांतर्फे व स्वराज्यप्राप्तीनंतर आचार्यपीठांतर्फे प्रस्तुत लेखकासारख्या आंग्लविद्याविभूषित अशा अनेक अध्यापकांना इतकेंच नव्हे तर ज्यांनीं शास्त्राध्यापन कधींही केलें नाहीं अशा विद्वानांनाही ही पदवी देण्यांत आली. अनेक शतकांची परंपरा असलेल्या व गाढ शास्त्रीय विद्वत्ता, बहुमोल ग्रंथनिर्मिति व अखंडित अध्यापनकार्य या तिहींची जोड असणाऱ्या विद्वानाला दिल्या जाणाऱ्या या पदवीचा हल्लींच्या तऱ्हेनें अपव्यय झाल्यास तिच्याबद्दल लोकामध्यें रहावा तितका आदर राहणार नाहीं; इतकेंच नव्हे पण तिच्यामुळें विद्वत्तेला प्रोत्साहनही मिळणार नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें.

### ९६. पुणें येथील इतर संस्थांशीं संबंध.

१८९० सालीं पुण्यांत आल्यानंतर लवकरच शास्त्रीबुवांचा डॉ. भांडारकर यांच्याशीं परिचय न्यायमूर्ति रानडे यांनीं करून दिला; व "विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमम्" या

न्यायानें शास्त्रीबुवांची खरी योग्यता ओळखून डॉ. भांडारकर यांनीं न्यायमूर्तींना 'हातचें रत्न घालवूं नका' अशा शब्दांत शास्त्रीबुवांच्या योग्यतेबद्दल संदेश पाठविला. त्यानंतर शास्त्रीबुवांच्या व भांडारकरांच्या मधूनमधून भेटीगांठी होऊं लागल्या व अनेक वेळां महाभाष्यांतील कांहीं उताऱ्यांसंबंधीं त्यांचें बोलणें होऊं लागलें. डॉ. भांडारकर यांनीं शास्त्रीबुवांना एलफिन्स्टन कॉलेजमधील शास्त्र्यांची जागा स्वीकारतां कां असेंही विचारलें. तसेंच डेक्कन कॉलेजमध्येंही जाण्याची इच्छा आहे कां म्हणून विचारलें. त्याप्रमाणेंच कलकत्ता येथील सरकारी संस्कृत कॉलेजमध्यें मुख्याध्यापक म्हणून जातां कां असें विचारलें. तीनही प्रसंगीं जरी गोपाळराव गोखले वगैरे फर्ग्युसन कॉलेजच्या अधिकारी वर्गापैकीं प्रमुख लोकांनीं त्यांना जाण्यास परवानगी दिली तरी त्यांनीं "मला फर्ग्युसन कॉलेज सोडावयाचें नाहीं" असें स्पष्ट सांगितलें. शास्त्रीबुवा फर्ग्युसन कॉलेजमध्यें आजीव सेवक नसले तरी प्रिन्सिपाल व इतर प्रोफेसर हे त्यांच्याशीं ते आपल्यापैकींच एक आहेत या भावनेनें अत्यंत आदरानें व स्नेहभावानें वागत. पुण्यांतील संस्कृतशीं संबद्ध अशा सर्व संस्थांशीं त्यांचा जिव्हाळ्याचा संबंध होता. वेदशास्त्रोत्तेजक सभेचे कांहीं वर्षे ते उपाध्यक्ष होते व तेथील वार्षिक परीक्षांची सर्व जबाबदारी त्यांचेवर असे. भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूटचे ते सन्माननीय सभासद होते. तसेंच ब्राम्हणसभेचे उपाध्यक्ष होते. पुण्यांत भरलेल्या विद्वत्संमेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते. याशिवाय सांगली येथें अनेक वर्षे तेथील पाठशाळेच्या विद्यार्थ्यांची परीक्षा घेण्यास ते जात असत. कांहीं वर्षे मुंबई, जयपूर व हिंदु युनिव्हर्सिटी यांच्या उच्च शास्त्रीय परीक्षांमध्यें ते निरनिराळ्या शास्त्रांचे परीक्षक असत.

## ९७. कॉलेजमधील अध्यापक वर्गाशीं संबंध व ग्रंथनिर्मिति.

कॉलेजामध्यें अध्यापनाची संधि मिळाल्याचा शास्त्रीबुवांनीं उत्तम फायदा घेतला. उच्च वर्गांतील विद्यार्थ्यांना निरनिराळ्या शास्त्रांतील ग्रंथ शिकवीत असतां त्या त्या शास्त्रांतील इतर मुख्य मुख्य ग्रंथांचें त्यांनीं उत्तम परिशीलन केलें. शिवाय फर्ग्युसन कॉलेजमधील अध्यापकांनीं, तसेंच इतर कॉलेजांतीलही विद्वान अध्यापकांनीं, विशेषतः प्रो. चांदोरकर, प्रो. पानसे, दे. भ. शिवरामपंत परांजपे, प्रो. घाटे, प्रो बेलवलकर, प्रो. गुणे, प्रो. सुरू, प्रो. दिनकरराव देवधर, प्रो. वाटवे, प्रो. चिंतामणराव देवधर व प्रो. वासुदेवराव परांजपे यांनीं त्यांचे जवळ निरनिराळ्या शास्त्रांतील आकर ग्रंथांचें पाङ्क्त अध्ययन केल्यामुळें अध्यापक वर्गाला त्या त्या शास्त्रीय ग्रंथांचें मर्म समजलें व जुन्या तऱ्हेनें शिकलेल्या उत्तम विद्वानांची खरी योग्यता कळाली. अनेक प्रसंगीं या विद्वानांचे 'तोंडून जुन्या पंडितांचें ज्ञान व्यापक व तलस्पर्शी ( Encyclopædic and deep ) असतें खरें' असे उद्गार निघाले. तसेंच या विद्वान अध्यापक वर्गानें मोकळेपणानें वेळोवेळीं निरनिराळ्या शंका विचारून आपलें समाधान करून घेतल्यामुळें शास्त्रीबुवांच्याही बुद्धीला सूक्ष्मेक्षिका व चिकित्सापद्धतीची जोड मिळाली व त्यामुळें त्यांचेकडून निरनिराळ्या शास्त्रांतील अधिकृत ग्रंथांचें व्याख्यान, विवरण, भाषांतर, संपादन व त्याचप्रमाणें नवीन प्रबन्धांची, उपोद्धातांची, व टीकांची निर्मितीही आधुनिक चिकित्सापद्धतीस अनुसरून यथासांग झाली. त्यांनीं एकंदर पंचवीस ग्रंथ लिहिले. त्या ग्रंथांचीं नांवें व एक ग्रंथ पुरा झाल्यानंतर दुसऱ्या ग्रंथाकडे कशी प्रवृत्ति झाली त्यासंबंधीं माहिती दुसरीकडे ( सर्वदर्शन-संग्रह द्वितीयावृत्ति उपोद्धात यामध्यें ) देण्यांत आली आहे.

## ९८. शारीरभाष्याचें मराठी भाषांतर.

या पंचवीस ग्रंथांपैकीं इ. स. १८९० सालापूर्वी सातारा मुक्कामीं लिहिलेल्या परिभाषेन्दुशेखरटीका ( तत्त्वादर्श ) व लघुशब्देन्दुशेखरटीका ( गूढार्थप्रकाश ) या अद्यापि अप्रकाशितच आहेत. शांकरब्रह्मसूत्रभाष्याचें मराठींत भाषांतर करण्याचें काम इ.स. १९०२ सालीं गायकवाड सरकारनें शास्त्रीबुवा व प्रो. दिनकरराव चांदोरकर यांचेकडे सोंपविलें. सदरहू भाषांतर दोन वर्षांचें आंत पुरें करावयाचें होतें. मूळ संस्कृत ग्रंथांचें टीकेसहित अवलोकन प्रो. चांदोरकर व शास्त्रीबुवा मिळून दुपारीं कॉलेजांतून परत आल्यानंतर संध्याकाळपर्यंत प्रो. चांदोरकर यांचे घरीं करीत असत व त्यानंतर रात्रीं व दुसरे दिवशीं सकाळीं प्रो. चांदोरकर मराठी भाषांतर लिहीत असत. शास्त्रीबुवा सारांश व टीपा लिहीत असत व प्रो. चांदोरकर यांनीं लिहिलेलें भाषांतर पुन्हां पहात असत. अशा रीतीनें सुमारें एक वर्ष लोटल्यावर प्रो. चांदोरकर प्लेगचे आजारानें कालवश झाले व सर्व जबाबदारी शास्त्रीबुवांच्यावर पडली; तरी रात्रंदिवस बसून मुदत संपण्याचे आंत संपूर्ण भाषांतर, सारांश, व टीपा त्यांनीं गायकवाड सरकारकडे रवाना केल्या. या ग्रंथाचा विशेष म्हणजे हें भाषांतर अत्यंत अधिकृत, सरळ व शुद्ध असून समजण्यास अतिशय सुलभ असल्यामुळें मराठीमधील इतर भाषांतरांना मागें सारून तें अतिशय लोकप्रिय झालें. शिवाय, टीपा अत्यंत मार्मिक असल्यामुळें व सारांशही मुद्देसूद असल्यामुळें वाचल्याबरोबर वाचणाऱ्याला मूळ संस्कृत ग्रंथांतील विषयांचें पूर्ण आकलन करतां येतें. या ग्रंथाची पहिली आवृत्ति पुष्कळ वर्षांपूर्वी संपली आहे व महाप्रयासानेंही हल्लीं तिची प्रत उपलब्ध होत नाहीं. गायकवाड सरकारांनीं लेखकास पुनर्मुद्रण करण्यास परवानगी दिली आहे व लवकरच दुसरी आवृत्ति बाहेर पडेल.

## ९९. रामानुजभाष्य, सर्वदर्शनसंग्रह इत्यादि ग्रंथांचें संपादन व त्यांवर टीका.

शांकरभाष्याचें भाषांतर करीत असतांना शास्त्रीबुवांनीं रामानुज, वल्लभ, मध्व, श्रीकण्ठ, निम्बार्क वगैरे विद्वान आचार्योनीं लिहिलेल्या सर्व भाष्यांचें अवलोकन केलें व साहजिकच शांकरभाष्यापेक्षां दुर्बोध अशा रामानुजाचार्योच्या श्रीभाष्यावर टीका लिहिण्याचें त्यांचे मनांत आलें व त्याप्रमाणें त्यांनीं श्रीभाष्य, त्यावरील टीका श्रुतप्रकाशिका व श्रुतप्रदीपिका, वेदार्थसंग्रह, यतीन्द्रमतदीपिका वगैरे ग्रंथांचें संपूर्ण अध्ययन करून विवृति नांवाची स्वतंत्र टीका श्रीभाष्याच्या चतुसूत्री भागावर लिहिली व उरलेल्या भागावर टिप्पण्या लिहिल्या. तसेंच यतीन्द्रमतदीपिकेवर प्रकाश नांवाची टीका लिहिली व विशिष्टाद्वैतमत नांवाचा प्रबंध मराठींत लिहिला. अशा रीतीनें विशिष्टाद्वैत मताच्या प्रधान ग्रंथांचें सुंदर रीतीनें व्याख्यान केल्याचा परिणाम म्हणजे ध्येयवादी (idealistic) शांकरमतापेक्षां वास्तववादी (realistic) रामानुजमताकडे डॉ. भांडारकर, थीबो वगैरे विद्वानांप्रमाणें शास्त्रीबुवांचाही ज्यास्त कल आहे असा लोकांमध्यें पसरलेला प्रवाद त्यांचे कानावर आला व त्यांनीं तो दूर करण्याकरितां "अद्वैतामोद" नांवाचा उत्कृष्ट प्रबन्धग्रंथ संस्कृतमध्यें लिहिला. वरील सर्व ग्रंथांचें व्याख्यान करीत असतां माधवाचार्योचा विद्वत्ताप्रचुर "सर्वदर्शनसंग्रह" ग्रंथ त्यांचें अवलोकनांत आला. ज्यावर टीका उपलब्ध नाहीं व जो अत्यंत अशुद्ध छापलेला उपलब्ध होता अशा या बहुमोल व अत्यन्त दुर्बोध ग्रंथाचें उत्तम संस्करण करून त्यांनीं त्यावर त्याचें काठिण्य दूर करण्याकरितां सुलभ व सुंदर टीका लिहिली व प्रस्तावनेंत प्राचीन तत्त्वज्ञानाचें सूक्ष्म निरीक्षण करून ऐतिहासिक व तौलनिक दृष्ट्या सर्व निर-

निराळ्या तत्त्वप्रणालिकांचें विवेचन केलें. या ग्रंथावर टीका लिहीत असतां त्यामधील न्याय, वैशेषिक, मीमांसा, योग वगैरे दर्शनांच्या प्रमुख ग्रंथांचें त्यांना अध्ययन करावें लागलें. तसेंच काव्यप्रकाश, साहित्यदर्पण, हे ग्रंथही कॉलेजच्या विद्यार्थ्यांना शिकवावे लागले. त्यामुळें त्यांनीं सर्वदर्शनसंग्रहावर टीका लिहिण्याचें काम चालू असतांनाच "न्यायकोशा-" ची सुधारून वाढविलेली आवृत्ति काढली, "संकेत" टीकेसहित काव्यप्रकाशाचें संपादन केलें व "पातञ्जल-योगसूत्र" हा ग्रंथ, भाष्य व नागेशभट्टांच्या वृत्तीसह प्रकाशित केला. त्यानंतर त्यांनीं आपलें लक्ष धर्मशास्त्राकडे वळविलें व पितामहांच्या "संस्कारपद्धति" नांवाच्या ग्रंथाचें प्रकाशन केलें; व तसेंच स्वतः "धर्मतत्त्वनिर्णय" व "सूत्रान्तरपरिग्रहाविचार" हे ग्रंथ लिहिले व "कुंडार्का-" वर टीका लिहिली. त्यानंतर पूर्वमीमांसाशास्त्रावरील "मीमांसान्यायप्रकाश" व वेदान्तावरील "सिद्धान्तबिन्दु" या कठीण ग्रंथांवर अभिप्रेत अर्थाचें उत्तम रीतीनें प्रतिपादन करणाऱ्या टीका लिहिल्या. त्याच वेळीं भगवद्गीतेचा खरा प्रतिपाद्य विषय काय असावा याचा स्वतंत्र रीतीनें विचार करून पहिल्या दोन अध्यायांवर त्यांनीं टीका लिहिली व योजिलेल्या कायपरिशुद्धि, साधनपरिशुद्धि व मोक्षपरिशुद्धि या तीन ग्रंथांपैकीं कायपरिशुद्धि ग्रंथ लिहिला.

## १००. व्याकरणमहाभाष्याचें भाषांतर.

हें सर्व झाल्यावर कित्येक वर्षांपूर्वीं योजिलेलें व थोडेंबहुत सुरू केलेलें व्याकरणमहा-भाष्याचा मराठींत अनुवाद करण्याचें काम त्यांनीं पुन्हां सुरू केलें व रात्रंदिवस परिश्रम करून वयाला पंचाहत्तर वर्षें ज्या दिवशीं परिपूर्ण झालीं त्या दिवशीं सर्व अनुवाद पुरा करून डेक्कन एज्युकेशन सोसायटीला अर्पण करून संस्थेनें केलेल्या उपकाराचा भार कमी केला. संस्थे-नेंही शास्त्रीबुवांना पंचाहत्तर वर्षें पुरीं झाल्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें व महाराष्ट्रीय जनतेनें त्यांना मानपत्र दिलें आणि फर्ग्युसन कॉलेजच्या वाचनालयांत त्यांच्या तैलचित्राचें अनावरण केलें.

---

मानपत्रांतील मजकूर पुढें दिल्याप्रमाणें —

अयि महामहोपाध्याय विद्वद्रत्नबिरुदसमलंकृताः पुण्यपुरीशिरोभूषणायमानाः

**अभ्यंकरकुलावतंसाः वासुदेवशास्त्रिचरणाः,**

वयं खलु सुमङ्गलेऽस्मिन्नवसरे तत्तन्महाराष्ट्रप्रदेशनिवासिनः निखिलविद्यासंकेतस्थानभूतान् पुरुषायुषस्य सुजीवितस्य त्रीन् पादान् परिसमाप्य षट्सप्ततितमे संवत्सरे पदं कुर्वाणान् अत्रभवतः सभाजयितुं संमिलिताः स्मः ।

भवद्गुणगणेन सुदूरं समाकृष्टैः अस्माभिः वक्ष्यमाणं किञ्चिदिव विनीतं वचः कर्णगोचरीकृत्य, समर्प्यमाणां चाल्पीयसीं संमाननां प्रतिगृह्य, मान्यमाननया प्राप्तप्रमोदान् अस्मान् अनुगृह्णन्तु अत्रभवन्तः इति साञ्जलि-बन्धं प्रार्थयामहे ।

अयि शास्त्रिवरेण्याः, किं नाम पुरुषाणां ऐहिकं जीवितं, कथं वा तत् अन्वर्थतां प्रयाति इत्येनं उपन्यासं विमर्शयन् आह कश्चन सुभाषितकारः —

जीवितं तदपि जीवितमध्ये गण्यते सुकृतिभिः खलु पुंसाम् ।
ज्ञान-विक्रम-कला-कुललज्जा-त्याग-भोग-सहितं सुफलं यत् ॥

अयि मान्यवराः, भवज्जीवितसरणिं आलोचयन्तः वयं प्रमोदपुरःसरं साभिमानं च उद्घोषयामः यद् एतत्सुभाषितानुरोधात् नूनं समासादितपूर्वं भवद्भिः सुजीवितगणनायां अस्यां आद्यं स्थानं इति ।

या प्रसंगीं पंतप्रधान श्री. बाळासाहेब खेर हे अध्यक्ष होते व सर रघुनाथ परांजपे, तात्यासाहेब केळकर, प्राध्यापक राजवाडे व पुण्यांतील इतर पुष्कळ प्राध्यापक हजर होते, व मोठा शिष्य-वर्गही हजर होता. या वेळीं उपस्थित मंडळींपैकीं मुख्य मुख्य लोकांनीं शास्त्रीबुवांचें योग्य गुणवर्णन केलें व त्यांना संस्थेनें मानपत्र व महावस्त्र अर्पण केलें. या महाभाष्याच्या अनुवादाच्या कामीं त्यांना त्यांचे परमशिष्य शंकरशास्त्री मारुलकर यांनीं बरेंच साहाय्य केलें व लेखकानेंही थोडासा हातभार लाविला. विशेष सांगण्याची गोष्ट म्हणजे सर्व टिप्पण्या शास्त्रीबुवांनीं स्वतः लिहिल्या व अनुवादही पूर्ण तपासून मूळ ग्रंथाचा अर्थ योग्य रीतीनें बरोबर अनुवादांत आला आहे कां नाहीं हें पाहून सर्व हस्तलिखित तयार केलें. ग्रंथ तयार करतां करतां व अनुवादाचें काम चालू असतांनाच त्यांनीं ग्रंथाला विचारपरिप्लुत विस्तृत प्रस्तावना लिहिण्यास सुरुवात आषाढ शुद्ध ३ शके १८५२ (इ स. १९३०) रोजीं केली आणि पाणिनीच्या सूत्रांची योग्यता, त्याचीं सूत्रें रचण्याची पद्धति, त्याचें लाघवाकडे लक्ष्य, त्याचें भाषेवर प्रभुत्व, वार्तिककारांच्या संबंधीं विचार, भाष्य-कारांची कामगिरी, भाष्यापूर्वींच्या संग्रह वृत्ति वगैरे ग्रंथांचें अस्तित्व व भाष्यकारांची विवरण-पद्धति इतक्या विषयांवरील विचार संग्रथित करून प्रस्तावनेचा एक खंड लिहून चै. शु. ३ शके १८६४ (इ. स. १९४२) रोजीं पुरा केला. तो जसाच्या तसा पुढें देत आहें:—

---

"जायमानो वै ब्राह्मणः त्रिभिर्ऋणवा जायते" इत्येतां श्रुतिं अनुरुध्य पारितं भवद्भिः सुगृहीत-नामधेयानां **श्री गोडबोले रामशास्त्रिपादानां** संनिधौ सप्ततारपुरे अध्ययनम् । तेन च विधिवत् स्वाध्यायेन अर्चिताः प्रथमं तावत् पाणिनि-कात्यायन-पतञ्जलिप्रभृतयः महामुनयः । तथा च पश्चाद् बादरायण-कणाद-जैमिनिप्रमुखाः महर्षयः । तदनु कृतसमावर्तनैः भवद्भिः अस्मद्भाग्यवशादेव स्वीयागमनेन इमां पुण्य-पुरीं नाम महाराष्ट्र-राजधानीं पावयद्भिः अत्रत्यसंस्कृतपाठशालायां 'फर्ग्युसन्' महाविद्यालये च आचार्यत्वं अङ्गीकृत्य त्यागपूर्वकं अध्यापिताः परःसहस्राः सुचिरं छात्रप्रवराः । अन्येषां च संस्कृतविचासरितं अवजिगाहिषूणां कृते विनिर्मिता खलु त्रयोदशग्रन्थात्मिका तीर्थसोपानपङ्क्तिः । प्रदर्शितः खलु धर्ममार्गविमूढेभ्यः पन्थाः । परिपालित प्राचीनमुनिसंमता आचारपद्धतिः । संरक्षिता कुलपरंपरा । किं बहुना । नित्यं सत्पदवीं अनुसरद्भिः भवद्भि प्रकटीकृतः कलिकालदमने महान् विक्रमः । स्वयं विततः शिष्यवरैश्च वितानितः अस्यां महाराष्ट्रभुवि महान् ज्ञानयज्ञः। वितीर्णानि भूयांसि विद्यादानानि । कृताः अन्तेवासि जन-धन्यवादरूपाः प्रतिग्रहाः । एवं भगवता प्रोक्तानि द्विजातीनां षट् कर्माणि कालानुरूपं केवलं सरस्वत्युपासनापर्यवसायीनि संपाद्य सफलीकृतं आत्मनः द्विजत्वम् । आत्मानुरूपसुतद्वयेन वंशलतां वितन्वद्भिः भवद्भिः प्रत्यर्पितं पितॄणां ऋणम् । परिपालितं अद्यावधि अनवरतं सदाचारैकव्रतम् ।

इत्थं ऋणत्रयापकरणात्

स्वाध्यायेन व्रतैर्होमैः त्रैविद्येनेज्यया सुतैः ।
महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः ॥

इति मनुवचनानुरोधात् स्वतनुं ब्राह्मीं विहितवन्तः कृतकृत्यतां इव संप्रति संप्राप्ताः भवन्तः । परस्पर-विरोधं अपहाय सरस्वत्याः साकं लक्ष्मीरपि भवन्तं स्वयमेव समुपागता । समाधिगता राज-जनपद-संभावना । अथवा परमभाग्यशालिभिः किं किं नाम न उपभुक्तं भवद्भिः ऐहिकजीवितफलम् ।

संप्रति वयं एतदेव आशास्महे यत् परमेशितुः सान्द्रतर-कृपावशात् लभन्तां भवन्तः क्षेमयुतं पूर्णायुः, समुपचीयतां च परिणतप्रज्ञानां अत्रभवतां आलम्बेन महाराष्ट्रभुवः प्रज्ञाश्रयं समुज्ज्वलं यशः इति ।

शाके १८६० तमे संवत्सरे
श्रावणस्य कृष्णैकादश्याम् ।

भवदीया वशंवदा
महाराष्ट्रिय-जनता.

---

# प्रस्तावना

( कै. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं लिहिलेली )

## १. लघुभाष्याविषयीं दन्तकथा.

" व्याकरणशास्त्रांतील अनेक ग्रन्थांमध्यें भाष्य हा ग्रन्थ सर्वांमध्यें श्रेष्ठ समजला जातो. हा ग्रन्थ पतंजलि ऋषींनीं रचिला आहे. यालाच महाभाष्य म्हणतात. महर्षि, महाब्राह्मण वगैरे शब्दांतील महत् शब्द जसा एक प्रकारचा उत्कृष्टपणा दाखवितो तसाच महाभाष्य यांतील महत् शब्द आहे. हा महत् शब्द आपेक्षिक महत्त्व दाखविणारा नव्हे. या बाबतींत कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं सर्व ठिकाणीं महत् शब्द हा बृहत् शब्दाप्रमाणें आपेक्षिक महत्त्व दाखविणाराच असतो व तोच उत्कृष्टपणाही दाखवितो. महाभाष्य हें देखील लघुभाष्यापेक्षां मोठें व उत्कृष्ट आहे. यासंबंधीं दन्तकथा प्रचलित आहे ती अशी : गोनर्द देशांतील एका ऋषीनें शिष्यांना व्याकरणशास्त्र शिकवितांना जें भाष्य रचिलें तें लधुभाष्य होय. परंतु तेवढ्यानें त्या गोनर्दीय ऋषीच्या मनाचें समाधान झालें नाहीं. पुढें एके दिवशीं संध्या करतेवेळीं त्या ऋषींच्या अंजलींतून एक ऋषि पडला. त्याला पतंजलि असें लोक म्हणूं लागले. ' गोनर्ददेशे कस्यचिदृषेरञ्जले: संध्याकरणसमये पतित इत्यैतिह्यात् ' असें शब्देन्दुशेखरामध्यें नागोजीभट्टांनीं लिहिलें आहे. त्या पतंजलि ऋषीनें पूर्वींच्या लघुभाष्याचा विस्तार करून महाभाष्य लिहिलें. या महाभाष्यामध्यें इतर विचारही ज्यास्त केला आहे. या महाभाष्यामध्यें सर्व लघुभाष्याचा संग्रह झाला असल्यामुळें लघुभाष्याचें महत्त्व नाहींसें झालें व कालांतरानें तो ग्रंथ लुप्त झाला. लघुभाष्य व महाभाष्य यांमध्यें मतभेद कोठेंही नाहीं. कांहीं ठिकाणीं महाभाष्यामध्यें ' गोनर्दीय असें म्हणतो असा जो उल्लेख येतो तो लघुभाष्यकारांना उद्देशूनच केलेला असतो.

## २. लघुभाष्याच्या अस्तित्वाबद्दल ज्यास्ती पुरावा.

" महाभाष्यामध्यें ' उक्तो भावभेदो भाष्ये ' धात्वर्थांमधील भेद भाष्यामध्यें सांगितलाच आहे ( पा. सू. ३।३।१९ भाष्य, ३।४।६७ भाष्य ) असें जें म्हटलें आहे तेथें ' भाष्यामध्यें ' ( भाष्ये ) हा शब्द लघुभाष्याला उद्देशूनच लिहिलेला दिसतो. कारण, कोणताही ग्रंथकार एखादा ग्रंथ करतांना त्याला जी गोष्ट लिहिण्याचा प्रसंग येतो ती गोष्ट जर त्याच ग्रंथामध्यें पूर्वीं लिहिली गेली असेल किंवा पुढें अवश्य लिहावयाची असेल तर तेथें त्या ग्रंथाचें नांव न घेतां फक्त ' हें पूर्वीं लिहिलें आहे ' किंवा ' हें पुढें लिहावयाचें आहे ' इतकेंच म्हणतो. तेव्हां येथें महाभाष्यकारांनीं ' भाष्यामध्यें ' असें जें म्हटलें आहे तें दुसऱ्याच भाष्याला म्हणजे

लघुभाष्याला उद्देशून असलें पाहिजे. तसेंच 'तास्यनुदात्तेत्०' (६।१।१८६) या सूत्रावरील भाष्यामध्यें 'वक्ष्यत्यस्य परिहारम्' याचा परिहार पुढें सांगणार आहे असें म्हटलें आहे. आणि पुढें त्याचा परिहार 'आने मुक्' (७।२।८२) येथें भाष्यामध्येंच दृष्टीस पडतो. तो गोनर्दीयाचा असावा. तेथें 'वक्ष्यति' याचा कर्ता लघुभाष्यकार असावा. अशा रीतीनें 'लघुभाष्य होतें' असें आपलें मत कांहीं लोक प्रतिपादन करितात. आतां 'लघुभाष्य झालेंच नाहीं' असें म्हणण्याला जोंपर्यंत कांहीं बळकट प्रमाण दिसत नाहीं तोंपर्यंत हें मत अग्राह्य आहे असें म्हणतां येत नाहीं. 'लघुभाष्य उपलब्ध नाहीं' हें प्रमाण कच्चें आहे. कारण एखादा ग्रंथ उपयुक्त असला तरी त्यापासून होणारा उपयोग जर त्याच्यापेक्षां चांगल्या तऱ्हेनें दुसऱ्या ग्रंथापासून होत असेल तर तो पूर्वीचा ग्रंथ आपोआपच अध्ययन–अध्यापनाच्या प्रचारांतून सुटतो आणि नंतर अर्थातच लुप्त होतो अशी उदाहरणें आपल्या डोळ्यापुढें अनेक आहेत. एकंदरींत 'लघुभाष्य होतें' असें गृहीत धरण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

### ३. "आचार्य अन्वाख्यान करतात" या महाभाष्यवचनावरून लघुभाष्याचें अनुमान.

"या महाभाष्यामध्यें महेश्वर, सूत्रकार पाणिनि आणि वार्तिककार कात्यायन या तिघांचा आचार्य शब्दानें निर्देश केलेला पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतो. आतां, प्रस्तावनेमध्यें 'तेभ्य एवं विप्रतिपन्नबुद्धिभ्योऽध्येतृभ्यः सुहृद् भूत्वाऽऽचार्य इदं शास्त्रमन्वाचष्टे इमानि प्रयोजनानि अध्येयं व्याकरणमिति' असें जें भाष्यकारांनीं सांगितलें आहे तेथें आचार्य शब्दानें महाभाष्यकारांनीं कोणाचा निर्देश केला आहे याविषयीं दोन मतें दृष्टीस पडतात. वरील वाक्याचा "वेदावरून वैदिक शब्द आम्हांला समजतील व भाषेवरून लौकिक शब्द समजतीलच तेव्हां व्याकरणाचा कांहीं उपयोग नाहीं अशा तऱ्हेनें बोलणाऱ्या त्या वितंडवादी शिष्यांना मित्रत्वाच्या नात्यानें 'हे व्याकरणशास्त्राचे उपयोग आहेत तेव्हां व्याकरणशास्त्राचें अध्ययन करावें' असें म्हणून आचार्योनीं (पाणिनीनें) ह्या व्याकरणशास्त्राचें अन्वाख्यान केलें आहे" असा एक अर्थ आहे. पूर्वसिद्ध असलेलीच गोष्ट कांहीं कारणाकरितां सांगणें याला 'अन्वाख्यान' म्हणतात. शब्द हे नित्य असल्यामुळें पूर्वसिद्धच आहेत. तथापि लोकांना साधु शब्दांचें ज्ञान व्हावें म्हणून सूत्रकारांनीं जें आगम, प्रत्यय, आदेश वगैरे कल्पून साधु शब्दांचें सूचन केलें आहे तें 'अन्वाख्यान' होय. "स्वरिताचें प्रथम अर्ध-ऱ्हस्व उदात्त समजावें" (१।२।३२) हें अन्वाख्यान स्पष्टच आहे. तेव्हां सूत्रकारांनीं व्याकरणशास्त्राचें जरी अन्वाख्यान केलें आहे तरी पण त्यांनीं 'हे व्याकरणशास्त्राचे उपयोग आहेत म्हणून व्याकरणशास्त्राचें अध्ययन करा' असें सूत्रपाठामध्यें सांगितलेलें कोठेंही आढळत नाहीं. तेव्हां 'आचार्य शब्दानें सूत्रकारांचा निर्देश भाष्यकारांनीं केला आहे' असें म्हणतां येत नाहीं. आतां 'व्याकरणशास्त्राचे हे उपयोग आहेत तेव्हां त्याचें अध्ययन करावें' असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे आणि भाष्यकारांनीं व्याकरणशास्त्राचें अन्वाख्यानही केलें आहे. उदा० 'सर्वनाम्नो वृत्तिमात्रे पुंवद्भावो वक्तव्यः' (पा. सू. २।२।२८ भाष्य, ५।३।२८ भाष्य) इत्यादि. परंतु भाष्यकारांना आपलाच आपण आचार्य शब्दानें निर्देश केला आहे असें संभवत नाहीं. तेव्हां महाभाष्यकारांनीं हा आचार्य शब्दानें कोणाचा निर्देश केला आहे असा प्रश्न उपस्थित झाला असतां लघुभाष्यकारच झटदिशीं मनांत येतात. हा प्रश्न सोडवितांना कांहीं लोक असें म्हणतात कीं येथें आचार्य शब्दानें सूत्रकार पाणिनीचाच निर्देश केला आहे. 'इमानि प्रयोजनानि अध्येयं व्याकरणम्' हें त्या

आचार्य पाणिनीच्या तोंडचें वाक्य भाष्यकारांनीं येथें दाखविलें आहे असें समजूं नये, तर त्या आचार्य पाणिनीच्या मनांतील भाव काय असावा तो येथें भाष्यकारांनीं दाखविला आहे.

## ४. अन्वाख्यानकर्ता संग्रहकार व्याडि या मताचें विवेचन.

" इतर कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं येथें आचार्य शब्दानें व्याडीचा निर्देश केला आहे. व्याडीलाच दाक्षायण म्हणतात. 'दक्षस्य युवापत्यं दाक्षायणः' अशी दाक्षायण शब्दाची व्युत्पत्ति आहे. दाक्षायणानें संग्रह नांवाचा ग्रंथ केला आहे असें 'शोभना खलु दाक्षायणस्य संग्रहस्य कृतिः' (२।२।३६ भा.) या भाष्योक्तीवरून सिद्ध होतें. 'संग्रह या ग्रंथामध्यें शब्द हा नित्य आहे किंवा अनित्य आहे याचा विचार केला आहे' असेंही 'संग्रहे एतत्प्राधान्येन परीक्षितं नित्यो वा स्यात्कार्यो वेति' (प्रस्तावनाभाष्य) या भाष्यावरूनच सिद्ध होतें. तेव्हां शब्दशास्त्राचा विचार करणाऱ्या संग्रह नावाच्या ग्रंथामध्यें या व्याकरणशास्त्राचे उपयोग दाखवून 'या व्याकरणशास्त्राचें अध्ययन करावें' असेंही सांगितलेलें असावें असें याच प्रकृत भाष्यावरून अनुमान करतां येतें. संग्रह नांवाचा ग्रंथ हल्लीं उपलब्ध नसल्यामुळें अनुमाना-शिवाय गत्यंतर नाहीं. लक्षश्लोकात्मक तो ग्रंथ आहे असें 'संग्रहो व्याडिकृतो लक्षश्लोक-संख्याको ग्रंथः' या उद्योताच्या उक्तीवरून समजतें. व्याडि आणि पाणिनि हे परस्परसंबंधी होते. व्याडि हा दाक्षायणाचा युवापत्य होता. आणि पाणिनि हा दाक्षीपुत्र होता. दाक्षी ही दक्षाची कन्या होती. दक्षस्य अपत्यं स्त्री दाक्षी अशी दाक्षी शब्दाची व्युत्पत्ति आहे. 'दक्षस्य गोत्रापत्यं स्त्री दाक्षी' अशीही दाक्षी शब्दाची व्युत्पत्ति संभवते. तेव्हां दाक्षी ही कदाचित् दक्षाची नातही असूं शकेल. असो, व्याडि हा दक्षाच्या पुत्रवंशांतील होता आणि पाणिनि हा दक्षाच्या कन्यावंशांतील होता असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

## ५. महाभाष्यांतील वार्तिकें व त्यांचा पाठ.

" याप्रमाणें महाभाष्यकारांनीं 'आचार्य' हा शब्द कोणाला उद्देशून लिहिला आहे यासंबंधानें तीन मतें दाखविलीं. त्यांपैकीं अमुकच मत खरें आहे असा निश्चय करण्याला आज कांहीं साधन उपलब्ध नाहीं. पाणिनीनें सूत्रें केल्यानंतर महाभाष्याच्या पूर्वी झालेले ग्रंथ जर उपलब्ध असते तर या गोष्टीचा निश्चय सहज झाला असता. त्या कालांत झालेला वार्तिकग्रंथ-सुद्धां मूळचा संपूर्ण उपलब्ध नाहीं. क्वचित् अर्धवट उपलब्ध होतो. हल्लीं जो वार्तिक ग्रंथ संपूर्ण प्रसिद्ध झाला आहे तो बरोबर आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण महाभाष्यामध्यें सूत्रांशिवाय जीं दुसरीं वाक्यें व्याख्या करण्याकरितां म्हणून घेतलीं आहेत तीं सर्व वार्तिककारांचींच आहेत असें गृहीत धरून तीं सर्व वाक्यें एकत्र करून तयार केलेला हा ग्रंथ आहे. त्यांपैकीं कांहीं वाक्यांमध्यें सूत्रामध्यें सूत्रकारांनीं उच्चारलेल्या शब्दांचा उपयोग दाखविला आहे; कांहीं वाक्यांमध्यें सूत्रावर आलेले आक्षेप दूर केले आहेत; आणि कांहीं वाक्यांमध्यें सूत्रकारांची न्यूनता भरून काढण्याकरितां अपूर्व वचनें केलीं आहेत. आतां, ह्या सर्व गोष्टी वार्तिककारांनीं केल्या आहेत असें म्हणतां येतें व तें योग्यही दिसतें; तरी पण तसा वार्तिकपाठ तयार करण्यानें मूळ वार्तिकपाठ बरोबर जुळेल असें म्हणतां येत नाहीं. सूत्रें व वार्तिकें यांच्या संबंधानें लिहिण्याला प्रवृत्त झालेल्या भाष्यकारांनीं जशीं कांहीं सूत्रें मुळीच निर्दिष्ट केलीं नाहींत तशीं कांहीं वार्तिकेंही निर्दिष्ट केलीं नसतील. तेव्हां मूळचीं सर्व वार्तिकें भाष्यामध्यें सांपडतीलच असें म्हणतां येत

नाहीं. ज्याप्रमाणें कांहीं सूत्रें सोपीं असल्यामुळें त्यासंबंधानें विशेष लिहावयाचें कांहीं नसल्यामुळें तीं सूत्रें संमत असूनही महाभाष्यकारांनीं आपल्या ग्रंथामध्यें त्यांचा उल्लेख केला नाहीं त्याप्रमाणें वार्तिकांसंबंधानेंही म्हणतां येतें. शिवाय तसा वार्तिकपाठ तयार करण्याला दुसरी एक अडचण अशी उपस्थित होते कीं जीं भाष्यवार्तिकें म्हणजे भाष्यकारांनीं स्वतंत्र केलेलीं वचनें आहेत तींही त्या वार्तिकपाठामध्यें घुसडलीं जातील.

## ६. वार्तिकांमधील ' उक्तम् ' व ' वक्ष्यते ' या शब्दांविषयीं विवेचन.

" सूत्रकारांनी केलेला मूळचा सूत्रपाठ हल्लीं भ्रष्ट झाला आहे असें भट्टोजी दीक्षितांनीं मनोरमा ग्रंथामध्यें स्पष्टच लिहिलें आहे. त्याप्रमाणेंच मूळचा वार्तिकपाठही भ्रष्ट झाला असण्याचा संभव आहे. आणखीही अडचण अशी उपस्थित होते कीं ह्या वार्तिकग्रंथामध्यें 'उक्तम्' म्हणजे हें पूर्वी सांगितलें आहे असें म्हटलें आहे. ज्या कांहीं ठिकाणीं 'उक्तम्' असें म्हटलें आहे त्यांपैकीं बऱ्याच ठिकाणीं त्यासंबंधानें लिहितांना महाभाष्यामध्यें 'तें अमुक सांगितलें आहे' असें जें दाखविलें आहे तें पुढील वार्तिकामध्यें दिसतें; पूर्वीच्या वार्तिकामध्यें दिसत नाहीं. तेव्हां त्या तशा ठिकाणीं 'उक्तम्' असा भूतकालाचा निर्देश जुळत नाहीं; 'वक्ष्यते' असा भविष्यकालाचा निर्देश पाहिजे. तशीं काहीं स्थळें उदाहरणार्थ दाखवितों. अटि चोक्तम् (१।१।३वा.९) अनन्त्यविकारे (६।१।१३वा.५); उक्तं वा (१।१।१२ वा. ६) अदस ईत्वोत्वे ( ८।२।६ वा. ९ ); उक्तं वा ( १।२।४३ वा. ७ ) परवल्लिङ्ग० ( २।४।२६ वा. ६ ); अधिरीश्वरवचन उक्तम् ( १।४।९७ वा. १ ) यस्य चेश्वर० वचनं० (२।३।९ वा. १); विभक्तौ चोक्तम् ( ४।१।१ वा. १५ ) न वा विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणात् ( ७।१।१ वा. १३ ); वावचने चोक्तम् ( ३।१।२ वा. ८ ) वावचनानर्थक्यं ( ३।१।७ वा. ९ ) वगैरे. येथें 'हें पूर्वी सांगितलें आहे' अशा अर्थाचें 'अटि चोक्तम्' हें पूर्व-वार्तिक होय, आणि 'तें अमुक सांगितलें आहे' अशा 'अर्थाचें 'अनन्त्यविकारे' हें पुढील वार्तिक होय. याप्रमाणेंच पुढेंही समजावें. तेव्हां 'उक्तम्' असा भूतकालचा निर्देश जूळून येत नाहीं.

## ७. 'मूळचा वार्तिकपाठ भ्रष्ट झाला ' हें कैयटांचें विधान.

" आतां तो भूतकालचा निर्देश जुळविण्याचे दोन मार्ग दिसतातः तो भूतकालचा निर्देश आणि भाष्यकारांनीं दाखविलेलें स्थळ या दोहोंपैकीं कोणतेंही एक वार्तिक नव्हे असें समजलें पाहिजे. ज्या ठिकाणीं 'हें सांगितलेंच आहे ' एवढेंच फक्त उच्चारलेलें असतें म्हणजे 'अमक्यानें' असा सांगणाऱ्याचा निर्देश किंवा 'अमुक ग्रंथांत' असा ग्रंथाचा निर्देश केलेला नसतो तेथें तें त्याच ग्रंथात पूर्वी सांगितलेलें असतें किंवा त्या वेळीं प्रसिद्ध असलेल्या दुसऱ्या एखाद्या ग्रंथांत सांगितलेलें असतें. तेव्हां तेथें 'उक्तम्' ही वार्तिककारांची उक्ति न घेतां भाष्यकारांचीच उक्ति आहे असें गृहीत धरलें तर भाष्यकारांचे वेळीं प्रसिद्ध असलेल्या वार्तिकामधील मजकूर पाहून भाष्यकारांनीं 'उक्तम्' असें त्यासंबंधानें म्हणणें योग्य दिसतें हा एक प्रकार. किंवा दुसरा प्रकार असा दिसतोः 'उक्तम्' हें म्हणणें वार्तिककारांचेंच आहे असें गृहीत धरलें तर तें जें सांगितलेलें भाष्यकारांनीं दाखविलें आहे तें वार्तिकाचे वेळीं प्रसिद्ध असलेल्या लघुभाष्यांतील किंवा वृत्तींतील मजकूर पाहून त्यासंबंधानें 'उक्तम्' असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे असें गृहीत धरावें. या दोन प्रकारांपैकीं पहिला प्रकारच बरा दिसतो. कारण 'मृजेर्वृद्धिरचः' असें सूत्र केलें

असतां 'न्यमर्द्' या उदाहरणामध्यें अट् आगमाला वृद्धि कां होत नाहीं अशी शंका भाष्यकारांनीं केली आहे ती शंका मनांत घेऊन त्या शंकेचें उत्तर पूर्वींच वार्तिककारांनीं दिलें आहे असें म्हणण्यापेक्षां भाष्यकारांनीं घेतलेल्या शंकेचें उत्तर भाष्यकारांनींच दिलें आहे व तें उत्तर देतांना वार्तिककारांची उक्ति प्रमाण म्हणून दाखविली आहे असें म्हणणें अधिक सयुक्तिक दिसतें त्याप्रमाणें 'उक्तम्' या शब्दानें युक्त अशीं जीं जीं वाक्यें असतील तीं सर्व वाक्यें वार्तिककारांचीं न मानतां भाष्यकारांचींच मानावीं हें बरें दिसतें. 'उक्तं वा' (१।१।१२ वा.६) या वार्तिकाविषयींही असेंच समजावें. तेथें त्या वार्तिकाच्या पूर्वी 'मार्थादीदाद्यर्थानां वा' असें वार्तिक म्हणून घेतलें नाहीं तर त्याच्या पुढें 'उक्तं वा' हें वार्तिक संगतवार जुळतें तेव्हां जसें 'मार्थादीदाद्यर्थानां वा' ही भाष्योक्ति म्हणून दाखविली आहे तशी त्याच्या पुढें संगतवार जुळणारी 'उक्तं वा' ही देखील भाष्यकारांचीच उक्ति आहे असें म्हणणें सयुक्तिक दिसतें. उद्योतकारांनींसुद्धां तेथें 'हल्लीं वार्तिकपाठ भ्रष्ट झाला आहे' असें कांहीं लोकांचें मत आहे म्हणून स्पष्टच सांगितलें आहे.

## ८. वार्तिकपाठ भ्रष्ट होण्याचीं कारणें.

"वार्तिकपाठ भ्रष्ट होण्याचे कारणांचा विचार केला असतां असें दिसतें कीं वार्तिककारांनीं सूत्रामध्यें अनुक्त अंशांचें पूरण फारच थोड्या ठिकाणीं केलें आहे. इतर गोष्टींचा विचार फार केला आहे. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे सूत्रकारांनीं अमुक शब्द कां उच्चारला आहे, त्याचा उपयोग काय असावा, अमुक शब्द सूत्रकारांनीं कां बरें उच्चारला नाहीं, इत्यादि प्रकारचा जो विचार केला आहे तो नुसता एकदां समजला म्हणजे झालें. ज्याप्रमाणें लोक काव्य तोंडपाठ करतात परंतु मल्लिनाथाची टीका कोणीही तोंडपाठ करीत नाहींत. कारण टीकेचा उपयोग फक्त काव्याचा अर्थ समजण्याच्या कामीं होतो. एकदां अर्थ समजला म्हणजे त्या टीकेकडे कोणींच पाहात नाहीं. त्याप्रमाणेंच येथें होय. ज्या वार्तिकांचा उपयोग सूत्राप्रमाणें नवीन कांहीं विधेयांश सांगण्याच्या कामीं होतो तेवढींच फक्त वार्तिकें अध्ययन करणाऱ्यांना तोंडपाठ असतात. इतर वार्तिकांचा तसा उपयोग नसल्यामुळें तीं तोडपाठ करण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. त्यामुळें तो पाठ भ्रष्ट झाला असावा.

## ९. पाणिनीच्या सूत्रपाठाचें वैशिष्ट्य.

पाणिनीनें जो सूत्रपाठ केला आहे त्याची सबंध तऱ्हा अगदींच निराळी दिसते. साधु शब्द अमुक आहे हें ठरविण्याकरितां सूत्रांचा उपयोग होतोच; परंतु एखाद्या उदाहरणामध्यें एकदम दोन शास्त्रें प्राप्त होत असतील तर तेथें कोणतें शास्त्र लागू करून साधु शब्दाचा निश्चय करावा हें ठरविण्याकरितां पर शास्त्र कोणतें किंवा सपाद सप्ताध्यायींतील शास्त्र कोणतें हें समजण्याची आवश्यकता भासते. शिवाय, अमुक सूत्रानें काय सांगितलें आहे तें समजण्याकरितां मागील पदाची अनुवृत्ति पाहावी लागते म्हणून सूत्रांचा क्रम समजण्याकरितां सर्व सूत्रपाठ तोंडपाठ करावा लागतो. तशी वार्तिकपाठाची रचनास्थिति नाहीं. नवीन विधेयांश सांगणारें वार्तिकसुद्धां तें वार्तिक अमुक सूत्रावरचें आहे एवढेंच फक्त समजावें लागतें. तें सूत्र जर पर असेल तर तेथील तें वार्तिक पर समजलें जातें; त्याप्रमाणेंच तें सूत्र सपाद सप्ताध्यायींतील असेल तर तें वार्तिकही तेथलेंच समजलें जातें. तात्पर्य, वार्तिकांच्या क्रमाचा कांहींच उपयोग दिसत नाहीं. म्हणूनही वार्तिकपाठ भ्रष्ट झाला असावा असें दिसतें.

## १०. सूत्रपाठांतील अनुनासिक, उदात्त वगैरे वर्णधर्मांच्या पाठाचें भ्रष्टत्व.

"सूत्रांच्या क्रमाचा उपयोग असल्यामुळें सर्व सूत्रपाठ तोंडपाठ करण्याचा प्रघात जरी लोकांमध्यें दिसतो तरी पाणिनीनें सूत्रपाठ रचतांना उदात्त, अनुदात्त वगैरे स्वर जसे लाविले तशा स्वरांचा पाठ भ्रष्ट झालाच आहे. कारण, साधु शब्द कोणता तें ठरविण्याचे कामीं त्या स्वरांचा फारसा उपयोग नाहीं. एखाद्या ठिकाणीं जरी उपयोग असला तरी तेवढ्यापुरती मनांत खूण धरली म्हणजे काम भागतें. अनुनासिकाचा पाठ असाच भ्रष्ट झाला आहे. स्वौजसमौट् (४।१।२) या सूत्रामध्यें प्रथमेच्या एकवचनाच्या सु प्रत्ययाचा उकार आणि पंचमीच्या एकवचनाच्या ङसि प्रत्ययाचा इकार हे दोन वर्ण मूळचे पाणिनीनें अनुनासिक उच्चारले आहेत. जरी अनुनासिकाचा पाठ कायम असता तरी फक्त ङसि प्रत्ययाचा इकार अनुनासिक उच्चारला आहे एवढेंच समजलें असतें. सु प्रत्ययाच्या उकाराला संधिकार्य होऊन वकार झाल्यामुळें मूळचा उकारच मुळीं उच्चारला जात नसतो. तेथें तो अनुनासिक आहे असें कसें कळणार? तेव्हां उदाहरणामध्यें त्या उकाराचा इत्संज्ञा होऊन लोप होत असल्यामुळें मूळचा तो अनुनासिक असावा असें इत्संज्ञा हें कार्य पाहून त्यावरून अनुमानानें मानावें लागतें. त्याचप्रमाणें पाठ भ्रष्ट झाला तरी ङसि प्रत्ययाच्या इकाराविषयीं तो अनुनासिक उच्चारला असावा असें मानतां येईल, तेव्हां वर्णांचा पाठ कायम असून वर्णांच्या धर्मांचा पाठ भ्रष्ट झाला असावा असें वाटतें. उदात्त, अनुदात्त, स्वरित व अनुनासिक हे चार वर्णधर्म होत.

## ११ पाणिनीची लाघवयुक्त लेखनपद्धति.

"पाणिनीनें वैदिक व लौकिक अशा दोन्ही प्रकारच्या शब्दांसंबंधानें व्याकरण केलें आहे. ह्या जगामध्यें शब्दांचा समुदाय हा किती पसरला आहे त्याचा कोणालाही अंत लागला नाहीं. पतंजलीनें असें म्हटलें आहे कीं "बृहस्पतीनें इन्द्राला देवांचीं एक हजार वर्षें-पर्यंत प्रत्येक शब्द उच्चारून शब्दशास्त्र सांगितलें, पण शब्द संपले नाहींत. बृहस्पतीसारखा प्रख्यात वक्ता, इन्द्रासारखा चलाख विद्यार्थी, एक हजार देवांचीं वर्षें अध्ययनाचा काल, तरी शब्दांचा अंत लागला नाहीं. मग आजकालची गोष्ट कशाला सांगता?"(व्या.म.भा.भाग१पृ.१२) अशा रीतीनें शब्दांचा अंत जरी लागला नाहीं तरी त्या शब्दांचे प्रकार किती आहेत त्यांची कल्पना करून त्या दिशेनें पाणिनीनें व्याकरण लिहिण्यास प्रारंभ करून आठ अध्याय सूत्र लिहिलें. हें आठ अध्याय सूत्र आज आम्हांला जरी मोठें वाटत आहे तरी शब्दसमुदायाचे मानानें फारच थोडें आहे. ज्याप्रमाणें समुद्राच्या मानानें गोष्पद समजलें जातें तसेंच हें होय. ज्या मार्गानें थोडक्यांत सांगतां येईल असा मार्ग पाणिनीनें स्वीकारला आहे. पाणिनीनें धातूंची कल्पना केली आहे. त्यांत कांहीं धातू अजन्त व कांहीं धातू हलन्त, कांहीं एकाच् तर कांहीं द्व्यच्क व कांहीं तर तीन अचांचे काल्पिले आहेत. त्या धातूंच्या पुढें प्रत्ययांची कल्पना करून तिङन्त पदांची म्हणजे क्रियापदांची माहिती दिली आहे. वाक्यामध्यें क्रियापदें व त्यांहून इतर म्हणजे नामें अशीं दोन प्रकारचीं पदें दृष्टीस पडतात. नामांमध्यें कर्ता, कर्म वगैरे कारकें, त्यांचीं विशेषणें आणि अव्ययें या सर्वांचा समावेश होतो. क्रियापदांच्या प्रत्ययांशिवाय निराळे कृत् नांवाचे प्रत्यय धातूंच्या पुढें कल्पून त्यांपासून नामें तयार केलीं आहेत. वाक्यांत आढळणारीं जोडनामें नामांच्या समासानें किंवा नामांच्या पुढें तद्धित प्रत्यय लावल्यानें होणारीं अशीं कल्पिलीं आहेत. अशा रीतीनें धातु वगैरेंच्या पुढें प्रत्ययांची कल्पना करून

विशेष फरक झालेला दिसेल तेवढ्यापुरते कांहीं ठिकाणीं आदेश, कांहीं ठिकाणीं आगम व कांहीं ठिकाणीं लोप अशी कल्पना करून थोडक्यांत सर्व प्रकारच्या पदांची माहिती होण्याकरितां सर्वांचा संग्रह केला आहे. त्यांत कांहीं ठिकाणीं अनेक शब्दांतील कांहीं भाग सारखा दिसत असेल तर तेथें त्याकरितां सामान्य नियम दिला आहे; व कांहीं थोड्या ठिकाणीं त्या भागामध्यें फरक दिसत असेल तर तेथें तेवढ्यापुरता त्या सामान्य नियमाचा अपवाद सांगितला आहे. अशा रीतीनें एवढ्या मोठ्या शब्दराशीचा जो हा थोडक्यांत अनुगम पाणिनीनें केला आहे त्यापेक्षां थोडक्यांत तर कोणालाही तो करतां येणार नाहींच; पण तितक्या प्रमाणांतही तो अनुगम होणार नाहीं. शिवाय, त्या आठ अध्याय सूत्रांमध्यें एकही शब्द फुकट उच्चारला आहे असें मोठ्या बुद्धिमान् मनुष्यालाही म्हणतां येणार नाहीं. पतंजलीनें तर एका ठिकाणीं पाणिनी-संबंधानें असे उद्गार काढले आहेत कीं "सर्वांना पूज्य व प्रमाणभूत आचार्य पाणिनि यांनीं हातांत दर्भांचें पवित्रक घालून शुद्ध जागेवर पूर्वेकडे तोंड करून मोठ्या प्रयत्नानें सूत्रें रचिलीं, तेव्हां त्या सूत्रांमध्यें एखादा वर्ण सुद्धां निरुपयोगी सांपडणें कठीण, मग सबंध सूत्राची गोष्ट बाजूलाच राहू दे."

## १२. रीश्वरादीश्वरान्मा भूत्० या कारिकेंतील लाघवाचा विचार.

"जगामध्यें जी संक्षिप्त बोलण्याची पद्धत कांहीं ठिकाणीं दृष्टीस पडते तेथें त्या संक्षिप्त बोलण्याचा अभिप्राय काय आहे व तेथें ज्यास्त अध्याहृत पदें कोणतीं घ्यावयाचीं तें सर्व वक्त्यानेंच सांगावें लागतें. ही पद्धत ग्रंथकारामध्येंही दिसते. काशिकावृत्तीमध्यें (१।४।५६) पुढें दिलेला एक श्लोक आहे—

रीश्वरादीश्वरान्मा भूत् कृन्मेजन्तः परोऽपि सः।
समासेष्वव्ययीभावो लौकिकं चातिवर्तते ॥

प्राग्रीश्वरान्निपाताः (१।४।५६) या सूत्रामध्यें पाणिनीनें 'रीश्वर' असा अनर्थक शब्द कां उच्चारला आहे, प्रागीश्वरात् असा 'ईश्वर' शब्दच कां उच्चारला नाहीं या गोष्टीचा विचार या श्लोकांत केला आहे. हा श्लोक काशिकाकारांनीं स्वतः करून घातला आहे किंवा पूर्वींच्या वृत्तीमधील आहे तें समजण्याला आज कांहींच साधन नाहीं. कसेंही असो, हें संक्षिप्त भाषण कसें आहे तें आपणाला पहावयाचें आहे. 'प्राग्रीश्वरात्' या सूत्रामध्यें 'रीश्वरात्' असें उच्चारून 'अधिरीश्वरे' (१।४।९७) या 'रीश्वर' शब्दापूर्वींपर्यंत जी निपात या संज्ञेची मर्यादा दाखविली आहे तेथें 'प्रागीश्वरात्' असा ईश्वर शब्द उच्चारला असता तर 'ईश्वरे तोसुन्कसुनौ' (३।४।१३) या ईश्वर शब्दाच्या पूर्वींपर्यंत निपातसंज्ञेची मर्यादा वाढली असती; ती न वाढावी याकरितां प्राग्रीश्वरात् असा 'रीश्वर' शब्द घातला आहे. असा या श्लोकांतील पहिल्या चरणाचा अर्थ आहे तो स्पष्टच आहे. पुढील तीन चरणांमध्यें मात्र त्यांतील पदांचा अर्थ व्याकरण-शास्त्रामध्यें जरी प्रसिद्ध आहे तरी त्यांत काय सांगितलें आहे तें सांगितल्याशिवाय समजावयाचें नाहीं; विलक्षण बुद्धिमान् जो असेल त्याला कदाचित् समजेल. 'ईश्वर' शब्द न उच्चारतां सूत्रकारांनीं जो 'रीश्वर' शब्द उच्चारला आहे त्याचें कारण पहिल्या चरणामध्यें जें दाखविलें आहे त्यावर आलेली शंका व तिचें उत्तर पुढील प्रत्येक चरणामध्यें दाखविलेलें आहे. दुसऱ्या चरणामध्यें 'कृन्मेजन्तः' एवढ्यानेंच

शंका सुचविली आहे: जर प्रागीश्वरात् असा ईश्वर शब्द उच्चारून 'ईश्वरे तोसुन्०' ही निपातसंज्ञेची मर्यादा घेतली तर से (३।४।९) वगैरे एजन्त कृत्-प्रत्यय व तुमुन् (३।४।१०) वगैरे मकारान्त कृत्प्रत्यय त्या मर्यादेंत सांपडत असल्यामुळें त्यांना निपात संज्ञा होऊन अव्यय संज्ञा (१।१।३७) होईल व कृन्मेजन्त: हें सूत्र व्यर्थ होईल, व अधिरीश्वरे हीच मर्यादा देण्याविषयीं तें ज्ञापक होईल. तेव्हां प्रागीश्वरात् असा ईश्वर शब्द उच्चारला तरी हरकत नाहीं अशी 'कृन्मेजन्त:' या शब्दांत शंका आहे. व 'परोऽपि स:' हें तिचें उत्तर आहे. तवै (३।४।९) वगैरे एजन्त कृत्-प्रत्यय व णमुल् (३।४।२२) वगैरे मकारान्त कृत्-प्रत्यय हे त्या मर्यादेच्या पलीकडचे आहेत. तेव्हां त्याकरितां 'कृन्मेजन्त:' हें सूत्र जरूर असल्यामुळें व्यर्थ होत नाहीं असा उत्तराचा अभिप्राय आहे. दुसरी एक शंका अशी कीं जर 'ईश्वरे तोसुन्०' ही मर्यादा घेतली तर समास सांगणारीं सूत्रें (२।१।४) त्या मर्यादेंत सांपडत असल्यामुळें समासाला निपातसंज्ञा होऊन अव्ययसंज्ञा होईल, व अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा सांगणारें 'अव्ययीभावश्च' (१।१।४१) हें सूत्र व्यर्थ होऊन पूर्वीप्रमाणें ज्ञापक होईल. या शंकेचें उत्तर असें कीं तें सूत्र व्यर्थ झालें तरी तें समासापुरतें नियमार्थ होईल. तो नियम असा कीं समासाला जर अव्यय-संज्ञा होईल तर फक्त अव्ययीभावालाच होईल इतरांना होणार नाहीं. तात्पर्य, मर्यादा कमी-करण्याला तें ज्ञापक होणार नाहीं. ही शंका व उत्तर हीं दोन्ही 'समासेष्वव्ययीभाव:' या तिसऱ्या चरणानें सुचविलीं आहेत. तिसरी एक शंका अशी येते कीं एकाद्या मालकानें 'ह्या पाहुण्याला देवळापर्यंत पोंचवून ये' असें आपल्या मनुष्याला सांगितल्यानंतर तो मनुष्य स्वभावत: पहिल्याच देवळापर्यंत त्या पाहुण्याला पोंचवितो. त्याप्रमाणें येथेंही पहिलाच जो 'ईश्वर' शब्द (१।४।९७) तोच मर्यादा म्हणून समजतां येईल. तेव्हां 'रीश्वर' शब्द उच्चारावयास नको. ह्या शंकेचें उत्तर असें कीं एखादे वेळीं बोलण्याच्या नादांत पहिलें देऊळ गेलें तरी तो जसा दुसऱ्या देवळापर्यंत जातो, तसें येथें होण्याचा संभव आहे म्हणून 'रीश्वर' शब्द उच्चारला आहे. ही शंका व उत्तर 'लौकिकं चातिवर्तते' या चवथ्या चरणानें सुचनिलीं आहेत. ह्या शंका व त्यांचीं उत्तरें मनांत घेऊन हे तीन चरण संक्षिप्त रीतीनें या श्लोकांत घातले आहेत हें सांगितल्यानंतरच ध्यानांत येईल.

## १३. पाणिनीच्या लाघवाचें वैशिष्ट्य व परसूत्राला प्राधान्य देऊन लाघवसाधन.

"वर निर्दिष्ट केलेल्या तऱ्हेचें संक्षिप्त स्वरूप पाणिनीनें आपल्या सूत्राला कोठेंही दिलें नाहीं. तात्पर्य, पाणिनीच्या सूत्रामध्यें एकही अक्षर कमी करतां येत नाहीं; व एकही अक्षर ज्यास्त घालण्याची जरूर पडत नाहीं. पाणिनीची लाघवाकडे इतकी नजर दिसते कीं त्याच्या सूत्रांचें अध्ययन करणाऱ्याला सूत्राकडे लाघवाच्या दृष्टीनें पहाण्याची संवय लागते व त्यामुळें प्रसंगविशेषीं 'अर्धमात्रेचें लाघव होतें असें वाटलें कीं पुत्रजन्मा-इतका आनंद होतो' अशा अर्थाची 'अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सवं मन्यन्ते वैयाकरणा:' ही म्हण लोकांमध्यें प्रचारांत आहे. शिवाय, पाणिनीनें आपल्या सूत्रांचा क्रम असा कांहीं मजेदार योजिला आहे कीं ज्या उदाहरणामध्यें दोन किंवा ज्यास्त नियम एकदम लागू होत असतील व त्यांमधील एकच नियम तेथें इष्ट असेल तेथें जो नियम पाहिजे असेल तो नियम ह्या सूत्रक्रमानें इतर नियमांच्या पुढें त्यानें घातला आहे आणि "दोन सारखे नियम एका ठिकाणीं एकदम लागू होत असतील तर त्या नियमांमध्यें पर जो असेल तोच तेथें लागू करावा" अशी सामान्य एक परिभाषा "विप्रतिषेधे परं कार्यम्" (१।४।२) करून ठेविली आहे. उदा० 'रामेभ्य:'

या चतुर्थीबहुवचनाच्या उदाहरणामध्यें 'सुपि च' (७।३।१०२) या सूत्रानें दीर्घ करावा किंवा 'बहुवचने झल्येत्' (७।३।१०३) या सूत्रानें एकार करावा असा संशय उत्पन्न झाला असतां तेथें पर असल्यामुळें एकारच होतो. पाणिनीनें 'सुपि च' या सूत्राच्या पुढेंच 'बहुवचने झल्येत्' हें सूत्र घातलें आहे. अगदीं पुढेंच असलें पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. मध्यें व्यवधान असलें व तें कितीही असलें तरी हरकत नाहीं. पाणिनीनें "विप्रतिषेधे परम्" असा नियम केला नसता तर बहुवचनामध्यें दीर्घ होत नाहीं असा निषेध करावा लागला असता; आणि असा एकच निषेध नव्हे तर अशीं उदाहरणें हजारों आहेत कीं ज्यांकरितां प्रत्येक ठिकाणीं असा निषेध करावा लागला असता व तें गौरव झालें असतें. पाणिनीनें 'विप्रतिषेधे परं' या नियमास योग्य असा क्रम योजून व त्याकरितां फक्त एकच परिभाषा करून अनेक निषेधसूत्रें करण्याचें गौरव टाळलेलें आहे.

## १४. त्रिपादीमुळें लाघवसाधन.

"आतां ही परिभाषा ज्या सूत्रांविषयीं लागू होऊं नये असे असेल व उलट दोन सूत्रें एकदम प्राप्त झालीं असतां तेथें पूर्व सूत्रच लागू करावयाचें असेल अशीं पर सूत्रें सर्व आठव्या अध्यायाच्या शेवटच्या तीन पादामध्यें घातलीं आहेत व त्याकरितां तेथें त्या तीन पादांच्या आरंभीं पूर्वत्रासिद्धम् (८।२।१) असें एकच सूत्र करून ठेविलें आहे. तेव्हां ज्या ठिकाणीं पूर्वत्रासिद्धम् याच्या पुढील व मागील अशीं दोन सूत्रें एका ठिकाणीं एकदम येतील तेथें पूर्वींचेंच गृहीत धरावयाचें असल्यामुळें त्या एका सूत्रानें तशीं किती तरी उदाहरणें साधतात. (८।२।१ वा. १ पहा.). शिवाय 'दोन्ही सूत्रें त्या सूत्राच्या पुढें असतील व जर तीं एका ठिकाणीं एकदम येतील तर तशा ठिकाणींही त्यांतल्या त्यांत जें पूर्वीं असेल तें गृहीत धरावयाचें' हेंही काम त्याच सूत्रानें होतें. आणखीही त्या सूत्राचा एक उपयोग होतो. तो असा – पूर्वत्रासिद्धम् हें सूत्र आरंभीं असलेले तीन पाद 'त्रिपादी' या नांवानें प्रसिद्ध आहेत. त्यांच्या मागें जो सव्वा सात अध्यायांचा सर्व भाग आहे त्याला 'सपादी' म्हणतात. एखाद्या उदाहरणामध्यें त्रिपादीमधील सूत्रानें कांहीं कार्य केल्यानंतर त्या कार्यावर अवलंबूनच जर त्याच्या मागील पूर्वींच्या सूत्रानें सांगितलेलें कार्य प्राप्त होईल तर तें होत नाहीं. (भाष्य ८।३।३३. भाग६ पृ. ४१७ स्तं. २ पहा) मग तें पूर्वींचें सूत्र त्रिपादीमधील असो अथवा सपादीमधील असो. हे सर्व प्रकारचे उपयोग पाणिनीनें 'पूर्वत्रासिद्धम्' एवढें एकच सूत्र करून साधिले आहेत. म्हणूनच तेथें 'पूर्वं कार्यम्' असें न म्हणतां 'असिद्धम्' असें म्हटलें आहे. याच कल्पनेनें 'षत्वतुकोरसिद्धः' (६।१।८६) 'असिद्धवदत्राभात्' (६।४।२२) येथें असिद्ध शब्द घातला आहे. यावरून पाणिनीचे प्रयत्न लाघवाकरितां किती तरी झाले आहेत हें समजतें. तसेंच, ज्या दोन संज्ञा एकदम एका ठिकाणीं नकोत तेवढ्या सर्व संज्ञा 'आ कडारादेका संज्ञा' (१।४।१) या अधिकारामध्यें ('आ कडारात्' ह्या सूत्रापासून पुढील तीन पादांमध्यें) घातल्या आहेत. तेव्हां अर्थातच इतर विधींप्रमाणेंच त्या संज्ञांपैकींही एकच कोणती तरी जी पाहिजे असेल ती पर वगैरे कारणानें होते, त्याकरितां निराळा प्रयत्न केला नाहीं. तशाच क्रमानें तेथें त्या संज्ञा सांगणारीं सूत्रें घातलीं आहेत.

## १५. लौकिक व वैदिक दोन्ही तऱ्हेच्या शब्दांची व्याकरणानें सिद्धि.

"पाणिनीनें आपलें व्याकरण वैदिक आणि लौकिक अशा दोन्ही प्रकारच्या शब्दांसंबंधानें केलें असल्यामुळें ज्या सूत्रामध्यें 'छन्दसि' किंवा 'भाषायाम्' असें कांहीं विशेष म्हटलें नाहीं

त्या सूत्रांचा उपयोग दोन्ही प्रकारच्या शब्दांसंबंधानें होतो. तो उपयोग दोन प्रकारचा संभवतो. इष्ट प्रयोग साधण्याकरितां, आणि अनिष्ट प्रयोगाचें निवारण करण्याकरितां. प्रायः, सर्व सूत्रांचा उपयोग इष्ट प्रयोग साधणें हा आहे. एकाद्या स्थळीं जर तें सूत्र प्राप्त होत असतांनाही उपयोगांत आणलें नाहीं तर इष्ट न साधतां उलट अनिष्ट प्रयोग मात्र होऊं लागेल;तो टाळून इष्ट साधणें असा त्या सूत्राचा उपयोग आहे व तो लौकिक व वैदिक या दोन्ही शब्दांसंबंधानें होतो. कांहीं सूत्रांचा उपयोग पुढें दिल्याप्रमाणेंही होतोः तें सूत्र नसलें तरी इष्ट उदाहरण साधतेंच; पण स्वतंत्र रीतीनें अनिष्टही उदाहरण होऊं लागतें व त्याचें निवारण त्या सूत्रानें केलें जातें. उदा–अस्तेर्भूः(२।४।५२) हें सूत्र नसलें तरी भू धातूपासून बभूव वगैरे उदाहरणें साधतातच. फक्त अस् धातूचें ' आस ' असें जें स्वतंत्र रूप होऊं लागतें तें होऊं न देणें हा त्या सूत्राचा उपयोग होय. अशा प्रकारचा उपयोग मात्र लौकिक शब्दांसंबंधानेंच संभवतो; वैदिक शब्दांसंबंधानें संभवत नाहीं. कारण, इष्ट प्रयोग साधून केवल आणखी अनिष्ट प्रयोगही वेदामध्यें संभवणार कसा ? त्या अनिष्ट प्रयोगघटित वाक्याला वेद असें म्हणतांच येणार नाहीं. म्हणूनच ' नित्यं छन्दसि ' ( ४।१।४६ ) हें सूत्र नको असें अभियुक्त म्हणतात. परंतु, अशा रीतीनें त्या सूत्राचा उपयोग नसला तरी तें सूत्र करण्यांत पाणिनीचा अभिप्राय असा दिसतो कीं त्या सूत्राच्या मागील ' बह्वादिभ्यश्च ' ( ४।१।४५ ) या सूत्रानें बहु वगैरे शब्दांहून स्त्रीलिंगी ङीष् प्रत्यय विकल्पानें सांगितला असल्यामुळें बह्वी व बहुः अशीं दोन रूपें लोकामध्यें होतात; पण त्याच्या पुढें 'नित्यं छन्दसि' हें सूत्र केल्यामुळें वेदामध्यें फक्त बह्वी असें एक प्रकारचेंच रूप व्हावें. तसेंच ' उर्ऋत् ' ( ७।४।७ ) या सूत्रानें ऋकार आदेश विकल्पानें सांगितला आहे. त्यामुळें अचीकृतत् आणि अचिकीर्तत् अशीं दोन रूपें लोकामध्यें होतात. त्याच्या पुढें ' नित्यं छन्दसि ' या सूत्रानें वेदामध्यें फक्त अचीकृतत् असें एक प्रकारचेंच रूप होतें असें सांगितलें आहे. बह्वी व अचीकृतत् हीं रूपें जरी पूर्वसूत्रानें साधत आहेत व दुसरीं रूपें वेदामध्यें नसल्यामुळें आपोआपच होणार नाहींत म्हणून 'नित्यं छन्दसि' हें सूत्र जरी नकोसें होतें, तरी वेदाचा अंत नसल्यामुळें त्यामध्यें कोठेंही बहुः व अचिकीर्तत् हीं रूपें नाहींतच अशी लोकांची खात्री झाली नसती; ती खात्री व्हावी म्हणून पाणिनीनें 'नित्यं छन्दसि' सूत्र केलें आहे. पाणिनीला तपश्चर्येच्या जोरावर पूर्णपणानें वेदाचें ज्ञान होतें. म्हणूनच त्याच्या तोंडांतून " नित्यं छन्दसि " असें सूत्र निघालें. एवढेंच नव्हे, तर ' छन्दोवत्सूत्राणि भवन्ति'(१।१।१ भाष्य, भाष्य १।४।३) या वचनानें पाणिनीच्या सूत्रांची योग्यता वेदासारखीच समजावी असें भाष्यकारांनीं स्पष्टच म्हटलें आहे.

## १६. सूत्रकारांच्या अंगची विलक्षण ईशशक्ति.

" पाणिनिसूत्रांना इतकी योग्यता येणें याचें कारण सूत्रकारांच्या अंगीं कांहींतरी विलक्षण ईशशक्ति असली पाहिजे. वेदासारखींच सूत्रें समजावीं असें म्हणण्याचा फायदा हा कीं वेदामध्यें एखादा प्रयोग चमत्कारिक दृष्टीस पडला तरी तो असाधु असें म्हणण्याची छाती सायणाचार्योंचीही होत नाहीं.उदा०—चषालं ये अश्वयूपाय तक्षति ( तै. सं. ४।६।८ ) है वैदिकवाक्य पहा. त्यावर " येऽप्यन्येऽश्वयूपार्थं चषालं यूपकटकं तक्षति तक्षणेन संस्कुर्वन्ति " असें भाष्य आहे. या वैदिक वाक्यांत ये हा बहुवचनी कर्ता असल्यामुळें तक्षति हें एकवचनी क्रियापद चमत्कारिक दिसलें तरी तें असाधु म्हणतां येत नाहीं; एवढेंच नव्हे पण तक्षन्ति असें तेथें कोणीं म्हटलें सर तसें केल्यानेंच उलट त्या मंत्राचा मंत्रपणा घालविला जातो व त्यापासून पुण्य

उत्पन्न होत नाहीं. सूत्रासंबंधानेंही असेंच समजावें. उदा.–'स्तोश्चुना श्चुः'; (पा.सू. ८।४।४०) या सूत्रामध्यें 'श्चुः' हा समाहार द्वंद्व असून तो शब्द पुंलिंगी उच्चारला आहे; हें चमत्कारिक दिसलें तरी तेथें तेंच शुद्ध समजलें जातें व पारायण करतांना तसेंच उच्चारावें लागतें; नाहीं तर पुण्य उत्पन्न होत नाहीं. असो, सूत्रकारांनीं स्वतः केलेल्या 'स नपुंसकम्' (पा. सू. २।४।१७) या सूत्राला झुगारून 'श्चुना श्चुः' असा पुंलिंगी केलेला प्रयोग जर त्यांच्या अंगच्या विलक्षण सामर्थ्यामुळें साधु समजला जातो तर त्यांनीं नवीन कल्पिलेले जे सांकेतिक टि, घु, भ इत्यादि संज्ञाशब्द ते साधु शब्द आहेत असें सहजच सिद्ध होतें. अर्थात् त्या टि, घु, भ इत्यादि संज्ञाशब्दांचा ज्या अर्थीं सूत्रकारांनीं संकेत केला असेल त्याच अर्थीं ते साधु शब्द समजले जाणार हें योग्यच आहे. गोणी हा शब्द गो शब्दाचा अपभ्रंश आहे. कांहीं देशांमध्यें त्या अर्थी त्या शब्दाचा उपयोग झालेला दृष्टीस पडतो. तेव्हां त्या अर्थी तो शब्द असाधूच समजला जाईल; परंतु जानपद० (पा. सू ४।१।४२) या सूत्राप्रमाणें 'आवपन' या अर्थी तो तर साधु शब्दच आहे. आतां जे शब्द मूळचे अनादि असून कांहीं विशिष्ट अर्थाचे आहेत पण पाणिनीनें मात्र त्यांचा संकेत कांहीं निराळ्या अर्थीं केला आहे असें जर असेल तर ते दोन्ही अर्थी साधु शब्दच समजले जातील. उदा०— वृद्धि व गुण हे शब्द पहा. 'असंशयं सतां सङ्गो गुणानां वृद्धिकारकः,' इत्यादि ठिकाणीं ते शब्द मूळ अर्थानें साधु शब्द आहेत. तसेंच आ, ऐ औ हे तीन वर्ण आणि अ, ए, ओ हे तीन वर्ण या अर्थींही सूत्रकारांनीं (पा. सू. १।१।१,२) संकेत केल्याप्रमाणें ते साधु शब्दच आहेत. साधु शद्बाचा प्रयोग केल्यानें पुण्य उत्पन्न होतें. श्रुतीमध्यें जसें यजेत म्हणजे यज्ञ करावा असा विधि सांगितला असल्यामुळें त्या विधीच्या जोरावर यज्ञापासून पुण्य उत्पन्न होतें अशी कल्पना केली जाते त्याप्रमाणें सूत्राविषयींही समजावें. प्रत्यय, आदेश वगैरे कार्यें सांगणाऱ्या सूत्रांचें तो प्रत्यय वगैरे कार्यें करून सिद्ध होणारा जो शब्द तो साधु समजावा आणि त्याचा प्रयोग करावा इतकें तात्पर्य आहे; आणि जर असें मानलें नाहीं तर नुसतीं प्रत्यय वगैरे कार्यें सांगण्याचा दुसरा कांहींच उपयोग असूं शकणार नाहीं.

## १७. संज्ञा–शब्दांच्या साधुत्वाविषयीं विचार.

"आतां येथें कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं टि, घु, भ वगैरे जे सूत्रकारांनीं कल्पिलेले संज्ञा-शब्द ते जर ही प्रकृति व हा प्रत्यय अशी कल्पना करून कोणत्याही सूत्रावरून सिद्ध होत नसतील तर ते शब्द साधु आहेत असें म्हणण्याला कांहीं आधार नाहीं; फार तर सूत्रकारांनीं ते शब्द वापरले आहेत एवढ्याच आधारावर त्यांना असाधु म्हणूं नका. हाच साध्वसाधुबहिर्भावपक्ष होय. वृद्धि हा शब्द जरी वृध् धातूहून क्तिन् प्रत्यय (पा. सू. ३।३।९४) करून साधत आहे तरी तो 'वाढणें' या अर्थाचा आहे. तेव्हां आ, ऐ, औ ह्या अर्थीं कल्पिलेला जो वृद्धि हा संज्ञा-शब्द तो टि, घु, भ यांप्रमाणेंच समजावा. आतां अनुनासिक, संयोग, संहिता, अवसान वगैरे शब्द ज्या अर्थीं प्रकृतिप्रत्ययाच्या कल्पनेनें साधत आहेत त्याच अर्थीं ते संज्ञा-शब्द सूत्रकारांनीं सांगितले आहेत म्हणून ते साधु शब्द होत व त्यांच्या प्रयोगापासून पुण्यही उत्पन्न होतें. यासंबंधानें इतर लोकांचें म्हणणें असें आहे कीं टि, घु, भ, गुण, वृद्धि वगैरे शब्द त्या त्या अर्थी सूत्रकारांनीं नवीन कल्पिले आहेत असें नाहीं. तर ते सर्व शब्द त्या त्या अर्थीं मूळचेच होते. त्यांत कांहीं शब्द डित्थ वगैरे शब्दांप्रमाणें अव्युत्पन्नही

असतील. सूत्रकारांनीं फक्त तीं तीं संज्ञा-सूत्रें करून या व्याकरणशास्त्रामध्यें अमुक शब्द अमुक अर्थींच गृहीत धरावा असा इषारा दिला आहे. तेव्हां अर्थातच त्या शब्दांच्या प्रयोगापासून पुण्य उत्पन्न होणारच. कारण ते सर्व शब्द साधु शब्दच आहेत. म्हणूनच सूत्रकारांनीं राजदन्तादि गणामध्यें (पा. सू. २।२।४२) वृद्धि, गुण, व गुणवृद्धि असे शब्द उच्चारले आहेत. गुण व वृद्धि या दोहोंपैकीं कोणत्याही शब्दाला द्वंद्वामध्यें पूर्वनिपात केला तरी हरकत नाहीं, कारण ते दोन्ही तऱ्हेचे शब्द साधूच आहेत असा त्या गणामध्यें ते शब्द घालण्याचा हेतु आहे. परंतु जर गुण व वृद्धि या शब्दांना त्या त्या अर्थी साधुत्वच नसेल तर त्यांच्या द्वंद्वांमध्यें पूर्वनिपाताचा विचारच करावयास नको असें होणार आहे. गुणवृद्धी असा प्रयोग सूत्रकारांनीं व त्याच सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं (पा.सू. १।१।३) केला आहे आणि वृद्धिगुणौ असा प्रयोग तेथेंच वार्तिककारांनीं (वा. ३) केला आहे.

## १८. वार्तिककारांची पाणिनिसूत्रांविषयीं आदरबुद्धि.

“ पाणिनीनें केलेल्या सूत्रांचें महत्व कात्यायन ऋषीला पूर्णपणानें अवगत होतें व तें त्याला मान्यही होतें. कोणत्याहि ग्रंथाला मान्यता दोन प्रकारांनीं मिळत असते. एक कर्त्याच्या दृष्टीनें आणि दुसरी प्रतिपाद्य विषयाच्या दृष्टीनें. ग्रंथकर्त्याच्या कालींच जी ग्रंथाला कर्त्याच्या दृष्टीनें मान्यता मिळते ती सर्वतोमुखी नसते. असें पहा कीं, लोकांमध्यें प्रत्येक मनुष्याला शत्रु, मित्र व उदासीन असे त्रिविध लोक कमीज्यास्त मानानें असतातच. तेव्हां ग्रंथकर्त्याचे पुत्र, मित्र वगैरे जे आप्त-इष्ट असतील त्यांनीं जरी त्या ग्रंथाला मान्यता दाखविली तरी इतर लोक दाखवीत नाहींत, ते उदासीनच राहतात; आणि जे शत्रू असतील ते तर उलट प्रत्यक्ष किंवा परोक्ष आक्षेपच घेत असतात; त्यामुळें अशा ग्रंथाला जर प्रतिपाद्य विषयाच्या मानानें महत्त्व न मिळेल तर त्या ग्रंथाला जी कर्त्याच्या दृष्टीनें मिळालेली मान्यता ती त्या ग्रंथकर्त्याच्या मागें कमी कमी होत जाऊन अखेरीला राहणारही नाहीं. परंतु जर प्रतिपाद्य विषयाच्या मानानें त्या ग्रंथाला महत्त्व मिळेल तर मात्र तें महत्त्व त्या ग्रंथकर्त्याच्या हयातीपेक्षां त्याच्या मागेंच ज्यास्त होत जाईल. अशा रीतीनें ग्रंथाचें महत्त्व सर्वतोमुखीं होण्याला कमींतकमी एक शतक तरी जावें लागतें. पाणिनीच्या सूत्रांचें महत्त्व असें सर्वतोमुखीं झालें असतां त्या संधींत कात्यायन महर्षि उत्पन्न झाले असावे. सूत्रांतील अमुक शब्द सूत्रकारांनीं अमुक अभिप्रायानें घातला आहे तेव्हां तो बरोबर आहे असें पुष्कळ ठिकाणीं कात्यायन महर्षींनीं वार्तिक करून त्यामध्यें वर्णिलें आहे. तेव्हां सूत्राचें महत्त्व कात्यायन महर्षींच्या मनांत किती बिंबलें होतें याची कल्पना वाचकांनींच करावी. कांहीं ठिकाणीं सूत्रांतील शब्दांवर आलेले आक्षेप दाखवून त्यांचें निरसन वार्तिककारांनीं केलें आहे. आतां कांहीं ठिकाणीं सूत्रांतील शब्द अपुरे आहेत असें दृष्टीस पडल्यावर तेथें ती उणीव भरून काढण्याकरितां कात्यायन महर्षींनीं वार्तिकें रचिलीं आहेत. तेथेंही पाणिनीला त्या गोष्टी माहीत नव्हत्या अशी कल्पना करूं नये. तशी कल्पना करण्यापेक्षां सूत्रकारांच्या पुढें अनेक विषय असल्यामुळें त्यांतील कांहीं गौण गोष्टी मनांत असूनही त्यांच्याकडे त्यांचें दुर्लक्ष झालें अशी कल्पना करावी. संभवेल व शक्य असेल ती कल्पना केली पाहिजे. मुख्य गोष्टी सुद्धां कांहीं लिहावयाच्या राहतात, पण त्या फारच थोड्या असतील तर त्यामुळें लिहिणाराचा कमीपणा वाचकांच्या मनांत सुद्धां येत नाहीं. असें पहा कीं, कात हा स्वभावतः कडू आहे खरा, परंतु थोड्या प्रमाणांत असेल तर तेवढ्यानें कमीपणा न येतां उलट विड्याचें महत्त्व ज्यास्तच वाढतें. विडा खातांना काताचा कडूपणा समजत-सुद्धां नाहीं. शिवाय, कात नसेल तर विडा बरोबर जुळतही नाहीं. अशा रीतीनें सूत्रकारांच्या

हातून ज्या कांहीं थोड्या गोष्टी लिहावयाच्या राहिल्या गेल्या त्या वार्तिककारांनीं आपल्या वार्तिकांनीं इतक्या बेमालूम भरून काढिल्या आहेत कीं 'तीं सूत्रें नव्हेत' असें कोणालाच वाटत नाहीं.

## १९. वार्तिकांचा सूत्रांमध्यें पाठ.

"अष्टाध्यायीचें पारायण करण्याचा जो सांप्रदायिक सूत्रपाठ आहे त्यामध्यें तीं वार्तिकें सूत्ररूपानेंच पढलीं आहेत. उदा०—'अचि शीर्ष'; ( ६।१।६२ ) 'अडभ्यस्तव्यवायेऽपि' (६।१।३६)' 'आत्मनश्च पूरणे' ( ६।३।६ ) 'नित्यमाम्रेडिते डाचि' ( ६।१।१०० ) 'यूनश्च कुत्सायाम्' ( ४।१।१६७ ) 'वृद्धस्य च पूजायाम्' ( ४।१।१६६ ) 'सुट् कात्पूर्वः' ( ६।१।१३५ ). तसेंच 'कौपिञ्जलहास्तिपदादण्' आणि 'आथर्वणिकस्येकलोपश्च' हींही दोन वार्तिकें सूत्रपाठामध्यें आहेत. हीं दोन भाष्यवचनेंच आहेत, व तींच सूत्रपाठामध्यें कोणीं तरी घातलीं आहेत असे कांहीं लोक म्हणतात. तसेंच 'एति संज्ञायामगात्' व 'नक्षत्राद्वा' ( ८।३।९९,१०० ) हीं दोन सुषामादि गणांतील ( ८।३।९८ ) गणसूत्रें आहेत. तींच कोणीं तरी सूत्रपाठामध्यें घातलीं आहेत. याप्रमाणें कांहीं वार्तिकें व कांहीं गणसूत्रें सूत्रपाठामध्यें जीं दिसत आहेत तीं कोणींही सूत्रपाठामध्यें घातलीं असोत तीं वचनें सूत्रांच्या अगदीं बरोबरीचीं आहेत यांत संशय नाहीं. म्हणूनच तो पाठ लोकांमध्यें अत्यंत रूढ झाला आहे. काशिकाकारांच्या पूर्वीपासूनच हा पाठ रूढ झाला असावा. कारण काशिकाकारांनीं हीं प्रक्षिप्त वचनें सूत्रेंच आहेत असें गृहीत धरूनच व्याख्या लिहिली आहे. कैयटानें दोन तीन ठिकाणीं ( ४।१।१६६,६।१।६२,६।१।१०० ) हीं वार्तिकें सूत्रामध्यें प्रक्षिप्त आहेत असें म्हटलें आहे. त्यांत सुद्धां विचार करण्यासारखी गोष्ट ही आहे कीं जो कैयट 'वार्तिकं दृष्ट्वा सूत्रेषु कैश्चित्प्रक्षिप्तम्' ( हें मूळ वार्तिककारांचें वचन कांहीं लोकांनीं सूत्रपाठामध्यें घातलें आहे ) असें 'वृद्धस्य च पूजायाम्' या वचनासंबंधानें म्हणतो तोच कैयट त्या वचनाच्या जवळच असलेलें जें 'यूनश्च कुत्सायाम्' हें वचन आहे त्यासंबंधानें 'यूनश्च कुत्सायामिति सूत्रमनार्षमिति वचनम्' म्हणजे 'यूनश्च कुत्सायाम्' हें सूत्र पाणिनीचें नाहीं म्हणून 'जीवद्वंश्यं च कुत्सितं गोत्रसंज्ञं भवतीति वक्तव्यम्' हें वचन केलें आहे असें तो म्हणतो. येथें कैयटानें हें वचन करण्याचा हेतु दाखविला आहे. परंतु हें वचन कोणीं केलें आहे तें त्यानें स्पष्ट लिहिलें नाहीं. तेव्हां हें वचन वार्तिककारांचें आहे किंवा भाष्यकारांचेंच आहे असा संशय येतो, पण जर हें वचन 'वृद्धस्य च पूजायाम्' या वचनाप्रमाणें वार्तिककारांचें असतें तर त्या दोन्ही वचनांसंबंधानें कैयटानें सारखेंच लिहिलें असतें. तात्पर्य, यूनश्च कुत्सायाम् या अर्थाचें वचन भाष्यकारांचेंच असावें असें दिसतें. कौपिञ्जलहास्तिपदादण् ( ४।३।१३२ ) हेंही वचन भाष्यकारांचेंच असावें. तेथेंही कैयटोपाध्यायांनीं 'अपाणिनीयः सूत्रेषु पाठ इत्याह' म्हणजे 'कौपिञ्जलहास्तिपदादण् याचा सूत्रांमध्यें पाठ पाणिनीनें केलेला नाहीं म्हणून हें वचन केलें आहे' असें लिहिलें आहे. कसेंही असो, तीं वचनें सूत्रपाठामध्यें घालून जो त्या वचनांसहित सांप्रदायिक सूत्रपाठ चालू झाला आहे तो तसाच गृहीत धरून त्यांचीही व्याख्या काशिकाकारांनीं इतर सूत्रांप्रमाणेंच केली आहे. तेव्हां भाष्यवचनाला दिलेलें प्रामाण्य काशिककारांना मान्य आहे असें दिसतें.

## २०. सूत्राध्ययनापासून पुण्यप्राप्ति.

"सूत्रकारांच्या अंगीं एक प्रकारची ईशशक्ति असल्यामुळें त्यांनीं केलेल्या सूत्रपाठाच्या अध्ययनापासून पुण्य उत्पन्न होतें. तशीच एक प्रकारची ईशशक्ति वार्तिककार व भाष्यकार

यांच्या अंगींही आहे. त्यामुळें साधु शब्द सिद्ध करण्याकरितां त्यांनीं केलेलीं जीं वचनें हल्लीं सांप्रदायिक सूत्रपाठांत सूत्रें म्हणूनच समजलीं जातात त्यांच्याही अध्ययनानें पुण्य उत्पन्न होतें, इतकेंच नव्हे, तर उलट पारायण करतांना चूकून एखादें सूत्र वगळलें गेलें तर जसा पाठभ्रंश झाल्यामुळें दोष लागतो तसा तीं नवीन घातलेलीं वचनें पारायण करतांना जर सूत्रपाठांतून वगळलीं गेलीं तर कमीपणा येऊन पाठभ्रंश झाल्याचा दोष लागतो. याप्रमाणें या व्याकरणशास्त्राचे आद्य प्रवर्तक असे पाणिनि, कात्यायन व पतंजलि हे जरी तीन ऋषी आहेत तरी हें व्याकरण 'पाणिनीय व्याकरण' असें पाणिनीच्या नांवानेंच प्रसिद्ध आहे. तेव्हां पाणिनीचें तपःसामर्थ्य कांहीं विशेष असलें पाहिजे. शिवाय, 'छन्दोवत्सूत्राणि भवन्ति' म्हणजे 'सूत्रें हीं वेदासारखींच समजावीं' अशी वेदतुल्यता पाणिनीच्या सूत्रालाच आहे. वार्तिककार व भाष्यकार यांच्या उक्तीला नाहीं. साधु शब्द सिद्ध करण्याच्या कामीं उपयोगीं पडणाऱ्या अशा वार्तिककार व भाष्यकार यांच्या कांहीं विधायक वचनांना जी वेदतुल्यता प्राप्त झाली आहे ती सूत्राच्या द्वारानेंच प्राप्त झाली आहे. म्हणूनच तीं वचनें सूत्रपाठामध्यें प्रक्षिप्त झालीं आहेत. शिवाय 'तदशिष्यं' ०(१।२।५३–५७) हीं पाणिनीचीं पांच सूत्रें साधु शब्द सिद्ध करण्याच्या कामीं उपयोगीं पडणारीं नसूनही तीं 'पाणिनीचीं सूत्रें' एवढ्याच दृष्टीनें सांग वेदपारायणामध्यें आवश्यक लागतात. त्यावरून पाणिनीचें विशेष तपःसामर्थ्य सिद्ध होतें. प्रामाण्य मात्र भाष्यकारवचनाला सर्वांत ज्यास्त मानिलें जातें. सूत्रकारांची प्रवृत्ति वार्तिकें पाहून झालेली नाहीं. पण वार्तिककारांची प्रवृत्ति मात्र सूत्रें पाहूनच झालेली आहे. तसेंच वार्तिककारांची प्रवृत्ति भाष्यवचनें पाहून झालेली नाहीं पण भाष्यकारांची प्रवृत्ति मात्र सूत्रें आणि वार्तिकें पाहूनच झालेली आहे. तेव्हां विधिवाक्य पाहूनच कांहीं ठिकाणीं त्या विधीची प्रवृत्ति न व्हावी याकरितां मुद्दाम प्रवृत्त झालेलें निषेधवाक्य जसें विधिवाक्यापेक्षां प्रबल समजलें जातें तसेंच येथें भाष्यकारांच्या वचनांच्या प्रामाण्याविषयीं समजावें.

## २१. सूत्रकारांचें भाषेवर प्रभुत्व.

"संस्कृत भाषेवर प्रभुत्व पाणिनि व कात्यायन या दोघांचेंही पूर्णपणानें होतें कदाचित् कात्यायन अगोदर होऊन नंतर पाणिनि झाला असता तर सूत्ररचनेचें काम कात्यायनांनीं केलें असतें व वार्तिक करण्याचें काम पाणिनीनें केलें असतें. परंतु हल्लींच्या स्थितीला अनुसरून पाहिलें असतां सूत्रकारांचें भाषेवर प्रभुत्व अलौकिकच दिसतें. असें पहा कीं, जो एखादा प्रत्यय अथवा आदेश बऱ्याच शब्दांमध्यें सारखा दिसतो त्या सर्व शब्दांपैकीं एकच शब्द सूत्रामध्यें उच्चारून त्याच्या पुढें आदि शब्द घालून त्याला गणाचें स्वरूप देऊन त्या तशा सूत्रानें त्या सर्व शब्दांना तो प्रत्यय अथवा आदेश लागू होईल अशा रीतीनें सूत्र करून ते सर्व शब्द गणपाठामध्यें दिले आहेत. अशा रीतीनें एका आकाराच्या सर्व शब्दांची माहिती होते आणि सूत्राचा सूत्रपणाही कायम राहतो. असे गण पाणिनीनें पुष्कळच केले आहेत. अशा रीतीनें अनंत प्रकारांपैकीं जे जे प्रकार ज्या ज्या शब्दांना सारखे दिसतात ते ते सर्व शब्द निवडून काढून एका ठिकाणीं दाखवून त्यांना तो तो प्रकार लावणें यावरूनच सिद्ध होतें कीं पाणिनीचें भाषेवर प्रभुत्व कांहीं अलौकिक असावें. आतां गणपाठामध्यें ज्या गणांत जे शब्द घातले आहेत तशा प्रकारचे परंतु गणांत न घातलेले असे जर कांहीं शब्द दृष्टीस पडतील तर ते शब्द त्याच गणामध्यें आहेत असें समजावें असें म्हणण्याची पाळी फारच थोड्या ठिकाणीं पाणिनीला आली आहे. तेथें त्या गणाच्या शेवटीं 'आकृतिगण

असें त्यानें म्हटलें आहे. उदा०—कृतादिगण ( २।१।५९ ) हा आकृतिगण आहे असें तेथें भाष्यकारांनींही म्हटलें आहे. एकंदर गण सुमारें २५० वर आहेत, त्यांपैकीं आकृतिगण फारच थोडे आहेत. वार्तिककारांनीं जे कांहीं २५।३० गण दाखविले आहेत, ते प्रायः आकृतिगण आहेत. आतां वार्तिककारांनाही भाषेंतील सर्व शब्दांचें ज्ञान असूं शकेल परंतु त्यांच्या कृतीवरून काय दिसतें तें येथें दाखविलें आहे.

## २२. सूत्रांचें सूचकत्व.

" सूत्र व वार्तिक या दोहोंचेंही महत्त्व सर्वतोमुखी झाल्यानंतर त्या सुमारास भाष्यकार पतंजलि झाले असावे. सूत्रांतील शब्दांचा अभिप्राय जो वार्तिकामध्यें वर्णिला आहे तो अभिप्राय भाष्यकारांनीं जागोजागीं इतक्या रीतीनें स्पष्ट करून दाखविला आहे कीं तें भाष्य वाचल्याबरोबर 'वार्तिककारांनीं दाखविलेला अभिप्राय हाच सूत्रकारांच्या मनांत असावा,' असें वाचकांना निश्चितपणें वाटूं लागतें. तेव्हां भाष्यकारांना सूत्रें व वार्तिकें यांचें महत्त्व किती वाटत असावें तें ठरविण्याचें काम वाचकांवरच सोंपवितों. सूत्रकारांच्या लिहिण्यांत राहून गेलेली उणीव जेथें जेथें वार्तिककारांनीं भरून काढली आहे तशा ठिकाणीं बहुतकरून भाष्यकारांनीं ' ही पाणिनीची उणीव नव्हे, पाणिनीनें ही गोष्ट अमुक तऱ्हेनें सुचविली आहे ' असें निदर्शनास आणिलें आहे. त्यामुळें ह्या व्याकरणशास्त्राचे आद्य प्रवर्तक पाणिनि, कात्यायन व पतंजलि हें ऋषित्रय समजलें जातें. व तेंच ऋषित्रय ह्या व्याकरणशास्त्रामध्यें प्रमाण समजलें जातें. पाणिनीची लाघवाकडे विशेष नजर असल्यामुळें त्यानें ज्या गोष्टी प्रत्यक्ष सूत्ररूपानें न सांगतां सूचित होण्यासारख्या दिसल्या अशा पुष्कळच गोष्टी स्वतःला मान्य असलेल्याही प्रत्यक्ष न सांगतां सूचित केल्या आहेत. त्या 'तज्ज्ञापयत्याचार्यः' असें म्हणून भाष्यकारांनीं उघड करून दाखविल्या आहेत. त्यामुळेंच—

'सूत्रेष्वेव हि तत्सर्वं यद् वृत्तौ यच्च वार्तिके'

असें सांप्रदायिक लोक म्हणत आले आहेत. ' वृत्तीमध्यें आणि वार्तिकामध्यें जें कांहीं सूत्रापेक्षां निराळें लिहिलेंसें वाटतें तें सर्व सूत्रामध्येंच आहे ' असा त्याचा अर्थ आहे.

## २३. वृत्तिग्रंथ.

" पाणिनीनें सूत्रें रचिल्यानंतर त्याच शतकांत किंवा त्याच्या पुढील शतकांत भाष्यकारांच्या पूर्वीं कोणीं तरी वृत्ति ग्रंथ लिहिलेला असावा. सूत्रांचा अर्थ स्पष्ट रीतीनें दाखविणाऱ्या ग्रंथाला 'वृत्तिग्रंथ' म्हणतात. सिद्धान्तकौमुदी ग्रंथामध्यें विद्वद्वर्य भट्टोजी दीक्षितांनीं प्रत्येक सूत्रापुढें जो त्या सूत्राचा अर्थ लिहिला आहे त्याला 'वृत्ति' असें म्हणण्याचा परिपाठ याच अर्थानें पडलेला असावा. काशिकाकारांनीं आरंभीं 'वृत्तौ भाष्ये तथा धातुनामपारायणादिषु' या श्लोकामध्यें 'भाष्ये वृत्तौ' असें न म्हणतां ' वृत्तौ भाष्ये ' अशा क्रमानें जो निर्देश केला आहे त्यावरून भाष्याच्या पूर्वीं वृत्तिग्रंथ झालेला असावा असें दिसतें. शिवाय 'पूर्वत्रासिद्धम्' ( ८।२।१ ) या सूत्रावर लिहितांना भाष्यामध्यें 'जीं हीं सव्वासात अध्यायांपर्यंत सूत्रें पूर्वीं दिलीं आहेत त्यांच्या दृष्टीनें पुढील तीन पाद ( म्हणजे त्यांतील शास्त्रें ) असिद्ध समजावीं', असा अर्थ लिहून शास्त्रासिद्धत्व पक्ष जो सुचविला आहे तेथें कैयटोपाध्यायांनीं ' वृत्तिग्रंथाचें म्हणणें बाजूला सारून शास्त्रासिद्धत्व पक्ष येथें भाष्यकारांनीं घेतला आहे' असें लिहिलें आहे. त्यावरून

भाष्याच्या पूर्वी वृत्तिग्रंथ झाला असावा असें स्पष्टच दिसतें. आतां तो वृत्तिग्रंथ पुढें लुप्त झाला असावा. कारण, हल्लीं कोठेंही तो उपलब्ध नाहीं. जी गोष्ट वाचकांना कळावी या उद्देशानें एकादा ग्रंथकार एकादा ग्रंथ लिहितो ती गोष्ट त्याच्या पेक्षां निराळ्या चांगल्या तऱ्हेनें किंवा सुलभ तऱ्हेनें समजूं शकेल असा दुसरा ग्रंथ लिहिला गेला म्हणजे तो पूर्वीचा ग्रंथ आपोआपच लुप्त होतो. किंवा, पूर्वींच्या ग्रंथांत चुकीचीं विधानें केलीं असतील तर त्या चुका दाखवून दुरुस्त केल्या असतां तो पूर्वीचा ग्रंथ लुप्त होतो. पूर्वींच्या वृत्तिग्रंथांतील चुका भाष्यकारांनीं दुरुस्त केल्यानंतर त्या वृत्तिग्रंथाचें महत्व लोकांना कमी भासूं लागलें, आणि पुढें काशिकाकारांनीं सूत्राचा अर्थ, उदाहरणें व प्रत्युदाहरणें लिहिल्यानंतर तो पूर्वींचा वृत्तिग्रंथ अगदींच लुप्त झाला असावा असें वाटतें.

## २४. 'सूत्र' शब्दाची व्याख्या.

"सूत्र, वार्तिक व भाष्य यांचीं जीं लक्षणें सामान्य लोकांना समजण्याकरितां अभियुक्तांनीं दाखविलीं आहेत तीं लक्षणें या व्याकरणशास्त्रांतील पाणिनीनें केलेल्या सूत्रांना, कात्यायनानें केलेल्या वार्तिकांना आणि पतंजलीनें केलेल्या भाष्याला बरोबर लागू पडतात. जणूं काय हीं उत्तम प्रकारचीं सूत्रें व तशींच वार्तिकें, आणि त्या दोहोंसंबंधानें योग्य विचार केलेलें भाष्य पाहून त्या धोरणानें अभियुक्तांनीं त्यांचीं तशीं लक्षणें केलीं आहेत कीं काय असें वाटतें. सूत्राचें लक्षण पुढें दिल्याप्रमाणें आहे—

अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद्विश्वतोमुखम् ।
अस्तोभमनवद्यं च सूत्रं शास्त्रविदो विदुः ॥

हें जें सूत्राचें प्रसिद्ध लक्षण तें लक्षण पाणिनीच्या सूत्रांना अगदीं बरोबर जुळतें. किंबहुना, हीं उत्तम प्रकारचीं सूत्रें पाहून लक्षणकारांनीं 'सूत्रें असावीं तर अशींच असावीं' असें मनांत धरूनच हें सूत्राचें लक्षण बनविलें असावें असें वाटतें. या लक्षणाचा अर्थ– ज्या गोष्टीचा उपयोग पुष्कळ ठिकाणीं होतो त्यांतील उपयोगी पडणारा असा मुख्य भाग ज्या वाक्यामध्यें थोडक्या अक्षरांनीं निःसंशय रीतीनें प्रतिपादन केला आहे म्हणजे अर्थातच ज्यामध्यें वायफळ अक्षरें मुळींच नाहींत त्या वाक्याला सूत्र म्हणतात.

## २५. 'वार्तिक' शब्दाची व्याख्या.

"सूत्रांतील शब्दांसंबंधानें विचार म्हणजे अमुक शब्द सूत्रामध्यें कशाकरितां घातला आहे आणि अमुक शब्द कां घातला नाहीं, तो घातला पाहिजे इत्यादि विचार वार्तिककारांनीं केला आहे त्यावरूनही 'यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्' हें सिद्ध होतें. वार्तिकाचें लक्षण पुढें दिल्याप्रमाणें आहे—

उक्तानुक्तदुरुक्तानां[१] चिन्ता यत्र प्रवर्तते ।
तं ग्रन्थं वार्तिकं प्राहुर्वार्तिकज्ञा मनीषिणः ॥ (पराशरपुराण. अ. १८)

याचा अर्थः—सूत्रामधील उच्चारलेला शब्द तसाच न उच्चारलेला शब्द आणि भलताच कांहीं तरी शब्द पडला असल्यासारखा भासणारा शब्द यांसंबंधीं सर्व प्रकारचा विचार ज्यांमध्यें

---

१ येथें 'द्विरुक्तानां' असा पाठही दृष्टीस पडतो.

केला जातो त्या ग्रंथाला वार्तिक असें म्हणतात. सूत्रें आणि वार्तिकें या दोहोंमधील शब्दांसंबंधानें विचार करण्याकरितां भाष्यकारांची प्रवृत्ति दिसते. त्यावरूनही 'यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्' ही गोष्ट दृढ होते.

## २६. सूत्रभेद करणें भाष्यकारांना अमान्य.

" यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम् असें आहे म्हणूनच सूत्रामध्यें कमीज्यास्तपणा करण्याकरितां वार्तिककारांची प्रवृत्ति दिसते, तशीच सूत्रें आणि वार्तिकें या दोन्हीसंबंधानें कमीज्यास्तपणा करण्याकरितां भाष्यकारांची प्रवृत्ति दिसते. जरी याप्रमाणें सूत्रामध्यें कमीज्यास्तपणा वार्तिककार आणि भाष्यकार या दोघांनीं केला आहे तरी सूत्रकार पाणिनीनें उच्चारलेल्या शब्दांचें पारायण करणाऱ्याला त्या पारायणापासून जें पुण्य लागेल तें पुण्य कांहीं कमीज्यास्त केलेले शब्द उच्चारणाऱ्याला लागावयाचें नाहीं. शिवाय, सूत्रामध्यें फिरवाफिरव करून जरी सर्व इष्ट साधत असलें तरी देखील तेथें ' सूत्रभेद ' होतो असें भाष्यकार म्हणतात. सूत्रभेद हा दोष होय. सूत्रभेद म्हणजे सूत्रामध्यें फिरवाफिरव करणें. जरी इतर सर्व गोष्टी साधत असल्या तरी सूत्रभेद हा दोष कांहीं भाष्यकार नाकबूल करीत नाहींत हें एक प्रकारचें सूत्रकारांचें महत्त्वच होय. ' सूत्रं तर्हि भिद्यते ' अशी जागोजागीं भाष्यकारांची उक्ति आहे यावरून हें स्पष्ट होतें. कारण, सूत्रकार पाणिनीचें तपःसामर्थ्य कांहीं विशेष आहे हें ' पवित्रपाणिराचार्यः०' इत्यादि ग्रंथांत भाष्यकारांनीं स्पष्टच दाखविलें आहे. तेव्हां ज्या ठिकाणीं सूत्रामध्यें कमीज्यास्तपणा वार्तिककार व भाष्यकार यांनीं दाखविला असेल तेथें फक्त इतकेंच समजावें कीं पाणिनीनें जे कांहीं सूत्रामध्यें शब्द उच्चारले आहेत त्यांचा कांहीं दृष्ट उपयोग होतो कीं नाहीं याचा त्यांनीं विचार स्पष्ट केला आहे. आतां पाणिनीच्या तोंडच्या शब्दांचा उपयोग ' पुण्य उत्पन्न होणें ' हा जर सर्व ठिकाणीं कायमच आहे तर कांहीं ठिकाणीं तरी ' दृष्ट उपयोग आहे कीं नाहीं ' हा विचार भाष्यकारांनीं विनाकारण केला आहे असें मात्र समजूं नये. कारण दृष्ट उपयोग समजूनच जें त्या शब्दांचें पारायण होतें त्यापासून विशेष उपयोग होतो असें ' यदेव विद्यया करोति ' (छां.१।१।१०) या श्रुतीवरून सिद्ध होतें. अदृष्ट उपयोग सर्व ठिकाणीं पाणिनीच्या तोंडचे शब्द उच्चारणाऱ्याला होतो हें तत्त्व सर्वमान्य आहे. ज्याप्रमाणें श्रीमहेश्वरांनीं केलेल्या 'अइउण्' इत्यादि चौदा सूत्रांसंबंधीं विचार करीत असतां भाष्यकारांनीं ऋलृक् या सूत्रामध्यें लृकाराचा कांहीं उपयोग नाहीं असें दाखविलें आहे तें भाष्यकारांचें बोलणें 'त्या लृकाराचा कांहीं दृष्ट उपयोग नाहीं' इतक्याच अर्थाचें समजावें, त्याप्रमाणेंच 'हयवरट्' या सूत्रामध्यें ' र ' हा वर्ण य आणि व या दोहोंच्या पुढें उच्चारला आहे तो य आणि व या दोन वर्णांच्या पूर्वीं उच्चारला तर त्यांत काय तोटे होतील व काय फायदे होतील असा जो विचार केला आहे तो फक्त दृष्ट फलासंबंधानेंच समजावा. सूत्रपाठ उच्चारण्यापासून जें कांहीं पुण्य उत्पन्न होणार आहे तें 'हयवरट्' असा पाठ उच्चारला असतां होणार आहे हें निश्चितच भाष्यकारांनीं गृहीत धरलें आहे. कारण वेदपाठामध्यें कमीज्यास्तपणा करण्याचें सामर्थ्य भाष्यकारांनाही नाहीं. आणि 'अइउण्' इत्यादि सूत्रांना ' वेदांचा वेद ' असें म्हणतात. त्याप्रमाणेंच येथेंही समजावें. असें पहा कीं सूत्रकार पाणिनीची लाघवाकडे प्रवृत्ति आहे हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आतां पाणिनीनें उच्चारलेल्या शब्दावरून जे शब्द साधु म्हणून समजले जातात ते तसेच शब्द त्याच्याही पेक्षां कमी शब्द उच्चारल्यानें जेथें साधु म्हणून समजले जातील तेथेंही भाष्यकार हे सूत्रकार पाणिनीचा कमीपणा समजत नाहींत. कमी शब्द उच्चारून साधु शब्द कळविण्याची तऱ्हा ही

कांहीं पाणिनीला करतां येत नव्हती असें नाहीं ; तर करतां येत होती परंतु जें कांहीं पाणिनीनें गौरव केलें आहे तें मुद्दामच केलें आहे. त्यावरून त्याला कांहीं गोष्ट सुचवावयाची आहे असा पाणिनीच्या मनांतील अभिप्राय भाष्यकारांनीं अनेक ठिकाणीं दाखविला आहे. 'सोऽयमेवं लघीयसा०' (पा. सू. ३।१।३, ६।४।४२, ८।३।३४) इत्यादि अनेक ठिकाणचें भाष्य पाहिलें म्हणजे हे ध्यानांत येईल; व त्या सुचविण्याचा उपयोग भाष्यकार स्वतः अन्यत्र दाखवीत असतातः 'किमेतस्य ज्ञापने०' हें भाष्य पहा. तेव्हां सूत्रकार पाणिनीचें महत्त्व भाष्यकारांना किती वाटत होतें याची कल्पना वाचकांनींच करावी.

## २७. 'भाष्य' शब्दाची व्याख्या.

"भाष्याचें लक्षण पुढें दिल्याप्रमाणें आहे—

सूत्रार्थो वर्ण्यते यत्र पदैः सूत्रानुकारिभिः ।
स्वपदानि च वर्ण्यन्ते भाष्यं भाष्यविदो विदुः ॥

याचा अर्थ— सूत्रांतील शब्दासारख्याच शब्दांनीं ज्या ठिकाणीं सूत्रांचा अर्थ दाखविला जातो, आणि आपणच उच्चारलेल्या पदांचा म्ह वाक्याचा अर्थ आपणच सांगितला जातो त्याला 'भाष्य' म्हणतात. पुष्कळ अर्थाचा थोडक्यांत संक्षेप करून जीं वाक्यें संक्षिप्तार्थबोधक उच्चारलीं जातात त्या वाक्यांना संग्राहक वाक्यें म्हणतात. संग्राहक वाक्यें लहान होतां होतां त्यांचें पर्यवसान शेवटीं सूत्रांपर्यंत जाऊन पोचतें. त्यांत कांहीं सूत्रें नुसतीं प्रतीक घेतल्यासारखीं फारच संक्षिप्त असतात. त्यांत किती व कोणत्या अर्थाचा संग्रह करावयाचा हें समजण्याकरितां भाष्य पहावें लागतें. त्यामुळें सूत्रकार व भाष्यकार यांमध्यें अंतर बहुशः फार थोडेंच असतें. ग्रंथकार जो ग्रंथ लिहितो तो त्यावर कोणींतरी स्पष्टीकरणार्थ टीका लिहावी अशा उद्देशानें लिहीत नाहीं; तर त्या वेळीं त्या ग्रंथापासून लोकांना चांगला उपयोग व्हावा याकरितां त्या वेळच्या प्रचलित भाषेंतच तो ग्रंथ लिहीत असतो. परंतु कालान्तरानें भाषेमध्यें विपर्यास होत असतो व तो बराच तसा झाला म्हणजे तोच ग्रंथ दुर्बोध वाटूं लागतो व त्या वेळच्या भाषेनें त्या ग्रंथाच्या स्पष्टीकरणार्थ लोकांची प्रवृत्ति होते. त्यामुळें मूळ-ग्रंथ आणि टीका-ग्रंथ यांमध्यें अंतर बरेंच असण्याचा संभव असतो. हीं लक्षणें ह्या व्याकरणशास्त्रांतील सूत्रें वगैरे ग्रंथांना बरोबर जमतात. ह्या सूत्रें वगैरे ग्रंथांचे कर्ते जे पाणिनि, कात्यायन आणि पतंजलि हे तीन ऋषि तेच या व्याकरणशास्त्राचे आद्य प्रवर्तक होत. ह्या तिघांवरच ह्या व्याकरणशास्त्राचा सर्व प्रकारचा भार आहे. मुनित्रयानुक्त असेल तें अप्रमाणच समजलें जातें. ग्रंथ चांगला असला तरी तो लोकांमध्यें सर्वतोमुखी प्रमाण समजण्याला कांहीं काल जावा लागतो. काशिकाकार हे भाष्यकारांच्या मागाहून लवकरच झाले असावेत. कारण त्यांच्या मनावर भाष्यकारांचें प्रामाण्य पूर्णपणें बिंबलें नव्हतें. भाष्यकारांना ज्या ठिकाणीं आपलें निराळें मत प्रतिपादन करावयाचें असेल त्या ठिकाणीं ते 'गोनर्दीय असें म्हणतो' असा 'गोनर्दीय' शब्दानें उल्लेख करतात. काशिकाकारही त्यांच्या मताचा उल्लेख करतांना 'गोनर्दीय असें म्हणतो' असाच उल्लेख करतात. इतर ग्रंथकार हे 'गोनर्दीय' शब्दानें उल्लेख न करतां 'भाष्यकार' अशा शब्दानें त्यांचें मत प्रदर्शित करतात. 'भाष्यकार' या शब्दानें जें महत्त्व दाखविलें जातें तितकें महत्त्व 'गोनर्दीय' शब्दानें दाखविलें जात नाहीं. बरोबरिचें नातें असेल तेथें तसा शब्द वापरला जातो. आपणच आपला

मोठेपणा कोणीही थोर मनुष्य दाखवीत नाहीं. तेव्हां ' भाष्यकार ' असा शब्द भाष्यकारांनीं आपल्याला स्वत:ला कोठेंही लाविला नाहीं. आपल्या ग्रंथाला मात्र क्वचित् ' भाष्य ' असें म्हटलें आहे. (३।३।१९ भाष्य, ३।४।६७ भाष्य). तसेंच, 'जराया जरस०' (७।२।१०१) येथें काशिकाकारांनीं 'गोनर्दीया-'चें मत सांगून त्याच्या विरुद्ध दुसरें मत ' अन्ये तु ' असा उपक्रम करून सांगितलें आहे. परंतु ग्राह्य मत कोणतें किंवा अग्राह्य कोणतें हें कांहींच सांगितलें नाहीं. यावरूनही वरील गोष्ट सिद्ध होते.

## २८. भाष्यकारांच्या वचनाचें प्रामाण्य.

" हल्लीं उपलब्ध असलेल्या काशिकेनंतरच्या ग्रंथांमध्यें भाष्याला प्रामाण्य इतकें कांहीं मानलें गेलें आहे कीं एखाद्यानें एखादी गोष्ट भाष्यविरुद्ध लिहिली कीं ती खोटी ठरविण्याकरितां ' भाष्यविरोध ' एवढेंच कारण या ग्रंथकारांना पुरेसें वाटतें. कांहीं ठिकाणीं तर भाष्यकारांनीं न सांगितलेली गोष्ट खोटी ठरविण्याला ' भाष्यकारांनीं तिच्या संबंधानें कांहींच लिहिलें नाहीं ' असेंही कारण देण्यांत येतें. भाष्यकारांनीं लिहिण्यासारखें असून जें लिहिलें नाहीं तें प्रमाण नव्हे अशी हल्लींच्या ग्रंथकारांची ठाम समजूत झालेली दिसते व त्यामुळेंच काशिकाकारां-सारख्यांनीं सुद्धां एखादी गोष्ट लिहिली असली तर वर दिलेलें कारण दाखवून ती खोटी आहे असें म्हणण्याला हल्लींचे ग्रंथकार मागें पुढें पहात नाहींत. उदा०—'मृदङ्ग' या बहुव्रीहीचें स्त्रीलिङ्गीं रूप मृदङ्गी व मृदङ्गा असें दोन प्रकारचें होतें. तसेंच सुगात्री सुगात्रा, स्निग्धकण्ठी स्निग्धकण्ठा अशीं रूपें होतात असें काशिकाकारांनीं लिहिलें आहे. परंतु तें भाष्यानुक्त म्हणून अप्रमाण आहे असें भट्टोजी दिक्षीतांनीं सिद्धान्तकौमुदीमध्यें स्त्रीप्रत्यय-प्रकरणांत स्पष्टच म्हटलें आहे; आणि हें योग्यच आहे. कारण भाषेवर प्रभुत्व मुनित्रयाचेंच आहे. साधु शब्द कोणते व असाधु शब्द कोणते याचें पूर्णपणानें ज्ञान असणें याला भाषेचें प्रभुत्व म्हणतात. पाणिनि वगैरे तीन ऋषींमध्यें सुद्धां भाष्यकारांचें भाषेवर प्रभुत्व सर्वांत जास्त आहे. 'अकच्स्वरौ तु कर्तव्यौ प्रत्यङ्गं मुक्तसंशयौ । त्वकत्पितृकः मकत्पितृकः इत्येव भवितव्यम्' (१।१।२९ म भा.भा.भाग१पृ.२३४) (युष्मद् व अस्मद् शब्दांना सर्वनाम संज्ञेचें कार्य अकच् प्रत्यय, आणि आद्युदात्त स्वर हे प्रत्येक ठिकाणीं निःसंशय करावे म्हणून त्वकत्पितृकः मकत्पितृकः अशींच रूपें झालीं पाहिजेत ) तसेंच,' इष्टमेवैतत्संगृहीतम् ' ( हें रूप तुम्हांला अनिष्ट वाटतें, परंतु वस्तुत: हें इष्टच रूप साधलें जात आहे) असे स्पष्ट शब्द ज्यांच्या तोंडांतून बाहेर पडतात त्यांचें भाषेवर प्रभुत्व किती आहे याची कल्पना वाचकांनींच करावी. ' इष्टमेवैतत्संगृहीतम् ' हें वाक्य भाष्यामध्यें अनेक ठिकाणीं आलेलें दृष्टीस पडतें. उदा०(२।४।७४ म. भा. भाग २ पृ.५०८; ४।१।७४ म. भा. भाग ४ पृ.७८; ४।१।८७ म. भा. भाग ४ पृ.९७–९८; ६।३।४३ म. भा. भाग ५ पृ. ३३१; ७।२।१०१ म. भा. भाग ६ पृ. १५८; ४।३।१५५ म. भा. क्षाग ४ पृ. २६६; ८।१।५५ म. भा. भाग ६ पृ. २९६; ८।२।२५ म. भा. भाग. ६ पृ. ३५२ ). आपल्या मनाची पूर्ण खात्री असल्याशिवाय असलें वाक्य शहाण्या मनुष्याच्या तोंडांतून कधींही बाहेर पडावयाचें नाहीं.

## २९. काशिकाकारांच्या वचनाचें प्रामाण्य.

"जे प्रयोग मुनित्रयांच्या वचनानें साधले जात नाहींत परंतु काव्यामध्यें दिसतात त्याकरितां काशिकाकारांनीं स्वतंत्र वचनें केलीं आहेत. तीं अप्रमाण आहेत असें पुढील ग्रंथकार समजू

लागले. ‘ईदूदेद्०’ (१।१।११) या सूत्रावर ‘मणीवादीनां प्रतिषेधो वक्तव्यः इति भाष्य-वार्तिककाराभ्यामपठितत्वादप्रमाणमेतत्’ असें कैयटानें स्पष्टच म्हटलें आहे. ‘मणीवादीनां प्रतिषेधो वक्तव्यः हें वचन सूत्रकारांनीं तर नाहींच, परंतु भाष्यवार्तिककारांनीं सांगितलें नसल्यामुळें अप्रमाण होय’ असा कैयटाच्या म्हणण्याचा अर्थ आहे. हें वचन म्हणजे वृत्तिकारांनीं लिहिलेलें हें वचन, असें त्याचें स्पष्टीकरण उद्योतकारांनीं केलें आहे. ‘मणी+इव अशीं पदें असतांना त्या ठिकाणीं प्रगृह्य संज्ञा होत नाहीं असें म्हणावें’ असा त्या वचनाचा अर्थ आहे. प्रगृह्य संज्ञा न झाल्यामुळें प्रकृतिभाव (६।१।१२५) होत नाहीं, आणि सवर्णदीर्घ (६।१।१०१) होऊन मणीव असा संधि होतो. काशिकाकारांनीं केलेलीं नवीन वचनें अप्रमाण आहेत असें समजण्याचें कारण असें कीं जसें भाषेवर प्रभुत्व मुनित्रयाचें आहे तसें काशिकाकारांचें नसावें. अमुक शब्द साधु आहे व अमुक शब्द असाधु आहे हें ज्ञान मुनित्रयाला तपोबलानें होणारें आहे आणि काशिकाकारांना कवि वगैरेंनीं केलेले प्रयोग पाहून हा शब्द साधु असावा असें ज्ञान अनुमानानें होणारें आहे असा त्या ज्ञानांमध्यें भेद दिसतो. परंतु कवी हे निरंकुश आहेत अशी लोकांत म्हण आहे. म्हणजे क्वचित् स्थलीं कवी हे व्याकरणांतील नियमांचें उल्लंघन करतात. तेव्हां त्यांचा प्रयोग पाहून केलेलें अनुमान बरोबरच असेल असें म्हणतां येत नाहीं. ‘वैदिक प्रयोगांसारखे कवीही सूत्राला सोडून कांहींतरी प्रयोग करतात; परंतु त्या कवींच्या कृतीवरून तसे प्रयोग इष्ट आहेत असें मात्र समजूं नये’ असें भाष्यकारांनीं (१।४।३ म. भा. भाषांतर भाग २ पृ. १३१) स्पष्टच सांगितलें आहे. तात्पर्य, सूत्रकार वेदाला अनुसरतात, म्हणजे वैदिक प्रयोग पाहून ते इष्ट आहेत असें समजून त्याप्रमाणें सूत्रें रचितात. परंतु कवींच्या संबंधानें मात्र तसें नाहीं; तर कवींनींच सूत्राला अनुसरलें पाहिजे. आतां ‘मणीवादीनां प्रतिषेधो वक्तव्यः’ हें वचन अप्रमाण समजलें तरी ‘मणीव’ इत्यादि प्रयोगांना असाधुत्व समजत नाहींत. तशा ठिकाणीं ‘इव शब्दाचा प्रयोग न करतां त्याच अर्थीं व या शब्दाचा प्रयोग केला आहे असें समजावें’ असें कैयटानेंच तेथें लिहिलें आहे.

मणीवोष्ट्रस्य लम्बेते प्रियौ वत्सतरौ मम

असा भारतामध्यें प्रयोग आहे. तसेंच—

स्फुटोत्पलाभ्यामलिदंपतीवतद्विलोचनाभ्यां कुचकुड्मलाशया ।
निपत्य बिन्दू हृदि कज्जलाविलौ मणीव नीलौ तरलौ विरेजतुः ॥ (नै. ९।८५)

असा नैषधांत प्रयोग आहे. इव शब्दाच्या अर्थीं ‘व’ शब्दाचा प्रयोग ‘शात्रवं व पपुर्यशः’ (रघुवंश४।४) असा कालिदासानें केला आहे. तेथें ‘शात्रवं च’ असाच शब्दाचा पाठ कांहीं लोक घेतात. मणीव वगैरे प्रयोगांची उपपत्ति ‘व’ शब्द घेऊन करणें हेंच बरें. त्याकरितां स्वतंत्र वचन करणें बरें नव्हे. तसें वचन घेतलें तर मणी इव अशा प्रकारचे प्रयोग मुळींच करतां येणार नाहींत. वरील नैषधाच्या श्लोकावरील टीकेमध्यें ज्या टीकाकारानें ‘मणीवादीनां प्रतिषेधो वक्तव्यः’ या वचनाचा उल्लेख केला आहे तो टीकाकार काशिकाकारांचा अनुयायी असावा. खुद्द काशिकेच्या पदमञ्जरी या टीकेमध्यें तर मखलाशीच केली आहे. ती अशी कीं—‘मणीवादीनां’ हें प्रतीक घेऊन त्याचा अर्थ लिहितांना ‘हें अपूर्व वचन करावें असा काशिकाकारांचा अभिप्राय मुळींच नाहीं; तर मणीव इत्यादि

प्रयोगांमध्यें प्रगृह्यसंज्ञाप्रयुक्त प्रकृतिभाव न होईल असें प्रतिपादन करावें अशा अभिप्रायाचें तें वाक्य आहे. तसें प्रतिपादन करण्याला हेतु इव या अर्थीं व शब्द घ्यावयाचा हा होय. म्हणजे कैयट वगैरेंनीं जें पुढें लिहिलें आहे तसेंच काशिकाकारांच्या मनांत होतें' असा अर्थ काशिकेंतील त्या वाक्याचा तेथें पदमञ्जरीकारांनीं लाविला आहे. न्यासकारांनींही पदमंजरीकारांप्रमाणेंच काशिकाकारांचा अभिप्राय दाखविला आहे. आतां या टीकाकारांनीं दाखविलेला काशिकाकारांचा अभिप्राय खुद्द काशिकाकारांच्या मनांत होता कीं नाहीं याबद्दल संशयच वाटतो. असो. एकंदरींत या व्याकरणशास्त्रामध्यें स्वतंत्र वचन करण्याचा अधिकार मुनित्रयाशिवाय कोणालाही नाहीं, हें वरील विवेचनावरून सिद्ध होतें.

## ३०. सूत्रांचे सहा प्रकार.

"पाणिनीची लाघवाकडे विशेष नजर असल्यामुळें सर्वच विधिसूत्रें न करतां त्यानें सहा प्रकारचीं सूत्रें करून सर्व काम भागविलें आहे. संज्ञा, परिभाषा, विधि, नियम, अतिदेश आणि अधिकार हे ते सहा प्रकार होत. अनेक वर्णांना किंवा अनेक शब्दांना एक संज्ञा करून ठेविली असतां ज्या ज्या ठिकाणीं त्या अनेक वर्णांचें किंवा अनेक शब्दांचें उच्चारण करण्याचा प्रसंग येईल तेथें तेथें तो एक संज्ञा-शब्द उच्चारला म्हणजे तेवढ्यानेंच तितक्या वर्णांचा अथवा तितक्या शब्दांचा बोध होतो; प्रत्येक ठिकाणीं तितके वर्ण किंवा शब्द उच्चारावे लागत नाहींत हें लाघव होय. तसेंच, परिभाषा-सूत्रें हीं लाघवाकरितांच केलीं आहेत. उदा०—'ज्या ज्या सूत्रामध्यें सप्तमी विभक्ति लावून शब्द उच्चारला असेल तेथें तेथें सांगितलेलें कार्य अव्यवहित अशा पूर्वीच्याला करावें' ( १।१।६६ ) अशी परिभाषा आहे. 'इको यणचि' म्हणजे अच् पुढें असतांना इ उ ऋ ऌ यांना क्रमानें य व र ल होतात ( ६।१।७७ ) असें विधिसूत्र आहे. तेथें अचि अशी अच् या पदाला सप्तमी लाविली आहे. त्यामुळें ते इ उ ऋ ऌ हे वर्ण अचाच्या मागेंच असले पाहिजेत व अव्यवहितच असले पाहिजेत असा नियम होतो. त्याप्रमाणेंच सप्तमी विभक्ति लावलेल्या सर्व ठिकाणीं वरच्याप्रमाणें नियम समजला जातो. बरें, तो सप्तमी-प्रत्यय सुद्धां त्या परिभाषेची प्रवृत्ति होण्याकरितांच केला आहे असें नाहीं. तो तेथें सूत्रार्थ जुळण्याकरितां करावाच लागतो. त्यांतच परिभाषेची प्रवृत्ति हें ज्यास्त काम पाणिनीनें साधून घेतलें आहे.

## ३१. अधिकारसूत्रें.

"अधिकारसूत्रें हींही लाघवाकरितांच केलीं आहेत. ज्या पदाचा संबंध पुढील अनेक सूत्रांमध्यें होतो व तो संबंध निरनिराळ्या तऱ्हेच्या शब्दांबरोबर होतो त्या पदाचाच फक्त निर्देश करून तेवढेंच स्वतंत्र अधिकार-सूत्र पाणिनीनें निराळें केलें आहे. उदा०—अनभिहिते ( २।३।१ ) इत्यादि. अनेक पदें घालूनही स्वतंत्र अधिकारसूत्र केलेलें दिसतें. उदा०—अलुगुत्तरपदे ( ६।३।१ ). अधिकाराचा संबंध कोठपर्यंत आहे हें समजण्याला कष्ट होतील अशा कांहीं ठिकाणीं ते कष्ट वाचविण्याकरितां त्या सूत्रामध्यें अवधीचा निर्देश केला आहे. उदा०—प्राग्रीश्वरान्निपाताः ( १।४।५६ ), प्राक्कडारात्समासः ( २।१।३ ), कृत्याः प्राङ् ण्वुलः ( ३।१।९५ ) इत्यादि. प्राग्दीव्यतोऽण् ( ४।१।८३ ) येथें तर दीव्यतः असा जो अवधीचा निर्देश केला आहे तो करण्यांत पाणिनीनें बुद्धिकौशल्यानें एक प्रकारचें निराळेंच

कार्य साधून घेतलें आहे. ते असें – त्या अण् या पदाची अनुवृत्ति 'अश्वपत्यादिभ्यश्च' या पुढील सूत्रांत आहे व त्याच्या पुढील 'दित्यदित्यादित्य० या सूत्रामध्यें 'ण्यः' असा दुसऱ्या प्रत्ययाचा निर्देश केला असल्यामुळें व तेथें 'च' शब्द न उच्चारल्यामुळें ती अण् पदाची अनुवृत्ति बंद होते. पण अधिकार या नात्यानें जो पुढें अण् पदाचा संबंध होतो तो पुढें ज्या ज्या सूत्रामध्यें अर्थाचा निर्देश केला आहे त्या त्याच फक्त सूत्रांमध्यें होतो. कारण, दीव्यतः असा अर्थाचा निर्देश अवधिरूपानें उच्चारल्यामुळें दीव्यति या अर्थाच्या पूर्वीचे अर्थ-निर्देशच मनांत येतात. जसें लोकामध्यें 'देवदत्तापर्यंत प्रत्येकाच्या पुढें एकेक नारळ ठेव' असें सांगितलें असतां देवदत्त हा जो अवधि तो मनुष्य असल्यामुळें त्याच्या पूर्वीच्या मनुष्यांच्याच पुढें नारळ ठेविला जातो, मध्यें कितीही खांब वगैरे इतर पदार्थ असले तरी त्यांच्या पुढें नारळ ठेविला जात नाहीं तसेंच हें होय. म्हणूनच 'तस्य समूहः' (४।२।३७) या अर्थ-निर्देशाच्या सूत्रामध्यें अधिकार या नात्यानें अण् पदाचा संबंध होतो तसा त्याच्या पुढील 'भिक्षादिभ्योऽण्' या सूत्रामध्यें अर्थनिर्देश नसल्यामुळें होणार नाहीं म्हणून तेथें निराळें अण् पद उच्चारावें लागलें. पुढें 'प्राग्वहतेष्ठक्' (४।४।१) 'प्राग्घिताद्यत्' (४।४।७४) इत्यादि सूत्रांमध्यें ज्या ज्या ठिकाणीं अवधिरूपानें अर्थाचे निर्देश केले आहेत तेथें असेंच समजावें. आतां हीं अधिकारसूत्रें स्वतंत्र न करतां तें तें पद पुढील सूत्रामध्यें घालून प्रत्येक ठिकाणीं एकेकच सूत्र केलें तर त्या त्या सूत्रामध्यें त्या त्या अधिकार पदाचा ज्याच्याशीं संबंध झाला असेल त्या पदाची पुढें अनुवृत्ति जोंपर्यंत आहे तोंपर्यंतच त्याच्याशीं संबंध पावलेलें अधिकारपद अनुवृत्त होतें असा भ्रम होईल तो न होतां अधिकार-पदाचा पुढें निर्दिष्ट केलेल्या अनेकांशीं संबंध होतो हें स्पष्ट कळावें म्हणून अधिकारसूत्रें स्वतंत्र निराळीं केलीं आहेत. उदा० 'अनभिहिते कर्मणि द्वितीया' (२।३।१२) असें एकच सूत्र केलें तर 'अनभिहिते' या पदाचा संबंध कर्मापुरताच आहे असें वाटेल. वस्तुतः त्याचा संबंध कर्मणि, संप्रदाने, कर्तृकरणयोः, इत्यादि सर्व कारकांबरोबर आहे. अधिकार हा स्वतंत्र सूत्रानेंच केला जातो असा नियम मात्र नाहीं उदा०– तयोर्य्वावचि संहितायाम् (८।२।१०८) येथून 'संहितायाम्' हा अधिकार पुढें आठवा अध्याय संपेपर्यंत चालू आहे. तेथें 'संहितायाम्' या एकाच पदाला स्वरित-प्रतिज्ञा असल्यामुळें तेवढेंच पद अधिकार आहे व त्याचाच संबंध पुढें होत आहे.

## ३२. अतिदेशसूत्रें

"अतिदेशसूत्रें हीं पाणिनीनें लाघवाकरितांच केलीं आहेत. उदा०– गाङ्कुटादिभ्योऽञ्णिन्ङित् (१।२।१) येथून ओळीनें सव्वीस सूत्रें अतिदेशाचींच आहेत. त्यांमध्यें कांहीं प्रत्ययांना ङितांसारखें समजावें व कांहीं प्रत्ययांना कितासारखें समजावें असें सांगितलें आहे. त्यामुळें यङ्, यक् असे प्रत्यक्ष ङकार व ककार असलेले प्रत्यय पुढें असतांना जीं जीं कार्यें त्यांच्या निमित्तानें होत असतात तीं तीं सर्व कार्यें 'त्यांसारखा समजावा' असें म्हण-ण्यानें होतात. जरी येथें ङिद्वत् किंवा किद्वत् असा ङित् किंवा कित् शब्दापुढें वति प्रत्यय उच्चारला नाहीं तरी ङितासारखा किंवा कितासारखा असाच अर्थ आचार्यांच्या मनांत आहे. एखाद्या सशक्त मनुष्यासंबंधानें 'हा भीम आहे' असा अभेदानें निर्देश केला असतां 'भीमा-सारखा' असाच त्याचा अर्थ लोक समजतात. आद्यन्तवत् (१।१।२१) या अतिदेश सूत्रा-मध्यें वत् प्रत्यय उच्चारल्याशिवाय अर्थबोध स्पष्ट होत नाहीं म्हणून वत् प्रत्यय उच्चारला आहे.

येथें एकस्मिन् हें उपमेयबोधक पद सप्तम्यन्त असल्यामुळें आद्यन्तयोरिव या अर्थी आद्यन्तवत् असा सप्तम्यन्ताहून इवार्थीं वति प्रत्यय केला आहे. च्णिवत् ( ६।४।६२ ) सन्वत् ( ७।४।७३ ) येथेंही असेंच समजावें. परवल्लिङ्गं० ( २।४।२६ ) लोटो लङ्वत् ( ३।४।८५ ) येथें उपमेय-बोधक पद षष्ठयन्त असल्यामुळें परस्येव परवत् तसेंच लङ इव लङ्वत् असा षष्ठयन्ताहून वति प्रत्यय केला आहे. तेथेंही अर्थबोध स्पष्ट होण्याकरितां वत् प्रत्यय उच्चारला आहे. इतर ठिकाणीं तृतीयान्ताहून तुल्यार्थी वति प्रत्यय केला असेल तेथेंही स्थानिवत् ( १।१।५६ ) वगैरे कांहीं ठिकाणीं अर्थबोध स्पष्ट होण्याकरितां वत् प्रत्यय उच्चारला आहे. तृतीयान्ताहून वत् प्रत्यय होण्यासारख्या कांहीं ठिकाणीं मात्र वत् प्रत्यय उच्चारल्याशिवाय वत् प्रत्ययाचा अर्थ सहजच मनांत येतो म्हणून त्या ठिकाणीं वत् प्रत्यय उच्चारला नाहीं. उदा०—गाङ्कुटादिभ्योऽञ्णिन् ङित् (१।२।१) असंयोगाल्लिट् कित् (१।२।५) षत्वतुकोरसिद्धः (६।१।८६) गोतो णित् (७।१।९०) पूर्वत्रासिद्धम् ( ८।२।१ ). आतां 'वति' प्रत्यय उच्चारल्याशिवाय त्याचा अर्थ सहज समजण्यासारखा असून जो कांहीं ठिकाणीं वति प्रत्यय उच्चारला आहे त्याचा हेतु असा आहे कीं उपमेय पदार्थाचें मूळचें स्वरूप वाचकांचे मनांतून लुप्त होऊं नये. असें पहा कीं, एखाद्या शक्तिमान् मनुष्याला उद्देशून ' हा भीम आहे ' असें कोणी म्हणतात. तसेंच ' हा भीमासारखा आहे ' असेंही कोणी म्हणतात. कसेंही म्हटलें तरी त्याच्या स्वरूपांत कांहीं बदल होत नाहीं, व शक्तीही कमी-ज्यास्त होत नाहीं. फक्त श्रोत्यांच्या मनामध्यें त्या मनुष्याचें मूळचें स्वरूप ' हा भीमासारखा आहे ' असें म्हणण्यांत कायम राहतें, व ' हा भीम आहे ' असें म्हणण्यांत लुप्त होतें. तीच स्थिति या शास्त्रामध्येंही समजावी. उदा०— आमन्त्रितं० ( ८।१।७२ ) या शास्त्रामध्यें अविद्यमानवत् असा वत् प्रत्यय लावून निर्देश केला आहे. तेव्हां तेथें कांहीं उदाहरणांमध्यें मूळचें विद्यमान स्वरूप धरून त्यावर अवलंबून कार्य करतां येतें (भाष्य ८।१।७२ म. भा. भाग ६ पृ.३०६ पहा. ) असिद्धवदत्राभात् ( ६।४।२२ ) येथेंही असाच उपयोग संभवतो. तोच तेथें वार्तिक-कारांनीं ( ६।४।२२.वा. १४ ) दाखविला असावा. याप्रमाणें संज्ञा, परिभाषा, अधिकार व अतिदेश या चार प्रकारच्या सूत्रांसंबंधानें विचार झाला.

## ३३. विधिसूत्रें.

" आतां विधिसूत्रें आणि नियमसूत्रें यांबद्दल विचार करावयाचा आहे. त्याकरितां पाणि-नीनें हें व्याकरण कसें लिहिलें असावें यासंबंधानें कल्पना करणें जरूर आहे. ती कल्पना अशी कीं, भाषेचें व्याकरण लिहिणारानें आरंभीं वाक्याकडे पाहिलें असतां त्यांत मुख्यत्वानें क्रियापदें दिसतात व इतर सर्व पदांचा त्यांचेकडेच संबंध झालेला दिसतो. तो संबंध साक्षात् किंवा परंपरेनें कसाही असो जे कांहीं अनेक ठिकाणीं क्रियापदाच्या आरंभींचे वर्ण सारखे दिसतात, त्यांना अनुसरून मूळ धातूची कल्पना केली जाते. त्या धातूंच्या पुढें तिङ् आणि कृत् अशा दोन प्रकारच्या प्रत्ययांची कल्पना केली जाते. तिङ्प्रत्यय लागून जें तिङन्त पद होतें त्यालाच क्रियापद म्हणतात. धातूला कृत् प्रत्यय लागून धातुसाधित नामें तयार होतात. नामांना स्त्री-प्रत्यय लागून स्त्री-प्रत्ययान्त नामें तयार होतात. त्या दोन्ही प्रकारच्या नामांना तद्धित-प्रत्यय लागून तद्धितान्त नामें तयार होतात. त्या तिन्ही प्रकारच्या नामांपैकीं कोणत्याही अनेक नामांचा समास झाला म्हणजे तीं सामासिक नामें होतात. सामासिक नामांनाही स्त्रीप्रत्यय व तद्धित-प्रत्यय लागूं शकतात. सर्व प्रकारच्या नामांना प्रथमा द्वितीया वगैरे प्रत्यय लागून सुबन्त पदें होतात. क्रियापदाशिवाय सर्वच पदें सुबन्त होत. जशीं धातूला प्रत्यय लागून धातु-

साधित नामें होतात तसे नामाला कांहीं प्रत्यय लागून धातू बनतात. हेच नामधातू होत. अशा रीतीनें अनेक प्रकारांची कल्पना करून भाषेमध्यें दिसणाऱ्या सर्व प्रकारच्या पदांचा व्याकरणांत पाणिनीनें संग्रह केला आहे.

## ३४. अपवादसूत्रें, नियमसूत्रें व निषेधसूत्रें.

"धातूच्या पुढें व नामाच्या पुढें प्रत्यय सांगणारीं विधिसूत्रें होत. शिवाय, तो प्रत्यय केल्यानंतर त्या प्रत्ययाला, त्याच्या भागाला, प्रकृतीला आणि तिच्या कांहीं भागाला त्या त्या प्रयोगाला अनुसरून आगम व लोप सांगणारीं हींही विधिसूत्रें आहेत. ज्या अनेक उदाहरणांमध्यें त्यांतील कांहीं भाग सारखा दिसत असेल त्या ठिकाणीं तो सारखा दिसणारा भाग प्रत्यय, आदेश किंवा आगम यांपैकीं ज्यानें साधत असेल तसा प्रत्यय वगैरे तेथें सांगितला जातो. तेथें त्या अनेक उदाहरणांचा संग्रह होईल अशा सामान्य शब्दानें त्या प्रत्यय वगैरेंचें विधान केलें जातें. आतां सामान्य शब्दानें संग्रह होणाऱ्यांपैकीं कांहीं विशेष ठिकाणीं तो प्रत्यय वगैरे नको असेल तर तेवढ्यापुरतें त्या प्रत्यय वगैरेंचें निषेध करणारें सूत्र केलें पाहिजे. परंतु अपवाद आणि नियम या दोन प्रकारच्या सूत्रांनीं ज्या ठिकाणीं आपोआपच निषेध सिद्ध होतो तेथें निराळें निषेध-सूत्र केलें जात नाहीं. उदा०—रमा, जाया वगैरे स्त्रीलिंगीं आकारान्त अनेक शब्द पाहून त्या धोरणानें ऱ्हस्व-अकारान्त शब्दाहून स्त्रीलिंगीं टाप् (आ) प्रत्यय होतो (४।१।४) असें सामान्यत: टाप् प्रत्ययाचें विधान केलें आहे. आतां नदी, आत्रेयी, यावती वगैरे ठिकाणीं टाप् प्रत्यय दिसत नाहीं म्हणून तेथें त्याचा निषेध केला पाहिजे; परंतु तसा निषेध सांगून भागणार नाहीं, तर तेथें निराळा ङीप् वगैरे कोणीतरी (ई) प्रत्यय सांगितलाच पाहिजे. तो जो अवश्य सांगावा लागणारा ङीप् वगैरे प्रत्यय तोच टाप् प्रत्ययाचा अपवाद समजला म्हणजे सहजच तेथें टाप् प्रत्यय होत नाहीं. अशा रीतीनें निराळें सूत्र न करतां पाणिनीनें काम भागविलें आहे. नियमासंबंधानेंहीं असेंच आहे. उदा०—हरिणा कविना, हरये कवये इत्यादि अनेक उदाहरणें पाहून त्या धोरणानें ऱ्हस्व-इकारान्त शब्दाला 'घि' संज्ञेचें विधान (१।४।७) केलें आहे. आतां पत्या पत्ये इत्यादि ठिकाणीं घिसंज्ञेचें कार्य 'ना' हा आदेश (७।३।१२०) दृष्टीस पडत नाहीं म्हणून पति शब्दाला 'घि' संज्ञेचा निषेध केला पाहिजे; परंतु तसा निषेध करून भागणार नाहीं. कारण भूपतिना, भूपतये, असें समासामध्यें 'घि' संज्ञेचें कार्य दृष्टीस पडतें व त्याकरितां समासामध्यें पति शब्दाला 'घि' संज्ञा होते असें पुनः विधान केलेंच पाहिजे. तेव्हां तेथें अवश्य विधान करावें लागणार आहे, तेवढेंच करावें, निराळें निषेध सूत्र करूं नये; तें निराळें केलेलें घिसंज्ञेचें पुनर्विधान नियमार्थ होऊन पत्या पत्ये हीं उदाहरणें सहजच साधतील. तो नियम असा कीं, पति या शब्दाला जर सामान्य सूत्रानें घिसंज्ञा कर्तव्य झाली तर ती समासामध्येंच करावी (१।४।८). आतां ज्या ठिकाणीं अपवाद किंवा नियम या दोन्ही तऱ्हा नाहींत तेथें नाइलाजास्तव निषेधसूत्र निराळें केलें आहे. उदा०—नाज्झलौ (१।१।१०). सवर्णसंज्ञेचा निषेध सांगणारें हें सूत्र आहे. निषेधसूत्रांचा अंतर्भाव विधिसूत्रांमध्येंच होतो; कारण तेथें निषेधाचें विधान केलें जातें.

## ३५. साधुशब्द व असाधु शब्द.

"याप्रमाणें सूत्रांचे सहा प्रकार करून तेवढ्यावरुन भाषेंतील सर्व शब्दांचा अनुगम ज्यानें आपल्या सूक्ष्म बुद्धीच्या जोरावर केला आहे तो लोकोत्तर पुरुष होय यांत शंका नाहीं.

काशिकाकारांनीं एका ठिकाणीं ' महती सूक्ष्मेक्षिका सूत्रकारस्य ' ( सूत्रकाराची फार बारीक दृष्टि आहे ) असें ( ४।२।७४ ) स्पष्टच म्हटलें आहे. स्वरांसुद्धां वैदिक शब्दांचा अनुगम या पाणिनीय व्याकरणामध्येंच दृष्टीस पडतो. भाषेमधील साधु शब्द कोणते हें समजण्याकरितां पाणिनीनें व्याकरण केलें आहे. भाषेमध्यें साधु शब्द किती आहेत त्याचा विचार केला असतां त्यांचा अंतच लागत नाहीं. मग असाधु शब्दाबद्दल बोलावयासच नको. एका साधु शब्दाबद्दल दहा असाधु शब्द असतात. शिवाय, साधु शब्द मूळचे आहेत तेवढेच; त्यांना वाढ नाहीं. आणि असाधु शब्दांना वाढ आहे. यापुढेंही आणखी किती वाढतील तें पण सांगतां येणार नाहीं. तेव्हां असाधु शब्दांची व्याख्या करणें झालें तर 'जे साधु शब्द नव्हेत ते असाधु' अशीच व्याख्या करावी लागेल. असो, साधु शब्दाची व्याख्या केली आहे ती अशी —

अनपभ्रष्टताऽनादिर्यद्वाऽभ्युदययोग्यता ।
व्याक्रिया व्यञ्जनीया वा जातिः काऽपीह साधुता ॥

जे अपभ्रंश नव्हेत, जे नवीन उत्पन्न झालेले नव्हेत, ज्यांच्या प्रयोगापासून पुण्य उत्पन्न होतें, अथवा व्याकरणावरून जे सिद्ध होतात ते साधु शब्द होत. या चार व्याख्यांपैकीं पहिली व्याख्या अन्योन्याश्रय दोषानें दुष्ट होते. कारण, ' जे अपभ्रंश नव्हेत ' हें ठरविण्याला अपभ्रंश कोणते तें अगोदर समजलें पाहिजे; आणि अपभ्रंश ठरविण्याला साधु शब्द कोणते तें अगोदर समजलें पाहिजे. कारण, ' जे साधु शब्द नव्हेत ते अपभ्रंश (असाधु) होत ' अशी अपभ्रंशाची व्याख्या आतांच दिलेली आहे. आतां जे लक्ष्यैकचक्षुष्क लोक मुनित्रयासारखे असतील त्यांच्या दृष्टीनें मात्र हा अन्योन्याश्रय दोष नाहीं. सूत्रांचें लक्ष्य साधु शब्द होत. सूत्रें हीं त्या साधु शब्दांचें लक्षण होत. सूत्रांकडे नजर दिल्याशिवाय ज्यांना साधु शब्द कोणते तें समजतें ते लोक लक्ष्यैकचक्षुष्क होत आणि ज्यांना साधु शब्द कोणते तें सूत्रावरूनच समजतें ते लोक लक्षणैकचक्षुष्क होत. ' जे शब्द नवीन उत्पन्न झालेले नव्हेत ते साधु शब्द होत ' किंवा ' ज्यांच्या प्रयोगापासून पुण्य उत्पन्न होतें ते साधु शब्द होत ' या दोन व्याख्या देखील लक्ष्यैकचक्षुष्कांच्या दृष्टीनेंच त्वरित उपयोगांत येतात. कारण अमुक शब्द मूळचाच आहे, किंवा अमुक शब्दाच्या उपयोगापासून पुण्य उत्पन्न होतें ही कल्पना आमच्यासारखे लक्षणैकचक्षुष्क लोक सूत्रावरूनच करणार. तेव्हां ' व्याकरणावरून जे सिद्ध होतात ते साधु शब्द होत ' हें शेवटचें लक्षणच लक्षणैकचक्षुष्क लोकांच्या उपयोगीं पडणारें आहे.

## ३६. ज्ञानपूर्वक शब्दप्रयोगानें पुण्यप्राप्ति.

" आतां सूत्रकारांनीं केलेल्या सूत्रावरून सिद्ध होणाऱ्या साधु शब्दांच्या प्रयोगापासून पुण्य उत्पन्न होतें हें खरें, परंतु तेथें पुण्य उत्पन्न करण्याची शक्ति केवल सूत्रकारांची नव्हे व केवल साधु शब्दांचीही नव्हे तर दोघांची मिळून आहे. तितकी पूर्ण शक्ति केवल सूत्रकारांचीच मानली तर सूत्रकारांनीं कांहीं सांगितलें तरी त्यापासून पुण्यच उत्पन्न होतें असें म्हणावें लागेल. ह्या सूत्रकारांनींच शिक्षेमध्यें " गीती शीघ्री शिरःकम्पी तथा लिखितपाठकः। अनर्थज्ञोऽल्पकण्ठश्च षडेते पाठकाधमाः" ( पा. शिक्षा. ३२ ) 'गात गात अध्ययन करणारा, घाईनें, किंवा मान हालवीत म्हणणारा, गुरूपदेशाशिवाय पुस्तकावरूनच वाचणारा, अर्थ न जाणणारा आणि बारीक गळ्यानें म्हणणारा, हे सहा प्रकारचे लोक पाठकाधम समजावे ' असें पाठकाधमाचें लक्षण केलें आहे. तेथेंही पाठकाधम होण्यांत पुण्य मानावें लागेल. त्याप्रमाणेंच

केवल साधुशब्द-प्रयोगामध्यें तितकी शक्ति मानिली तर केवल काव्यपाठी पौराणिक लोकांनींही केलेल्या साधुशब्दप्रयोगापासून पुण्य उत्पन्न होतें असें मानावें लागेल. आतां प्रत्येकामध्यें जेवढी शक्ति आहे त्या मानानें तेथें पुण्य उत्पन्न होणारच. 'गीती शीघ्री०' हा श्लोक म्हणण्यानें पुण्य उत्पन्न होणारच. प्रत्यक्ष पाठकाधम होण्यांत मात्र पुण्य उत्पन्न होत नाहीं. तात्पर्य, व्याकरणज्ञानपूर्वक साधु शब्दांचा प्रयोग केला तरच त्यापासून पूर्ण पुण्य उत्पन्न होणार आहे. लक्ष्यैकचक्षुष्क लोकांना जरी व्याकरणावांचून साधु शब्दांचें ज्ञान होतें तरी त्यांनीं सुद्धां व्याकरणप्रक्रियास्मरणपूर्वकप्रयोग केला तरच पूर्ण पुण्य उत्पन्न होणार आहे. 'तस्यापि शास्त्रप्रक्रियास्मरणपूर्वकप्रयोग एव धर्मोत्पत्तेः' असें नागोजीभट्टांनीं शेखरामध्यें स्पष्टच म्हटलें आहे. गोप्रदान वगैरे कर्मापासून पुण्य उत्पन्न होतें तेथें देखील दान हें कर्म आणि गोसारखी महत्त्वाची वस्तु या दोहोंच्या सामर्थ्यानेंच तें पूर्ण उत्पन्न होतें. तसेंच यज्ञ वगैरे कर्म आणि त्याला उपयोगीं पडणारें सार्थ मन्त्रज्ञान या दोहोंपासूनच उत्पन्न झालेलें पुण्य स्वर्ग वगैरे फल देणारें होतें. 'योऽग्निष्टोमेन यजते य उ चैनमेवं वेद' या श्रुतीमध्यें अग्निष्टोम याग आणि त्याला उपयोगीं असें ज्ञान ह्या दोन्ही गोष्टी जेथें असतील तेथें फलप्राप्ति होते असें स्पष्टच सांगितलें आहे. त्या श्रुतीमध्यें 'य उ च' असा समुच्चयार्थक 'च' शब्द उच्चारला आहे, 'वा' शब्द घातला नाहीं.

## ३७. कर्मामध्यें पुण्य उत्पन्न करण्याची शक्ति.

" अथवा, साधु शब्दप्रयोगामध्येंच पुण्य उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आहे. परंतु त्या सामर्थ्याचा पूर्ण उपयोग होण्याला मात्र शास्त्रप्रक्रियाज्ञानाचें साहाय्य लागतें. उदा० दानकर्माचे अंगींच पुण्य उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आहे. परंतु त्या सामर्थ्याचा विशेष उपयोग होण्याला गोसारख्या महत्वाच्या वस्तूची जरूर लागते. तसेंच, ज्योतिष्टोम वगैरे यागांमध्येंच पुण्य उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आहे. पण त्या याग वगैरे कर्मामध्यें ज्यास्त शक्ति येण्याला विद्येची म्हणजे ज्ञानाची जरूर लागते. म्हणूनच श्रुतीमध्यें 'यदेव विद्यया करोति तदेव वीर्यवत्तरं भवति' ( छा.१।१।१० ) ज्ञानपूर्वक केलें जाणारें कर्म अधिक बलयुक्त असतें असें म्हटलें आहे. या श्रुतीला धरूनच अभियुक्त म्हणतात.

श्रुतिराह भवेत्कर्म विद्यया वीर्यवत्तरम् ।
अनस्तिकल्पमितरद्यन्न विद्यापुरस्कृतम् ।

ह्या ठिकाणीं वीर्यवत्तरम् येथील तरप् प्रत्यय आणि अनस्तिकल्पम् येथील कल्पप् प्रत्यय यांवरून कर्मामध्यें पुण्य उत्पन्न करण्याची शक्ति स्वाभाविक आहे असें सिद्ध होतें. जर ती कर्माच्या अंगीं स्वाभाविक शक्ति नसेल तर साहाय्याचा तेथें कांहींच उपयोग होणार नाहीं. कारण काष्ठ, लोष्ठ वगैरेंना विरजण लावलें तरी त्यांच्या साहाय्यानें तेथें कांहीं दहीं बनत नाहीं. एका कवीनें म्हटलें आहे–' दृढेन कटिबन्धेन चित्रं किं गतिमद्भवेत् । ' बळकट कंबर बांधली म्हणून त्या साहाय्यानें चित्र कांहीं चालूं शकत नाहीं. असो.

## ३८. सूत्रकार या दृष्टीनें पाणिनीची योग्यता.

" व्याकरणशास्त्राला पाणिनीय व्याकरण म्हणतात असें पूर्वीं सांगितलेंच आहे. 'पाणिनिना प्रोक्तं पाणिनीयम्' (पाणिनीनें सांगितलेलें तें पाणिनीय होय) अशी 'पाणिनीय' शब्दाची

व्युत्पत्ति आहे. येथें पाणिनि शब्दाच्या पुढें ' छ ' प्रत्यय झाला आहे. जरी प्रोक्त या अर्थी झालेल्या या छ प्रत्ययापासून पाणिनीनें केलेलें इतका अर्थ निघत नाहीं, तरी पण वस्तुतः हें व्याकरण पाणिनीनेंच केलेलें आहे. 'कोणी तरी दुसऱ्या सूत्रकारानें केलेलीं सूत्रें पाणिनीनें फक्त शिष्यांना सांगितलीं ' असें मात्र समजूं नये. कारण, असें पहा कीं या सूत्रांची व्याख्या वार्तिककारांनीं केली आहे. आणि सूत्रें, व वार्तिकें या दोहोंची व्याख्या भाष्यकारांनीं केली आहे. तेथें ' शब्द नित्य आहेत असें गृहीत धरूनच सूत्रकारांनीं त्या शब्दांचें व्याकरण करून त्याच्या द्वारानें एक प्रकारचा धर्मनियम केला आहे ' असें वार्तिककारांनीं आरंभींच म्हटलें आहे. त्याचें स्पष्टीकरण करतांना भाष्यकारांनीं सूत्रकारांचा प्रत्यक्ष निर्देश केला आहे. शिवाय 'पूरणगुण०' ( २।२।११ ) यानें सांगितलेल्या षष्ठीसमासनिषेधाचें उदाहरण ' पाणिनेः सूत्रकारस्य ' असें भाष्यकारांनीं लिहिलें आहे. तसेंच ' उभयप्राप्तौ० ' ( २।३।६६ ) या सूत्राचें उदाहरण ' शोभना खलु पाणिनेः सूत्रस्य कृतिः, शोभना खलु पाणिनिना सूत्रस्य कृतिः ' असें भाष्यकारांनीं दिलें आहे. वार्तिककारांनींही सूत्रकार या दृष्टीनें पाणिनि या नांवाचा उल्लेख केला आहे. उदाहरणार्थ—' सिद्धं तु तद्गुणसंविज्ञानात्पाणिनेर्यथा लोके ' ( ६।१।१ वा. १५ ), ' प्रातिपदिकविज्ञानाच्च भगवतः पाणिनेः सिद्धम् ' ( ७।१।२ वा. ५ ), ' एकशेषनिर्देशाद्वा स्वरभिन्नानां भगवतः पाणिनेः सिद्धम् ' ( ८।४।६८ वा. ४ ). शिवाय, सूत्रकार या दृष्टीनें पाणिनीची योग्यता फार मोठी आहे म्हणूनच वार्तिककारांनीं ' भगवान् पाणिनि ' असें म्हटलें आहे. भाष्यकारांनीं तर ' भगवान् पाणिनि आचार्य ' असें अनेक ठिकाणीं भगवान् व आचार्य अशीं दोन्ही विशेषणें लावून पाणिनीची विशेष योग्यता दाखविली आहे. शिवाय, भाष्यकारांची ' पाणिनि ' हें विशेष नांव न घेतांच नुसत्या आचार्य शब्दानेंच पाणिनीचा निर्देश करावयाची वहिवाट दिसते. ' आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति ' असें वाक्य भाष्यामध्यें अनेक ठिकाणीं दृष्टीस पडतें. ज्या ठिकाणीं तसें वाक्य भाष्यकार घालतात त्या ठिकाणीं आचार्यांनीं केलेल्या सूत्राचा प्रत्यक्ष उपयोग एक असतोच, आणि त्याच सूत्रावरून सूचित केलेल्या गोष्टीचाही दुसऱ्या तऱ्हेनें उपयोग होतोच. तेव्हां एका कृतीनें निरनिराळीं दोन प्रकारचीं कार्यें साधतील अशीही आचार्यांची कृति असते.

### ३९. "न चेदानीमाचार्याः सूत्राणि कृत्वा निवर्तयन्ति" या भाष्यवचनाचें स्वारस्य.

" ज्याप्रमाणें कोणीं एक श्रद्धालु मनुष्यानें आंब्याच्या रोपाजवळ तर्पण केलें तर त्याच्या एका कृतीनें आंब्याच्या रोपाला पाणी मिळालें आणि पितरही संतुष्ट झाले अशीं दोनही कार्यें होतात त्याप्रमाणेंच हें होय. आचार्यांच्या कृतीमध्यें मुख्यत्वानें विशेष गोष्ट ही दिसते कीं, जे ' आचार्य ' या पदवीला पोचले असतील त्यांच्या हातून भलतीच गोष्ट कधींही होत नाहीं. लिहितांना त्यांच्या हातून खोटें वाक्य कधींही लिहिलें जाणार नाहीं. 'आचार्याः कृत्वा न निवर्तन्ते ' असें पण्डित लोक म्हणतात. भाष्यकारांनींही एका ठिकाणीं ( पृ. १२ पं. ९ ) ' न चेदानीमाचार्याः सूत्राणि कृत्वा निवर्तयन्ति' (आचार्यांनीं एकदा सूत्रें लिहिलीं तीं लिहिलीं, ते तीं परत घेत नाहींत ) असें म्हटलें आहे. या त्यांच्या म्हणण्याचा अभिप्राय कांहीं पण्डित लोक असा वर्णन करतात कीं आचार्यांच्या हातून खोटें वाक्य कधींही लिहिलें जात नाहीं. कारण, जर त्यांच्या हातून एखादें वाक्य खोटें लिहिलें गेलें असेल तर तें केव्हां तरी त्यांना परत घ्यावें लागेलच. आतां ' आचार्य हे फार हट्टी असल्यामुळें त्यांना आपली चूक कळून आली तरी ते आग्रहानें आपली चूक कबूल करीत नाहींत ' असा

अभिप्राय ' न चेदानीमाचार्याः सूत्राणि कृत्वा निवर्तयन्ति ' या भाष्याचा समजूं नये. कारण आचार्यांच्या मनामध्यें लेशतः सुद्धां आग्रह असणार नाहीं. सर्व प्रकारच्या शास्त्रार्थांसंबंधीं सिद्धान्त ज्यांच्याजवळ साठविलेले असतात, जे दुसऱ्याला सदाचार शिकवितात, आणि जे वेद व वेदार्थ यांतील मूलतत्त्व जाणतात, ते आचार्य होत. तेव्हां ते आचार्य हट्टी असतील अशी कल्पना करणें शक्य नाहीं. म्हणून ' त्यांना आपली चूक परत घेण्याचा प्रसंगच येत नाहीं' असाच भाष्यकारांचा अभिप्राय समजला पाहिजे. अर्थातच तसा प्रसंग न येण्याचें कारण ' तशी चूक न होणें ' हेंच होय. संभवेल तोच अभिप्राय समजला जातो याविषयीं एक दृष्टान्त असा आहे—'यस्य पर्णमयी जुहूर्भवति न स पापं श्लोकं शृणोति '(तै. सं. ३।५।७।२) अशी श्रुति आहे. पर्ण हें पळसाचें नांव आहे; कारण त्याची उत्पत्ति पर्णापासून आहे. जेव्हां गायत्रीनें द्युलोकांतून भूमीवर सोम आणिला तेव्हां त्याचें जें पर्ण मध्येंच गळून पडलें त्यापासून पळस वृक्ष उत्पन्न झाला अशी आख्यायिका आहे. जुहू म्हणजे होमाचें साधन असें विशेष प्रकारचें पात्र. ' ज्याचें तें पात्र पळसाच्या काष्ठाचें आहे तो निंदाद्योतक शब्द ऐकत नाहीं म्हणजे त्याची निंदा त्याचे कानीं पडत नाहीं ' असा श्रुतीचा अर्थ आहे. या श्रुतीमध्यें पर्णमय जुहूची प्रशंसा केली आहे. ' ज्याची पर्णमय जुहू असते त्याची लोक निंदा करीत नाहींत; कारण त्याच्या हातून वाईट कर्म होत नाहीं आणि म्हणूनच त्याच्या कानीं त्याची निंदा पडत नाहीं असा श्रुतीचा अभिप्राय आहे. येथें 'तो बहिरा होतो म्हणून त्याच्या कानीं त्याची निंदा पडत नाहीं' असा मात्र श्रुतीचा अभिप्राय नाहीं. कारण, तसा अभिप्राय असेल तर पर्णमय जुहूची प्रशंसा होणार नाहीं. शिवाय ' निंदाद्योतक शब्द ऐकत नाहीं ' येथें जें निंदाद्योतक असें शब्दाला विशेषण दिलें आहे त्यावरून ' प्रशंसाद्योतक शब्द त्याच्या कानीं पडतात ' असा जो गर्भित अर्थ निघतो तोही श्रुतीचा तसा भलता अभिप्राय मानिला तर जुळणार नाहीं. तात्पर्य, ' आचार्य ' या पदवीला जो पोंचतो त्याच्या हातून चूक होत नाहीं असाच ' आचार्यांनीं जीं सूत्रें एकदां लिहिलीं तीं सूत्रें ते परत घेत नाहींत ' या भाष्याचा अर्थ सिद्ध होतो.

### ४०. पाणिनिसूत्रांचें निरपवाद प्रामाण्य.

" आतां ह्या जो या वाक्याचा अभिप्राय पंडित लोकांनीं काढिला आहे तो बरोबर आहे. जरी तो अभिप्राय योग्य आहे तरी ज्या ठिकाणीं भाष्यकारांनीं हें वाक्य घातलें आहे त्या ठिकाणीं तो अभिप्राय जुळत नाहीं. भाष्यकारांनीं आरंभीं प्रस्तावनेमध्यें वार्तिककारांना उद्देशून हें वाक्य लिहिलें आहे. व्याकरण शब्दाच्या अर्थाबद्दल विचार चालू झाला असतां तेथें जर व्याकरण शब्दाचा ' शब्द ' हा अर्थ असेल तर ' वैयाकरणो योगः ' ह्या प्रयोगामध्यें व्याकरण शब्दाहून 'भव' या अर्थीं जो तद्धित प्रत्यय केला आहे तो जुळत नाहीं. कारण, योग म्हणजे सूत्र हें कांहीं शब्दांमध्यें असत नाहीं असा दोष वार्तिककारांनीं दाखविला आहे. त्या अर्थाचें ' भवे ' असें वार्तिक लिहिलें आहे. पुढें आणखी दोष दाखवितांना ' प्रोक्तादयश्च तद्धिताः' असें वार्तिक लिहिलें आहे. व्याकरण शब्दाचा अर्थ ' शब्द ' असा घेतला तर प्रोक्त वगैरे अर्थीं होणारे तद्धित प्रत्यय जुळणार नाहींत असा त्या वार्तिकाचा अर्थ आहे. ' पाणिनीयं व्याकरणं ' या प्रयोगामध्यें पाणिनि शब्दाहून ' पाणिनिना प्रोक्तं ' म्हणजे पाणिनीनें सांगितलेलें असा प्रोक्त या अर्थीं जो तद्धित छ प्रत्यय झाला आहे तो जुळत नाहीं. कारण पाणिनीनें सूत्रें सांगितलीं आहेत; शब्द कांहीं सांगितले नाहींत. येथें अशी शंका उद्भवते कीं वार्तिककारांनीं ' भवे ' हें वार्तिक निराळें कां लिहिलें तें निराळें लिहावयास नको, त्यांनीं दाखविलेला जो दोष त्या दोषाचा संग्रह दुसऱ्या वार्तिकामधील ' प्रोक्त वगैरे अर्थीं० ' यांतील वगैरे

शब्दानें होत आहे. या शंकेचें उत्तर देतांना भाष्यकारांनीं वरील वाक्य उच्चारलें आहे व त्यासंबंधानें भाष्यकारांनीं असें लिहिलें आहे कीं, आचार्य वार्तिककारांच्या आरंभीं जें मनांत आलें तें त्यांनीं लगेच 'भवे' या वार्तिकानें निर्दिष्ट केलें, आणि नंतर जें मनांत आलें तें त्यांनीं मागून निर्दिष्ट केलें; आणि आचार्योनीं एकदां जें लिहिलें तें कायमच असतें तें केंव्हांही ते परत घेत नाहींत. परत घेण्याची स्थलें दोन प्रकारचीं असतात. (१) पूर्वीं लिहिलेलें चुकलेंच असेल तर तें परत घ्यावें लागतें; आणि (२) पूर्वीं लिहिलेलें जरी चुकलें नसलें तरी तें दुसऱ्या कांहीं कारणानें वाचकांच्या ध्यानांत येण्यासारखें असेल तर तें परत घेतां येतें. प्रकृत स्थलीं दुसऱ्या प्रकारानें परत घेण्याचा प्रसंग आहे खरा; परंतु आचार्य हे केंव्हांच परत घेत नाहींत म्हणून 'भवे' हें वार्तिक तेथें कायम ठेविलें आहे. आतां या दुसऱ्या प्रकारानें परत घेण्याचा प्रसंग आला असतां तेथें परत घेतलें नाहीं तर त्या ठिकाणीं त्या परत न घेण्यापासून आचार्योचा मोठेपणा कांहींच दाखविला जात नाहीं असें जरी आहे तरी भाष्यकारांच्या तोंडचें वाक्य हें दोन्ही प्रकारांचें दर्शक असल्यामुळें पहिल्या प्रकारानें त्यांचा मोठेपणा दाखविला जात आहेच. कारण भाष्यकारांनीं दिलेलें वाक्य दोन्हीकडेही लागू पडतें. 'लिहिलेलें परत घेत नाहींत' याचें तात्पर्य 'परत घेण्यासारखें लिहीत नाहींत' असें लोक समजतातच. जसें लोकांमध्यें एखाद्या शहाण्या मनुष्यासंबंधानें बोलतांना 'तो आपली सही कधींही परत घेत नाहीं' असें म्हणतात, त्याचें तात्पर्य 'तो भलत्या मजकुरावर सही करणार नाहीं' असें लोक समजतात व त्यानेंच त्याच्या शहाणपणाची ज्यास्त प्रशंसा केली जाते तसेंच येथें समजावें.

भाष्यस्यार्थबुभुत्सूनां सौलभ्येनार्थबोधकम् ।
अदो भाषान्तरं श्रीशो मया समुदपादयत् ॥"

---

## विद्वद्वंश



- नागेशोपाध्याय १६५०–१७३०
  - रामचंद्रभट्ट तारे
  - वैद्यनाथ पायगुंडे
    - नीलकंठशास्त्री थत्ते १७६०–१८३४
      - राघवाचार्य ओक
      - राघवेन्द्राचार्य गजेन्द्रगडकर
        - नारायणाचार्य
          - अनन्ताचार्य
            - बाळाचार्य
              - नृसिंहाचार्य
              - सेतुमाधवाचार्य
              - अश्वत्थामाचार्य
              - केशवाचार्य
              - प्रल्हादाचार्य
      - गोविंदाचार्य अष्टपुत्रे
      - मेरुशास्त्री गोडबोले
        - भिकुशास्त्री गोडबोले
          - भीमाचार्य झळकीकर
          - वामनाचार्य झळकीकर
        - डेंगवेकर
          - ब्रह्मानन्द
            - प्रज्ञानन्द
              - केवलानन्द
      - कुप्पाशास्त्री
      - मोरशास्त्री साठे
        - कृष्णशास्त्री चिपळुणकर
          - विष्णुशास्त्री चिपळुणकर
      - नीलकंठशास्त्रीभट
        - विष्णुशास्त्रीभट
          - त्रिंबकशास्त्री
        - धोंडशास्त्रीभट
          - दामोदरशास्त्री साठे
      - भास्करशास्त्री अभ्यंकर १७८३–१८७१
        - काशिनाथशास्त्री अष्टपुत्रे
          - राजारामशास्त्री कार्लेकर
            - बाळशास्त्री रानडे (बालसरस्वती)
              - शिवकुमार
                - जयदेवमिश्र
              - तात्याशास्त्री पटवर्धन
                - गणपतीशास्त्री मुकाटे
              - कैलासचंद्र
                - लक्ष्मणशास्त्री
                  - राजेश्वरशास्त्री
              - विश्वनाथ दंडिभट्ट
              - गंगाधरशास्त्री तेलंग
                - गंगानाथ झा.
              - स्नेहिरामशास्त्री
                - शिवनारायण
                  - गुरुप्रसादशास्त्री
              - हेमराज पंडित (नेपाळ)
              - केशवशास्त्री मराठे
              - दामोदरशास्त्री भारद्वाज
              - रामशास्त्री तेलंग
        - अनंतशास्त्री पेंढारकर
          - डॉ. कीलहॉर्न
            - डॉ. भाण्डारकर
        - रामशास्त्री गोडबोले १८३७–१९१३
          - विठ्ठलशास्त्री धारुरकर
          - बाबाशास्त्री काळे
            - नारायणशास्त्री खिस्ते
          - रघुनाथशास्त्री अभ्यंकर
            - सदाशिवशास्त्री काशीकर
            - गणेशशास्त्री जोशी
            - गोविंदशास्त्री अभ्यंकर
          - सितारामशास्त्री आठल्ये
          - वासुदेवशास्त्री अभ्यंकर १८६३–१९४२
            - रंगाचार्य रड्डी
            - गणेशशास्त्री गोडबोले
            - शंकरशास्त्री मारुलकर
            - दिगंबरशास्त्री जोशी
            - भगवानशास्त्री धारुरकर
            - शिवरामशास्त्री छिंत्रे
            - गणेशशास्त्री शेंड्ये
            - सिद्धेश्वरशास्त्री चित्राव
            - काशिनाथ अभ्यंकर (लेखक)
            - महादेवशास्त्री साठे
            - नीलकंठराव अभ्यंकर
            - गंगाधरपंत अभ्यंकर
          - त्रिंबकशास्त्री लेले
          - कृष्णशास्त्री गोडबोले
        - नारायणशास्त्री गोडबोले
        - गंगाधरशास्त्री शेंड्ये
        - हरिशास्त्री शेंड्ये
      - दिनकरशास्त्री खांबेटे
        - रामशास्त्री
          - नारायणशास्त्री वाडीकर
      - गोपाळाचार्य कऱ्हाडकर
        - दत्तशास्त्री निगुडकर
          - वासुदेवशास्त्री निगुडकर
          - पांडुरंगशास्त्री आठल्ये
  - भैरवमिश्र
  - अहोबल

श्री

# उपोद्घात.

## व्याकरणशास्त्राच्या विकासाचे नऊ कालखंड ( १–१२ ).

### १. व्याकरणविषयक विचारांना आरंभ.

भगवान् पतञ्जलीनें केलेल्या महाभाष्याचें अध्ययन करण्यापूर्वी सामान्यरीत्या व्याकरण-शास्त्राची माहिती असणें आवश्यक आहे. व्याकरण हा शब्द वि आणि आ हे उपसर्ग जोडलेल्या कृ या धातूपासून साधला जातो. अन ( ल्युट् ) हा करणार्थी प्रत्यय घेतल्यास ( शब्दाच्या ) 'स्पष्टीकरणाचें साधन' हा व्याकरण शब्दाचा अर्थ होतो, कर्ता या अर्थी घेतल्यास 'स्पष्टीकरण करणारें' शास्त्र हा अर्थ होतो व भावार्थी घेतल्यास 'स्पष्टीकरण' असा अर्थ होतो. कोणत्याही अर्थी प्रत्यय घेतला तरी, शब्दांचें स्पष्टीकरण जिनें होतें ती विद्या, किंवा जी करते ती विद्या, किंवा स्पष्टीकरण या स्वरूपाचीच विद्या अशा अर्थानें 'शब्दस्पष्टीकरणविद्या' या अर्थी हा शब्द ब्राह्मणकालापासून उपयोगांत आला आहे. वार्तिककारांनीं आरंभींच प्रस्तावनान्हिकांत 'सूत्रे व्याकरणे षष्ठ्यर्थोऽनुपपन्नः' येथून आरंभ करून पांच वार्तिकांमध्यें 'व्याकरण' शब्दाच्या अर्थाचा विचार केला आहे. भाष्यकारांनीं वार्तिकांचें व्याख्यान करून पाणिनीच्या सूत्रांना व्याकरण कसें म्हणतां येईल तें स्पष्ट केलें आहे. 'व्या+कृ' धातूचे दाखविणें अथवा स्पष्ट करणें या अर्थी वेदामध्यें व ब्राह्मणग्रंथांमध्यें अनेक वेळां प्रयोग दिसून येतात. तैत्तिरीय संहितेमध्यें ( तै. सं. ६।४।७ ) देवांनीं इंद्राला वाणीचें स्पष्टीकरण करण्याची विनंति केली व इंद्रानें तिचें स्पष्टीकरण केलें अशी कथा आहे. या कथेवरून ब्राह्मणग्रंथांचे कालीं वैदिक शब्दांचे स्पष्टी-

---

१. करणार्थी ल्युट् 'करणाधिकरणयोश्च' ( ३.३ ११७ ) या सूत्रानें सांगितला आहे. प्रदीपकारांनीं 'शब्दे ल्युडर्थः' (म. भा. भाग १ पृ. २५) या वार्तिकाचें विवेचन करतांना 'करणे ल्युड् विधीयते, शब्दश्च व्याक्रियमाणत्वात् कर्म न तु करणमिति भावः' असें म्हटलें आहे व उद्योतकारांनीं 'स तु ( ल्युट् तु ) क्काचित्क इति भावः' असें व्याख्यान केलें आहे.

२. कर्ता या अर्थी "नन्दिग्रहिपचादिभ्यो ल्युणिन्यचः" ( ३।१।१३४ ) या सूत्रानें 'ल्यु' प्रत्यय सांगितला आहे.

३. भाव या अर्थी "ल्युट् च" ( ३।३।११५ ) या सूत्रानें ल्युट् सांगितला आहे.

४. या वार्तिकांच्या स्पष्टीकरणाकरितां ( म. भा. भाग १ पृ. २५–२७ ) पहावीं.

५. "तस्मादेवमाह । वाग्वै पराच्यव्याकृताऽवदत्ते देवा इन्द्रमब्रुवन्निमां नो वाचं व्याकुर्विति । सोऽब्रवीद् वरं वृणै मह्यं चैवैष वायवे च सह गृह्याता इति । तस्मादैन्द्रवायवः सह गृह्यते । तामिन्द्रो मध्यतोऽवक्रम्य व्याकरोत् । तस्मादियं व्याकृता वागुद्यते ॥ (तै. सं. कांड ६, प्रपाठक ४, अनुवाक ७ ).

करणाची इच्छा वेदद्रष्टया ऋषींना होती व त्याप्रमाणें ते करीत होते. वैदिक कर्मांचे वेळीं वेदाच्या ऋचा म्हटल्या गेल्या असतां शब्दरूप वेदमन्त्रांनीं देवता संतुष्ट होऊन फळें देत असत असा अनुभव लोकांना येत असे. त्यामुळें देवतांचें स्वरूप काय तसेंच मन्त्रांचें व मन्त्रस्वरूप वाणीचें स्वरूप काय हें जाणण्याची साहजिकच त्यांना इच्छा झाली. देवतांच्या स्वरूपाचें वर्णन ब्राह्मणग्रंथांमध्यें अनेक वेळां देवतावाचक शब्दांच्या व्युत्पत्ती-वरून केलेलें पाहून विशेषनामांचीही त्यांच्या स्वरूपाला योग्य अशी व्युत्पत्ति करण्यास सुरुवात झाली व तिचें पर्यवसान भाषेंतील यच्चयावत् शब्दांची धातूंपासून व्युत्पत्ति म्हणजे निर्वचन देण्यांत झालें. अशा तऱ्हेचीं निर्वचनें देणाऱ्या ग्रंथांना निरुक्त ही संज्ञा देण्यांत आली.[१] वेदमंत्रांच्या वाणीचें म्हणजे वैदिक शब्दांचें व्याख्यान करण्यासही विद्वानांनीं सुरुवात केली. या व्याख्यानास व्याकरण ही संज्ञा दिली गेली. या निरुक्ति व व्याकरण विद्यांचे बरोबरच वैदिक मंत्रांचें स्पष्ट उच्चारण करतां यावें या दृष्टीनें शिक्षाग्रंथ व वृत्तबद्ध मंत्रांच्या वृत्तांचें ज्ञान व्हावें याकरितां छन्दोग्रंथही निर्माण झाले. तसेंच वैदिक विधींच्या स्वरूपाचें ज्ञान होण्याकरितां कल्पग्रंथ व कालाचें ज्ञान होण्याकरितां ज्यौतिषग्रंथही रचिले गेले. या सहा प्रकारच्या ग्रंथांना वेदाचीं सहा अंगें म्हणून संबोधण्यांत येतें.

## २. वेदाङ्गव्याकरणाचें स्वरूप.

या सहा अंगांमध्यें व्याकरण हें प्रधान[२] वेदाङ्ग समजण्यांत येतें. कारण, वेदाच्या सहा अंगां-पैकीं वेदमन्त्रांचा अर्थ समजण्यास त्याचाच मुख्यत्त्वानें उपयोग होतो. संहिताकालीं व ब्राह्मणकालीं वेदमन्त्रांचें पठण करून यथायोग्य यागादि कर्में करणें यांकडेच लोकांचें लक्ष्य होतें व त्या वेळची भाषा वेदमन्त्रांच्या भाषेप्रमाणेंच असल्यामुळें ती दुर्बोधही नव्हती. त्यामुळें व्याकरण-विषयक विचारांना त्या वेळीं सुरवात झाली नव्हती असें म्हटलें तरी चालेल. महाभाष्यकारांनीं जरी 'चत्वारि वाक्परिमिता पदानि०' किंवा 'चत्वारि शृङ्गा०' (ऋ.सं. १.१६४.४५;४.५८.३) यांसारख्या ऋचांचे 'पद' या शब्दाचा नाम, आख्यात, उपसर्ग व निपात ही पदें असा अर्थ घेऊन व्याकरणपर अर्थ लावले तरी सायणाचार्योनीं आपल्या भाष्यांत (ऋ. सं. १, १६४, ४५ भाष्य) म्हटल्याप्रमाणें ते अर्थ वैयाकरणांचे आहेत; वैदिक ऋषींना ते अभिप्रेत असतीलच असें नाहीं. मात्र "गायत्रेण प्रति मिमीते अर्कम् अर्केण साम त्रैष्टुभेन वाकम्। वाकेन वाकं द्विपदा चतुष्पदा अक्षरेण मिमते सप्त वाणीः" (ऋ. सं. १।१६४।२४) या मन्त्रांत 'पाद' शब्दाचा अर्थ 'श्लोकाचा चरण' व 'अक्षर' शब्दाचा अर्थ 'स्वर' अथवा 'व्यञ्जनसहित स्वर' असा आहे व त्यावरून छन्दोविषयक विचार ऋग्वेदकालीं चालू होते एवढें सिद्ध होतें. व्याकरणविषयक कल्पनांना मात्र ब्राह्मणकालीं आरंभ झाला हें निरनिराळ्या ब्राह्मणग्रंथांत आढळणाऱ्या लिंगांच्या व वचनांच्या उल्लेखां[३]वरून तसेंच भूत, भविष्यत् व वर्तमान या अर्थीं

१. महाभाष्यांत याविषयीं उल्लेख (सू. ३।३।१ श्लो. वा. २) येथें आला आहे. (म. भा. भाग ३ पृ २८४-२८५ पहा).

२. भाष्यकारांनीं 'प्रधानं च षट्स्वङ्गेषु व्याकरणम्। प्रधाने च कृतो यत्नः फलवान् भवति' (म. भा. भाग १ पृ. ३) असें स्पष्ट म्हटलें आहे.

३. याकरितां (श. ब्रा. १।५।४।६-११, ६।१।३।४; ताण्ड्य ब्रा. १।२०।१३ ऐ. ब्रा. ; ६।१।३ गोपथ ब्रा. १।२५) पहा.

कृतं, करिष्यत् आणि कुर्वत् या शब्दांच्या प्रयोगांवरूनही स्पष्ट होतें. आरण्यक व उपनिषद् ग्रंथांमध्यें वाणीच्या वर्णनाच्या प्रसंगानें आलेल्या स्वर, स्पर्श, ऊष्मन्, धातु, प्रातिपदिक, नाम, आख्यात, प्रत्यय, विभक्ति वगैरे संज्ञांवरून शिक्षाग्रंथांसारखे व्याकरणविषयक लहानसे ग्रंथही लिहिले गेले असावे. हल्लीं उपलब्ध असलेल्या यास्क ऋषींच्या निरुक्तामध्यें आलेल्या उल्लेखांवरून प्रातिशाख्य ग्रंथच नव्हेत तर इतरही वेदाङ्गव्याकरण ग्रन्थ यास्काचार्यांच्या निरुक्ताच्या पूर्वी लिहिले असावे. निरुक्ताला व्याकरणाचें पूरक शास्त्र ( तदिदं विद्यास्थानं व्याकरणस्य कार्त्स्न्यम् ) असें म्हटलें आहे. एकंदरींत पाहतां, निरनिराळ्या शाखांच्या शिक्षा व प्रातिशाख्यें हीं रचिलीं गेल्यानंतर यास्काचार्यांनीं निरुक्त रचिलें असावें व त्यानंतर पाणिनीची अष्टाध्यायी रचिली गेली असावी असें दिसतें.

## ३. ' प्रातिशाख्य ' ग्रंथांचें स्वरूप.

प्रातिशाख्य ग्रंथांमध्यें वेदांतील पदांच्या स्वराविषयीं, उच्चारणाविषयीं, पाठाविषयीं, समासांविषयीं, संधींविषयीं व वृत्तांविषयीं विवेचन केलें आहे. निरनिराळ्या वेदशाखांमध्यें वरील बाबतींत दिसून येणाऱ्या वैशिष्ट्याचाही विचार या ग्रंथांमध्यें केला असल्यामुळें या ग्रंथांना 'प्रातिशाख्य' हें अन्वर्थ नांव दिलें आहे. दोन किंवा ज्यास्त शाखांचें मिळून एक[३] प्रातिशाख्यही दृष्टीस पडतें. शाखा अनेक असल्यामुळें हीं प्रातिशाख्यें जरी अनेक असलीं व पुष्कळशीं लुप्त झालीं असलीं तरी मुख्य मुख्य सात आठ हल्लीं उपलब्ध आहेत. शौनकाचें ऋक्प्रातिशाख्य व कात्यायनाचें शुक्लयजुर्वेदप्रातिशाख्य हीं त्यांपैकीं दोन प्रमुख आहेत. प्रातिशाख्य ग्रंथांना ' पार्षद ' ग्रन्थ असेंही म्हणतात. पार्षद व पारिषद या दोन्ही शब्दांचा एकच अर्थ आहे. विद्वान ऋषींच्या सभेत चर्चा होऊन निष्पन्न झालेले व मुखपरंपरेनें चालूं असलेले निर्णय हा 'पार्षद' शब्दाचा अर्थ दिसतो. 'अर्थनित्यः परीक्षेत' असा दंडक जरी निरुक्तकारांनीं घालून दिला असला व त्याप्रमाणें शब्दाचा अर्थ पाहून जरी निरुक्तकारांनीं शब्दांचें निर्वचन केलें असलें तरी त्याला निर्वचनच म्हणतां येईल. व्याकरणकारांनीं शास्त्रयुक्त पद्धतीनें केलेल्या व्युत्पत्तीची त्याला योग्यता येणार नाहीं. उदाहरणार्थ ' अग्नि ' हा शब्द घेतल्यास तीन निरनिराळ्या धातूंहून त्यांचें निर्वचन केलें आहे. संहिताकाल व निरुक्तकाल यांमध्यें अनेक शतकांचा काळ लोटला असल्यामुळें व ऐतिहासिक दृष्ट्या विवेचन करण्यास सामग्री उपलब्ध नसल्यानें विशेषनामांचा व विशिष्ट शब्दांचा जो प्रचारांत अर्थ असेल तो कायम ठेवावा या हेतूनें निरुक्तकारांनीं निरुक्तग्रंथ रचिले. उदाहरणार्थ, उदक शब्द घेतला तर जरी उद् + अञ्च् या धातूपासून वरतीं काढणें या क्रियेशीं संबंध असल्यामुळें तो शब्द साधला जाऊन प्रचारांत आला असला तरी तो अर्थ ऐतिहासिक दृष्ट्या उपलब्ध नसल्यामुळें उन्द् ( ओलें करणें ) या धातूपासूनही निरुक्तकार तो शब्द साधतील.

---

१. ऐ. ब्रा. ४।५।१-३; ५।१।१ पहा.

२. निरुक्त अध्याय १ खंड १५ पहा.

३. उदाहरणार्थ, शाकल व बाष्कल या शाखांचें एकच प्रातिशाख्य आहे.

४. निरुक्त अध्याय २, खंड १ पहा.

५. निरुक्त अध्याय २, खंड २४ पहा.

## ४. पार्षद ग्रंथांचा कालखंड.

प्रातिशाख्य ग्रंथांमध्यें मन्त्रांतील पदें परंपरागत जशींच्या तशीं घेऊन त्यांच्या शुद्ध उच्चारणाविषयीं स्वराविषयीं, तसेंच मूळ संहितापाठाशीं तुलना केल्यास ऱ्हस्व, दीर्घ आणि स्वर यांमधील फरक व संधिकार्यामुळें होणारे इतर फरक यांविषयीं प्रामुख्यानें विचार केला आहे. अर्थाकडे लक्ष्य देऊन प्रकृतिप्रत्ययात्मक विभाग सांगून पदें साधणें किंवा विभक्तियुक्त पदांची किंवा सामासिक पदांची फोड करून त्यांचा योग्य अर्थ कसा होईल याचें विवेचन प्रातिशाख्यांमध्यें केलेलें नाहीं प्रातिशाख्यांमधील विवेचन त्यामुळें एका दृष्टीनें निर्जीवच म्हटलें तरी चालेल. व्याकरणग्रंथांमध्यें अर्थविचाराचें चैतन्य दृष्टीस पडतें. हा व्याकरण व प्रातिशाख्य यांमधील मुख्य फरक आहे. याशिवाय लोकामध्यें प्रचलित असलेल्या भाषेचाही विचार व्याकरणग्रंथांत केला आहे; प्रातिशाख्यांत तो कोठेंही केला नाहीं. व्याकरणग्रंथ व प्रातिशाख्यग्रंथ यांमधील वर दिलेल्या स्वरूपभेदामुळें प्रातिशाख्यांचा व्याकरणग्रंथांमध्यें अंतर्भाव होत नाहीं व त्यांना व्याकरण म्हणूं नये असें कांहीं विद्वानांचें मत आहे. इतर कांहीं विद्वानांच्या मतें वर्णविचार, स्वरविचार, संधिकार्यें वगैरे व्याकरणाच्याच विषयांचें त्यांमध्यें विवेचन असल्यामुळें प्रातिशाख्यें हीं विशेष प्रकारचे व्याकरणग्रन्थच समजले जात असत व पाणिनीनें व्याकरण लिहिण्यापूर्वीं वेदाङ्ग-व्याकरणांतच त्यांचा अंतर्भाव होत असे. कांहीं विद्वानांच्या मतें प्रातिशाख्यकालीं वैदिक व लौकिक दोन्ही प्रकारच्या शब्दांचें विवेचन असलेले कांहीं व्याकरणग्रंथ होते व त्यांचा वेदाङ्ग-व्याकरणग्रंथांमध्यें अंतर्भाव होत असे. पाणिनीनें त्यांपैकीं आपिशलि, गार्ग्य, शाकल्य वगैरेंचा उल्लेख आपल्या अष्टाध्यायींत केला आहे. अशाच व्याकरणग्रंथांसारखा इन्द्रानेंही एक व्याकरणग्रंथ लिहिला होता व तो ऐन्द्र नांवानें प्रसिद्ध होता असें कांहीं विद्वान मानतात.

## ५. पाणिनीचा कालखंड.

पाणिनिपूर्वकालीं व्याकरण शब्दाचा ( शब्दांचें ) सामान्य विवेचन असा जरी अर्थ असला तरी अर्थाकडे पूर्ण लक्ष देऊन वाक्यांतील पदांचा परस्परसंबंध, पदांचा समास, पदांचा प्रकृतिप्रत्ययात्मक विभाग, संधिकार्यें, स्वर, नामांची ( सुबन्तांची ) व क्रियापदांची ( तिङन्तांची ) सिद्धि या विषयांचें प्रामुख्यानें विवेचन करून पाणिनीनें पद्धतशीर, शास्त्रशुद्ध व लाघवयुक्त असूनही सर्वाङ्गपरिपूर्ण असा अष्टाध्यायी ग्रंथ लिहिल्यानंतर शब्दशास्त्र या अर्थी व्याकरणशब्दाचा प्रयोग होऊं लागला. वरतीं लिहिल्याप्रमाणें पाणिनिपूर्व पार्षदकालीं हें शब्दशास्त्र आरंभावस्थेंतच होतें. पाणिनीनें वैदिक भाषेबरोबर अभियुक्त व सुसंस्कृत लोकांमध्यें त्याचे वेळी प्रचलित असलेल्या भाषेचाही अभ्यास करून अष्टाध्यायी रचिली. पाणिनीच्या वेळीं प्रचलित असलेली भाषा व वेदभाषा या वस्तुतः एकच होत्या व त्या दोन्ही भाषांचें एकेंच व्याकरण त्यानें लिहिलें. फक्त वेदामध्यें सांपडणारे व प्रचलित भाषेंत न सांपडणारे

---

१. " सर्ववेदपारिषदं हीदं शास्त्रम् । तत्र नैकः पन्थाः शक्य आस्थातुम् । " ( म. भा. भाग ५ पृ. ३०६ ) या महाभाष्यवचनावरून हें स्पष्ट होतें.

जे शब्द ते साधण्याकरितां त्यानें ' मन्त्रे ' किंवा ' छन्दसि ' शब्द घालून निराळीं सूत्रें रचिलीं आहेत.

## ६. वार्तिककारांचा कालखंड.

पाणिनीनें शक्य तितकीं थोडीं, तरी पण जवळजवळ ४००० सूत्रें रचून त्याचे काळीं प्रचलित असलेल्या भाषेचें परिपूर्ण व्याकरण रचिलें असलें तरी शें दोनशें वर्षें लोटल्यानंतर स्वाभाविकच भाषेमध्यें थोडाफार फरक झाला व शेजारच्या देशांच्या संघट्टनानें शब्दसमृद्धीही वाढली. या फेरफाराचा व शब्दसमृद्धीचा पूर्ण अभ्यास करून वार्तिककारांनीं वार्तिकें रचिलीं. या वार्तिकांचा पाणिनिसूत्रांसारखा स्वतंत्र पाठ नाहीं व तीं संग्रथित करून एके ठिकाणीं दिलेलींही नाहींत. महाभाष्यामध्यें बहुतेक वार्तिकांचा उल्लेख असला तरी कांहीं थोडीं वार्तिकें महाभाष्यांत आढळत नाहींत; तीं इतरत्र दृष्टीस पडतात. अठरा पुराणें जशीं सत्यवतीसुत व्यासानें रचिलीं असा प्रवाद आहे त्याप्रमाणें पाणिनिव्याकरणावरील सर्व वार्तिकें वररुचि कात्यायनानें रचिलीं असें समजलें जातें. या वार्तिकांची संख्या पाणिनिसूत्रांच्या इतकीच — थोडीशी ज्यास्तच— आहे व ती निरनिराळ्या प्रकारचीं आहेत. त्यांपैकीं पूरक किंवा पुरवणी-वार्तिकांची संख्या जरी ज्यास्त असली तरी विवेचनात्मक, चिकित्सात्मक, व्याख्यानात्मक व प्रवचनात्मक अशींही पुष्कळ वार्तिकें आहेत. हीं सर्व वार्तिकें पाणिनिसूत्रांवरच आहेत; त्यांना स्वतंत्र स्थान नाहीं. वार्तिककारांनीं वार्तिकें रचून पाणिनिसूत्रांना एक प्रकारची बळकटी आणली इतकेंच नव्हे तर वेदाङ्ग म्हणून पाणिनिसूत्रांचा जो मौखिक पाठ चालू होता त्याच्याबरोबर पाणिनिसूत्रांच्या अध्ययनाचें व अर्थविवेचनाचेंही काम चालूं केलें. जरी पाणिनिसूत्रें हीं इतर शास्त्रांतील सूत्रांशीं तुलना केली असतां प्रतिपाद्य अर्थाच्या ज्ञानाचे बाबतींत स्पष्ट व निः-संदिग्ध असलीं तरी पाणिनीच्या लाघवयुक्त पद्धतीमुळें अध्यापनाचे वेळीं गुरुजींना प्रत्येक सूत्राचें विस्तृत व्याख्यान करावें लागत असे. तसेंच आपाततः दिसणारा सूत्रांचा परस्परविरोध व प्रचलित प्रयोगांपैकीं कांहीं प्रयोग साधण्यास आढळून येणाऱ्या अडचणी दूर करण्याकरितां कांहीं महत्त्वाचे नियम करणेंही भाग पडत असे. शिवाय, केव्हां केव्हां पाणिनिसूत्रांवरून अनु-मानानें कांहीं महत्त्वाचे निष्कर्षही काढावे लागत असत. निरनिराळ्या अध्यापनसंस्थांमध्यें व अध्यापनपरंपरांमध्यें या बाबतींत कांहीं मतभेदही होत असत. ह्या महत्त्वाच्या परिभाषारूप अथवा न्यायरूप नियमांसहित केलें जाणारें निरनिराळ्या अध्यापनपरंपरांमध्यें चालू असलेलें विवेचन नीट लक्षांत रहावें म्हणून सारांशात्मक गद्यरूप लहान लहान वार्तिकें रचिलीं गेलीं व पूर्वपक्ष-उत्तरपक्ष रूपानें केल्या जाणाऱ्या विवेचनांचा सारांश लक्षांत रहावा म्हणून श्लोकरूप वार्तिकेंही रचण्यांत आलीं. एकंदरींत पाहतां, या निरनिराळ्या वार्तिककार आचार्यांनीं पाणिनि-सूत्रांच्या अर्थाचें चिकित्सापूर्वक विवेचन करून अध्यापनपरंपरा चालू केली व वेदपाठकांमध्येंच नव्हे तर विद्वत्समाजांतही सूत्रांचें स्थान दृढ केलें.

---

१. यांशिवाय निगम ( पा. सू. ६।३।११२, ६।४।९, ७।२।६४, ७।३।८१, ७।४।७४ ) आणि आर्ष ( पा. सू. १।१।१६, ४।१।७८) हेही शब्द पाणिनीनें घातले आहेत.

## ७. भाष्यकारांचा कालखंड.

सूत्रकार व वार्तिककार यांनंतरची व्याकरणशास्त्राचे बाबतींत अत्यंत महत्त्वाची कामगिरी भगवान् पतंजलि मुनींनीं व्याकरणमहाभाष्य रचून केली. सूत्रांचा फक्त अर्थ सांगणारीं अशीं वार्तिकें नाहींत म्हटलें तरी चालेल; असल्यास तीं फारच थोडीं आहेत. सूत्रांचा केवल अर्थ, उदाहरणें व प्रत्युदाहरणें देणारे कांहीं वृत्तिग्रंथही वार्तिकांबरोबरच रचिले गेले असावे व 'कुणि'[१] नांवाच्या आचार्यांची वृत्ति हा त्यांपैकींच एक ग्रंथ असावा. सूत्रार्थ निश्चित करण्याचे बाबतींतील नियमही संग्रथित करून कांहीं ग्रंथ लिहिले गेले असावे; व आचार्य व्याडींनीं एक परिभाषाग्रंथ[२] लिहिला होता अशी लोकप्रसिद्धि आहे. या परिभाषाग्रंथाशिवाय 'संग्रह' नांवाचा फार विस्तृत व्याकरणग्रंथ त्यांनीं लिहिला[३]. तो आज जरी उपलब्ध नसला तरी त्याचे नंतरच्या टीकाकारांनीं त्यांतून उद्धृत केलेलीं वाक्यें उपलब्ध आहेत. निरनिराळ्या अध्यापनपरंपरांमध्यें चाललेल्या व्याख्यानांचा सूक्ष्म अभ्यास करून व त्याप्रमाणेंच त्या वेळीं अस्तित्वांत असलेल्या वृत्तिग्रंथांचें, परिभाषाग्रंथांचें व व्याख्यानांचें सूक्ष्म अवलोकन करून महाभाष्यकारांनीं आपलें महाभाष्य लिहिलें. या महाभाष्यानें व्याकरणग्रंथांमध्यें पाणिनिसूत्रांचें स्थान अढळ केलें इतकेंच नव्हे तर इतर व्याकरणग्रंथांचें समूळ उच्चाटन केलें म्हटलें तरी चालेल. पाणिनिसूत्रांमध्यें आपिशालि, शाकटायन, गार्ग्य वगैरे दहा पाणिनिपूर्व वैयाकरणांचे, तसेंच वार्तिकें व महाभाष्य यांमध्यें आढळून येणारे काशकृत्स्न, वाजप्यायन, व्याडि, वगैरे पांच सहा पतञ्जलिपूर्व वैयाकरणांचे उल्लेख व किरकोळ मतभेद यांशिवाय या जाड्या वैयाकरणांची कांहींही कामगिरी आज शिल्लक राहिली नाहीं. वार्तिकें मात्र पाणिनिसूत्रांचेंच विवेचन करणारीं असल्यामुळें व त्यांचेंच विवेचन बहुशः महाभाष्यांत केलें असल्यामुळें शिल्लक राहिलीं. वार्तिकांमध्यें आलेल्या विषयांशिवाय इतर महत्त्वाच्या पुष्कळ विषयांचा महाभाष्यांत स्वतंत्र रीतीनें ऊहापोह केला आहे, अनेक उदाहरणें व प्रत्युदाहरणें दिलीं आहेत, अनेक शंका उद्भूत करून उत्तरें दिलीं आहेत व अनेक ठिकाणीं अधिकारयुक्त वाणीनें निर्णय दिले आहेत. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे पाणिनिसूत्रांचें सर्वांगपरिपूर्ण विवेचन प्रसादगुणयुक्त वाणीनें या भाष्यग्रंथांत आल्यानंतर व्याकरणविषयांत विवेचन करण्याजोगें कांहीं राहिलेंच नाहीं. लौकिक सर्व विचार महाभारतांत आल्यामुळें 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वं' असें म्हणण्याचा जसा प्रघात पडला त्या-

---

१. आचार्य 'कुणि' यांचा उल्लेख—" कुणिना प्राग्ग्रहणमाचार्यनिर्देशार्थं व्यवस्थितविभाषार्थं च इति व्याख्यातम्। तेन क्रोडो नाम उदग्ग्रामस्तत्र भवः क्रौड इत्यणेव भवति ··· भाष्यकारस्तु कुणिदर्शनमशिश्रियत्" असा कैयटभट्टांनीं सूत्र १ । १ । ७४ वरील भाष्यप्रदीपामध्यें केला आहे. हरदत्तानेंही पदमंजरीचे आरंभींच काशिकेंतील मंगलश्लोकाचें विवेचन करतांना " तत्र सूत्रार्थप्रधानो ग्रन्थो वृत्तिः । सा चेह प्राणिनिप्रणीतानां सूत्राणां कुणिप्रभृतिभिराचार्यैर्विरचितं विवरणम्" असा आचार्य 'कुणीं' चा स्पष्ट उल्लेख केला आहे.

२. हरप्रसादशास्त्री व स्टाईन यांनीं 'व्याडिपरिभाषावृत्ति' नांवाच्या हस्तलिखिताचा उल्लेख हस्तलिखितांच्या सूचीमध्यें केला आहे.

३. 'व्याडि' आचार्यांचा उल्लेख ऋक्प्रातिशाख्यकारांनीं केला आहे. वार्तिकांमध्येंही 'द्रव्याभिधानं व्याडिः' असा उल्लेख आला आहे. (म. भा. भाग १ पृ. ५९० ). महाभाष्यकारांनींही संग्रहग्रंथाचा उल्लेख ( २ । ३ । ६६ म. भा. भाग २ पृ. ४५३; १ । १ । १ म. भा. भाग १ पृ १३,१४ ) येथें कला आहे. वाक्यपदीयांत अनेक ठिकाणीं 'संग्रह' ग्रंथाचा उल्लेख आला आहे. याशिवाय काशिकेमध्येंही ( ४।२।६०; ७।३।७६ ) व्याडीचा उल्लेख मिळतो. नागेशांनीं केलेला उल्लेख प्रसिद्धच आहे.

प्रमाणें व्याकरणविषयक सर्व प्रश्नांचा महाभाष्यांत परामर्श घेतला गेल्यामुळें 'भाष्योच्छिष्टं शब्दशास्त्रं' म्हटल्यास कोणत्याही प्रकारची अतिशयोक्ति होणार नाहीं. महाभाष्यानंतर व्याकरणशास्त्राची वाढ होणारा ग्रंथ लिहिण्यांत आला नाहीं. संस्कृत व्याकरण म्हणजे पाणिनि, कात्यायन व पतंजलि या तीन मुनींचीच कृति ( त्रिमुनि व्याकरणम् ) असें म्हणण्याचा प्रघात पडला व नंतरचे जे ग्रंथ झाले ते 'त्रिमुनिव्याकरणा'चें व्याख्यान अथवा टीका या स्वरूपाचे झाले.

## ८. भर्तृहरीचा कालखंड.

वरतीं निर्दिष्ट केल्याप्रमाणें पाणिनिपूर्वकालीं व्याकरणशास्त्र हें आरंभावस्थेंतच होतें. त्या शास्त्राचा विस्तार पाणिनिकालीं व वार्तिककालीं होऊन पतंजलिकालीं तें पूर्णावस्थेला पोंचलें. म्हणून संस्कृत व्याकरणशास्त्राचा खरा काल म्हणजे पाणिनि, कात्यायन व पतंजलि या त्रिमुनींचाच, व संस्कृत व्याकरण म्हणजे पाणिनिसूत्रें, कात्यायनाचीं वार्तिकें व पतंजलीचें महाभाष्य हें जरी खरें असलें तरी नंतरच्या कालांत संस्कृत भाषेऐवजीं इतर बोधभाषा प्रचारांत आल्याचा व इतर शास्त्रांच्या अध्ययनास मिळालेल्या चालनेचा व्याकरणशास्त्रावर एक प्रकारचा परिणाम झाला व त्याचा विकास एका विशिष्ट प्रकारानें होत गेला. वेदांतील कर्मकांडावर आधारलेलें पूर्वमीमांसाशास्त्र व ज्ञानकांडावर आधारलेलें उत्तरमीमांसाशास्त्र यांचें अध्ययन व्याकरणशास्त्रापेक्षां सुलभ असल्यामुळें व त्या शास्त्रांच्या अध्ययनानें झालेल्या तत्त्वज्ञानाचें स्वर्गरूपीं व मोक्षरूपीं फल हें ज्यास्त आकर्षक असल्यामुळें त्या शास्त्रांच्या अध्ययनाकडे लोकांची प्रवृत्ति ज्यास्त झाली. सांख्य, योग, वैशेषिक, नैयायिक इत्यादि वैदिक दर्शनांच्याच नव्हे तर बौद्ध व जैन या अवैदिक दर्शनांच्याही अध्ययनापासून होणाऱ्या तत्त्वज्ञानाचें तेंच फल सांगितलें असल्यामुळें त्या शास्त्रांकडेही लोकांची प्रवृत्ति झाली. या सर्वांचा परिणाम व्याकरणशास्त्रावर झाला व त्याचें अध्ययन कमीकमी होऊं लागलें. पांच सहा शतकांत तें इतकें कमी झालें कीं महाभाष्याची प्रतही[1] दुर्मिळ झाली. व्याकरणशास्त्रावर ओढवलेली ही मोठी आपत्ति दूर करण्याकरितांच कीं काय सहाव्या शतकांत भर्तृहरीसारखा महावैयाकरण निर्माण झाला व त्यानें व्याकरणशास्त्राला दर्शनाचें स्वरूप[2] देऊन त्याच्या अध्ययनानें प्राप्त झालेल्या तत्त्वज्ञानाचेंही मोक्ष हें फल सांगितलें. भर्तृहरीनें महाभाष्यावर 'महाभाष्यप्रदीपिका' नांवाची विस्तीर्ण व पाण्डित्यपूर्ण टीका लिहून महाभाष्यही जगविलें.

## ९. काशिकाकारांचा कालखंड.

भर्तृहरीनें व्याकरणशास्त्राला दर्शनाचें स्वरूप देऊन तें जरी ज्यास्ती आकर्षक केलें तरी त्याचे वेळीं संस्कृतभाषा ही बोलभाषा नसल्यामुळें ती शिकण्याकरितांच व्याकरणाध्ययनाची जरूर भासूं लागली व अष्टाध्यायीचा उपयोग लोकांमध्यें प्रचलित अशा संस्कृत भाषेंतील वाक्यांचा योग्य अर्थ समजून घेणें याऐवजीं पंडितसभांमध्यें प्रचलित व शास्त्रीय तसेंच अभियुक्त वाङ्मय जिच्यामध्यें साठवलेलें आहे अशा संस्कृतभाषेचें ज्ञान करून घेणें हा होऊं लागला. व

१. "यः पतञ्जलिशिष्येभ्यो भ्रष्टो व्याकरणागमः।
काले स दाक्षिणात्येषु ग्रन्थमात्रे व्यवस्थितः" ( वाक्यपदीय २।४८८ पद्य )

२. "अनादिनिधनं ब्रह्म शब्दतत्त्वं यदक्षरम्।
विवर्ततेऽर्थभावेन प्रक्रिया जगतो यतः" ( वाक्यपदीय १।१ पद्य )

खुद्द अष्टाध्यायीच नीट समजण्यास अष्टाध्यायीवर कळण्यास सुलभ व उदाहरणें प्रत्युदाहरणें इत्यादिकांनीं युक्त अशा वृत्तीची जरूर भासूं लागली व जयादित्य आणि वामन या दोन विद्वानांनीं मिळून 'काशिका' नांवाची वृत्ति लिहिली. भर्तृहरीच्या वाक्यपदीयानें व्याकरण-शास्त्राला दर्शनाचें स्वरूप दिलें व त्याबरोबरच वाक्यांतील शब्दांपासून व शब्दांतील कृत्, तद्धित व विभक्ति या प्रत्ययांपासून संबद्ध अर्थ कसा निघतो या अर्थविचारास 'वाक्यपदीय'[1] नांवाचा विद्वत्तापूर्ण ग्रंथ लिहून चालना दिली व त्याच सुमारास जयादित्य व वामन यांनीं काशिका लिहिली गेल्यामुळें व्याकरणशास्त्रामध्यें प्रवेश करण्यास मार्ग फारच सुलभ झाला. या दोनही ग्रंथांवर त्या ग्रंथांचा प्रतिपाद्यविषय ज्यास्त स्पष्ट कळावा म्हणून टीकाग्रंथ लिहिण्यांत आले व त्यामुळें व्याकरणशास्त्राच्या अध्ययनास चालना मिळाली. व्याकरणशास्त्राचें सामान्यज्ञान काशिकेचें अध्ययन करून मिळविल्यानंतर विशिष्ट अभ्यास करण्याकरितां पदमञ्जरी व न्यास या काशिकेवरील टीकांचे, हेलाराज व पुण्यराज यांनीं लिहिलेल्या टीकेसहित वाक्यपदीयाचे, व कैयटाच्या प्रदीप टीकेसह महाभाष्याचे अध्ययनास पाठशालांतून सुरवात झाली व अशा तऱ्हेनें व्याकरणशास्त्राचें संपूर्ण अध्ययन करणाऱ्यांना समाजांत 'वैयाकरण' म्हणून मानाचें स्थान मिळूं लागलें.

## १०. कैयटांचा कालखंड.

भर्तृहरीनें व्याकरणशास्त्राला दर्शनाचें स्वरूप देऊन व महाभाष्यावर पाण्डित्यपूर्ण टीका लिहून व्याकरणशास्त्राला पुन्हां मानाचें स्थान दिलें तरी वेदग्रंथांवर पूर्णपणें आधारलेल्या व त्यामुळें एका दृष्टीनें ज्यांना ज्यास्त महत्त्व मिळालें होतें अशा मीमांसा, वेदान्त वगैरे दर्शनांकडे लोकांचा कल ज्यास्तच होता व तो तसाच राहिला. त्यांतच भर म्हणजे—"सूत्र-कार हे स्वतः सूत्रें रचून शुद्ध शब्द कोणते व अपशब्द कोणते तें लोकांना शिकवतात पण स्वतःच अपशब्दांचे कितीतरी प्रयोग करतात" अशा शेलक्या शब्दांत कुमारिलभट्टांनीं आपल्या तन्त्रवार्तिक ग्रंथामध्यें सूत्रकारांवर खरमरीत टीका करून[2] वैदिक कर्मकाण्डाचा प्रसार केला व त्यानंतर थोड्याच कालावधींत श्रीशंकराचार्यांनीं भक्तिपर अनेक रसाळ व सुंदर स्तोत्रें रचून व त्याबरोबर वेदान्तदर्शनावर बहुमोल ग्रंथ लिहून लोकांचें मन वेदान्त विषयाकडे आकर्षून घेतलें. या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, व्याकरणसूत्रें हीं मूळचींच कितीही शास्त्रशुद्ध व पद्धतशीर असलीं व महाभाष्यकारांनीं त्यांचें सुसंगत संपूर्ण विवेचन प्रसादयुक्त वाणीनें केलें असलें व भर्तृहरीनें व्याकरणशास्त्राला दर्शनाची योग्यता आणून दिली असली तरी प्रतिपाद्य विषयाच्या कठिनतेमुळें व्याकरणशास्त्राचें अध्ययन पुन्हां मागें पडलें व त्याला चालना कैयट हरदत्त वगैरे टीकाकारांनीं दिली. कैयटभट्टांनीं महाभाष्याच्या दरेक

---

१. 'वाक्यपदीय' या ग्रंथाचें 'वाक्यप्रदीप' असें नांव कांहीं ठिकाणीं आढळतें, पण तें चुकीनें पडलें असावें.

२. ज्यास्त स्पष्टीकरणाकरितां जै. सू. १।३।१८ वरील तन्त्रवार्तिक (बनारस संस्कृत सीरीज प्रत-पृष्ठें १९०–२२५ पहा. विशेषतः पृ. २०१ वरील "येपि व्याकरणस्यैव परे पोर प्रतिष्ठिताः । सुतरां तेपि गाव्यादितुल्यानेव प्रयुञ्जते । सूत्रवार्तिकभाष्येषु दृश्यते चापशब्दनम् । अश्वारूढा. कथं चाश्वान् विस्मरेयुः सचेतनाः" हे श्लोक पहा.

पङ्क्तीचें विवेचन करून भाष्याचें मर्म व गूढार्थ लोकांना समजावून देण्याचें काम केलें, तर हरदत्त वगैरे टीकाकारांनीं काशिकावृत्तीचें विद्वत्तापूर्ण विवेचन केलें.

## ११. भट्टोजी दीक्षितांचा कालखंड.

काशिकावृत्ति हा ग्रंथ जरी अध्ययनास सुलभ असला तरी त्यांतील उदाहरणें हीं जुन्या काळचीं जुन्या ग्रंथांतून घेतलीं असल्यामुळें तो विशेष आकर्षक वाटत नसे; तसेंच त्यांतील सूत्रक्रमानुसार व्याख्यान हें शास्त्रांत प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्याला समजण्यास जरा अवघडच पडूं लागलें; शिवाय, कांहीं ठिकाणीं त्यांत भाष्यकारांशीं मतभेदही आढळून आल्यामुळें त्याबद्दलची पूज्य भावनाही कालान्तरानें कमी होऊं लागली. या सर्वांचा परिणाम असा झाला कीं काशिका ग्रंथ हा जरी उपयुक्त व विद्वत्ताप्रचुर असला तरी दिवसानुदिवस तो मागें पडला आणि त्या कालच्या उदाहरणांनीं युक्त व प्रतिपाद्य विषयाचीं निरनिराळीं प्रकरणें पाडून व त्याप्रमाणें सूत्रांची मांडणी करून भाषाज्ञानास व त्याबरोबर शास्त्रज्ञानासही सुलभ असे प्रक्रियाकौमुदी व सिद्धान्तकौमुदी यांसारखे समजण्यास सुलभ ग्रंथ रामचंद्र शेष व भट्टोजी दीक्षित यांनीं लिहिले. याचा परिणाम असा झाला कीं व्याकरणशास्त्राचें अध्ययन हा साधारणपणें अभ्यासाचा एक नियतविषयच झाला व व्याकरणशास्त्राचें सामान्य अध्ययन हें इतर शास्त्रांमध्यें प्रवेश होण्याला आवश्यकच होऊन बसलें. व्याकरणाध्ययनाची लोकप्रियता साहजिकच वाढली व सिद्धान्तकौमुदी व प्रक्रियाकौमुदी या प्रकरण–ग्रंथांवर मार्मिक टीकाग्रंथही लिहिण्यांत आले. सिद्धान्तकौमुदी व प्रक्रियाकौमुदी यांमध्येंही सिद्धान्तकौमुदी ग्रंथ हा जरी गंभीरार्थयुक्त असला तरी त्यांतील प्रतिपादनशैलीमुळें व भाषासौष्ठवामुळें तो ज्यास्त लोकप्रिय झाला. एकंदरींत पाहतां भर्तृहरीनें सहाव्या-सातव्या शतकांत व्याकरणशास्त्रास पुनर्जीवन दिलें; कैयट, हरदत्त वगैरे पंडितांनीं अकराव्या-बाराव्या शतकांत त्याला पुन्हां वाढीला लाविलें व भट्टोजी दीक्षितांनी तें सोळाव्या-सतराव्या शतकांत भरभराटीस आणलें.

## १२. नागेशभट्टांचा कालखंड.

वरतीं लिहिल्याप्रमाणें भर्तृहरि, काशिकाकार, कैयट व भट्टोजी दीक्षित यांचे कालीं पाणिनीय व्याकरणशास्त्राची विशिष्ट दिशांनीं प्रगति झाली व त्या प्रगतीबरोबरच पाणिनीय पद्धतीशिवाय इतरही कातन्त्र, सारस्वत, हैम वगैरे व्याकरणपद्धती सुरू झाल्या. अलीकडील शेंदोनशें वर्षांची प्रगति पाहिली तर मौलिक प्रगति दिसून येत नसली तरी अनेक टीकात्मक व विवेचनात्मक ग्रंथ लिहिले गेल्यामुळें व्याकरणशास्त्राचें स्थान स्थिर झालें आहे. या बाबतींत महत्त्वाची कामगिरी अठराव्या शतकांत नागेशभट्टांनींच केली असें म्हटलें तरी चालेल. त्यांनीं परिभाषेन्दुशेखर हा स्वतंत्र ग्रंथ लिहिला; तसेंच, मंजूषा हा अर्थग्रंथ लिहून वाक्यपदीयाच्या अभ्यासाला, उद्योत लिहून महाभाष्याच्या अभ्यासाला व शब्देन्दुशेखर लिहून सिद्धान्तकौमुदीच्या अभ्यासाला बहुमोल मदत केली.

याप्रमाणें प्रथमतः वेदाङ्गकालीं (इ. स. पूर्व १०००–६५०) व्याकरणविद्या या स्वरूपांत असलेलें व्याकरण हें पाणिनि कात्यायन व पतंजलि या मुनित्रयाच्या कालीं (इ. स. पूर्व

१. मागील प्रस्तावना पृ. ८९–९१ पहा.

६५०-१०० ) व्याकरणशास्त्र झालें. त्यानंतर भर्तृहरीच्या कालांत ( इ. स. पूर्व १००ते इ. स. ६५० ) तें व्याकरणदर्शन म्हणून परिणत झालें. त्यानंतर काशिकाकार. कैयट व भट्टोजी यांच्या कालांत ( इ. स. ६५०-१६५० ) तें भरभराटीस आलें व त्यानंतर नागेशभट्टांच्या कालांत तें शिखराला पोंचलें (इ. स. १६५०-१९५०). याविषयीं संग्रहकारिका पुढें देत आहें.

शब्दानुशासनं शास्त्रं पार्षदेषु समुद्गतम् ।
सूत्रबद्धं पाणिनिना वार्तिकैः सुदृढीकृतम् ॥
प्रपञ्चितं भाष्यकारैर्हरिणा दर्शनीकृतम् ।
वृत्तिबद्धं जयादित्यैर्व्याख्यातं कैयटादिभिः ॥
प्रक्रियाकौमुदीकारैर्दीक्षितैः सुलभीकृतम् ।
स्थिरीकृतं पल्लवितं चान्ते नागेशपण्डितैः ॥ स्वकृत.

## पार्षदकाल ( शक-पूर्व १४००-६०० )

### १३. प्रातिशाख्य ग्रंथांचा प्रतिपाद्य विषय.

पार्षदकालाला व्याकरणशास्त्राच्या इतिहासाचा पहिला कालखंड म्हटलें तरी चालेल. प्रातिशाख्य ग्रंथांचा व्याकरणांत अंतर्भाव केल्यास मुख्यत: प्रातिशाख्यरूपानें या कालखंडांत व्याकरण-विद्या अस्तित्वांत होती. या प्रातिशाख्यांशिवाय वेदांचे तंत्रग्रंथही प्रसृत होते, व हल्लीं जरी लुप्त असले तरी सर्व वेदांना साधारण व प्रचलित भाषेंतील शब्दांचें विवेचन करणारे बरेच व्याकरण-ग्रंथही या कालांत लिहिले गेले. यांशिवाय व्याकरणाला पोषक शिक्षाग्रंथ, निघंटू-सारखे कोशग्रंथ, तसेंच शब्दांचें निर्वचन देणारे निरुक्तग्रंथही या कालीं अनेक झाले. प्रत्येक शाखेला एक किंवा दोन तीन शाखांना मिळून एक याप्रमाणें अनेक प्रातिशाख्य जरी या कालीं लिहिलीं गेलीं असलीं तरी ऋक्प्रातिशाख्य, आश्वलायनप्रातिशाख्य, वाजसनेयिप्रातिशाख्य, तैत्तिरीयप्रातिशाख्य, मैत्रायणीयप्रातिशाख्य, सामवेदप्रातिशाख्य व अथर्ववेदप्रातिशाख्य हींच आज प्रामुख्यानें उपलब्ध आहेत. प्रातिशाख्य ग्रंथांमध्यें वैदिक पदांचा मुख्यत: विचार केला आहे. 'पदप्रकृति: संहिता' अशी संहिता शब्दाची व्याख्या देऊन प्रातिशाख्य ग्रंथांना आरंभ केलेला दिसतो टीकाकारांनीं पदप्रकृतिः हा बहुव्रीहि समास घेतला आहे व त्यावरून आपाततः जरी 'पदें मूळचीं, व नंतरची संहिता' अशी कल्पना मनांत आली तरी वस्तुत: वेदद्रष्ट्या ऋषींनीं अन्तःस्फूर्तीनें एकदम संहिताच म्हटली. अर्थात् त्यांचे वेळीं प्रचलित भाषेंतच ती म्हटली व त्याप्रमाणें शतकानुशतकें तिचें पठण होत गेलें. म्हणून 'पदप्रकृतिः संहिता' याचा ऐतिहासिक दृष्ट्या 'पदांची प्रकृति संहिता' असा षष्ठीतत्पुरुष घेऊन अर्थ करणें ज्यास्त बरें. संहिताकालीं जरी संहितेचा अर्थ स्पष्ट असला तरी कालांतरानें भाषेंत फरक पडल्यामुळें व ऐतिहासिक परंपरा नाहींशी झाल्यामुळें तिच्या अर्थबोधाकरितां पदच्छेद करावा लागला. ऋग्वेद-संहितेचा पदच्छेद शाकल्यानें केला, तैत्तिरीय संहितेचा आत्रेयानें केला व सामवेदसंहितेचा गार्ग्यानें केला असें समजलें जातें. या पदच्छेदानंतर वैदिक पदांचा विचार प्रातिशाख्य ग्रंथांमध्यें करण्यांत आला हें 'पदप्रकृतीनि सर्वचरणानां पार्षदानि' या निरुक्तांतील पंक्तीवरून सहज लक्षांत येतें. पदविचारामध्यें संधिविचार, समासविचार, ह्रस्व दीर्घ वगैरे आदेशांचे विचार, तसेंच उदात्त अनुदात्त वगैरे स्वरांचे विचार हे प्रामुख्यानें आढळून येतात. यांशिवाय पदांचे घटक वर्ण, अक्षरें

( Syllables ), मात्रा, वर्णांचें योग्य उच्चारण, उच्चारदोष यांचेंही विवेचन या ग्रंथांत केलें आहे. पदांच्या जाती व विभाग स्पष्ट करण्याकरितां संज्ञाशब्द त्यांचे अर्थ व उपयोगही दिले आहेत व शेवटीं निर्दोष वेदपठण कसें करावें तें सांगितलें आहे. प्रातिशाख्यां-च्याच वेळीं प्रातिशाख्यांच्या सारखेच वेदाचें व्याकरण सांगणारे तन्त्रग्रंथही लिहिले गेले. या तन्त्रग्रंथांचे कर्ते कात्यायन, शाकटायन औदव्रजि वगैरे वैयाकरण सांगितले आहेत व त्यांमधील पुष्कळांचा पाणिनिसूत्रांमध्यें उल्लेख केलेला आढळतो. शब्देन्दुशेखर व शब्दकौस्तुभ यांमध्यें ऋक्तन्त्रांतील उतारेही घेतले आहेत.

## १४. प्रातिशाख्य ग्रंथांचा काल.

सर्व प्रातिशाख्यें पाणिनिपूर्वीं लिहिलीं गेलीं किंवा त्यांतील कांहीं लिहिलीं गेलीं, त्याप्रमाणेंच शौनकाचें ऋक्प्रातिशाख्य प्रथम लिहिलें गेलें कां कात्यायनाचें वाजसनेयि-प्रातिशाख्य प्रथम लिहिलें गेलें, तसेंच प्रातिशाख्यें प्रथम लिहिलीं गेलीं कां कात्यायन शाक-टायन वगैरे वैयाकरणांचे व्याकरणग्रंथ प्रथम लिहिले गेले यांबद्दल विद्वानांमध्यें मतभेद बरेच दिसून येतात. ल्यूडर्सच्या मतें तैत्तिरीय प्रातिशाख्य सर्वांत प्रथम लिहिलें गेलें; तर लाइ-बिशच्या मतानें ऋक्प्रातिशाख्य प्रथम लिहिलें गेलें. सर्वच प्रातिशाख्यें पाणिनीच्या नंतर लिहिलीं गेली असें गोल्डस्टूकरचें मत आहे. वाजसनेयि प्रातिशाख्य कात्यायनानें लिहिलेलें असल्यामुळें तें पाणिनीच्या नंतर लिहिलें गेलें असें सर्वसाधारण मत आहे. तसेंच पाणिनिसूत्रासारखी पूर्णत्वास पोंचलेली विवेचनपद्धती नसल्यामुळें, नाम आख्यात उपसर्ग व निपात हे प्राचीन चार शब्दविभाग घेतले असल्यामुळें, तसेंच ब्राह्मणग्रंथांमध्यें सांपडणाऱ्या बऱ्याच संज्ञाशब्दांचा त्यांत उपयोग केला गेला असल्यामुळें ऋक्प्रातिशाख्य हें पाणिनिपूर्व कालीं लिहिलें असावें असाही कांहीं विद्वानांचा समज आहे. पाणिनीच्या अष्टाध्यायींत आढळणाऱ्या आपिशालि, काश्यप, गार्ग्य, भारद्वाज, शाकटायन व शाकल्य या वैयाकरणांशिवाय इन्द्र, औदव्रजि, कात्यायन, कौत्स, पौष्करसादि, माध्यन्दिनि, व्याडि, शाकल व शौनकि या वैयाकरणांचा उल्लेख प्रातिशाख्य ग्रंथां-मध्यें आढळतो, परंतु त्यावरून प्रातिशाख्यें हीं पाणिनीनंतरचींच आहेत असें म्हणतां येत नाहीं. पाणिनीच्या पूर्वींचेही हे वैयाकरण असूं शकतील; मतभेदाचा प्रसंग न आल्यामुळें पाणिनीनें त्यांचा उल्लेख केला नसेल. या सर्व वैयाकरणांनीं तन्त्रें किंवा प्रातिशाख्यें या तऱ्हेचे ग्रंथ न लिहितां प्रचलित भाषेंतील शब्दांचेंहीं विवेचन केलें असलेले व्याकरणग्रंथ लिहिले असावे असें ‘संबुद्धौ शाकल्यस्येतौ अनार्षे’ या सूत्रांत पाणिनीनें उच्चारलेल्या ‘अनार्षे’ या शब्दावरून सूचित होतें. एकंदरींत पाहतां, हल्लीं असलेल्या स्वरूपांत जरी नसले तरी प्रातिशाख्य व तन्त्रग्रंथ हे प्रथम लिहिले गेले असावे, त्यानंतर यास्कांचें निरुक्त व नंतर पाणिनीची अष्टाध्यायी व त्यानंतर जुने प्राति-शाख्य ग्रंथ योग्य त्या सुधारणा करून लिहिले असावे असें सिद्ध होतें.

---

१ “ ऋक्तन्त्रव्याकरणे शाकटायनोऽपि “ इदमक्षरं छन्दो वर्णशः समनुक्रान्तं—” लघुशब्देन्दुशेखर संज्ञाप्रकरण. ( राजस्थान–संस्कृत कॉलेज ग्रंथमाला पृ २२ ) पहा.

२ “ ऋक्तन्त्रव्याकरणस्य छान्दोग्यलक्षणस्य प्रणेता औदव्रजिरप्यसूत्रयत … … ..” असा उल्लेख भट्टोजी दीक्षितांनीं आरंभींच शब्दकौस्तुभ ग्रंथामध्यें केला आहे. ( शब्दकौस्तुभ सूत्र १।१।८ पहा)

## १५. पाणिनीच्या वेळची ' संस्कृत ' भाषा.

वरतीं निर्दिष्ट केलेल्या ग्रंथकारांच्या उल्लेखांवरून पाणिनिपूर्वकालीं लोकांमध्यें त्या ग्रंथकारांचे व्याकरणविषयक ग्रंथ कोणत्या स्वरूपाचे होते याचें विवेचन करण्यापूर्वीं त्यांचे वेळीं प्रचलित भाषा कोणत्या स्वरूपाची होती याचा थोडासा विचार करणें जरूर आहे. फार प्राचीन काळीं लिहिण्याची कला फारशी अवगत नसली तरी वैदिक वाङ्मय हें उच्चवर्णीय लोकांच्या तोंडपाठ असे. लिहिण्याची कला पाणिनिपूर्वी कांहीं शतकें उपयोगांत आली असें म्हणावयास त्याच्या सूत्रांतील लिपि, ग्रंथ वगैरे शब्द पुराव्यादाखल देतां येतील. पाणिनिपूर्व वैदिक वाङ्मयाबरोबर कांहीं भिक्षुसूत्रें,नटसूत्रें व इतर विषयांचीं कांहीं सूत्रें अस्तित्वांत होतीं. तसेंच, महाभारत व रामायण यांचा मुख्य भाग प्राचीन काळीं रचिला गेला असें मानल्यास थोडीशी काव्यसंपत्तीही त्या वेळीं असण्याचा संभव आहे. वैदिक वाङ्मयाच्या भाषेकडे लक्ष दिलें असतां ऋग्वेद मंडलें २–९ व त्यावर अधिष्ठित सामवेद व यजुर्वेदाचा भाग सोडल्यास वैदिक वाङ्मयाची भाषा ही पुष्कळ अंशीं पाणिनिव्याकरण-संस्कृत अशा 'संस्कृत' भाषेसारखीच आहे. पाणिनीनें जी भाषा समजण्याकरितां आपलें व्याकरण लिहिलें ती भाषा म्हणजे—आर्षशब्द व क्रियापदांचीं व नामांचीं आर्ष रूपें बाजूला सारून ऋग्वेदाच्या पहिल्या व दहाव्या मंडलाच्या भाषेसारखी व लौकिक वाङ्मयामध्यें व व्यवहारामध्यें त्या वेळीं प्रचारांत असलेली भाषा. जरी भाषा या अर्थीं 'संस्कृत' हा शब्द पाणिनीच्या व्याकरणांत आलेला नाहीं व भाष्यकारांनींही तशा अर्थीं वापरला नाहीं तरी पण ' अद्भिः संस्कृतम् ' ( पा. सू. ४ । ४ । १३४ ) व ' संस्कृतं भक्षाः ' ( पा. सू. ४ । २ । १६ ) या सूत्रांमध्यें तो शब्द ज्या अर्थानें वापरला आहे त्याच अर्थानें पाणिनीनें प्रकृतिप्रत्ययात्मक विभाग कल्पून अशुद्ध शब्द दूर करून ' संस्कृत ' केलेल्या भाषेला 'संस्कृत' हा शब्द भाष्यकारांचे नंतर लावण्यांत आला. भाषा या अर्थीं या 'संस्कृत' शब्दाचा प्रयोग जुन्यांत जुना रामायणांत व भरताच्या नाट्यशास्त्रांत आढळतो. आर्ष शब्द, आर्ष प्रयोग, व अभियुक्त लोकांमध्यें ज्यांचा प्रयोग आढळत नाहीं असे शब्द काढून टाकून **संस्कार दिलेली** जी बोधभाषा तिला **संस्कृत** हें नांव देण्यांत आलें; व '**प्रकृत**' म्हणजे सामान्य अजाण न शिकलीसवरलेली अशी जी जनता तिच्यामध्यें प्रसृत जी भाषा तिला **प्राकृत** नांव देण्यांत आलें. "अग्निमीळे०" (ऋ. सं. १।१।१) "तत्सवितुः०"(ऋ.सं.३।६२।१०)"सहस्रशीर्षा०"(ऋ.सं.१०।९०।१)इत्यादि अनेक उत्तमोत्तम

१. भारतामध्यें लेखनकला केव्हां अस्तित्वांत आली याविषयीं विद्वानांमध्यें बराच मतभेद आढळून येतो. मंत्रद्रष्ट्यांनीं वेद जेव्हां रचिले तेव्हां लेखनकला माहीत नव्हती व मौखिक पाठानेंच वेद कायम राहिले याविषयीं कोणाचाही मतभेद नाहीं. त्याप्रमाणेंच पाणिनिकालीं लेखनकला अस्तित्वांत होती याविषयींही मतभेद नाहीं. मतभेद म्हणजे–रोठ, गोल्डस्टूकर, बॉथलिंक वगैरे विद्वानांच्या मतें प्रातिशाख्यें रचिलीं त्या काळीं लेखनकला अस्तित्वांत होती व वेदग्रंथ लिहिलेही जात असत; तर वेबर, मॅक्सम्यूलर वगैरे विद्वानांच्या मतानें प्रातिशाख्यें रचिलीं गेल्यानंतर लेखनकला अस्तित्वांत आली व नंतर वेदग्रंथ लिहिले गेले. कांहींही असो, उच्चारणशास्त्राचा प्राचीन भारतांतील अभ्यास फारच सूक्ष्म प्रकारानें झाला होता व " त्रिषष्टिः चतुः-षष्टिर्वा वर्णाः शम्भुमते मताः " या शिक्षावाक्यांत म्हटल्याप्रमाणें वर्णांचे त्रेसष्ट चौसष्ट प्रकार ठरविण्यांत आल्यानंतर प्रत्येक वर्णाला खूण देऊन वर्ण लिहिण्यांत आले. ही लेखनकला पाणिनीच्या पूर्वीं प्रचलित होती. पाणिनीनंतर ती झाली असती तर पाणिनीनें बेचाळीसच वर्ण सांगितल्यामुळें बेचाळीसच वर्ण लिहिण्यांत आले असते.

वैदिक ऋचांमध्यें आर्ष प्रयोग मुळींच नाहींत, किंवा असल्यास फारच थोडे आहेत हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. दृष्टान्त देऊन बोलावयाचें म्हटल्यास पेशवेकालीन लेखांत व बोलण्यांत प्रचलित असलेली भाषा आज वाचली म्हणजे ती आजकालच्या शिकलेल्या लोकांना विशेष अडचण न पडतां समजते व तशीच ' आमासनी वाइचपण तुमी मंगालेलं कळत न्हाय तवा अपणासनी समजावं म्हनून विचारतोया ' यासारखी खेडवळ लोकांची भाषाही समजते. त्याप्रमाणेंच त्या वेळीं वैदिक भाषा व लोकांतील प्रचलित प्राकृत भाषा या दोन्ही शिकल्यासवरलेल्या लोकांना उत्तम कळत होत्या.

## १६. ' वैदिक ' भाषा व ' प्राकृत ' भाषा यांमधील भेद.

वैदिक वाङ्मय हें अफाट, उच्च दर्जाचें, सुंदर विचारांचें व गहन अर्थाचें पवित्र असें मानिलें गेलें असल्यामुळें त्याचा बरोबर अर्थ कळण्याची इच्छा सुशिक्षित लोकांना त्या कालीं असलीच पाहिजे व तिला अनुसरूनच लोकामध्यें प्रचलित नसलेले पण वेदामध्यें आढळणारे जे शब्द त्यांच्या प्रयोगांचें पूर्ण परिशीलन करून पाणिनीनें त्या त्या शब्दांचा योग्य उच्चार व्हावा व बरोबर अर्थ कळावा म्हणून ' छन्दसि ' हें पद उच्चारून निरनिराळ्या सूत्रांमध्यें सर्व वैदिक प्रयोगांचा खुलासा केला आहे. या पाणिनिपूर्व वाङ्मयांतील वैदिक वाङ्मय हें निरनिराळ्या कालखंडांमध्यें व निरनिराळ्या देशविभागांमध्यें रचिलें गेल्यामुळें त्यामध्यें एकाच अर्थाचे वाचक पुष्कळ शब्द, एकाच क्रियेचे वाचक अनेक धातू, तसेच एकाच संबंधाचे बोधक अनेक प्रत्यय दिसून येतात. लौकिक भाषेमध्यें ही संख्या जरी पुष्कळ कमी झाली तरी एकाच अर्थाचे बोधक अनेक शब्द असणें हें वैशिष्टय कायम राहिलें. सामान्य जनांच्या प्राकृत भाषेमध्यें मात्र आजकालच्या प्रचलित भाषांप्रमाणें व्यवहारांत निरनिराळे ज्यास्त पदार्थ आल्यामुळें शब्दांची संख्या वाढली असली तरी एकार्थवाचक धातूंची, नामांची व प्रत्ययांची संख्या फारच कमी झाली इतकेंच नव्हे, तर द्विवचन, चतुर्थी विभक्ति, आत्मनेपद वगैरे प्रत्यय पार नाहींसे झाले व उच्चारण सुलभ करतां यावें म्हणून वर्णांमध्यें ऋ, ॠ व ऌ तसेच ऐ व औ हे स्वर आणि पुष्कळशीं जोडाक्षरें नाहींशीं झालीं. पाणिनिपूर्वकालीं व पाणिनीचेही कालीं या प्राकृत भाषेंत मुळींच वाङ्मय नसावें; म्हणूनच पाणिनीनें आपल्या व्याकरणामध्यें या भाषेला स्थान दिलें नाहीं.

## १७. पाणिनीनें ज्या भाषेचें व्याकरण लिहिलें ती भाषा.

पाणिनीचे कालीं लौकिक संस्कृत-वाङ्मयामध्येंही वैदिक प्रयोगांसारखेच पण लोकामध्यें फार थोड्या ठिकाणीं आढळणारे अथवा विशिष्ट जनसमूहामध्यें आढळणारे असे शब्दप्रयोग पुष्कळ होते. पण त्याचे वेळच्या व त्याच्या प्रांतांतल्या अभिजात वाङ्मयामध्यें ते आढळून येत नसल्यामुळें त्यानें आपल्या व्याकरणामध्यें त्यांना स्थान दिलें नाहीं.ज्याप्रमाणें पुणें जिल्ह्यांत बोलली जाणारी मराठी हीच मुख्य मराठी समजली जाते किंवा नडियाद जिल्ह्यांतील गुजराती ही मुख्य गुजराती समजली जाते त्याप्रमाणें भारतांतील उत्तरेकडील भाषा ही त्या वेळीं अभिजातभाषा समजली जात असे. याविषयीं शांखायन ब्राह्मणामधील पुढील महत्त्वाचा उल्लेख लक्षांत घेण्याजोगा आहे "तस्मादुदीच्यां दिशि प्रज्ञाततरा वागुद्यते। उदञ्च उ एव यान्ति वाचं शिक्षितुम्। यो वा तत आगच्छति तस्य वा शुश्रूषन्ते" (शां. ब्रा. ७।६). ही उत्तर दिशा म्हणजे भारतांतील उत्तरेचा प्रांत म्हणजे सिन्धु व सतलज या नद्यांमधील भाग. काशिकाकारांनीं "प्रागुदञ्चौ

विभजते हंसः क्षीरोदके यथा। विदुषां शब्दसिद्ध्यर्थं सा नः पातु इरावती" असें एक जुनें वार्तिक उद्धृत केलें आहे. त्यावरून इरावतीच्या म्हणजे रावी नदीच्या उत्तरेच्या भागाला उत्तरप्रांत म्हणत असत. पाणिनीचें निवासस्थान शलातुर ग्राम व अध्ययनाचें ठिकाण तक्षशिला हीं दोन्ही या उत्तरप्रांतांतच होतीं. वेदग्रंथ हे निरनिराळ्या देशभागांत निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या ऋषींनीं किंवा ऋषिकुलांनीं रचिले असल्यामुळें साहजिकच त्यांमध्यें एकाच अर्थीं अनेक शब्द,एकाच अर्थीं अनेक प्रत्यय, इतकेंच नव्हे तर एकच प्रत्यय लावला असतां आगम, विकार, लोप, ह्रस्व, दीर्घ अशा तऱ्हेच्या फरकांमुळें अनेक रूपें ठिकठिकाणीं दिसून येतात. वैदिक ग्रंथांना निरपेक्ष प्रामाण्य असल्यामुळें व त्यांतील शब्दांना अत्यंत पावित्र्य असल्यामुळें त्यांतील सर्व वैकल्पिक प्रयोग जरी पाणिनीनें प्रमाणभूत मानिले व त्यांची बहुलम्, विभाषा वगैरे शब्दांचा उपयोग करून किंवा त्यांकरितां स्वतंत्र विधानें सांगून उपपत्ति केली, तरी पण त्याच्या प्रांतांत लोकांमध्यें वरतीं निर्दिष्ट केलेल्या वैकल्पिक वैदिक प्रयोगांपैकीं जे प्रचलित होते तेवढेच त्यानें लौकिक व्यवहाराकरितां शुद्ध शब्द म्हणून मानिले व आपल्या सूत्रांनीं त्यांची सिद्धि केली.

पाणिनीनें वेदग्रंथांचा संपूर्ण अभ्यास करून आणि त्याच्या स्वतःच्या प्रांतांतील व कालांतील प्रचलित भाषेशीं तुलना करून वैदिक वाङ्मयामध्यें जे जे भिन्न प्रयोग दिसले ते 'छान्दस' प्रयोग मानून त्यांचें उपपादन केलें आणि दोनही भाषांमध्यें सारखे म्हणजे समान स्वरूपाचे आढळणारे शब्द व प्रयोग यांचा पूर्ण समावेश करून आपली अष्टाध्यायी रचिली. अर्थात् त्याच्या प्रांतांत तसेंच वैदिक वाङ्मयांतही न आढळणारे व इतरत्र आढळणारे शब्द व प्रयोग हे अपशब्द व अपप्रयोग म्हणून त्यानें मानिले. क्वचित् थोड्याच ठिकाणीं 'प्राचां' शब्दानें कांहीं शब्दांचा त्यानें उल्लेख केला आहे. त्याचें कारण जरी ते शब्द अथवा प्रयोग पूर्वेकडील देशांमध्यें आढळत असले तरी त्याच्याही प्रांतांत त्यांचा कांहीं शिष्ट लोक प्रयोग करीत असत. जर सर्व निरनिराळ्या प्रांतांमधील मतभेदांना त्यानें जागा दिली असती तर या भिन्नभिन्न प्रयोगांच्या अमर्यादित संख्येमुळें त्याला त्याचें व्याकरण लिहिणेंच एका दृष्टीनें अशक्य झालें असतें. तसेंच, अनेक प्रकारच्या अनेक विकल्पांमुळें त्याच्या व्याकरणाचें अध्ययन करून बोलणाऱ्यांचा गोंधळच झाला असता. असा गोंधळ होऊं नये व प्रचलित भाषेला एक प्रकारची स्थिरता यावी आणि बोधभाषा, बोलभाषा व ग्रंथभाषा या एकच व्हाव्या या उद्देशानेंच त्यानें निरनिराळ्या प्रांतांतील मतभेदांना जागा न देतां आपलें व्याकरण रचिलें.

## १८. वैदिक भाषेचीं कांहीं वैशिष्ट्यें.

फारसें सूक्ष्म विवेचन न करतां पाणिनीनें साधलेल्या वैदिक शब्दांचा व प्रयोगांचा वरवर विचार करून संधिकार्यें विभक्तिप्रत्यय व धातुसाधितें एवढ्याविषयींच बोलावयाचें म्हटल्यास पुढील गोष्टी प्रामुख्यानें दिसून येतातः—वैदिक वाङ्मयांत अनेक वेळां दोन स्वर संनिध आले

---

१. काशिकाकारांनीं हें श्लोकवार्तिक "एङ् प्राचां देशे" (पा. सू. १।१।७५) या सूत्राचें व्याख्यान करतांना उद्धृत केलें आहे. त्यामध्यें 'शरावती' या पाठापेक्षां 'इरावती' हा पाठ ज्यास्त चांगला आहे व वार्तिक पाठाच्या हस्तलिखित प्रतींत तो आढळतो. महाभाष्यांत हें वार्तिक उद्धृत केलेलें आढळत नाहीं.

असतां संधिकार्य केल्याशिवाय उच्चारण केलें जात असे. कधीं कधीं त्या दोन स्वरांमध्यें अंतःस्थ वर्ण घातला जात असे. स्वरान्त धातूच्या पुढें प्रत्ययांतील स्वर आला असतां बहुधा इकाराच्या पुढें ' य् ' तसेंच, उकाराच्या पुढें ' व् ' घालण्यांत येत असे, आणि यण्-संधि केला जात नसे. कांहीं प्रसंगीं संयुक्त व्यंजनांमध्यें पुढील व्यंजनास योग्य असा स्वर दोन व्यंजनांमध्यें घातला जात असे. क्वचित् ठिकाणीं दोन व्यंजनांमधील ऱ्हस्व स्वर काढून टाकून संयुक्त व्यंजनेंही केलीं जात असत. वेदामध्यें-विशेषतः वृत्तबद्ध ऋचांमध्यें-वृत्तांना अनुरूप अक्षरांची संख्या होण्याकरितां हें सर्व करण्यांत येत असलें तरी वेदपठणामुळें ' छान्दस ' प्रयोग लोकांच्या सारखे कानीं पडून त्या तऱ्हेनें प्रचलित भाषेंत उच्चारण करण्याची कांहीं प्रांतांची प्रवृत्ति झाली. विभक्तिप्रत्ययांचे बाबतींतही अनेक प्रकारचें वैशिष्ट्य वैदिक भाषेंत होतें. त्यांतील विभक्तिप्रत्ययाचा लोप, किंवा त्या प्रत्ययाच्या आद्य स्वराचा व प्रकृतीच्या अंत्य स्वराचा मिळून पूर्वसवर्णदीर्घ, किंवा त्या प्रत्ययाला ' आ ' आदेश किंवा ' या ' आदेश हे प्रकार प्रमुखपणानें आढळून येतात. तृतीयेचा 'भिस्' प्रत्यय हा 'ऐस्' आदेश न होतां कायम राहणें, तसेंच चतुर्थी विभक्तीबद्दल साधारणपणें षष्ठी विभक्तीचा उपयोग हेही प्रकार वैदिक वाङ्मयांत बऱ्याच ठिकाणीं आढळतात. त्याप्रमाणेंच स्वरान्त अव्ययांच्या शेवटच्या स्वराला दीर्घ केलेलाही अनेक ठिकाणीं दृष्टीस पडतो. धातूंच्या रूपांविषयीं विचार केल्यास लुङ्, लङ्, लृङ्, प्रत्यय जोडले असतांना धातूच्या पूर्वीं होणारा ' अ ' हा आगम अनेक ठिकाणीं वेदामध्यें आढळून येत नाहीं. तीन भूतकालांच्या ( लुङ्, लङ् व लिट् ) उपयोगाविषयीं रूढ असलेले निर्बंधही वेदामध्यें कडकपणानें पाळण्यांत आलेले दिसत नाहींत. क्रियापदांचे बाबतींतील विशेष म्हणजे भाषेमध्यें न आढळणारा सर्वसामान्यकालवाचक लेट् हा लकार वेदामध्यें पाणिनीनें वर्णन केला आहे व या लेट् प्रत्ययाचे पूर्वीं अट् व आट् हे आगमही सांगितले आहेत. त्याचप्रमाणें दुसऱ्या तिसऱ्या, पांचव्या, सातव्या, आठव्या व नवव्या गणांतील धातूंच्या पुढेंही केव्हां केव्हां 'शप्'

---

१. उदाहरणार्थ ' बुध्न्यो अग्र्न्० ' ' यो अस्कभायत्० ' इत्यादि प्रयोग पहा.

२ उदाहरणार्थ—अग्नयाशा, पटवाशा, भूवादयो धातवः इत्यादि पहा.

३. याविषयीं " छन्दस्युभयथा " ( पा. सू ६।४।८६ ) व उदाहरणें पहा.

४. उदाहरणार्थ—सुवर्ग्यं लोकम्; त्रियम्बकं यजामहे, विभुवम्, तनुवं पुषेम इत्यादि. " न य्वाभ्यां पदान्ताभ्यां पूर्वौ तु ताभ्यामैच् " ( पा. सू. ७।१।३ ) हें सूत्र पाणिनीनें केलें आहे तें करतांना त्याच्या मुळाशीं अशाच प्रकारचा अन्तःस्थ वर्ण दोन स्वरांमध्यें घालण्याचा प्रघात त्याच्या मनांत असावा.

५. उदाहरणार्थ—समाम्नायः समाम्नातः, प्रथमं दध्र आपः इत्यादि.

६. याविषयीं " सुपां सुलुक्पूर्वसवर्णा० " ( पा. सू ७।१।३९ ) हें सूत्र व त्याचीं उदाहरणें पहा.

७. याविषयीं " अतो भिस ऐस् " व " बहुलं छन्दसि " ( पा. सू. ७।१।९,१० ) हीं सूत्रें व त्यांचा उदाहरणें पहा.

८. याविषयीं " चतुर्थ्यर्थे बहुलं छन्दसि " ( पा. सू २।३।६२ ) हें सूत्र व उदाहरणें पहा.

९. याविषयीं " ऋचि तुनुघमक्षु० " ( पा. सू. ६।३।१३३ ) हें सूत्र व उदाहरणें पहा.

१०. याविषयीं " बहुलं छन्दस्यमाङ्योगेपि " ( पा सू ६।४।७५ ) हें सूत्र व उदाहरणें पहा.

११. याविषयीं " छन्दसि लिट् " ( पा. सू. ३।२।१०५ ) व उदाहरणें पहा.

१२. याविषयीं " लिङर्थे लेट् " ( पा. सू. ३।४।७ ) " लेटोऽडाटौ " ( पा. सू. ३।४।९४ ) हीं सूत्रें व उदाहरणें पहा.

हा विकरण दृष्टीस पडतो असें म्हटलें आहे. लुङ् प्रत्ययापूर्वी ' च्लि ' प्रत्ययाला अङ् व चङ् हेही आदेश वेदामध्यें अनेक ठिकाणीं आढळून येतात[2]. धातूंच्या रूपांविषयीं वरील प्रकारचें वैशिष्टय दिसून येतें त्यावरून वेदकालीं स्वरान्तच ( स्वर शेवटीं असलेलाच ) धातू समजण्याचा परिपाठ असावा. तद्धित प्रत्ययांचे बाबतींत वेदामध्यें भाषेपेक्षां अगदीं निराळे असे वैदिक प्रत्यय आढळत नाहींत; फक्त कधीं कधीं एका प्रत्ययाऐवजीं दुसरा एवढेंच वैशिष्टय दिसतें. स्त्रीप्रत्ययांसंबंधानें दीर्घ ई शेवटीं असलेला रात्री शब्द किंवा ' बहु ' वगैरे शब्दांऐवजीं ' बह्वी ' वगैरे शब्द या प्रकारचें किरकोळ वैशिष्टय दिसून[3] येतें. कृदन्त प्रत्ययांचे बाबतींत वैशिष्टय म्हणजे तुम् (तुमुन्) प्रत्ययाचे ऐवजीं से, असे, अध्यै, वगैरे अनेक प्रत्यय[4] व त्वा ( क्त्वा ) प्रत्ययाचे ऐवजी य ( ल्यप् ) प्रत्ययाचा उपयोग किंवा उलटापालट[5] हेही प्रकार वैदिक वाङ्मयांत अनेक ठिकाणीं दिसून येतात.

## १९ पाणिनीचे कालांतील प्रांतीय ' संस्कृत ' भाषा.

भारतांतील सर्व प्रांतांमध्यें वेदग्रंथ हे निरपेक्ष प्रमाण होते व त्यांचा पाठ सर्व ठिकाणीं सारखाच चालू होता; व तसाच तो कायम रहाण्याविषयीं खबरदारी घेतली जात असे. वैदिक वाङ्मयांत आढळून येणाऱ्या प्रयोगांच्या वरतीं निर्दिष्ट केलेल्या विविधतेचा व वैशिष्टयाचा त्या त्या प्रांतांतील प्रचलित भाषेवर मात्र निरनिराळा परिणाम झाला व प्रांतानिहाय वेदभाषेंतील वरतीं निर्दिष्ट केलेल्या वैशिष्टयांपैकीं निरनिराळीं वैशिष्टयें प्रत्येक भाषेंत कांहीं याप्रमाणें प्रांतीय बोलभाषेंतही प्रसृत झालीं; व त्या अनुरोधानें बोलभाषांमध्यें निराळेपणा दिसून येऊं लागला. पाणिनीचे वेळीं प्रचलित असलेल्या भाषेचा पाणिनीनें 'भाषा' या शब्दानेंच उल्लेख केला आहे; तरी सोयीकरितां त्या भाषेला पाणिनीच्या प्रांतांतील 'संस्कृतभाषा' म्हणण्यास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें वेदामधील कांहीं वैशिष्टयें घेऊन उत्तरदेशांतील 'संस्कृत' भाषा झाली व पाणिनीनें तिचें व्याकरण रचिलें त्याप्रमाणें मथुराप्रांत ( शूरसेनदेश ), कोसलप्रांत, प्राग्देश, मगध, मालव, महाराष्ट्र, लाट वगैरे देशांमध्येंही वैदिक भाषेमधील इतर कांहीं वैशिष्टयें घेऊन त्या त्या प्रांतांमधील 'संस्कृत' भाषा तयार झाल्या. पाणिनिपूर्व कालीं व पाणिनीच्या कालीं या भाषा साधारणतः एकच होत्या. शब्दांचे अर्थ, शब्दांचे संबंध व वाक्यरचना हीं सर्व सारखींच होतीं. फक्त स्वर, संधिकार्यें, ह्रस्व उच्चारणाऐवजीं दीर्घ उच्चारण किंवा व्यतिक्रम, व कांहीं ठिकाणीं विशिष्ट प्रत्यय व आगम यांमुळें शब्दांच्या रूपांमध्यें थोडीफार भिन्नता होती. या प्रांतीय ' संस्कृत ' भाषांचीं निरनिराळीं व्याकरणेंही अस्तित्वांत असावीं, व इन्द्र, आपिशलि, कात्यायन, गार्ग्य, शाकटायन वगैरे वैयाकरण त्यांचे कर्ते असावे. त्यांपैकीं ऐन्द्र व्याकरण हें शूरसेन अथवा हस्तिनापुर प्रांतांत प्रचलित असावें व

---

१. याविषयीं " व्यत्ययो बहुलम् " ( पा. सू. ३।१।८५ ) व उदाहरणें पहा.

२. याविषयीं " कृमृदृरुहिभ्यश्छन्दसि " ( पा.सू. ३।१।५९ ) व उदाहरणें पहा.

३. याविषयीं "रात्रेश्चाजसौ" "नित्यं छन्दसि" (पा.सू ४।१।३१, ४।१।४७) हीं सूत्रें व उदाहरणें पहा.

४. याविषयीं " तुमर्थे सेसेनसे० " ( पा सू ३।४।९ ) व उदाहरणें पहा.

५. याविषयीं " समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप् " व " क्त्वापि च्छन्दसि " ( पा. सू. ७।१।३७, ३८ ) हीं सूत्रें व उदाहरणें पहा.

त्यामुळें त्या व्याकरणांत निर्दिष्ट केलेले विशिष्ट शब्द व त्यांचीं विशिष्ट रूपें महाभारत ग्रंथांत आढळून येतात. कात्यायन हा दाक्षिणात्य समजण्यांत येत होता. तो जरी अगदीं दक्षिणेचा नसला तरी पाणिनीच्या उत्तरदेशाच्या दक्षिणेस मालवदेश हें त्याचें निवासस्थान असावें.

## २०. निरनिराळ्या प्रांतांतील 'प्राकृत' भाषा.

या अनेक प्रकारच्या 'संस्कृत' भाषांमध्यें वरतीं निर्दिष्ट केलेल्या वैदिक भाषेच्या वैशिष्ट्यांपैकीं निरनिराळीं कांहीं वैशिष्ट्यें होतीं. कांहीं शतकें गेल्यावर या भाषांमध्यें तद्देशीय शब्दांचाही भरणा झाला व त्याबरोबरच त्या त्या देशांतील उच्चारणवैशिष्ट्यांमुळें एका वर्णाचे ऐवजीं दुसऱ्या वर्णाचें उच्चारण किंवा वर्णलोप किंवा वर्णागम यांसारखे इतर प्रकारही या भाषांमध्यें प्रसृत झाले, व या 'संस्कृत' भाषांची परिणति निरनिराळ्या 'प्राकृत' भाषांमध्यें झाली. या 'प्राकृत' भाषांमध्यें चतुर्थी विभक्ति, आत्मनेपद, द्विवचन, ऋ, ॠ, ऌ, ऐ व औ हे स्वर आणि विसर्ग[2] हे सर्वच गाळले गेले. 'स' काराबद्दल 'श' कार, श व ष यांचे ऐवजीं स[3], न ऐवजीं ण, शब्दांचे आरंभीं नसल्यास क, ग, च, ट, त, द, प या व्यंजनांचा लोप, अथवा त्यांचे ऐवजीं 'य'काराचें उच्चारण[4], संयुक्त व्यंजनांमध्यें एकवर्गीय व्यंजनांचा संयोग, संयोगामध्यें समानवर्गीय व्यंजनें नसल्यास तशीं तीं करणें, तसेंच संयुक्त व्यंजनांतील एक व्यंजन गाळून मागील स्वराला दीर्घ[5] हे किंवा अशाच प्रकारचे फरक लोकांच्या उच्चारण वैशिष्ट्यास अनुरूप असे निरनिराळ्या भाषांमध्यें निरनिराळ्या प्रकारांनीं अंमलांत आले. प्रांतीय 'संस्कृत' भाषांपासून तयार झालेल्या या प्रांतीय भाषांना 'प्राकृत'[6] ही सामान्य संज्ञा देण्यांत आली व त्या भाषांवर कात्यायन, वररुचि, चंड, हेमचन्द्र वगैरे वैयाकरणांनीं त्या भाषांतील शब्दप्रयोगांसंबंधीं नियम घालून व्याकरणें रचिलीं.

## २१. 'संस्कृत' भाषा व 'प्राकृत' भाषा यांचा संबंध.

याप्रमाणें या शौरसेनी, महाराष्ट्री, जैनमहाराष्ट्री, मागधी, अर्धमागधी, पाली वगैरे त्या त्या प्रांतांतील 'प्राकृत' बोलभाषा त्या त्या प्रांतांमधील विशिष्ट 'संस्कृत' भाषांपासून तयार झाल्या. वैदिक वाङ्मयामध्यें आढळणारे छान्दस शब्द व प्रयोग सोडल्यास या प्रांतीय 'संस्कृत' भाषा व वेदभाषा साधारणतः एकच होत्या हें वरतीं दाखविलेंच आहे. या 'संस्कृत' भाषांमधील उत्तर देशांतील 'संस्कृत' भाषा ही पाणिनीनें व्याकरणबद्ध केली. म्हणून तिच्यामध्यें कांहींही फरक न पडतां आजपर्यंत ती जशीच्या तशी कायम राहिली आहे व त्यावेळेपासून आजपर्यंत सुमारें अडीच हजार वर्षें भारतांतील सर्व

१. "प्रियतद्धिता दाक्षिणात्याः । यथा लोके वेदे चेति प्रयोक्तव्ये यथा लौकिकवैदिकेषु इति प्रयुञ्जते" (व्या. म भा.ग १ पृ.१८ पहा.)

२ याविषयीं "लोकाद् इति च वर्तते तेन ॠ ॠ ऌ ऐ औ ङ ञ श ष विसर्जनीयप्लुतवर्जो वर्णसमाम्नायो लोकादवगन्तव्यः" (हे. सू. १।१।१ हैमवृत्ति पहा.)

३ याविषयीं हेमचन्द्र प्राकृत व्याकरण "शषोः सः" (हैमसूत्र ८।१।२६०) व उदाहरणें पहा.

४. याविषयीं हेमचन्द्र प्राकृत व्याकरण "कगचजतदपयवां प्रायो लुक्" तसेंच "अवर्णो यश्रुतिः" (हैमव्याकरण ८।१।१७७, १८०) हीं सूत्रें पहा.

५ याविषयीं "लुप्तयरवशषसां शषसां दीर्घः" (हे. सू. ८।१।४३) पहा.

६. "अथ प्राकृतम्" (हैमव्याकरण १।१।१) हें हेमचन्द्राच्या व्याकरणाचें पहिलेंच सूत्र पहा.

प्रांतांमध्यें 'संस्कृत' भाषा अथवा 'गीर्वाण' भाषा म्हणून तीच बोलली जात आहे व तिच्यांतच ग्रंथ-रचना केली जात आहे. वरतीं निर्दिष्ट केलेल्या महाराष्ट्री, अर्धमागधी, पाली वगैरे 'प्राकृत' भाषांतही धार्मिक व लौकिक वाङ्मय आहे, काव्यें व नाटकें आहेत, सुभाषितें व कथानकेंही आहेत, तसेंच तत्त्वज्ञानपर कांहीं ग्रंथही आहेत. परंतु संस्कृत वाङ्मयाशीं तुलना करतां ते फारच थोडे आहेत. ते कांहीं विशिष्ट ठिकाणीं विशिष्ट कालखंडांतच लिहिले गेले व त्यांचा संस्कृतसारखा सर्वत्र प्रसार झाला नाहीं. या प्राकृत वाङ्मयांतील अर्धमागधींत लिहिलेले जैन आगम ग्रंथ व पालीमध्यें लिहिलेले त्रिपिटक ग्रंथ सर्वांत प्राचीन आहेत. त्यांमधील विषय जरी इसवी सनापूर्वीं पांचव्या व सहाव्या शतकांत गौतमबुद्ध व महावीर यांनीं प्रतिपादन केला असला तरी ते ग्रंथ बुद्ध व महावीर या धर्मप्रवर्तकांचे नंतर कांहीं वर्षांनीं त्यांच्या शिष्यांनीं व प्रशिष्यांनीं रचिले हें "अत्थं वयई अरिहा सुत्तं गंथंति गणहरा निउणम्" ( अर्थं वदति अर्हा, सूत्रं ग्रथ्नन्ति गणधरा निपुणम् ) या निर्युक्तींतील उक्तीवरून सिद्ध होतें. पाणिनीच्याच काय, पण कात्यायनाच्याही कालापर्यंत ते रचिले नसावे. पाणिनिकालीं या भाषा जरी बोलण्यांत असल्या तरी त्यांमध्यें ग्रंथ मुळींच नसल्यामुळें पाणिनि व कात्यायन यांनीं त्यांचा उल्लेखही केला नाहीं. एकंदरींत पाहतां, छान्दस प्रयोग बाजूला ठेवल्यास वैदिक भाषा म्हणजेच 'संस्कृत' भाषा, तसेंच प्रांतीय 'संस्कृत' भाषांपासून परिणत झालेल्या व वैदिक प्रयोगवैशिष्ट्यें व प्रांतीय उच्चारणवैशिष्ट्यें ज्यांमध्यें उतरलीं आहेत अशा व उच्चारणास सुलभ केलेल्या ज्या प्रांतीय भाषा त्याच 'प्राकृत-भाषा' असें सिद्ध होतें. तेव्हां "प्रकृतिः संस्कृतम्" या प्राकृतभाषेच्या व्याकरणकारांनीं व टीकाकारांनीं म्हॅटल्याप्रमाणें संस्कृत हीच प्राकृत भाषांची जननी असें मानिलें तरी चालेल. तसेंच पाश्चात्य भाषाशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें वैदिक भाषेपासून प्राकृतभाषा तयार झाल्या असेंही मानण्यास कांहीं हरकत नाहीं.

## २२. पाणिनिकालचे व्याकरणग्रंथकार.

पार्षदकालीं निरनिराळ्या प्रांतांमध्यें थोड्याफार फरकाच्या निरनिराळ्या 'संस्कृत' भाषा प्रचलित होत्या व त्या त्या प्रांतांमधील त्या त्या वैयाकरणांनीं त्यांचा अभ्यास करून त्यांवर व्याकरणग्रंथ रचिले हें वर सांगितलेंच आहे. अशा वैयाकरणांपैकीं आपिशलि, काश्यप, गार्ग्य, गालव, चाक्रवर्मण, भारद्वाज, शाकटायन, शाकल्य, सेनक व स्फोटायन या दहा वैयाकरणांचा पाणिनीनें आपल्या सूत्रांमध्यें निर्देश केला आहे. यांशिवाय वार्तिकांमध्यें व महाभाष्यामध्यें काशकृत्स्न, कुणरवाडव, व्याडि, वाजप्यायन वगैरे वैयाकरणांचे उल्लेख आले आहेत. "इन्द्र-श्चन्द्रः काशकृत्स्नापिशली शाकटायनः । पाणिन्यमरजैनेन्द्रा जयन्त्यष्टादिशाब्दिकाः" या वैयाकरणकुलांमध्यें प्रसिद्ध असलेल्या श्लोकांतही सूत्रें, वार्तिकें व भाष्य यांमध्यें उल्लेख न आलेल्या इन्द्र, अमरसिंह व जैनेन्द्र या तीन वैयाकरणांचीं नांवें गोविलेलीं आढळतात. प्रातिशाख्य ग्रंथांमधील तसेच यास्काचार्यांच्या निरुक्तामधील उल्लेख पाहिल्यास सहज आणखी कित्येक ग्रंथकार सांपडतील कीं, ज्यांपैकीं थोडे तरी त्या वेळचे व्याकरणग्रंथकार असतील. या सर्व वैयाकरणांपैकीं ज्या दहा वैयाकरणांचे सूत्रांमध्यें प्रत्यक्ष उल्लेखच आले आहेत ते सोडल्यास बाकीचे वैयाकरण हे पाणिनीच्या पूर्वीं होऊन गेले किंवा नंतर होऊन गेले हें सिद्ध करणें फार कठिण आहे. वरतीं सांगितलेंच आहे कीं, केवळ प्रातिशाख्य ग्रंथांमध्यें त्यांचा उल्लेख मिळतो म्हणून ते

---

१. "अथ प्राकृतम्" ( हैमसूत्र १।१।१ ) या सूत्रावरील हैमवृत्ति पहा.

पाणिनीच्या पूर्वीं झाले किंवा पाणिनीच्या सूत्रांमध्यें उल्लेख नाहीं म्हणून ते पाणिनीनंतर झाले असा कोणत्याही प्रकारचा निश्चय करतां येणें शक्य नाहीं.

## २३. ग्रंथकारांचा उल्लेख गोत्र-प्रत्ययान्त नांवानें करण्याची प्रथा.

नांवांवरूनच फक्त विचार करावयाचा म्हटल्यास भारतांत अत्यंत प्राचीन कालापासून व्यक्तिगत वैशिष्ट्यावरून अथवा गुणावरून अथवा क्रियेवरून किंवा केवळ यदृच्छेनें ठेविलेलीं विश्वामित्र, गृत्समद, वसिष्ठ, शुनःशेप वगैरे अनेक विशेषनामें प्रचलित असलीं व वेदवाङ्मयामध्यें त्यांचा वेळोवेळीं उल्लेख आला असला तरी शिक्षा, कल्प, व्याकरण वगैरे वेदाङ्गग्रंथांचे कर्त्यांचा उल्लेख गोत्रप्रत्ययान्त शब्दांनेंच केलेला आढळतो. वेदाङ्गग्रंथकालीं ग्रंथकर्त्या विद्वान ऋषींचा व ग्रंथाध्ययन करणाऱ्या आचार्यांचा तद्धितप्रत्ययान्त शब्दांनींच उल्लेख करण्याची प्रथा होती. प्रातिशाख्य ग्रंथ, तन्त्रग्रंथ, निरुक्त व पाणिनीचा गणपाठ यांमध्यें आढळणाऱ्या अशा नांवांची गणना केल्यास त्यांची संख्या सहज दोनतीनशेंच्यावर जाईल. आरंभीं म्हणजे ग्रंथनिर्मितीला सुरुवात झाली त्या वेळीं हीं नावें जरी सोयीचीं वाटलीं तरी कालांतरानें एकाच कुळांत एकाच वेळीं बापलेक किंवा भाऊभाऊ किंवा चुलतेपुतणे ग्रंथकार झाले असतां गार्ग्य, दाक्षि, या तऱ्हेचें गोत्रनांव दोघांचें एकच असल्यामुळें दोघांपैकीं कोणता ग्रंथकर्ता ओळखावा याविषयीं संशय येऊं लागला, व तो संशय दूर करण्याकरितां गोत्रनांवापुढें आणखी एक प्रत्यय लावून गार्ग्य व गार्ग्या-

१. तैत्तिरीय व मैत्रायणीय प्रातिशाख्यांमध्यें आग्निवेश्य, आग्निवेश्यायन, आत्रेय, आह्वरक, उख्य, उत्तमोत्तरीय, काण्डमायन, काण्डिन्य, कौहलीपुत्र, गौतम, तैत्तिरीय, पौष्करसादि, प्लाक्षायण, प्लाक्षि, भारद्वाज, माचाकीय, मीमांसक, वाडभीकर, वात्सप्र, वाल्मीकि, शाङ्खायन, शैत्यायन, स्थविरकौण्डिन्य, सांकृत्य व हारीत हीं नांवें सांपडतात.

ऋक्प्रातिशाख्यामध्यें आन्यतरेय, आगस्त्य, कौत्स, गार्ग्य, पाञ्चाल, प्राच्यपाञ्चाल, बाभ्रव्य, माक्षव्य, मांडूकेय, यास्क, वेदमित्र, व्याडि, शाकटायन, शाकल, शाकल्य, शाकल्यपिता, शूरवीर, व शौनक हीं नांवें सांपडतात.

वाजसनेयिप्रातिशाख्यामध्यें औपशीवि, कात्यायन, काण्व, काश्यप, गार्ग्य, जातूकर्ण्य, दाल्भ्य, माध्यंदिन, शाकटायन, शाकल्य व शौनक हीं नांवें सांपडतात, कात्यायनप्रातिशाख्यामध्यें कण्व नांवाचा उल्लेख मिळतो

ऋक्तन्त्रामध्यें इन्द्र, औदव्रजि, नैगी, पाणिनि, बृहस्पति, ब्रह्मा, भारद्वाज, शाकटायन हीं नांवें सांपडतात.

निरुक्तामध्यें आग्रायण, औदुम्बरायण, औपमन्यव, और्णवाभ, कात्थक्य, क्रौष्टुकि, गालव, चर्मशिरस्, तैटीकि, वार्ष्यायणि, शाकपूणि व स्थौलष्ठीविन् हीं नांवें सांपडतात.

पाणिनीनें दिलेलीं दहा वैयाकरणांचीं नांवें प्रसिद्धच आहेत. त्यांशिवाय वार्तिकांमध्यें पौष्करसादि व शौनक यांचा उल्लेख मिळतो व महाभाष्यामध्यें आपिशलि, काशकृत्स्न, कुणरवाडव, क्रौष्ट्रीय, गोनर्दीय गोतम, भारद्वाजीय, यास्क, वार्ष्यायणि, व्याडि, शाकटायन व सौनाग यांचा उल्लेख मिळतो.

यांशिवाय प्राच्य व उदीच्य ग्रंथकार असेही उल्लेख पुष्कळ ठिकाणीं आले आहेत. प्राच्यपञ्चाल, शाकल्यपिता या उल्लेखांवरून या प्राचीनकाळींसुद्धां एकाच कुलामध्यें दोन प्रसिद्ध ग्रंथकर्त्यांना तेंच गोत्रनांव असल्यामुळें दोहोंमधील भेद दाखविण्याकरितां प्राच्य व पिता यांसारखे शब्द जोडण्याची जरूर भासूं लागली होती हें दिसून येतें.

यण तसेंच दाक्षि व दाक्षायण यांसारखे दोनदोन शब्द प्रचारांत आले. पाणिनीनें तद्धित प्रकरणांत या प्रत्ययांची नोंद करून त्यांना गोत्रार्थक प्रत्यय व युवार्थक प्रत्यय अशीं नावें दिलीं आहेत. ग्रंथकारांचे गोत्रप्रत्ययान्त नांवानें अथवा युवप्रत्ययान्त नांवानें असे उल्लेख पाणिनिपूर्वकालीं व पाणिनीनंतर दोनतीनशें वर्षेपर्यंत आढळून येतात. कालान्तरानें हींही नांवें गैरसोयीचीं झालीं. कारण, एकाच कुलामध्यें गोत्रनांवानें प्रसिद्ध असलेल्या गार्ग्य, कात्यायन यांसारख्या एका प्रसिद्ध व्यक्तीच्या पांचव्या सहाव्या वंशजांनाही तींच नांवें दिलीं गेल्यामुळें संशय येऊं लागला व तो दूर करण्याकरितां गोत्रनांव व वैयक्तिक नांव हीं दोनही एकदम उच्चारण्याचा प्रघात सुरू झाला. साधारणपणें पाणिनीनंतर लवकरच ही प्रथा पडली असावी व या प्रथेचीं कुणर-वाडव, वररुचि-कात्यायन, सौर्य-भगवान् वगैरे उदाहरणें देतां येतील. ही प्रथा विचारांत घेतली असतां वाजसनेयिप्रातिशाख्यकर्ता कात्यायन हा पाणिनिपूर्वी होऊन गेला व त्याचाच वंशज दोनचारशें वर्षांनंतर वररुचि-कात्यायन हा पाणिनीनंतर होऊन गेला असें म्हटल्यास कांहीं हरकत दिसून येणार नाहीं.

## २४. वैयक्तिक नांवानें उल्लेख करण्याची प्रथा.

गोत्रनांवाऐवजीं देशाच्या नांवावरून 'रहिवाशी' या अर्थाचा प्रत्यय लावून साधलेलें नांव किंवा आईच्या नांवापुढें पुत्र शब्द लावून किंवा पुत्र या अर्थी प्रत्यय लावून साधलेलें गोनर्दीय अथवा गोणिकापुत्र यांसारखेंही नांव वैयक्तिक नांवाबरोबर उच्चारण्यांत येऊं लागलें. हीही प्रथा कांहीं शतकें टिकली. त्यानंतर वैयक्तिक नांवांमध्यें पुष्कळ विविधता उत्पन्न झाल्यामुळें व एका कुटुंबांत वैयक्तिक नांवेंही हटकून निरनिराळीं ठेवण्याचा प्रघात पडल्यामुळें वैयक्तिक नांवानेंच उल्लेख करण्याची प्रथा पडली. या वैयक्तिक नांवांची भर्तृहरि, पुण्यराज, हेलाराज, जिनेन्द्र-बुद्धि, कैयट, धर्मकीर्ति, हरदत्त, देवनन्दिन्, जयादित्य, वामन, उदयन, चन्द्रगोमिन्, क्षपणक, पाल्यकीर्ति, बोपदेव वगैरे अनेक उदाहरणें देतां येतील. हीं व्यक्तिनांवें व्यक्तीच्या गुणवैशिष्ट्यावरून, स्वभाववैशिष्ट्यावरून तसेंच कांहीं विशिष्ट घटनेमुळें देण्यांत आलीं, तर कांहीं वेळां केवळ यदृच्छेनेंही तीं देण्यांत आलीं. ही प्रथा पतंजलीच्या नंतर पडली व साधारणत: बारापंधरा शतकें ती चालू होती. जरी वैयक्तिक नांवांमध्यें विविधता पुष्कळ होती तरी हजार दीडहजार वर्षांच्या कालखंडांत तेंच व्यक्तिनांव धारण करणाऱ्याही अनेक व्यक्ती दिसून येऊं लागल्या व संशयाला पुन्हां जागा मिळाली. अशा तऱ्हेचा संशय दूर करण्याकरितां धंद्यावरून, निवासस्थानावरून, विशिष्ट कार्यावरून किंवा जातीवरून साधलेलें असें नांव उपनांव म्हणून या व्यक्तिनांवाबरोबर उच्चारण्यांत येऊं लागलें व ती प्रथा आजपर्यंत चालू आहे. रामचंद्र शेष, भट्टोजी दीक्षित, नागेश उपाध्याय, मैत्रेय रक्षित, विठ्ठल शेष वगैरे अनेक जोडनांवें या प्रथेचीं उदाहरणें म्हणून देतां येतील. अशा तऱ्हेचीं उपनावें ब्राह्मणवर्गामध्यें भट्ट, याज्ञिक, मीमांसक, द्विवेदी, त्रिवेदी, चतुर्वेदी, सामवेदी, यज्वा, वाजपेयी वगैरे अनेक आढळतात. विद्वान पूर्वज हा आचार्य, उपाध्याय किंवा पंडित म्हणून प्रसिद्धीला आल्यानंतर त्याच्या वंशजांना तेंच नांव देण्यांत येत असे. विद्वान जैन साधूंच्या पुढें 'सूरि,' तसेंच वेदान्ती संन्याश्यांच्या पुढें 'सरस्वती', विद्वानांच्या पुढें शास्त्री, तसेंच याज्ञिककर्मे करणाऱ्यांच्या नांवापुढें भट्ट हींही उपपदें जोडण्यांत आलीं.

## २५. नांवांवरून निष्कर्ष व पार्षद कालांतील वैयाकरण.

व्यक्तिनांवांच्या व उपनावांच्या या विवेचनावरून साधारणपणें निष्कर्ष काढणें झाल्यास, पाणिनिपूर्वकालीं ग्रंथकर्त्यांचा निर्देश गोत्रप्रत्ययान्त किंवा युवप्रत्ययान्त नांवानें केला जात असे.

पाणिनीनंतर भाष्यकारांचे कालापर्यंत या गोत्रप्रत्ययान्त अथवा युवप्रत्ययान्त नांवाच्या पुढें अथवा मागें व्यक्तीच्या नांवाचा निर्देश केला जात असे. भाष्यकारांनंतर साधारणपणें भट्टोजी दीक्षितांच्या कालापर्यंत केवळ व्यक्तिगत नांवानेंच उल्लेख केला जात असे व भट्टोजी दीक्षितांच्या कालानंतर हल्लीं व्यक्तिगत नांवाच्या पुढें उपनांव लावण्याचा प्रघात पडला आहे. कधीं कधीं व्यक्तिगत नांवापुढें उपनांवापूर्वीं देव, विजय, शंकर, यासारखें माननीय नांव किंवा शास्त्री, भट्ट, राय यांसारखें गुणनिदर्शक नांव किंवा पितृनामही उपपद जोडण्यांत येतें. पाणिनीनें उल्लेख केलेल्या दहा वैयाकरणांशिवाय इतर ज्या वैयाकरणांचे उल्लेख प्रातिशाख्य ग्रंथांमध्यें, निरुक्तांत किंवा वार्तिकांमध्यें किंवा महाभाष्यांत आले आहेत त्यांचीं नांवें पाहिल्यास तीं बहुधा गोत्र-प्रत्ययान्त किंवा युवप्रत्ययान्त आढळून येतात. म्हणून पाणिनीनें जरी त्यांचा निर्देश केला नसला तरी ते पाणिनिपूर्व असूं शकतील, व तसें मानण्यास कांहीं हरकतही दिसत नाहीं. अशा वैयाकरणांपैकीं साधारणपणें ठळक वैयाकरणांचा निर्देश त्यांच्या वैशिष्ट्याची दिशा दाखवून पुढील संग्रहकारिकांमध्यें केला आहे–

नामान्याख्यातजानीति प्रब्रूते **शाकटायनः** ।
न तथेति प्राह **गार्ग्यः**, इन्द्रेणार्थः पदं स्मृतम् ॥ १ ॥
अन्त्यवर्णसमुद्भूता धातवश्च प्रकीर्तिताः ।
किद्विकल्पं तृषादीनां क्त्वायाः प्रोवाच **काश्यपः** ॥ २ ॥
ऋत एव थलोऽनिट्त्वं **भारद्वाजो**ऽब्रवीत्तथा ।
पुंवद्भाषितपुंस्कं च तृतीयादिषु **गालवः** ॥ ३ ॥
प्रगृह्यसंज्ञां संबुद्धौ **शाकल्यो** लौकिकेष्वितौ ।
ह्रस्वं प्रकृतिभावं चासवर्णेऽभ्युक्तवानिकः ॥ ४ ॥
इताविकारस्याचष्टे ईकारं **चाक्रवर्मणः** ।
गिरेरिकारस्याकारं तथैव प्राह **सेनकः** ॥ ५ ॥
गोरोकारस्यावङं तु प्राह **स्फोटायन**स्तथा ।
वृद्धेर्विकल्पं सुब्धातौ प्रोवाच**आपिशलि**र्मुनिः ॥ ६ ॥
समूहेऽर्थे तथा धेनोरनञः कं च तद्धितम् ।
नाम्ना पुष्करणं तस्य शब्दशास्त्रं प्रकीर्तितम् ॥ ७ ॥
**वैयाघ्रपद्यं** दशकं **पाणिनीयं** त्वकालकम् ।
**काशकृत्स्नं** त्रिकं प्रोक्तं तथा च गुरुलाघवम् ॥ ८ ॥
द्रव्याभिधानिक**व्याडे**र्दशधुष्करणं स्मृतम् ।
अनेकशेषं **दैवं** स्याच्चान्द्रं चासंज्ञकं स्मृतम् ॥ ९ ॥
करोतेरादिकर्तृत्वे दीर्घत्वं शास्ति **शौनकिः** ।
द्वित्वं **पौष्करसादि**स्तु चयः प्राह परे शरि ॥ १० ॥
वष्टि **भागुरि**रल्लोपमवाप्योरुपसर्गयोः ।
**आपं** चैव हलन्तानां यथा वाचा निशा दिशा ॥ ११ ॥
**चारायण**श्छछ्रयोगात् पुच्छकृच्छ्रे पुरोः कृतात् ।
**माध्यन्दिनि**श्चोशनसः संबुद्धौ च त्रिरूपताम् ॥ १२ ॥ स्वकृत.

## २६. पाणिनीनें निर्दिष्ट केलेल्या वैयाकरणांच्या मतभेदांवरून निष्कर्ष.

पाणिनीनें निर्दिष्ट केलेल्या दहा वैयाकरणांच्या मतभेदांचा विचार केल्यास ते मतभेद संधिकार्यें, द्वित्व, आगम, स्वर व गुण यांविषयींच आहेत; प्रत्ययभेद किंवा शब्दसिद्धि यांविषयीं नाहींत; तसेंच धातुसाधितें किंवा नामसाधितें यांविषयींही नाहींत. मतभेद दाखविणारीं अठरा सूत्रें आहेत. त्यांपैकीं संधिकार्याबद्दल मतभेद आठ सूत्रांत प्रदर्शित केला आहे. या मतभेदाचा विचार केल्यास असें दिसून येतें कीं वेदामध्यें दोन असवर्ण स्वर जवळ आले असतां उच्चारण-सौकर्यामुळें व स्वाभाविक असलेल्या उच्चारणपद्धतीमुळें संधि न करतां पहिल्या स्वरासारखा अंत:स्थवर्ण त्या दोन स्वरांमध्यें घालून जी विशिष्ट उच्चारणपद्धति होती तीच कांहीं प्रांतांत प्रचलित 'संस्कृत' भाषांत पाळण्यांत आली, व तीच प्रांतीय 'संस्कृत' पासून तयार झालेल्या 'प्राकृत' भाषांमध्यें पाळली गेली. 'अर्धमागधी' प्राकृतामध्यें दोन स्वर जवळ आले असतां 'य'कार मध्यें घातला जातो व महाराष्ट्री प्राकृतामध्यें या दोन स्वरांमधील 'य'काराचें उच्चारण केलें जात नाहीं. साधारणपणें अनुमान काढावयाचें झाल्यास यकाराचें उच्चारण करणारे शाकटायन व स्फोटायन हे पूर्वेकडील देशांत राहणारे असावे, तसेंच गार्ग्य व शाकल्य हे उत्तरेकडील राहणारे असावे. पाणिनीच्या उत्तर प्रांतांत दोन्ही तऱ्हांनीं उच्चारण चालू असावें. दोन सूत्रांमध्यें द्वित्वाबद्दल मतभेद आला आहे; तोही उच्चारणवैशिष्ट्यामुळेंच झाला आहे. कारण, संयुक्त व्यंजन आलें असतां पूर्वीच्या स्वराच्या वर जोर पडून तो स्वर ह्रस्व असल्यास त्याचें उच्चारण दीर्घ स्वरासारखें साहजिकच होतें; व त्यामुळें त्याच्या पुढें संयुक्त व्यंजनें दोन किंवा अधिक असलीं तरी त्यांचे उच्चारणांत फरक पडत नाहीं. उदा० 'पुत्रम्' उच्चारलें काय किंवा 'पुत्त्रम्' उच्चारलें काय सारखेंच; म्हणून त्या व्यंजनांना द्वित्व करण्याचा प्रघात कांहीं प्रांतांमध्यें पडला होता तोच पाणिनीनें नमूद केला आहे. त्यावरूनही पूर्वेकडील शाकटायनाच्या प्रदेशांत द्वित्वानें दोनाचीं तीन व्यंजनें करून उच्चारण्याचा प्रघात असावा व शाकल्याच्या उत्तरेकडील प्रांतांत तो नसावा. यांशिवाय पाणिनीनें नमूद केलेले मतभेद हे किरकोळ स्वरूपाचे—इडागमविकल्प, ह्रस्व, स्वरितोच्चारण यांबद्दल[३], किंवा 'इ' काराच्या ऐवजीं अकाराबद्दल, अथवा रूपभेदांबद्दलच आहेत; व त्यांवरूनही प्रांतीय मतभेदाचेंच निदर्शन केलें जातें. यावरून या सर्व वैयाकरणांनीं त्यांचे प्रांतांतील प्रचलित 'संस्कृत' भाषेचीं व्याकरणें लिहिलीं असावीं. या व्याकरण-ग्रंथांमध्यें

---

१, वा सुप्यापिशलेः (६।१।९२) प्रार्षभीयति प्रर्षभीयति; ओतो गार्ग्यस्य (८।३।२०) भो इदम्, भोयिदम्; व्योर्लघुप्रयत्नतरः शाकटायनस्य ( ८।३।१८ ) अस्मायुद्धर, अस्माउद्धर; लोपः शाकल्यस्य (८।३।१९) असा आदित्य:, असावादित्यः; संबुद्धौ शाकल्यस्येतावनार्षे ( १।१।१६ ) वायो इति, वायविति; अवङ् स्फोटायनस्य (६।१।१२३) गवाग्रम्, गोऽग्रम्; ई चाक्रवर्मणस्य (६।१।१३०) चिनुहीदम्, चिनुही ३ इदम्; इकोऽसवर्णे शाकल्यस्य ह्रस्वश्च (६।१।१२७) दधि अत्र, दध्यत्र;

२. त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य (८।४।५०) इन्द्र:; सर्वत्र शाकल्यस्य (८।४।५१) अर्कः.

३. तृषिमृषिकृषेः काश्यपस्य (१।२।२५) तृषित्वा, तर्षित्वा; इको ह्रस्वोऽङ्यो गालवस्य (६।३।६१) ब्रह्मबन्धुतरा, ब्रह्मबन्धूतरा; नोदात्तस्वरितोदयमगार्ग्यकाश्यपगालवानाम् (८।४।६७) गार्ग्यस्तत्र.

४. अड् गार्ग्यगालवयोः ( ७।३।९९ ) अस्वपीत्, अस्वपत्; गिरेश्च सेनकस्य ( ५।४।१११ ) उपगिरम्, उपगिरि.

५. ऋतो भारद्वाजस्य (७।२।६३) सस्मर्थ; लङः शाकटायनस्यैव (३।४।१११) अयुः; तृतीयादिषु भाषितपुंस्कं पुंवद् गालवस्य (७।१।७४) शुचये, शुचिने.

जसा प्रातिशाख्यांमध्यें वेदाच्याविषयीं विचार केलेला आहे तसाच म्हणजे वर्णसंख्या, वर्णोच्चारण, वर्णलोप, संधिकार्यें, स्वर, ह्रस्वदीर्घ-विचार,व द्वित्व यांबद्दलचाच विचार प्रामुख्यानें केला असावा. या वैयाकरणांशिवाय इतरही वैयाकरण पाणिनिपूर्व कालीं झाले असावे हें जरी त्यांचा उल्लेख पाणिनि-सूत्रांमध्यें आलेला नसला तरी इतर ग्रंथांमध्यें आलेल्या त्यांच्या उल्लेखांवरून व उताऱ्यांवरून स्पष्ट होतें.

## २७. 'ऐन्द्र व्याकरण-संप्रदाया'-विषयीं विवेचन.

अशाच वैयाकरणांपैकीं पण पाणिनीनें उल्लेख न केलेला इन्द्र नांवाचा एक मोठा वैयाकरण होऊन गेला असावा. इन्द्रानें लिहिलेला म्हणून प्रसिद्ध असा ऐन्द्र व्याकरण नांवाचा ग्रंथ एकही हस्तलिखितांमध्यें सुद्धां उपलब्ध नाहीं. तैत्तिरीय संहितेमध्यें(६।४।१)देवांनीं इन्द्राला वाणीचें स्पष्टीकरण करण्याची विनंति केली अशा तऱ्हेची आख्यायिका आहे. तिचा अर्थ इन्द्र ही वाणीची अधिष्ठात्री देवता आहे व इन्द्राच्या अनुग्रहाशिवाय वाणीचें शुद्ध उच्चारण होणें व योग्य अर्थ कळणें अशक्य आहे एवढाच आहे. महाभाष्यांतही (म.भा.भाग१पृ.१२) 'बृहस्पतीनें इन्द्राला १००० देववर्षें शब्द शिकविले तरी शब्द संपले नाहींत' असें वाक्य आहे. हें वाक्य केवळ अर्थवाद स्वरूपाचें आहे व त्यामध्यें शब्द असंख्य आहेत येवढाच अर्थ अभिप्रेत आहे. पाणिनीनें आठ ठिकाणीं 'प्राचाम्' शब्द उच्चारून पूर्वींच्या वैयाकरणांचे मतभेद प्रदर्शित केले आहेत. त्यांपैकीं सहा मतभेद तद्धित प्रत्ययांसंबंधीं आहेत. प्राचाम् या शब्दानें तेथें 'ऐन्द्र' व्याकरणाचा उल्लेख पाणिनीनें केला आहे व ऐन्द्र नांवाचा जरी एखादा विशिष्ट व्याकरणग्रंथ नव्हता तरी ऐन्द्र ही एक व्याकरणशाखा होती व तिलाच उद्देशून 'प्राचाम्' शब्द पाणिनीनें आपल्या सूत्रांत घातला आहे असें बर्नेलसारखे कांहीं वैयाकरणांचें मत आहे. पाणिनिसूत्रांमध्यें प्राचाम् या शब्दाचा अर्थ 'पूर्वींचे' अथवा 'प्राचीन काळचे' असा दिसत नाहीं. 'प्राचाम्' याच्या जोडीला त्यानें 'उदीचाम्' असा शब्द कांहीं ठिकाणीं घातला आहे त्यावरून "प्राचाम्' हा देशवाचक शब्द आहे व पूर्वेकडील वैयाकरण हा त्या शब्दाचा अर्थ पाणिनीला अभिप्रेत असावा. पूर्वेकडील देशांतल्या पाणिनिपूर्व लोकप्रिय व्याकरणसंप्रदायाला 'ऐन्द्र' हें नांव दिलें असण्याचा संभव आहे.

## २८. ऐन्द्र व्याकरणासंबंधीं कांहीं आख्यायिका.

ऐन्द्र नावानें प्रसिद्ध असा व्याकरणग्रंथ असो, किंवा ऐन्द्र हें संप्रदायाचें नांव असो, या ऐन्द्र व्याकरणाचें कोणत्या प्रकारचें वैशिष्ट्य होतें त्याची कल्पना त्या व्याकरणाविषयीं आलेल्या इतर ग्रंथांतील उल्लेखांवरून थोडीशी येण्याजोगी आहे. तैत्तिरीय संहिता ( ६।४।१ ) ग्रंथांतील उल्लेख व महाभाष्यांतील उल्लेख अर्थवादात्मकच आहेत. बृहत्कथामञ्जरीमध्यें व कथासरित्सागरामध्यें पाणिनीची आख्यायिका दिली आहे. त्या आख्यायिकेमध्यें पाणिनीच्यावर अनुग्रह करण्याकरितां शंकरानें हुंकार केला व त्यामुळें ऐन्द्र व्याकरण नष्ट झालें अशी आख्यायिका आहे. बौद्ध ग्रंथांमध्यें ऐन्द्र व्याकरणाचा उल्लेख करून शारिपुत्रानें लहानपणीं ऐन्द्र व्याकरणाचें अध्ययन केलें असें म्हटलें आहे. बृहस्पतीनें इन्द्राला व्याकरण शिकविलें, तें ऐन्द्र व्याकरण जम्बूद्वीपांत चालूं होतें, पण पाणिनीच्या व्याकरणानें तें मागें पाडिलें अशी तिबेटामधील पाली वाङ्मयामध्यें नोंद आढळते. चान्द्र व्याकरणाचें पाणिनीय व्याकरणाशीं सादृश्य आहे तसेंच कालाप व्याकरणाचें ऐन्द्र व्याकरणाशीं सादृश्य आहे असा पंडितांमध्यें प्रवाद आहे.

इतकेंच नव्हे, तर कालाप अथवा कातन्त्र व्याकरणाचा कर्ता शर्ववर्मा यानें कार्तिकेयाला आपणास व्याकरणाचा उपदेश करण्याविषयीं विनंति केली असतां कार्तिकेयानें 'सिद्धो वर्णसमाम्नायः' असें पहिलें सूत्र म्हटल्याबरोबर शर्ववर्म्यानें पुढील सर्व सूत्रें रचिलीं अशीही दन्तकथा आहे. सारस्वत व्याकरणाच्या टीकेंत "इन्द्रादयोपि यस्यान्तं न ययुः शब्द-वारिधेः। प्रक्रियान्तस्य कृत्स्नस्य क्षमो वक्तुं नरः कथम्" असा श्लोक आहे. देवगिरीच्या बोपदेवानें धातुपाठाच्या आरंभीं लिहिलेला "इन्द्रश्चन्द्रः काशकृत्स्नापिशली शाकटायनः। पाणिन्यमरजैनेन्द्रा जयन्त्यष्टादिशाब्दिकाः" हा श्लोक लोकांमध्यें प्रसिद्धच आहे. याशिवाय देव-बोधानें महाभारतावरील टीका लिहितांना आरंभींच "यान्युज्जहार माहेन्द्राद् व्यासो व्याकरणा-र्णवात्। पदरत्नानि किं तानि सन्ति पाणिनिगोष्पदे ॥ न दृष्ट इति वैयासे शब्दे मा संशयं कृथाः। अशैरज्ञातमित्येव पदं न हि न विद्यते" या श्लोकांत ऐन्द्र व्याकरणाचा गौरव करून त्याच्या विस्ताराची कल्पना दिली आहे. बर्नेलनें टोलकप्पिय (टोळकल्पित = व्याकरणपाठशाळा-मध्यें अभ्यासोपयुक्त ग्रंथ) नांवाच्या दाक्षिणात्य व्याकरणाचें कातन्त्र व्याकरणाशीं तसेंच कात्यायनाच्या पाली व्याकरणाशीं साम्य दाखविलें आहे; आणि कातन्त्राचें मूळ ऐन्द्र व्याकरण असल्यामुळें ऐन्द्र व्याकरण कसें असावें त्याची कल्पना दिली आहे. त्यावरून ऐन्द्र व्याकरणा-मध्यें वर्णसमाम्नाय व संधिकार्यें प्रथम प्रकरणामध्यें, त्यानंतर विभक्तिप्रत्यय, सर्वनामें, कारक, समास व तद्धित याविषयीं विचार दुसऱ्या प्रकरणामध्यें, धातूंचे प्रकार, काल व अर्थवाचक प्रत्यय, द्वित्व, संप्रसारण, गुण, अनुषङ्ग व इडागम याचा विचार तिसऱ्या प्रकरणामध्यें व शेवटीं चवथ्या प्रकरणामध्यें कृत्प्रत्ययांचा विचार केला असावा असें दिसतें.

## २९. ऐन्द्र व्याकरण व वर्णसमूहाचा विचार.

ऐन्द्र व्याकरणामध्यें ग्रंथारंभीं वर्णांचें विवेचन केलें असलें पाहिजे हें "अथ वर्णसमूहः" या चरक-व्याख्याकारांनीं उद्धृत केलेल्या ऐन्द्र सूत्रावरून सिद्ध होतें. या वर्णसमूहांत किती वर्ण होते व त्यांचा क्रम कसा होता हें जरी स्पष्ट नसलें तरी वर्ण सांगणारीं सूत्रें त्यानें दिलीं होतीं व प्रत्येक सूत्राच्या शेवटीं त्यानें इत् म्हणजे मूक वर्ण जोडले असावे. हे इत् वर्ण जोडून पाणिनीनें जसे प्रत्याहार केले आहेत तशा प्रकारचे प्रत्याहार त्यानें केले नसले तरी इत्संज्ञक वर्णांची मूळ कल्पना त्याची असावी असें नन्दिकेश्वराच्या[1] "अत्र सर्वत्र सूत्रेषु०" या कारिके-वरील उपमन्युकृत व्याख्येमध्यें[2] 'धात्वर्थम्' या पदाचें व्याख्यान करतांना व्याख्याकारांनीं घातलेल्या 'तथा चोक्तमैन्द्रे अन्त्यवर्णसमुद्भूता धातवः परिकीर्तिताः' या ओळीवरून स्पष्ट दिसून येतें. या ओळीच्या अर्थाचें विवेचन जरी टीकाकारांनीं केलेलें नसलें तरी शेवटीं 'समुद्भूत' वर्ण ज्याला जोडला आहे तो धातू असा त्या श्लोकार्धाचा अर्थ असावा. वेदकालीं पुष्कळसे धातू अकारान्त असले पाहिजेत हें 'भेदति,' 'हनति,' 'मरति' वगैरे वेदांमध्यें जागोजागीं आढळणाऱ्या रूपांवरून दिसून येतें. आ, इ, उ वगैरे स्वर शेवटीं असलेले धातूही वेदकालीं रूढ असावे हे 'दाति' वगैरे रूपांवरून दिसून येतें. व्यंजनान्त धातू मात्र मानण्यांत

---

१. नन्दिकेश्वरकारिका २ वरील उपमन्युकृत व्याख्या पहाः

धात्वर्थं धातुमूलकशब्दशास्त्रप्रवृत्त्यर्थमित्यर्थः। अन्त्यवर्णजालं शब्द इति न्यायेन। तथा चोक्तमिन्द्रेण— 'अन्त्यवर्णसमुद्भूता धातवः परिकीर्तिताः' इति।

नसावे. पाणिनीच्या व्याकरणामध्येंही व्यंजनान्त धातू असे धातुपाठामध्यें दिले नाहींतच. धातूच्या शेवटीं स्वर हा पाणिनीनें जोडलाच आहे. तो स्वर फक्त उच्चारणाकरितां आहे. तो नाहींसा होणारा म्हणजे 'निघून जाणारा' असल्यामुळें त्याला 'इत्' (निघून जाणारा) असें म्हटलें आहे. इन्द्रानेंही आपल्या धातुपाठामध्यें व्यंजनान्त धातू दिले नसावे. त्याच्या व्याकरणामध्यें सर्वच धातू स्वरान्त—हन, भिद, दा, वगैरे होते इतकेंच नव्हे, तर त्यांचे पुढें त्यानें मुद्दाम कांहीं वर्ण त्या धातूंचें पद (परस्मैपद अथवा आत्मनेपद) किंवा इतर कांहीं वैशिष्ट्य ओळखलें जावें म्हणून लाविले होते; व त्या वर्णांना त्यानें 'मूळचे नसलेले पण उत्पन्न झालेले' या अर्थाची 'समुद्भूत' अशी संज्ञा दिली होती असें दिसतें. हे समुद्भूत वर्ण ण् ङ् क् ञ् वगैरे एकंदर तेराच असावे व पाणिनीनेंही हे तेरा समुद्भूत वर्ण इत् म्हणून घेऊन वर्णसमाम्नायाचीं उपदेश-सूत्रें चवदा करावीं लागल्यामुळें व एक वर्ण कमी आल्यामुळें दोन वेळां ण् हा अन्त्य वर्ण घातला असावा. धातूंचें मूळचें स्वरूप स्वरान्त कल्पिलें गेलें होतें म्हणूनच प्राकृत भाषांमध्यें सर्व धातू स्वरान्त आढळून येतात; व प्राकृत व्याकरणकारांनींही धातू हे स्वरान्तच असतात असा दंडकें घालून दिला आहे.

## ३०. "अर्थः पदम्" या ऐन्द्र सूत्राविषयीं विचार.

ऐन्द्र अथवा माहेन्द्र व्याकरण हें आज जरी उपलब्ध नसलें तरी वरतीं उद्धृत केलेल्या देवबोधाच्या टीकेंतील दोन श्लोकांवरून तें विस्तृत स्वरूपाचें असावें व त्यामध्यें पाणिनीच्या व्याकरणाप्रमाणें अशुद्ध किंवा सूत्रानें साधतां न येण्याजोगीं अशीं त्या वेळीं प्रचलित असलेलीं अनेक रूपें साधलेलीं असावीं. पाणिनीनें मात्र तीं रूपें आपल्या व्याकरणामध्यें साधलीं नाहींत. त्याचें कारण त्याच्या मतीं त्या रूपांचा प्रचार शिष्ट लोकांत नसावा व असल्यास तो कांहीं विशिष्ट लोकांमध्यें किंवा विशिष्ट प्रांतांमध्येंच असावा. शिवाय, अशा रूपांना आपल्या व्याकरणांत जागा दिल्यास त्यांचा प्रचार कमी होण्याऐवजीं उलटा वाढेल असेंही त्याला वाटलें असावें. 'पद' शब्दाची 'अर्थः पदम्' अशी सुटसुटीत व्याख्या ऐन्द्र व्याकरणांत दिलेली म्हणून दुर्गाचार्य वगैरे टीकाकारांनीं उद्धृत केली आहे. पाणिनीच्या मताप्रमाणें प्रत्ययान्त शब्दाला पद अशी संज्ञा आहे. 'अर्थः पदम्' अशी पद शब्दाची व्याख्या केल्यास शब्दाचा प्रकृति व प्रत्यय असा विभाग केल्यावर ती केवळ प्रकृतीला म्हणजे धातूला अथवा प्रातिपदिकालाही लागू पडेल; पण तशी ती लागू पडतां कामा नये म्हणून ती व्याख्या बाजूला सारून पाणिनीनें 'सुप्तिङन्तं पदम्' अशी व्याख्या दिली आहे. ऐन्द्र मताप्रमाणें प्रकृतिप्रत्ययविभाग कल्पिल्यावर फक्त प्रकृतीला अथवा फक्त प्रत्ययालाही 'पद' ही संज्ञा होऊं शकते व ऐन्द्र व्याकरणाचे कालीं त्याप्रमाणें ती प्रचारांतही असावी. याला पुरावा म्हणजे दृषद्भ्याम् याचा पदपाठ दृषद् भ्याम् (दृषद्भ्यामिति दृषद्ऽभ्याम्) तसाच 'पृत्सु' याचा पदपाठ पृत् सु (पृत्सु इति पृत्ऽसु) असा प्रकृति हें एक स्वतंत्र पद व प्रत्यय हें निराळें स्वतंत्र पद मानून देण्यांत येतो. देवेभिः या ठिकाणीं पदपाठकारांनीं पदें तोडलीं नाहींत; कारण, 'भिः' याला जरी वेगळा अर्थ असला तरी 'देवे' असा एकारान्त शब्द नसल्यामुळें 'देवे' याला वेगळा अर्थ नाहीं; तो वेगळा

---

१. याकरितां हेम. व्या. सूत्रें ८।४।२१९-२४१ पहा.

२. "नैकं पदजातम्। यथा अर्थः पदमित्यैन्द्राणाम्" (दुर्गाचार्य निरुक्तवृत्ति)

अर्थ 'देव' याला आहे. ऐन्द्र व्याकरणाचे पूर्वी शाकल्य वगैरे ऋषींनीं केलेले पदपाठ प्रचारांत असावे. व त्या पदपाठांचा अभ्यास करून व त्यांतील पदांकडे लक्ष देऊन इन्द्रानें आपल्या व्याकरणांत 'अर्थः पदम्' अशी व्याख्या दिली असावी. पदपाठांतील पदांचें जिनें स्पष्टीकरण होईल अशी 'अर्थः पदम्' ही व्याख्या ऐन्द्र व्याकरण हें पाणिनीच्या पूर्वी प्रचारांत असावें असें अनुमान काढण्याला एक साधन म्हणून देतां येईल. आपिशलीनें 'विभक्त्यन्तं पदम्' अशी पद शब्दाची व्याख्या दिली आहे व 'विभक्ति' शब्दाचा 'सुप् व तिङ्' असा अर्थ असल्यामुळें पाणिनि व आपिशलि यांच्या व्याख्या एकच आहेत असें म्हटलें असतां चालेल.

## ३१. माहेश व्याकरणाविषयीं अनुमान.

देवबोधाच्या टीकेमधील 'यान्युज्जहार माहेन्द्रात्०' या श्लोकामध्यें 'माहेन्द्रात्' याचे ऐवजीं 'माहेशात्' असा पाठभेद आढळतो. त्या पाठाला महत्त्व दिल्यास माहेन्द्र व्याकरणाचेंच 'माहेश' व्याकरण असें नांव पूर्वी प्रचारांत असावें; किंवा ऐन्द्र व्याकरणाच्या जोडीला माहेश व्याकरणही पाणिनिपूर्वकालीं लिहिलें असावें असें म्हणावें लागतें. माहेश व्याकरण अस्तित्वांत होतें अशी कल्पना केल्यास 'अइउण्', 'ऋऌक्' वगैरे चवदा शिवसूत्रें म्हणून जीं समजलीं जातात तीं या माहेश व्याकरणाचे आरंभीं दिलीं असावीं असें वाटतें. ऐन्द्र व्याकरण निराळें होतें असें मानिल्यास इन्द्रानें वर्णसमाम्नाय, इत्संज्ञक वर्ण व प्रत्याहार हे माहेश व्याकरणावरून घेतले असावे. "त्रिषष्टिः चतुःषष्टिर्वा वर्णाः शम्भुमते मताः" या पाणिनीय शिक्षेच्या आरंभींच्या श्लोकांतील 'शम्भुमते' या शब्दावरून शंकरानें उपदेश केलेला असा वर्णसमाम्नाय व त्यावर आधारलेला एखादा व्याकरणग्रंथ किंवा शिक्षाग्रंथ पाणिनीला अवगत असावा असें अनुमान काढणें शक्य आहे. शब्देन्दुशेखरामध्यें नागेशभट्टांनीं या बाबतींत उद्बोधक विवेचन केलें आहे व त्यावरून "वर्णसमाम्नाय हा परंपरागत फार प्राचीन—किंबहुना, वर्ण हे प्रथम कधीं उच्चारण्यांत आले हें सांगतां येत नसल्यामुळें अनादि नित्यच—होता; पाणिनीनें वर्णांचा क्रम आपणांस उपयुक्त होईल अशा रीतीनें बदलून व इत् वर्ण जोडून त्यांचें चौदा सूत्रांत संग्रथन केलें आहे" असें सुचविण्याचा त्यांचा अभिप्राय दिसून येतो. "वृत्तावसाने नटराजराजः०" ही नंदिकेश्वरांची कारिका अर्थवादात्मक आहे व पाणिनीनें दिलेल्या वर्णसमाम्नायाचें पावित्र्य व अधिकारयुक्तता दाखविणें हा त्या कारिकेंतील वर्णनाचा हेतु आहे.

## ३२. शाकटायनाचें व्याकरण

पाणिनीनें उल्लेख केलेल्या दहा वैयाकरणांपैकीं शाकटायन व आपिशलि हे मोठे वैयाकरण होऊन गेले. जरी त्यांचे ग्रंथ आज उपलब्ध नाहींत तरी त्यांचे बद्दल इतर ग्रंथांमध्यें आलेल्या उल्लेखांवरून त्यांच्या कार्याविषयीं थोडीशी कल्पना येते. शाकटायनाचा उल्लेख प्रातिशाख्यांमध्यें व निरुक्तांत[1] आला आहे. शाकटायन हा जरी वैयाकरण होता तरी शब्दव्युत्पत्तीबाबत त्याचें मत निरुक्तकारांप्रमाणें होतें ही गोष्ट निरुक्तकारांनीं "तत्र नामान्याख्यात-

---

१. याकरितां 'तत्र नामान्याख्यातजानीति शाकटायनो नैरुक्तसमयश्च । न सर्वाणीति गार्ग्यो वैयाकरणानां चैके । (निरुक्त १।१२ पहा.)

जानीति शाकटायनो नैरुक्तसमयश्च " ( निरुक्त १।१२ ) या वाक्यांत निर्दिष्ट केली आहे. द्वित्वासंबंधानें ( ८।४।५० ), यकार-वकार-लोपासंबंधानें ( पा. सू. ८।३।१८ ), व जुस् आदेशासंबंधानें ( पा. सू. ३।४।११ ) शाकटायनाचें भिन्न मत पाणिनीनें सांगितलें आहे; तीन व्यंजनांचा संयोग असतां द्वित्व करून चार व्यंजनें करूं नये असें शाकटयनाचें मत होतें; तसेंच ' य 'काराचा अथवा ' व 'काराचा लोप करणें झाल्यास पूर्ण लोप करूं नये पण अर्धवट त्या वर्णाचें उच्चारण करावें; व द्वितीय गणांतील आकारान्त धातूंना जुस् प्रत्यय विकल्पानें होऊन आयन् व अयु: अशा प्रकारचीं दोन दोन रूपें होतात असेंही त्यानें म्हटलें आहे. भाषेंतील प्रत्येक शब्द धातुसाधित असतो व त्याप्रमाणें प्रत्येक शब्दाची व्युत्पत्ति देतां येते असें निरुक्तकारांचें म्हणणें होतें; तर वैयाकरणांचें म्हणणें सर्वच शब्द धातुसाधित नसतात असें होतें. पाणिनिकालीं व त्यानंतर हे मतभेद फार तीव्र स्वरूपाचे झाले; ते इतके कीं, जर एखाद्या व्याकरणकर्त्यानें नैरुक्त मताचें प्रतिपादन केलें तर त्याची वैयाकरणांमध्यें निन्दा होत असे. शाकटायनाचीही त्या वेळीं अशा प्रकारें निंदा होत असे हें "नाम च धातुजमाह निरुक्ते व्याकरणे शकटस्य च तोकम्" (नाम म्हटलें की तें धातूपासून साधलें जातें असें निरुक्तकार म्हणतात पण शाकटाचें पोरही तेंच म्हणूं लागलें. म. भा. भाग ३ पृ. २८४ ) या भाष्यकारांनी उद्‌धृत केलेल्या श्लोकार्धावरून स्पष्ट होतें. भाष्यकार एवढा शेरा देऊनच थांबले नाहींत. शाकटायन शब्दाचीही व्युत्पत्ति केल्यास पाणिनीनें नडादि गणामध्यें शकट शब्द घालून शकट शब्दापासून शाकटायन शब्द साधल्यामुळें शकट हा आपला पूर्वज असला पाहिजे असेंही शाकटायनाला कबूल करावें लागेल असें म्हणण्यापर्यंत त्यांनीं मजल मारली आहे; व ' हा शाकटायन वेड्यासारखा बैलगाड्यांच्या रस्त्यावर बसला असतां शेजारून शेंकडों बैलगाड्या गेल्या तरी त्याला दाद लागली नाहीं' असें म्हटलें आहे. ( म. भा. भाग ३ पृ. २५० ). भाष्यकारांनीं हा केवळ विनोदच केला आहे. वरील दन्तकथेंत कांहीं तथ्य असलें तर त्यावरून शाकटायनाचा वेंधळेपणा नव्हे, तर त्याची गाढशास्त्रीयविचारमग्नता ध्यानांत येईल.

## ३३. नामांच्या व्युत्पत्तीविषयीं वैयाकरण व नैरुक्त यांमधील मतभेद.

वरतीं निर्दिष्ट केलेल्या वैयाकरण व नैरुक्त यांमधील तीव्र मतभेदाचा सामान्य रूपानें विचार केल्यास एखाद्या वस्तूला किंवा व्यक्तीला प्रथमतः जेव्हां व्यवहाराकरितां नांव देण्यांत येतें तेव्हां त्या वस्तूमधील किंवा व्यक्तीमधील विशिष्ट क्रिया पाहून तें नांव दिलें जातें किंवा विशिष्ट ध्वनीवरूनही भाषेमध्यें कित्येक नांवें देण्यांत येतात हें जरी पुष्कळ अंशीं खरें असलें तरी तशा तऱ्हेचा म्हणजे क्रियेवरूनच नामाची उत्पत्ति होते असा कडक नियम घालतां येणें शक्य नाहीं असें वैयाकरण म्हणतात. गुणावरूनही कित्येक वेळां नांवें दिलेलीं आढळतात. त्याप्रमाणेंच केवळ यदृच्छेनेंच कांहीं वेळां नांवें दिलीं जातात. ब्राह्मण-ग्रंथांमध्यें सामान्य नांवांचींच नव्हे तर ' इन्दनाद् इन्द्रः ', ' रोदनाद्रुद्रः ' अशा तऱ्हेनें संज्ञाशब्दांचीही व्युत्पत्ति दिली गेल्यामुळें नैरुक्तांनीं सर्वच प्रातिपदिकें धातुसाधितें असतात असें मत प्रतिपादन केलें असावें. अगदीं खोल विचार केल्यास यदृच्छेचे वेळींही कांहींतरी क्रिया असते, तसेंच गुणाचा वाचक असा गुणवाचक शब्दही जेव्हां प्रचारांत येतो त्या वेळीं तो कोणत्या ना कोणत्या तरी क्रियेमुळेंच प्रचारांत येतो. मनुष्याची नैसर्गिक प्रवृत्ति क्रिया पाहून उद्गार काढणें हीच असते असा अनुभव असल्यामुळें ऐतिहासिक दृष्टया मूलावलोकन केल्यास " नामान्याख्यातजानि " या प्रवादांत पुष्कळ तथ्य आहे असें दिसतें. निरुक्तकारांनीं " अथानन्वितेर्थेऽप्रादेशिके विका

पदेभ्यः पदेतरार्धान् संचस्कार शाकटायनः। एतेः कारितं च यकारादिं चान्तकरणम्। अस्तेः शुद्धं च सकारादिं च" (निरुक्त १।१३) या वाक्यामध्यें शाकटायनानें दिलेल्या 'सत्य' शब्दाच्या व्युत्पत्तीचें वर्णन केलें आहे व 'अशा तऱ्हेनें व्युत्पत्तीची कल्पना करतांना वैयाकरण असूनही शाकटायनानें आपल्या पुढें मजल मारिली आहे' असें ध्वनित केलें आहे. न्यासकारांनीं शाकटायन हा जातिवाचक, गुणवाचक, व क्रियावाचक असे शब्दांचे तीनच प्रकार मानीत होता असें म्हटलें आहे. ऋक्तन्त्र व उणादि सूत्रें हीं शाकटायनानें रचिलीं असें नागेशभट्टांनीं उद्योतांत (महाभाष्यप्रदीप १।१।१ वरील उद्योत) व लघुशब्देन्दुशेखरांत आरंभींच (ल. श. शेखर बनारस प्रत पृष्ट ७) म्हटलें आहे व तसेंच पुष्कळ वैयाकरणांचें मतही आहे. शब्दकौस्तुभ-कारांनीं ऋक्तन्त्राचा कर्ता औदव्रजि होता असें म्हटलें आहे. कदाचित् औदव्रजि हें शाक-टायनाचें दुसरें नांवही असूं शकेल. एकंदरींत पाहतां शाकटायन हा पाणिनिपूर्वकालीं पहिल्या प्रतीचा वैयाकरण होऊन गेला असें दिसतें; व त्याला "अनुशाकटं वैयाकरणाः" (पा.सू. १।४।८६ काशिकावृत्ति) या काशिकेंतील उक्तीवरून चांगली पुष्टि मिळते. हल्लीं प्रसिद्ध असलेलें 'शाकटायन व्याकरण' हें जैन शाकटायन नांवाच्या आधुनिक वैयाकरणानें रचिलें आहे.

### ३४. गार्ग्याचें व्याकरण.

शाकटायनाच्याच वेळीं गार्ग्य नांवाचा वैयाकरण होऊन गेला असावा. याचाही ग्रंथ उपलब्ध नाहीं. पाणिनीच्या सूत्रांमध्यें तीन ठिकाणीं गार्ग्य वैयाकरणाचा उल्लेख आला आहे. त्यांमधील एक स्वरासंबंधीं आहे. दुसरा 'ओ' या स्वराच्या पुढें संधिकार्यामुळें आलेल्या 'य' काराचा लोप होतो म्हणजे उच्चारण होत नाहीं असें प्रांतीय उच्चारणवैशिष्ट्य प्रतिपादन करणारा आहे. तिसरा उल्लेख केवळ रुद् स्वप् वगैरे पांच धातूंचीं अरोदत् अरोदीत् अशीं दोन दोन रूपें होतात म्हणून सांगणारा आहे. या उल्लेखांवरून गार्ग्यानें लौकिक व वैदिक या दोनही भाषांचें व्याकरण लिहिलें असावें असें दिसतें. गार्ग्य हा सामवेदाचा पदपाठकर्ता म्हणून प्रसिद्ध आहे. शाकल्यानें ऋग्वेदाचा पदपाठ करतांना ज्या ठिकाणीं दोन्ही पदें स्वतंत्र रीतीनें अर्थ प्रतिपादन करणारीं नसल्यामुळें अवग्रह देऊन पदें पाडलीं नाहींत अशा सूर्यस्य, सख्ये, अन्ये इत्यादि ठिकाणींही गार्ग्यानें पदें पाडलीं आहेत. निरुक्तामध्यें 'गार्ग्यानें स्वतः नैरुक्त असूनही सर्वच शब्द धातुसाधित नसतात असें म्हटलें आहे' असा उल्लेख आला आहे (नि. १।१२). त्यावरून गार्ग्याच्या व्याकरणांत शब्दांचीं धातूपासून व्युत्पत्ति देणारें मोठें प्रकरण असलें पाहिजे व अर्थाच्या धोरणानें योग्य दिसेल तेथेंच व्युत्पत्ति द्यावी असें त्यानें म्हटलें असावें असें दिसतें. गार्ग्याची दुसरी कामगिरी म्हणजे त्यानें 'उपसर्ग हे विशेषक असतात' म्हणजे 'त्यांना स्वतंत्र अर्थ असतो' असें आपलें मत व्यक्त केलें आहे (निरुक्त १।३); त्यावरून एका दृष्टीनें गार्ग्यानें शब्दाच्या अर्थविचारशास्त्राला आरंभ केला असें म्हटलें तरी चालेल.

---

१ सन्तं अर्थं आययति इति सत्यम्. 'झालेली गोष्ट कळवून जें देतें तें सत्य' असा व्युत्पत्तीवरून 'सत्य' शब्दाचा अर्थ शाकटायनाला अभिप्रेत असावा. (निरुक्त १।१३ वरील दुर्गवृत्ति पहा.)

२. याकरितां पा. सू. ३।३।१ वरील न्यासवृत्ति पहा.

३. "नोदात्तस्वरितोदयमगार्ग्यकाश्यपगालवानाम्" (पा. सू. ८।४।६७) पहा.

४. "ओतो गार्ग्यस्य" (पा. सू. ८।३।२०) पहा.

५. "अड् गार्ग्यगालवयोः" (पा. सू. ७।३।९९) पहा.

## ३५. शाकल्य, काश्यप, भारद्वाज, गालव, चाक्रवर्मण, सेनक व स्फोटायन यांचीं व्याकरणें.

गार्ग्य व शाकटायन यांचेच समकालीन असलेल्या व पाणिनीनें उल्लेख केलेल्या वैयाकरणांपैकीं शाकल्य, काश्यप व भारद्वाज यांचा उल्लेख प्रातिशाख्य ग्रंथांमध्यें मिळतो. शाकल्यानें ऋक्संहितेचा पदपाठ केला असें प्रसिद्धच आहे. पाणिनीच्या सूत्रांमध्यें आलेले शाकल्याचे उल्लेख पाहिले असतां ते दोन पदें संनिध आलीं असतां होणाऱ्या संधिकार्याबद्दलच आहेत. त्यांवरून ऋग्वेदाचा पदपाठकर्ता शाकल्य यानेंच लौकिक भाषेविषयींही व्याकरण रचिलें असावें असें दिसतें. पदाच्या शेवटच्या स्वराला असवर्ण स्वर पुढें आला असतां संधिकार्य न होणें (पा. सू. ६।१।१२७) तसेंच संधिकार्यामुळें झालेल्या 'य'काराचा अथवा 'व'काराचा लोप होणें (पा. सू. ८।३।१९) हें शाकल्याच्या प्रांतांतील वैशिष्ट्य पाणिनीच्या प्रांतांतही आढळून येत असल्यामुळें शाकल्याचा पाणिनीनें उल्लेख केला आहे. 'शाकल्यमतानें असवर्ण स्वर पुढें आला असतां पदाच्या शेवटीं असलेल्या स्वराला संधिकार्य होत नाहीं व तो स्वर दीर्घ असल्यास ह्रस्व होतो' असें जें 'इकोऽसवर्णे०' (पा.सू. ६।१।१२७) या सूत्रांत भिन्न मत प्रतिपादन केलें आहे त्याचा भाष्यकारांनीं व वार्तिककारांनीं 'शाकल' म्हणून उल्लेख केला आहे व वार्तिककारांनीं "सित् प्रत्यय पुढें असतांना तसेंच नित्यसमासामध्येंही शाकल प्रकृतिभाव करूं नये" (६।१।१२७ वा. १) असें स्पष्ट सांगितलें आहे. शकल शब्द गर्गादि गणामध्यें आहे व शकलाचें गोत्रापत्य या अर्थीं शाकल्य हा शब्द साधला आहे. त्यावरून पदपाठकर्त्याचें व व्याकरणकर्त्याचें शाकल्य हेंच नांव योग्य आहे. शाकल्याची शाखा, ग्रंथ अथवा मत यांना 'शाकल' म्हणतां येतें. शाकल हें ग्रंथकर्त्याचें नांव आढळून आल्यास तें चुकीनें पडलें असावें असें वाटतें. काश्यपाचा उल्लेख इडागमासंबंधीं (पा. सू. १।२।२५) व स्वरासंबंधीं (पा. सू. ८।४।६७) आला आहे. भारद्वाजाचाही उल्लेख एकदांच इडागमनिषेधासंबंधीं (पा. सू. ७।२।६३) आला आहे. प्रातिशाख्यग्रंथांत काश्यप व भारद्वाज या दोघांचाही उल्लेख आला आहे. त्यावरून त्यांनींहीं एखाद्या शाखेचें प्रातिशाख्य रचिलें असल्याचा संभव आहे. प्रातिशाख्यांमध्यें ज्यांचे उल्लेख आले नाहींत अशा गालव, चाक्रवर्मण, सेनक व स्फोटायन या चार वैयाकरणांचा पाणिनीनें आपल्या सूत्रांत उल्लेख केला आहे. त्यांपैकीं गालवाचा मतभेद स्वराविषयीं, अडागमाविषयीं, ह्रस्वाविषयीं व पुंवद्भावाविषयीं (पा. सू. ८।४।६७; ७।३।९९; ६।३।६१; ७।१।७४) असा चार वेळां आला आहे. चाक्रवर्मण, सेनक व स्फोटायन यांचा उल्लेख एक एकदांच आला आहे (पा. सू. ६।१।१२८, ५।४।११२, ६।१।१२३). स्फोटायन या वैयाकरणाला 'स्फोटाबद्दल प्रामुख्यानें विचार केला असल्यामुळें स्फोटायन हें नांव देण्यांत आलें' असें हरदत्तानें पदमञ्जरी टीकेमध्यें म्हटलें आहे. हे चारही ग्रंथकार व्याकरणकर्ते असावे व त्यांनीं व्याकरणग्रंथ रचिले असावे.

## ३६. आपिशलीचें व्याकरण.

आपिशालि हा शाकटायनाप्रमाणेंच पाणिनिपूर्वकालीं एक मोठा वैयाकरण होऊन गेला असावा. पाणिनीनें आपिशलीचा उल्लेख फक्त एकाच ठिकाणीं "वा सुप्यापिशलेः" (पा. सू. ६।१।९२) या सूत्रामध्यें केला आहे. पण पाणिनीनंतरच्या इतर बऱ्याच ग्रंथकारांनीं त्याचा निर्देश केला असल्यामुळें व त्यांनीं ज्या बाबतींमध्यें त्याचा निर्देश केला आहे त्या बाबतींत पाणिनीचे सूत्रामध्यें कांहींच निर्देश न आल्यामुळें पाणिनीनें उल्लेख केलेल्या आपिशलीपेक्षां निराळा दुसरा आपिशालि पाणिनीनंतर होऊन गेला कीं काय व पाणिनीच्याच

सूत्रांचें त्यानें व्याख्यान केलें कीं काय असा संशय येतो. परंतु, मतभेद असेल तरच पाणिनि इतर वैयाकरणांचा निर्देश करतो, मतभेद नसल्यास इतर वैयाकरणांचीं मतें आपल्या सारखींच असल्यानें त्यांचा निर्देश न करतां तो तीं प्रतिपादन करीत असतो अशी पाणिनीची लिहिण्याची पद्धति असल्यामुळें,आपिशलि हा पाणिनिपूर्वकालीं मोठा वैयाकरण होऊन गेला असावा व त्याच्या व्याकरणांत आलेल्या संज्ञांचा,त्यानें दिलेले नियमांचा,फार काय,पण त्यानें दिलेल्या सूत्रांचाही पाणिनीनें आपल्या व्याकरणांत समावेश केला असावा असें म्हणणें ज्यास्त सयुक्तिक दिसतें. हरदत्तानें आपल्या ग्रंथाच्या आरंभींच शुद्ध शब्द कोणते व अपशब्द कोणते याबद्दल सविस्तर विचार करून जे शब्द 'अनिदंप्रथम' म्हणजे सार्वकालिक व ज्यांचें उच्चारण परंपरेनें जाणलें जातें ते शुद्ध शब्द आणि जे विशिष्ट कालीं प्रचारांत आले व त्यापूर्वीं जे नव्हते ते अशुद्ध शब्द असा सिद्धान्त मांडला आहे; व त्याचा खुलासा करण्याकरितां पाणिनीनें हे शब्द शुद्ध व हे अशुद्ध असें कोणापासून जाणलें तर आपिशलीपासून, आपिशलीनें कोणापासून तर त्याच्या पूर्वीच्या वैयाकरणांपासून, त्यानें कोणापासून तर त्याच्याही पूर्वीच्या वैयाकरणांपासून असें म्हटलें आहे.[1] यावरून आपिशलि हा मोठा वैयाकरण पाणिनीच्या पूर्वी होऊन गेला या म्हणण्यास चांगलीच पुष्टि मिळते.

## ३७. आपिशलीच्या व्याकरणाचें पाणिनीच्या व्याकरणाशीं साम्य.

आपिशलीचें व्याकरण फार विस्तृत होतें व पाणिनीनंतरही कित्येक शतकें त्याचें अध्ययन चालू होतें हें महाभाष्य, काशिका, पदमञ्जरी, न्यास, शब्दकौस्तुभ वगैरे ग्रंथांमध्यें त्याचेविषयीं आलेल्या उल्लेखांवरून स्पष्ट होतें. भाष्यामध्यें आपिशलीचा ग्रंथ या अर्थी 'आपिशल' शब्दाचा उल्लेख दोनें ठिकाणीं आला आहे[2] व स्वर-प्रकरणांमध्यें[3] "आपिशल-पाणिनीयव्याडीयगौतमीयाः" असा आपिशलि, पाणिनि व्याडि व गौतम या चार वैयाकरणांचा उल्लेख आला आहे. भाष्यामधील सर्वांत महत्त्वाचा उल्लेख म्हणजे "तथा चापिशलेर्विधिः" या श्लोकवार्तिकाच्या चरणाचें स्पष्टीकरण करतांना भाष्यकारांनीं "धेनुरनञि कमुत्पादयति" असें आपिशलीचें सूत्रच उद्धृत केलें आहे हा आहे.[4] या उल्लेखावरून भाष्यकारांचे वेळीं आपिशलीचें सूत्रबद्ध व्याकरण उपलब्ध असलें पाहिजे, एवढेंच नव्हे तर त्याचा पुष्कळ ठिकाणीं अभ्यासही चालू असला पाहिजे. पाणिनीनें क्रौड्यादि गणांत आपिशलि व व्याडि यांचा

---

१. "अनिदंप्रथमाः शब्दाः साधवः परिकीर्तिताः ।
त एव शक्तिवैकल्यप्रमादालसतादिभिः ॥ १ ॥
अन्यथोच्चरिताः पुंभिरपशब्दा इतीरिताः ।
स्मारयन्तश्च ते साधूनर्थधीहेतवः स्मृताः ॥ २ ॥

आदिमन्तोऽपभ्रंशाः । ... तत्र ये साधवस्ते शास्त्रेणानुशिष्यन्ते, असाधुभ्यो विविक्ताः प्रकृतिप्रत्ययविभागेन ज्ञाप्यन्ते इमे साधव इति । आपिशलेन पूर्वव्याकरणेन । आपिशलिना तर्हि केनावगतं, ततः पूर्वेण व्याकरणेन ... ( काशिकाव्याख्या पदमञ्जरी भाग १ पृ. ६।७ पहा. )

२. "आपिशलिना प्रोक्तं" ( व्याकरणमहाभाष्य १।१।१ पृ, २६) तसेंच आपिशलमधीते ब्राह्मणी आपिशला ब्राह्मणी" ( व्याकरणमहाभाष्य पा. सू. ४।१।४ भाग ४ पृ. ३६ ) पहा.

३. व्याकरणमहाभाष्य पा. सू. ६।२।३६ भाग ५ पृ. २५७ पहा.

४. "तथा चापिशलेर्विधिः । एवं च कृत्वा आपिशलेराचार्यस्य विधिरुपपन्नो भवति । धेनुरनञि कमुत्पादयति । धेनूनां समूहो धैनुकम् । अधेनूनां समूहः आधेनवम् ॥ ( व्या. म. भा. भाग ४ पृ. १८२ पहा. )

उल्लेख केला आहे व भाष्यकारांनीं स्वर-प्रकरणांत व्याडिशाला व आपिशलिशाला हीं उदाहरणेंही दिलीं आहेत; तसेंच 'आपिशलमधीते' (आपिशल ग्रंथांचें अध्ययन करणारी) या अर्थी 'आपिशला' असा शब्दही दिला आहे. या सर्व उल्लेखांवरून आपिशलि व व्याडि हे दोघेही मोठे वैयाकरण पाणिनिसमकालीन अथवा थोडेसे पूर्वी होऊन गेले असून त्यांच्या ग्रंथांचें अध्ययन पाणिनीय व्याकरणाच्याच जोडीनें भाष्यकारांच्या कालापर्यंत अव्याहत चालू असलें पाहिजे हें सिद्ध होतें. भाष्यकारांच्या नंतरही कांहीं शतकें आपिशलिसंप्रदाय चालू होता; कारण, हरदत्तांनीं पदमञ्जरीमध्यें "मन्यकर्मण्यनादरे०" या सूत्राचें व्याख्यान करतांना आपिशलीचें नांव देऊन "मन्यकर्मण्यनादर उपमाने विभाषाप्राणिषु इत्यापिशलिरधीते स्म। न तत्र प्रतिषेधापेक्षा। तथा च भट्टिप्रयोगो निदर्शनीयः 'अश्मानं दृषदं' इत्यादि। तत्त्वाख्यानमेतत्" (पदमञ्जरी पूर्वार्ध पृ. ४२७ पा. सू. २।३।१७) या ठिकाणीं "मन्यकर्मण्यनादर उपमाने विभाषाप्राणिषु" हें आपिशलीचें सूत्रच उद्धृत केलें आहे. याशिवाय काशिका, न्यास, महाभाष्यप्रदीप, तन्त्रप्रदीप, धातुवृत्ति इत्यादि ग्रंथांमध्येंही कांहीं ठिकाणीं आपिशलीचीं सूत्रें उद्धृत केलेलीं आढळतात. या उद्धृत केलेल्या सूत्रांमध्यें व पाणिनिसूत्रांमध्यें अतिशय साम्य आढळतें. तसेंच, टाप्, ठन्, शप् वगैरे प्रत्यय, सार्वधातुक संज्ञा, भष् व जम् हे प्रत्याहार आपिशलीनेंही दिले आहेत. या सर्व गोष्टींचा विचार केल्यास असें दिसून येतें कीं आपिशलीचें व्याकरण पाणिनिपूर्वी लिहिलें गेलें व पाणिनीला त्याची पुष्कळच मदत झाली.

### १८. आपिशलीच्या व्याकरणाचें वैशिष्ट्य.

आपिशलीचें व्याकरण फार विस्तृत होतें हें वरतीं निरनिराळ्या वैयाकरणांनीं निरनिराळ्या विषयांवर त्याचीं सूत्रें उद्धृत केलीं आहेत व मतभेद दर्शविला आहे यावरून दिसून येतें. "आपिशलं पुष्करणम्" (पा. सू. ४।३।११५ वरील काशिकावृत्ति) या काशिकाकारांच्या उक्तीवरून या व्याकरणाला 'पुष्करण' म्हणण्यांत येत होतें असें दिसतें. पुष् धातूपासून पुष्करण शब्द साधिला असल्यामुळें (पोषेण करणं पुष्करणम्) व 'पुष्कल' शब्दाशीं त्याचें साम्य असल्यामुळें आपिशलीच्या विस्तृत व्याकरणाला 'पुष्करण' म्हटलें असावें असें वाटतें. 'पुष्करणम्' शब्दाऐवजीं 'दुष्करणम्' असाही पाठभेद पदमञ्जरीकारांनीं घेतला आहे व त्याचा खुलासा पाणिनीच्या 'वृत्' प्रमाणें 'दुष्' हा समाप्ति दाखविणारा शब्द आपिशलीच्या व्याकरणामध्यें होता अशा रीतीनें त्यांनीं केला आहे. पुष्करण शब्दाऐवजीं 'अन्त-

---

१. "क्रौड्यादिभ्यश्च" (पा. सू. ४।१।८०) पहा. या क्रौड्यादि गणामध्यें क्रौडि, लाडि, व्याडि, आपिशलि, सौधातकि, भौरिकि, कापिष्ठलि वगैरे शब्द दिले आहेत.

२. "छात्र्यादयः शालायाम्" (पा. सू. ६।२।८६) पहा. छात्र्यादिगणामध्यें छात्रि, भाण्डि, व्याडि वगैरे शब्द दिले आहेत.

३. "आपिशलमधीते ब्राह्मणी आपिशला ब्राह्मणी" (पा. सू. ४।१।१४ वरील महाभाष्य भाग ४ पृ. ३६ पहा.)

४. उदाहरणार्थ—"मन्यकर्मण्यनादरे उपमाने विभाषा प्राणिषु। विभक्त्यन्तं पदम्। धेनोरनञः। उभस्योभयः अद्विवचनटापोः। शताच्च ठन्यतावग्रन्थे। शब्विकरणे गुणः। करोतेश्च। मिदेश्च। तुरुस्तुशम्यमः सार्वधातुकासु च्छन्दसि।

५. "दुष् इति संकेतशब्दो यत्र क्रियते यथा पाणिनीये 'वृत्' इति, तद् दुष्करणं व्याकरणम्"। (काशिकाव्याख्या पदमञ्जरी भाग २ पृ. १८७)

करणम् '.असाही पाठ कांहीं वैयाकरणांनीं घेतला आहे. ' अन्तकरणम् ' असा पाठ घेतल्यास व ' अन्तकरण ' शब्दाचा प्रत्यय हा अर्थ घेतल्यास धातूंना व नामांना विशिष्ट अर्थीं विशिष्ट प्रत्यय लावून पद्धतशीर रीतीनें धातुसाधितांची व नामसाधितांची उपपत्ति लावणें हें आपिशलीच्या व्याकरणाचें वैशिष्ट्य होतें असें दिसून येतें. ' अन्तकरण ' हा शब्द धातु या अर्थीं निरुक्तांत[1] वापरलेला आढळतो. धातु हा अर्थ घेतल्यास आपिशलीनें धातुपाठही रचिला असावा असें दिसून येतें. आपिशलीनें वह्, वृध् व व्यध् या धातूंना ' भष्[2]-भाव ' होत नाहीं असें सांगितलें आहे. प्रथमत: येथें भष्भावाची शक्यताच कशी येते याचा विचार केल्यास बंगाल प्रांतांत जसें हल्लीं ' व ' काराचे ऐवजीं ' ब ' काराचें उच्चारण प्रचलित आहे त्या-प्रमाणें आपिशलीच्या वेळीं त्याच्या प्रांतांत प्रचलित असावें; व वंगदेशांत ' व ' काराचें उच्चारण प्राचीन कालापासून होतें असें मानिल्यास आपिशलि हा पूर्ण प्राग्देशीय वंगदेशचा राहणारा असावा असें म्हणावें लागतें. वह् , वृध् व व्यध् या तीन धातुंना भष्भावाचा निषेध आपिशलीनें ज्याअर्थी केला आहे त्याअर्थी या धातूंमध्यें जरी ' ब ' या वर्णाचें उच्चारण होत असलें तरी मूळचा दन्तौष्ठ्य ' व ' हाच वर्ण तेथें आहे, व मूळचा ' व ' कार ' ब ' सारखा उच्चारणांत आला असल्यास तेथें भष्-भाव करूं नये असें सांगण्याचें आपिशलीचें तात्पर्य आहे. 'आपिशल्युपज्ञं गुरुलाघवम्' असें काशिकाकारांनीं म्हटल्यावरून[3] सूत्रें रचितांना लाघवगौरवाचा विचार करणें हें आपिशलीचें वैशिष्ट्य होतें असें सूचित होतें. ' काशकृत्स्नं गुरुलाघवम् ' असा वैयाकरणप्रवाद प्रसिद्धच आहे. ' अस् ' धातूऐवजीं ' स् ' हा धातु आपि-शलीनें आपल्या व्याकरणांत दिला आहे असाही एक वैयाकरणप्रवाद आहे. निरुक्तामध्यें शाकटायनानें ' सत्य ' हा शब्द ' अस् ' व ' इ ' ( प्रयोजक ) या दोन धातूंपासून साधिला आहे असें सांगितलें आहे. हें सर्व विचारांत घेतलें असतां शाकटायन, आपिशलि व काशकृत्स्न हे तिघेही वैयाकरण पाणिनिपूर्वकालीं पूर्वेकडील देशांत रहात होते व तिघांनींही लौकिक व वैदिक या दोनही प्रकारच्या शब्दांचें विस्तृत व्याकरण लिहिलें होतें असें सिद्ध होतें. आपिशलीनें पाणिनी-सारखेच शिक्षा, गणपाठ, उणादिपाठ व धातुपाठ हेही रचिले असावे असें महाभाष्यप्रदीपिका, काव्यमीमांसा वगैरे ग्रंथांमध्यें आलेल्या उताऱ्यांवरून सिद्ध होतें.

## ३९. वैयाघ्रपद्याचें ' दशक ' व्याकरण.

वैयाघ्रपद्य याचेंही नांव जुन्या व्याकरणकारांमध्यें दिलें जातें. गर्गादि गणामध्यें ( पा. सू. ४।१।१०५ गणपाठ ) व्याघ्रपाद् शब्द पाणिनीनें दिला आहे त्यावरून वैयाघ्रपद्य हा पाणिनीच्या पूर्वींही होऊन गेला असावा. काशिकाकारांनीं " संबोधने तूशनसस्त्रिरूपं सान्तं तथा नान्तमथाप्यदन्तम् । माध्यन्दिनिर्वष्टि गुणं त्विगन्ते नपुंसके व्याघ्रपदां वरिष्ठः " ( पा. सू. ७।१।९४ काशिकावृत्ति ) ही जुनी कारिका उद्धृत केली आहे व हे त्रपो, हे त्रपु अशा तऱ्हेचीं

---

१. " एतेः कारितं च यकारादिं चान्तकरणम्, अस्तेः शुद्धं च सकारादिं च " ( निरुक्त १।१३ ).

२. " एकाचो बशो भष् झषन्तस्य स्ध्वोः " ( पा. सू. ८।२।३७ ) पहा.

३. " मात्रोपज्ञोपक्रमच्छाये नपुंसके " ( पा. सू. ६।२।१४ ) या सूत्रावरील काशिकावृत्ति पहा.

४. " उपज्ञाते " ( पा. सू. ४।३।११५ ) या सूत्रावरील काशिकावृत्ति पहा.

५. वरील टीप १ पहा.

दोन रूपें वैयाघ्रपद्य आचार्यांचे मतानें होतात असें सांगितलें आहे. व्याघ्रपाद् हा मूळ पुरुष. व्याघ्रपाद् शब्दापासून ' त्याचें गोत्रापत्य ' या अर्थी वैयाघ्रपद्य शब्द सिद्ध होतो. भट्टोजी दीक्षितांनीं काशिका वृत्तीमध्यें "पूर्वत्रासिद्धम्" (पा. सू. ८।२।१) या सूत्राचें स्पष्टीकरण करतांना दिलेल्या " शुष्किका शुष्कजङ्घा च......निदर्शनम् " या कारिकेचा वैयाघ्रपद्याचें वार्तिक म्हणून शब्दकौस्तुभ (पा. सू. १।१।५९ श. कौ.) ग्रंथामध्यें उल्लेख आला आहे. काशिकाकारांनीं " सूत्राच्च कोपधात् " (पा. सू. ४।२।६५) या सूत्राचीं उदाहरणें देतांना ' अष्टकाः पाणिनीयाः ' ' त्रिकाः काशकृत्स्नाः ' या उदाहरणांबरोबर ' दशकाः वैयाघ्रपदीयाः ' असें उदाहरण दिलें आहे ; तसेंच " संख्यायाः संज्ञासंघसूत्राध्ययनेषु " (पा. सू. ५।१।५८) या सूत्राचीं उदाहरणें देतांना ' अष्टकं पाणिनीयम् ' व ' त्रिकं काशकृत्स्नम् ' या उदाहरणांबरोबर ' दशकं वैयाघ्रपदीयम् ' हें उदाहरण दिलें आहे. त्यावरून वैयाघ्रपद्याचा व्याकरणग्रन्थ दहा अध्यायांचा होता असें अनुमान करतां येतें; इतकेंच नव्हे, तर पाणिनीच्या बरोबर वैयाघ्रपद्य व काशकृत्स्न यांच्या ग्रंथांच्या या उदाहरणादाखल केलेल्या उल्लेखांवरून काशिकाकारांच्या कालीं या ग्रंथांचें पाणिनीच्या अष्टाध्यायीप्रमाणें अध्ययन चालू असावें असेंही मानावयास हरकत नाहीं.

## ४०. पाणिनीचें ' अकालक ' व्याकरण.

काशिकाकारांनीं " उपज्ञोपक्रमं तदाद्याचिख्यासायाम् " (पा सू. २।४।२१) या सूत्राचीं उदाहरणें देतांना ' पाणिन्युपज्ञं अकालकं व्याकरणम् ' व ' व्याड्युपज्ञं दुष्करणम् ' अशीं उदाहरणें दिलीं आहेत. या उदाहरणांवरून पाणिनीय व्याकरणाला काशिकाकारांचे वेळीं ' अकालक ' असें टोपण नांव असावें; तसेंच व्याडीच्या ग्रंथाला ' दुष्करण ' नांव असावें असें दिसतें. ' अकालकम् 'चे ऐवजीं ' अकौलापकम् ' असा पाठभेद आढळतो; पण त्यापेक्षां ' अकालकम् ' हा पाठ अर्थबोधाला ज्यास्त बरा दिसतो. ' अकालकम् ' याचा अर्थ ' कालाधिकाररहित ' म्हणजे ' ज्यामध्यें वर्तमाना भविष्यन्ती वगैरे काल दाखविणारे अधिकार केले नाहींत असा ' हा होतो. पदमञ्जरीकारांनीं ' पूर्वाणि व्याकरणान्यद्यतनादिकालपरिभाषायुक्तानि तद्रहितं ' असें ' अकालकम् ' या पदाचें स्पष्टीकरण केलें आहे. त्यावरून पूर्वींच्या व्याकरणकारांनीं अद्यतनी, श्वस्तनी, भविष्यन्ती, अनद्यतनी, परोक्षा, भवन्ती वगैरे ज्या कालबोधक संज्ञा वापरल्या त्या संज्ञा पाणिनीय व्याकरणांत दिसत नाहींत म्हणून पाणिनीय व्याकरणाला ' अकालक ' हें नांव देण्यांत आलें होतें हें स्पष्ट होतें. महाभाष्यामध्यें अद्यतनी,

---

१. व्याघ्रस्य पादा इव पादाः यस्य या अर्थी " पादस्य लोपो० " (पा. सू. ५।४।१३८) या सूत्रानें ' अ'काराचा लोप होऊन ' व्याघ्रपाद् ' असा शब्द सिद्ध होतो. त्या शब्दाला गर्गादि गणामध्यें ' व्याघ्रपाद् ' शब्द असल्यामुळें " गर्गादिभ्यो यञ् " (पा. सू. ४।१।१०५) या सूत्रानें यञ् प्रत्यय जोडला जाऊन ' वैयाघ्रपद्य ' असा शब्द तयार होतो.

२. ' अकालापकम् ' हा पाठ घेतला असतां कालाप म्हणजे कातन्त्र व्याकरणापेक्षां निराळें हा अर्थ ' अकालापकम् ' या शब्दाचा होणें शक्य आहे.

३. पदमञ्जरी भाग १ पृष्ठ ४७२ पहा.

४. " अद्यतन्यां च " (पा. सू. २।४।३ वा. २), " वा चाद्यतन्याम् " (पा. सू. ३।२।१०२ वा. ६) तसेंच ' वाद्यतन्याम् ' (पा. सू. ६।४।११४ वा. ३) पहा.

श्वस्तनी, भविष्यन्ती व परोक्षा[3] या संज्ञा कांहीं ठिकाणीं उपयोगांत आणल्या आहेत व कातन्त्र व्याकरणांतही त्यांचा उपयोग केला आहे. पाणिनीनें मात्र या कालवाचक संज्ञांचे ऐवजीं लट् लिट् वगैरे दहा लकारयुक्त संज्ञांचा उपयोग केला आहे; व त्यामुळें त्याच्या व्याकरणाचा 'अकालकम्' म्हणून उल्लेख होणें जरी शक्य आहे तरी पण 'ज्या व्याकरणांच्या अध्ययनाध्यापनाला स्मृतिग्रंथाच्या उपयुक्ततेला ज्याप्रमाणें मर्यादा घातली आहे त्याप्रमाणें कालमर्यादा किंवा देशमर्यादा नाहीं असें व्याकरण' असा 'अकालक' शब्दाचा अर्थ घेणेंही शक्य आहे व जैनवाङ्मयांत या प्रकारचा अर्थ आढळूनही येतो. पाणिनीय व्याकरणासंबंधानें ज्यास्त विस्तार पुढें करण्यांत येईल.

## ४१. काशकृत्स्नाचें 'त्रिक' व 'गुरुलाघव' व्याकरण

काशकृत्स्न व्याकरणासंबंधीं काशिकाकारांनीं 'त्रिकं काशकृत्स्नम्' व 'त्रिकाः काशकृत्स्नाः' असे उल्लेख केले[6] आहेत. त्यांवरून काशिकाकारांचे कालीं काशकृत्स्न व्याकरण माहीत असावें व त्याचे तीन अध्याय असावे असें दिसून येतें. कदाचित् दैवव्याकरणकारांप्रमाणें जाति, गुण व क्रिया असे शब्दाचे तीनच अर्थ काशकृत्स्नाला अभिप्रेत असतील व त्यामुळेंच 'त्रिकं काशकृत्स्नम्' असें म्हटलें असण्याचा संभव आहे. "उपज्ञाते" (पा. सू. ४।३।११५) या सूत्राचें व्याख्यान करतांना 'पाणिनीयमकालकं व्याकरणम्', 'काशकृत्स्नं गुरुलाघवम्' व 'आपिशलं पुष्करणम्' अशीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यांवरून लाघवगौरवविचार हेंही काशकृत्स्नाच्या व्याकरणाचें वैशिष्ट्य असावें असें दिसतें. महाभाष्यकारांनीं आरंभींच (म. भा. भाग १ पृष्ठ २६) आपिशलीच्या बरोबर काशकृत्स्नाचा व्याकरणसंप्रदायप्रवर्तक म्हणून उल्लेख केला आहे व काशकृत्स्ना ब्राह्मणी व काशकृत्स्नी मीमांसा अशीं उदाहरणेंही दिलीं आहेत. पाणिनीनेंही "उपकादिभ्योन्यतरस्यामद्वन्द्वे" (पा. सू. २।४।६९) या सूत्रांतील उपकादि गणामध्यें, तसेंच "वुञ्छण्कठ...ठकोरीहण...कुमुदादिभ्यः" (पा सू. ४।२।८०) या सूत्रांतील अरीहणादि गणामध्यें काशकृत्स्न शब्द घातला आहे. त्यावरून काशकृत्स्न हा पाणिनिपूर्व वैयाकरण असण्या-

---

१. "परिदेवने श्वस्तनी भविष्यन्त्यर्थे" (पा. सू ३।३।१५ वा. १) पहा.

२. वरील टीप ५ पहा. तसेंच "तेषां याः क्रियास्तासु भविष्यन्तीषु" (पा. सू. ३।१।१२३ वरील भाष्य) पहा.

३. "ज्ञापकान्न परोक्षायाम्" (पा. सू. १।२।१८ वा. १) तसेंच, "क्रियायां परोक्षायाम्" (पा. सू. ३।२।११५ वरील भाष्य) पहा.

४. याविषयीं 'कलौ पाराशरस्मृतिः' हें वचन प्रसिद्धच आहे. "नियतकालाश्च स्मृतयो व्यवस्थाहेतव इति मुनित्रयेनाद्यत्वे साध्वसाधुप्रविभागः" असें कैयटभट्टांनींही "शताच्च०" (पा. सू. ५।१।२१) या सूत्रावरील आपल्या प्रदीप व्याख्येमध्यें म्हटलें आहे.

५. उदाहरणार्थ 'दशवैकालिक सूत्र' या प्रसिद्ध दहा अध्याय असलेल्या जैन सूत्रग्रंथाला "वैकालिक" असें विशेषण दिलें आहे.

६. "संख्यायाः संज्ञा०" (पा. सू. ५।१।५८) व "सूत्राच्च कोपधात्" (पा. सू. ४।२।६५) यांवरील काशिकावृत्ति पहा.

चाही संभव आहे. कैयटोपाध्यायांनीं काशकृत्स्नांच्या कांहीं सूत्रांचा आपल्या प्रदीपग्रंथांत उल्लेख केला आहे. महाभाष्यकारांच्या 'काशकृत्स्नी मीमांसा' या उल्लेखावरून[2] काशकृत्स्नांनी मीमांसा-शास्त्रावर एखादा ग्रंथ लिहिला असला पाहिजे. बादरायणसूत्रांतही काशकृत्स्नाचा उल्लेख आला आहे. पदमञ्जरीकारांनीं "तदर्हम्" (पा. सू. ५।१।११७) या सूत्राची व्याख्या करतांना "तदर्हमिति नारब्धं सूत्रं व्याकरणान्तरे। संभवत्युपमात्रापि भेदस्य परिकल्पनात्" असें म्हटलें आहे. "तदर्हमिति०" हाच श्लोक वाक्यपदीयांत आला आहे व त्याची व्याख्या करतांना हेलाराजांनीं आपिशल व काशकृत्स्न या व्याकरणांमध्यें "तदर्हम्" हें सूत्र घातलें नाहीं असें स्पष्ट विधान केलें आहे.

## ४२. व्याडीचा 'संग्रह' ग्रंथ.

पाणिनीनें आपल्या सूत्रांमध्यें उल्लेख न केलेल्या वैयाकरणांपैकीं व्याडि नांवाचाही एक मोठा वैयाकरण साधारणपणें पाणिनिसमकालीन असा होऊन गेला. व्याडीचा उल्लेख महाभाष्य-कारांनीं 'दाक्षायण' नांवानें केला[3] आहे व पाणिनीच्या गणपाठांतही[4] त्याचा उल्लेख आला आहे. त्यावरून तो पाणिनिसमकालीन किंवा जरा पूर्वीचा असावा. व्याडीनें व्याकरणशास्त्रावर 'संग्रह' नांवाचा मोठा ग्रंथ रचिला असें निरनिराळ्या ग्रंथांमध्यें त्याविषयीं आलेल्या उल्लेखां-[5]वरून व त्यांतून घेतलेल्या उताऱ्यांवरून सिद्ध होतें. महाभाष्यांतही या संग्रहग्रंथाचा उल्लेख[6] आला आहे व वार्तिककारांनीं "द्रव्याभिधानं व्याडिः" या वार्तिकांत 'सर्व शब्दांचा द्रव्य हा अर्थ असतो' असा त्याच्या मताचा उल्लेख[7] केला आहे. नंतरच्या वैयाकरणांनीं उद्धृत

---

१. "तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च" (पा. सू. २।१।५१) या सूत्रावरील भाष्याची व्याख्या करितांना "काशकृत्स्नं प्रत्ययोत्तरपदयोरिति सूत्रं तावद्विचारयति। पाणिनीयं तु पश्चाद् विचारयिष्यति" असें प्रदीपामध्यें म्हटलें आहे; तसेंच "शताच्च ठन्यतावशते" (पा. सू. ५।२।२१) या सूत्रावरील भाष्याची व्याख्या करितांना "आपिशलकाशकृत्स्नयोरत्वग्रन्थ इति वचनादन्यत्र प्रतिषेधाभावः" असेंही प्रदीपामध्यें म्हटलें आहे.

२. "अनुपसर्जनात्" (पा. सू. ३।१।१४) या सूत्रावरील भाष्य पहा. तसेंच "एको गोत्रे" (पा. सू. ४।१।९३) या सूत्रावरील, व "ञितश्च तत्प्रत्ययात्" (पा. सू. ४।३।१५५) याही सूत्रावरील भाष्य पहा. (महाभाष्य भाग ४ पृष्ठ ३६, १२३, व २६७ पहा.)

३. व्या. म. भा. भाग २ पृ. ४५३; भाग ४ पृ. ११; भाग ५ पृ. १४४ पहा.

४. पा. सू. ४।२।५४ मधील ऐषुकारि गणामध्यें दाक्षायण शब्द घातलेला आढळतो.

५. "संग्रहो व्याडिकृतो लक्षसंख्यो ग्रन्थः" (महाभाष्यप्रदीपोद्योत) तसेंच "इह पुरा पाणिनीये अस्मिन् व्याकरणे व्याड्युपरचितं लक्षग्रन्थपरिमाणं संग्रहाभिधानं निबन्धनमासीत्" (पुण्यराजकृत वाक्यपदीय टीका.) व त्याप्रमाणें "संग्रहोप्यस्यैव शास्त्रस्यैकदेशः" (महाभाष्यप्रदीपिका) पहा. याशिवाय व्याडि या नांवानें उल्लेख ऋक्प्रातिशाख्यांमध्यें तीन वेळां आला आहे व महाभाष्यामध्यें "आपिशलपाणिनीयव्याडीयगौतमीयाः" या वाक्यांत त्याच्या ग्रंथाचें अध्ययन करणाऱ्या संप्रदायाचा उल्लेख आला आहे.

६. "शोभना खलु दाक्षायणस्य संग्रहस्य कृतिः" (म. भा. भाग २ पृ. ४५३) तसेंच "संग्रह एतत् प्राधान्येन परीक्षितम्" (म. भा. भाग १ पृ. १३) "संग्रहे तावत्कार्यप्रतिद्वन्द्विभावान्मन्यामहे" (म. भा. भाग १ पृ. १४) पहा.

७. व्या. म. भा. भाग १ पृ. ५९० पहा.

केलेल्या वाक्यांवरून संग्रह हा शब्दांचें अर्थविवेचन करणारा ग्रंथ असावा असें वाटतें. भर्तृहरीच्या वाक्यपदीयावरील टीकेंत संग्रह ग्रंथांतून अनेक श्लोक व वाक्यें उद्धृत[1] केलीं आहेत. महाभाष्यप्रदीपिकेंतही संग्रह ग्रंथाचा भर्तृहरीनें उल्लेख केला आहे. 'संग्रहश्लोक' म्हणून ज्या ठिकाणीं उल्लेख आले आहेत त्या ठिकाणीं संग्रह ग्रंथांतील श्लोक असा जरी अर्थ होऊं शकला तरी लोकांमध्यें 'संग्रहश्लोक' या शब्दाचा 'विस्तृत व्याख्यान थोडक्यांत लक्षांत राहण्याकरितां केलेले श्लोक' असा जो प्रसिद्ध अर्थ आहे तोही तेथें ग्रंथकाराला अभिप्रेत असणें शक्य आहे. रामायण, हर्षचरित, चरक व यज्ञफलनाटक यांमध्यें संग्रहव्याकरण असा उल्लेख आला आहे तो व्याडीच्या 'संग्रह' या ग्रंथाला अनूलक्षूनच असला पाहिजे. भर्तृहरीनें आपल्या वाक्यपदीय ग्रंथामध्यें 'संग्रहेस्तमुपागते' अशा स्पष्ट शब्दांनीं संग्रह ग्रंथाचें अध्ययनाध्यापन आपल्या वेळीं अगदीं कमी म्हणजे जवळ जवळ नष्टच झालें होतें असें म्हटलें आहे; व त्याला कारण लोकांची अभिरुचि विस्तृत ग्रंथ वाचण्याकडे नसून लहानलहान ग्रंथ वाचण्याकडे होत चालली होती असें दिलें[2] आहे. संग्रह ग्रंथाचे उल्लेख आधुनिक वैयाकरणांच्याही ग्रंथांत आढळतात व भारतामध्यें कांहीं ग्रंथालयांमध्यें संग्रह ग्रंथाचीं त्रुटित पानें उपलब्ध आहेत असेंही ऐकिवांत आहे. महाभाष्यकारांनीं संग्रह ग्रंथाबद्दल फार आदरयुक्त उद्गार काढले आहेत व ज्यास्त विस्तारानें स्पष्टीकरण पाहिजे असल्यास संग्रह ग्रंथांतील विवेचन पहावें असें म्हटलें[3] आहे. आपल्या मताच्या समर्थनार्थ किंवा ज्यास्त स्पष्टीकरणार्थ इतर ग्रंथांचा किंवा ग्रंथकारांचा हवाला देण्याची पद्धति पाणिनि व भाष्यकार यांच्या ग्रंथांत आढळत नसतांही "संग्रहे तावत् प्राधान्येन परीक्षितम्" या म्हणण्यानें शब्द नित्य किंवा अनित्य या बाबतींत संग्रह ग्रंथांत उत्तम विचार केला आहे तो पहावा असें म्हणून त्या विचाराला भाष्यकारांनीं आपली मान्यता दाखविली आहे. एकशेष प्रकरणांतही वार्तिककारांनीं संक्षिप्त रीतीनें मांडिलेल्या जातिपदार्थवाद व व्यक्तिपदार्थवाद यांचें निरूपण करतांनाही 'द्रव्याभिधानं व्याडिः' या शब्दांनीं व्याडीचें मत मांडून त्याचे विरुद्ध वार्तिककारांनीं व तसेंच भाष्यकारांनीं कांहींही उद्गार काढले नाहींत[4].

## ४३. व्याडीचे इतर ग्रंथ.

वरील सर्व उल्लेखांवरून संग्रह हा ग्रंथ व्याडीनें रचिला होता, तो फार विस्तृत होता व त्यामध्यें व्याकरणविषयक अनेक मुख्य मुख्य सिद्धान्तांचें विवेचन केलें होतें व त्यांतील आपणाला पूर्णसंमत असलेले सिद्धान्त, ज्याप्रमाणें पूर्ववार्तिककारांचीं वार्तिकें नामनिर्देश न करतांही भाष्यकारांनीं घेतलीं आहेत त्याप्रमाणेंच, आपल्या ग्रंथांत भाष्यकारांनीं घेतले असण्याचा संभव आहे. कात्यायनानें पाणिनिसूत्रांना परिपूरक म्हणून जशीं वार्तिकें रचिलीं तशीं व्याडीनेंही कांहीं व्याकरणसूत्रेंही आपल्या संग्रह या ग्रंथांत घातलीं असावीं. जरी संग्रह हा ग्रंथ लक्षश्लोकात्मक होता असा प्रवाद असला तरी त्या प्रवादांत लक्ष शब्दानें ग्रंथसंख्या निर्दिष्ट केली आहे; त्यामध्यें गद्यमय भागही सूत्ररूपानें वार्तिकरूपानें व व्याख्यानरूपानें बराच होता असें विद्वानांचें म्हणणें

१. वाक्यपदीय १।२६; १।४४; १।७७; ३।३ व ३।१३ यांवरील टीका पहा.

२ "प्रायेण संक्षेपरुचीनल्पविद्यापरिग्रहान् । संप्राप्य वैयाकरणान् संग्रहेस्तमुपागते" (वाक्यपदीय २।४८४) पहा.

३. मागील पृष्ठ १३६ टीप ६ पहा

४. व्या. म. भा. भाग १ पृष्ठें ५९०-५९८ पहा.

आहे. शब्दाचा प्रतिपाद्य अर्थ ' व्यक्ति ' असें मानणारा व्याडि हा मोठा मीमांसक होता व मीमांसक हे जातिपक्षवादी असले तरी व्याडीनें व्यक्त्यभिधानपक्ष प्रतिपादन करण्याचें धाष्टर्य केलें व तें त्याच्या संग्रह या ग्रंथाच्या नाशाला कारण झालें असाही समज आहे. व्याडीनें संग्रह या ग्रंथाशिवाय इतरही कांहीं ग्रंथ लिहिले होते व पतंजलींनीं व वार्तिककारांनीं जागोजागीं निर्दिष्ट केलेल्या परिभाषास्वरूपाच्या वाक्यांपैकीं व न्यायांपैकीं पुष्कळ न्याय व परिभाषा व्याडीच्या परिभाषाग्रंथांतून घेतल्या असाव्या असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. " व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिः० " ही परिभाषाही व्याडीनें प्रथमतः प्रतिपादन केली असा वैयाकरणांमध्यें प्रवाद आहे. त्याच्या परिभाषाग्रंथाचें नांव ' व्याडिपरिभाषावृत्ति ' असें होतें व त्याचीं कांहीं हस्तलिखितें ग्रंथालयांत जतन केलेलीं आहेत. काशिकाकारांनी " उपज्ञोपक्रमं० " (पा. सू. २।४।११) या सूत्राचें विवेचन करितांना " व्याडयुपज्ञं दुष्करणम् " असें उदाहरण दिलें आहे. ' दुष्करणम् ' शब्दाऐवजीं ' हुष्करणम् ' पाठ न्यासकारांनीं घेतला आहे व ' हुष् ' ही कालवाचक संज्ञा आहे असें म्हटलें आहे. पदमञ्जरीमध्यें ' दुष्करणम् ' हा पाठ घेतला आहे व ' दुष् ' हा शब्द पाणिनीच्या ' वृत् ' शब्दाप्रमाणें परिगणनाच्या शेवटीं घालण्याची व्याडीची पद्धति होती असें म्हटलें आहे. ' धुष्करणम् ' असाही पाठ आहे. तो घेतल्यास धुष् हा शब्द धातु या अर्थी जुन्या वैयाकरणांनीं वापरल्यामुळें व्याडीनें सर्व धातूंचा संग्रह दहा गणामध्यें केला असावा किंवा धातूंचे क्यजन्त, णिजन्त वगैरे दहा प्रकार वर्णन केले असावे असें अनुमान काढण्यास जागा आहे.

## ४४. दैव आणि चान्द्र व्याकरणें.

दैव आणि चान्द्र हीं व्याकरणें फार विस्तृत नसावीं; व तीं महाभाष्यकारांच्या नंतर लिहिण्यांत आलीं असावीं. कारण, महाभाष्यांत किंवा त्याचे पूर्वींच्या ग्रंथांत त्यांचा उल्लेख मिळत नाहीं. भाष्यानंतरच्याही ग्रंथांत त्यांचा फार ठिकाणीं उल्लेख मिळत नाहीं. हल्लीं देवेन्द्र किंवा पूज्यपाद देवनन्दिन् नांवाच्या जैन वैयाकरणानें लिहिलेलें दैवेन्द्र व्याकरण प्रसिद्ध आहे. त्याचाच दैव व्याकरण म्हणून उल्लेख करण्यांत आला असावा किंवा तें जुन्या दैव व्याकरणावर आधारलेलें असावें. कारण, सुलभ रीतीनें लोकांना व्याकरणज्ञान व्हावें या हेतूनें तें लिहिलें असल्यामुळें त्या व्याकरणांत लोकांमध्यें प्रचलित असलेल्याच शब्दांचा विचार केला आहे. त्यांमध्यें वैदिक शब्दांचा विचार केला नाहीं, स्वरांचा विचार केला नाहीं व पाणिनीचें एकशेष प्रकरणही त्यांत आढळून येत नाहीं. एकशेष प्रकरण नसल्यामुळें दैव व्याकरणाला ' अनेकशेष ' म्हणण्याचीही वहिवाट होती. " तदशिष्यं संज्ञाप्रमाणत्वात् " (पा. सू. १।२।५३) या पाणिनिसूत्रांतील ' तद् ' व ' अशिष्यं ' हीं पदें पादाच्या शेवटपर्यंत अनुवृत्त होतात असें कांहीं टीकाकारांचें मत आहे असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे व या पादांतच एकशेष प्रकरण आहे. त्यावरून भाष्यकारांचे वेळीं एकशेष प्रकरणाचा कांहीं उपयोग नाहीं व तें गाळून टाकल्यास हरकत नाहीं असें म्हणणाऱ्या टीकाकारांचा एक वर्ग असावा व त्याला अनुसरूनच दैव व्याकरणांत एकशेष प्रकरण गाळलें गेलें असावें. चन्द्रगोमीचें म्हणून हल्लीं

---

१. पाणिनीच्या व्याकरणांतही सन्, क्यच्, काम्यच्, क्यङ्, क्यष्, णिङ्, णिच्, यङ्, यक् व आय् हे दहा प्रत्यय लावून दहा प्रकारचे धातू दिले आहेत.

२. " सरूपाणामेकशेष एकविभक्तौ " (पा. सू. १।२।६४) पासून " ग्राम्यपशुसंघेष्वतरुणेषु स्त्री " (१।२।७३) पर्यंत पाणिनीनें एकदेश प्रकरण दिले आहे.

प्रसिद्ध असलेलें जें व्याकरण आहे त्याचाच उल्लेख " इन्द्रश्चन्द्रः० " या श्लोकांत केला असावा व तेंच ' चान्द्र ' व्याकरण म्हणून पूर्वी प्रचलित असावें व तें आज तिबेटांत असलेल्या प्रतीवरून तयार केलेलें असें अपुरें उपलब्ध आहे. त्यामध्यें परिभाषांचा उल्लेख आहे व त्या व्याडीच्या परिभाषावृत्ति या ग्रंथावरून घेतल्या असाव्या असा समज आहे. पाणिनीच्या टि, घु, भ यांसारख्या सांकेतिक संज्ञा त्या व्याकरणांत घेतल्या नाहींत; म्हणून त्याला 'असंज्ञक' व्याकरण म्हणण्यांत आलें असावें.

## ४५. शौनकि, पौष्करसादि, व भागुरि यांचीं व्याकरणें.

वरतीं निर्दिष्ट केलेल्या वैयाकरणांशिवाय शौनकि, पौष्करसादि, भागुरि, चारायण व माध्यन्दिनि यांनींही याच पार्षदकालखंडांत लहानसे व्याकरणग्रंथ लिहिले असावे. यांपैकीं पौष्करसादि व चारायण यांचा महाभाष्यांत उल्लेख आला आहे. बाकीच्यांचा उल्लेख महाभाष्यांत किंवा त्यापूर्वींच्या ग्रंथांत प्रत्यक्ष आला नसला तरी त्यांच्या मतवैशिष्ट्याच्या प्रकारावरून व नांवांवरून ते पतंजलिपूर्वीं होऊन गेले असावे असें म्हणणें शक्य आहे. शौनकीचा उल्लेख चरक–टीकाकारांनीं " व्युत्पादितः । करोतेरपि कर्तृत्वे दीर्घत्वं शास्ति शौनकिः " या शब्दांत त्याचें मतवैशिष्ट्य दाखवून केला आहे. त्यावरून प्रयोजक या अर्थीं पाणिनीनें सांगितलेला णिच् प्रत्यय स्वार्थींही होतो असें शौनकीचें मत होतें असें दिसून येतें. स्वार्थींही णिच् होतो असें म्हणण्याचे ऐवजीं कर् या धातूला दीर्घ होऊन कार् असा धातू होतो असा शौनकीचा उल्लेख आहे त्यावरून व त्यानें वापरलेल्या ' आदिकर्ता ' या शब्दावरून तो एक जुना व्याकरणकार असावा असें वाटतें. व्युत्पन्न या अर्थीं व्युत्पादित शब्द शौनकीनें उदाहरणादाखल दिला आहे. ' रामो राज्यमचीकरत् ' यासारखेही अनेक प्रयोग जुन्या ग्रंथांमध्यें आढळतात. पौष्करसादीचा उल्लेख ' चयो द्वितीयाः शरि पौष्करसादेरिति वाच्यम् ' या वार्तिकांतच मिळतो. त्या ठिकाणीं उच्चारणाबद्दल मतभेद वार्तिककारांनीं दिला आहे व वथ्सः, ख्शीरम्, अफ्सराः हीं उदाहरणें देऊन काशिकाकारांनीं पौष्करसादीच्या देशामध्यें श, ष अथवा स पुढें आला असतां वर्गांतील प्रथम व्यंजनाऐवजीं द्वितीय व्यंजन उच्चारण्याचा प्रघात होता असें निदर्शित केलें आहे. भागुरीचाही मतभेद शब्दप्रयोगासंबंधीं आहे व त्यावरून त्याच्या प्रांतांत व्यञ्जनान्त स्त्रीलिंगी शब्दांचें ' आ ' शेवटीं जोडून स्वरान्त उच्चारण करण्याचा प्रघात असावा. संस्कृत भाषा ज्या वेळीं सामान्य जनांमध्यें प्रचलित होती त्या वेळीं परक्या भाषेंतून घेतलेल्या शब्दांचा प्रयोग करतेवेळीं लिंगाविषयीं घोटाळा होऊं लागला. त्या शब्दांच्या शेवटीं 'अ' असल्यास परक्या भाषेमध्यें जरी तशा शब्दांचा अर्थाप्रमाणें स्त्रीलिंगी प्रयोग असला तरी ' संस्कृत ' भाषेंत ' अ 'कारान्त स्त्रीलिंगी शब्दच नसल्यामुळें संशय येऊं लागला. व्यंजनान्त नामांचे बाबतींतही असा संशय येऊं लागला व प्रयोग करतांना घोटाळा होऊं नये म्हणून स्त्रीलिंगी व्यंजनान्त शब्द असल्यास

१. "शौनकादिभ्यश्छन्दसि" ( पा. सू. ४।३।१०६ ) या सूत्रांत जरी ' शौनकि ' शब्द नसला तरी 'शौनक' शब्द पाणिनीनें घातला आहे. पौष्करसादि हा शब्द "चयो द्वितीयाः शरि पौष्करसादेः" ( पा. सू. ८।४।४८ वा. ३ ) या वार्तिकांतच वार्तिककारांनीं घातला आहे. ' भागुरि ' असा ह्रस्व-इकारान्त नसला तरी ' भागुरी ' असा दीर्घ-ईकारान्त शब्द महाभाष्यांत आला आहे. ( पा. सू. ७।३।४५ वरील भाष्य पहा. ) त्याप्रमाणेंच ' माध्यंदिनि ' जरी नसला तरी ' माध्यन्दिन ' असा शब्द महाभाष्यांत आला आहे. ( पा. सू. ४।३।६० वरील भाष्य पहा ). चारायण शब्दाचा उल्लेख महाभाष्यांत कोठेंही मिळत नाहीं; परंतु ' कम्बलचारायणीयाः ' या उदाहरणामध्यें ' चारायणीय ' शब्दाचा उल्लेख आलेला आहे.

त्याला 'आ' शेवटीं जोडून त्याचा स्त्रीलिंगी प्रयोग करण्याची प्रथा कांहीं प्राकृत भाषेचा पुष्कळ प्रसार असलेल्या पूर्वेकडील प्रांतांत पडली असावी. "न यासयो:" (पा. सू. ७।३।४५) या सूत्रावरील "वर्तका शकुनौ प्राचाम्" (वार्तिक ८) या वार्तिकाचें व्याख्यान करतांना भाष्यकारांनीं "शकुनाविति किमर्थम् । वर्तिका भागुरी लोकायतस्य" असें उदाहरण दिलें आहे. त्यावरून 'वर्तिका' प्रयोग करणारा भागुरि हा पूर्वेकडील देशांत राहणारा वैयाकरण होऊन गेला असावा असें स्पष्ट होतें.

## ४६. चारायण व माध्यन्दिनि यांचीं व्याकरणें.

चारायणाचा उल्लेख फक्त एकाच ठिकाणीं "कम्बलचारायणीयाः" या भाष्यकारांनीं दिलेल्या उदाहरणांत आला आहे. त्यावरून चारायणाची शिष्यपरंपरा भाष्यकारांचे वेळीं चालू होती असें दिसतें. "घृतरौढीयाः" या उदाहरणावरून घृतसमृद्ध मध्यदेशांत रौढीची परंपरा, 'ओदनपाणिनीया:' या उदाहरणावरून दक्षिणेंतील ओदनसमृद्ध देशांत पाणिनीची शिष्यपरंपरा व 'कम्बलचारायणीयाः' या उदाहरणावरून चारायणाची शीतप्रचुर उत्तर प्रांतांत शिष्यपरंपरा भाष्यकारांचे वेळीं प्रामुख्यानें चालू असावी. अथवा 'पाणिनीचें व्याकरण शिका, भात खाण्यास म्हणजे उपजीविकेला अडचण पडणार नाहीं; रौढीचें व्याकरण शिका, घृतही मिळेल व चारायणाचें शिका लोक कांबळाही पांघरण्यास देतील' असा विनोदही या उदाहरणामध्यें ध्वनित असावा. 'पुरुकृते छच्छ्रयो:' असें चारायणाचें सूत्र उद्धृत करण्यांत येतें. त्यावरून पुरु शब्दाला 'छ' तद्धित प्रत्यय लावून 'रु' याचा लोप करून पुच्छ शब्द, तसाच कृत शब्दाला 'छ्र' तद्धित प्रत्यय लावून 'त' याचा लोप करून कृच्छ्र शब्द चारायणानें साधला असावा. कदाचित् चारायण हा प्रातिशाख्य कालचा एखादा वैयाकरण असावा व शाकटायनानें नैरुक्त मताचा अवलम्ब करून सगळीं नामें धातूंपासूनच साधलीं जातात असें मत व्यक्त केलें त्याच वेळीं लोकांमध्यें प्रचारांत असलेले शब्द धातूंपासून सहज साधतां आले नाहींत तर वेदांतील जुन्या शब्दांपासून तरी ते साधावे असें मत चारायणानें व्यक्त करून पुच्छ व कृच्छ्र यांसारखे शब्द साधले असावे. चारायणानें बरेच ताद्धित प्रत्यय देऊन तद्धितान्त शब्द साधले असावे. हा वैयाकरण पाणिनीच्या पूर्वीं झाला असल्यास ज्या ठिकाणीं तद्धित प्रत्ययांची कल्पना क्लिष्ट असेल त्या ठिकाणीं ती सोडून देऊन पाणिनीनें इतर ठिकाणचे तद्धित प्रत्यय चारायणानें दिल्याप्रमाणें स्वीकारले असतील व पाणिनीनें योग्य अर्थ सांगून आपल्या सूत्रांमध्यें त्यांचा अंतर्भावही केल्यामुळें चारायणाचें व्याकरण मागें पडलें असेल. माध्यंदिनीचा उल्लेख काशिकेमध्यें "ऋदुशनस्पुरुदंसोनेहसां च" (पा. सू. ७।१।९४) या सूत्राच्या व्याख्येंत उद्धृत केलेल्या "संबोधने तूशनसस्त्रिरूपं सान्तं तथा नान्तमथाप्यदन्तम् । माध्यंदिनिर्वष्टि गुणं त्विगन्ते नपुंसके व्याघ्रपदां वरिष्ठ:" या कारिकेंत आहे. हा मतभेद रूपभेदासंबंधानें आहे व त्याला विशेष महत्त्व नाहीं.

---

१ प्राकृत भाषेमध्यें व्यञ्जनान्त स्त्रीलिंगी नामांना 'आ' जोडावा असें सांगितलें आहे, (हैम व्याकरण ८।१।१५ ते ८।१।१७ सूत्रें पहा.)

२. जर भागुरि हा उत्तरेकडील राहणारा असता तर त्याच्या मतानें 'वर्तिका' असाच सर्वदा प्रयोग झाला असता व 'वर्तिका भागुरी' एवढेंच उदाहरण पुरेसें झालें असतें. भाष्यकारांनीं 'लोकायतस्य' हा ज्यास्त शब्द येथें मुद्दाम घातला आहे. कारण, भागुरि हा पूर्वेकडील वैयाकरण असल्यामुळें पक्षी या अर्थीं त्याच्या मतानें 'वर्तका' हाच शब्द योग्य होईल; पण लोकायत मतावरील वृत्तिग्रंथ या अर्थीं त्याच्या मतानें 'वर्तिका' हाच शब्द योग्य आहे हें भाष्यकारांना येथें सुचवावयाचें आहे.

# पाणिनिकाल ( शकपूर्व ६५०-३०० )

## ४७. पाणिनिपूर्व व्याकरणग्रंथांचे दोन प्रवाह.

पार्षदकालांतील वैयाकरणांच्या कार्याचें विहंगमदृष्टीनें अवलोकन केल्यास त्यामध्यें व्याकरणग्रंथांचे एकमेकापासून विभिन्न असे दोन प्रवाह किंवा शाखा आढळून येतात. वेद-वाङ्मय हें दोहींनाही सारखेंच प्रमाणभूत असलें तरी त्याचेकडे पाहण्याचा त्या शाखांचा निरनिराळा दृष्टिकोण होता. त्याला कारण निवासस्थानभेद, परंपरालोप व आन्यभाषिकांचा संसर्ग हीं देतां येतील. अत्यंत प्राचीन वैदिकसंस्कृतीचें भारतांतील निवासस्थान उत्तरदेश ( पंजाब, गांधार, काश्मीर वगैरे प्रांत ) हें होतें; व तेथून ती संस्कृति पाणिनीच्या कालापर्यंत पूर्वेकडे मगध, वंग, कामरूप या प्रांतांकडे व पाणिनीच्या कालानंतर दक्षिणेकडे पाण्ड्य व केरल प्रांतांपर्यंत शातवाहनांचे व चालुक्यांचे कालांत पसरत गेली. पुराणमताभिनिवेशी अप्रागतिक उत्तरेकडील प्रांतांमध्यें वर्णोच्चारण, शब्दप्रयोग, संधिकार्यें व स्वर (accent) यांचे बाबतींत वैदिक परंपरा पूर्णत्वानें राखली गेली व ज्याप्रमाणें वेदशब्द हे अनादि ( अनिदंप्रथम ) मानिले गेले त्याप्रमाणेंच भाषेंतील लौकिक शब्दही अनादि असेच मानिले गेल्यामुळें शब्दव्युत्पत्तीकडे व देश्य शब्दांचा अंतर्भाव करण्याकडे उत्तरेकडील वैयाकरणांचें लक्ष कमी होतें. लौकिक व वैदिक दोनही प्रकारची भाषा समजावी व शब्दांच्या अर्थाचें योग्य ज्ञान व्हावें व त्याबरोबरच अशुद्ध, तसेंच शुद्ध असूनही शिष्टांना असंमत, असे शब्दप्रयोग केले जाऊं नयेत या हेतूनें उत्तरेकडील वैयाकरणांनीं आपले व्याकरणग्रंथ लिहिले. त्यांनीं भाषा **समजण्याकरितां** व्याकरणग्रंथ लिहिले; भाषा **शिकण्याकरितां नव्हे**. याउलट पूर्वेकडील प्रांतांमध्यें शब्दव्युत्पत्ती-कडे ज्यास्त लक्ष दिलें गेलें व थोड्या फार प्रमाणांत तेथील रहिवाश्यांच्या व इतर जनांच्या उच्चारणवैशिष्ट्याची छाया प्रचलित लौकिक भाषेवर पडली व ग्रंथ रचतांना भाषाज्ञानाबरोबर भाषा शिकविणें हाही हेतु पूर्वेकडील वैयाकरणांनीं आपले मनांत ठेऊन आपले ग्रंथ रचिले.

## ४८. पूर्वेकडील व पश्चिमेकडील प्रांतांमधल्या व्याकरणग्रंथांमधील मतभेद.

उत्तरेकडच्या प्रांतांतील वैयाकरणांनीं भाषेचा योग्य अर्थ समजण्याकरितां व्याकरण लिहिल्यामुळें वाक्यांतील शब्दांचा परस्परसंबन्ध, प्रकृतिप्रत्ययविभागाची कल्पना करून त्या शब्दांची सिद्धि, व वाक्यामध्यें ते शब्द उच्चारले गेल्यास उच्चारणामध्यें घडून येणारा फरक या गोष्टींचा त्यांना प्रामुख्यानें विचार करणें जरूर पडलें व त्या अनुरोधानेंच पाणिनीसारख्या व्याकरणकारांनीं आपले व्याकरणग्रंथ लिहिले. याउलट पूर्वेकडील देशांमध्यें शब्दव्युत्पत्तीचा विशेष विचार करून व त्याच्या अनुरोधानें शब्दांच्या बाह्यस्वरूपाकडे लक्ष देऊन नाम, आख्यात, उपसर्ग व निपात असे शब्दांचे चार विभाग पाडण्यांत आले आणि या निरनिराळ्या प्रकारच्या शब्दांचे पोटविभाग करून त्यांचे गण, कोश व संग्रह तयार करण्यांत आले. पूर्वेकडील व्याकरणग्रंथांमध्यें शब्दांची व्युत्पत्ति देतांना व नामांचीं व धातूंचीं रूपें साधतांना उच्चारणास सुलभ अशा स्वरान्त ( स्वर शेवटीं असलेल्या ) नामांचीं व धातूंचीं कल्पना करण्यांत आली

१. याविषयीं हैमव्याकरण सूत्रेंही लक्षांत घेण्याजोगीं आहेत. 'प्राकृत' भाषांमध्यें व्यंजनान्त धातू किंवा प्रातिपदिकें नाहींत इतकेंच नव्हे तर व्यंजनान्त नामें (सुबन्त) व क्रियापदें (तिङन्त) सुद्धां वापरण्यांत नाहींत.

व वर्णसमाम्नाय, संधिकार्यें, वर्णोच्चारण इत्यादि बाबतींत नियम करण्यांत आले; तसेंच संधिकार्यामुळें उच्चारण्यांत आलेले अंतःस्थ वर्ण य आणि व यांचा लोप न होतां उच्चारण व्हावें अशा रीतीनें संधिकार्यांची कल्पना करण्यांत आली. पौर्वात्य व औदीच्य व्याकरणांमधील वरतीं निर्दिष्ट केलेल्या या वैशिष्ट्यांकडे लक्ष देऊन विचार केल्यास इन्द्र, शाकटायन, गार्ग्य, काश्यप, गालव, आपिशलि, भारद्वाज, स्फोटायन, सेनक, चाक्रवर्मण, भागुरि, चारायण व माध्यन्दिनि या सर्वांचा पूर्वेकडील वैयाकरण म्हणून, तसेंच व्याडि, शाकल्य व पाणिनि यांचा उत्तरेकडील वैयाकरण म्हणून निर्देश करण्यास कांहीं हरकत नाहीं.

## ४९. पाणिनीच्या व्याकरणाचें स्वरूप व प्रतिपाद्य विषय.

पाणिनीनें आपल्या व्याकरणामध्यें पहिल्या दोन अध्यायांत सुबन्त व तिङन्त असे पदांचे दोन प्रकारचे भेद व वाक्यांतील पदांचा परस्पर संबंन्ध यांविषयीं विचार केला आहे. तिसऱ्या अध्यायामध्यें धातूंपासून शब्दसिद्धीचा विचार केला आहे. चवथ्या व पांचव्या अध्यायांमध्यें नामांपासून (प्रातिपदिकांपासून) शब्दसिद्धीचा विचार केला आहे. सहाव्या व सातव्या अध्यायांमध्यें सुबन्त व तिङन्त शब्दांच्या प्रकृतिप्रत्ययात्मक सिद्धीचा व त्यांच्या स्वरसिद्धीचा विचार केला आहे आणि शेवटी आठव्या अध्यायांत संनिहित पदांचें उच्चारण होतांना वर्णोच्चारणामध्यें व स्वरामध्यें होणाऱ्या फरकांचा विचार केला आहे. पाणिनीच्या व्याकरणांतील प्रतिपाद्य विषयांकडे लक्ष दिलें असतां (१) संज्ञा व परिभाषा, (२) स्वरांचें व व्यंजनांचे प्रकार, (३) धातूंचीं पदें, (४) कारकविचार, (५) विभक्तिविचार, (६) एकशेष व समास, (७) धातुसाधितें (कृदन्त) व क्रियापदें, (८) नामसाधितें (तद्धित) व सुबन्त नामें, (९) प्रकृतीला प्रत्ययामुळें व प्रत्ययाला प्रकृतीमुळें होणाऱ्या आगमांचा व आदेशांचा विचार, (१०) स्वरविचार, (११) द्विरुच्चारण आणि (१२) संधिकार्यें हे प्रतिपाद्य विषय प्रामुख्यानें आढळून येतात. या सर्वांचें विवेचन करतांना पाणिनीनें शब्दांच्या बाह्यस्वरूपाकडेच विशेषतः लक्ष दिलें आहे. अर्थात् प्रकृतीला व प्रत्ययाला निरनिराळा अर्थ असतो असें त्याचें स्पष्ट मत आहे व प्रत्यय सांगतांना प्रत्येक ठिकाणीं प्रत्ययाचा अर्थ त्यानें दिला आहे. ज्या ठिकाणीं अर्थ न सांगतांना विकरणासारखे प्रत्यय त्यानें सांगितले आहेत त्या ठिकाणीं ते प्रत्यय स्वार्थींच (निराळा स्वतंत्र अर्थ नसतांनाच) होतात असें स्पष्ट दिसून येतें; व तन्मूलकच "अनिर्दिष्टार्थाः प्रत्ययाः स्वार्थे भवन्ति" असा वैयाकरण संकेत प्रसिद्धच आहे. प्रातिपदिकांचें परिगणन अशक्य असल्यामुळें त्यानें ते केलें नाहीं व त्यांचे अर्थ लोकप्रसिद्ध असल्यामुळें त्यानें ते दिले नाहींत. धातूंचें परिगणन करणें शक्य असल्यामुळें त्यानें तें धातुपाठांत केले आहे व त्याबरोबरच धातूंचे अर्थही त्यानें दिले आहेत. प्रकृतीचे व प्रत्ययांचे अर्थ हे साक्षात् वाचकत्वानें मनांत येतात कां द्योतकत्वानें मनांत येतात हा विचारच त्यानें केला नाहीं. या बाबतींत पदमञ्जरीकारांनीं स्पष्ट म्हटल्याप्रमाणें पाणिनीनें वेदामध्यें उच्चारलेले तसेंच भाषेमध्यें शिष्ट लोकांच्याच व्यवहारांत असलेले शब्द जसेच्या तसेच शुद्ध मानून योग्य अर्थ कळावा या दृष्टीनें प्रकृतिप्रत्ययविभागाची कल्पना करून आपल्या व्याकरणामध्यें ते साधले आहेत. कोणत्याही धातूला अथवा नामाला त्याच्या व्याकरणांतील नियमाप्रमाणें प्रत्यय लावून शब्द तयार करण्यांत आले तरी ते प्रचारामध्यें नसल्यास त्यांचा प्रयोग करूं नये असा त्याचा स्पष्ट अभिप्राय दिसतो. वेदामध्यें व शिष्ट लोकांमध्यें प्रचारांत असलेलेच

शब्द वापरावे; अन्य व्याकरणांमधील प्रकृतिप्रत्ययविभाग कल्पून त्यांची सिद्धि केली तरी कांहींही हरकत नाहीं असें त्याचें मत असावें. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे, पाणिनीचें या बाबतीतील मत "शब्द हे नित्यच आहेत, व त्यांचा अर्थाशीं असलेला संबंधही नित्य आहे, प्रकृतिप्रत्यय-विभाग हा अर्थ कळण्याच्या दृष्टीनें सोयीकरितां काल्पनिकच आहे" या शब्दांमध्यें देतां येईल.

## ५०. पूर्वींच्या व्याकरणांची पाणिनीला मदत.

पाणिनीला व्याकरण रचण्याचे बाबतींत त्याच्या पूर्वींच्या वैयाकरणांचे कार्याची पुष्कळ मदत झाली असावी. शब्दसिद्धि करण्याकरितां त्यानें अष्टाध्यायी रचिली त्या वेळीं त्याला अनुकूल अशा सर्व गोष्टी त्यानें पूर्व वैयाकरणांकडून घेतल्या : अक्षरसमाम्नाय त्यानें प्रातिशाख्य ग्रंथ व प्राचीन वैयाकरण यांचेकडून घेतला; आपल्या सोयीकरितां त्यांतील कांहीं वर्ण गाळून इतर वर्णांचे ते पोटभेद कल्पून त्यांचा इतर वर्णांमध्यें समावेश केला व वर्णांचा पूर्वींच्या वैयाकरणांनीं दिलेला क्रमही त्यानें बदलला; नवा वर्ण मात्र त्यानें एकही घातला नाहीं. लाघवाकडे लक्ष देऊन त्यानें पुष्कळ ठिकाणीं उदाहरणादाखल एकच शब्द सूत्रांत घालून त्यासारखे बाकीचे शब्द त्या शब्दानंतर गणाची कल्पना करून गणामध्यें संग्रथित केले. गणपाठांतील पुष्कळ गण त्यानें शाकटायन आपिशलि वगैरे पूर्व वैयाकरणांकडून घेतले असावें. धातुपाठ व धातुपाठांतील गण यांचे बाबतींतही त्याला पूर्व वैयाकरणांची व कोशकारांची मदत झाली. वर्णोच्चारणास अत्यंत जरूरीचे असे बेचाळीस वर्ण घेऊन त्यांची चौदा सूत्रांमध्यें उपयुक्त रीतीनें वाटणी करून सूत्रांतील अन्त्यवर्णाबरोबर सूत्रांतील वर्णाचा उच्चार करून त्यानें ग्रंथलाघवाला अत्यंत उपयोगी असे प्रत्याहार साधले आहेत; व त्यांपैकीं बेचाळीस प्रत्याहारांचा आपल्या व्याकरणामध्यें त्यानें उपयोग केला आहे. प्रत्याहाराची कल्पना त्यानें इन्द्र, आपिशलि यांसारख्या पूर्ववैयाकरणांकडून घेतली असावी. संधिकार्यांचे बाबतींत प्रातिशाख्य ग्रंथांची त्यानें भरपूर मदत घेतली असावी व पूर्ववैयाकरणांचेच नियम दृष्टीस पडेल त्याठिकाणीं फक्त मतभेद दाखवून, त्यानें दिलें असावे. सर्वनाम, अव्यय, धातु प्रतिपादिक वगैरे लोकप्रसिद्ध संज्ञा, त्याप्रमाणेंच विभक्ति, लिङ्ग, वचन यांच्या संज्ञा व परस्मैपद, आत्मनेपद वगैरे शास्त्रीय संज्ञा त्यानें पूर्वीच्याच वैयाकरणांकडून घेतल्या. लाघवाचे दृष्टीनें एका तऱ्हेचे अनेक शब्द थोडक्यांत देतां यावे म्हणून घु, घि, नदी, निष्ठा वगैरे संज्ञा त्याच्या स्वकल्पितच आहेत. नामधातू व दशगणी हीं त्यानें व्याडीपासून घेतलीं असावीं.

## ५१. पाणिनीच्या शब्दव्युत्पत्तीचें वैशिष्ट्य.

कृदन्त धातुसाधितें त्यानें नैरुक्तांकडून घेतलीं असावीं. परंतु धातुसाधित शब्दांची व्युत्पत्ति देतांना प्रकृति व प्रत्यय या दोघांनाही अर्थाची कल्पना करून दोघांचाही मिळून झालेला अर्थ प्रचारांत असलेल्या अर्थाशीं योग्य रीतीनें जुळत असेल तरच त्यानें कृत् प्रत्यय देऊन शब्द साधले आहेत. उच्चारणाचे बाबतींत केवळ वर्णसाम्य असलेला कोणताही धातु हा शब्दाचा एक भाग, व राहिलेला भाग हा प्रत्यय, अशी नैरुक्तांप्रमाणें कल्पना करून व कसाबसा धातूचा अर्थ शब्दांत आलेला दाखवून धातुसाधित शब्द साधण्याचा त्यानें प्रयत्न मुळींच केला नाहीं. अशा रीतीनें शब्द साधीत गेल्यास शब्द हे अमर्यादित असल्यामुळें व्याकरणलेखनाला पारच येणार नाहीं हें एक कारण त्यानें तसा प्रयत्न न करण्याचें असेल. शिवाय, धातूची जरी

अर्थाच्या धोरणानें योग्य अशी कल्पना केली तरी जशी जरूर लागेल त्याप्रमाणें निरानिराळ्या वेळीं निरनिराळ्या प्रत्ययांच्या कल्पना करणें त्याला मान्य नसावें. पण सर्वांत महत्त्वाचें कारण जर असेल तर शब्द हे अव्युत्पन्न अनादिसिद्धच आहेत. प्रकृतिप्रत्ययविभाग हा अर्थबोधाकरितां केवळ काल्पनिकच असल्यामुळें तो जरूर असेल तेवढ्याच ठिकाणीं करावा असें त्याचें ठाम मत होतें हेंच होय. मूळ प्रातिपदिकांचे स्वर त्यानें दिलेच नाहींत. कदाचित् निरनिराळ्या प्रातिपदिकांचे आद्युदात्त किंवा अन्तोदात्त अशा रीतीनें गण केलेले त्याला उपलब्ध असतील; किंवा शान्तनवाच्या फिट्सूत्रांप्रमाणें त्याला कांहीं स्वरसूत्रें उपलब्ध असतील. किंवा स्वरसहित शब्दोच्चारण त्याचे वेळीं लोकांमध्यें प्रचलित असल्यामुळें प्रातिपदिकांचे स्वर देण्याची त्याला जरूर वाटली नसावी. प्रातिपदिकांपासून स्त्रीलिंगी शब्द, सुबन्त शब्द किंवा तद्धितप्रत्ययान्त शब्द साधतांना होणारा स्वरांतील बदल मात्र त्यानें प्रत्ययाला इत् वर्ण लावून किंवा प्रत्यक्ष शब्दानें प्रतिपादन करून वेळोवेळीं दाखविला आहे. तद्धिताचे बाबतींतही चारायण वगैरे वैयाकरणांची त्याला मदत झाली असावी. कारक, एकशेष वगैरे बाबतींत मात्र त्याचें वैशिष्ट्य पूर्णपणें आढळून येतें.

### ५२. शब्दसिद्धि करतांना पाणिनीचें अर्थाकडे लक्ष.

पाणिनीनें शब्दसिद्धि करण्याकरितां आपलें व्याकरण रचिलें; व तें रचितांना अर्थाकडे योग्य लक्ष त्यानें दिलें असलें तरी पदाचा व अर्थाचा परस्परसंबंध कोणता, तो कृत्रिम आहे कां नित्य आहे किंवा सांकेतिक आहे, अर्थाकडे प्रामुख्यानें लक्ष दिल्यास शब्दाचे किती प्रकार होतात, अर्थ मनामध्यें कसा येतो, अर्थाचे धोरणानें लोकामध्यें पदें तयार होऊं शकतात किंवा नाहीं, समासांतील पदांचा अर्थ व समासाचा अर्थ एकच किंवा निराळा, तसेंच उपसर्गाचा व धातूचा अर्थ मिळून विशिष्टार्थ होतो किंवा धातूमध्येंच तो अर्थ असतो व उपसर्ग तो अर्थ दाखवण्याचेंच केवळ काम करतो अशा निरनिराळ्या प्रश्नांचा पाणिनीनें मुळींच विचार केला नाहीं. कदाचित् शुद्ध शब्द कोणते व अपशब्द कोणते तें कळल्यामुळें अपशब्दांचें उच्चारण न व्हावें हाच प्रामुख्यानें त्याचा व्याकरण लिहिण्याचा हेतू असल्यामुळें अर्थविचार अप्रस्तुत म्हणून तिकडे त्यानें लक्ष दिलें नसावें. किंवा व्याडीनें या बाबतींत संग्राह्य असा पुष्कळ विचार करून 'संग्रह' हा ग्रंथ लिहिलाच असल्यामुळें व व्याडीचें प्रतिपादन त्याला मान्य असल्यामुळें त्यानें पुनरुक्ति टाळली असावी. किंवा शब्द हे स्वतः नित्य व अर्थाशींही नित्यसंबद्ध असल्यामुळें त्यांच्या अर्थाची चिकित्सा करण्याचें कारणच नाहीं अशी "तदशिष्यं संज्ञाप्रमाणत्वात्" (पा. सू. १।२।५३) या सूत्रांत त्यानें सांगितल्याप्रमाणें त्याची दृढ समजूत असावी.

### ५३. शब्दाच्या अर्थाविषयीं विचारांना आरंभ.

अर्थाचे बाबतींत विवेचन करण्यास गार्ग्य यानें प्रथमतः सुरुवात केली. व उपसर्ग हे क्रियेच्या विशेषाचे बोधक असतात अशा मताचें प्रतिपादन केलें. त्यानंतर या बाबतींत इतरही वैयाकरणांनीं थोडाफार विचार केला असावा; परंतु या बाबतींत उल्लेख करण्याजोगी कामगिरी संग्रहकार व्याडीचीच आहे. "सरूपाणामेकशेष एकविभक्तौ" (पा. सू. १।४।६४) या सूत्राचें विवेचन करतांना वार्तिककारांनीं "आकृत्यभिधानाद्वा एकं विभक्तौ वाजप्यायनः" (वा. ३५) या वार्तिकामध्यें व त्याचे पुढील कांहीं वार्तिकांमध्यें वाजप्यायनाच्या जात्यभिधानपक्षाचें

व त्यानंतर "द्रव्याभिधानं व्याडिः" (वा. ४५) या वार्तिकामध्यें व पुढील कांहीं वार्तिकांमध्यें व्याडीच्या व्यक्त्यभिधानपक्षाचें निरूपण केलें आहे व भाष्यकारांनीं दोन्ही पक्षांचें स्पष्टीकरण केलें आहे. शब्दाच्या प्रतिपाद्य अर्थाविषयीं व्याडीच्या पूर्वींच्या व्याकरणकारांनीं व निरुक्तकारांनीं व व्याडीनंतर भाष्यकारांनीं यासंबंधीं व्यक्त केलेल्या विचारांचें परिशीलन केल्यास, तसेंच व्याडीच्याही या बाबतींत इतर ग्रंथांत आलेल्या उताऱ्यांचा विचार केल्यास शब्दांच्या प्रतिपाद्य अर्थाविषयीं व्याडीचें काय म्हणणें होतें याची चांगली कल्पना येण्याजोगी आहे. मंत्रद्रष्ट्यांनीं जेव्हां वैदिक ऋचा म्हटल्या त्या वेळीं ऋचांचा अर्थ लक्षांत घेऊनच त्यांनीं त्या म्हटल्या. त्यानंतर ब्राह्मणग्रंथकालीं योग्य वेळीं योग्य मंत्रांचें जसेंच्या तसें उच्चारण करण्यांतच पुण्यप्राप्ति होते असें निश्चित मत प्रतिपादिलें गेलें व अर्थाकडे लक्ष न देतां तसेंच शब्दामध्यें किंवा स्वरामध्यें कोणताही बदल न करतां वेदग्रंथांचें अध्ययन चालू राहिलें. अशाच वेळीं 'अनर्थका मन्त्राः' (मन्त्रांना कांहीं एक अर्थ नाहीं) असें सामान्य जनांमध्यें प्रसृत असलेलें कौत्सानें प्रतिपादन केलेलें मत[1] खोडून काढून 'मन्त्र हे अर्थवान आहेत' असा निरुक्तकारांनीं आपला सिद्धान्त मांडिला. याच वेळीं प्रत्येक वाक्याला स्वतंत्र असा विशिष्टार्थ असतो व तो वाक्योच्चारण संपल्याबरोबर ध्यानांत येतो असें मत[2] व्यक्त केलें गेलें. यानंतर वेदवाक्यांचा योग्य रीतीनें अर्थ मनांत यावा म्हणून पदकारांनीं पदें पाडिलीं व पार्षद कालांतील वैयाकरणांनीं प्रकृतिप्रत्ययविभागाची कल्पना करून पदांपासून वाक्यार्थ कसा मनांत येतो तें दाखवून पदें हीं अर्थाचें प्रतिपादन करतात व वाक्यांतील वेगवेगळ्या पदांचा जो अर्थ तोच वाक्यार्थ या मताचें प्रतिपादन केलें.

## ५४. अर्थाच्या अनुरोधानें शब्दांचे चार प्रकार.

पार्षद कालच्या वैयाकरणांनीं पदाच्या अर्थाकडे लक्ष देऊन नाम, आख्यात, उपसर्ग व निपात असे पदांचे चार प्रकार पाडले. 'सत्त्वप्रधानानि नामानि' अशी नामांची व्याख्या देण्यांत आली; व आख्याताची व्याख्या 'भावप्रधानमाख्यातम्' अशी देण्यांत आली. सत्त्व शब्दाचा सामान्य रीतीनें द्रव्य असा अर्थ देण्यांत आला व त्यामध्यें घट, पट इत्यादि प्रत्यक्ष दिसणारे पदार्थ, तसेच स्वर्ग पुण्य वगैरे अनुमेय पदार्थ या सर्वांचा अंतर्भाव करण्यांत आला. द्रव्यावर आढळून येणाऱ्या निरनिराळ्या स्थिर धर्मांचा द्रव्यापासून केव्हांही पृथक् न राहणारे द्रव्यांचे गुण म्हणून द्रव्यांमध्येंच अन्तर्भाव करण्यांत आला. भाव या शब्दाचा सामान्य रीतीनें क्रिया हा अर्थ देण्यांत आला व द्रव्यावर आढळून येणाऱ्या व क्षणोक्षणीं

---

१. "यदि मन्त्रार्थप्रत्ययायानर्थकं भवतीति कौत्सः । अनर्थका हि मन्त्राः । तदेतेनोपेक्षितव्यम्" (निरुक्त १।१५) पहा.

२. वाक्य ऐकूं येत असतांना एकामागून एक अशा रीतीनें उच्चारलेले वर्ण ऐकणाऱ्याचे मनावर एक प्रकारचा संस्कार करीत असतात, व शेवटचा वर्ण ऐकल्याबरोबर सबंध वाक्याचा अर्थ मनांत येतो असें मीमांसक मानतात. वैयाकरणांचेंही तेंच मत आहे; परंतु शेवटचा वर्ण ऐकल्याबरोबर वाक्यस्फोटरूप शब्द मनांत येतो व त्यामुळें वाक्यार्थ कळतो असें वैयाकरण मानतात; संस्कार उत्पन्न होतो असें ते मानीत नाहींत.

बदलणाऱ्या क्रियारूप अस्थिर धर्मांचा भाव म्हणून उल्लेख करण्यांत आला. अर्थाकडे लक्ष देऊन अशा रीतीनें शब्दांचे सत्त्वप्रतिपादक ( नाम ) व भावप्रतिपादक ( आख्यात ) असे दोनच भेद केले गेले तरी वेदामध्यें व लोकामध्यें प्रचारांत असलेल्या शब्दांच्या बाह्य स्वरूपाकडे लक्ष दिल्यास पुष्कळसे शब्द जरी विभक्तिप्रत्ययान्त असले तरी कांहीं विभक्तिप्रत्ययरहित शब्द भाषेमध्यें आढळून आले. अशा शब्दांपैकीं प्र, परा वगैरे कांहीं शब्द भावाचा किंवा क्रियेचा विशेष दाखवितात असें दिसून आलें; तर च, वा, ह वगैरे शब्द द्रव्यांचा संबंध, समुच्चय, विकल्प, विरोध वगैरे प्रकारचा विशेष दाखवितात असें आढळून आलें. क्रियेचा विशेष दाखविणाऱ्या विभक्तिप्रत्ययरहित शब्दांना उपसर्ग ही संज्ञा देण्यांत आली व द्रव्याचा विशेष दाखविणाऱ्या विभक्तिरहित शब्दांना निपात ही संज्ञा देण्यांत आली. पाणिनीनें या क्रियेच्या किंवा द्रव्याच्या विशेष दाखविणाऱ्या शब्दांचीं पूर्व वैयाकरणांनीं दिलेलीं उपसर्ग व निपात हीं नांवें जरी कायम ठेविलीं तरी त्यांना विभक्तिप्रत्यय लागतातच पण त्यांचा लोप ( लुक्[१] ) होतो असें प्रतिपादन करून त्या दोन्ही प्रकारच्या शब्दांचा सुबन्तांमध्येंच त्यानें अंतर्भाव केला.

## ५५. जातिपदार्थवाद व व्यक्तिपदार्थवाद.

अशा रीतीनें बाह्य स्वरूपावरून शब्दांचे चार प्रकार करण्यांत आल्यानंतर त्या शब्दांनीं प्रतिपादन केलेल्या अर्थांचा विचार करण्यांत आला. पाणिनीनें प्रकृतीचा अमुक अर्थ व प्रत्ययाचा अमुक अर्थ अशी फोड करून अर्थनिश्चय करण्याला उपयुक्त असें जरी व्याकरण लिहिलें असलें तरी त्याचें 'शब्दानुशासन' शास्त्र हें शब्दप्रधान शास्त्र असल्यामुळें अर्थांच्या भेदांचें व पोटभेदांचें त्यानें विवेचन केलें नाहीं. तें काम व्याडीच्या पूर्वींच्या वैयाकरणांनीं केलें असलें तरी त्यांचेबद्दल कांहींही माहिती उपलब्ध नसल्यामुळें त्या बाबतींत व्याडीचीच कामगिरी उल्लेख करण्याजोगी आहे; व एका दृष्टीनें व्याडीला शब्दार्थशास्त्राचा आद्य प्रवर्तक म्हणून व त्याच्या 'संग्रह' या ग्रंथाला अर्थविचाराचा आद्य ग्रंथ म्हणून म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. सत्त्वप्रधान शब्दांच्या अर्थांचे जाति व द्रव्य ( व्यक्ति ) असे दोन प्रकार केले गेले. वाजप्यायनासारख्या कांहीं वैयाकरणांनीं एका प्रकारच्या सर्व व्यक्तींचा जातिस्वरूपाचा जो सामान्य आकार तोच शब्दोच्चारणाबरोबर प्रथमतः ध्यानांत येतो अशा मताचें प्रतिपादन केलें; तर व्याडीनें सर्व ठिकाणीं द्रव्य म्हणजे व्यक्ति हाच अर्थ मनांत येतो व सर्व व्यवहार व्यक्तीच्या अनुरोधानेंच चालतात अशा मताचें प्रतिपादन केलें[२]. भाष्यकारांनीं या दोनही मतांचें विवेचन करून जातीचा बोध व्यक्तीशिवाय होत नाहीं व व्यक्तीचा बोध जातीशिवाय होत नाहीं असें म्हणून दोन्ही मतांची सुंदर सांगड घातली आहे[३].

---

१. अव्ययादाप्सुपः ( पा. सू. २।४।८२ ) पहा

२. "सरूपाणामेकशेष एकविभक्तौ" ( पा. सू. १।२।६४ ) यावरील वार्तिकें ३५–५९ व त्यांवरील भाष्य पहा.

३. "न ह्याकृतिपदार्थिकस्य द्रव्यं न पदार्थो द्रव्यपदार्थिकस्य वाकृतिर्न पदार्थः । उभयोरुभयं पदार्थः कस्यचित् किंचित् प्रधानभूतं किंचिद्गुणभूतम् । आकृतिपदार्थिकस्याकृतिः प्रधानभूता द्रव्यं गुणभूतम् । द्रव्यपदार्थिकस्य द्रव्यं प्रधानभूतमाकृतिर्गुणभूता" ( पा. सू. १।२।६४ वरील महाभाष्य भाग १ पृष्ठ ५९६ पहा ).

## ५६. व्याडीचा ' द्रव्याभिधान ' पक्ष.

लोकांतील व्यवहाराकडे पाहिल्यास सर्व ठिकाणीं शब्दावरून व्यक्तीचाच बोध होतो असें व्याडीचें मत आहे. "स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं०" या ठिकाणीं किंवा "स्त्रीणामशिक्षितपटुत्वममानुषीषु०" या ठिकाणीं विशिष्ट व्यक्तीचा बोध होत नसला तरी सामान्यत: सर्व स्त्रिया असाच तेथें विवक्षित अर्थ असल्यामुळें व्यक्ति हाच स्त्री शब्दाचा तेथें अभिप्रेत अर्थ आहे. जाति, गुण, क्रिया व संज्ञा हे शब्दांच्या अर्थाचे चार प्रकार व्याडीच्या वेळीं मानण्यांत आले होते किंवा नाहीं याविषयीं निश्चित कांहीं सांगतां येत नाहीं. जरी हे प्रकार व्याडीच्या नंतर पाडण्यांत आले असें म्हटलें तरी पण सामान्यरीत्या शब्दांच्या नाम व आख्यात या दोन प्रमुख भेदांवरून द्रव्य (सत्त्व) व क्रिया (भाव) हे अर्थाचे दोन प्रकार त्याला माहीत असावे. व्याडीचा अभिप्राय पुढें दिल्याप्रमाणें थोडक्यांत सांगतां येईल:— शुक्ल, लोहित वगैरे गुणवाचक शब्द तसेच पाचक, पूजक वगैरे क्रियावाचक शब्द हेही व्यवहारामध्यें द्रव्याचाच एक प्रकारचा विशेष दाखवून गुणयुक्त व क्रियायुक्त द्रव्याचाच बोध करतात. त्याचप्रमाणें पाचक, याजक, पूजक वगैरे शब्द क्रियेचाच एक प्रकारचा विशेष दाखवून ती क्रिया ज्या व्यक्तीवर आहे त्याच व्यक्तीचा बोध करतात. आतां प्रश्न राहिला फक्त आख्यातांचा म्हणजे क्रियापदांचा; पण, क्रियापदांविषयींही असें म्हणतां येईल कीं पचति, यजति, इयाज वगैरे शब्दांनीं विशिष्ट कालीं घडणारी क्रिया जरी दाखविली व जरी त्या शब्दांनीं क्रियेचें मुख्यत्वानें प्रतिपादन केलें, तरी क्रिया ही केव्हांही कर्त्याशिवाय होणें शक्य नसल्यामुळें क्रियेकडून शेवटीं कर्त्याचाच बोध होतो; व पचति, यजति, इयाज, वगैरे शब्दही एका दृष्टीनें क्रियाश्रय द्रव्याचेंच प्रतिपादन करितात[1]. एकंदरींत " द्रव्याभिधानं व्याडिः " या वार्तिकाचा ' लोकव्यवहारांतील सर्व शब्द हे द्रव्याचाच बोध करून देतात; मग तो मुख्यत्वानें करून दिला जावो, किंवा गुणाश्रय म्हणून करून दिला जावो, किंवा क्रियाश्रय म्हणून करून दिला जावो ' असा अर्थ व्याडीला अभिप्रेत असावा.

## ५७. व्युत्पत्तिपक्ष व अव्युत्पत्तिपक्ष यांसंबंधीं व्याडीचे विचार.

वर लिहिल्याप्रमाणें भाषेंतील शब्द हे द्रव्याचाच बोध करून देतात या मताचें व्याडीनें प्रतिपादन केलें; परंतु द्रव्याचा बोध कोणत्या रूपानें शब्दाकडून केला जातो– वाच्यत्वानें केला जातो किंवा द्योत्यत्वानें केला जातो– याविषयीं व्याडीचें मत काय असावें याचा विचार करणें झाल्यास वाक्यपदीयाच्या टीकाकारांनीं उद्‌धृत केलेला व्याडीच्या ' संग्रह ' या ग्रंथांतील एक महत्त्वाचा उतारा फार उद्बोधक आहे. तो पुढें दिल्याप्रमाणें टीकाग्रंथांत आढळतो:—

एवं हि संग्रहे पठ्यते—" वाचक उपादान: स्वरूपवानिति अव्युत्पत्तिपक्षे । व्युत्पत्तिपक्षे त्वर्थावहितं समाश्रितं निमित्तं शब्दव्युत्पत्तिकर्माणि प्रयोजकम् । उपादानो द्योतक इत्येके[2] । सोयमिति व्यपदेशेन संबन्धोपयोगस्य शक्यत्वात् ॥"

---

१. हेंच मत सर्व नैयायिकांनीं स्वीकृत केलें आहे.

२ " द्वावुपादानशब्देषु शब्दौ शब्दविदो विदुः । एको निमित्तं शब्दानामपरोऽर्थे प्रयुज्यते "
( वाक्यपदीय १।४४ ) यावरील टीका पहा.

टीकाकारांनीं या उताऱ्याचें जरी कांहींही स्पष्टीकरण केलें नसलें, तरी पण 'प्रकृतिप्रत्ययात्मक विभागाला अनुसरून शब्दाचा अर्थ मनांत येणें' हा नैरुक्तांना सर्वस्वीं मान्य असा व्युत्पत्तिपक्ष व 'शब्दाचा अर्थ फोड न होतां एकदम मनांत येणें' हा वैयाकरणांना व्युत्पत्तिपक्षाच्या इतकाच मान्य असा अव्युत्पत्तिपक्ष या दोनही पक्षांचें व्याडीच्या वेळीं प्रतिपादन केलें जात होतें व ते दोन्ही पक्ष व्याडीला मान्य होते. पाचक किंवा याजक यांसारखा व्युत्पन्न किंवा धातुसाधित शब्द उच्चारला असतां पच् किंवा यज् या धातूचा क्रियारूप अर्थ व अक या प्रत्ययाचा कर्ता हा अर्थ हे दोनही मिळून संयुक्त जो अर्थ तो एकदम मनांत येतो व तोच त्या शब्दाचा प्रतिपाद्य अर्थ असल्यामुळें त्याला वाच्यार्थ म्हणतां येतें. आतां अव्युत्पन्न असा घट किंवा पट किंवा गो यांसारखा शब्द उच्चारला असतां तो ऐकल्याबरोबर घागरीसारखा पदार्थ किंवा वस्त्रासारखा पदार्थ किंवा बैल ध्यानांत येतो खरा, पण तो ध्यानांत येण्यास निमित्त किंवा कारण जें त्या त्या शब्दाचा त्या त्या पदार्थाशीं जो कायमचा संबंध त्याचें ज्ञान तें आवश्यक असतें. संबंध–ज्ञानाशिवाय पदार्थ–ज्ञान कधींही होत नाहीं. या कायमच्या संबंधालाच आलंकारिकांनीं 'संकेत' हें नांव दिलें आहे. ज्या लोकांना हा संकेत माहीत नसतो त्यांना त्या त्या विशिष्ट शब्दापासून तो तो विशिष्ट अर्थ मनांत येत नाहीं. तसेंच, ज्या लोकांना एखाद्या शब्दाचा निराळ्या तऱ्हेचा संकेत माहीत असतो त्यांच्या ध्यानांत निराळाच अर्थ येतो. उदाहरणार्थ, फक्त इंग्रजीच जाणणाऱ्या मनुष्याला 'गो' हा शब्द उच्चारला असतां 'जाणें' हाच अर्थ ध्यानांत येईल व गो शब्द उच्चारल्याबरोबर जवळ असलेल्या बैलाकडे न पाहतां तो चालता होईल. अशा रीतीनें शब्दार्थसंबंधाचें ज्ञान हें निमित्त होऊन शब्दाच्या अर्थाचा बोध होणें याला 'अव्युत्पत्तिपक्ष' म्हणतात.

### ५८. द्रव्याचा बोध वाच्यत्वानें होतो किंवा द्योत्यत्वानें होतो याविषयीं व्याडीचे विचार.

अशा रीतीनें व्युत्पत्तिपक्षीं व अव्युत्पत्तिपक्षीं शब्दाच्या उच्चारणापासून अर्थ मनांत कसा येतो हे व्याडीनें सांगितल्यानंतर 'व्युत्पन्न व अव्युत्पन्न अशा दोन्ही प्रकारच्या शब्दांपासून अर्थ मनांत येतो खरा, पण अव्युत्पत्तिपक्षीं तो अर्थ शब्दार्थसंबंध-ज्ञानामुळें (संकेत-ज्ञानामुळें) दाखवला जातो, तो साक्षात् प्रतिपादित होत नाहीं, म्हणून तो द्योत्य असतो' असें कांहीं वैयाकरणांचें मत म्हणून त्यानें दिलें आहे, व त्या मताचें त्यानें खंडन केलें नाहीं. म्हणून व्याडीला तें मत मान्य होतें किंवा नव्हतें हें कांहीं सांगतां येत नसलें तरी पण वाच्यार्थ व द्योत्यार्थ असे शब्दाचे दोन प्रकारचे अर्थ असतात व अव्युत्पन्न शब्दांपासून द्योत्य रूपानेंच शब्दांचा अर्थ मनांत येतो अशा मताचें प्रतिपादन त्याचे वेळचे कांहीं वैयाकरण करीत होते हें सांगण्याचा त्याचा अभिप्राय वरील उताऱ्यावरून स्पष्ट होतो. आधुनिक वैयाकरणांनीं उपसर्ग व निपात यांच्यापासून द्योतकत्वानें अर्थ मनांत येतो असें जें म्हटलें आहे त्याच्या मुळाशीं व्याडीनें वरतीं निर्दिष्ट केलेलीही कल्पना असूं शकेल व त्यामुळेंही त्यांनीं उपसर्ग व निपात हे अव्युत्पन्न असल्यामुळें त्यांना 'द्योतक' म्हटलें असेल.

पूर्वेकडील वैयाकरणांच्या ग्रंथांत प्रामुख्यानें आढळणारीं कांहीं भाषावैशिष्ट्यें, मतवैशिष्ट्यें, व उच्चारणवैशिष्ट्यें पुढें दिलेल्या संग्रहकारिकांवरून ध्यानांत येतील :—

पौरस्त्यवैयाकरणैः स्वेषु ग्रन्थेषु दर्शिताः ।
मतवैशिष्ट्यप्रकारा निर्दिश्यन्ते समासतः ॥ १ ॥

गुणो जातिः क्रिया चैते शब्दस्यार्थास्त्रयः स्मृताः ।
प्रायः सर्वाणि नामानि प्रव्युत्पन्नानि धातुतः ॥ २ ॥

नाम्नां तथैव धातूनां हलन्तानामजन्तता ।
स्यादन्त्यस्य हलो लोपाद् अचमन्त्ये निवेश्य वा ॥ ३ ॥

य्वोः सन्ध्युद्भूतयोर्लोपो न स्यात्स्यात्तु लघुश्रुतिः ।
क्वचिद् द्वयोर्हलोर्मध्ये स्यादचः परिकल्पनम् ॥ ४ ॥ स्वकृत.

## ५९. पाणिनिपूर्व वेदसंहिताग्रंथ.

पाणिनीय व्याकरणाची पूर्वपीठिका समजण्याकरितां ज्याप्रमाणें शब्दप्रक्रिया व अर्थप्रक्रिया यांसंबंधीं पार्षदकालच्या वैयाकरणांनीं केलेल्या विवेचनाचें साधारण ज्ञान आवश्यक आहे त्याचप्रमाणें पाणिनिपूर्वकालीं रचिलेल्या व पाणिनीला उपलब्ध असलेल्या लौकिक व वैदिक वाङ्मयाच्या विस्ताराची साधारण कल्पनाही असणें अगत्याचें आहे. या बाबतींत विस्तारानें विवेचन करावयाचें म्हटल्यास चवथ्या अध्यायांतील " तदधीते तद्वेद " इत्यादि आठ सूत्रें (पा.सू.४।२।५९–६६), "तेन प्रोक्तम्" इत्यादि अकरा सूत्रें ( पा. सू. ४।३।१०१–१११ ), त्याप्रमाणेंच " उपज्ञाते " व " कृते ग्रन्थे " हीं सूत्रें ( पा. सू. ४।३।११५, ११६ ), या सर्व सूत्रांवरील वार्तिकें, महाभाष्य व काशिका, या ग्रंथांमध्यें, या सूत्रांवरील गणांमध्यें, तसेंच इतरही ऋगयनादि[1], उक्थादि[2] वगैरे गणांमध्यें आलेल्या प्रतिपाद्य विषयांच्या व ग्रंथकर्त्यांच्या नांवांचा सूक्ष्म विचार करणें अतिशय आवश्यक आहे. साधारणपणें विचार करणें झाल्यास, सर्व वैदिक वाङ्मय म्हणजे चारही वेदांच्या संहिता, ब्राह्मणग्रंथ, तसेच आरण्यक ग्रंथ पाणिनीला अवगत होते. अत्रि, वसिष्ठ, वामदेव, वगैरे मंत्रद्रष्ट्यांचा, तसाच, तित्तिरि, वरतन्तु, खण्डिक, उख, काश्यप, कौशिक, इत्यादि अनेक शाखाप्रवर्तकांचा उल्लेख त्याच्या सूत्रांमध्येंच[3] आला आहे. वाजसनेयि शाखेचा उल्लेख मिळत नसल्यामुळ पाणिनीनंतर त्या शाखेची प्रवृत्ति झाली तसेंच अथर्व-वेदाचा व उपनिषदांचा समाधानकारक उल्लेख नसल्यामुळें पाणिनीच्या कालानंतर तीं रचण्यांत आलीं असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. परंतु वाजसनेयि शाखेचा प्रचार पूर्वेकडील मिथिला प्रांतांत असल्यामुळें तिचा उल्लेख आला नसावा. अथर्ववेद व उपनिषदें मात्र पाणिनीला अवगत होतीं. कारण " आथर्वणिकस्येकलोपश्च " ( ४।३।१३३ ) व " जीविकोपनिषदावौपम्ये " (१।४।७९) या सूत्रांतील उल्लेख अथर्ववेद व उपनिषदें यांनाच उद्देशून आहेत. वेद हे ऋषींनीं अंतःस्फूर्तीनें जाणले असले व ते जाणणाऱ्या ऋषींचा मंत्रद्रष्टे म्हणून उल्लेख करण्याचा प्रघात जरी असला तरी पाणिनीनें वेदग्रंथांविषयीं 'प्रोक्त' हा शब्द वापरला आहे हें 'कठचरकाल्लुक्' ( पा. सू. ४।३।१०७ ) या सूत्रांतील 'कठ' या शब्दावरून स्पष्ट होतें. पाणिनीनें 'दृष्ट' हा शब्द सामांबद्दलच वापरला आहे हे " दृष्टं साम " ( पा. सू. ४।२।७९-८१ ) वगैरे सूत्रांवरून दिसतें.

१. "अणृगयनादिभ्यः" (पा. सू. ४।३।७३) यावरील गणपाठ पहा.

२. "क्रतूक्थादिसूत्रान्ताट्ठक्" (पा. सू. ४।२।६०) यावरील गणपाठ पहा.

३. "अत्रिभृगुकुत्सवसिष्ठगोतमाङ्गिरोभ्यश्च" (पा. सू. २।४।६६), वामदेवाड्ड्यड्ड्यौ (पा. सू. ४।२।९), "तित्तिरिवरतन्तुखण्डिकोखाच्छण्", "काश्यपकौशिकाभ्यामृषिभ्यां णिनिः" (पा. सू. ४।३।१०२, १०३) पहा.

## ६०. पाणिनिपूर्व ब्राह्मणग्रंथ.

" पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेषु " ( पा. सू. ४।३।१०५ ) या सूत्रांतील ' पुराणप्रोक्त ' या शब्दावरून ब्राह्मण ग्रंथांपैकीं कांहीं प्राचीन ब्राह्मणें व कांहीं नवीन ब्राह्मणें असा उल्लेख करण्याचा पाणिनीचे वेळीं प्रघात होता; व " याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधः " ( पा. सू. ४।२।६६ वा. ४ ) या वार्तिककारांच्या वचनावरून त्याला पुष्टि मिळते. तसेंच, याज्ञवल्क्यानें जुन्या ब्राह्मण ग्रंथांचें प्रवचन केलें असेंही त्यावरून स्पष्ट होतें. "शतषष्टेः षिकन् पथः" (पा.सू ४।२।६०श्लो.वा.१म.भा. ४पृ.१८८) या वार्तिकांत वार्तिककारांनीं मुद्दाम उल्लेख केला असल्यामुळें शतपथ ब्राह्मण हें कदाचित् पाणिनिकालानंतरचें असावें असें दिसतें. ब्राह्मण व कल्प या दोन्ही प्रकारच्या ग्रंथांचा एकत्र उल्लेख पाणिनीनें केल्यामुळें व त्यांचा प्रतिपाद्य विषय एकच असल्यामुळें कांहीं ब्राह्मणग्रंथांचा कल्पग्रंथांमध्यें अंतर्भाव होत असला पाहिजे. कुमारिलभट्टांनींहि ' अरुणपराशरशाखाब्राह्मणस्य कल्परूपत्वात् ' असें स्पष्ट विधानच केलें आहे. पाणिनीनें " अनुब्राह्मणादिनिः " ( पा. सू. ४।२।६२ ) या सूत्रांत ' अनुब्राह्मण ' शब्द घातला आहे. त्यावरून ब्राह्मणांसारख्या श्रौत-निर्वचनपर ग्रंथांना त्या वेळीं अनुब्राह्मण ही संज्ञा देण्यांत येत असली पाहिजे. " सुब्रह्मण्या " या नांवाच्या निगदग्रंथाचा " न सुब्रह्मण्यायाम्० " ( पा. सू. १।२।३७ ) या सूत्रांत उल्लेख आला आहे; पण कोणत्या वेदभागाला ती संज्ञा असावी तें नक्की सांगतां येत नाहीं.

## ६१. पाणिनिपूर्व वेदाङ्गग्रन्थ.

वेदाप्रमाणेंच पाणिनीला सर्व वेदांगेंही अवगत असावीं असें त्याच्या सूत्रांमध्यें व गणांमध्यें आलेल्या उल्लेखांवरून दिसतें. शिक्षाग्रंथांची संख्या केवळ हल्लीं उपलब्ध असलेल्या उल्लेखांवरून जरी साठाचे वर जात असली तरी शौनक, भारद्वाज, गालव, आपिशलि वगैरे कांहीं विवक्षित वैयाकरणांनीं रचिलेले शिक्षाग्रंथच आज उपलब्ध आहेत. शिक्षाग्रंथकर्ते म्हणून नव्हे, पण नांवानें त्यांचा उल्लेख पाणिनीच्या सूत्रांमध्यें आल्यामुळें शौनक, भारद्वाज इत्यादिकांचे शिक्षाग्रंथ पाणिनिपूर्वीं लिहिले गेले असावे. " पुराणप्रोक्तेषु० " या सूत्रांत प्रत्यक्ष उल्लेख असल्यामुळें कल्पग्रंथ तर पाणिनीच्या पूर्वीं होतेच; पण " यज्ञे समि स्तुवः " (पा. सू. ३।३।३१ ) व " क्रतुयज्ञेभ्यश्च " ( पा. सू. ४।३।६८ ) या पाणिनिसूत्रांवरून यज्ञप्रक्रियेवरही इतर बरेच ग्रंथ असावे असें सिद्ध होतें. व्याकरणग्रंथांच्या विषयीं वर विचार केलाच आहे. निरुक्त ग्रंथांपैकीं " यस्कादिभ्यो गोत्रे " ( पा. सू. २।४।६३ ) या सूत्रामध्यें यस्क शब्दाचा उल्लेख आल्यामुळें तसेंच उक्थादि गणामध्यें ' निरुक्त ' शब्द असल्यामुळें यास्काचें निरुक्तही पाणिनीच्या पूर्वीं लिहिलें असावें. छंदाविषयीं विचार केल्यास ऋग्वेद संहितेंत व निरुक्तामध्यें वृत्तांचें विवेचन असल्यामुळें छंदोग्रंथही पाणिनीला अवगत होते. " सोस्यादिरिति छन्दसः प्रगाथेषु " ( पा. सू. ४।२।५५ ) या सूत्रावरून वृत्तांप्रमाणें ऋचांचेंही त्या वेळीं गान केलें जात असे. छंदःशास्त्रप्रवर्तक पिंगल हा पाणिनीचा भाऊ होता अशी आख्यायिका आहे. उक्थादि गणामध्यें ज्योतिष शब्द आला आहे त्यावरून कांहीं ज्योतिष ग्रंथही पाणिनीला अवगत असावे.

## ६२. पाणिनिपूर्व सूत्रग्रंथ, पुराणग्रंथ व काव्यग्रंथ.

वेदांग–ग्रंथांनंतर झालेल्या सूत्र–ग्रंथांविषयीं विचार केल्यास " पाराशर्यशिलालिभ्यां भिक्षुनटसूत्रयोः " ( पा. सू. ४।३।११० ) या सूत्रामध्यें भिक्षुसूत्र व नटसूत्र यांचे प्रत्यक्ष

उल्लेख आले आहेत; त्यावरून संन्यासदीक्षा घेतलेल्या भिक्षूंच्या आचारांसंबंधीं नियम घालून देणारीं कांहीं सूत्रें पाणिनिकालीं असलीं पाहिजेत व त्यांचाच भिक्षुसूत्रानें उल्लेख केला असावा. जैन आचारांगसूत्र व बौद्ध विनय–पिटक हे ग्रंथ या सूत्रांवरच आधारलेले असावे. नट-सूत्राच्या उल्लेखावरून नाट्यशास्त्रावरही सूत्ररूप ग्रंथ असावे. यांशिवाय कांहीं काव्यग्रंथ व पुराणग्रंथही पाणिनीच्या पूर्वी लिहिले गेले होते. "महान्व्रीह्यपराह्ण०" (पा. सू. ६।२।३८) या सूत्रामध्यें 'भारता'चा(महाभारताचा)उल्लेख आला आहे. तित्तिरि, चरक व उख हे श्लोककर्ते म्हणून लोकांत प्रसिद्ध आहेत व त्यांचा उल्लेख पाणिनिसूत्रांत आहे. "शिशुक्रन्द०" (पा. सू. ४।३।८८) या सूत्रामध्यें आख्यायिकांचे कांहीं विषय दिले आहेत त्यावरून कांहीं आख्यायिका-ग्रंथही त्याला अवगत होते. जांबवतीविजय काव्य व पार्वतीपरिणय नाटक हींही पाणिनीनें रचिलीं असा लोकप्रवाद आहे. यांशिवाय आणखीही बऱ्याच विषयांवर पाणिनीचे पूर्वीं ग्रंथ लिहिले गेले होते हें ऋगयनादि गण (पा. सू ४।३।७३ गणपाठ) व उक्थादिगण (पा. सू. ४।२।६० गणपाठ) यांमध्यें आढळणाऱ्या न्याय, निरुक्त, व्याकरण, निगम, वास्तुविद्या, क्षत्रविद्या, उत्पात, उपनिषद्, मुहूर्त, निमित्त, शिक्षा तसेंच उक्थ, लोकायत, न्यास, न्याय, ज्योतिष, यज्ञ, धर्म, संहिता, पद, क्रम, आयुर्वेद इत्यादि शब्दांवरून सिद्ध होतें.

### ६३. पाणिनीचा जीवनवृत्तान्त.

पाणिनीच्या चरित्रासंबंधीं फारच थोडी माहिती मिळूं शकते. पाणिनीचे कालीं सिंधु व सतलज या नद्यांमधील प्रांताला 'वाहीक' देश म्हणत असत. पाणिनि हा या वाहीक देशा-जवळ शलातुर गांवचा राहणारा असावा असें न्यासकारांनीं म्हटलें आहे व 'शालातुरीय' या शब्दानें पाणिनीचा उल्लेखही कांहीं ग्रंथकारांनीं केला आहे. पणिन् हें त्याच्या एखाद्या प्रसिद्ध पूर्वजाचें नांव असावें; व त्यावरून गोत्रापत्य या अर्थीं पाणिन व युवापत्य या अर्थीं पाणिनि शब्दाची व्युत्पत्ति पदमञ्जरीकारांनीं दिली आहे. त्याची आई दक्ष घराण्यांतील होती. कारण, दाक्षीपुत्र या नांवानें पाणिनीचा उल्लेख महाभाष्यकारांनीं केला आहे. पाणिनिकृत शिक्षेंतही दाक्षीपुत्र शब्दाचा उल्लेख आहे. पाणिनि हें नांव जरी सर्वतोमुखीं असलें तरी 'पाणिन' या नांवानेंही त्याचा काशिकाकारांनीं उल्लेख केला आहे. पाणिनि व दाक्षीपुत्र या नांवांशिवाय कोशकारांनीं व टीकाकारांनीं आहिक, शालङ्कि व शालातुरीय अशींही त्याचीं नावें दिलीं आहेत. वर्ष हें पाणिनीच्या गुरुजींचें नांव, उपवर्ष हें गुरुजींच्या भावाचें नांव, पिङ्गल हें पाणिनीच्या बंधूंचें नांव व तसेंच कौत्स हें शिष्याचें नांव होतें अशा तऱ्हेचा वृत्तांत कथा-सरित्सागरामध्यें दिला आहे; पण ऐतिहासिक दृष्ट्या त्याला किती महत्त्व देतां येईल हा प्रश्नच आहे. जैमिनिसूत्राच्या वृत्तिकाराचेंही उपवर्ष हें नांव देण्यांत येतें. 'संग्रह' ग्रंथाचा कर्ता व्याडि व पाणिनि यांचा निकट संबंध जोडण्यांत येतो. व्याडीला दाक्षायण हें नांव असल्यामुळें व्याडि हा पाणिनीच्या मातृवंशातील नातेवाईक होता; मामा किंवा मामेभाऊ असेल. पाणि-नीच्या सूत्रांमध्यें व्याडीचा उल्लेख जरी आला नसला तरी क्रौड्यादि गणामध्यें व्याडीचा उल्लेख आला आहे. त्यावरून व्याडि हा पाणिनिसमकालीन किंवा जरासा पूर्वींचाही असणें शक्य आहे. पणिन् (देवघेव करणारा) हें त्याच्या गोत्रप्रवर्तकाचें नांव असल्यामुळें व महाभाष्यामध्यें 'ओदनपाणिनीयाः' असा त्याच्या शिष्यांच्या संबंधीं उल्लेख आला असल्या-मुळें पाणिनि हा श्रीमान् व समृद्ध असावा असें टीकाकारांचें म्हणणें आहे. 'पूर्वपाणिनीयाः' व 'अपरपाणिनीयाः' या काशिकाकारांनीं दिलेल्या उदाहरणांवरून पाणिनीला दीर्घायुष्य

लाभलें होतें व पूर्वायुष्यांतील व उत्तरायुष्यांतील असे त्याचे दोनही प्रकारचे शिष्य होते. 'पूर्वपाणिनीय' शब्दाचा पाणिनीच्या पूर्वीचे व्याकरणग्रंथकर्ते असाही अर्थ होणें शक्य आहे. तसेंच "उभयथा ह्याचार्येण शिष्याः पठिताः" या महाभाष्यांतील उल्लेखावरून त्यांचा शिष्यपरिवार फार मोठा होता व शिष्यांना तो स्वतःचीं सूत्रें स्वतःच स्पष्टीकरण देऊन पढवीत असे असें स्पष्ट होतें. पदमञ्जरीकारांच्या उल्लेखांवरूनही या म्हणण्यास पुष्टी मिळते. लिहिण्याची कला फारशी प्रघातांत नसूनसुद्धां पाणिनीचा विस्तृत सूत्रपाठ आज जसाच्या तसा उपलब्ध आहे यावरून शिष्याकरवीं तो सर्व सूत्रें मुखोद्गत करून घेत असला पाहिजे.

## ६४. पाणिनीच्या व्याकरणाविषयीं प्रशंसोद्गार.

कथासरित्सागरामध्यें पाणिनि हा वर्षाच्या शिष्यांपैकीं एक अत्यंत बुद्धिमंद शिष्य होता असा उल्लेख असला तरी तपश्चर्येच्या प्रभावामुळें म्हणा, किंवा महेश्वराच्या अनुग्रहामुळें म्हणा, दीर्घ परिश्रम व व्यासंग यांमुळें वाग्देवतेला प्रसन्न करून तिच्या अनुग्रहानें तो अत्यंत प्रतिभासंपन्न ऋषिश्रेष्ठ बनला व त्या वेळच्या वैदिक व लौकिक वाङ्मयांवर त्यानें पूर्ण प्रभुत्व मिळविलें, हें त्याच्या सर्वाङ्गपरिपूर्ण अशा सूत्रपाठाचें निरीक्षण करणाऱ्याच्या सहज ध्यानांत येण्याजोगें आहे. पतंजलीसारख्या महापंडितानें 'दर्भपवित्रपाणि आचार्य' म्हणून त्याचा बहुमानपूर्वक उल्लेख केला आहे इतकेंच नव्हे, तर 'सूत्रें करण्यास तो बसला म्हणजे एकामागून एक अशीं भराभर तो सूत्रें रचीत असे व एकदां सूत्र रचून शिष्यांना सांगितलें म्हणजे पुन्हा तें फिरविण्याचें कारण त्याला कधींही पडत नसे' असें त्याच्या प्रतिभासंपन्नतेचें वर्णन केलें आहे. काशिकाकारांनीं त्याच्या सूत्रांतील सूक्ष्म विवेचनाचें कौतुक करून "महती सूक्ष्मेक्षिका वर्तते सूत्रकारस्य" या विधानानें भाष्यकारांच्या वचनाला पूर्ण पुष्टि दिली आहे. चिनी यात्रेकरू इत् सिंग यांनेंही पाणिनीच्या व्याकरणाच्या पूर्णत्वाविषयीं योग्य उद्गार काढले आहेत. "पाणिन्युपज्ञमकालकं व्याकरणम्" या काशिकाकारांच्या वाक्यांतील 'अकालक' शब्दाचा अर्थ ज्याला कालमर्यादा नाहीं असें, म्हणजे ज्याचें पठनपाठन रचनाकालापासून अव्याहत चालू आहे असें, असा असल्यामुळें काशिकाकारांनीं पाणिनीय व्याकरणाचें त्रिकालाबाधितत्व सुचविलें आहे. पाश्चात्य विद्वान् मोनियर वुइलियम्स, मॅक्सम्यूलर, कोलब्रुक इत्यादिकांनीं त्याच्या

---

१. म. भा. भाग २ पृ. ९७ पहा.

२. याविषयीं राजशेखराचा पुढें दिलेला श्लोक विचारांत घेण्याजोगा आहे—

"न विद्यते यद्यपि पूर्ववासनागुणानुबन्धि प्रतिभानमुत्तमम्।
श्रुतेन यत्नेन च वागुपासिता ध्रुवं करोत्येव कमप्यनुग्रहम्॥

३. "प्रमाणभूत आचार्यो दर्भपवित्रपाणि... किं पुनरियता सूत्रेण" (म. भा. भाग १ पृ. ९७) "माङ्गलिक आचार्यो महतः शास्त्रौघस्य मङ्गलार्थं वृद्धिशब्दमादितः प्रयुङ्क्ते" (म. भा. भाग १ पृ. १००) "माङ्गलिक आचार्यो महतः ...वकारमागमं प्रयुङ्क्ते (म. भा. भाग २ पृ. १), तसेंच "न चेदानीमाचार्याः सूत्राणि कृत्वा निवर्तयन्ति" (म. भा. भाग १ पृ. २६) पहा.

४. "उदक् च विपाशः" (पा. सू. ४।२।७४) वरील काशिकावृत्ति पहा.

५. "महेश्वराच्या अनुग्रहानें पाणिनीनें रचिलेलें सहस्रश्लोकपरिमित वृत्तिसूत्र आठ वर्षे वयाचीं मुलें आठ महिन्यांत शिकत असत." असे उद्गार इत्सिंगनें आपल्या प्रवासवर्णनांत काढले आहेत.

६. मागें उपोद्घात पृष्ठ १३४ परिच्छेद ४० पहा.

व्याकरणाचें कौतुक केलें आहे व जगामधील जुन्यांत जुनें असूनही श्रेष्ठांत श्रेष्ठ व सर्वांगपरिपूर्ण व्याकरण अशी त्याची स्तुति केली आहे. अष्टाध्यायीशिवाय शिक्षा, धातुपाठ व गणपाठ हीं स्वतःच्या सूत्रांना पूरक म्हणून जशीं त्यानें रचिलीं तशीं पञ्चपादात्मक उणादिसूत्रेंही त्यानें रचिलीं असें भर्तृहरीच्या महाभाष्यप्रदीपिकेंतील उल्लेखावरून दिसतें. शिक्षाग्रंथाविषयीं विचार केल्यास उपलब्ध असलेला लहान शिक्षाग्रंथ त्यानें रचिला किंवा सूत्ररूपानें त्यानें रचिलेला शिक्षाग्रंथ हा निराळाच होता याविषयीं विद्वानांत मतभेद आहे. या ग्रंथांशिवाय जाम्बवतीविजय व पार्वतीपरिणय हे सुंदर काव्यमय ग्रंथ त्यानें रचिले असावे असें राजशेखर, क्षेमेन्द्र व शरणदेव यांच्या उल्लेखांवरून व वैयाकरणकुलामध्यें प्रचलित असलेल्या दंतकथांवरून दिसतें; व महाभाष्यांतील "ब्रुविशासिगुणेन च यत्सचते तदकीर्तितमाचरितं कविना" (म. भा. भाग २ पृ. १७६-१७७) या श्लोकार्धांतील कवि या शब्दानें त्यास पुष्टि मिळते.

## ६५. पाणिनीच्या पूर्वींचीं व्याकरणें व पाणिनीचें व्याकरण यांचा संबंध.

पाणिनीचा काल जरी निश्चितपणानें ठरविला गेला नसला व कांहीं विद्वानांचे मतानें श्रमण, निर्वाण वगैरे शब्दांचा उल्लेख त्याच्या सूत्रांमध्यें आल्यामुळें गौतमबुद्धानंतर तो होऊन गेला असें असलें तरी पुष्कळ विद्वानांच्या मतानें इसवी सनापूर्वी सातवें आठवें शतक हा त्याचा काल ठरविला जातो. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें प्रकृतिप्रत्ययाच्या विभागाची कल्पना करून वैदिक वाक्यांचा व लौकिक वाक्यांचा शुद्ध उच्चार व योग्य अर्थ लोकांना समजावून देणें हा त्याचा व्याकरण लिहिण्याचा मुख्य हेतु होता. गांधार देशांतील शलातुर गांवापासून कोसल अंग, वंग, मगध, कलिंग वगैरे प्राच्य[3] देशांच्या टोकापर्यंत प्रत्येक प्रांतांत प्रवास करून तेथील चालीरीतींचा[4], उद्योगधंद्यांचा[5], लोकांच्या व्यवसायांचा[6], तेथें प्रचलित असलेल्या भाषांचा,

१. पाणिनीचें व्याकरण म्हणजे मानवी बुद्धीचा एक आश्चर्यकारक नमुना आहे असें मोनियर वुइलियम्सनें काढलेले उद्गार प्रसिद्धच आहेत. सर वुइलियम हंटरनें सुद्धां पाणिनीय अष्टकाला मानवी बुद्धीचा महत्त्वपूर्ण आविष्कार असें म्हटलें आहे.

२. जाम्बवतीविजय किंवा जाम्बवतीजय हें काव्य पाणिनीनें लिहिलें असें प्रथमतः प्रतिपादन राजशेखरानें "नमः पाणिनये तस्मै यस्मादाविरभूदिह । आदौ व्याकरणं काव्यमनु जाम्बवतीजयम्" या श्लोकांत केलें. त्यामुळें पाणिनीनें जाम्बवतीविजय काव्य लिहिलें असा वैयाकरणांचा समज आहे. पाणिनी काव्यकर्ता होता असा उल्लेख क्षेमेन्द्रानें 'पाणिनेरुपजातिभिः' या शब्दांनीं केलेला प्रसिद्धच आहे शरणदेवानें दुर्घटवृत्तीमध्यें "सायंचिरं०" (पा. सू. ४।३।२३) या सूत्राची व्याख्या करितांना जाम्बवतीविजया मधील एक श्लोक उद्धृत केला आहे पार्वतीपरिणय नाटक पाणिनीनें रचिलें अशीही वैयाकरणकुलामध्यें एक प्रचलित दन्तकथा आहे.

३. 'कोसल' शब्द पाणिनीच्या "वृद्धेत्कोसलाजादाञ्ञ्यङ्" (४।१।१६९) या सूत्रामध्यें आला आहे; मगध व कलिङ्ग हे शब्द "वृद्धिमगधकलिङ्ग०" (४।१।१६८) या सूत्रामध्यें आले आहेत व अङ्ग व वङ्ग हे शब्द "गहादिभ्यश्च" (पा सू. ४।१।१३८) या सूत्रावरील गहादि गणामध्यें आढळतात.

४. पात्रेसमितादिगण (२।१।४८) व मयूरव्यंसकादिगण (२।१।७२) यांतील शब्द पहा.

५. अश्वपत्यादिगण (४।१।८४) व वेतनादिगण (४।४।१२) यांतील शब्द पहा.

६. पुरोहितादिगण (५।१।१२८) व याजकादिगण (६।२।१५१) यांतील शब्द पहा.

वैदिक शाखांचा, अध्ययनग्रंथांचा तसेंच तेथील गोत्रवाचक, स्त्रीवाचक, व्यक्तिवाचक, देशवाचक, नगरवाचक, ग्रामवाचक इत्यादि विशेष नांवांचा त्यानें पूर्ण अभ्यास केला असावा. प्रत्येक ठिकाणीं उपलब्ध झालेल्या व पूर्व वैयाकरणांनीं लिहिलेल्या व्याकरणविषयक ग्रंथांचें व प्रातिशाख्य ग्रंथांचें पूर्ण अवलोकन करून व त्यांमध्यें दिलेल्या व्याकरणविषयक नियमांचा व संज्ञांचा संग्रह करून त्यानें आपलें 'अष्टाध्यायी' नांवाचें व्याकरण शास्त्र रचिलें. शब्दव्याकरणशास्त्र या दृष्टीनें तें परिपूर्ण आहे इतकेंच नव्हे तर त्यांतील सुमारें चार हजार सूत्रांचें विशिष्ट दृष्टिकोणानें परिशीलन केल्यास बुद्धिमान् विद्वानाला त्याच्यावरून त्या कालचें वाङ्मय व संस्कृति यांचा इतिहास लिहिणेंही शक्य होईल असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. पाणिनीचे पूर्वी आपिशलि, भागुरि, इन्द्र, शाकटायन वगैरे वैयाकरणांनीं पाणिनीच्या सारखीं व्याकरणें लिहिलीं होतीं व पाणिनीला त्यांचा फार उपयोग झाला हें मागें सांगितलेंच आहे. पाणिनीनें आपलें व्याकरण त्यांवरच अधिष्ठित केलें आहे असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. पाणिनीच्या व्याकरणाची विशिष्ट पद्धति व सूत्रांची मांडणी पाहिल्यास त्यानें पूर्वीच्या व्याकरणांचा केवळ संक्षेप किंवा विस्तार करून किंवा किरकोळ फरक करून आपलें व्याकरण रचिलें असें मुळींच म्हणवत नाहीं. पूर्वीच्या वैयाकरणांच्या मतानें स्वरांची संख्या चौदा किंवा पाणिनीच्या शिक्षेंत दिल्याप्रमाणें एकवीस जरी असली तरी पाणिनीनें नऊच स्वर दिले आहेत. त्याप्रमाणें व्यंजनेंसुद्धां तेहतीसच दिलीं आहेत. त्यांचा सामान्य क्रम व वर्गांतील क्रमही निराळा दिला आहे. याशिवाय वर्णसमाम्नायांत प्रत्याहाराकरितां व धातु आणि प्रत्यय यांमध्यें विशिष्ट पद किंवा स्वर, तसेंच वृद्धि, गुण इत्यादिकांची प्राप्ति आणि निषेध यांकरितां, 'इत्' वर्ण त्यानें दिले आहेत.

---

१. शौनकादिगणांतील ( ४।३।१०६ ) शब्द पहा.

२. उक्थादिगण ( ४।२।६० ), ऋगयनादिगण ( ४।३।७३ ) व कथादिगण ( ४।४।१०२ ) यांतील शब्द पहा.

३. पैलादिगणांतील ( २।४।५९ ) शब्द पहा.

४. कल्याण्यादिगण ( ४।१।१२६ ) व महिष्यादिगण ( ४।४।४८ ) यांतील शब्द पहा.

५. अरीहणादिगण ( ४।२।८० ), ऐषुकार्यादिगण ( ४।२।५४ ), क्रोड्यादिगण ( ४।१।८० ) बिदादिगण ( ५।१।१०४ ) गर्गादिगण ( ४।१।१०५ ) व कण्वादिगण ( ४।२।१११ ) यांतील शब्द पहा.

६. उत्सादिगण ( ४।१।८६ ) कम्बोजादिगण ( ४।१।१७३ ), भर्गादिगण ( ४।१।१७६ ) कच्छादिगण ( ४।२।१३३ ), गहादिगण ( ४।२।१३८ ) व सिद्धादिगण ( ४।३।९३ ) यांतील शब्द पहा.

७. वरणादिगण ( ४।२।८२ ), कन्यादिगण ( ४।२।९५ ) व तक्षशिलादिगण ( ४।३।९३ ) यांतील शब्द पहा.

८. नद्यादिगणांतील ( ३।२।९७ ) शब्द पहा.

९. त्रीणि सूत्रसहस्राणि तथा नव शतानि च ।
षण्णवतिश्च सूत्राणां पाणिनिः कृतवान् स्वयम् ॥

असा एक श्लोक वैयाकरण संप्रदायामध्यें प्रचलित आहे. त्यामध्यें पाणिनीनें ३९९६ सूत्रें रचिलीं असें म्हटलें आहे. प्रसिद्ध अष्टाध्यायीपाठांत ३९८३ सूत्रें दिलीं आहेत.

१०. उपोद्घात पृष्ठ १४३ पहा.

११ "उपदेशेऽजनुनासिक इत्" ( पा सू. १।३।२ पहा. )

त्याप्रमाणें लाघवाचे दृष्टीनें टि, घु, भ वगैरे संज्ञाही कल्पिल्या आहेत. या सर्व दृष्टीनें विचार केल्यास असें दिसून येतें कीं पूर्व वैयाकरणांची पाणिनीला निरनिराळ्या प्रकारांनीं पुष्कळ मदत झाली असली तरी त्यानें एका दृष्टीनें सर्वांगपूर्ण असें नवेंच व्याकरण लिहिलें यांत शंकाच नाहीं. पूर्वींच्या व्याकरणांचा सारांश किंवा विस्तार या रूपाचेंच व्याकरण त्याला लिहावयाचें असतें तर प्रतिपाद्य विषयविभागांच्या क्रमामध्यें, वर्णसमाम्नायामध्यें व संज्ञांमध्यें महत्त्वाचे बदल करण्याचें त्याला कारणच नव्हतें.

## ६६. ' अइउण्, ' ' ऋलृक् ' इत्यादि सूत्रांच्या कर्त्याविषयीं विवेचन.

पाणिनीच्या ' अष्टाध्यायी 'च्या आरंभीं पठनपाठनांत असलेलीं अइउण्, ऋलृक् इत्यादि चौदा सूत्रें पाणिनीनें स्वतः रचिलीं किंवा पूर्व वैयाकरणांकडून जशींच्या तशींच त्यानें घेतलीं याविषयीं विद्वानांमध्यें मतभेद आहे. त्याप्रमाणेंच भाष्यांतील पहिलें वाक्य ' अथ शब्दानुशासनम् ' हें पाणिनीचेंच मङ्गलाकरितां घातलेलें व शास्त्रोद्देश सांगणारें सूत्रांना आरंभ करण्यापूर्वी दिलेलें प्रस्ताववाक्य आहे, किंवा कात्यायनाचें वार्तिक आहे किंवा व्याडीचें वाक्य आहे किंवा भाष्यकारांचेंच वाक्य आहे याविषयींही मतभेद आहे. अइउण् इत्यादि सूत्रांमध्यें उच्चारलेल्या वर्णांचा क्रम व संख्या यांमध्यें व शिक्षा आणि प्रातिशाख्य ग्रंथांमधील वर्णांचा क्रम व संख्या यांमध्यें पुष्कळच भिन्नता असल्यामुळें अइउण् इत्यादि प्रत्याहारसूत्रें पाणिनीनेंच रचिलीं असावीं.

" नृत्तावसाने नटराजराजो ननाद ढक्कां नवपञ्चवारम् ।
उद्धर्तुकामः सनकादिसिद्धानेतद्विमर्शे शिवसूत्रजालम् "

या नंदिकेश्वराच्या कारिकेमध्यें शंकरानें चौदा वेळां डमरूचा निनाद केला असें म्हटलें आहे; तसेंच हा निनाद पाणिनीला निरनिराळ्या वर्णांच्या सारखा ऐकूं आला व त्यानें त्या निनादाचें चौदा सूत्रांत रूपांतर करून तीं सूत्रें प्रथम घालून आपली अष्टाध्यायी रचिली असा वैयाकरणांमध्यें प्रचलित समजही पिढ्यानुपिढ्या चालूं आहे. शिवाय, प्रत्याहाररूपानें अष्टाध्यायीला या सूत्रांची पदोपदीं उपयुक्तताही आहे. महाभाष्यकारांनीं 'ऋलृक्' या सूत्राचें विवेचन करतांना 'लृ'-काराची सूत्रामध्यें काय आवश्यकता आहे. असा प्रश्न उपस्थित केला आहे;[२] ' ह ' हा वर्ण दोनदां कां उच्चारला आहे याबद्दल विवेचन केलें आहे;[३] व त्याप्रमाणेंच ' हयवरट् ' या सूत्राऐवजीं ' हरयवट् ' असें सूत्र कां केलें नाहीं याचाही विचार केला आहे.[४] यावरून हीं सूत्रें पाणिनीनें रचिलीं असें भाष्यकारांचें मत असावें. जर हीं सूत्रें महेश्वरोपदेश म्हणून सर्वथा प्रमाण असतीं तर महेश्वराच्या शब्दांचे विषयीं ऊहापोह करणें अयुक्त आहे असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें असतें. नंदिकेश्वराची कारिका ही अर्थवाद स्वरूपाची आहे व ' अइउण् ', ' ऋलृक् ' इत्यादि सूत्रांचें महत्त्व दाखविणें हेंच तिचें प्रयोजन आहे.

---

१. याबद्दल थोडेसें विवेचन पूर्वीं ( उपोद्घात पृ. १२५–१२६ मध्यें ) केलें आहे तें पहावें.

२. याविषयीं म. भा. भाग १ पृष्ठ ४४–५२ पहा.

३. याविषयीं म. भा. भाग १ पृष्ठ ६८ पहा.

४. याविषयीं म. भा. भाग १ पृष्ठ ६९–७० पहा.

## ६७. अष्टाध्यायी–सूत्रपाठाविषयीं विचार.

पाणिनीनें रचिलेल्या सूत्रपाठाला ' अष्टाध्यायी ' म्हणण्याचा प्रघात आहे. ' अष्टकं पाणिनीयम् ' असाही त्याचा उल्लेख करण्यांत येतो. हा अष्टाध्यायी सूत्रपाठ भाष्यकारांनतर कांहीं कालानें वेदाङ्ग म्हणून समजण्यांत आला व त्याचा पाठ निश्चित करण्यांत आला आणि त्या वेळीं भाष्यकारांनीं वार्तिकें म्हणून दिलेल्या कांहीं वार्तिकांचाही त्यांत समावेश करण्यांत आला. त्याप्रमाणेंच भाष्यकारांच्या वेळीं प्रचलित असलेल्या कांहीं सूत्रांच्या दोन पाठांपैकीं एक पाठ कायम करण्यांत आला. नागेशभट्टांनीं शब्देन्दुशेखराच्या आरंभीं पाणिनीय अष्टाध्यायी-सूत्रपाठ हेंच वेदाङ्ग–व्याकरण असें स्पष्ट म्हटलें आहे. सूत्रपाठाचा वेदाङ्ग व्याकरण म्हणून स्वीकार करण्यांत आल्यानंतर आजपर्यंत कित्येक शतकें त्याचा अव्युच्छिन्न पाठ चालू आहे. सूत्रांची गणना करून दर वीस वीस सूत्रांचा एक गट करून दर पादाचे शेवटीं गटाच्या आद्या-क्षरांची साखळी करण्यांत आली आहे व तिचाही वैदिकांच्या पाठामध्यें अंतर्भाव झाला आहे. वार्तिकांमधील कांहीं शब्द सूत्रांमध्यें घालून हल्लींचा सूत्रपाठ काशिकाकारांनीं चालू केला असें कैयट, हरदत्त वगैरे वैयाकरणांचें म्हणणें आहे. पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील

---

१. उदाहरणार्थ—" वृद्धस्य च पूजायाम् " व " यूनश्च कुत्सायाम् " यांचा भाष्यकारांनीं वार्तिकें म्हणून उल्लेख केला आहे. परंतु हीं वार्तिकें सूत्रपाठांत हल्लीं पठन केली जातात. (पा. सू. ४।१।१६६ व १६७, म. भा. भाग ४ पृष्ठ १६१,१६२ ) पहा.

२ उदाहरणार्थ—भाष्यकारांनीं " आ कडारादेका संज्ञा " व " प्राक्कडारात् परं कार्यम् " असा त्यांचे-वेळीं प्रचलित असलेल्या दोन पाठांचा उल्लेख केला आहे. व आचार्य पाणिनि हे दोनही प्रकारांनीं आपल्या शिष्यांना पढवीत असत असें स्पष्ट म्हटलें आहे ( म. भा. भाग २ पृष्ठ ९७ ). पण हल्लींच्या अष्टाध्यायी सूत्रपाठामध्यें " आ कडारादेका संज्ञा " ( पा. सू. १।४।१ ) हाच पाठ चालू आहे.

३. " श्रुतिमूलकत्वादस्यैव वेदाङ्गत्वम् । अत्र प्रमाणम्–' येनाक्षरसमाम्नायमधिगम्य महेश्वरात् कृत्स्नं व्याकरणं प्रोक्त ' मिति शिक्षावचनम् " असें शब्देन्दुशेखरांत ग्रन्थारंभींच नागेशांनीं स्पष्ट म्हटलें आहे. कांहीं टीकाकारांनीं या वाक्याबर आक्षेप घेऊन उद्बोधक चर्चा केली आहे.

४. याविषयीं " हलश्च " ( पा. सू. ३।३।१२१ ) या सूत्रावरील भाष्याचें व्याख्यान करतांना कैयटभट्टांनीं ' अध्यायसूत्रे आधारावायशब्दौ वार्तिके दर्शनादभियुक्तैः प्रक्षिप्तौ ' असें लिहिलें आहे; व अभियुक्त या शब्दानें त्यांनीं काशिकाकारांचा उल्लेख केला आहे असें मानण्याचा प्रघात आहे. याच सूत्राचें व्याख्यान करतांना पदमञ्जरीकार हरदत्तांनीं " घञ्विधाववहारावायानामुपसंख्यानमिति वार्तिकम् । वृत्तिकारस्तु आधारावायशब्दान् सूत्रे प्रक्षिप्य चकारेणावहारशब्दं साधयति स्म । विचित्रा हि वृत्तेः कृतिर्वृत्तिकारेण " असें म्हणून कैयटभट्टांच्या म्हणण्याला पुष्टि दिली आहे; पण वृत्तिकारांच्या या कृतीबद्दल अरुचि प्रदर्शित केली आहे. " वृद्धस्य च पूजायाम् " व " यूनश्च कुत्सायाम् " ( पा. सू. ४।१।१६६–१६७; म. भा. भाग ४ पृष्ठ १६१–१६२ ) यांचें विवेचन करतांनाही पदमञ्जरीकारांनीं " वार्तिककारीयं चेदं सूत्रं वृत्तिकारेण तु सूत्रेषु प्रक्षिप्तम् । एतेनोत्तरसूत्रं व्याख्यातम् " असे उद्गार काढले आहेत. त्याप्रमाणेंच " नित्यमाम्रेडिते डाचि " ( पा. सू ६।१।१०० ) याचें व्याख्यान करतांना " वार्तिकमेवेदम् । वृत्तिकृता सूत्ररूपेण पठितम् " असें म्हटलें आहे; व " आत्मनश्च पूरणे " ( पा. सू. ६।३।६ ) याचें विवेचन करतांनाही " वार्तिकमेवेदं सूत्ररूपेण पठितम् " येवढेंच म्हटलें आहे. या सर्व उल्लेखांवरून पाणिनीच्या सूत्रांत कांहीं ठिकाणीं बदल तर कांहीं ठिकाणीं वार्तिकांचाही अंतर्भाव वृत्तिकारांनीं केला हें

"तदशिष्यं संज्ञाप्रमाणत्वात्" इत्यादि पांच सूत्रांमध्यें (पा. सू. १ । २ । ५३ – ५७) आपणच सांगितलेल्या कांहीं विधींची वस्तुतः मुळींच जरूर नाहीं असें पाणिनीनें स्वतः प्रतिपादन केलें आहे हें लोकव्यवहाराला फार विसंगत दिसतें म्हणून हीं पांच सूत्रें पाणिनीचीं नाहींतच; मागाहून सूत्रपाठामध्यें कोणींतरी त्यांचा अंतर्भाव केला असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. वास्तविक पाहतां हीं पांचही सूत्रें पाणिनीचींच आहेत. 'तदशिष्यं०' इत्यादि शब्दांनीं निर्दिष्ट केलेलीं अष्टाध्यायींत पूर्वीं आलेलीं सूत्रें पूर्व वैयाकरणांचीं आहेत; तीं न केलीं असतां चालेल असें त्याला सुचवावयाचें आहे. इतर कांहीं लोक हीं पांचच नव्हे, तर पाद संपेपर्यंतचीं सर्वच सूत्रें प्रक्षिप्त आहेत असें म्हणतात. कांहीं वैयाकरण याचे पुढेंही जाऊन पाणिनीचा सूत्रपाठ हा मूळचा फारच लहान होता, कालान्तरानें तो ज्यास्त ज्यास्त विस्तृत होत गेला असें म्हणतात. पूर्वीं कोणतीं सूत्रें होतीं व मागाहून कोणतीं घातलीं गेलीं याविषयीं मात्र हे टीकाकार कांहींच बोलत नाहींत. कदाचित् महाभाष्यांत घेतलीं आहेत तेवढींच मूळचीं व बाकीचीं सर्व मागाहून घातलेलीं असें त्यांचें मत असावें; पण हेंही म्हणणें बरोबर नाहीं. कारण, महाभाष्यांत ज्यांचें विवेचन केलें नाहीं अशा पुष्कळच सूत्रांचा भाष्यकारांनीं जागोजागीं उल्लेख केला आहे. भाष्यकारांनीं "नैकं प्रयोजनं योगारम्भं प्रयोजयति" तसेंच "नैकमुदाहरणं योगारम्भं प्रयोजयति" असें अनेक ठिकाणीं म्हटलें आहे. त्यावरून ज्या सूत्रांनीं फक्त एकेकच उदाहरण साधलें जातें तीं सर्व सूत्रें पाणिनीनंतरचीं सूत्रपाठांत प्रक्षिप्त केलेलीं असावीं असेंही कांहीं टीकाकार म्हणतात. वास्तविक पाहतां ही ओळ लिहिण्यांत भाष्यकारांचा अभिप्राय मात्र अगदीं निराळा दिसतो; 'एका उदाहरणाकरितां निराळें सूत्र करावें लागल्यास सूत्रकार तें करीत नसतात, सामान्य तऱ्हेनें नियम व त्यांना सामान्य तऱ्हेनेंच अपवाद देण्याची सूत्रकारांची पद्धति आहे; नैरुक्तांप्रमाणें दरेक शब्द साधणें व त्याकरितां सूत्र करणें त्यांना पसंत नाहीं' असा ही ओळ लिहिण्यांत भाष्यकारांचा अभिप्राय आहे. पाणिनीचा सूत्रपाठ स्वररहित म्हणजे एकश्रुतीनेंच सूत्रकारांनीं लिहिला व तो संधिकार्यें करून संहितारूपानेंच लिहिला गेल्यामुळें सूत्रविभाग जरूर पडेल त्याप्रमाणें करतां येतो असेंही भाष्यकार व वृत्तिकार यांनीं म्हटलें आहे; व त्याप्रमाणें कांहीं ठिकाणीं भाष्यामध्यें व वार्तिकांमध्यें योगविभाग सांगितलाही आहे.

---

बरोबर केलें नाहीं असा पदमञ्जरीकारांचे म्हणण्याचा रोख आहे असें स्पष्ट होतें. कदाचित् वृत्तिकृत् या शब्दानें त्यांना काशिकाकारांचे पूर्वींचा जुना वृत्तिकार कुणि वगैरे अभिप्रेत असेल. कारण, वैदिकांचे पठनांतील अष्टाध्यायी वेदाङ्गाचा सूत्रपाठ हा भाष्यकारांचे नंतर पण काशिकाकारांचे पूर्वींच निश्चित झाला होता, व वरतीं उल्लेख केलेले फरक व वार्तिकें वैदिकपाठामध्यें आढळून येतात.

१. महाभाष्यामध्यें फक्त १२२८ सूत्रांचेंच भाष्यकारांनीं विवेचन केलें आहे. अर्थात् इतर सूत्रांचा उल्लेख वेळोवेळीं केला गेला असल्यामुळें तीं त्यांना माहीत होतीं हें स्पष्टच आहे. या इतर सूत्रांमधील कांहीं म्हणजे ज्यांचा प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षही उल्लेख नाहीं अशीं सूत्रें त्यांना माहीत नसावीं असें म्हणणें शक्य आहे पण तशीं सूत्रें कोणतीं हें निश्चित सांगतां येणें शक्य नसल्यामुळें तसें म्हणणें बरोबर होणार नाहीं. भाष्यकारांनीं ज्यांचा वार्तिकें म्हणून उल्लेख केला आहे अशीं नऊ वार्तिकें व दोन गणसूत्रें वगळल्यास भाष्यकारांचे वेळीं ३९७२ सूत्रांचा पाठ असावा असें दिसतें.

२. याकरितां पा सू १।१।१२; म. भा. भाग १ पृ १७८; पा. सू. १।१।४१; म. भा. भाग १ पृष्ठ २५५; पा. सू ७।१।९६; म. भा. भाग ६ पृ ८९; पा. सू. ३।१।६७; म. भा. भाग ३ पृष्ठ १३४ पहा.

## ६८ अष्टाध्यायीचें स्वरूप.

पाणिनीय अष्टक अथवा अष्टाध्यायी या ग्रंथांत जवळजवळ चार हजार सूत्रें आहेत[1]. हीं व्याकरणसूत्रें रचण्यांत पाणिनीनें आपलें ध्येय म्हणजे लौकिक व वैदिक वाक्यांचें यथार्थ ज्ञान करून देणें हें उत्तम रीतीनें साधलें आहे. त्याच्या सूत्रांत पद्धतशीरपणा नाहीं व विषयविभाग आणि त्यांची खुलासेवार मांडणी त्यानें केली नाहीं असें जरी आपाततः दिसून आलें[2] तरी त्याच्या-वेळीं संस्कृत भाषेला असलेलें स्थान व सामान्य जनतेला असलेलें संस्कृतचें ज्ञान हीं लक्षांत घेऊन सर्व सूत्रांचें परिशीलन केल्यास पाणिनीच्या अष्टाध्यायींत विषयविस्ताराबरोबर पद्धतशीर-पणा, लाघवाबरोबरच निःसंदिग्धता, व तान्त्रिक संज्ञा आणि संकेत यांचेबरोबरच अर्थप्रति-पादकत्व हे गुण प्रामुख्यानें आढळून येतात. कोणतेंही लौकिक किंवा वैदिक वाक्य घेतल्यास त्याचें यथार्थ ज्ञान होण्याकरितां प्रथमतः त्या वाक्यांतील शब्दांचा परस्पर संबंध, सामासिक शब्दांची फोड, कृदन्तप्रत्ययान्त व तद्धितप्रत्ययान्त प्रातिपदिकांचा प्रकृतिप्रत्ययविभाग, सुबन्तांचा तसाच तिङन्तांचा प्रकृतिप्रत्ययविभाग, शब्दांचे स्वर, व वाक्यामधील शब्द एकामागून एक उच्चारतांना झालेलीं संधिकार्यें यांचें ज्ञान क्रमशः आवश्यक असतें; व हाच क्रम मनांत घेऊन

---

१. " त्रीणि सूत्रसहस्राणि तथा नव शतानि च ।
षण्णवतिश्च सूत्राणां पाणिनिः कृतवान् स्वयम् ।। "

या वैयाकरणकुलांमध्यें प्रसृत असलेल्या उक्तीप्रमाणें पाणिनिसूत्रें ३९९६ आहेत. अष्टाध्यायी-सूत्रपाठ निश्चित झाल्यानंतर व त्याला वेदाङ्ग व्याकरण म्हणून मानण्यांत आल्यानंतर ऋग्वेदाच्या दशग्रंथीं मौखिक परंपरेंत तो पाठ चालू झाला. त्यामध्यें ३९८३ सूत्रें म्हटलीं जातात. महाभाष्यामध्यें वार्तिकें म्हणून गणलेलीं नऊ वचनें व दोन गणसूत्रें या सूत्रपाठांत सूत्रें म्हणून दिलीं आहेत. तीं वजा केलीं असतां भाष्यकारांच्या पाठांत ३९७२ सूत्रें होतीं असें दिसतें. पुढें दिलेल्या अकरा सूत्रांपैकीं पहिलीं नऊ भाष्यकारांचे वेळीं वार्तिकें होतीं; व शेवटचीं दोन गणसूत्रें होतीं: " वृद्धस्य च पूजायाम् " (पा. सू. ४।१।१६६), " यूनश्च कुत्सायाम् " (पा. सू. ४।१।१६७), " कौपिञ्जलहास्तिपदादण् " (पा. सू. ४।३।१३२) " आथर्वणिकस्येकलोपश्च " (पा. सू. ४।३।१३३), " अचि शीर्षः " (पा. सू. ६।१।६२) " नित्यमाम्रेडिते डाचि " (पा. सू. ६।१।१००) " सुट् कात्पूर्वः " (पा. सू. ६।१।१३५) " अड्भ्यासव्यवायेपि " (पा. सू. ६।१।१३६) " आत्मनश्च पूरणे " (पा. सू. ६।३।६), " एति संज्ञायामगात् " (पा. सू. ८।३।९९) आणि " नक्षत्राद्वा " (८।३।१००). काशिका व सिद्धान्तकौमुदी यांमध्यें परंपरागत वैदिक पाठाप्रमाणेंच ३९८३ सूत्रें दिलीं आहेत. कांहीं अगदीं थोड्या ठिकाणीं सूत्रांच्या पाठामध्यें एखाददुसरा ज्यास्ती कमी शब्द आढळून येतो. या ३९८३ सूत्रांपैकीं कांहींचा योगविभाग करून ३९९६ सूत्रें केलीं असावीं. काशिका-कारांनीं सूत्रपाठ निश्चित केला असें कांहीं वैयाकरणांचें मत आहे. पण तें बरोबर दिसत नाहीं. कारण " अध्यायन्यायोद्याव० " (३।३।१२२), " आसुयुवपि० " (३।१।१२६), " लाक्षारोचनाशकल० " (४।२।२) या तीन सूत्रांमध्यें वार्तिकांमधील कांहीं पदेंच अंतर्भूत करण्यांत आलीं आहेत. काशिकाकारांनीं जर पाठ ठरविला असता तर महाभाष्यामध्यें दिलेल्या वार्तिकांतील सर्वच पदें त्यांनीं सूत्रामध्यें घातलीं असतीं. ज्यास्त स्पष्टीकरणाकरितां वरील तीन सूत्रांवरील काशिकाव्याख्या व पदमञ्जरी टीका पहा.

२. या बाबतींत डॉ. बर्नेलनें ' पाणिनीची पद्धति अनैसर्गिक, कृत्रिम आणि घोटाळ्याची आहे ' ( Panini's plan is elaborate and intricate ) असा शेरा मारला आहे.

पाणिनीनें आपला अष्टाध्यायी-सूत्रपाठ रचिला. प्रचलित भाषेचें व व्याकरण ग्रंथांचें सूक्ष्म अध्ययन करून शब्दशास्त्राचा विषय जरी अत्यंत विस्तृत असला तरी सूत्रें शक्य तितकीं संक्षिप्त करून व त्यांची संख्या फारच मर्यादित करून आठ अध्यायांत लौकिक व वैदिक भाषेचें त्यानें संपूर्ण व्याकरण रचिलें याबद्दल त्याचें जितकें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे. या बाबतींत " अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सवं मन्यन्ते वैयाकरणाः " या वैयाकरणोक्तीच्या इतका दुसरा भरभक्कम पुरावा मिळणें कठीणच आहे.

## ६९ अष्टाध्यायीचे पहिले दोन अध्याय.

पाणिनीनें प्रथमतः पहिल्या अध्यायामध्यें आपलें शास्त्र समजण्याला उपयुक्त अशा संज्ञा व नियम सांगितले आहेत. होतां होईल तों त्यानें लोकांमध्यें प्रचलित व पूर्वींच्या वैयाकरणांनीं दिलेल्याच संज्ञा घेतल्या आहेत. ज्या ठिकाणीं त्या मिळाल्या नाहींत अशा थोड्याच ठिकाणीं टि, घु, भ वगैरे संज्ञा कल्पिल्या आहेत. या संज्ञा व नियम सांगण्यांत त्याचा हेतु लोकांमध्यें व वेदामध्यें प्रयोगांत आढळणाऱ्या धातु, प्रातिपदिक, अव्यय, सर्वनाम, निपात, उपसर्ग वगैरे शब्दांचे निरनिराळे प्रकार समजावून देऊन त्यांचा वाक्यामध्यें परस्परसंबंध कसा असतो त्याचा खुलासा करणें हा आहे. अत्यंत संक्षिप्त अशा आपल्या सूत्रांचा अर्थ बरोबर कळावा या हेतूनें पाणिनीनें कांहीं सामान्य नियमही घालून दिले आहेत. त्यांतील बरेचसे नियम लोकांमधील वहिवाटीला अनुसरून दिलेले असे आहेत किंवा युक्तिसिद्ध आहेत. कांहीं थोड्याच नियमांना त्यानें रचिलेल्या व्याकरणशास्त्राचे सांकेतिक नियम म्हणून म्हणावें लागेल. याप्रमाणें शब्दांचें सामान्यज्ञान व संबंध कळल्यावर दुसऱ्या अध्यायांत त्यानें पदविधि सांगितले आहेतः शब्द सामासिक असल्यास त्यांतील विभक्त शब्दांचा खुलासा केला आहे; शब्दांचा बरोबर अर्थ कळावा म्हणून विशिष्ट स्थळीं धातूंना व शब्दांना होणारे आदेशही त्यानें सांगितले आहेत; तत्पुरुष, अव्ययीभाव वगैरे समासांचें विवेचन केलें आहे व शब्दांच्या लिंग, वचन व विभक्तींचा खुलासा केला आहे. शब्दापासून जो अर्थ मनांत येतो तो सर्व अर्थ त्याच्या पोट-विभागावरून होणाऱ्या अर्थांचें संकलन करून आला पाहिजे; तसेंच, सुप् व तिङ् हे विभक्ति-प्रत्यय लाविल्याशिवाय कोणत्याही शब्दाचा प्रयोग होत नसतो; या दोन गोष्टी त्याच्या दुसऱ्या अध्यायांतील विवेचनावरून स्पष्टच होतात. भाष्यामध्येंही " अपदं न प्रयुञ्जीत " वगैरे पूर्व-वैयाकरणांचे संकेत स्पष्ट केले आहेत.

---

१. या बाबतींत " महान् हि शब्दस्य प्रयोगविषयः । सप्तद्वीपा वसुमती त्रयो लोकाश्चत्वारो वेदाः साङ्गाः सरहस्या बहुधा विभिन्ना एकशतमध्वर्युशाखाः सहस्रवर्त्मा सामवेद एकविंशतिधा बाह्वृच्यं नवधाथर्वणो वेदो वाकोवाक्यमितिहासः पुराणं वैद्यकमित्येतावाञ् शब्दस्य प्रयोगविषयः " असें भाष्यकारानीं म्हटलें आहे. ( म भा भाग १ पृ. २१ पहा. )

२. " षष्ठी स्थानेयोगा " ( पा. सू. १।१।४९ ), " स्थानेन्तरमः " ( पा. सू. १।१।५० ), " स्थानिवदादेशोनल्विधौ " ( पा. सू. १।१।५६ ), " तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य ", " तस्मादित्युत्तरस्य " ( पा. सू १।१।६६,६७ ). तसेंच " विप्रतिषेधे परं कार्यम् " ( पा. सू १।४।२ ) हीं सूत्रें पहा.

३. " उरण् रपरः " (पा. सू. १।१।५१ ), " अलोन्त्यस्य " ( पा. सू. १।१।५२ ), " ङिच्च " " आदेः परस्य " " अनेकाल्शित्सर्वस्य " ( पा. सू. १।१।५३,५४,५५ ), " येन विधिस्तदन्तस्य " ( पा. सू. १।१।७२ ) पहा.

### ७० अष्टाध्यायीचा तिसरा अध्याय.

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें स्वतंत्र पदांचें व सामासिक शब्दांतील पृथक् पदांचें विवेचन केल्यानंतर पदामधील प्रकृतिप्रत्ययात्मक पोटविभागाकडे त्यानें लक्ष दिलें आहे व त्याप्रमाणें तिसऱ्या अध्यायांत प्रत्यय सांगण्यास आरंभ करून धातूंना लागणारे प्रत्यय तिसऱ्या अध्यायामध्यें व प्रातिपदिकांना लागणारे प्रत्यय चौथ्या व पांचव्या अध्यायांमध्यें सांगितले आहेत. पाणिनीनें स्वतंत्र धातुपाठ रचून वैदिक व लौकिक प्रयोगांत आढळून येणाऱ्या सर्व धातूंचें परिगणन केलें आहे. धातुपाठांत १९४४ धातू दिले आहेत. त्यांशिवाय कांहीं सूत्रांमध्यें उच्चारलेले सांपडतात. त्यांशिवाय, धातुसाधित धातू व नामसाधित धातूही सांगून प्रत्यय लागून होणाऱ्या क्रियापदांचें, कृदन्त नामांचें व कृदन्त अव्ययांचें संपूर्ण विवेचन त्यानें तिसऱ्या अध्यायांत केलें आहे. धातूंना लागणारे प्रत्यय सांगतांना त्यानें त्यांच्या अर्थाकडे नजर ठेवून निरनिराळे काल दाखविणारे व कर्ता, कर्म, करण, अधिकरण, भाव वगैरे निरनिराळे अर्थ दाखविणारे प्रत्यय एकामागून एक असे सांगितले आहेत. या धातुसाधित शब्दांचें विवेचन करून प्रत्यय सांगतांना पाणिनीनें ज्या धातुसाधित शब्दांचा लोकांतील प्रसिद्ध अर्थ अवयवार्थाला अनुसरून असेल असेच शब्द घेऊन त्यांचा प्रकृतिप्रत्ययविभाग सांगितला आहे. उदाहरणार्थ–'कर्ता' म्हणजे करणारा, 'कर्तव्य' म्हणजे करण्याजोगें यांसारख्याच शब्दांची त्यानें व्युत्पत्ति दिली आहे; कारु म्हणजे शिल्पी, तसेंच कर्ण म्हणजे कान, कर्म म्हणजे विधि, वायु म्हणजे वारा, स्वादु म्हणजे गोड अशा शब्दांची व्युत्पत्ति त्यानें दिली नाहीं. अशा तऱ्हेच्या म्हणजे साधारणतः रूढ असे विवक्षित अर्थ असणाऱ्या अनेक शब्दांची व्युत्पत्ति उणादि सूत्रांमध्यें दिली आहे. उणादि सूत्रांचा उल्लेख पाणिनीनें "उणादयो बहुलम्" (३।३।१) या सूत्रानें केला आहे व 'बहुलम्' शब्दावरून अशा तऱ्हेची व्युत्पत्ति देऊन प्रत्येक शब्द धातूपासून साधण्याचा प्रयत्न करण्याचें कारण नाहीं व शब्द अनन्त असल्यामुळें असा प्रयत्न करणें शक्यही नाहीं असें ध्वनित केलें आहे. भाष्यकारांनीं अनेक ठिकाणीं "उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि" असें म्हटलें आहे. आणि "पाणिनेस्तु अव्युत्पन्नपक्ष एव" या वाक्यामध्यें शेखरकारांनीं तेंच स्पष्ट केलें आहे.

### ७१ अष्टाध्यायीचा चवथा व पांचवा अध्याय.

तिसऱ्या अध्यायामध्यें धातुसाधितांचा जसा विचार केला आहे त्याप्रमाणेंच चौथ्या अध्यायामध्यें प्रथमतः पुल्लिंगी शब्दांवरून स्त्रीलिंगी शब्दांची सिद्धि करून त्यानंतर पांचवा अध्याय संपेपर्यंत नामसाधित प्रातिपदिकांचा विचार केला आहे. या बाबतींतही पाणिनीची विचारसरणी वर निर्दिष्ट केल्याप्रमाणेंच आहे. ज्या ठिकाणीं नामसाधित शब्दाचा अर्थ प्रकृतिभूत शब्द व प्रत्यय यांच्या अर्थाला अनुसरून असेल अशा सामान्य नामसाधित शब्दांचेंच त्यानें विवेचन केलें आहे.

---

१. "उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि" हें वाक्य भाष्यकारांनीं अनेक ठिकाणीं घातलें आहे. (पा. सू. १।१।६१; ३।४।७७; ४।१।१; ६।१।१६२; ७।१।२; ७।२।८; ७।३।५०; ७।४।१३; ८।२।७८; ८।३।५९ पहा.) दोनच ठिकाणीं "अथाप्युणादयो व्युत्पाद्यन्ते एवमपि न दोषः" असें म्हटलें आहे. (पा सू. ३।४।७७ व ७।३।५० पहा.) त्यावरून उणादिसूत्रें पाणिनिकृत नाहींत असें भाष्यकारांचें मत होतें असें स्पष्ट दिसतें. जर उणादिसूत्रें पाणिनीचीं असतीं तर उणादि प्रातिपदिकें व्युत्पन्न आहेत असें पाणिनीचें मत असल्यामुळें भाष्यकारांनीं वादविवादाचा प्रश्नच उपस्थित केला नसता. भाष्यकारांचे वेळीं दोनही मतें प्रचलित होतीं हें मात्र खरें.

उदाहरणार्थ, दाक्षि म्हणजे दक्षाचा मुलगा, चैत्री म्हणजे चित्रायुक्त पौर्णमासी, गार्ग्य म्हणजे गर्गाचा नातू पणतू वगैरे (गोत्रापत्य),यांसारख्याच शब्दांचें त्यानें विवेचन केलें आहे व हें विवेचन करतांना प्रत्ययांचे निरनिराळे जितके म्हणून त्याला आढळले तितके सर्व अर्थ व त्या त्या अर्थी होणारे विशिष्ट शब्द यांचें त्यानें संपूर्ण परिगणन केलें आहे. हें परिगणन करतांना तोच प्रत्यय त्याच अर्थी ज्यांना लागतो असे अनेक शब्द एकत्रित करून त्यांचे गण त्यानें दिले आहेत. चौथ्या व पांचव्या अध्यायांतील सूत्रांमध्यें निर्दिष्ट केलेल्या अशा गणांची संख्या सुमारें दीडशें आहे व त्यांमध्यें सुमारें सदतीसशें शब्दांचा अंतर्भाव झाला आहे. या सर्वांना पाणिनीनें विशिष्ट अर्थी विशिष्ट प्रत्यय सांगितले आहेत. तद्धित प्रकरणामध्यें साधारणतः पांच प्रकारचे शब्द पाणिनीनें साधिले आहेत. पाणिनीनें प्रथमतः (१) व्यक्तिवाचक शब्दांहून मुलगा,नातू पणतू वगैरे (गोत्रापत्य),आणि युवापत्य या अर्थी व्यक्तिवाचक शब्द साधिले आहेत. त्यानंतर ( २ ) तें जाणणारा, तें म्हणणारा, त्यानें खेळणारा, त्यानें तरणारा, तें ज्याला दिलें जातें तो, त्याचा मालक, त्याचे ठिकाणीं झालेला इत्यादि निरनिराळ्या अर्थी वस्तुवाचक शब्दांहून साधिले जाणणारे व्यक्तिवाचक शब्द त्यानें दिले आहेत; तसेंच ( ३ ) व्यक्तिवाचक शब्दांहून त्याचा देश, त्यानें उच्चारलेला, रचिलेला ( ग्रंथ वगैरे ), त्याच्या मालकीचा इत्यादि अर्थांचे वस्तुवाचक शब्दही त्यानें साधिले आहेत व त्याचप्रमाणें ( ४ ) वस्तुवाचक शब्दांहून त्यांचा समूह, त्याचा स्वभाव इत्यादि अर्थी इतर वस्तुवाचक शब्द साधले आहेत; व शेवटीं ( ५ ) विभक्तीच्या अर्थी प्रत्यय लावून अव्ययेंही साधलीं आहेत. पाणिनीनें जरी आपल्या प्रांतांतीलच भाषेचा विचार केला असला तरी विशिष्ट प्रत्यय घेणाऱ्या निरनिराळ्या गर्गादि, शिवादि, वगैरे गणांमध्यें दिलेल्या विशिष्ट शब्दांचीच संख्या वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें तीन हजार सातशेंच्यावर गेली आहे. त्यावरून त्या वेळीं बोलल्या जाणाऱ्या भाषेंतील व उपलब्ध असलेल्या ग्रंथांतील शब्दसमृद्धीची कल्पनाच करावी लागेल. अशा रीतीनें तद्धित प्रत्यय सांगून झाल्यावर समास केला असतां सामासिक शब्दांच्या शेवटीं आढळून येणारे समासान्तही त्यानें दिले आहेत.

## ७२. अष्टाध्यायीचा सहावा व सातवा अध्याय.

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें सुबन्त व तिङन्त शब्दांच्या प्रकृतिप्रत्ययविभागांचें निरूपण करून भाषेंत आढळणाऱ्या शब्दांचें स्वरूप सांगून झाल्यावर सहाव्या अध्यायांत पाणिनीनें ज्या विशिष्ट शब्दांचें व धातूंचे बाबतींत त्यांच्या पुढें सांगितलेले प्रत्यय लाविले असतांना कांहीं विकृती दृष्टीस पडतात असे धातू अथवा प्रातिपदिकें व त्यांच्या विकृती सांगितल्या आहेत. त्यांमध्यें मुख्यतः लिट्, सन् व यङ् प्रत्यय केले असतांना धातूंचें होणारें द्विरुच्चारण, वच्, स्वप्, इत्यादि धातूंना होणारें संप्रसारण, पाद दन्त इत्यादि शब्दांना होणारे पद् दत् वगैरे आदेश, तसेंच, धातूच्या आरंभीं असलेल्या ‘ ष ’काराला ‘ स ’कार व ‘ ण ’काराला ‘ न ’कार हीं कार्यें प्रामुख्यानें येतात. त्यानंतर एकादेश, गुण, वृद्धि, पररूप, सवर्णदीर्घ, इत्यादि संधिकार्यें व प्रकृतिभाव म्हणजे संधिकार्याचा निषेध हीं सांगून झाल्यावर पाणिनीनें शब्दांच्या स्वरांचा विचार केला आहे. स्वरांचे बाबतींत त्यानें प्रत्येक पदामध्यें एकच मुख्य स्वर म्हणजे उदात्त उच्चारला जातो व बाकीचे सर्व स्वर अनुदात्त उच्चारले जातात या उच्चारणांत आढळून येणाऱ्या वैशिष्ट्याचा प्रामुख्यानें उल्लेख केला आहे. क्वचित् ठिकाणीं मूळचा म्हणजे उदात्त

व अनुदात्त मिळून झालेला स्वरित—उदात्ताच्या पुढील अनुदात्ताला झालेला स्वरित नव्हे—असा असल्यास तोच मुख्य स्वर राहून बाकीच्या सर्व स्वरांचें अनुदात्त उच्चारण होतें असें त्यानें सांगितलें आहे. समासस्वरांचें संपूर्ण विवेचन करून सामान्यतः समासाच्या शेवटचा स्वर म्हणजे उत्तरपदाच्या शेवटचा स्वर उदात्त असतो असें सांगून पूर्वपदाचा आदि केव्हां उदात्त असतो, अंत केव्हां उदात्त असतो, तसेंच उत्तरपदाचा आदिस्वर केव्हां उदात्त असतो, याबद्दलही त्यानें विवेचन केलें आहे; व त्यानंतर समासांतील पूर्वपदाला व उत्तरपदाला होणाऱ्या विकृतीही त्यानें सांगितल्या आहेत. याप्रमाणें शब्दांचें स्वरूप, परस्परसंबंध, व्युत्पत्ति व स्वर सांगून झाल्यावर 'अङ्गाधिकार' या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या सहाव्या अध्यायाच्या चवथ्या पादामध्यें व सातव्या अध्यायाच्या चारही पादांमध्यें ज्याहून प्रत्यय केला जातो ती प्रकृति म्हणजे अंग व त्या अंगापुढील प्रत्यय यांच्या विकारांचें संपूर्ण विवेचन त्यानें केलें आहे.

## ७३. अष्टाध्यायीचा आठवा अध्याय.

अशा रीतीनें सात अध्यायांमध्यें शब्दांचें स्वरूप, व्युत्पत्ति, विकृति व स्वर सांगून शब्दांचा अर्थ कसा यथायोग्य ठरविण्यांत येतो हें दाखवून दिल्यानंतर शब्दांचें द्विरुच्चारण केव्हां होतें व तें झालें असतां द्विरुच्चारणाच्या एका भागामुळें दुसऱ्या भागाला होणाऱ्या विकृती व स्वरांत होणारा बदल यांचा विचार पाणिनीनें आठव्या अध्यायाच्या पहिल्या पादामध्यें केला आहे; व एका दृष्टीनें त्याचें शब्दानुशासन शास्त्र येथें पुरें झाल्यासारखेंच आहे. 'त्रिपादी' या प्रसिद्ध नांवानें ओळखल्या जाणाऱ्या राहिलेल्या तीन पादांमध्यें प्रयोग करण्यास योग्य असे सुबन्त व तिङन्त शब्द वाक्यामध्यें जवळजवळ उच्चारले गेले असतां एका शब्दाच्या सांनिध्यामुळें दुसऱ्या शब्दाच्या उच्चारणावर होणारा परिणाम दाखविणारे कुत्व, जश्त्व, श्चुत्व, णत्व, यांसारखे वर्णविकार त्यानें सांगितले आहेत. तसेंच, शब्दांच्या अंतीं असलेल्या सकाराला विसर्ग, रेफ अथवा 'ओ'कार, तसेंच पदांमधील व्यंजनांना केव्हां केव्हां होणारें द्वित्व, किंवा संयुक्त तीन व्यंजनांमधील एका व्यंजनाचा लोप, व त्यानंतर संहितारूप वाक्य तयार झाल्यावर सर्वानुदात्तस्वरूपाचें 'प्रचय' नांवाचें स्वरोच्चारणाचें वैशिष्ट्य सांगून त्यानें आपला अष्टाध्यायीरूप ग्रंथ पुरा केला आहे. हें स्वरवैशिष्ट्य सांगणारें "नोदात्तस्वरितोदयमगार्ग्यकाश्यपगालवानाम्" सूत्रच शेवटचें मानावें व त्यामध्यें 'उदय' हा शब्द अन्त्यमंगल दाखवितो असें भाष्यकारांनीं स्पष्ट म्हटलें आहे. अष्टाध्यायी सूत्रपाठांत "अ अ इति" असें शेवटचें सूत्र "नोदात्त०" या सूत्रानंतर म्हटलें जातें; व त्याचा अर्थ "व्याकरणप्रक्रियेमध्यें अ हा स्वर सर्व ठिकाणीं विवृत असतो, पण भाषेमध्यें सर्व ठिकाणीं तो संवृतच उच्चारला जातो" असा अत्यंत सामान्य स्वरूपाचा असल्यामुळें वस्तुतः पाणिनीय व्याकरणाचें "नोदात्त०" हें शेवटचें सूत्र समजलें गेल्यास कांहीं हरकत नाहीं.

## ७४. अष्टाध्यायीच्या शेवटच्या त्रिपादीचें वैशिष्ट्य.

'त्रिपादी' या नांवानें वैयाकरणामध्यें प्रसिद्ध असलेल्या शेवटच्या तीन पादांतील कार्यें हीं प्रकृतीला प्रत्यय जोडून प्रयोगाला योग्य झालेल्या शब्दांमध्यें शब्दसमूहरूप वाक्य उच्चारतांना उच्चारणवैशिष्ट्यामुळें व ध्वनिसांनिध्यामुळें होणारे वर्ण व स्वर यांचे विकार दाखविणारीं असल्यामुळें साहाजिकच संपूर्ण शब्द तयार झाल्यानंतर तीं करणें जरूर आहे. परंतु, कोणत्याही ग्रंथकर्त्यानें उच्चारलेल्या वचनांपैकीं मागाहून उच्चारलेलें वचन हे पूर्वी उच्चारलेल्या वचनापेक्षां ज्यास्त प्रबल असतें या स्वाभाविक लोकन्यायास अनुसरून केलेल्या खुद्द पाणिनीच्याच "विप्रति-

येधे परं कार्यम् " ( पा. सू. १।४।२ ) या नियमास अनुसरून त्रिपादींतील कार्यें ही सव्वा-सात अध्यायांमध्यें सांगितलेल्या कार्यापेक्षां पूर्वी होतील ही अडचण टाळण्याकरितां या शेव-टच्या तीन पादांच्या आरंभीं " पूर्वत्रासिद्धम् " ( ८।२।१ ) असा निर्बंध घालून या तीन पादांमधील कार्यें पूर्वीच्या कार्यांच्या दृष्टीसच पडत नाहींत अशी फारच सुंदर युक्ति लढवून हीं कार्यें सर्वांत शेवटीं करण्याची व्यवस्था त्यानें करून दिली आहे.

## ७५. पाणिनीच्या व्याकरणांतील संज्ञांचे पांच प्रकार.

पाणिनीनें सांगितलेल्या संज्ञांचें सूक्ष्म रीतीनें अवलोकन केल्यास त्यांचे एकंदर पांच प्रकार सांगतां येतील. (१) प्रथम, मध्यम व उत्तम या पुरुषवाचक संज्ञा; वर्तमान, भूत व भविष्यत् या कालवाचक संज्ञा; पुंस्, स्त्री व नपुंसक या लिङ्गवाचक संज्ञा; एकवचन, द्विवचन व बहुवचन या वचनवाचक संज्ञा; व त्याप्रमाणेंच प्रथमा, द्वितीया, तृतीया इत्यादि विभक्तिवाचक संज्ञा मिळून एकंदर एकोणीस संज्ञा त्यानें पूर्वी लोकांमध्यें व वैयाकरणांमध्यें प्रसिद्ध असलेल्याच घेतल्या आहेत; व त्यांच्या व्याख्या न देतां त्यांचा उपयोग केला आहे. (२) धातु[1], उपसर्ग[2], निपात[3], गति[4], अव्यय[5], सर्वनाम[6] व संख्या[7] या शब्दांचे प्रकार सांगणाऱ्या संज्ञा; समास[8], तत्पुरुष, कर्मधारय,

---

१. धातूंचें परिगणन " भूवादयो धातवः " ( पा. सू. १।३।१ ) येथें केलें आहे. त्याशिवाय " गुप्तिज्किद्भ्यः सन् " ( पा. सू. ३।१।५ ) या सूत्रापासून "सनाद्यन्ता धातवः" ( पा. सू. ३।१।३२ ) या सूत्रापर्यंत धातुसाधित व नामसाधित धातूंचें परिगणनही केलें आहे.

२. " कुगतिप्रादयः " या सूत्रांत प्रादि गण सांगून उपसर्गांचें परिगणन केलें आहे. अर्थात् हे प्र, परा इत्यादि शब्द क्रियायोग असतांनाच उपसर्ग म्हणून समजले जातात हें " उपसर्गाः क्रियायोगे " ( पा. सू. १।४।५८ ) या सूत्रांत स्पष्ट केलें आहे.

३. " प्राग्रीश्वरान्निपाताः " ( पा. सू. १।४।५६ ) पासून " अधिरीश्वरे " ( पा. सू. १।४।९७ ) पर्यंत निपातांचें परिगणन केलें आहे.

४. " गतिश्च " ( पा. सू. १।४।६० ) पासून " जीविकोपनिषदावौपम्ये ' ( पा. सू. १।४।७९ ) पर्यंत गतिसंज्ञक शब्दांचें परिगणन केलें आहे.

५. "स्वरादिनिपातमव्ययम्" (पा. सू. १।१।३७) पासून " अव्ययीभावश्च " (पा. सू १।`।४१) या सूत्रापर्यंत अव्ययांचें परिगणन केलें आहे.

६, " सर्वादीनि सर्वनामानि " (पा. सू. १।१।२७) या सूत्रापासून "अन्तरं बहिर्योगोपसंव्यानयोः" ( पा. सू. १।१।३६ ) या सूत्रापर्यंत सर्वनामांचें परिगणन केलें आहे.

७. " बहुगणवतुडति संख्या " ( पा. सू. १।१।२३ ) यामध्यें संख्यावाचक शब्द सांगितले आहेत व त्यांशिवाय लोकांतील सर्व संख्यावाचक शब्दांनाही संख्या ही संज्ञा दिली आहे.

८. समासांचें परिगणन "प्राक्कडारात्समासः" (पा. सू. २।१।३) यांत सांगितल्याप्रमाणें पा. सू. २।१।३ पासून २।२।३८ पर्यंत केलें आहे. त्यांपैकीं पा. सू. २।१।५ पासून २।१।२१ पर्यंत अव्ययीभाव समास; पा. सू. २।१।२२ पासून पा. सू. २।२।२२ पर्यंत तत्पुरुषसमास, पा. सू. २।२।२३ पासून २।२।२८ पर्यंत बहुव्रीहि समास व २।२।२९ मध्यें द्वन्द्व समास दिले आहेत. द्विगु हा तत्पुरुष समासाचाच एक प्रकार म्हणून " द्विगुश्च " (पा. सू २।१।२३) या सूत्रामध्यें सांगितला आहे व त्याची व्याख्या ' संख्यापूर्वो द्विगुः ' ( पा. सू २।१।५२ ) या सूत्रांत दिली आहे.

द्विगु, अव्ययीभाव, द्वन्द्व, बहुव्रीहि, एकशेष या समासनिदर्शक संज्ञा; व त्याप्रमाणेंच प्रत्यय, कारक, व प्रगृह्य या सामान्य संज्ञा; मिळून एकंदर अठरा संज्ञाही त्यानें लोकांमध्यें व वैयाकरणांमध्यें प्रसिद्ध असलेल्याच घेतल्या व त्यांच्याही त्यानें व्याख्या दिल्या नाहींत; परंतु या संज्ञा ज्यांना लागू पडतात त्या शब्दांचें त्यानें आपल्या सूत्रांमध्यें परिगणन केलें आहे. (३) ह्रस्व, दीर्घ, प्लुत, लघु, गुरु, उदात्त, अनुदात्त, स्वरित, गुण, वृद्धि, अनुनासिक, संयोग व सवर्ण या वर्णांना लागू पडणाऱ्या संज्ञा; गोत्र व युवन् या शब्दांच्या अर्थांना लागू पडणाऱ्या संज्ञा; तशाच अपादान, संप्रदान, करण, अधिकरण, कर्ता व कर्म या विभक्तींच्या अर्थांना लागू पडणाऱ्या संज्ञा; आणि त्याप्रमाणेंच संहिता, अवसान, लोप व उपसर्जन या शब्दसंबंधांना लागू पडणाऱ्या संज्ञा; मिळून पंचवीस संज्ञा त्यानें पूर्वींच्या वैयाकरणांकडून घेतल्या, परंतु त्याला विवक्षित असलेल्याच नियन्त्रित अर्थीं त्या संज्ञा घेतल्या जाव्या म्हणून त्यानें त्यांच्या व्याख्या दिल्या आहेत. (४) कृत्, कृत्य, निष्ठा, तद्धित, तद्राज, सार्वधातुक, आर्धधातुक, परस्मैपद, आत्मनेपद, विभक्ति, संबुद्धि, सर्वनामस्थान व अपृक्त या प्रत्ययांना लागू पडणाऱ्या संज्ञा; सुप्, अच्, तिङ्, हल् या प्रत्याहाररूप संज्ञा; लुक्, श्लु, लुप्, इत् या वर्णलोपनिदर्शक संज्ञा; आम्रेडित, उपधा, अभ्यास व अभ्यस्त या शब्दाच्या भागाला लागणाऱ्या संज्ञा; व त्याप्रमाणेंच प्रातिपदिक, अङ्ग, वृद्ध, नदी, षट्, आमन्त्रित, उपपद व पद या विशिष्ट शब्दस्वरूपांना लागू पडणाऱ्या संज्ञा; सर्व मिळून एकंदर तेहेतीस शास्त्रीय संज्ञा प्रतिपाद्य अर्थाच्या धोरणानें त्यानें आपल्या शास्त्राला उपयोगी पडण्याकरितां तयार केल्या आहेत व त्यांच्या त्यानें व्याख्या दिल्या आहेत; यांपैकीं कांहीं संज्ञा पूर्वींच्या वैयाकरणांकडून त्यानें घेतल्या आहेत. पदसंज्ञेविषयीं भाष्यकारांनीं "पदमितीयं भगवतः कृत्रिमा संज्ञा" असे प्रत्यक्ष उद्गारच काढले आहेत.[१] (५) यांशिवाय टि, घु, घि, घ, आणि भ, या पांच संज्ञा त्यानें लाघवाकरितां स्वकल्पनेनेंच तयार करून दिल्या आहेत. पूर्वींच्या वैयाकरणांच्या त्या संज्ञा होत्या असें कांहींचें मत आहे. विवक्षित शब्दांचें शेवटचें अथवा पहिलें अक्षर घेऊन त्यानें त्या घडविल्या असाव्या असेंही कांहीं विद्वानांचें मत आहे.

## ७६. पूर्ववैयाकरणांच्या संज्ञांमध्यें पाणिनीनें केलेला फरक.

या शंभर संज्ञांशिवाय उपदेशांपैकीं म्हणजे महेश्वराच्या व स्वतःच्या सूत्रांपैकीं एक अक्षर घेऊन त्याला इत् म्हणून सांगितलेला शेवटचा वर्ण जोडून त्यानें लाघवाकरितां कांहीं संज्ञांच्यासारखे शब्द तयार केले आहेत. " आदिरन्त्येन सहेता " ( १।१।७१ ) असें सूत्र त्याकरितां सांगून 'उपदेशांतील आरंभींचा वर्ण व इत्संज्ञक शेवटचा वर्ण मिळून झालेला शब्द हा आरंभींच्या व मध्यें असलेल्या सर्व शब्दांचा वाचक होतो' अशा प्रकारची थोडक्यांत पुष्कळ प्रतिपादन करण्याची कुशल कल्पना त्यानें काढली आहे; व अशा तऱ्हेचे अच् (स्वर) व हल् (व्यंजनें) यांशिवाय अण्, अक् वगैरे चाळीस मिळून बेचाळीस लाघवसाधक शब्द त्यानें वापरले आहेत. या शब्दांना 'प्रत्याहार'[२] असें नांव वैयाकरण देतात. नाम व आख्यात या पूर्व वैयाकरणांच्या

---

१ "सुट् कात्पूर्वः" ( पा. सू. ६।१।१३५ ) यावरील भाष्य ( भाग ५ पृष्ठ १८७ पहा )

२. व्याकरणशास्त्रांत उपयोगी पडणाऱ्या बेचाळीस प्रत्याहारांच्या गणनेकरितां पुढील संग्रहकारिका देण्यांत येतात.

" एकस्मात् ङञणवटा, द्वाभ्यां षः, त्रिभ्य एव कणमाः स्युः ।
ज्ञेयौ चयौ चतुर्भ्यः, रः पञ्चभ्यः, शलौ षड्भ्यः ॥ "

संज्ञांच्या ऐवजीं पाणिनीनें प्रातिपदिक व धातु अशा संज्ञा दिल्या आहेत. प्रकृतिप्रत्ययात्मक विभाग निश्चित करणें हें पाणिनीच्या व्याकरणाचें वैशिष्ट्य असल्यामुळें नाम म्हणजे प्रयोग केले जाणारे सत्त्वप्रधान देवः, गृहम् वगैरे जे शब्द त्यांच्या 'देव', 'गृह' या रूपाच्या प्रकृतीच्या विभागाला 'प्रातिपदिक' ही पाणिनीनें अन्वर्थ संज्ञा दिली आहे; व प्रत्यय निराळा दाखवून प्रत्ययासहित प्रातिपदिकाला त्यानें 'सुबन्त' असें नांव दिलें आहे. आख्यात ही संज्ञा तिङ्प्रत्ययान्त क्रियापदाला पूर्व वैयाकरणांनीं दिली होती. त्यापैकीं प्रत्यय निराळा काढून राहिलेल्या शब्दस्वरूपाला पाणिनीनें धातु ही संज्ञा दिली. 'स्वर' या शब्दाचे अ, आ वगैरे वर्ण त्याचप्रमाणें उदात्त, अनुदात्त वगैरे धर्म असे दोन अर्थ असल्यामुळें कोणता अर्थ कोठें अभिप्रेत आहे याविषयीं घोटाळा होऊं नये म्हणून त्यानें अ, इ, वगैरे वर्णांना 'अच्' व व्यंजनांना 'हल्' या संज्ञा देऊन स्वर व व्यंजन या संज्ञा टाळल्या आहेत. उदात्त, अनुदात्त अशा प्रकारचे धर्म या अर्थीं 'स्वर' शब्द त्यानें वापरला आहे. यांशिवाय पूर्व वैयाकरणांच्या उपग्रह या संज्ञेऐवजीं त्यानें परस्मैपद व आत्मनेपद या संज्ञा, संक्रम व निवृत्तिस्थान या संज्ञांबद्दल क्ङित् म्हणजे कित् अथवा ङित् या संज्ञा, व प्रग्रह या संज्ञेबद्दल प्रगृह्य अशा संज्ञा वापरल्या आहेत. 'इत्' यालाच 'अनुबन्ध' हें दुसरें नांव वार्तिककारांनीं व भाष्यकारांनीं दिलें आहे.

### ७७. पाणिनीचीं परिभाषासूत्रें.

या संज्ञांशिवाय आपल्या अष्टाध्यायीच्या पहिल्या पादामध्यें पाणिनीनें आपण रचिलेल्या सूत्रांचा अर्थ स्पष्ट व निःसंदिग्ध कळावा म्हणून अर्थ करण्याचे कामीं उपयुक्त असे कांहीं नियमही घालून दिले आहेत. या नियमांसारखेच दुसरे अनेक नियम अथवा संकेत वार्तिककारांनीं दिले आहेत व इतर कांहीं भाष्यकारांनीं लोकव्यवहारावरून व पाणिनीच्या सूत्रांतील शब्दांवरून अनुमानानें काढले आहेत व त्यांना परिभाषा हें नांव दिलें आहे. म्हणून पाणिनीच्याही नियमांना परिभाषा म्हणतां येईल. या पाणिनीच्या परिभाषारूप सूत्रांपैकीं "स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा" (१।१।६८) "स्वरितेनाधिकारः" (१।३।११) व "षष्ठी स्थानेयोगा" (१।१।४९) ही सूत्रें त्यानें स्वतःच्या शास्त्राला संकेतरूप नियम म्हणून केलीं आहेत. "यथासंख्यमनुदेशः समानाम्" (१।३।१०) आद्यन्तवदेकस्मिन्" (१।१।२१), "स्थानेन्तरतमः" (१।१।५०), "स्थानिवदादेशोनल्विधौ" (१।१।५६) हीं सूत्रें म्हणजे लोकव्यवहारास अनुसरून केलेलेच एका प्रकारचे न्याय आहेत. त्याप्रमाणेंच "अलोन्त्यस्य" (१।१।५२), "अनेकाल्शित्सर्वस्य" (१।१।५५) "येन विधिस्तदन्तस्य" (१।१।७२) "आदेः परस्य" (१।१।५४), तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य" व "तस्मादित्युत्तरस्य" (१।१।६६ ६७) हीं सूत्रें अर्थस्पष्टीकरणाला मदत म्हणून केलेलीं आहेत.

### ७८. अक्षरांचे व शब्दांचे प्रकार.

याप्रमाणें स्वतःच्या शास्त्रांतील मुख्य मुख्य संज्ञा व परिभाषा पहिल्या पादामध्यें देऊन पाणिनीनें वर्णांचे व शब्दांचे प्रकार सांगितले आहेत व त्यांचा तपशीलवार विचार पुढील

---

"रयादेको ङञगबटैः, पेण द्वौ, त्रय इह कणाभ्याम् ।
चत्वारश्च चमाभ्यां, पञ्च यराभ्यां, शलाभ्यां षट् ॥"

पहिल्या कारिकेंतील एकेचाळीस व दुसऱ्या कारिकेंतील त्रेचाळीस प्रत्याहारांशिवाय र ( र्+अ ) हा प्रत्याहार र व ल या वर्णांच्या संग्रहाकरितां "उरण् रपरः" ( पा. सू. १।१।५१ ) या सूत्रांत घेतला आहे.

तीन पादांमध्यें केला आहे. कित् व ङित् प्रत्यय पुढें असतांना 'इक्' स्वराला गुण व वृद्धि होत नाहींत असें पहिल्या पादामध्यें आरंभींच सांगितलें असल्यामुळें कित् व ङित् प्रत्ययांचें परिगणन करणें जरूर पडलें म्हणून म्हणा, किंवा पूर्ववैयाकरणांनीं कित् व ङित् या शब्दांनीं उल्लेख केले जाणाऱ्या प्रत्ययांना संक्रम व निवृत्तिस्थान या संज्ञा दिल्या होत्या त्यांचें स्पष्टीकरण करण्याकरितां म्हणा, दुसऱ्या पादाचे आरंभीं पाणिनीनें कित् व ङित् प्रत्ययांचें विवेचन केलें आहे. त्यानंतर स्वरांचा विचार करतांना संप्रसारण हा स्वरांचाच एक प्रकार या दृष्टीनें संप्रसारणाचा विचार केला आहे व तें कोठें कोठें होतें तें सांगितलें आहे. संप्रसारणाला प्रसारण ही पूर्व वैयाकरणांची संज्ञा होती. त्यानंतर अ, इ, उ, इत्यादि स्वरांचे ह्रस्व, अर्धह्रस्व, दीर्घ व प्लुत हे भेद सांगून एकश्रुति, अनुदात्त, उदात्त, स्वरित, स्वरितस्थोदात्त, सन्नतर व उच्चैस्तर असे स्वरांचे सात प्रकार त्यानें सांगितले आहेत. हे सात प्रकार हल्लींच्या सा, रे, ग, म, प, ध, नि या सात स्वरांच्या मुळाशीं असावे. याप्रमाणें स्वर आणि व्यंजनें यांच्या निरनिराळ्या प्रकारांचें विवेचन झाल्यावर शब्दांची प्रकृतिप्रत्ययविभागात्मक जी मुख्य फोड तिजकडे लक्ष देऊन ज्या मूळ शब्दस्वरूपांना प्रत्यय जोडले जातात असे शब्दांचे धातु व प्रातिपदिक हे जे दोन मुख्य प्रकार त्यांचें विवेचन केलें आहे. प्रतिपदं गृह्णाति तत् प्रातिपदिकम् ( पा. सू. ४।४।३९ ) अशी प्रातिपदिक या शब्दाची व्युत्पत्ति देऊन प्रत्येक पदाच्या मुळाशीं असलेलें शब्दस्वरूप असा 'प्रातिपदिक' या शब्दाचा अर्थ देतां येणें शक्य आहे. अर्थात् या शब्दस्वरूपामधून क्रियाप्रतिपादक शब्दस्वरूप निराळें करून त्याला 'धातु'[1] ( अत्यंत मूलस्वरूप ) असें नांव दिलें आहे. अव्युत्पन्न नामें, धातुसाधित नामें (कृदन्त), नामसाधित नामें ( तद्धित ), सर्वनामें, अव्ययें, उपसर्ग व निपात या सर्वांचा द्रव्य हाच प्रतिपाद्य अर्थ असल्यामुळें त्यांचा प्रातिपदिकांतच पाणिनीनें अंतर्भाव केला आहे. फक्त, अव्यय, उपसर्ग व निपात यांना लागलेल्या विभक्ति-प्रत्ययाचा लोप होतो हें वैशिष्ट्य[2] त्यानें सांगितलें आहे.

### ७९. एकशेष–कल्पना.

सर्व अवयवांचा मिळून जो अर्थ होतो तोच शब्दाचा अर्थ असला पाहिजे असा पाणिनीचा संकेत असल्यामुळें द्विवचनान्त व बहुवचनान्त शब्दांचे बाबतींत द्वित्वाचें व बहुत्वाचें समर्थन करण्याकरितां पाणिनीला एकशेषाची कल्पना करावी लागली, व त्यानें 'देवौ' हा द्विवचनान्त शब्द देवश्च देवश्च अशा दोन देव शब्दांचा मिळून झाला आहे; तसाच 'देवाः' हा बहुवचनान्त शब्द देवश्च देवश्च देवश्च...अशा अनेक 'देव' शब्दांचा मिळून झाला आहे असें सांगून "एकाच स्वरूपाचे अनेक शब्द एकापुढें एक समूह या अर्थानें एकाच विभक्तींत आले असतां त्यांपैकीं एकच शब्द शिल्लक राहतो" असा नियम[3] घालून दिला आहे. वार्तिककारांनीं अगदीं एकाच अर्थाचे पण निराळ्या शब्दस्वरूपाचे असल्यास, तसेंच निराळ्या

---

१. 'धातु' हा शब्द प्राचीन काळीं कोणत्याही वस्तूचें मूलस्वरूप ( element ) या अर्था वापरण्यांत होता. पृथ्वीधातु, अब्धातु, तेजोधातु व वायुधातु हे चार धातू म्हणून उल्लेख जुन्या बौद्ध वाङ्मयांत मिळतात.

२. "अव्ययादाप्सुपः" ( पा. सू. २।४।८२ ) पहा.

३. "सरूपाणामेकशेष एकविभक्तौ" ( पा. सू. १।२।६४ ) पहा.

अर्थांचे असून अगदीं एकाच शब्दस्वरूपाचे असल्यास देखील त्यांतील एकच शब्द शिल्लक ठेवावा अशी या नियमाला जोड दिली आहे. पुल्लिंग व स्त्रीलिंग एवढाच फरक असलेल्या एकार्थ-वाचक शब्दांपैकींही एक (पुल्लिंगी) शब्दच राहतो[२] व पितृ आणि मातृ, भ्रातृ आणि स्वसृ, पुत्र आणि दुहितृ, श्वशुर आणि श्वश्रू अशा शब्दांपैकींही एकच शब्द राहतो[३] व त्याप्रमाणेंच तत्, यत् वगैरे दोन सर्वनामें समूह या अर्थानें एकापुढें एक आलीं असतां त्यांपैकीं एकच सर्वनाम राहतें[४] असेंही पाणिनीनें सांगितलें आहे. दोन किंवा अनेक शब्दांपैकीं एकच शब्द शिल्लक राहणें या भाषा-वैशिष्ट्याला पाणिनीनें आपल्या सूत्रांत घातलेल्या 'एकशेष' या शब्दावरून 'एकशेष' हेंच नांव देण्यांत आलें. हें एकशेष-प्रकरण पूर्वीं व्याकरणांत नव्हतें व पाणिनीनेंच तें आपल्या व्याकरणांत प्रथम घातलें असा कांहीं वैयाकरणांचा समज आहे. त्याचे पुढेंही जाऊन इतर कांहीं वैयाकरण, पाणिनीनंतर कोणींतरी वैयाकरणानें हें प्रकरण पाणिनीच्या सूत्रपाठांत प्रक्षिप्त केलें असें म्हणतात; व 'दैव' वगैरे व्याकरणांमध्यें तें आढळून येत नाहीं हें कारण आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ देतात.

## ८०. वचनविचार.

एकवचन, द्विवचन व बहुवचन अशीं तीन वचनें संस्कृत भाषेंतच आढळतात. शब्द उच्चारून एकमेकांशीं बोलण्याचा व्यवहार सुरू झाला त्या वेळीं बोलणारा हा स्वतःविषयीं अहं असा एकवचनी प्रयोग करूं लागला व ऐकणाऱ्याविषयीं त्वं असा प्रयोग करूं लागला. साधारणपणें बोलणारा व ऐकणारा मिळून दोघे ही कल्पना व्यक्त करण्याकरितां द्विवचनाचा उल्लेख चालूं झाला व या दोघांमध्यें तिऱ्हाइत माणसाचा अन्तर्भाव केल्यानंतर बहुत्वकल्पना प्रचारांत आली. "अस्मदो द्वयोश्च" या सूत्रावरून असें दिसून येतें कीं कांहीं वेळां बोल-णारा हा स्वतःबद्दलसुद्धां बहुवचनी प्रयोग करूं लागला. त्याप्रमाणेंच पुष्कळ वेळां श्रोत्याचे बाबतींतही बहुमानार्थी बहुवचनाचा प्रयोग होऊं लागला. त्यामुळें द्विवचनाचे प्रयोग कमी कमी होत गेले व अखेर द्विवचन लुप्तच झालें. प्राकृत भाषांमध्यें व त्यांपासून झालेल्या देशी भाषांमध्यें एकवचन व बहुवचन अशीं दोनच वचनें आढळून येतात.

## ८१. लिङ्गविचार.

वचनप्रत्ययांप्रमाणें लिंगप्रत्ययही शब्दाच्या प्रतिपाद्य अर्थाचें स्वरूप दाखविण्याकरितां उपयोगीं पडतात. संख्यावाचक शब्द सोडल्यास बाकीच्या कोणत्याही प्रातिपदिकापासून वच-नाचा बोध वचनवाचक प्रत्यय लाविल्याशिवाय होत नसल्यामुळें ज्याप्रमाणें वचन हा अर्थ प्रत्ययाचा आहे असें मानतां येतें त्याप्रमाणें लिंगाचे बाबतींत म्हणतां येत नाहीं. जरी 'देवान् ज्ञानानि, रुच्या इत्यादि ठिकाणीं सुप् प्रत्ययानें व देवी, रमा इत्यादि ठिकाणी ई (ङीप् ङीष् व ङीन्) व आ (टाप् डाप् व चाप्) या स्त्रीत्व अर्थीं सांगितलेल्या प्रत्ययांनीं स्त्रीलिंगाचा बोध

१. "नानार्थानामपि सरूपाणाम्" व "एकार्थानामपि विरूपाणाम्" (पा. सू. १।२।६४ वरील वार्तिकें २२ व २३) पहा.

२. "पुमान् स्त्रिया" (पा. सू. १।२।६७) पहा.

३. पाणिनिसूत्रें (१।२।६८, ७०, ७१) पहा.

४. "त्यदादीनि सर्वैर्नित्यम्" (पा. सू. १।२।७२) पहा.

होत असला तरी लिङ्ग हें प्रातिपदिकाच्या प्रतिपाद्य अर्थावर अवलंबून असल्यामुळें तें प्रथम मनांत येतें व वचन हें वक्त्याच्या विवक्षेवर अवलंबून असल्यामुळें नंतर मनांत येतें. याप्रमाणें प्रतिपाद्य अर्थाला अनुरूप अशीं जरी लिङ्ग व वचन हीं दोन्ही असलीं तरी कांहीं ठिकाणीं लोकव्यवहारामध्यें कांहीं अपवाद दृष्टीस पडतात ते पाणिनीनें "अस्मदो द्वयोश्च" वगैरे सूत्रांनीं सांगितले आहेत. स्त्रीचिन्ह, पुरुषचिन्ह किंवा दोहींचा अभाव यांवर वस्तुतः लिंग अवलंबून असतें. म्हणून ज्या अचेतन वस्तूंचे ठिकाणीं स्त्रीचिन्ह व पुरुषचिन्ह हीं दोन्ही दिसत नाहींत तेथें नपुंसकलिंगींच शब्दप्रयोग व्हावा व त्याप्रमाणें हल्लीं कांहीं भाषांमध्यें होतो हें जरी खरें असलें तरी संस्कृत भाषेमध्यें अचेतनवस्तु-वाचक अनेक शब्दांचे स्त्रीलिंगी व पुंल्लिंगी प्रयोग दृष्टीस पडतात. याला कारण काय असावें याचा विचार करून पाहिल्यास साधारणपणें आकारानें मोठेपणा, जोरदारपणा, तेज वगैरे पुरुषांमध्यें आढळून येणारे धर्म वस्तूमध्यें प्रामुख्यानें आढळून येत असल्यास तेथें पुल्लिंगकल्पना; तशीच याउलट लहान आकार कोमलपणा, संकोच वगैरे धर्म आढळून आल्यास तेथें स्त्रीलिंगकल्पना व्यवहारांत आली. यूकाः, लिक्षाः, पिपीलिकाः वगैरे शब्दांचे फक्त स्त्रीलिंगीच प्रयोग, त्याप्रमाणें पतङ्गाः, भृङ्गाः वगैरे शब्दांचे पुल्लिंगीच प्रयोग दृष्टीस पडतात यावरून वरील गोष्ट सिद्ध होते. प्राचीन काळीं अचेतन वस्तूंच्या बद्दलही केव्हां केव्हां आलंकारिक भाषेंत पतिपत्नीवाचक कल्पना केल्या गेल्या; त्यावरूनही पुल्लिंगाचें व स्त्रीलिंगाचें नियमन झालेलें कांहीं ठिकाणीं दृष्टीस पडतें. उदाहरणार्थ, रात्रि ही दिवसाची बायको किंवा नद्या ह्या समुद्राच्या बायका या कल्पनेमुळें रात्रिवाचक व नदीवाचक शब्द सर्व स्त्रीलिंगी आढळून येतात. या बाबतींत ज्यास्त विवेचन भाष्यकारांनीं स्त्रीप्रत्यय सांगण्यापूर्वी "स्त्रियाम्" (पा. सू. ४।१।३; म. भा. भाग ४ पृ. १६–२१ ) या सूत्राचें विवेचन करतांना केलें आहे. वचनाचे बाबतींतही अक्षताः वगैरे कांहीं शब्दांचे केवळ बहुवचनी प्रयोग दृष्टीस पडतात. त्याला कारण त्यांचें बहुत्वच नेहमीं प्रत्ययास येतें हेंच आहे. अप्सरसः व दाराः येथें व्यक्ति एक असतांनासुद्धां बहुमान दाखविण्या-करितां बहुवचनी प्रयोग करण्याचा प्रघात पडला असावा.

## ८२. पदांच्या अर्थाचें सामान्य विवेचन.

प्रातिपदिकांचा सामान्य रीतीनें अर्थ मनांत आल्यावर धातूंचा अर्थ समजावा या दृष्टीनें धातुपाठामध्यें उभयपदी म्हणून दिलेल्या धातूंना कोणत्या अर्थी परस्मैपद–प्रत्यय व कोणत्या अर्थी आत्मनेपद–प्रत्यय लागतात, तें पाणिनीनें सांगितलें आहे. तसेंच, विशिष्ट अर्थीं किंवा विशिष्ट उपसर्ग जोडल्यावर ज्या धातूंच्या पुढें विशिष्ट पदाचेच प्रत्यय दृष्टीस पडतात अशा धातूंचें परिगणन केलें आहे. जरी व्यवहारांत असलेल्या सर्व धातूंची गणना करणें कठिण असलें तरी प्रातिपदिकांच्या गणनेप्रमाणें ती अशक्य कोटींतली नसल्यामुळें पाणिनीनें लोका-मध्यें व वेदामध्यें दृष्टीस पडणाऱ्या सर्व धातूंचें भ्वादि, अदादि इत्यादि दहा गणांमध्यें परिगणन केलें आहे. या दहा गणांना धातुपाठ अशी संज्ञा आहे व त्यांमध्यें अर्थासह एकंदर १९४४ धातू दिले आहेत. धातूंच्या पदविचारानंतर पाणिनीनें प्रातिपदिकांना लावण्यांत येणाऱ्या नदी

१. लिङ्गकल्पनेचा संबन्ध सत्त्व, रजस् व तमस् या गुणांशींही भर्तृहरीनें जोडलेला आहे; सत्त्व-प्रधान म्हणजे स्थैर्य ज्यांचा स्वभाव आहे असे शब्द नपुंसकलिंगी, रजःप्रधान म्हणजे प्रवृत्ति हा ज्यांचा स्वभाव आहे असे शब्द पुल्लिंगी, त्याप्रमाणेंच तमःप्रधान शब्द स्त्रीलिंगी असतात असें भर्तृहरीचें म्हणणें आहे.

२. याविषयीं पाणिनिसूत्रें ( १।३।१२ ते १।३।९३ ) पहा.

धि, अंग, पद, भ, इत्यादि संज्ञाचे अर्थ स्पष्ट केले आहेत; तसेंच, प्रत्ययांना लागणाऱ्या एकवचन, द्विवचन व बहुवचन या संज्ञांचें व प्रथमपुरुष, मध्यमपुरुष व उत्तमपुरुष या संज्ञांचेंही स्पष्टीकरण केलें आहे. प्रातिपदिकांचे व प्रत्ययांचे अर्थ वेगवेगळे कळावे म्हणून ज्या अर्थामुळें प्रातिपदिकाचा क्रियेशीं अथवा दुसऱ्या प्रातिपदिकाशीं संबंध दृष्टीस पडतो त्या अपादान, संप्रदान वगैरे अर्थांचें त्यानें विवेचन केलें आहे. प्रातिपदिकांचे अर्थ हे लोकव्यवहारावरूनच समजले जातात. साधारणतः प्रातिपदिकाचा अर्थ सत्व म्हणजे द्रव्य हा घट, पट, देवदत्त इत्यादि पदार्थांमध्यें प्रत्यक्षतः, व ब्राह्मण, शूद्र, शुक्ल, कृष्ण, याजक, पूजक इत्यादि शब्दांमध्यें ती ती विशिष्ट जाति, गुण अथवा क्रिया धारण करण्यामुळें परंपरेनें असला, तरी ज्या 'च', 'अथ', 'ततः' इत्यादि अव्ययांचे बाबतींत तो साक्षात् अथवा परंपरेनेंही दृष्टीस पडत नाहीं असा एक प्रातिपदिकांचा वर्ग पाणिनीनें दाखविला आहे व त्यामध्यें उपसर्ग, निपात, गति व कर्मप्रवचनीय यांची त्यानें गणना केली आहे. अव्ययांचा ज्या शब्दांशीं संबद्ध म्हणून प्रयोग केला जातो त्या शब्दांच्या अर्थांचा कांहीं विशिष्ट संबंध त्या अव्ययामुळें मनांत येतो व संबद्ध द्रव्यांचें ज्ञान मागाहून होतें. अव्ययांपासून संबन्धज्ञान प्रत्यक्षतः होत असल्यामुळें व अर्थज्ञान हें नंतर होत असल्यामुळें अव्ययें हीं अर्थांचीं द्योतक असतात, वाचक नसतात, असें मानण्यांत आलें असावें. याप्रमाणें शब्दांचा सामान्य तऱ्हेनें अर्थ व वाक्यामध्यें त्यांचा परस्पर संबन्ध यांची कल्पना पाणिनीच्या पहिल्या अध्यायावरून उत्तम प्रकारें येऊं शकते.

## ८३. अव्ययीभाव समास.

भाषेमध्यें जीं सामासिक पदें दृष्टीस पडतात त्यांच्या अर्थांचा उलगडा होण्याकरितां पाणिनीनें दुसऱ्या अध्यायांत समासांचें निरूपण केलें आहे. त्यानें समास या शब्दाची व्याख्या न देतां फक्त समास हा अधिकार सांगून त्याच्या पुढें निरनिराळ्या समासांचें परिगणन केलें आहे. सामासिक पदाचा अर्थ जरी अवयवभूत पदांच्या अवयवासारखाच असला तरी तो समन्वित अशा विशिष्ट तऱ्हेनें मनांत येतो ही गोष्ट त्यानें "समर्थः पदविधिः" ( २।१।१ ) असा अधिकार करून समर्थ अशा शब्दांचाच समास होतो असें सांगितलें आहे त्यावरून सिद्ध होते. 'समास' या शब्दाच्या व्युत्पत्तीवरूनही हेंच सिद्ध होतें. प्रथमतः अव्ययीभाव हा अधिकार सांगून विभक्ति, समीप, समृद्धि इत्यादि अर्थीं होणाऱ्या समासांना 'अव्ययीभाव' ही संज्ञा त्यानें दिली आहे; व त्यानंतर कांहीं विशिष्ट अव्ययें देऊन त्यांचा विशिष्ट शब्दांबरोबर विशिष्ट अर्थीं अव्ययीभाव सांगितला आहे. अव्ययीभाव ही अन्वर्थ संज्ञा आहे.

---

१. "तिङस्त्रीणि त्रीणि प्रथममध्यमोत्तमाः" इत्यादि सूत्रांमध्यें (पा. सू. १।४।१०१-१०८) पाणिनीनें प्रथम पुरुष, मध्यम पुरुष व उत्तम पुरुष यांचें स्वरूप देऊन त्यांचा केव्हां प्रयोग होतो हें सांगितलें आहे. प्रचलित मराठी व्याकरणामध्यें इंग्रजी भाषेच्या व्याकरणाला अनुसरून प्रथम पुरुष, द्वितीय पुरुष व तृतीय पुरुष अशीं नांवें दिलीं आहेत व मी ( अहं ) हें उपपद असतांना क्रियापदाहून प्रथम पुरुष होतो असें म्हटलें आहे. पाणिनीनें 'तो, ती अथवा तें' असें उपपद असतां प्रथमपुरुष सांगितला आहे. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे पाणिनीचा प्रथम पुरुष म्हणजे हल्लींच्या व्याकरणांतील तृतीय पुरुष, मध्यम म्हणजे द्वितीय, व उत्तम म्हणजे प्रथम अशी व्यवस्था दृष्टीस पडते. या फरकाचें कारण म्हणजे इंग्रजी व्याकरणाचें अनुकरण हेंच दिसतें. पाणिनीच्या क्रमाच्या मुळाशीं "तत्त्वमसि" अहं ब्रह्मास्मि" हा उपनिषदांतील क्रम असावा.

२ याविषयीं मागें उपोद्घात परिच्छेद ५८ पहा.

अव्ययीभाव समासाचें त्यानें अव्ययांमध्यें परिगणन केलें आहे. अव्ययीभाव समासामध्यें पूर्व-पदाला प्राधान्य असतें, असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे.[1]

## ८४. तत्पुरुष समास.

अव्ययीभावानंतर 'तत्पुरुषः' या अधिकारामध्यें (पा.सू.२।१।२२पासून २।२।२२) तत्पुरुष समास सांगितले आहेत. तत्पुरुष ही संज्ञा पाहिली असतां 'तत्पुरुषः' यासारखे म्हणजे तस्य पुरुषः यासारखे सोडविले जाणारे जे उत्तरपदार्थप्रधान समास ते तत्पुरुष असें साधारणपणें ध्यानांत येतें. समासाचा विग्रह करतांना पहिल्या पदाची म्हणजे गौण पदाची जी विभक्ति असेल तिला अनुसरून लोकांमध्यें द्वितीयातत्पुरुष, तृतीयातत्पुरुष वगैरे नांवें प्रचलित आहेत. तत्पुरुषः या अधिकारामध्यें प्रथमतः असमानाधिकरण पदांचे विभक्तितत्पुरुष दिले आहेत; व त्यानंतर समानाधिकरण पदांचे तत्पुरुषसमास दिले आहेत. 'कर्मधारया'ची[2] व्याख्या समानाधिकरण तत्पुरुष अशी असल्यामुळें या तत्पुरुषांना कर्मधारय म्हणण्याची प्रथा पडली आहे. पहिलें पद समानाधिकरण असूनही संख्यावाचक असेल तर त्या समासाला 'द्विगु' हें नांव पाणिनीनें दिलें आहे. यानंतर पूर्वपद हें अवयव दाखविणारें असेल तेव्हां एकदेशितत्पुरुष, 'न' (नञ्) असेल तेव्हां नञ्तत्पुरुष, उपसर्ग असेल तेव्हां प्रादितत्पुरुष, उपपद असेल तेव्हां उपपदतत्पुरुष, 'णम्' शेवटीं असलेलें म्हणजे णमुलन्त असेल तेव्हां णमुल्तत्पुरुष असे निरनिराळे तत्पुरुष समासाचे प्रकार त्यानें दिले आहेत.

## ८५. बहुव्रीहि व द्वंद्व समास.

तत्पुरुष अधिकारानंतर बहुव्रीहि अधिकार सांगून समासांतील पदांच्या अर्थापेक्षां समासाचा अर्थ निराळा असल्यास त्या समासाला बहुव्रीहि समास म्हणावें अशी पाणिनीनें बहुव्रीहि समासाची व्याख्या दिली आहे. या बहुव्रीहि अधिकारामध्यें पाणिनीनें संख्यावाचक शब्दांबरोबर, सह या अव्ययाबरोबर, व दिग्वाचक शब्दाबरोबर होणारेही समास दिले आहेत; कारण याही समासांमध्यें ज्या पदांचा समास होतो त्या पदांच्या अर्थापेक्षां निराळा असा सामासिक पदाचा अर्थ असतो. शेवटीं, 'च' या अव्ययाचे समूह व समाहार हे जे अर्थ आहेत त्या अर्थीं दोन अथवा अधिक पदांच्या समासाला द्वन्द्व म्हणावें अशी व्याख्या देऊन समाहार या अर्थीं होणाऱ्या द्वन्द्वाचें त्यानें परिगणन केलें आहे. पाणिनीनें समासाचें विवेचन जरी इतक्या सूक्ष्म रीतीनें केलें असलें तरी भाषेमध्यें त्याच्या विशिष्ट सूत्रांनीं न साधले जाणारे असे कित्येक समास राहिले आहेत; कारण, जीवंत भाषेमध्यें समासांचें पूर्ण परिगणन होणें शक्य नाहीं. पाणिनीला याची जाणिव असावी व म्हणूनच त्यानें "सह सुपा" (२।१।४) असें समास सांगणारें साधारण सूत्र करून ठेवलें आहे.

## ८६. सामासिक शब्दांच्या लिङ्गवचनांविषयीं विचार.

द्वन्द्व व तत्पुरुष या समासांमध्यें समासाला उत्तरपदाच्या लिंगाचे प्रत्यय लाविले जावे

---

१. भाष्यकारांनीं "पूर्वपदार्थप्रधानोऽव्ययीभावः। उत्तरपदार्थप्रधानस्तत्पुरुषः। अन्यपदार्थप्रधानो बहुव्रीहिः। उभयपदार्थप्रधानो द्वन्द्वः" असें अनेक ठिकाणीं (पा. सू. २।१।६, २०, ४९) प्रतिपादन केलें आहे. (म. भा. भाग २ पृष्ठे २७०, २७६, २९६ पहा.)

२. 'एकार्थप्रतिपादकत्वरूपं कर्म धारयती'ति कर्मधारयः अशी कर्मधारय शब्दाची व्युत्पत्ति देतां येते. कर्मधारय समासामध्यें दोनही पदांपासून एकाच पदार्थाचा बोध होतो. याविषयीं सविस्तर विवेचन भांडारकर रिसर्च इन्स्टिट्यूट जर्नल १९५३ सालच्या अंकामध्यें लेख लिहून केलें आहे.

असा पाणिनीनें निर्बंध घालून दिला आहे. समाहार या अर्थीं द्वन्द्व असला तर समाहार या अर्थाला योग्य असे नपुंसकलिंगी प्रत्यय लागतात. अव्ययीभाव समासाला अव्यय ही संज्ञा असल्यामुळें विभक्तिप्रत्ययाचा लोप ( लुक् ) होतो; अकारान्त अव्ययीभावाला मात्र अम् प्रत्यय लागतो. बहुव्रीहि समासाचीं लिंगवचनें अन्य पदार्थाच्या लिंगवचनांप्रमाणें असतात. समासांतील पदांचा अर्थ जरी समासाच्या स्वरूपावरून साधारणतः कळत असला तरी आंतील पदांच्या विभक्ति-प्रत्ययांचे निरनिराळे अर्थ कळल्याशिवाय समासाचा बरोबर अर्थ कळणार नाहीं म्हणून द्वितीया, तृतीया वगैरे विभक्तिप्रत्यय कोणत्या अर्थीं होतात तें सांगून विशिष्ट विभक्तींचे जे प्रयोग दिसून येतात त्यांचेबद्दल पाणिनीनें नियम सांगितले आहेत; व सामान्य नियमांप्रमाणें सामासिक शब्दांचीं लिंगवचनें जेथें दृष्टीस पडत नसतील अशीं अपवाद स्थळेंही त्यानें निर्दिष्ट केलीं आहेत. त्याप्रमाणेंच ज्यांचा समास होतो, त्यांतील एका शब्दाऐवजीं दुसरा शब्द समास झाल्यावर जेथें आढळून येतो अशींही स्थळें निर्दिष्ट केलीं आहेत. तद्धितान्त शब्दाशीं समास झाल्यास जेथें तद्धित प्रत्ययाचा लोप होतो असेही शब्द दिले आहेत. शेवटीं, विशिष्ट स्थलीं सुप् प्रत्यय किंवा विकरण प्रत्यय केव्हां लुप्त होतात तें सांगून पाणिनीनें दुसरा अध्याय पुरा केला आहे. याप्रमाणें वाक्यांमधील निरनिराळ्या शब्दांचा परस्परसंबन्ध व त्यांचा योग्य अर्थ यांचें बरोबर ज्ञान पहिल्या दोन अध्यायांत झाल्यानंतर दरएक सुबन्त अथवा तिङन्त शब्दांतील प्रकृति-प्रत्ययविभाग करून प्रत्येक पदाचा योग्य अर्थ समजावा या हेतूनें पुढील अध्यायाला पाणिनीनें सुरवात केली आहे व प्रथमतः धातुसाधित धातु, कृदन्तशब्द व तिङन्तशब्द यांचेबद्दल नियम तिसऱ्या अध्यायामध्यें दिले आहेत.

## ८७. कालनिदर्शक प्रत्ययांविषयीं विचार आणि सामान्यकालनिदर्शक कृत्प्रत्यय.

धातुपाठामध्यें प्रत्येक धातूचा अर्थ देऊन पाणिनीनें एकंदर १९४४ धातू सांगितले आहेत. त्यांशिवाय इच्छा या अर्थीं सन्, प्रयोजन या अर्थीं णिच्, व पौनःपुन्य या अर्थीं यङ् हे प्रत्यय लावून धातुसाधित धातूही होतात असें त्यानें सांगितलें आहे. तसेंच इच्छा या अर्थीं क्यच्, आचार या अर्थीं क्यङ् आणि क्विप् हे प्रत्यय नामांना लावून नामधातूही होतात असें त्यानें म्हटलें आहे. कालवाचक व अर्थवाचक लकार–प्रत्यय पुढें असतांना धातूच्या पुढें विकरण प्रत्यय, तसेच लृट् प्रत्ययांच्या पूर्वी स्य, लुट् प्रत्ययांच्या पूर्वी तास्, लेट् प्रत्ययांच्या पूर्वी सिप्, लुङ् प्रत्ययाच्या पूर्वी सर्वसाधारण च्लि व त्याला विवक्षित ठिकाणीं सिच्, क्स, चङ्, अङ्, चिण् वगैरे आदेश; तसेंच कांहीं विवक्षित धातूंहून व सर्व नामधातूंहून लिट् प्रत्ययांचे पूर्वी आम् असे कालनिदर्शक प्रत्यय त्यानें सांगितले आहेत. पाणिनीनें या विकरणांना व कालनिदर्शक प्रत्ययांना अर्थ न दिल्यामुळें ते स्वार्थीं होतात असें जरी वैयाकरण मानीत असले तरी या प्रत्ययांपासून कालाचा बोध होत असल्यामुळें एका दृष्टीनें त्यांना कालाचे द्योतक म्हटल्यास चालेल. पाणिनीनें धातुसाधित नामें देण्यांतही एक प्रकारचा क्रम स्वीकारिला आहे. प्रैष, अतिसर्ग, प्राप्तकाल व अर्ह या अर्थीं प्रत्येक धातूला लागणारे व 'कृत्य' या नांवानें ओळखिले जाणारे तव्य व अनीय हे प्रत्यय त्यानें प्रथमतः दिले आहेत व त्यांशिवाय विशिष्ट धातूंना लागणारे

---

१. "परवल्लिङ्गं द्वन्द्वतत्पुरुषयोः" ( पा. सू. २।४।२६ ) पहा.

२. "नाव्ययीभावादतोऽम्त्वपञ्चम्याः" ( पा. सू. २।४।८३ ) पहा.

३. याविषयीं पाणिनिसूत्रें २।४।७१ ते २।४।८४ पहा.

यत्, क्यप् व ण्यत् प्रत्यय देऊन कर्तव्य, करणीय, कृत्य व कार्य यांसारखीं रूपें साधिलीं आहेत. त्यानंतर कर्ता या अर्थी प्रत्येक धातूला लागणारे ण्वुल् व तृच् हे सामान्य प्रत्यय देऊन विशिष्ट ठिकाणीं लागणारे अच्, क, श, ण, ष्वुन्, थकन्, ण्युट् इत्यादि प्रत्यय देऊन कारक, कर्ता, कर वगैरे शब्द साधिले आहेत. त्यानंतर कर्ता याच अर्थी, पण धातूचे पूर्वी कर्म या अर्थाचें उपपद असतांना लागणारे, अण्, क, ण, ड, टक्, ट, खश् वगैरे प्रत्यय देऊन कुम्भकार, कम्बलद, वर्महर, जनमेजय, अभ्रंलिह यांसारखे अनेक शब्द साधिले आहेत. या सर्व शब्दांमध्यें उपपदाचा प्रत्ययान्त धातूबरोबर समास होतो व त्या समासाला उपपदतत्पुरुष अथवा केवलतत्पुरुष म्हणतात.

## ८८. भूतकालवाचक प्रत्यय, वर्तमानकालवाचक प्रत्यय, भविष्यकालवाचक प्रत्यय व भावे-प्रत्यय.

पाणिनीनें कर्ता या अर्थी भूतकालवाचक सर्वसाधारण क्वसु व क्तवतु प्रत्यय तसेंच कर्म या अर्थी क्त व कानच् हे प्रत्यय सांगितले आहेत. त्यांपैकीं क्त व क्तवतु या प्रत्ययांना त्यानें निष्ठा ही संज्ञा दिली आहे. अर्थात् हे प्रत्यय परिनिष्ठित म्हणजे संपलेली क्रिया दाखवितात. हे भूतकालवाचक प्रत्यय सांगतांनाच त्यानें भूतकालवाचक परोक्ष या अर्थी लिट्, अनद्यतन भूत या अर्थी लिङ्, व सामान्यभूत या अर्थी लुङ् हे लकारप्रत्यय सांगितले आहेत. धातूला सांगितलेल्या पदाला अनुसरून या लकार प्रत्ययांना तिङ् प्रत्यय आदेश होऊन 'चकार', 'अकरोत्', 'अकार्षीत्' यांसारखीं क्रियापदें (आख्यातें) तयार होतात. भूतकाल या अर्थी 'पुरा' अथवा 'स्म' यांचा योग असतांना लट् प्रत्ययही होतात. भूतकालवाचक प्रत्यय सांगितल्यानंतर पाणिनीनें वर्तमानकालवाचक सत् या संज्ञेनें ओळखिले जाणारे शतृ व शानच् प्रत्यय व विशिष्ट अर्थी दिसून येणारे शानन् व चानश् हेही प्रत्यय सांगितले आहेत. वर्तमानकालवाचक लट् प्रत्यय सांगून करोति व कुरुते यांसारखीं रूपेंही त्यानें तयार केलीं आहेत. अर्थाचे बाबतींत साधारणपणें भूतकालवाचक प्रत्ययांसारखे व ताच्छीलिक नांवानें ओळखिले जाणारे तच्छील, तद्धर्म, व तत्साधुकारिन् या अर्थी विशिष्ट धातूंहून होणारे इष्णुच्, वुञ्, उकञ्, वगैरे अनेक प्रत्यय त्यानें सांगितले आहेत. याच अर्थी तृन्, क्विप्, व युच् हे साधारणतः सर्व धातूंहून होतात. वर्तमानकालवाचक व भूतकालवाचक प्रत्ययांनंतर पाणिनीनें भाविष्यकालवाचक प्रत्यय सांगितले आहेत. त्यांमध्यें 'कर्ता' तसेंच 'करिष्यति' यांसारखीं क्रियापदें ज्यांहून साधलीं जातात असे अनद्यतनभविष्य या अर्थी लुट् व सामान्यभविष्य या अर्थी लृट्, हे प्रत्यय सांगितले आहेत. तसेंच भविष्यकालवाचक शतृ व शानच् हेही प्रत्यय सांगितले आहेत. याच प्रसंगानें क्रियार्थक क्रिया असतांना सर्व धातूंना लागणारे तुमुन् व ण्वुल् हेही प्रत्यय सांगितले आहेत. सर्वात शेवटीं धात्वर्थ प्रतिपादन करणारे व भावे-प्रत्यय म्हणून ओळखिले जाणारे व साधारणतः सर्व धातूंहून होणारे ल्युट्, क्त, घञ्, व क्तिन्, हे प्रत्यय सांगितले आहेत. क्तिन् प्रत्ययाचे ऐवजीं स्त्रीलिंगी अ (अ+टाप्=आ) प्रत्ययही विशिष्ट धातूंहून सांगितला आहे. यांशिवाय अच्, अप्, क, क्विप्, नन्, इत्यादि अनेक प्रत्यय विशिष्ट धातूंहून सांगितले आहेत. क्विप् हाही प्रत्यय भाव या अर्थी सांगितला आहे. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे सर्व धातूंची 'परिनिष्ठित भाव' या अर्थी प्रातिपदिकांत गणना होते असें पाणिनीला सांगावयाचें आहे.

## ८९. कृदन्त शब्दांच्या लिङ्गवचनांचें विवेचन.

भूत, वर्तमान व भविष्यत् हे काल, तसेच कर्ता, कर्म, करण व अधिकरण हीं कारकें यांना दाखविणारे प्रत्यय लागून तयार होणारे कृत्-प्रत्ययान्त शब्द हे प्रत्यक्षत: अथवा अप्रत्यक्षतः द्रव्याचा बोध करून देणारे असल्यामुळें ज्या द्रव्यांना उद्देशून त्यांचा प्रयोग केलेला असतो त्या द्रव्याच्या लिंगाला व वचनाला अनुरूप असे लिंगवाचक व वचनवाचक प्रत्यय त्यांना लागतात. लकार प्रत्यय लागून क्रियावाचक क्रियापदेंच होत असल्यामुळें लिंगाचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. धातूचा अर्थ भाव म्हणजे क्रिया हिच्यापासून वास्तविक पाहतां लिंगबोध होणें शक्य नसलें तरी भाव या अर्थीं प्रत्यय लागून तयार झालेले पाक, पक्ति व पचन यांसारखे शब्द तिन्ही लिंगीं दृष्टीस पडतात. हें पाहूनच भाष्यकारांनीं "कृदभिहितो भावो द्रव्यवद् भवति" असें म्हटलें आहे.[1] पाणिनीचीं सूत्रें पाहिलीं असतां "भावे" (३।३।१८) या सूत्रांतील भाव हा शब्द, "तुमन्ण्वुलौ क्रियायां क्रियार्थायाम्" (३।३।१०) या सूत्रांतील क्रिया हा शब्द, व "कर्तरि कर्मव्यतिहारे" (१।३।१४) या सूत्रांतील कर्म हा शब्द हे तीनही शब्द जरी पाणिनीनें धात्वर्थ दाखविण्याकरितां योजिलेले असले तरी या तीनही शब्दांच्या अर्थांमध्यें धात्वर्थाला अनुरूप असा कांहीं बारीक भेद त्याला विवक्षित असावा असें दिसतें. "कारकं हि क्रियां निर्वर्तयति" या प्रचारांत असलेल्या वाक्यामध्यें सांगितलेले जे तीन टप्पे ते कर्म, क्रिया व भाव या तीन शब्दांमध्यें पाणिनीला विवक्षित असावे. आरंभींचा कारक व्यापार म्हणजे कर्म, चालू कारकव्यापार म्हणजे क्रिया व शेवटचा कारकव्यापार म्हणजे भाव असे तीन टप्पे मिळून धातूचा अर्थ पाणिनीला विवक्षित असावा व त्या अनुरोधानें ल्युट्, क्तिन् व घञ् या प्रत्ययांचा प्रयोग पाणिनिकालीं चालू असावा असें दिसतें. याप्रमाणें क्रियापदें व धातुसाधितें हीं कोणत्या अर्थीं व कोणते प्रत्यय लावून होतात हें सांगितल्यानंतर तुमुन्, क्त्वा व णमुल् या प्रत्ययांसंबंधीं नियम सांगून पाणिनीनें विशिष्ट तिङ् प्रत्ययांना विशिष्ट प्रसंगीं होणारे आदेश सांगितले आहेत. त्याप्रमाणेंच मुख्य क्रियेच्या कालाला अनुसरून गौण क्रियेचा काल समजावा व त्याप्रमाणें प्रत्यय करावे (धातुसंबन्धे प्रत्ययाः) असा सर्वसाधारण नियम घालून विशिष्ट प्रसंगीं त्यांना होणारे अपवाद सांगून पाणिनीनें आपला तिङन्ताध्याय पुरा केला आहे.

## ९०. स्त्रीप्रत्यय.

आख्यातें (क्रियापदें) व कृदन्त शब्द यांशिवाय भाषेमध्यें आढळून येणाऱ्या शब्दांच्या मूळ स्वरूपांचे (प्रातिपदिकांचे) पाणिनीनें प्रत्ययरहित व प्रत्ययसहित असे दोन विभाग केले आहेत. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें उणादि प्रातिपदिकें हीं पाणिनिमताप्रमाणें प्रत्ययरहितच समजावयाचीं असें भाष्यकारांचें मत आहे.[2] प्रत्ययान्त शब्दांचे स्त्रीप्रत्ययान्त व इतर असे दोन विभाग पाणिनीनें केले आहेत. प्रत्ययान्त शब्दांना–(प्रातिपदिकांना)–ही स्त्रीत्व विवक्षा असल्यास स्त्रीलिंगी प्रत्यय लागतात.

---

१. हें वाक्य महाभाष्यामध्यें अनेक ठिकाणीं आलें आहे. (पा. सू. २।२।१९ म. भा. भाग २ पृ. ३५२; पा. स. ४।१।३, भाग ४ पृ. २४; पा. सू. ५।४।१९, भाग ४ पृ. ४८७, पा. सू. ६।२।१३९, भाग ५ पृ. २८५ पहा.) विशेष विवेचन पा. स. ३।१।६७ वरील भाष्यामध्यें आलें आहे. (भाग ३ पृ. १२७–१२८ पहा.)

२. याविषयीं मागें उपोद्घात पृष्ठ १६० टीप १ पहा.

एकापुढें एक असे दोन स्त्रीलिंगी प्रत्यय एकाच अर्थी मात्र लागत नाहींत. स्त्रीप्रत्यय हे स्त्रीलिंगाची विवक्षा असेल तेथेंच लावण्यांत येतात. आख्यातें व अव्ययें यांना स्त्रीलिंगाची विवक्षाच शक्य नसल्यामुळें ते लावण्यांत येत नाहींत. मातृ, दुहितृ, सरित्, शरद्, धेनु, रुचि, शक्ति इत्यादि ठिकाणीं जेथें मूळ शब्दांपासून स्त्रीलिंगाचाच फक्त बोध होतो तेथेंही स्त्रीप्रत्यय लाविले जात नाहींत. तसेंच, पितृ, भ्रातृ, पुरुष, पुंस् वगैरे शब्दांपासून जेथें फक्त पुंल्लिंगाचाच बोध होतो तेथेंही स्त्रीप्रत्यय लाविले जात नाहींत. अकारान्त शब्दांहून स्त्रीत्वविवक्षा असतांना स्त्रीत्वाचा बोध होत असतांनाही आ ( टाप् ) प्रत्यय करून स्त्रीत्ववाचक शब्द आकारान्तच केले जातात. लिंगाच्या बोधाविषयीं लोकव्यवहार हाच सर्वथा प्रमाण समजावयाचा हें ' लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य ' या वचनानें भाष्यकारांनीं स्पष्ट केलें आहे. लोकांमध्यें लिंगव्यवहार कसा करण्यांत आला याविषयीं विवेचन " स्त्रियाम् " (४।१।३) या सूत्रावरील भाष्यामध्यें उत्तम प्रकारें केलें आहे व थोडेसें विवेचन मागेंही केलें आहे. स्त्रीत्वविवक्षा ही पाणिनीनें तीन प्रकारांनीं दिलेली आहे ( १ ) ज्या विशिष्ट धर्मांनीं युक्त पुल्लिंगी व्यक्तीचा बोध होत असेल त्याच धर्मांनीं विशिष्ट अशा स्त्रीलिंगी व्यक्तीचा बोध होत असेल तेव्हां; उदा० शुक्ला ( शाटी याचें विशेषण ), बाला ( लहान मुलगी ), कर्त्री ( करणारी स्त्री ) कुमारी ( लहान वयाची मुलगी ); ( २ ) विशिष्ट जातीची किंवा गोत्राची स्त्री या रीतीनें बोध होत असेल तेव्हां; उदा० अजा, कुक्कुटी, ब्राह्मणी, वृषली, नाडायनी; ( ३ ) विशिष्ट पुरुषाची भार्या या अर्थानें बोध होत असेल तेव्हां. उदा० गणकी, प्रष्ठी, इन्द्राणी, वरुणानी वगैरे.

## ९१. स्त्रीप्रत्ययान्त शब्दांविषयीं मूळ कल्पना.

पाणिनीनें जरी आ ( टाप् , डाप् , चाप् ) व ई ( ङीप् , ङीष् , ङीन् ) हे स्त्रीप्रत्यय म्हणून सांगितले असले तरी स्त्रीवाचक शब्द हे साधारणतः पुरुषवाचक शब्दांचा स्वर दीर्घ होऊन साधले गेले असावे. ज्या ठिकाणीं अमक्या जातीची किंवा अमक्या व्यक्तीची स्त्री असा बोध होत असेल तेथें मात्र अमक्याची ( अमक्याशीं संबद्ध ) या अर्थी ' इ ' प्रत्यय लागल्यावर स्त्रीत्वविवक्षेमुळें त्या 'इ'काराला दीर्घ करण्यांत आला असावा. अमक्याची भार्या असा बोध असतांनाही अमक्याची या अर्थी ' इ ' प्रत्यय व भार्यात्व-( स्त्रीत्व )-विवक्षेमुळें दीर्घोच्चारण झालें असावें. इन्द्राणी, वरुणानी इत्यादि ज्या ठिकाणीं पाणिनीनें ' आनुक् ' आगम सांगितला आहे तेथें पुरुषवाचक शब्द बहुमानार्थी असल्यामुळें इन्द्राणाम् ( भार्या ), वरुणानाम् ( भार्या ) अशा अर्थी इन्द्राणाम् + ई = इन्द्राणी, वरुणानाम् + ई = वरुणानी अशा प्रकारचे शब्द लोकप्रचारांत आले असावे. व्यञ्जनान्त शब्द स्त्रीत्ववाचक असला तर स्त्रीप्रत्यय लाविला जात नसे; तरी पण स्त्रीलिंगी शब्द लोकव्यवहारांत आकारान्त किंवा ईकारान्तच दृष्टीस पडत असल्यामुळें त्या शब्दांना 'आ' जोडण्याची प्रथा कांहीं प्रांतांमध्यें पडली हें " वष्टि भागुरि...आपं चैव हलन्तानां यथा वाचा निशा दिशा " या कारिकेवरून स्पष्ट दिसून येतें.

---

१. म. भा. भाग २ पृ. २९३, ३८८ व ४६९, भाग ४ पृ. २१, ४६०, ४५९ व ५००, तसेंच भाग ६ पृ. २७९ पहा.

२. म. भा. भाग ४ पृ. १६-२१ पहा.

३. उपोद्घात पृ. १६७-६८ परिच्छेद ८१ पहा.

४. " इन्द्रवरुणभवशर्वरुद्रमृडहिमारण्ययवयवनमातुलाचार्याणामानुक् " ( पा. सू. ४।१।४९ ) पहा.

## ९२. स्त्रीप्रत्यय व तद्धितप्रत्यय यांमधील साम्य.

स्त्रीप्रत्ययांशीं तुलना केली असतां जरी तद्धित प्रत्ययांचे बाबतींत पुष्कळसें संख्याधिक्य व अर्थांचें वैविध्य दृष्टीस पडलें तरी तद्धितप्रत्यय व स्त्रीप्रत्यय यांमध्यें एकप्रकारचें साम्य दिसून येतें. तें साम्य म्हणजे स्त्रीप्रत्यय हे ज्याप्रमाणें 'त्याची स्त्री' या अर्थानें एका शब्दाचा (ज्याला प्रत्यय लागतो त्या शब्दाचा) दुसऱ्या शब्दाशीं असलेला एक प्रकारचा संबंध दाखवितात त्याप्रमाणें तद्धितप्रत्ययही 'त्याच्याशीं संबद्ध' या सामान्य अर्थानेंच एका व्यक्तीचा दुसऱ्या व्यक्तीशीं किंवा वस्तूशीं, तसाच एका वस्तूचा दुसऱ्या वस्तूशीं किंवा व्यक्तीशीं असलेला संबंध दाखवितात. एकाच अर्थी अनेक शब्द असल्यामुळें संस्कृतभाषेची शब्दसमृद्धि पाहतां जितका तिचा विस्तार दिसून येतो तितकाच शब्दाच्या उपयोगामध्यें तिचा संकोच दिसून येतो; व ठिकठिकाणीं शब्दांचें काम प्रत्ययांनीं केलेलें आढळून येतें. या वैशिष्ट्यामुळें संस्कृतभाषेला प्रत्ययमय भाषा अथवा प्रत्ययप्रचुर भाषा (inflectional language) असें म्हणण्यांत येतें. ज्याप्रमाणें स्त्रीप्रत्ययाचे बाबतींत स्त्री पत्नी वगैरे संबद्ध शब्द उच्चारल्याशिवाय ब्राह्मणी या शब्दावरून **ब्राह्मण जातीची स्त्री** किंवा दाक्षी या शब्दावरून **दक्ष गोत्रांतील स्त्री** अथवा इन्द्राणी या शब्दावरून **इन्द्राची पत्नी** एवढा अर्थ मनांत येतो त्याप्रमाणेंच गार्गि या शब्दावरूनच **गर्गाचा मुलगा** किंवा वैयाकरण शब्दावरून **व्याकरण अध्ययन करणारा विद्यार्थी** एवढा सर्व अर्थ मनांत येतो. अर्थात्, जे तद्धितप्रत्यय अनेक सामान्य अर्थी सांगितले असतात तेथें ठिकठिकाणचा विशिष्ट संबंध ध्यानांत येण्याकरितां विशेष्याचा प्रयोग केला जातो; पण संबंध हा प्रत्ययानेंच दाखविला जातो.

## ९३. 'तद्धित' संज्ञेचें विवेचन.

तद्धित या संज्ञेची व्याख्या पाणिनीनें दिली नाहीं. तत्पुरुष, कर्मधारय या शब्दांप्रमाणें लोकांमध्यें व वैयाकरणांमध्यें त्याचे वेळीं नामांवरून नामें साधणाऱ्या प्रत्ययांना 'तद्धित' प्रत्यय ही संज्ञा देण्यांत आली असावी. 'अव्ययीभावः' (पा. सू. २।१।५) 'तत्पुरुषः' (पा. सू. २।१।२२) अशीं अधिकारसूत्रें करून जसें त्या समासांचें त्यानें परिगणन केलें आहे तसेंच 'तद्धिताः' (पा. सू. ४।१।७६) असा अधिकार करून त्यानें तद्धित संज्ञा लागू पडणाऱ्या पांचवा अध्याय संपेपर्यंत सांगितलेल्या सर्व प्रत्ययांचें परिगणन केलें आहे. त्याप्रमाणेंच धातूला लागणाऱ्या तिङ् प्रत्ययाखेरीज सर्व प्रत्ययांना त्यानें कृत् हें क्रिया करणारें या सामान्य अर्थाचें जसें नांव दिलें आहे तसेंच अपत्यवाचक, देशवाचक व कालवाचक यांसारख्या तद्धितप्रत्ययांना देखील 'त्याला हितकारक' अशा सामान्य अर्थाचेंच त्यानें नांव दिलें असावें. वास्तविक पाहतां तद्धित हे नांव ज्यांमुळें पडलें असे 'तस्मै हितम्' म्हणजे 'त्याला हितकारक' या अर्थाचे तद्धितप्रत्यय त्यानें सर्वांत आरंभीं म्हणजे अपत्य प्रत्ययांचे पूर्वींच द्यावयास पाहिजे होते; पण त्यानें ते प्रत्यय एकंदर तद्धितप्रत्ययांपैकीं निम्मे अधिक प्रत्यय चौथ्या अध्यायांत सांगून झाल्यानंतर पांचव्या अध्यायाचे आरंभीं दिले आहेत. याचें कारण अपत्य हा अर्थ फार महत्त्वाचा असल्यामुळें त्या अर्थी प्रत्यय प्रथमतः द्यावे असें त्यानें ठरविलें व अपत्य या अर्थी सर्वसामान्य जसा अण् प्रत्यय आहे त्याप्रमाणेंच अनेक निरनिराळ्या अर्थी अण् यासारखेच ठक्[1] आणि छ[2]

---

१. "प्राग्वहतेष्ठक्" (पा. सू. ४।४।१) पहा.

२. "प्राक् क्रीताच्छः" (पा. सू. ५।१।१) पहा.

हे सर्वसामान्य प्रत्यय प्रथमतः सांगणें जरूर आहे असें वाटल्यावरून त्यानें ते सांगितले; व ते सांगून झाल्यावर सर्वसाधारण यत् प्रत्यय सांगतेवेळीं यत् प्रत्ययाच्या अनेक अर्थांपैकीं 'हित' हा एक अर्थ असल्यामुळें 'तस्मै हितम्' या अर्थाच्या प्रत्ययांना त्यानें सुरवात केली. पांचव्या अध्यायांतील बहुतेक सर्व प्रत्यय विशिष्ट अर्थी विशिष्ट शब्दाहून सांगितलेले विशिष्ट प्रत्यय या स्वरूपाचेच दिसून येतात. चौथ्या व पांचव्या अध्यायांतील स्त्रीप्रत्ययांखेरीज सर्व प्रत्ययांना 'तद्धित' याऐवजीं दुसरी एखादी चांगली लागू पडेल अशी संज्ञा पाणिनि देऊं शकला असता; पण पूर्वाचार्यांनीं अशा प्रकारच्या प्रत्ययांना दिलेली तद्धित संज्ञाच उपयोगांत आणणें त्याला योग्य वाटलें व अशा सर्व प्रत्ययांचें संपूर्ण परिगणन व्हावें या हेतूनें त्यानें ती आरभींच स्वतंत्र अधिकार[3]सूत्र घालून दिली.

## ९४. अपत्यबोधक प्रत्यय.

पाणिनीनें जरी तद्धितप्रकरणांचे विभाग पाडले नसले तरी त्याच्या लिहिण्याच्या धाटणीवरून कांहीं विभाग पाडतां येणें शक्य आहे. प्रथमतः त्यानें कोणत्याही प्रातिपदिकाला लागणारा विशिष्ट अर्थाचा अण्, ठक्, छ यांसारखा सर्वसाधारण प्रत्यय सांगितला आहे व त्यानंतर विशिष्ट प्रातिपदिकांहून होणारे वैशिष्ट्ययुक्त प्रत्यय, तसेंच विशिष्ट अर्थी होणारे विशिष्ट प्रत्यय अपवाद म्हणून सांगितले आहेत. उदाहरणार्थ, अपत्य या अर्थी कोणत्याही प्रातिपदिकाहून होणारा सामान्य अण् प्रत्यय त्यानें सांगितला आहे; व त्यानंतर त्यानें प्रातिपदिकाच्या शेवटीं 'अ'कार असेल तर इ ( इञ् ) प्रत्यय करावा अशा रीतीनें कांहीं अपवाद सांगितले आहेत. तसेंच, शिव वगैरे शिवादि गणांतील शब्दांहून 'इञ्' न करतां अण् प्रत्ययच करावा, तसेंच स्त्रीवाचक शब्दांहून साधारणतः ढक् ( एय ) प्रत्यय करावा असेंही सांगितलें आहे; व पुत्र सोडून इतर नातू, पणतू, वगैरे अपत्य या अर्थी गर्ग वगैरे शब्दांहून यञ् प्रत्यय सांगितला आहे. अपत्य या शब्दाचा पाणिनीनें फार व्यापक अर्थ घेतला आहे; व पुत्रवंशांतील सर्वांना पूर्वजांचें अपत्य म्हणून त्यानें म्हटलें आहे; पुत्र सोडून नातू पणतू वगैरे सर्व पुत्रवंशजांना गोत्र ही संज्ञा त्यानें दिली आहे; व कांहीं विशिष्ट प्रत्यय गोत्रापत्य या अर्थींच सांगितले आहेत. गोत्रनांवांचा पाणिनीचे काळीं हल्लींच्या आडनांवांसारखा किंवा कुलनामांसारखा उपयोग केला जात असे व कुटुंबामध्यें जरी हल्लींसारखीं व्यक्तिनामें होतीं तरी कुटुंबांशिवाय इतर लोकांकडून कोणत्याही व्यक्तीचा गोत्रनांवानेंच उल्लेख केला जात असे. अध्ययनाची शाखा, प्रवर वगैरे समजण्यास त्याचा फार उपयोग होत असल्यामुळें व धार्मिक कृत्यें हीं शाखांना अनुरूपच केलीं जात असल्यामुळें धार्मिक विधि करणारा, करविणारा व शिकविणारा या सर्वांचा उल्लेख गोत्रनांवानेंच करणें सोयीचें होई. फक्त, एकाच वेळीं एकाच कुळांत बापलेक, चुलतेपुतणे भाऊभाऊ इत्यादि व्यक्ती प्रसिद्ध असल्यास लहान व्यक्तीचा उल्लेख गोत्रप्रत्ययान्त नांवाला आणखी एक प्रत्यय ( युवप्रत्यय ) लावून करण्यांत येत असे.

---

१. "प्राग् हिताद्यत्" ( पा. सू. ४।४।७५ ) पहा.
२ "तस्मै हितम्" ( पा. सू ५।१।५ ) पहा.
३. "तद्धिताः" ( पा. सू. ४।१।७६ ) पहा.

## ९५. ' शैषिक ' प्रत्यय.

अपत्यप्रत्ययांनंतर पाणिनीनें सामान्य रीतीनें सांगितलेला अण् प्रत्यय अपत्य या अर्थाशिवाय आणखी कोणकोणत्या अर्थी होतो तें सांगितलें आहे; व कोणत्या विशिष्ट अर्थी कोणत्या विशिष्ट शब्दांहून त्या अण् प्रत्ययाला अपवाद म्हणून इतर प्रत्यय होतात तें सांगितलें आहे. साधारणत: अण् प्रत्यय हा ग्रंथवाचक शब्दांहून ' तें जाणणारा ' किंवा ' तें म्हणणारा ' या अर्थी होतो. त्याप्रमाणेंच त्यानें रंगविलेलें, त्यानें संस्कृत, त्यांचा समूह, त्यांचा देश इत्यादि अर्थीही साधारणत: अण् प्रत्यय होतो; तसेंच, देवतावाचक शब्दांहून त्या देवतांचा भक्त या अर्थीही अण् प्रत्यय होतो. पाणिनीनें ' शेषे ' असा अधिकार करून त्या अधिकारामध्यें त्या ठिकाणीं झालेला, त्या ठिकाणाहून आलेला, त्यामध्यें कुशल या अर्थी, तसेंच त्यानें उच्चारलेलें, त्यानें केलेलें, मिळविलेलें, विकत घेतलेलें अथवा त्यापासून उत्पन्न झालेलें या अर्थी, त्याप्रमाणेंच त्याचें व्याख्यानरूप असलेला किंवा त्यासंबंधीं रचिलेला ( ग्रंथ ) या अर्थी, तसेंच त्यांची जन्मभूमि किंवा निवासस्थान असा देश या अर्थी, फार काय, ' त्याचें हें ' या अत्यंत सामान्य अर्थीही अण् प्रत्यय सामान्यत: सांगितला आहे; व त्याला अपवाद म्हणून वरील ' शेषे ' या अधिकारांतील कोणत्याही अर्थी, ज्यावरून प्रत्यय करावयाचा तो शब्द अव्यय असेल तर ' त्य ' ( त्यप् ), कालवाचक असेल तर ' ठञ् ', दक्षिणा, पश्चात् वगैरे दिशा दाखविणारा असेल तर ' त्यक् ' व वृद्ध म्हणजे आ, ऐ औ यांपैकीं स्वर प्रारंभीं असलेला असेल तर ' छ ' असे अपवाद प्रत्यय सांगितले आहेत. पाणिनीनें ' त्याचें अपत्य ' या सामान्य अर्थी, ' त्याचें हें ' या शैषिक अर्थी, किंवा ' त्यानें केलेलें ' इत्यादि विशिष्ट अर्थी कोणत्याही शब्दाहून सामान्यत: जसा अण् प्रत्यय सांगितला आहे त्याप्रमाणेंच पुढें दिलेल्या कांहीं विशिष्ट अर्थी कोणत्याही शब्दाहून सामान्यत: ठक् प्रत्यय सांगितला आहे व विशिष्ट शब्दांहून विशिष्ट प्रत्यय जागोजागीं त्याला अपवाद म्हणून सांगितले आहेत. हा ठक् प्रत्यय त्यानें खेळतो, खणतो, जिंकतो किंवा उपजीविका करतो अशा अर्थी तृतीयान्त शब्दांहून; तें देतो, राखतो, वेंचतो, या अर्थी द्वितीयान्त शब्दांहून; त्याचा स्वामी या अर्थी षष्ठ्यन्त शब्दांहून; त्याप्रमाणेंच तेथें नेमलेला, तेथें योग्य, तेथें माहीत असलेला किंवा अध्ययन करणारा या अर्थी सप्तम्यन्त शब्दांहून सांगितला आहे. ठक् प्रत्ययानंतर ' त्याला हितकारक ' या अर्थी चतुर्थ्यन्त शब्दांहून सामान्यत: ' छ ' प्रत्यय सांगितला आहे व उकारान्त शब्द तसेंच गो, हविस्, युग इत्यादि शब्द यांहून 'छ'प्रत्ययाच्या ऐवजीं यत् प्रत्यय सांगितला आहे.

---

१. " शेषे " पा. सू. ४।२।९२ पहा.

२. " तस्येदम् " ( पा. सू ४।३।१२० ) पहा.

३. पाणिनिसूत्रें " अव्ययात्त्यप् " ( ४।२।१०४ ), " कालाट्ठञ् " ( ४।३।११ ), " दक्षिणापश्चात्० " ( ४।२।९८ ), " वृद्धाच्छः " ( ४।२।११४ ) पहा.

४. " प्राग्वहतेष्ठक् " इत्यादि सूत्रें ( ४।४।१–७४ ) पहा.

५. " प्राक् क्रीताच्छः " ( ५।१।१ ) पहा.

६. " उगवादिभ्यो यत् " ( ५।१।२ ) पहा.

## ९६. गुणविशेषवाचक व क्रियाविशेषवाचक तद्धित प्रत्यय.

याप्रमाणें अण्, ठक्, छ, आणि यत् हे सामान्यतः त्या त्या अर्थीं कोणत्याही शब्दाला लागणारे प्रत्यय व विशिष्ट अर्थीं विशिष्ट शब्दांहून त्यांना अपवादभूत विशिष्ट प्रत्यय हे सर्व सांगून झाल्यावर पाणिनीनें द्रव्याचा विशेष दाखविणारे गुणवाचक शब्द तसेच क्रियेचा विशेष दाखविणारे क्रियाविशेषणरूप शब्द साधण्याकरितां कांहीं विशिष्ट प्रत्यय सांगितले आहेत. त्यासारखी क्रिया करतो असा अर्थ विवक्षित असतांना 'त्यासारखी' या शब्दानें जो क्रियाविशेष सांगितला आहे त्या अर्थीं 'वति' (वत्) असा प्रत्यय पाणिनीनें सांगितला आहे. तसेंच, त्याच्याप्रमाणें किंवा तेथीलप्रमाणें या अर्थीं षष्ठ्यन्त किंवा सप्तम्यन्त शब्दाहूनही वति प्रत्यय सांगितला आहे. हा 'वति' प्रत्यय शेवटीं असलेले शब्द अव्ययें होतात. भाव किंवा कर्म (कर्तव्य कर्म) या अर्थीं साधारणतः त्व व ता (तल्) हे प्रत्यय होतात; व विशिष्ट ठिकाणीं विशिष्ट शब्दाहून इमन् (इमनिच्), ष्यञ्, यक्, अण्, अञ् व वुञ् हेही प्रत्यय होतात. 'तें ज्याचें आहे' किंवा 'ज्या ठिकाणीं आहे' अशा अर्थीं मतुप् प्रत्यय होतो. हा मतुप्-प्रत्ययान्त शब्द विशेषणरूप असल्यामुळें विशेष्याप्रमाणें त्याला लिंगवचनें लागतात. अकारान्त शब्दांहून इन् व इक (ठन्) हेही प्रत्यय होतात. यांशिवाय, विशिष्ट शब्दांना मतुप् प्रत्ययाचे अर्थीं इतरही व, र, ल वगैरे प्रत्यय लागतात. पांसुल, गडुल वगैरे ठिकाणीं ल प्रत्यय दृष्टीस पडतो; त्याप्रमाणेंच फेनिल, पिच्छिल, सिकतिल या ठिकाणीं इल; ऊषर, सुषिर इत्यादि ठिकाणीं र; द्युम व द्रुम या ठिकाणीं म; तुन्द, उदर इत्यादि प्रातिपदिकांहून इल; व अस् शेवटीं असलेल्या प्रातिपदिकांहून विन् हेही प्रत्यय दृष्टीस पडतात. यांशिवाय श, न, व, भ, युस्, उरच्, ग्मिन्, आलच्, आटच् इत्यादि प्रत्ययही विशिष्ट शब्दांहून पाणिनीनें सांगितले [६] आहेत. विभक्तीच्या अर्थीं सर्वनाम शब्दाहून त्र व तस् हे साधारण प्रत्यय सांगून सर्वत्र, सर्वतः यांसारखे शब्द त्यानें साधिले आहेत व विशिष्ट सर्वनाम शब्दांहून विशिष्ट प्रत्यय व कांहीं सर्वनाम शब्दांना विशिष्ट आदेश सांगून इतः, अत्र, इह, कुत्र, सदा, तदा, यांसारखीं कित्येक अव्ययेंही त्यानें साधिलीं आहेत. अतिशायन या अर्थीं तमप् व तरप् हे साधारणतः सर्व शब्दांहून व गुणवाचक शब्दांहून इयसुन् व इष्ठ हेही प्रत्यय त्यानें दिले आहेत. या प्रत्ययांशिवाय प्रशंसा या अर्थीं रूपप्; ईषदसमाप्ति (जवळजवळ तसाच) या अर्थीं कल्प, देश्य व देशीय; क्रियेची आवृत्ति या अर्थीं कृत्वसुच्; अज्ञात, कुत्सित, अनुकम्पित वगैरे अर्थीं (कन्) हे प्रत्ययही त्यानें दिले आहेत; आणि सर्वांत शेवटीं विशिष्ट अर्थ न सांगतां म्हणजे स्वार्थींच विशिष्ट शब्दांहून विशिष्ट प्रत्यय सांगितले आहेत.

---

१. " तेन तुल्यं क्रिया चेद्वतिः " (५।१।११५) पहा.
२. " तत्र तस्येव " (५।१।११६) पहा
३. " स्वरादिनिपातमव्ययम् " (१।१।३७) या सूत्रांतील स्वरादि गणामध्यें सामि, वत्, सना, असे शब्द घातले आहेत.
४. " तस्य भावस्त्वतलौ " इत्यादि सूत्रें (५।१।११९-१३६) पहा.
५. " तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप् " (५।२।९४) पहा.
६. याकरितां पाणिनिसूत्रें (५।२।९६ पासून १४० पर्यंत) पहा.
७. पाणिनिसूत्रें ५।३।१-४६ पहा.
८. पाणिनिसूत्रें ५।३।५५-६४ पहा.
९. पाणिनिसूत्रें ५।३।६६-९५ पहा.
१०. पाणिनिसूत्रें ५।३।९६-५।४।६७ पहा.

## ९७. तद्धित प्रत्ययांच्या स्वरूपाचें विवेचन.

पाणिनीनें सांगितलेल्या तद्धित प्रत्ययांची संख्या जरी दोनशेंच्यापेक्षां ज्यास्त असली तरी वृद्धीकरितां लावण्यांत आलेले ञ्, ण्, क् हे वर्ण, स्वराकरितां लावलेले त्, च्, प्, इत्यादि वर्ण, त्याप्रमाणें स्त्रीप्रत्ययाकरितां लावलेला ष, तसाच लोपाकरितां लावलेला ड, हे वर्ण काढून टाकल्यास तसेंच, फ,ढ,ख इत्यादि प्रत्ययांना कायम होणारे आयन ,एय ईन इत्यादि आदेश विचारांत घेतल्यास दृश्यमान शब्दस्वरूपामध्यें भिन्नता असणाऱ्या तद्धित प्रत्ययांची संख्या बरीच मर्यादित होते. अशा स्वरूपाचे एकाक्षरी तद्धित प्रत्यय मुख्यतः अ, इ, य, वत्, इन् आणि क हे प्रामुख्यानें दिसून येतात. आयन ( फ ), एय ( ढ ), ईय ( छ ), व इय ( घ ) यांचा ' य ' मध्यें अंतर्भाव करतां येण्यासारखा आहे. यांशिवाय मत्, वत्, त्व, ता (तल्), त्य, थ, था, थम्, दा, धा, सात् हे एकाक्षरी तसेंच इमन्. ईयस्, इष्ठ, ईर, आल, आट, अन, अक वगैरे स्वरादि द्यक्षरी प्रत्ययही दिसून येतात. यांशिवाय व्यञ्जनादि द्यक्षरी प्रत्यय वल, तर, तम, चुञ्चु, चण, चर, ताति, तय, देश्य, विध, भक्त, रूप, शाल, तसेच त्र्यक्षरी देशीय, द्वयस शंकट हे प्रत्ययही आढळून येतात. साधारणपणें प्रत्ययाचें आद्याक्षर म्हणून वर्गातील दुसरें व चवथें व्यंजन सोडून बाकीचीं व्यंजनें किंवा स्वर यांपैकीं दिसून येतात. थ व ध हीं व्यंजनें केव्हां केव्हां आरंभीं दिसतात; तीं सोडून बाकीचीं ख, घ, छ, इत्यादि आठ व्यंजनें चिन्हस्वरूप प्रत्यय म्हणून घेऊन त्यांना कायमचे इन, इय, ईय वगैरे द्वयक्षरी आदेश पाणिनीनें सांगितले आहेत. असें करण्यांत पाणिनीचा हेतु लाघवसाधन हा जरी असला तरी त्याचेबरोबर दुसराही कांहीं हेतु असणें शक्य आहे. आदेशरूप नसलेले मूळचेच द्वयक्षरी प्रत्यय वल, तर, तम वगैरे जे वर निर्दिष्ट केले आहेत त्यांच्यापेक्षां आदेशरूपानें ईन, इक, आय वगैरे द्वयक्षरी प्रत्यय निराळे दाखविण्यांत त्याचा हेतु त्यांचें कांहीं वैशिष्ट्य दाखविणें हा असावा. हें वैशिष्ट्य जरी हे शब्द प्रत्यय म्हणून सांगितले गेले तरी मूळचे ते प्रातिपदिकस्वरूपच होते अशा प्रकारचें दिसून येतें. ज्याप्रमाणें सर्व विभक्तींमध्यें प्रयोग न दिसल्यामुळें सायं, चिरं. इत्यादि शब्दांचा अव्ययांमध्यें अंतर्भाव करण्यांत आला त्याप्रमाणेंच वल, देश्य, देशीय वगैरे शब्दांचा दुसऱ्या शब्दाला जोडल्याशिवाय स्वतंत्र प्रयोग दृष्टीस न पडल्यामुळें प्रत्ययांमध्यें अंतर्भाव पाणिनीनें केला असावा. शिवाय, ईन ईय वगैरे द्वयक्षरी प्रत्यय त्या तऱ्हेचे म्हणजे मूळचे प्रातिपदिकस्वरूप नाहींत हे दाखवण्याकरितांच ख छ वगैरे मूळ एकाक्षरी प्रत्ययांची कल्पना पाणिनीनें केली असावी. वल, द्वयस वगैरे प्रत्यय लावले असतांना प्रातिपदिकाला आदिवृद्धि होत नाहीं हीही गोष्ट या बाबतींत विचारांत घेण्याजोगी आहे.

## ९८. तद्धित प्रत्ययांची उत्पत्ति.

प्राकृत भाषांमध्यें स्त्रीलिंगी नामांना तृतीया, पंचमी, षष्ठी व सप्तमीचे एकवचनाचे अ, इ, उ आणि ए हे सर्वसाधारण प्रत्यय सांगितले आहेत. हे प्रत्यय लावण्यांत आले असतां प्रातिपदिकाच्या शेवटच्या स्वराचा या प्रत्ययाच्या स्वराशीं संधि होत नाहीं किंवा दोहोंमध्यें यकाराचें लघु उच्चारणही होत नाहीं. वेदामध्यें हे प्रत्यय आढळून येत नाहींत. प्रत्ययलोप किंवा पूर्वसवर्ण दीर्घ आढळून येतात. इ ( ङि ) आणि ए ( ङे ) हे विभक्तिप्रत्यय संस्कृत भाषेमध्यें आहेत. परंतु ते लाविल्यास पूर्वी स्वर असल्यास त्याच्याशीं संधिकार्य होत असतें. यावरून असें अनुमान निघणें शक्य आहे कीं पाणिनीचे वेळीं प्रांतीय भाषांमध्यें अ, इ, उ,

आणि ए हे संबन्धबोधक प्रत्यय असले पाहिजेत. प्रांतीय संस्कृत भाषांमध्यें मात्र विभक्त्यर्थी न घेतां संबंधार्थीच हे प्रत्यय घेण्यांत आले असावे; परंतु संस्कृतभाषेच्या संधिकार्य न करतां एकाजवळ एक असे दोन स्वर न येणें या वैशिष्ट्यामुळें त्यांचा पूर्वीच्या स्वराशीं संधि करण्यांत येत असे. एकाच पदाच्या आंत संधिकार्य न होतां दोन स्वर तितउ या शब्दांतच दिसतात. एका पदाचा शेवटचा व दुसऱ्या पदाचा पहिला स्वर यांमध्यें संधिकार्य न होतां दोन स्वर मधील वर्णाचा लोप झाला असल्यासच समासामध्यें व वाक्यामध्यें दिसतात. वाक्यामध्यें संहिता विवक्षित नसल्यास संधिकार्य होत नाहीं ही गोष्ट निराळी. अण्, अञ् वगैरे सहा प्रकारांनीं दिसणारा 'अ' प्रत्यय व इञ् प्रत्यय हे मूळचे संबंध दाखविणारेच प्रत्यय असावे; व त्यांवरून अपत्य, स्त्री, मालकीची वस्तू, इत्यादि संबद्ध पदार्थांचाच बोध होत असे; स्त्री हा अर्थ विवक्षित असतांना साधारणतः शेवटच्या स्वराचें दीर्घ उच्चारण होत असल्यामुळें आ, ई व ऊ हे स्त्रीप्रत्यय समजण्यांत आले. य हा प्रत्यय इ आणि अ यांचा मिळून झाला असल्यामुळें जेथें य प्रत्यय लागतो त्या ठिकाणीं साधारणपणें दोन संबंध दृष्टीस पडतात. इन, आयन, वगैरे ज्या प्रत्ययांमध्यें 'न' हा वर्ण दृष्टीस पडतो त्या ठिकाणीं बहुवचनाची किंवा बहुमानाची कल्पना शब्दामध्यें अंतर्भूत दिसून येते. 'व' हा वर्ण असल्यास 'तद्युक्तत्व' हा अर्थ दिसून येतो. त्याप्रमाणेंच, स्वर पूर्वी असलेला 'क' हा वर्ण प्रत्ययामध्यें दिसल्यास क्रियाकारकत्व दिसून येतें. फक्त कवर्णरूपच कन् प्रत्यय असल्यास लहानपणा, कमीपणा निंदा वगैरे कल्पना दिसून येतात.

## ९९. समासान्त प्रत्यय.

भाषेमध्यें समासाच्या शेवटीं आढळून येणाऱ्या वर्णविकारांचा विचार करून समासाच्या शेवटीं जोडण्यांत आलेल्या वर्णांना अथवा अक्षरांना समासान्त प्रत्यय ही संज्ञा पाणिनीनें दिली आहे, व त्या प्रत्ययांचा तद्धित प्रत्ययांमध्यें अंतर्भाव केला आहे. वास्तविक पाहतां तद्धित प्रत्ययांप्रमाणें या प्रत्ययांना पाणिनीनें कोणताही अर्थ सांगितला नाहीं. ज्या थोड्या ठिकाणीं अर्थ सांगितलेला आढळतो तो सामासिक पदाचा अर्थ असतो. म्हणून समासाचा अर्थ तोच समासान्त प्रत्ययाचा अर्थ असल्यामुळें समासान्त प्रत्ययांना स्वार्थे प्रत्यय म्हणण्यास हरकत नाहीं. तद्धित प्रत्यय पुढें असतांना होणारीं विशेषतः 'टि'–लोप किंवा 'अ'कार–लोप किंवा 'इ'कार–लोप यांसारखीं कार्यें व्हावीं म्हणून या प्रत्ययांचा तद्धित प्रत्ययांमध्यें पाणिनीनें अंतर्भाव केला असावा. समासान्त प्रत्ययांमध्यें अ, अच्, टच्, षच्, ष आणि अप् इत्यादि प्रत्ययांनीं सांगितलेला 'अ' हा समासान्त प्रामुख्यानें आढळून येतो व विशेषतः व्यंजनान्त अव्ययीभाव व द्वन्द्व या समासांच्या शेवटीं तो जोडण्यांत येऊन सामासिक पद स्वरान्त केलें जातें. बहुतेक ठिकाणीं जोडण्यांत येणाऱ्या अच् व टच् या प्रत्ययांतील 'च्' या इद्वर्णामुळें तो 'अ'कार उदात्त होऊन समास अन्तोदात्त होतो. प्रचलित भाषेमध्यें व्यञ्जनान्त शब्द कमी

---

१. 'तितउ' शब्दाची व्युत्पत्ति, 'ततवद्वा, तुन्नवद्वा' अशी निरुक्तांत दिली असल्यामुळें 'तितवु' अंत प्रथमा एकवचनी रूप त्या वेळीं प्रांतीय प्राकृतामध्यें असावें; त्यांतील 'व' गाळून, वकार गाळल्यामुळें संधि न होतां 'तितउ' शब्द संस्कृत भाषेमध्यें प्रचारांत आला असावा.

२. उदा० "अनोश्मायःसरसां जातिसंज्ञयोः (५।४।९४), अङ्गुलेर्दारुणि (५।४।११४) इत्यादि सूत्रें पहा.

कमी करण्याच्या प्रवृत्तीचाच हा समासान्त 'अ' निदर्शक म्हणतां येईल. बहुव्रीहि समासाचे शेवटीं कांहीं शब्दांच्या शेवटच्या स्वराऐवजीं अन् किंवा अस् आदेश आढळून येतो. मुख्यतः ऋ किंवा ई शेवटीं असलेल्या बहुव्रीहि समासाला 'क' जोडण्यांत येतोच; पण इतर ठिकाणींही त्याचें वैकल्पिक विधान पाणिनीनें केलें आहे. पूजनार्थक सु आणि अति शब्द व निन्दार्थी किम् हा शब्द पूर्वपद असतांना समासान्त प्रत्यय लागत नाहींत असें पाणिनीनें सांगितलें आहे व त्याला कारण हे शब्द पूर्वपद असल्यास त्यांनाच अर्थमहत्व असल्यामुळें त्यांचेंच भाषेमध्यें होणारें उदात्त उच्चारण हें असणें शक्य आहे.

## १००. धातूंना तसेंच प्रातिपदिकांना होणारे द्वित्व, संप्रसारण व इतर आदेश.

धातुपाठामध्यें पाणिनीनें ज्या स्वरूपाचे धातू दिले आहेत, किंवा ज्या मूळ स्वरूपाचीं प्रातिपदिकें समजलीं जातात, तें प्रातिपदिकांचें व धातूंचें मूळ स्वरूप प्रयोगामध्यें पुष्कळ ठिकाणीं आढळून येत नाहीं. कांहीं ठिकाणीं विशिष्ट जातीच्या प्रत्ययांपूर्वीं त्यामध्यें विशिष्ट जातीचा बदल आढळून येतो. या स्वरूपभेदाचा पूर्ण अभ्यास करून पाणिनीनें त्याचें द्वित्व, संप्रसारण, आत्व, सत्व, नत्व, यलोप या निरनिराळ्या प्रकारांनीं निरूपण केलें आहे. बरेचसे स्वरूपभेद उच्चारणवैशिष्ट्यामुळें झाले असावे. उदाहरणार्थ — षकारादि किंवा णकारादि धातूंच्या ऐवजीं सकारादि व नकारादि धातूंचे प्रयोग. पाणिनीचे वेळीं सच्या ऐवजीं ष, तसेंच नच्या ऐवजीं ण उच्चारण करणें या प्रांतीय उच्चारण-वैशिष्ट्यामुळें कांहीं लोक सहते याच्या ऐवजीं षहते म्हणत असावे; तसेंच नमति याच्या ऐवजीं णमति म्हणत असावे. कांहीं प्राकृत भाषांमध्यें 'स' च्याऐवजीं 'श'चें किंवा 'ष'चें उच्चारण होत असतें; तर याच्या उलट दुसऱ्याच प्राकृत भाषांमध्यें 'श' व 'ष' या दोन्हींचे ऐवजीं 'स'कार उच्चारला जातो. प्राकृत भाषांमध्यें 'न'च्या ऐवजीं 'ण'कारच बहुशः उच्चारला जातो. विषहते, प्रणमति इत्यादि ज्या ठिकाणीं ष किंवा ण यांचें उच्चारण होतें तेथें पाणिनीला सह् हा धातु सकारादि व नम् हा धातु नकारादि सांगूनही षत्व किंवा णत्व सांगतां आलें असतें. असें असूनही ज्या अर्थी पाणिनीनें धातुपाठांत 'सह्' यासारख्या अनेक धातूंचें षह् यासारखें षकारादि उच्चारण, तसेंच 'नम्' यासारख्या अनेक धातूंचें 'णम्' यासारखें णकारादि उच्चारण केलें आहे त्या अर्थी तशा प्रकारचे ते धातू त्या वेळीं प्रांतीय उच्चारणांत असले पाहिजेत असें अनुमान करणें शक्य आहे. 'सुट् कात्पूर्वः' व 'अडभ्यासव्यवायेपि' हीं वार्तिकें म्हणूनच भाष्यामध्यें दिलीं आहेत; त्यावरून पाणिनिकालीं उपसर्गासहित धातूंचे विशिष्ट अर्थ समजले जात असत असें दिसतें. कृ धातूचा जरी करणें हा अर्थ असला तरी संस्कृ (सम्+कृ) या उपसर्गसहित कृ धातूचा विभूषित करणें हा अर्थ मानण्यांत येत असावा. फक्त रूपसिद्धि करतांना द्वित्व, अडागम इत्यादि कार्यांचे वेळीं कृ एवढाच धातु (स्कृ नव्हे) विचारांत घेऊन रूपसिद्धि केली जात असे. म्हणून वरील 'सुट् कात्पूर्वः' व 'अडभ्यासव्यवायेपि' यांसारख्या वचनांची पाणिनीला जरूर भासली नाहीं. "लोपो व्योर्वलि" (पा. सू. ६।१।६६) या सूत्रानें धातूच्या शेवटीं असलेल्या 'य' काराचा तसाच 'व' काराचा लोप पाणिनीनें सांगितला आहे त्यावरूनही व्यञ्जनान्त धातूच्या व्यञ्जनाचा लोप करून स्वरान्त धातू करण्याची प्रांतीय प्राकृत भाषांमधील प्रवृत्ति पाणिनीचे वेळीं चालू झालेली दिसून येते.

---

१ "नद्यृतश्च" (५।४।१५३), "शेषाद्विभाषा" (५।४।१५४) सूत्रें पहा.

२. पा. सू. (६।१।१३२ वा. १, ५ पहा.

## १०१. उदात्त, अनुदात्त व स्वरित या स्वरांचें उच्चारण.

स्वरांविषयीं पाणिनीनें फारच सूक्ष्म रीतीनें विचार केला आहे. पाणिनीचे वेळीं बोलभाषा व बोधभाषा 'छान्दस–'प्रयोगरहित संस्कृतच होती हें वर सांगितलेंच आहे. पाणिनीनें 'भाषायाम्' हा शब्द या भाषेलाच उद्देशून वापरला आहे. या भाषेंतील शब्दांचें उच्चारण लोकांमध्यें स्वरांसहितच (accented) होत असे. प्रत्येक पदामध्यें उदात्त स्वर एकच असतो म्हणजे त्या उदात्तगुणयुक्त स्वराचें जरासें विशिष्ट आघातपूर्वक उच्चारण होतें व बाकीच्या सर्व स्वरांचें अनुदात्त म्हणजे अगदीं साधें कोणत्याही तऱ्हेनें जोर न देतां उच्चारण होतें. हाच "उच्चैरुदात्तः" "नीचैरनुदात्तः" व "अनुदात्तं पदमेकवर्जम्" या सूत्रांचा अर्थ पाणिनीला अभिप्रेत असावा.जरा जोर देऊन केल्या जाणाऱ्या अशा विशिष्ट उच्चारणाच्याच पाणिनीनें 'उच्चैः' या पदानें निर्देश केला आहे. हल्लीं वैदिक लोकांमध्यें हात किंवा मस्तक वर करून जरा जोर देऊन स्वरिताचें उच्चारण केलें जातें, तसेंच हात किंवा मस्तक खालीं करून जरा जोर देऊन अनुदात्ताचें उच्चारण केलें जातें; व उदात्ताचें उच्चारण अगदींच सामान्य तऱ्हेनें केलें जातें. अशा तऱ्हेचें उच्चारण कधीं व कसें प्रचलित झालें तें सांगतां येत नाहीं. पण वैदिक कालीं व पाणिनीचे कालीं हल्लीं मराठी किंवा इंग्रजी भाषेमध्यें जसें अनेकाक्षरी शब्दाचें एका अक्षरावर जोर देऊन उच्चारण होतें त्याप्रमाणें फक्त उदात्त स्वरावर जोर देऊन उच्चारण होत असलें पाहिजे. "अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम्" ही ऋचा म्हणतांना वैदिक लोक खूण केलेल्या अनुदात्त व स्वरित या स्वरांवर विशेष जोर देऊन मान किंवा हात खालीं करून अ पु य दे इत्यादि अनुदात्तांचें जोर देऊन उच्चारण करतात; त्याचप्रमाणें मी हि स्य इत्यादि स्वरितांचेंही जोर देऊन उच्चारण करितात; अशा उच्चारणामध्यें पुरोहितं यज्ञस्य ऋत्विजम् इत्यादि अनेकाक्षरी शब्दांमध्यें दोन अक्षरांचें आघातयुक्त (accented) उच्चारण होतें व ही ऋचा म्हणतांना एकंदर बारा अक्षरांच्यावर जोर दिला जातो. परंतु तें योग्य दिसत नाहीं. वास्तविक पाहतां अग्नि, यज्ञ, देव, ऋत्विज् व रत्नऽधा हे अंतोदात्त शब्द आहेत. त्यांच्या पुढील अम् स्य व तम हे प्रत्यय अनुदात्त आहेत. होतृ हा तृन्-प्रत्ययान्त शब्द आद्युदात्त आहे. पुरोहितम् या शब्दामध्यें पुरः हें पूर्वपद समास झाला असतां अन्तोदात्त कायम राहिलें आहे व ईळे हें क्रियापद अग्नि या नामाच्या पुढें आल्यामुळें सर्वानुदात्त आहे. या ऋचेमध्यें फक्त उदात्तांचेंच 'उच्चैः' म्हणजे जरा जोर देऊन उच्चारण करावयाचें म्हटल्यास अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम् या ऋचेचें सर्वानुदात्त ईळे शब्द सोडून बाकीच्या प्रत्येक शब्दामध्यें खुणेनें दाखविलेल्या फक्त ग्नि रो ज्ञ इत्यादि सात उदात्त अक्षरांवरच जोर देऊन उच्चारण करणें योग्य होईल. लोकामध्यें पाहिलें असतां 'यज्ञाच्या देवाला अग्नीला भजतों' असा तीनच ठिकाणीं जोर देऊन मराठी वाक्य उच्चारलें जातें.

---

१. "भाषायां सदवसश्रुवः" "सख्यशिश्वीति भाषायाम्" (४।१।६२) "मयड् वैतयोर्भाषायाम्०" (४।३।४१) "विभाषा भाषायाम्" (६।१।१७७) "स्थे च भाषायाम्" (६।३।१९) "प्रथमायाश्च द्विवचने भाषायाम्" (७।२।८८), "पूर्वं तु भाषायाम्" (८।२।९८) सूत्रें पहा.

## १०२. धातुसाधितांमधील उदात्त स्वराचें विवेचन.

उदात्त हा पाणिनिकालीं प्रचलित भाषेत मुख्य स्वर होता व दरेक शब्दामध्यें (केवल तसेच सामासिक शब्दामध्यें सुद्धां ) हल्लींच्या प्रांतीय भाषांमध्यें किंवा इंग्रजीमध्यें होतें त्याप्रमाणें त्या उदात्त स्वराचें जरा जोरानें उच्चारण होत असे. प्रत्येक शब्दामध्यें एकच उदात्त स्वर असावयाचा असा नियम असल्यामुळें व धातू हे बहुतेक एकाक्षरीच असल्यामुळें त्यांचा स्वर उदात्तच असे. प्रत्ययाशिवाय धातूंचा प्रयोग नसल्यामुळें क्विप् प्रत्यय लावून साधलेल्या कृदन्त नामांमध्येंच धातूच्या उदात्त स्वराचें उच्चारण दृष्टीस पडे; त्याप्रमाणेंच एकवचनी तिङ् प्रत्यय (तिप् सिप् मिप् ) हे अनुदात्त असल्यामुळें त्यांचेपूर्वी धातूच्या उदात्ताचें उच्चारण होई. बाकीच्या ठिकाणीं प्रत्यय आद्युदात्त असतात या सर्वसाधारण नियमास अनुसरून तिङ्–विभक्तिप्रत्यय उदात्त असल्यामुळें धातूचा उदात्त स्वर प्रत्ययांवर जात असे. याला मुख्यतः अपवाद पाणिनीनें " तास्यनुदात्तेत्० " ( ६।१।१८६ ) या सूत्रामध्यें सांगितल्याप्रमाणें अनुदात्तेत् (अनिट्) धातूंच्या रूपांमध्यें आढळून येई. धातूच्या पूर्वी लागणाऱ्या अट् या आगमाचें उच्चारणच विशिष्ट जोरानें होत असल्यामुळें पाणिनीनें मुद्दाम 'अट् उदात्तः' ( ६।४।७१ ) असें म्हटलें आहे. कृदन्त स्वरांचा विचार केल्यास प्रत्यय आद्युदात्त असतात या सामान्य नियमाप्रमाणें कृदन्त शब्दांमध्यें धातूचा उदात्त स्वर प्रत्ययावर जाई व प्रत्ययाचें आद्युदात्त उच्चारण होत असे. ज्या ठिकाणीं धातूचा उदात्त कायम राही अशा ठिकाणीं प्रत्ययाला प् हा अनुबन्ध लावून पाणिनीनें प्रत्यय अनुदात्त केला आहे किंवा प्रत्ययाला ञ् किंवा न् अनुबन्ध लावून धातूचा आदि स्वर उदात्त सांगून धातुस्वर कायम ठेविला आहे. हा सर्वसाधारण नियम बऱ्याच ठिकाणीं लागू पडत नसलेला दृष्टीस पडल्यामुळें " कर्षात्वतो० " वगैरे अपवादसूत्रें पाणिनीला सांगावीं लागलीं. धातूचें द्विरुच्चारण झालें असतां पूर्वीच्या भागावर जोर देऊन उच्चारण होत असल्यामुळें " अभ्यस्तानामादिः " ( ६।१।१०९ ) हें सूत्र करून अभ्यस्ताचा आदि उदात्त होतो असें पाणिनीनें म्हटलें आहे; व ज्या ठिकाणीं द्वित्वाच्या द्वितीय भागांत दीर्घ स्वर असतो व प्रथम भागांत ह्रस्व स्वर आढळतो तीं अपवादस्थलें " भीह्रीभृहु० " ( ६।१।१९२ ) या सूत्रांत निर्दिष्ट केलीं आहेत.

## १०३. नामसाधितांमधील उदात्त स्वराचें विवेचन.

सुबन्त शब्दांविषयीं ( नामें, सर्वनामें इत्यादिकांविषयीं ) विचार केल्यासही प्रत्येक सुबन्त शब्दामध्यें एकच उदात्त आढळून येतो, व बाकीचे सर्व स्वर अनुदात्त असतात. ज्याप्रमाणें पाणिनीनें " धातोः " ( ६।१।१६२ ) असें साधारण सूत्र करून धातूचा अन्त्य स्वर उदात्त असतो असें म्हटलें आहे त्याप्रमाणें नामें सर्वनामें इत्यादि प्रातिपदिकांविषयीं म्हटलें नसलें तरी प्रातिपदिकें हीं साधारपणें अन्तोदात्त असतात हें त्यांचें मत असावें. " फिषः " म्हणजे प्रातिपदिकाचा अन्त उदात्त असतो या शान्तनवाचे सूत्राचा ( फि. सू. ११ ) पाणिनीनें उल्लेख प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षसुद्धां केलेला आढळून येत नाहीं. म्हणून फिट्सूत्रें हीं पाणिनीच्या नंतर रचिलीं गेलीं असावीं असें म्हणणें शक्य आहे. पाणिनीनें धातुसाधित अथवा नामसाधित अशा व्युत्पन्न प्रातिपदिकांच्याच स्वरांचें विवेचन केलें आहे अव्युत्पन्न प्रातिपदिकाचे स्वर लोकव्यवहारामध्यें उच्चारणांत जसे येतात तसेच घ्यावयाचे असल्यामुळें त्यानें त्याकरितां नियम केले नाहींत. कदाचित् त्याचे वेळीं निरनिराळ्या जातींच्या अव्युत्पन्न प्रातिपदिकांचे गण लोकामध्यें प्रसिद्ध असावे व त्या गणांमध्यें आद्युदात्त अन्तोदात्त वगैरे स्वरनिर्देश केलेले असावे. प्रातिपदिकां-

पुढील विभक्तिप्रत्यय हे पाणिनींनें सामान्यतः अनुदात्त म्हणून दिले आहेत. त्याला मुख्य अपवाद "सावेकाचस्तृतीयादिर्विभक्तिः" ( ६।१।१६८ ) हा आहे; व त्यामध्यें एकाक्षरी शब्दाला तृतीयादि विभक्तींचे प्रत्यय लागले असतां प्रत्यय उदात्त होतो म्हणजे प्रकृतीचा उदात्त स्वर प्रत्ययावर जातो असें म्हटलें आहे कृदन्त व तद्धित प्रत्ययामुळें प्रातिपदिकांच्या स्वरांमध्यें होणारा बदल त्यानें प्रत्ययाला ञ्, न्, च्, त्, क्, आणि ल् हे अनुबन्ध लावून दाखविला आहे. यांपैकीं ञ् आणि क् या अनुबंधांनीं मागील स्वराला वृद्धि होत असल्यामुळें उदात्त स्वर स्वभावतःच आद्याक्षरावर जातो. ज्या ठिकाणीं तसा जाणें इष्ट नसेल तेथें प्रत्ययाला वृद्धिनिदर्शक क् किंवा ण् हे अनुबंध त्यानें लाविले आहेत; तसेंच वृद्धि न होतांही प्रत्यय लावला असतांना आद्युदात्त इष्ट असेल तेथें प्रत्ययाला न् हा अनुबंध लावला आहे. त् हा एकच अनुबन्ध स्वरितस्वरयुक्त प्रत्यय दाखवितो. त् या अनुबंधानें युक्त सर्व प्रत्ययांमध्यें यकार आढळून येतो त्यावरून य हा प्रत्यय इ आणि अ या दोन उदात्त व अनुदात्त प्रत्ययांचा मिळून झाला असावा असें म्हणण्यास जागा मिळते.

## १०४. समासांमधील उदात्त स्वराचें विवेचन.

समासस्वरांचे बाबतींतही पाणिनीनें सूक्ष्म विवेचन केलें आहे.वैदिक भाषेंत दोनच शब्दांचा समास आढळून येतो. वेदांच्या पदपाठामध्यें सामासिक पदांतील दोन पृथक् पदें अवग्रह देऊन पृथक् दाखविलीं जातात. केव्हां केव्हां भ्याम् भिस् आणि सु हे विभक्तिप्रत्यय अवग्रहानें पृथक् दाखविले जातात. पण अशा वेळीं सामासिक शब्दाच्या शेवटीं हे प्रत्यय असल्यास तीन पदें कधींही दाखविलीं जात नाहींत; सामासिकपद व विभक्तिप्रत्यय हेच अवग्रहानें सुटे दाखविले जातात. संस्कृतभाषा ही जोंपर्यंत बोलभाषा होती तोपर्यंत योग्य स्वरांसहितच शब्द उच्चारले जात असत व समासही दोन फार तर तीन शब्दांचेच केले जात असत. संस्कृतचें बोलभाषा हें स्वरूप नाहींसें होऊन ग्रंथांमध्येंच तिचें स्थान राहिल्यावर अनेक शब्दांच्या समासाला सुरुवात झाली व बाण आणि सुबन्धु यांचे वाङ्मयामध्यें समासानें एकत्रित होणाऱ्या पदानीं उच्चांक गाठिला. सामासिक पदाचा अंत्य स्वर उदात्त असतो व त्याला अपवाद बहुव्रीहि समासामध्यें पूर्वपदाचे स्वर कायम राहतात असा सर्वसामान्य दंडक पाणिनीनें घालून दिला आहे.[2] य नियमाला जे तत्पुरुष समासामध्यें अनेक अपवाद दिसून येतात त्यांचें त्यानें "तत्पुरुषे तुल्यार्थ०" (६।२।२) पासून "न भूताधिक०" ( ६।२।९१ ) पर्यंत एक प्रकारानें परिगणनच केलें आहे असें म्हटलें असतां चालेल. पुष्कळ समासांमध्यें समासाचा अन्त्य स्वर उदात्त न होतां पूर्वपदाचाच अन्त्य स्वर उदात्त होतो असें आढळून येतें. अशा समासांचेंही त्यानें "अन्त्यः" (६।२।९२) या सूत्रापासून "निष्ठोपसर्ग०" ( ६।२।११० ) या सूत्रापर्यंत परिगणन केलें आहे. त्यानंतर उत्तरपदाचा आदि स्वर केव्हां उदात्त होतो हें त्यानें "उत्तरपदादिः" ( ६।२।१११ ) असें अधिकारसूत्र देऊन "कुण्डं वनम्" ( ६।२।१३६ ) या सूत्रापर्यंत सांगितलें आहे. त्यानंतर उत्तरपदाचा स्वर जेथें कायम राहतो असे समास तीन सूत्रांमध्यें ( १३७–१३९ ) सांगून, वनस्पति, बृहस्पति तनूनपात् इत्यादि शब्दांमध्यें तसेंच देवतावाचक शब्दांच्या द्वन्द्व समासामध्यें

---

१. उदाहरणार्थ–इन्द्राग्निऽभ्याम्, अनवद्यऽरूपाः, दशावनिऽभ्यः, [illegible]ऽ[illegible]म्, पुरएताऽइव, विप्रर्ताऽइव, इत्यादि शब्द पहा.

२. "समासस्य" ( ६।१।२१९ ) बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम् ( ६।२।१ ) सूत्रें पहा.

समासांतील दोनही पदांचे स्वर कायम राहतात असें सांगितलें आहे. सर्वांत शेवटीं, वरील नियमांप्रमाणें अन्तोदात्ताशिवाय इतर स्वर प्राप्त होत असेल परंतु अन्तोदात्तच इष्ट असेल अशीं सर्व स्थलें त्यानें दिलीं आहेत.

## १०५. पाणिनिकालीं स्वरयुक्त शब्दोच्चारण.

पाणिनीय व्याकरणामध्यें स्वरविचार हें फारच महत्त्वाचें प्रकरण आहे. प्रचलित भाषेंत आढळून न येणारीं छान्दस रूपें व प्रयोग हीं पाणिनीनें ठिकठिकाणीं वैशिष्ट्य म्हणून 'छन्दसि 'मन्त्रे' वगैरे शब्द उच्चारून दिलीं आहेत. स्वराचें विवेचन मात्र एकाच ठिकाणीं सहाव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादाच्या उत्तरार्धामध्यें व तिसऱ्या पादामध्यें त्यानें केलें आहे. त्यामध्येंही भाषायाम्², छन्दसि³, मन्त्रे⁴ असे शब्द भाषेपेक्षां वेदामध्यें स्वरवैशिष्ट्य जेथें दिसून येतें तेथेंच घातले आहेत. त्यावरून पाणिनीचे कालीं वैदिक भाषेमध्यें व लौकिक भाषेमध्येंही स्वरसहितच उच्चारण होत असे, फक्त कांहीं थोड्याच ठिकाणीं वेदामध्यें स्वरवैशिष्ट्य दिसून येई असें सिद्ध होतें. स्वरांचें विवेचन पाणिनीनें अत्यंत परिश्रमपूर्वक केलें आहे हें त्यानें उत्सर्गरूपानें व अपवादरूपानें दिलेल्या नियमांच्या संख्येवरून सहज दिसून येतें. त्यानें दिलेले स्वर हे त्याच्या निवास-देशांतील भाषेमध्यें आढळून येणारे आहेत. हल्लीं पंचाब या नांवानें प्रसिद्ध असलेल्या त्याच्या प्रांतांत देखील विपाशू (बीया) नदीच्या एका बाजूला एक स्वर व दुसऱ्या बाजूला दुसरा या तऱ्हेचें वैशिष्ट्य "उदक् च विपाशः" (पा. सू. ४ । २ । ७४ ) या सूत्रामध्यें त्यानें निर्दिष्ट केल्यावरून त्याचें अवलोकन किती सूक्ष्म होतें व त्यानें अभ्यास किती काळजीपूर्वक केला होता याची कल्पना येण्यासारखी आहे. काशिकाकारांनीं "महती सूक्ष्मेक्षिका वर्तते सूत्रकारस्य" (पा. सू. ४ । २ । ७४ काशिका) या शब्दांनीं त्याच्या सूक्ष्म अवलोकनाचें योग्य कौतुक केलें आहे. त्यानें दिलेल्या स्वरांमध्यें आढळून येणाऱ्या वैशिष्ट्याचा विचार केल्यास पुढील साधारण नियम प्रामुख्यानें दिसून येतात. (१) उदात्त, अनुदात्त व स्वरित हे तीन स्वर अ, इ, उ इत्यादि स्वरांचे उच्चारणवैशिष्ट्यरूप धर्म आहेत; व्यंजनांचे धर्म नाहींत. (२) या तीन स्वरांपैकीं उदात्त हाच मुख्य स्वर आहे. (३) प्रत्येक शब्दामध्यें एकच स्वर उदात्त असतो व बाकीचे अनुदात्त असतात. (४) हल्लींच्या बोलभाषा व इंग्रजी भाषा यांतील आघात (accent) जसा असतो त्याप्रमाणेंच उदात्त स्वर आघातरूपच असतो. (५) उदात्त स्वरानें युक्त 'इ'कार अथवा 'उ'कार हा अनुदात्त स्वरानें युक्त अशा 'अ' काराशीं संधि-कार्यानें मिसळून त्याला 'य' काराचें अथवा 'व' काराचें स्वरूप प्राप्त झाल्यावर त्याच्या पुढील अकार हा खरा स्वरित असतो; व असा स्वरित ज्या शब्दांमध्यें असतो तेथें बाकीचे सर्व स्वर अनुदात्त असतात; त्या शब्दांमध्यें उदात्त स्वर नसतो. एका शब्दामध्यें उदात्ताच्या नंतर दोन

---

१. "उभे वनस्पत्यादिषु युगपत्" ( ६।२।१४० ), देवताद्वन्द्वे च ( ६।२।१४१ ) सूत्रें पहा.

२. "विभाषा भाषायाम्" ( ६।१।१७७ ) पहा.

३. "अच्चेश्छन्दस्यसर्वनामस्थानम्" ( ६।१।१६६ ), "ङ्याश्छन्दसि बहुलम्" ( ६।१।१७४ ), "जुष्टार्पिते च च्छन्दसि" ( ६।१।२।२०५ ), "आद्युदात्तं द्व्यच् छन्दसि" ( ६।२।११९ ), "विभाषा छन्दसि" ( ६।२।१६४ ) "परादिश्छन्दसि बहुलम्" ( ६।२।१९९ ) सूत्रें पहा.

४. "नित्यं मन्त्रे" ( ६।१।२०६ ) पहा.

किंवा ज्यास्त अनुदात्त स्वर आले असतां उदात्तालगतच्या अनुदात्ताचें स्वरितासारखें उच्चारण झाल्यामुळें त्यालाही पाणिनीनें स्वरित हें नांव दिलें आहे; अर्थात हा गौणस्वरितच खरा.

## १०६ उदात्तस्वराचा आघातयुक्त शब्दोच्चारणाशीं संबंध.

उदात्तस्वर हा आघातस्वरूप असा उच्चारणाचा एक प्रकारच आहे हें वर सांगितलेंच आहे. महत्त्वाची बाब म्हटली कीं तिचें उच्चारण आघातयुक्त स्वरानें करणें हें मानवी स्वभावाचें वैशिष्ट्यच आहे. वाक्यांतील प्रत्येक शब्दाला विशिष्ट तऱ्हेचें महत्त्व असतें आणि प्रत्येक शब्द कोणत्या तरी अक्षरावर आघात देऊन उच्चारला जातो. शब्दामध्यें सुद्धां प्रातिपदिक व प्रत्यय यांपैकीं प्रत्ययाला प्राधान्य असल्यामुळें साधारणतः प्रत्यय उदात्तस्वरयुक्त उच्चारला जातो. ज्या शब्दाची सिद्धि व्याकरणरीत्या एकामागून एक निरनिराळे प्रत्यय व उदात्तस्वरयुक्त आगम लागून होते त्या शब्दांतील शेवटीं लागलेल्या प्रत्ययाचा अथवा आगमाचा उदात्तस्वर सर्वांत प्रबळ ठरतो व तोच उदात्त उच्चारला जातो. आघात हा जसा अर्थावर अवलंबून राहतो तसा ह्रस्व, दीर्घ, गुरु अशा वर्णगुणावरही अवलंबून असतो. शब्दामधील गुरु स्वराचें उच्चारण हें उच्चारणस्वभावामुळेंच लघुस्वराच्या उच्चारणापेक्षां ज्यास्त आघातयुक्त असतें म्हणून धातु किंवा प्रातिपदिक एकाक्षरी ह्रस्वस्वरयुक्त असल्यास व त्याला दीर्घस्वरयुक्त प्रत्यय लागल्यास त्या प्रातिपदिकाचा किंवा धातूचा उदात्त स्वर प्रत्ययावर जातो. परंतु, प्रत्ययामुळें त्या प्रातिपदिकाचा अथवा धातूचा लघुस्वर संयोग पुढें आल्यामुळें किंवा वृद्धीनें अथवा गुणानें गुरु झाल्यास प्रातिपदिकाचा अथवा धातूचा उदात्तस्वर कायम राहतो व तसें व्हावें म्हणून पाणिनीनें त्या प्रत्ययाचा स्वर अनुदात्त सांगितलेला असतो किंवा त्या प्रत्ययाला ञ् किंवा न् अनुबंध लावलेला असतो. समासाचे बाबतींतही तत्पुरुष समासामध्यें उत्तरपदाला प्राधान्य असल्यामुळें 'समासाचा अन्त्य स्वर उदात्त असतो' हा नियम लागू पडतो. परंतु ज्या तत्पुरुष समासामध्यें पूर्वपदाचाच अर्थ प्रामुख्यानें विवक्षित असतो त्या ठिकाणीं पूर्वपदप्रकृतिस्वर कायम रहावा याविषयीं पाणिनीनें विशिष्ट विधान केलें आहे. बहुव्रीहीमध्यें पहिलें पद जरी दुसऱ्या पदाला बहुधा विशेषण असलें तरी बहुव्रीहीनें निर्दिष्ट केलेल्या अन्य पदार्थाचें एक प्रकारचें वैशिष्ट्य पूर्वपदानें दाखविलें जात असल्यामुळें पूर्वपदाचा स्वर कायम राहतो. द्विगूमध्यें संख्या ही प्रामुख्यानें दाखवावयाची असल्यामुळें पूर्वपदाचा स्वर कायम राहतो. देवताद्वन्द्वामध्यें तसेंच वनस्पति, बृहस्पति इत्यादि शब्दांमध्यें दोन्ही पदांना सारखेंच प्राधान्य असल्यानें दोन्ही पदांचा प्रकृतिस्वर कायम राहतो. हाक मारतांना प्रथम अक्षरावर जोर देणें स्वभावसिद्ध असल्यामुळें संबोधन शब्दाचा ( आमन्त्रिताचा ) आदि स्वर उदात्त होतो. यदि म्हणजे जर किंवा यत् म्हणजे जें या पदावर अर्थाच्या दृष्टीनें कमीपणा असून क्रियापदाला विशेष महत्त्व असल्यामुळें तेथें क्रियापदाचें सर्वनिघातयुक्त असें उच्चारण होत नाहीं व क्रियापदाचा स्वर कायम राहतो. समास नसतांनाही कांहीं ठिकाणीं अर्थाच्या दृढ संबन्धामुळें पुढील आमन्त्रिताशीं मागील शब्द इतका बांधला जातो कीं दोन्ही पदांमध्यें मिळून एकच मुख्य स्वर ( उदात्त ) दिसून येतो. या पदांच्या दृढ संबद्धतेला पराङ्गवद्भाव म्हणतात.

## १०७. अलुक् समास व उत्तरपदामध्यें होणारे फरक.

पाणिनिकालीं संस्कृत भाषा लोकामध्यें प्रचलित असल्यामुळें व बोलतांना शब्दप्रयोगांत होतां होईल तों प्रत्यय जोडून किंवा समास करून संबद्ध कल्पना एकत्रित सांगण्याची प्रवृत्ति

असल्यामुळें प्रत्यय जोडतांना किंवा समास करतांना उच्चारणवैशिष्ट्यामुळें पूर्वपदामध्यें होणारे परिणाम पाणिनीनें ' उत्तरपदे ' असा अधिकार चालू करून सहाव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादामध्यें दिले आहेत. त्यांपैकीं अलुक् समास हा एक महत्त्वाचा प्रकार आहे. संबद्ध दोन पदें एकापुढें एक ठेविलीं असतांना जशीं दिसतात तशींच बाह्यतः अलुक् समासामध्यें दिसतात, व आंतील विभक्तींचा लोप न होतांही दोन पदांचा समास झाला आहे असें मानण्यांत येतें. याला कारण अलुक् समासामध्यें दोन्ही पदांना मिळून एकच उदात्त स्वर असतो व सामासिक अर्थ हा विशिष्ट तऱ्हेनें संबद्ध असा मनांत येतो. उत्तरपदामुळें पूर्वपदाला होणाऱ्या आदेशांमध्यें पूर्वपदाच्या शेवटच्या ' ऋ ' या वर्णाला आनङ् ( आ ) आदेश, 'इ' काराला ' ई ' आदेश, तसेंच दीर्घ ' ई ' ला ह्रस्व ' इ ' यांची प्रामुख्यानें गणना होते. यांशिवाय पूर्वपदाच्या शेवटीं स्त्रीलिंगी प्रत्यय असल्यास तो जाऊन प्रातिपदिकाचें शुद्ध स्वरूपही पूर्वपदाला कांहीं ठिकाणीं प्राप्त होतें. अशा तऱ्हेच्या परिणामाला पुंवद्भाव म्हणून संबोधण्यांत येतें. यांशिवाय पूर्वपदाच्या शेवटच्या स्वराला ह्रस्व दीर्घ वगैरे आदेशही होतात व कांहीं ठिकाणीं पूर्वपदाच्या स्वरूपामध्यें हृदय शब्दाला हृद् आदेश, महत् शब्दाला महा आदेश, पाद शब्दाला पद् आदेश, उदक शब्दाला उद् आदेश अशा प्रकारचे महत्त्वाचे बदलही झालेले दृष्टीस पडतात. यांशिवाय पूर्वपदाच्या शेवटीं ' म् ' हा वर्णही ज्यास्त घातलेला अनेक ठिकाणीं दृष्टीस पडतो.

## १०८ एकश्रुति अथवा स्वररहित उच्चारण.

पाणिनिकालीं वेदवाक्यांचेंच नव्हे, तर लौकिकवाक्यांचें सुद्धां, स्वरांसहित उच्चारण होत असें, असें वर म्हटलेंच आहे. परंतु " एकश्रुति दूरात्संबुद्धौ " ( १।२।३३ ) पासून "उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः " ( १।२।४० ) या सूत्रांचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास वैदिक वाक्यांचे बाबतींत यज्ञकर्म चालू असतांना उपयोगांत आणिलेल्या मंत्रांचें स्वरासहित उच्चारण पाणिनिकालींसुद्धां केव्हां केव्हां होत नसे. " विभाषा छन्दसि " ( १।२।३६ ) या सूत्रावरून तर प्रसंगविशेषीं वाटेल त्या मन्त्राचें स्वररहित उच्चारण होत असे असें दिसून येतें. " न सुब्रह्मण्यायाम्० " या सूत्रावरून उदात्त व अनुदात्त हेच दोन मुख्य स्वर होते असें दिसून येतें व " समाहारोच्चोश्चेन्नाभावात् " ( १।२।३१ वा. १, २, ३ ) इत्यादि तीन वार्तिकांवरून त्याला पुष्टि मिळते. वार्तिककारांचे कालीं स्वररहित उच्चारणाचा ज्यास्तच प्रचार झाला असावा. कारण, उदात्त याचा अर्थ काय अशी शंका " उच्चनीचस्यानवस्थितत्वात्संज्ञाऽप्रसिद्धिः " ( पा. सू. १।२।२९ वा. १ ) या वार्तिकांत उपस्थित करून पुढील " सिद्धं तु समानप्रक्रमवचनात् " या वार्तिकांत तिचें उत्तर दिलें आहे. भाष्यकारांनीं या ठिकाणीं फारच मार्मिक विवेचन केलें आहे; व उदात्त स्वराचें स्पष्टीकरण दिलें आहे (महाभाष्य भाग १ पृ.५०२-५०५). पाणिनीचे कालीं जरी केव्हां केव्हां वैदिक मन्त्रांचें स्वररहित उच्चारण होत असलें तरी वेदाचा त्रैस्वर्यपाठच त्याला संमत होता व वेदमन्त्रांचें सस्वर उच्चारण व्हावें असें त्याचें मत होतें इतकेंच नव्हे, तर लौकिक भाषेमध्येंही सस्वर उच्चारणच त्याला इष्ट होतें. तसें जर नसतें तर इतक्या परिश्रमपूर्वक त्यानें सूत्रामागून सूत्रें रचून विस्तृत स्वर-प्रकरण लिहिलेंच नसतें. सस्वर

---

१ हें स्वरप्रकरण " अनुदात्तं पदमेकवर्जम् " ( ६।१।१५८ ) येथें सुरू होऊन " परादिश्छन्दसि बहुलम् " ( ६।२।१९९ ) येथें पुरें होतें. या प्रकरणांत प्रकृतींचे, प्रत्ययांचे व समासांचे स्वर विस्तारानें सांगितले आहेत. स्वर हे प्रामुख्यानें वेदग्रंथांमध्येंच आढळून येत असले तरी या प्रकरणांत स्वर सांगतांना

उच्चारणाच्या उपयुक्ततेविषयीं विचार केल्यास " इन्द्रशत्रुर्वर्धस्वेन्द्र०" इत्यादि मन्त्रामध्यें स्वरप्रमाद घडला असतां काय परिणाम घडतो याचें विवेचन भाष्यकारांनीं "यथेन्द्रशत्रुः स्वरतोपराधात्" " यो वा इमाम्०" इत्यादि वाक्यांची व्याख्या लिहितांना केलेंच आहे. ( म. भा. भाग १ पृ. ४–६ ). लोकामध्यें सुद्धां सस्वर उच्चारण केलें असतां अर्थाविषयीं येणारा संशय पुष्कळ ठिकाणीं दूर होतो. ज्या ठिकाणीं एका पदाचे दोन अर्थ असतात तशीं पदें किंवा कवींनीं आपल्या काव्यांत श्लिष्ट म्हणून मुद्दाम उपयोगांत आणलेलीं अपतितया, न तया इत्यादि पदें जरी बाजूला ठेविलीं तरी विस्तृत अर्थ थोडक्या शब्दांत प्रतिपादन करणें हें वैशिष्टय असलेल्या संस्कृत भाषेमध्यें दोन निरनिराळे पदच्छेद असलेल्या अविक्रम, अविनाश, विप्रयोग, वगैरे अनेक शब्दांचा इष्ट अर्थ स्वरासहित शब्दोच्चारण केलें असतां ज्यास्त सुलभ रीतीनें ध्यानांत येतो हें निर्विवाद आहे.

## १०९ अङ्गाधिकार व आभीयप्रकरण.

पाणिनीय अष्टकांतील अङ्गस्य ( ६।४।१ ) या सूत्राला आरंभ करून सातव्या अध्यायाच्या अखेरपर्यंत पांच पादांना दिलेलें अङ्गाधिकार हें नांव वैयाकरण कुलांमध्यें प्रसिद्धच आहे. ज्या शब्दस्वरूपाला उद्देशून प्रत्यय सांगितले आहेत तें अङ्ग अशी ' अङ्ग ' शब्दाची व्याख्या देण्यांत येते. निरनिराळ्या प्रांतांतील शब्द व त्यांचे विशिष्ट उच्चारणप्रकार सामील करून तयार झालेल्या पाणिनिकालच्या जीवंत संस्कृतभाषेंत ज्याप्रमाणें प्रत्ययांची विविधता दिसून येते त्याप्रमाणेंच त्या प्रत्ययांमुळें प्रकृतिभूत शब्दाला म्हणजे अंगाला होणारे विकार व अङ्गामुळें त्या प्रत्ययांना होणारे विकार यांचीही विविधता असणें अगदीं स्वाभाविक आहे. अशा तऱ्हेनें अङ्गाला होणाऱ्या विकारांपैकीं आत्व, इत्व, ईत्व, इयङ्, उवङ्, ऊत्व, एत्व, यण् व संप्रसारण हे आदेश; अट्, आट्, युट्, वुक्, आणि रम् हे आगम; य अ, आ, अन्, न्, णि, उपधा आणि अभ्यास यांचा लोप हे मुख्यतः चवथ्या पादामध्यें दिले

---

पाणिनीनें नेहमींप्रमाणें लौकिक व वैदिक भाषा मिळूनच भाषेचें स्वरूप मनांत ठेऊन स्वरांचें विवेचन केलें आहे; व भाषेमध्यें जेथें एखादा विशिष्ट स्वर आढळत नाहीं पण वेदामध्येंच आढळतो तेथें छन्दसि अथवा मन्त्रे असा शब्द त्यानें सूत्रांत घातला आहे. या स्वर-प्रकरणांत ज्या प्रत्ययांचे स्वर सांगितले आहेत ते भाषेमध्यें नेहमीं उपयोगांत असणारेच प्रत्यय आहेत; पण विशेष म्हणजे " गन्तव्यपण्यं वाणिजे " ( ६।२।१३ ), " मात्रोपज्ञोपक्रमच्छाये नपुंसके " ( ६।२।१४ ), " राजन्यबहुवचनद्वन्द्वेऽन्धकवृष्णिषु " ( ६।२।३४ ), " कार्तकौजपादयश्च " ( ६।२।३७ ), " महान्व्रीह्यपराह्ण० " ( ६।२।३८ ), " कुरुगार्हपत० " ( ६।२।४२ ), " प्राचां क्रीडायाम् " ( ६।२।७४ ), " घोषादिषु च " ( ६।२।८५ ) इत्यादि अनेक सूत्रांमध्यें ज्या शब्दांच्या स्वरांचें विवेचन केलें आहे ते भाषेमध्येंच आढळणारे शब्द आहेत. यावरून पाणिनिकालीं सस्वर उच्चारणपद्धति होती हें निश्चित होतें.

१. " काले वारिधराणा**मपतितया** नैव शक्यते स्थातुम् ।
उत्कण्ठितासि तरले नहि नहि सखि पिच्छिलः पन्थाः ॥ "
" कान्ते धावय मे पादाविति भर्त्रा नियोजिता ।
**न तया** धाविनौ पादौ भर्तुराज्ञा न लङ्घिता ॥ "

२. अविक्रम या ठिकाणीं अवि+क्रम त्याप्रमाणेंच अ+विक्रम, अविनाश यामध्यें अवि+नाश तसाच अ+विनाश, व विप्रयोग येथें वि+प्रयोग तसाच विप्र+योग, अशा रीतीनें पदच्छेद होऊं शकतात.

आहेत. हे विकार होण्याकरितां निमित्तें अगदीं सामान्य तऱ्हेचीं असल्यामुळें व अङ्ग हें एकच निमित्ती असल्यामुळें कांहीं उदाहरणांमध्यें एकाच वेळीं दोन तीन कार्यें उपस्थित होतात व तीं सर्व करणें इष्ट असतें. अशा ठिकाणीं "विप्रतिषेधे परं कार्यम्" हा नियम लावून पर कार्य आधीं केलें तरी, किंवा परं शब्दाचा इष्ट असा अर्थ करून पूर्व कार्य आधीं केलें तरी, राहिलेल्या कार्याचें निमित्त नाहींसें झाल्यामुळें तें कार्य होणें इष्ट असूनही होऊं शकत नाहीं. अशा वेळीं दुसरें कार्य होण्याकरितां पूर्व कार्य झालें असलें तरी तें न झाल्यासारखें मानणें हा पाणिनीनें उपाय काढला व त्याकरितां "असिद्धवदत्राभात्" (पा. सू. ६।४।२२) असें विधान करून 'अत्र' म्हणजे सूत्रें २३–१७५ मध्यें जीं कार्यें सांगितलीं आहेत त्यांपैकीं एकाच निमित्तानें दोन कार्यें आलीं असतां त्यांतलें एक परत्वास्तव किंवा नित्यत्वास्तव करावें व नंतर तें झालेलें कार्य असिद्ध मानून, म्हणजे नाहींसें झालेलें निमित्त कायम आहे असें समजून, दुसरेंही कार्य करावें असें सांगितलें आहे. उदाहरणार्थ, अस् व शास् धातूंच्या पुढें 'हि' प्रत्यय असतांना "घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्च" (६।४।११९) या सूत्रानें, 'अस्' ला 'ए' आदेश व "शा हौ" (६।४।३५) या सूत्रानें 'शास्' याला 'शा' आदेश प्राप्त होतात व त्याबरोबरच 'हि' प्रत्ययाला 'धि' आदेश "हुझल्भ्यो हेर्धिः"(६।४।१०१) या सूत्रानें प्राप्त होतो. या ठिकाणीं 'अस्'ला 'ए' व 'शास्'ला 'शा' असे आदेश करूनही ते केले नाहींत असें समजून 'हि' याला 'धि' आदेश करण्यांत येतो. याउलट या प्रकरणामधील एक कार्य केल्यावर तें झाल्यामुळेंच दुसरें कार्य प्राप्त झालें तर तें झालेलें कार्य असिद्ध समजून दुसरें कार्य करूं नये असाही असिद्धत्वाचा उपयोग करण्यांत येतो. त्यामुळें जहि येथें 'हन्' याला 'ज' आदेश "हन्तेर्जः" (६।४।३६) या सूत्रानें झाल्यावर "अतो हेः" (६।४।१०५) या सूत्रानें 'हि' चा लुक् प्राप्त होतो पण तो होत नाहीं. 'अन्तरङ्ग कार्य कर्तव्य असतांना बहिरङ्ग कार्य असिद्ध होतें व अर्थात् त्यामुळें अन्तरङ्ग कार्य प्रथम होतें; व बहिरङ्ग कार्य झालेलें असेल तर तें असिद्ध होतें' या अर्थाचा 'अन्तरङ्ग-परिभाषा' नांवानें प्रसिद्ध असलेला संकेत पाणिनीनें दिला नसला तरी प्रथमतः कात्यायनानें व त्यानंतर भाष्यकार व इतर वैयाकरणांनीं त्याचा फार उपयोग केला आहे. आभीयासिद्धत्वाची कल्पना अन्तरङ्गासिद्धत्व कल्पनेच्या मुळाशीं असावी[1].

## ११०. प्रत्ययांचे दोन प्रकार.

पाणिनीच्या व्याकरणांत दोन प्रकारचे प्रत्यय दृष्टीस पडतात. धातु किंवा प्रातिपदिक या रूपाच्या मूळ प्रकृतीला लागणारे सुप् प्रत्यय, तिङ् प्रत्यय, कृत् प्रत्यय, तद्धित प्रत्यय, व विकरण प्रत्यय हे पहिल्या प्रकारांत येतात; आणि, हे प्रत्यय लागल्यामुळें मागच्या प्रकृतीला अंग म्हणण्यांत आल्यावर त्या अंगामुळें या प्रत्ययांना होणारे जे आदेशभूत प्रत्यय ते दुसऱ्या प्रकारांत येतात. झ ठ फ ढ वगैरे प्रत्ययांना होणारे आदेश व विभक्ति-प्रत्ययांना होणारे आदेश हे अंगामुळें होणारे असल्यामुळें त्यांचा दुसऱ्या प्रकारांत अंतर्भाव होतो. हे प्रत्ययांचे आदेश व प्रत्ययामुळें होणारे अंगविकार अंगाधिकारामध्यें दिले आहेत. त्यांमध्यें धातूंना होणारे वृद्धि व गुण, तसेच धातूंना लागणारे नुम् आगम व इट् आगम, तसेच त्यांचे निषेध यांची प्रामुख्यानें गणना होते. पाणिनीनें हे सर्व प्रत्यय, आगम व आदेश अंगाधिकारामध्यें सविस्तर सांगितले आहेत. त्याप्रमाणेंच अंगाला होणारे दीर्घ, ह्रस्व, एत्व, ईडागम, नुडागम, पुगागम इत्यादि विकारांचेंही

1. "असिद्धवचनमुत्सर्गलक्षणभावार्थमादेशलक्षणप्रतिषेधार्थं च" असा 'असिद्ध' शब्दाचा उपयोग सांगितला आहे. (म. भाष्य. भाग ५ पृ. ३८६ तसेंच पृ. १३१ पहा.)

त्यानें संपूर्ण विवेचन केलें आहे; व सर्वांत शेवटीं निरनिराळे लट्, लिट्, लङ्, लिङ् इत्यादि लकार प्रत्यय पुढें असतांना होणारीं अंगकार्यें त्यानें दिलीं आहेत.

## १११. द्विरुच्चारण.

लोकव्यवहारामध्यें प्रयोगयोग्य पद कांहीं प्रसंगीं दोनदां उच्चारण्यांत येत असतें. धातु-साधित धातु किंवा आख्यात (तिङन्त) साधतांनाही कांहीं वेळां धातूचें द्विरुच्चारण होत असतें. त्याप्रमाणेंच संयुक्त व्यंजनामधील एका व्यंजनाचेंही द्विरुच्चारण होतें. या सर्वांना द्वित्व हा शब्द सारखाच लागू पडतो. धातूच्या किंवा वर्णांच्या द्विरुच्चारणाला साधारणपणें द्वित्व ही संज्ञा देण्यांत येते; म्हणून संपूर्ण सुबन्त अथवा तिङन्त शब्दांच्या द्वित्वाला[3] द्विरुच्चारण म्हणणें ज्यास्त सोयीचें होईल. या द्विरुच्चारणाच्या दुसऱ्या भागाला आम्रेडित अशी संज्ञा पाणिनीनें दिली आहे. लोकामध्यें मात्र दोनदां उच्चारलेल्या समग्र शब्दस्वरूपाला आम्रेडित म्हणतात. साधारणपणें पाहिल्यास तिङन्त शब्दांचें किंवा क्रियापदांचें द्विरुच्चारण क्रियेचें सातत्य असतांना दृष्टीस पडतें व सुबन्तांचे द्विरुच्चारण वीप्सा विवक्षित असतांना आढळून येतें. यां-शिवाय प्र, परि, सम्, उप, उद्[6] या उपसर्गांचें, अधि, अधस् व उपरि या अव्ययांचें, तसेंच संबोधनार्थी उच्चारलेल्या शब्दांचेंही द्विरुच्चारण विशिष्ट प्रसंगीं आढळून येतें.

## ११२. सर्वनिघात.

भाषेमध्यें उच्चारलेल्या प्रत्येक पदामध्यें एक उदात्त असतो व बाकी सर्व स्वर अनुदात्त असतात हें मागें सांगितलेंच आहे. त्याप्रमाणेंच उदात्त स्वर हा आघातस्वरूपाचा असतो व तो अर्थमहत्त्वाप्रमाणें प्रकृतीवर, किंवा प्रत्ययावर, किंवा सामासिक पदांमधील पूर्वपदावर किंवा उत्तरपदावर दिलेला आढळून येतो; तसेंच, केव्हां केव्हां तो दीर्घ उच्चारलेल्या जाणाऱ्या वर्णावरही अवलंबून असतो हेंही मागें सांगितलें आहे. ज्याप्रमाणें प्रत्येक पदांतील महत्त्वाच्या विभागावर उदात्त अवलंबून असतो त्याप्रमाणें संबद्ध पदें एकत्रित करून वाक्य उच्चारलें जातें तेव्हां इतर पदांच्या मानानें एकादें पद बरेंच कमी महत्त्वाचें असल्यास त्या पदावर मुळींच आघात दिला जात नाहीं व त्यांतील सर्व स्वरांचें अनुदात्त उच्चारण होतें. अशा प्रकारच्या संपूर्ण अनुदात्त उच्चारणाला 'सर्वनिघात' म्हणण्याची वहिवाट आहे. युष्मद् व अस्मद् शब्दांचीं एकाक्षरीं रूपें अनुदात्त असतात. पादाच्या अथवा वाक्याच्या आरंभीं नसलेल्या आमन्त्रितालाही सर्व-निघात होतो. त्याप्रमाणेंच गतिसंज्ञकाच्या पुढें दुसरा गतिसंज्ञक उपसर्ग असल्यास मागील गतिसंज्ञक अनुदात्त होतो. या बाबतींत विशेष महत्वाची बाब म्हणजे 'क्रियापदाशिवाय दुसरा कोणताही शब्द मागें असलेलें क्रियापद सर्वानुदात्त होतें' हा सर्वसाधारण नियम पाणिनीनें

---

१. याविषयीं पाणिनिसूत्रें ६।१।१ ते ६।१।१२ पहा.

२. याविषयीं पाणिनिसूत्रें "अचो रहाभ्यां द्वे," तसेंच "अनाचि च" (८।४।४६–४७) पहा.

३. याविषयीं "सर्वस्य द्वे" इत्यादि सूत्रें (८।१।१ ते ८।१।१५) पहा.

४. "तस्य परमाम्रेडितम्" (पा. सू. ८।१।२) पहा. 'आम्रेडितं द्विस्त्रिरुक्तं०' असा अमर-कोशांत श्लोक आहे.

५. "अनुदात्तं पदमेकवर्जम्" (पा. सू. ६।१।१५८) पहा.

६. याविषयीं "युष्मदस्मदोः षष्ठीचतुर्थीद्वितीयास्थयोर्वान्नावौ" (पा. सू. ८।१।२०) पहा.

७. "गतिर्गतौ" (पा. सू. ८।१।७०) पहा.

सांगितला आहे; व त्याला अपवादस्थळेंही अनेक दिलीं आहेत; त्यांतील महत्वाचा अपवाद म्हणजे यदि शब्द किंवा यद् शब्दाचें रूप वाक्यांत जर त्या क्रियापदाशीं संबद्ध असेल तर त्या क्रियापदाला सर्वानुदात्त होत नाहीं हा आहे व लौकिक उच्चारणांत तसा अनुभवही येतो.

## ११३. भाषेमधील व्यंजनान्त प्रातिपदिकें.

भाषेमधील सर्व प्रकारच्या सुबन्त व तिङन्त शब्दांचें व्याकरण म्हणजे रूपसिद्धि व अर्थाचें विवेचन सव्वासात अध्यायांमध्यें केल्यानंतर शेवटच्या तीन पादांमध्यें पदें समन्वित करून वाक्य उच्चारण्याचे वेळीं पदांतील शेवटच्या वर्णांना होणारे आदेश पाणिनीनें दिले आहेत. त्याप्रमाणेंच दोन पदांच्या अतिशयित सांनिध्यामुळें पदांतील वर्णांना होणारे विकार — विशेषतः पहिल्या पदाच्या शेवटच्या वर्णाला व दुसऱ्या पदाच्या आदिवर्णाला होणारे विकार— त्यानें दिले आहेत; पदांमधील वर्णांनाही द्वित्व किंवा णत्व यांसारखे होणारे विकार त्यानें दिले आहेत. यांतील बहुतेक विकार वर्णोच्चारणाचे बाबतींत होणाऱ्या प्रांतीय वैशिष्ट्यामुळेंच घडून आलेले दिसतात. संस्कृत भाषेंत प्रयोगयोग्य सुबन्त व तिङन्त शब्दांपैकीं बहुसंख्य शब्द अजन्त म्हणजे स्वर शेवटीं असलेलेच दिसून येतात. स् या व्यंजनाला झालेला विसर्ग तसाच म् या व्यंजनाला झालेला अनुस्वारही शब्दाच्या शेवटी अनेक वेळां येतो. स्वरांमध्यें सुद्धां ऋ व ऌ हे क्वचितच आढळतात. व्यंजनांपैकीं मात्र वर्गांतील दुसरीं व चौथीं व्यंजनें, च-वर्गांतील व्यंजनें व त्याप्रमाणेंच य, र, ल, व, श, ष, स, ह हीं व्यंजनें प्रयोगयोग्य शब्दांच्या शेवटीं आढळून येत नाहींत. धातूंच्या शेवटीं कोणताही वर्ण (स्वर अथवा व्यंजन) असतो. त्याप्रमाणेंच प्रातिपदिकाचे शेवटीं कोणतेंहि व्यंजन असूं शकतें. अव्युत्पन्न प्रातिपदिकें हीं साधारणतः स्वरान्त असलीं तरी व्युत्पन्न प्रातिपदिकांच्या शेवटीं कोणताही स्वर किंवा कोणतेंही व्यंजन येऊं शकतें. कारण, भाषेमध्यें धातूंच्या शेवटीं बहुतेक सर्व व्यंजनें आढळतात; व क्विप् प्रत्यय लागून धातूपासून जसेंच्या तसें म्हणजे धातूच्याच स्वरूपाचें क्विबन्त प्रातिपदिक होऊं शकतें. अशा प्रकारच्या व्यञ्जनान्त प्रातिपदिकांना लागलेल्या प्रथमा-एकवचनाच्या सु प्रत्ययाचा सदा लोप होत असल्यामुळें कोणतेंही व्यंजन सुबन्ताच्या शेवटीं जरी येऊं शकलें तरी लोकांमधील शब्दप्रयोगांमध्यें मात्र क, ट, त, आणि प या चार वर्गांतील व्यंजनें आणि त्यांतील सुद्धां पहिली, तिसरीं व कांहीं ठिकाणीं पांचवीं हींच व्यंजनें पदाच्या शेवटीं दृष्टीस पडतात.

## ११४. प्रातिपदिकांचे सुबन्त प्रयोग.

पाणिनीनें अशा तऱ्हेनें विवक्षित व्यंजनेंच सुबन्तांच्या शेवटीं येण्याकरितां कांहीं विवक्षित कार्यें सांगितलीं आहेत. 'ह्' वर्णाला ढ किंवा घ सांगितल्यामुळें हकारान्त प्रातिपदिकाचें प्रथमा एकवचनाचें रूप ट् किंवा ड्, त्याप्रमाणेंच क् किंवा ग् शेवटीं असलेलेंच आढळून येतें. य्, र्, ल् अथवा व शेवटीं असलेलें प्रथमा एकवचनीं रूप प्रयोगांत आढळूनच येत नाहीं; फक्त पुनर् सारखीं अव्ययें किंवा ऋकारान्त शब्दाच्या संबोधनाचें रूप यांमध्येंच 'र्' वर्ण शेवटीं आढळून येतो. 'श'काराला 'ष'कार होतो व षकाराला जश्त्व होऊन ट्

१. "तिङतिङः" (पा. सू. ८।१।२८) पासून "कुत्सने च सुप्यगोत्रादौ" (८।१।६९) सूत्रें पहा.

२. याविषयीं "निपातैर्यद्यदिहन्त०" (८।१।३०) पहा.

३. याविषयीं 'हो ढः" इत्यादि तीन सूत्रें (८।२।३१-३३) पहा.

४. "व्रश्चभ्रस्जसृज०" (८।२।३६) पहा.

किंवा ड् शेवटीं येतो. सकार शेवटीं आल्यास त्याला र आणि नंतर विसर्ग होतो व विसर्गाचाही लोप होतो किंवा त्याला 'ओ' आदेश होतो. च–वर्गातील व्यंजन शेवटीं आल्यास त्याला क वर्गातील व्यंजन आदेशरूपानें होऊन क् किंवा ग् शेवटीं येतो. सुबन्ताच्या शेवटच्या मकाराला केव्हां केव्हां अनुस्वार होतो. पूर्वपदांतील निमित्तामुळें पदाच्या आरंभींच्या वर्णाला होणाऱ्या कार्यांमध्यें षत्व आणि णत्व यांचा प्रामुख्यानें अंतर्भाव होतो. पाणिनीनें षत्व व णत्व यांबद्दल अनेक नियम व अपवाद सांगितले आहेत. त्यावरून ज्या ज्या शब्दांमध्यें ण् किंवा ष् दृष्टीस पडतो ते सर्व शब्द मूळचे णकारादि किंवा षकारादि असे मूळ प्रांतीय उच्चारणांत असावे, असा निष्कर्ष निघू शकेल. पूर्वपदांतील शेवटचें व्यंजन व उत्तरपदांतील पहिलें व्यंजन यांमध्येंही एकमेकांच्या सांनिध्यामुळें कांहीं फरक दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ—सकार व त-वर्गातील व्यंजनांना शकार व चवर्गीय व्यंजनाचा योग आला असतां शकार व तवर्गीय व्यंजन होतें. यालाच वैयाकरण–संप्रदायामध्यें श्चुत्व म्हणतात. श्चुत्वाप्रमाणेंच ष्टुत्वही षकार किंवा टवर्गीय व्यंजनाचा योग आला असतांना होतें. त्याप्रमाणेंच वर्गाच्या चवथ्या, तिसऱ्या, दुसऱ्या व पहिल्या व्यंजनाला तिसरें व्यंजन होतें व कांहीं ठिकाणीं पहिलें व्यंजनही होतें. शेवटच्या नकाराचा केव्हां केव्हां लोप होतो. तसेंच ङ, ण किंवा न् हा पदाचे शेवटीं असून त्याच्या पुढें स्वर आल्यास आणखी ङ्, ण् किंवा न् उच्चारण्यांत येतो. यांशिवाय दोन किंवा ज्यास्ती व्यंजनांचा संयोग असल्यास त्यांतील एका व्यंजनाचें द्विरुच्चारणही केव्हां केव्हां होतें; तसेंच, केव्हां केव्हां दुसरें एकादें व्यंजनही ज्यास्त घालण्यांत येतें. वर दिलेलीं सर्व कार्यें हीं प्रांतीय उच्चारण-वैशिष्ट्याचेच निरनिराळे परिणाम भाषेमध्यें प्रसृत झाल्याचीं द्योतक आहेत असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं.

१. "ससजुषो रुः" (८।२।६६), "खरवसानयोर्विसर्जनीयः" (८।३।१५), "रोः सुपि" (८।३।१६), "भोभगोअघोअपूर्वस्य योऽशि" (८।३।१७) "व्योर्लघुप्रयत्नतरः शाकटायनस्य" (८।३।१८) "लोपः शाकल्यस्य" (८।३।१९) "ओतो गार्ग्यस्य" (८।३।२०) व "हलि सर्वेषाम्" (८।३।२२) हीं सूत्रें पहा.

२. "चोः कुः" (८।२।३०) पहा.

३. "मोऽनुस्वारः" (८।३।२३) पहा.

४. याविषयीं "इणः षः (८।२।३९) पासून "निव्यभिभ्योड्व्यवाये वा छन्दसि" (८।३।११९) सूत्रें, त्याप्रमाणेंच "रषाभ्यां नो णः समानपदे" (८।४।१) पासून "क्षुभ्नादिषु च" (८।४।३९) पर्यंत सूत्रें पहा.

५. "स्तोः श्चुना श्चुः" (८।४।४०) पहा.

६ "ष्टुना ष्टुः (८।४।४१) पहा.

७. याविषयीं "झलां जश् झशि" (८।४।५३) पासून "वावसाने" (८।४।५६) पर्यंत सूत्रें पहा,

८. 'नलोपः प्रातिपदिकान्तस्य" व "न ङिसंबुद्ध्योः" (८।२।७, ८) सूत्रें पहा.

९. ""ङमो ह्रस्वादचि ङमुण्नित्यम्" (८।३।३२) सूत्र पहा.

१०. याविषयीं "अचो रहाभ्यां द्वे" (८।४।४६) पासून "झरो झरि सवर्णे" (८।४।६५) पर्यंत सूत्रें पहा.

११. याविषयीं "ङ्णोः कुक्टुक् शरि" (८।३।२८) पासून "शि तुक्" (८।३।३१) पर्यंत सूत्रें पहा.

# वार्तिककाल, शकपूर्व ३००–२००

## ११५. वार्तिक–वचनांची आवश्यकता व रचना.

व्याकरणशास्त्रासारख्या गहन व विस्तृत विषयाचें पाणिनीनें केलेलें निरूपण किती जरी सर्वांगपरिपूर्ण असलें तरी सूत्रें रचितांना त्यानें अत्यंत लाघवयुक्त पद्धतीचा स्वीकार केल्यामुळें त्याच्या ग्रंथाचें अध्यापन करतेवेळीं महत्त्वाच्या सूत्रांचें विस्तृत विवेचन करणें अध्यापकांना भाग पडलें. अतिपूर्वेकडील प्रांत सोडल्यास भारतांतील निरनिराळ्या सर्व प्रांतांमध्यें पूर्वींचे व्याकरणग्रंथ पार मागें पडले व पाणिनीच्या अष्टाध्यायीचा जोरानें पुरस्कार[१] झाला. निरनिराळ्या आचार्यांनीं आपल्या शिष्यगणांना पाणिनीच्या सूत्रांचा योग्य अर्थ व सूत्रांतील निरनिराळ्या पदांचा उपयोग व महत्त्व समजावून देतांना सूत्रांवर आपण स्वतः केलेल्या चर्चेंपैकीं महत्त्वाचे मुद्दे स्मरणास उपयुक्त पडतील अशा रीतीनें सूत्रांच्या अत्यंत लाघवयुक्त पद्धतीनें संग्रथित करून ठेविले व पूर्वपक्षोत्तरपक्षमालारूप विवेचनावर स्मरणोपयुक्त संग्रहकारिका रचिल्या. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या शास्त्रांतील प्रमेयें हीं बहुतांशीं बुद्धिगोचरच असल्यामुळें त्यांचें प्रतिपादन करतांना अनेक प्रकारचे विचारप्रवाह व मतभेद दिसून येतात. व्याकरणशास्त्र हें प्रचलित भाषेमध्यें आढळून येणाऱ्या शब्दप्रयोगांवर अधिष्ठित असल्यामुळें त्यांमध्यें मतभेदांना व बौद्धिक कल्पनासंभारांना वस्तुतः जागा जरी नसली तरी भाषेमध्यें सारखे होणारे बदल व शब्दसमृद्धीची वाढ यांचेकडे नजर देऊन सूत्रांचें स्पष्टीकरण करतांना सूत्रांना पुरवणी म्हणून व्याख्यानाचे वेळीं व्याख्यानकर्त्यांना अनेक बारीकसारीक गोष्टींची नोंद करावी लागली; तसेंच, सूत्रें अत्यंत संक्षिप्त असल्यामुळें विस्तृत विवेचन देऊन त्याचा सारांशही थोडक्या शब्दांत ग्रथित करून ठेवावा लागला. शिवाय, सूत्रांचें स्पष्टीकरण करतांना इतर शास्त्रांमध्यें चालू असलेली पद्धति स्वीकारून सूत्राचें प्रयोजन, सूत्रांतील शब्दांची उपयुक्तता, तान्त्रिक अडचणी, सूत्रांवर आक्षेप, त्यांचें निराकरण इत्यादि गोष्टींवर भर देऊनही सूत्रांचें विवेचन करणें भाग पडलें व निरनिराळ्या आचार्यांनीं तें यथायोग्य केलें. कांहीं विशिष्ट ठिकाणींच आपल्या बुद्धिविभवावर भर देऊन इतर प्रकारानें इष्टसिद्धि होत असल्यामुळें सूत्रांतील कांहीं पदांचें किंवा सूत्रांचें त्यांनीं वैयर्थ्य दाखविलें आहे.

## ११६. वार्तिककारांमध्यें कात्यायनाचें स्थान.

वर निर्दिष्ट केलेल्या रीतीनें अनेक व्याख्यानकर्त्यांनीं पाणिनिसूत्रांचीं व्याख्यानें केलीं व त्यांचें लाघवयुक्त टांचण करून ठेवलें. या टांचणांना वार्तिकें म्हणून संबोधण्याचा प्रघात पडला. अशा भारद्वाज, सौनाग, कुणरवाडव, क्रोष्ट्रीय, इत्यादि सांप्रदायिक वार्तिककारांमध्यें कात्यायनाची गणना मुख्यत्वानें करण्यांत येते. कात्यायनानें स्वतः कोणतीं वार्तिकें रचिलीं व इतर वार्तिककारांनीं कोणतीं रचिलीं हें निवड करून सांगणें फार कठिण– फार काय अशक्यच– आहे. कात्यायनाचा वार्तिकपाठ म्हणून हल्लीं छापलेल्या ग्रंथाला जुन्या परंपरेचा आधार बिलकूल नाहीं. स्वतः भाष्यकारांनीं अमुक वार्तिक कात्यायनाचें आहे असें म्हटलें आहे त्या ठिकाणीं, तसेंच कैयट वगैरे टीकाकारांनीं तसें म्हटलें आहे तेथेंच फक्त, तीं वार्तिकें कात्यायनाचीं आहेत असें निश्चितपणें म्हणतां येईल असें जरी खरें असलें तरी भाष्यामध्यें भाष्यकारांनीं उद्धृत केलेल्या वार्तिकांपैकीं बहुसंख्य वार्तिकें कात्यायनानेंच रचिलीं असावीं. सूत्रांच्या धाटणीवर लिहिलेलीं बहुतेक सर्व

वार्तिकें कात्यायनाचींच असावीं. महाभाष्यकारांनीं या सर्व वार्तिकांचा कर्ता कात्यायन आहे असें कोठेंही म्हटलें नसलें व कात्यायनाचा नांवानें उल्लेख दोन तीन वेळांच केलेला असला तरी त्यांनीं उद्‌धृत केलेल्या वार्तिकांमध्यें आढळणाऱ्या ' उक्तम् ', ' उक्तं तु ' अशा शब्दांनीं केलेले उल्लेख पूर्वी उद्धृत केलेल्या वार्तिकांनाच लागू पडत असल्यामुळें सूत्रपद्धतीनें रचिलेल्या गद्यमय सर्व वार्तिकांचा संग्रहकर्ता तरी एकच आहे असें म्हणावें लागतें. जेथें निराळा कर्ता आहे तेथें त्याच्या नांवाचा उल्लेख भाष्यकारांनीं केला आहे. अव्युच्छिन्न गुरुशिष्यपरंपरेमध्यें सर्व वार्तिकें कात्यायनानें रचिलीं असा समज आहे. तसेंच, पाणिनीय व्याकरण हें 'त्रिमुनि' म्हणून संबोधण्यांत येतें व तीन मुनी म्हणजे पाणिनि, कात्यायन व पतंजलि असें मानण्यांत येतें. या सर्व कारणांवरून बहुतेक गद्यमय संक्षिप्तवचनात्मक वार्तिकें कात्यायनानें रचिलीं असें मानण्यांत येतें.

## ११७. कात्यायनाची कामगिरी.

पाणिनीच्या सूत्रांचें विवेचन करण्याचे कामीं कात्यायनानें जी कामगिरी केली ती निःसंशय फारच श्रेष्ठ दर्जाची व महनीय आहे. अत्यंत परिश्रमपूर्वक रचिलेल्या सुमारें चार हजार सूत्रें असलेल्या पाणिनीच्या अष्टाध्यायी या सूत्रग्रंथावर त्यानें सुमारें ४२०० वार्तिकें रचिलीं. कांहीं सूत्रांवर एक दोन तर कांहीं सूत्रांवर पन्नासांचे पेक्षां ज्यास्त इतकीं वार्तिकें त्यानें रचिलीं. हीं वार्तिकें रचतांना त्यानें सूत्रांचाच क्रम स्वीकारला व साधीं व स्पष्टार्थ सूत्रें गाळून महत्त्वाच्या अशा सुमारें बाराशें सूत्रांचेंच विवरण केलें आहे. या विवरणामध्यें पाणिनीच्या सूत्रांत जें राहून गेलें तें सांगितलें आहे, जें सांगितलें नसतां चाललें असतें त्याचें निदर्शन केलें आहे, जें अनवधानतेनें सांगितलें गेलें तें दुरुस्त केलें आहे, अस्पष्टार्थ असलेलें स्पष्ट करून सांगितलें आहे व जें महत्त्वाचें आहे त्याचें शंकासमाधानात्मक रीतीनें व्याख्यान केलें आहे. याप्रमाणें एका दृष्टीनें पाणिनीच्या सूत्रांचें दृढीकरण करण्याची कामगिरी वार्तिककारांनीं बजावली आहे. परंतु कांहीं टीकाकार कात्यायनाच्या या महत्त्वाच्या कामगिरीविषयीं अनुदार उद्गार काढतात. कात्यायन हा पाणिनीच्या चुक्या काढून दाखविणारा टीकाकार होता तसेंच पाणिनीच्या चुक्या दाखविण्याचें त्यानें व्रतच घेतलें होतें असें या टीकाकारांचें म्हणणें आहे. वस्तुतः हें म्हणणें मुळींच बरोबर नाहीं. जर कात्यायनाला आपली श्रेष्ठता दाखवावयाची असती तर त्यानें वार्तिकें न रचितां स्वतंत्र व्याकरणग्रंथच रचिला असता. त्यानें स्वतंत्र ग्रंथ लिहिला नाहीं इतकेंच नव्हे, तर सूत्रांचीं प्रतीकें घेऊन त्यांचें त्यानें व्याख्यान केलें आहे; व आपण स्वतंत्र ग्रंथ केला नाहीं या जाणिवेनें व विनयानेंही त्यानें आपलें नांव कोठेंही घातलें नाहीं. पदमञ्जरीकार पंडित हरदत्तांनीं स्वतःविषयीं दर्पोक्तीनें काढलेले उद्गार

" एवं प्रकटितोस्माभिर्भाष्ये परिचयः परः। तस्य निःशेषतो मन्ये प्रतिपत्तापि दुर्लभः "

तसेच पंडितराय जगन्नाथांनीं काढलेले

"णेरणाविति सूत्रार्थं भगवान् वेत्ति पाणिनिः। अहं च भाष्यकृद्वेत्ति वृत्तिकृद्वेत्ति वा न वा"

हे उद्गार विचारांत घेतले असतां वार्तिककारांनीं स्वतः जरी काढले नसले तरी

सूत्रकारनिगूढार्थं वेत्ति कात्यायनो मुनिः। पतञ्जलिस्तन्मुखेन तन्मुखेनेतरे बुधाः

अशा तऱ्हेचे उद्गार वार्तिककारांविषयीं काढावेसे वाटतात व ते वार्तिककारांना पूर्ण लागू पडतात.

## ११८. वार्तिककारांचीं वार्तिकें व भाष्यकारांच्या इष्टी.

वार्तिकें रचतांना 'अमुक सूत्राची मुळींच जरूर नव्हती, अमुक सूत्रांत हे शब्द ज्यास्त घालावयास पाहिजे होते, अमुक शब्द घातले नसतां चाललें असतें अशा रीतीनें ठिकठिकाणीं पाणिनीचे प्रमाद दाखविणारा कात्यायन हा दोषैकदृष्टि होता' असें गोल्डस्टूकर, वेबर वगैरे विद्वानांचें म्हणणें आहे. या म्हणण्याला मुरड घालून कात्यायन हा चिकित्सक टीकाकार होता असें डॉ. कीलहॉर्न यांनीं आपलें मत प्रदर्शित केलें आहे. कात्यायनाचीं वार्तिकें कोणतीं व भाष्यकारांचीं वचनें कोणतीं यासंबंधीं विद्वत्तापूर्ण विवेचन डॉ. कीलहॉर्न यांनीं "कात्यायनाचीं वार्तिकें" या मथळ्याखालीं एक उद्बोधक निबंध लिहून केलें आहे. भाष्यकारांच्या 'इष्टी' म्हणून ज्या वार्तिकांना परंपरागत म्हणण्यांत येतें त्या इष्टीही शोधून निराळ्या काढणें कठीण आहे. तरी पण, 'इति वक्तव्यम्', 'इति वाच्यम्', 'इत्युपसंख्यानम्' असें साधारणपणें ज्या वार्तिकांच्या शेवटीं म्हटलें आहे व विशेषत: वार्तिक लिहिल्यानंतर वार्तिकांतील बहुतेक शब्द जसेच्या तसे ठेवून कांहीं शब्द ज्यास्त घालून ज्यांचें स्पष्टीकरण भाष्यामध्यें केलें आहे तीं कात्यायनाचीं वार्तिकें समजावीं असा निष्कर्ष डॉ. कीलहॉर्न यांनीं काढला आहे व आपल्या म्हणण्याचे पुष्ट्यर्थ पुष्कळ उदाहरणेंही दिलीं आहेत. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे जेथें जेथें दोनदां उच्चारण दिसून येतें त्या त्या ठिकाणीं पहिलें उच्चारण वार्तिककारांचें वार्तिक असतें व दुसरें भाष्यकारांनीं केलेलें त्या वार्तिकाचें व्याख्यान असतें, व जेथें एकच उच्चारण असतें तेथें तें वचन भाष्यकारांचें असतें असा साधारण सिद्धान्त डॉ. कीलहॉर्न यांनीं दिला आहे. या सिद्धांताशीं अत्यंत सहमत होणें शक्य नसलें तरी डॉ. कीलहॉर्न यांचें म्हणणें ग्राह्य धरण्यास हरकत नाहीं. कांहीं वार्तिकें श्लोकात्मक आहेत व तीं तशींच भाष्यामध्यें दिलीं आहेत. कांहीं ठिकाणीं त्यांचे तुकडे पाडून भाष्यामध्यें स्पष्टीकरण केलें आहे व सूत्राच्या व्याख्येच्या शेवटीं संपूर्ण श्लोकही दिले आहेत. हीं श्लोकवार्तिकें बहुधा भाष्यकारांनींच संग्रह-श्लोक म्हणून रचिलीं असावीं. भाष्यकारांनीं जसें भ्राजीया: पठन्ति, क्रोष्टीया: पठन्ति, सौनागा: पठन्ति असें कांहीं थोड्या ठिकाणीं म्हटलें आहे किंवा कात्य अथवा कात्यायन असा उल्लेख केला आहे त्याप्रमाणें आपलीं स्वत:चीं वचनें सोडून बाकीच्या सर्व ठिकाणीं वार्तिककारांचा त्यांनीं नामनिर्देश केला असता तर बरें झालें असतें. वैयाकरणांच्या संप्रदायामध्यें मात्र ज्या ठिकाणीं वार्तिककर्त्यांच्या नांवाचा उल्लेख नाहीं अशीं सर्व वचनें कात्यायनाचीं वार्तिकें म्हणून समजण्याचा प्रघात आहे.

## ११९. कात्यायनाचा वार्तिकपाठ.

कात्यायनाचा वार्तिकपाठ म्हणून शीर्षक असलेल्या कांहीं लेखी प्रती उपलब्ध आहेत. त्या प्रतींमध्यें दिलेलीं वार्तिकें हीं ज्या सूत्रावर वार्तिकें आहेत तीं सूत्रें प्रतीक म्हणून प्रारंभीं लिहून नंतर लिहिलेलीं आढळतात. महाभाष्यामध्यें उद्धृत केलेल्या वार्तिकांशीं त्यांची तुलना केल्यास पुष्कळच ठिकाणीं पाठभेद आढळून येतात. या वार्तिकपाठांतील कांहीं वार्तिकें भाष्या-मध्यें उद्धृत केलेलीं आढळत नाहींत, पण काशिका सिद्धान्तकौमुदी वगैरे ग्रंथांमध्यें आढळतात; त्याप्रमाणेंच वार्तिकपाठामध्यें न दिलेलीं अनेक वार्तिकें महाभाष्यामध्यें आढळतात. या लेखी प्रतींच्या आरंभीं किंवा शेवटीं कोठेंही ग्रंथकर्त्यांचें नांव दिलेलें नाहीं. वार्तिकपाठ हें शीर्षक असल्यामुळें व त्यामध्यें आढळून येणारीं बहुतेक वार्तिकें महाभाष्यामध्यें उद्धृत केलेलीं असल्यामुळें

हा वार्तिकपाठ कात्यायनाचा म्हणून मानण्यांत आला आहे व तसें असणें पुष्कळ अंशीं शक्यही आहे. या वार्तिकपाठांतील बहुतेक सर्व वार्तिकें अनुक्तांशपूरक या स्वरूपाचींच आहेत. यावरून असें अनुमान करणेंही शक्य आहे कीं कात्यायनानें रचिलेला मूळचा वार्तिकपाठ हा पूरक अशाच स्वरूपाचा असावा; व त्यामध्यें पाणिनिकालानंतर स्वतःचे कालापर्यंत भाषेमधील शिष्टप्रयोग पाहिले असतां जे फेरफार दिसून आले त्यांचेंच विवेचन कात्यायनानें केलें असावें. या पूरक वार्तिकांची संख्या सुमारें बाराशें आहे. या लेखी वार्तिकपाठाशिवाय एक मुद्रित वार्तिकपाठ कात्यायनानें केलेला म्हणून उपलब्ध आहे. या मुद्रित वार्तिक पाठांतील वार्तिकांची संख्या ५०६६ आहे. यामध्यें डॉ. कीलहॉर्न यांनीं आपल्या मुद्रित महाभाष्यांत जाड्या अक्षरांनीं जीं सुमारें ४२०० वार्तिकें दिलीं आहेत त्यांशिवाय महाभाष्यांत आढळणारीं कारिकामय वार्तिकेंही दिलीं आहेत, भाष्यकारांचीं इष्टिवचनेंही दिलीं आहेत; त्याप्रमाणें भाष्यकारांनीं क्रोष्ट्रीयाः पठन्ति, भारद्वाजीयाः पठन्ति, सौनागाः पठन्ति, इत्यादि अवतरणें देऊन जीं वार्तिकें उद्धृत केलीं आहेत तीं दिलीं आहेत; इतकेंच नव्हे, तर कैयटभट्टांनीं उद्धृत केलेल्या वार्तिकवचनांचाही संग्रह केला आहे. हा वार्तिकपाठ कात्यायनाचा नसून महाभाष्यावरून कोणींतरी आधुनिक वैयाकरणानें तयार केलेला कात्यायनाचे नांवावर घातलेला आहे असें डॉ. कीलहॉर्न यांचें म्हणणें आहे. अर्थात् संपूर्ण वार्तिकपाठ कात्यायनाचा नसला तरी त्यांतील बहुसंख्य वार्तिकें कात्यायनानेंच रचिलीं आहेत असें डॉ. कीलहॉर्न यांनीं म्हटलें आहे. एकंदरींत पाहतां हा मुद्रित वार्तिकपाठ महाभाष्यामध्यें आढळणाऱ्या सूत्रसदृश गद्यमय व कारिकामय वचनांचा संपूर्ण संग्रह आहे; मग त्याचा कर्ता कोणीही असो.

### १२०. नागेशभट्टांनी दिलेली 'वार्तिक' या शब्दाची व्याख्या व पाश्चात्य विद्वानांचीं मतें.

पाराशरपुराणामध्यें "उक्तानुक्तदुरुक्तानां चिन्ता यत्र प्रवर्तते। तं ग्रन्थं वार्तिकं प्राहुर्वार्तिकज्ञा मनीषिणः" अशी वार्तिक शब्दाची व्याख्या दिली आहे; व ती महाभाष्यामधील वार्तिकांना पूर्णपणें लागू पडते. या व्याख्येप्रमाणें उक्तचिन्तनपर, अनुक्तचिन्तनपर व दुरुक्तचिन्तनपर असे तीन मुख्य प्रकार होतात व या तिन्ही प्रकारचीं वार्तिकें महाभाष्यामध्यें आढळतात. नागेशभट्टांनीं 'सूत्रेऽनुक्तदुरुक्तचिन्ताकरत्वं वार्तिकत्वम्' अशी वार्तिक या शब्दाची व्याख्या दिली आहे. या व्याख्येमध्यें 'उक्त' हा शब्द त्यांनीं गाळला आहे. त्यामुळें उक्तचिन्तनपर अशा पूर्वपक्षोत्तरपक्षरूप वार्तिकांची व व्याख्यानसाररूप वार्तिकांची गणना वार्तिकांमध्यें करतां येणें कठीण पडतें. कदाचित् वार्तिक शब्दाच्या प्रसिद्ध व्याख्येमधून 'उक्त' हा शब्द गाळण्यांत अनुक्तचिन्तन व दुरुक्तचिन्तन करणाऱ्या वचनांनाच वार्तिक ही संज्ञा द्यावी असें सांगण्याचा त्यांचा हेतु असावा; व न जाणों, वर निर्दिष्ट केलेला लेखी वार्तिकपाठ हा त्यांचेजवळ असावा व तोच कात्यायनाचा अधिकृत वार्तिकपाठ असून वार्तिकांसारखीं सर्व इतर वचनें पाणिनीय अष्टकाचें अध्यापन करणाऱ्या निरनिराळ्या आचार्यांचीं व्याख्यानसाररूप वचनें व भाष्यकारांचींच इष्टिरूप वचनें आहेत असें त्यांचें मत असावें. नागेशभट्टांच्या 'वार्तिक' शब्दाच्या व्याख्येचा अक्षरशः अर्थ लक्षांत घेऊन डॉ. गोल्डस्टूकर यांनीं 'इति वक्तव्यम्', 'इति वाच्यम्', 'इत्युपसंख्यानम्' वगैरे शब्दांनीं पुरीं केलेलीं जेवढीं वचनें तेवढींच कात्यायनाचीं वार्तिकें असून त्यांशिवाय इतर सर्व वार्तिकांसारखीं दिसणारीं वचनें हीं भाष्यकारांचीं इष्टिवचनें आहेत अशा मताचें प्रतिपादन केलें आहे व अनुक्तदुरुक्तचिन्तनपर वार्तिकें रचिणाऱ्या कात्याय-

नाला दोषैकदृष्टि चिकित्सक ठरवून त्याच्यावर 'पुरोभागि'–त्वाचा शिक्का मारला आहे; इतकेंच नव्हे, तर पाणिनिसूत्रांचें विवेचन करतांना भाष्यकारांनींही कात्यायनाचें संपूर्ण अनुकरण केलें आहे असें म्हटलें आहे. या बाबतींत कात्यायन व पतंजलि यांमध्यें त्यांचे मतानें फरक एवढाच कीं कात्यायनाला फक्त पाणिनीच्याच दोषांचें आविष्करण करावयाचें असल्यामुळें त्यानें तें मनःपूत केलें आहे; पण भाष्यकारांना पाणिनि व कात्यायन या दोघांच्या दोषांचें आविष्करण करावयाचें असल्यामुळें कात्यायनाप्रमाणें भाष्यकारांनीं पाणिनिसूत्रांवर दोष दाखविले आहेत व कात्यायनानें काढलेल्या दोषांचें समर्थन केलें आहे. कात्यायनाच्या वार्तिकांचे दोष दाखविण्याचा त्यांना प्रसंग आला तेव्हां मात्र जरी पाणिनिसूत्रांचें त्यांना समर्थन करावें लागलें तरी तें त्यांनीं मोठ्या खुबीनें केलें आहे व वेळोवेळीं आपलीं वचनें इष्टिरूपानें दिलीं आहेत. डॉ. वेबर या पाश्चात्य विद्वानांनीं जरी गोल्डस्टूकरनें दिलेलें वरील मत ग्राह्य धरलें तरी भाष्यकारांकडे त्यांनीं जराशा सहानुभूतिपूर्वक दृष्टीनें पाहिलें आहे; व कात्यायन जरी दोषैकदृष्टि चिकित्सक असला तरी कात्यायनानें दाखविलेच्या दोषांचें निराकरण करण्याचें जबाबदारीचें काम अनेक ठिकाणीं भाष्यकारांनीं केलें आहे इतकेंच नव्हे, तर कात्यायनाच्या हल्ल्यांतून पाणिनीचा बचाव करण्याचा प्रयत्न हा महत्त्वाचा धागा महाभाष्याच्या रचनेंत सारखा चालू होता असें त्यांनीं म्हटलें आहे. डॉ. बर्नेल या पाश्चात्य पंडितांनीं भाष्यकारांकडे ज्यास्त सहानुभूतिपूर्वक दृष्टीनें पाहिलें आहे व भाष्यकारांनीं वार्तिककारांच्या निरनिराळ्या प्रकारच्या हल्ल्यांना तोंड देऊन पाणिनीचें समर्थन केलें आहे असें म्हटलें आहे.

### १२१. डॉ. कीलहॉर्न यांचें मत.

डॉ. कीलहॉर्न यांनीं डॉ. गोल्डस्टूकर, वेबर व बर्नेल या तिघा विद्वानांच्या मतांचा परामर्श घेऊन कात्यायनाप्रमाणेंच भाष्यकारांचीही पाणिनीचे दोष काढण्याकडे प्रवृत्ति होती असें म्हटलें आहे. भाष्यकारांनीं कात्यायनानें दाखविलेले दोष दूर करण्याकरितां मार्ग सुचविले आहेत व स्वतःही वार्तिककारांप्रमाणेंच सूत्रांवर दोष दाखवून निराकरणही केलें आहे. दोघांनींही अनेक ठिकाणीं सूत्रांच्या अर्थाचें विवेचन करून योग्य अर्थाचा निर्णय केला आहे; अनेक ठिकाणीं सूत्रांच्या आवश्यकतेचें, प्रतिपाद्य अर्थाचें व उपयुक्ततेचें विवेचन केलें आहे; कांहीं ठिकाणीं सूत्रांतील कांहीं पदें, तर थोड्या ठिकाणीं सबंध सूत्राचीही अनावश्यकता दाखविली आहे; व सूत्राच्या योग्य अर्थाचें विवेचन करतांना कांहीं ठिकाणीं शंकासमाधानात्मक रीतीचा अवलंब केला आहे. भाष्यकारांनीं मात्र ज्या ठिकाणी वार्तिककारांचें मत ग्राह्य नाहीं त्या ठिकाणीं, तसेंच ज्या ठिकाणीं आपलें मत स्वतंत्र रीतीनें प्रतिपादन करावयाचें आहे त्या ठिकाणीं स्वतंत्र इष्टिरूप वचनें केलीं आहेत. परंतु, हें सर्व करण्यामध्यें दोघाही वैयाकरणांचा कल पाणिनीच्या सूत्रांचें दोषाविष्करण करण्याकडे होता असें डॉ. कीलहॉर्न यांनीं म्हटलें आहे. महाभाष्यकारांच्या लिखाणामध्यें दोन तऱ्हेचे प्रवाह सारखे चाललेले दिसतात असें डॉ. कीलहॉर्न यांनीं म्हटलें आहे. एक प्रवाह कात्यायनाचीं वार्तिकें देऊन त्यांना इति वाच्यम्, इति वक्तव्यम् अशा प्रकारची किरकोळ जोड देऊन त्यांचें स्पष्टीकरण करण्याचा व दुसरा स्वतः स्वतंत्र रीतीनें वार्तिकांचें विवेचन करून त्यांचा ऊहापोह करण्याचा. या भाष्यकारांच्या निरूपणांत भाष्यकारांनीं आपलीं स्वतःचीं लघुवचनें घातलीं आहेत. कांहीं ठिकाणीं जुन्या वैयाकरणांच्या कारिकाही दिल्या आहेत. डॉ. कीलहॉर्न यांनीं जोडीनें वाहणाऱ्या या दोन

लेखनप्रवाहांचें सूक्ष्म परिशीलन करून त्यांमध्यें आढळणारें भाषावैशिष्ट्यही दाखविलें आहे. कात्यायनाच्या वार्तिकांचें निरूपण चालू असतांना शंका मांडणें झाल्यास 'चेत्' या अव्ययाचा उपयोग करण्यांत येतो; पण भाष्यकारांचें स्वतःचें स्वतंत्र निरूपण चालूं असतां 'यदि...अथ' शब्द वापरले जातात. वार्तिककारांचें शंकासमाधानात्मक निरूपण चालू असतांना 'न वा... सिद्धं तु' अशा तऱ्हेची शब्दयोजना दिसून येते; पण भाष्यकारांच्या स्वतःच्या निरूपणांत 'नैष दोषः ...तर्हि वक्तव्यम्,' या प्रकारचे शब्दप्रयोग आढळून येतात. तसेंच वार्तिकांचें निरूपण चालूं असतांना शक्य तों नामांचा उपयोग केला जातो; पण भाष्यकारांचें स्वतःचें निरुपण चालूं असतांना क्रियापदांचा उपयोग केला जातो. एकंदरींत पाहतां, डॉ. कीलहॉर्न यांनीं भाष्यकारांचे बाबतींत आपल्या टीकेचा प्रखरपणा पुष्कळच कमी केला असला व भाष्यकारांनीं बऱ्याच ठिकाणीं वार्तिकांचें खंडन करून पाणिनिसूत्रांचें समर्थन केलें आहे असें म्हटलें असलें तरी वार्तिककारांप्रमाणें भाष्यकारांची दृष्टि सूत्रकारांचे दोष दाखविण्याकडे होती असें त्यांनीं आपलें मत दिलें आहे.

## १२२. पाश्चात्य विद्वानांच्या मतांचें परीक्षण.

डॉ. कीलहॉर्न यांनीं महाभाष्याचें चिकित्सात्मक पद्धतीनें अवलोकन करून वार्तिकांचे बाबतींत थोडक्यांत पुढें दिल्याप्रमाणें आपले सिद्धांत मांडले आहेतः (१) भाष्यामध्यें आढळणाऱ्या वार्तिकांपैकीं बहुसंख्य वार्तिकें कात्यायनाचीं आहेत व कांहीं थोडींशींच भाष्यकारांचीं इष्टिरूप वचनें आहेत. (२) हीं वार्तिकें कात्यायनानें पाणिनीच्या सूत्रांतील दोष दाखविण्याच्या दृष्टीनें लिहिलेलीं आहेत. (३) भाष्यकारांनीं यांपैकीं बऱ्याच वार्तिकांचा स्वीकार केला आहे; पुष्कळ वार्तिकांचें स्पष्टीकरण केलें आहे व थोड्याच ठिकाणीं त्यांची अनावश्यकता दाखविली आहे. या बाबतींत डॉ. कीलहॉर्न यांनीं केलेलें विवेचन खरोखरच उद्बोधक व मार्मिक आहे; परंतु तें करतांना पाणिनिकालानंतर कात्यायनाच्या कालापर्यंत प्रचलित भाषेमध्यें महत्त्वाचे फेरफार झाले होते, तसेंच, पाणिनीचें अष्टक अतिशय लोकप्रिय झालें असल्यामुळें भारतांतील प्रत्येक विद्याकेन्द्रांत त्याचा अभ्यास अवश्य त्या स्पष्टीकरणासह अस्खलित चालू होता या दोन गोष्टींकडे डॉ. गोल्डस्टूकर, वेबर व बर्नेल यांप्रमाणेंच डॉ. कीलहॉर्न यांचेंही लक्ष गेलें नव्हतें असें दिसतें; या कारणानें 'हें ज्यास्त पाहिजे' 'हें नको' अशा कात्यायनाच्या लेखनपद्धतीकडेच केवळ त्यांचें लक्ष गेलें व कात्यायनाचें समर्थन महाभाष्यामध्यें केलें असल्यामुळें कात्यायन व पतञ्जलि हे दोघेही पाणिनीचे दोष काढणारे खवचट टीकाकार होते असा ग्रह होऊन या सर्व पाश्चात्त्य विद्वानांचा वार्तिकांकडे व महाभाष्याकडे बघण्याचा दृष्टिकोणच एक प्रकारें दूषित झाला होता असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें.

## १२३. वार्तिकें रचण्यांत वार्तिककारांचा उद्देश.

भाषेमध्यें झालेल्या महत्त्वाच्या फेरफारांमुळें पाणिनिसूत्रें हीं वार्तिककारांच्या वेळच्या प्रचलित संस्कृत भाषेचें व्याकरण या दृष्टीनें अपुरीं पडलीं व सूत्रांतील उणीवा कात्यायन व इतर वार्तिककार यांना भरून काढाव्या लागल्या; व त्यांनीं त्या सूत्रांच्या सारखींच अनुक्तदुरुक्तचिंतनरूप छोटीं छोटीं वार्तिकें आवश्यक त्या सूत्रांवर जागोजागीं लिहून भरून काढिल्या. पाणिनीच्या सूत्रांवर हल्ले चढविण्याचा वार्तिककारांचा बिलकूल उद्देश नव्हता. त्याप्रमाणेंच मोठमोठ्या

विद्याकेंद्रांमध्यें अध्यापकांना पाणिनिसूत्रांचें स्पष्टीकरण करतांना अत्यन्त लाघवयुक्त पद्धतीनें लिहिलेल्या महत्त्वाच्या सूत्रांवर अर्थाचें विवेचन व स्पष्टीकरण लक्षांत रहावें यासाठीं वार्तिकांसारखींच उक्तचिन्तनपर लघुवचनें करावीं लागलीं. ही अनुक्तचिंतनपर, दुरुक्तचिंतनपर व उक्तचिंतनपर वार्तिकें करण्यांत वार्तिककारांची पाणिनीचे दोष दाखविण्याची इच्छा मुळींच नव्हती. पाणिनीच्या व्याकरणाचें दृढीकरण तसेंच पूर्णत्वानें व सौलभ्यानें स्पष्टीकरण करण्याच्या इच्छेनेंच सर्व वार्तिककार वार्तिकें लिहिण्याकडे प्रवृत्त झाले हें त्यांच्या लिहिण्याच्या पद्धतीवरून स्पष्ट होतें; इतकेंच नव्हे, तर त्यांच्या शब्दरचनेवरून सूत्रकारांचेविषयीं त्यांच्या मनांत मोठी आदरबुद्धि होती हें स्पष्ट होतें. अष्टाध्यायीच्या शेवटच्या सूत्रावरील शेवटचें वार्तिक "एकशेषनिर्देशाद्वा स्वरभिन्नानां भगवतः पाणिनेः सिद्धम्" यासारखीं वार्तिकें याविषयीं साक्ष देण्यास पुरेशीं आहेत. या तीन प्रकारच्या वार्तिकांपैकीं उक्तचिन्तनपर वार्तिकें हीं निरनिराळ्या आचार्योंनीं अध्यापनाचे वेळीं टांचणें म्हणून प्रथमतः लिहिलीं असावीं व वार्तिककारांनीं अथवा कदाचित् भाष्यकारांनीं तीं उद्धृत करून त्यांचा संग्रह केला असावा.

## १२४. वार्तिककारांच्या विवेचनपद्धतीचें वैशिष्ट्य.

महाभाष्यामध्यें उद्धृत केलेल्या वार्तिक-वचनांचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास वार्तिककारांच्या विवेचनपद्धतीचें पुढें दिल्याप्रमाणें वैशिष्ट्य ध्यानांत येईल. वृत्तिग्रंथांप्रमाणें सूत्राचा सरळ अर्थ सांगून उदाहरणें देऊन सूत्राचें स्पष्टीकरण करण्याची पद्धति वार्तिकांमध्यें कोठेंही आढळून येत नाहीं. वार्तिकांचें अध्ययन करण्यापूर्वी सरळ अर्थ व उदाहरणें यांसहित सूत्रांचें सामान्य ज्ञान आवश्यक आहे असें गृहीत धरूनच वार्तिककारांनीं आपलीं वार्तिकें रचिलेलीं दिसतात. वार्तिककारांनीं केलेल्या विवेचनाचा क्रम पाहूं गेल्यास सूत्राचा विवक्षित अर्थ सामान्य तऱ्हेनें कळण्याजोगा नसल्यासच त्याचें विवेचन वार्तिककार करतात. सूत्राचा अर्थ स्पष्ट असेल तर सूत्रार्थाचें विवेचन करण्याच्या खटपटींत वार्तिककार पडत नाहींत. सूत्राचा सामान्य अर्थ कळला आहे हें गृहीत धरून सूत्राच्या आवश्यकतेचा विचार करण्यास वार्तिककार आरंभ करितात. सूत्राची आवश्यकता स्पष्टपणें निदर्शनास येत असल्यास त्या बाबतींतही विवेचन न करतां वार्तिककार पदकृत्याकडे वळतात म्हणजे सूत्रांतील मुख्य पदांचा उपयोग काय याचा विचार करतात; व तो करतांना कांहीं ठिकाणीं एकादें पद व अगदीं थोड्याच ठिकाणीं संपूर्ण सूत्र अनावश्यक असल्याचें सांगतात. ही अनावश्यकता दाखविण्याचे कामीं मात्र अनेक ठिकाणीं बराच प्रयत्न केलेला दिसतो व कांहीं ठिकाणीं क्लिष्ट मार्गाचेंही अवलंबन केलेलें दिसतें. भाष्यकारांना हें पसंत पडलेलें दिसत नाहीं व पुष्कळ ठिकाणीं या प्रत्याख्यानपद्धतीचे बाबतींत त्यांनीं आपली नाखुषी प्रदर्शित केली आहे. एके ठिकाणीं तर 'तदेतन्महतो वंशस्तम्बाल्लट्वानुकृष्यते' (' ही एवढी खटपट कशाकरितां तर वेळूच्या काठीवर चढून चिमणी धरण्याकरितां ' महाभाष्य भा. १ पृष्ठ५२) अशी वार्तिककारांवर त्यांनीं भेदक टीकाही केली आहे. अशा तऱ्हेनें सूत्राच्या अर्थाचें, प्रयोजनाचें व सूत्रांतील पदांच्या आवश्यकतेचें विवेचन जरूर नसल्यास तें न करतां व जरूर असल्यास तें करून नंतर सूत्राच्या अर्थाची तात्त्विक चिकित्सा वार्तिककार करतात व पूर्वपक्षउत्तरपक्षात्मक पांडित्यपूर्ण विवेचन-पद्धतीचा अवलंब करून सूत्राचा अर्थ पूर्ण स्पष्ट करतात. अशा तऱ्हेचें विवेचन अनेक ठिकाणीं कारिका-स्वरूपाचीं वार्तिकें करून केलेलेंही आढळून येतें. याशिवाय, महत्त्वाच्या सूत्रांचे बाबतींत सूत्राच्या विषयाशीं संबद्ध अशा कांहीं विषयांचें वार्तिककारांनीं विवेचन केलें आहे व अगदीं थोड्या ठिकाणीं व्याकरणविषयक

स्वतंत्र प्रश्नांची चर्चा केली आहे. थोडक्यांत म्हणावयाचें तर वार्तिककारांनीं रचिलेल्या वार्तिकांपैकीं ( १ ) सूत्रव्याख्यान–वार्तिकें, ( २ ) सूत्रपदप्रयोजन–वार्तिकें, ( ३ ) सूत्रप्रयोजन-वार्तिकें, ( ४ ) सूत्रपदप्रत्याख्यान–वार्तिकें, ( ५ ) सूत्रप्रत्याख्यान–वार्तिकें, ( ६ ) शङ्कोद्भावन-समाधान–वार्तिकें ( ७ ) संबद्धार्थकथन–वार्तिकें आणि ( ८ ) स्वतंत्रार्थकथन–वार्तिकें असे उक्त-चिन्तनपर वार्तिकाचे आठ प्रकार सांगतां येतील.

## १२५. नवान्हिकी भाष्यांतील वार्तिकें.

महाभाष्य हें बहुतांशीं वर वर्णिलेल्या अशा वार्तिकांच्या व्याख्यानानें व चर्चेनेंच व्यापिलें आहे. व्याख्यानरूप ग्रंथांमध्यें तसेंच भाष्यग्रंथांमध्यें शास्त्राचा महत्त्वाचा प्रतिपाद्यविषय बहुशः आरंभींच ग्रंथकारांनीं आणिलेला आढळून येतो व पुष्कळ ग्रंथांमध्यें मूळ ग्रंथाच्या आरंभींच्या अगदीं थोड्या भागाचें विवेचन पाहिल्यास त्या शास्त्रांतील बहुतेक प्रमेयें स्पष्ट होतात. श्रीभाष्य, ऐतरेयोप-निषच्छांकरभाष्य यांसारखीं अनेक उदाहरणें या बाबतींत देतां येतील. प्रास्ताविक विवेचनाकरितां महाभाष्यकारांनीं जें प्रथम आन्हिक (पस्पशान्हिक) लिहिलें आहे त्यामध्येंच चोवीस वार्तिकांचें व्याख्यान केलें आहे; व शिवसूत्रविवेचनात्मक दुसऱ्या आन्हिकांतही पांसष्ट वार्तिकें आढळून येतात. या दोन आन्हिकांतच विशेषतः व्याकरणविषयक सामान्य प्रश्नांचें विवेचन केलेलें आहे. उदा-हरणार्थ,– व्याकरणशास्त्राचा उपयोग, व्याकरण शब्दाच्या अर्थाचें विवेचन, शुद्ध शब्दप्रयोगाचें फल, वर्णांच्या अर्थवत्त्वाचें विवेचन, वर्णांचे एकदेश वर्णासारखे दिसल्यास त्यांना स्वतंत्र वर्ण समजावें काय, या महत्त्वाच्या विषयांची चर्चा पहिल्या दोन आन्हिकांत प्रामुख्यानें आढळून येते. नवान्हिकी म्हणून प्रसिद्ध असलेल्या पहिल्या पादावरील भाष्यामध्यें तिसऱ्या आन्हिकापासून पाणिनिसूत्रांचें व्याख्यान चालू झालें आहे व त्यामध्यें पाणिनीच्या पहिल्या पादांतील ७५ सूत्रांपैकीं ५६ सूत्रांवर ४९० वार्तिकें आहेत. एकंदर भाष्यांतील ५०३२ वार्तिकांपैकीं ५७९ वार्तिकांचें विवरण या नवान्हिकी प्रकरणांत आलें आहे. या ५७९ वार्तिकांपैकीं फक्त ७० च वार्तिकें हस्तलिखित वार्तिकपाठांत आढळतात व तीं अनुक्तदुरुक्तचिंतनस्वरूपाचीं आहेत. बाकीचीं सर्व उक्तचिंतनस्वरूपाचींच आहेत. पहिल्या पादामध्यें सूत्रार्थनिश्चायक स्वरू-पाचींच बहुसंख्य वार्तिकें आहेत व तीं प्रामुख्यानें अइउण्, क्ङिति चः वृद्धिरादैच्, हलोनन्तराः० मुखनासिका०, तुल्यास्य०, नाज्झलौ०, अदसो मात्, दाधा घ्वदाप्, ष्णान्ता षट्, सर्वादीनि०, तद्धितश्चा०, कृन्मेजन्तः०, न वेति०, इग्यणः० मिदचो०, द्विर्वचनेचि, अदर्शनं०, तपर०, या सूत्रांवर दिलेलीं आहेत. इको गुणवृद्धी, उरण् रपरः, प्रत्ययस्य लुक्०, तस्मिन्निति०, अणुदित्०, वृद्धिर्यस्या०, या सूत्रांवर पदप्रयोजनवार्तिकें दिलीं आहेत. आद्यन्तवद्०, अव्ययीभावश्च, एच इग्०, षष्ठी स्थाने०, अलोन्त्यस्य, स्थानिवद्०, प्रत्ययलोपे०, स्वं रूपं, आणि येन विधि० या सूत्रांच्याच प्रयोजनाचा विचार वार्तिककारांनीं केला आहे. दीधीवेवीटाम् व पूर्वपरावर० यांतील कांहीं पदांच्याच प्रत्याख्यानाचा विचार केला आहे; तर क्ङलक् व न धातुलोप० या सूत्रांचेंच प्रत्या-ख्यान वार्तिकाकारांनीं सुचविलें आहे. ईदूदेत्०, शे, ईदूतौ च०, क्तक्तवतू०, व आद्यन्तौ टकितौ या सूत्रांच्या अर्थाविषयीं शंका उपस्थित करून त्यांचें निराकरण केलें आहे. संबद्धार्थ-कथन करणारीं व स्वतंत्रार्थकथन करणारीं वार्तिकें पस्पशान्हिक व प्रत्याहारान्हिक यांमध्यें पुष्कळच आहेत; व त्यांमधील व्याकरणशास्त्राचा उपयोग वगैरे प्रमुख विषय वरतीं निर्दिष्ट केलेच आहेत. नवान्हिकी भाष्यामध्यें अनुक्तदुरुक्तचिंतनपर वार्तिकें अवघीं चवदाच हस्तलिखित वार्तिकपाठांत आढळतात.

## १२६. हस्तलिखित वार्तिकपाठांतील वार्तिकांचें स्वरूप.

वर वर्णन केलेल्या प्रकारांशिवाय कांहीं महत्त्वाचे प्रकार वार्तिकांमध्यें आढळून येतात. भाषेंत निरनिराळ्या प्रकारचा बदल झाल्यामुळें पाणिनिसूत्रांनीं सिद्ध झालेले कांहीं शब्द व प्रयोग वार्तिककारांना भाषेमध्यें रूढ नसलेले आढळून आले. अशा शब्दांची पाणिनिसूत्रांनीं सिद्धि न व्हावी या हेतूनें वार्तिककारांना स्वतंत्र प्रतिषेधवचनें करावीं लागलीं. त्याप्रमाणेंच कांहीं शब्द व प्रयोग पूर्वीं रूढ असलेले पण त्यांचे वेळीं विशिष्ट अर्थीं व विशिष्ट प्रसंगींच प्रचारांत असल्याचें वार्तिककारांना आढळून आलें. अशा शब्दांची सिद्धि वार्तिककारांनीं सूत्रार्थनियन्त्रणरूप वार्तिकें रचून केली. यांशिवाय आपल्या वेळीं पाणिनिसूत्रांप्रमाणें ज्यांची सिद्धि होणें शक्य नाहीं असेही अनेक शब्द वार्तिककारांना आढळून आले व त्यांची सिद्धि होण्याकरितां वार्तिककारांना स्वतंत्र पूरक वचनें तयार करावीं लागलीं. पाणिनि हा वैयाकरण असल्यामुळें निरुक्तकारांप्रमाणें दरेक शब्द साधण्याचें त्यानें व्रत घेतलें नव्हतें. सामान्य नियम घालून व त्यांना अपवाद जोडून जेवढे शब्द सुलभ रीतीनें साधतां आले तेवढेच त्यानें कृत्प्रत्यय व तद्धित-प्रत्यय जोडून साधले. त्यांशिवाय उणादिसूत्रांनींही कांहीं विशिष्ट शब्द साधले गेले. तरीपण पाणिनिसूत्रांप्रमाणें ज्यांची व्युत्पत्ति देतां येईना असे अनेक शब्द राहिले. वार्तिककारांना अशा सर्व शब्दांकडे लक्ष देणें शक्य नसलें तरी जे शब्द पाणिनिसूत्रांनीं साधिलेल्या शब्दांसारखे होते पण सूत्रांनीं ज्यांची सिद्धि राहून गेली त्या शब्दांची, त्याप्रमाणेंच त्यांचेवेळीं भाषेमध्यें जे नवीन शब्द प्रचारांत आले होते त्यांपैकीं महत्त्वाच्या शब्दांची सिद्धि पाणिनीनें दिलेल्या प्रत्ययांनीं होणें शक्य असल्यास त्यांनीं ( १ ) सूत्राची व्याप्ति वाढविण्याकरितां सूत्रांतील पदांमध्यें बदल सुचवून, किंवा ( २ ) कांहीं विशिष्ट पदें ज्यास्त घालावीं असें सुचवून, किंवा ( ३ ) सूत्रांसारखीं स्वतंत्र वार्तिकवचनें रचून केली. या तीन प्रकारच्या वार्तिकांपैकीं पहिल्या दोन प्रकारच्या वार्तिकांचा म्हणजे साधुतरपदन्यासरूप व अधिकपदन्यासरूप वार्तिकांचा दुरुक्त-चिंतनपर वार्तिकांमध्यें समावेश होतो. अर्थात् दुरुक्त या शब्दाचा लक्षणेनें अपूर्णोक्त असा अर्थ करावा लागतो. स्वतंत्रवचनरूप वार्तिकांची अनुक्तचिंतनपर वार्तिकांमध्यें गणना करतां येते. हीं दुरुक्तचिंतनपर व अनुक्तचिंतनपर वार्तिकें रचण्यांत वार्तिककारांचा उद्देश सूत्रार्थाचें व्याख्यान करणें हा नसून इष्टशब्दसाधन हाच होता हें स्पष्ट दिसतें; व याच दोन प्रकारच्या वार्तिकांचा हस्तलिखित वार्तिकपाठामध्यें प्रामुख्यानें समावेश झालेला आढळून येतो; कोठें कोठें प्रतिषेधवचनें, नियन्त्रणवचनें व पूरकवचनेंही करावीं लागलीं; या तीन प्रकारच्या वचनां-चाही अनुक्तचिंतनपर व दुरुक्तचिंतनपर वचनांतच समावेश होतो.

## १२७. व्याकरणविषयक सामान्य प्रश्नांचें वार्तिककारांनीं केलेलें विवेचन.

‘ अथ शब्दानुशासनम् ’ हें वाक्य महाभाष्याच्या आरंभीं दिलें आहे. तें भाष्यकारांनीं स्वतः शीर्षक म्हणून घातलेलें असलें तरी त्यांनीं तें व्याडि वगैरे पूर्वाचार्यांकडून घेतलेलें असावें. भाष्यकारांना स्वतःला व्याकरण हा शब्द ज्यास्त पसंत असावा हे त्यांच्या विवेचनावरून दिसतें. अथ शब्दानुशासनम् हे वार्तिककारांचें वचन नाहीं. कारण वार्तिकांचा आरंभ ‘ सिद्धे शब्दार्थसंबन्धे ’ या वार्तिकानें झाला आहे असें भाष्यकारांनीं

म्हटलें आहे, व वार्तिककारांनीं स्वतः पाणिनितन्त्राला व्याकरण ही संज्ञा दिली आहे. वार्तिककारांनीं प्रस्ताव स्वरूपाचीं चोवीस वार्तिकें लिहिलीं आहेत व त्यानंतर माहेश्वरसूत्रांचें व्याख्यान पांसष्ट वार्तिकांत केलें आहे. माहेश्वरसूत्रांच्या विवेचनानंतर पाणिनिसूत्रांच्या विवेचनास वार्तिककारांनीं सुरुवात केली आहे व पहिल्या पादाचें विवेचन ४९० वार्तिकांमध्यें केलें आहे. प्रास्ताविक वार्तिकांपैकीं पहिल्या नऊ वार्तिकांमध्यें वार्तिककारांनीं शब्द, अर्थ व त्यांचा संबंध हे नित्य आहेत व शिष्टसंमत शब्दांच्या उच्चारणापासून धर्मप्राप्ति होते असें म्हटलें आहे. त्यानंतर व्याकरण शब्दाच्या अर्थाविषयीं चर्चा केली आहे आणि त्यानंतर माहेश्वर सूत्रावरील वार्तिकांमध्यें क्ष वगैरे संयुक्त व्यंजनांमधील ककार षकार वगैरे वर्ण कार्याकरितां जसे निराळे समजले जातात त्याप्रमाणें ए ओ ऐ औ या संध्यक्षरांमधील अ आ इ उ हे वर्ण निराळे समजले जावे किंवा नाहीं या प्रश्नाचा विचार केला आहे व 'व्यपवृक्त' म्हणजे विभिन्न अथवा स्पष्टपणें निराळें असेंच जेथें उच्चारण असेल तेथेंच ते वर्ण निराळे समजावे, ए ऐ ओ औ यांतील अ इ उ हे निराळे समजूं नये असा निर्णय दिला आहे.[1] अ इ उ ण्, ऋ ऌ क्...या पाणिनीच्या वर्णसमाम्नायामध्यें अनुस्वार, विसर्ग वगैरे उच्चारणांत दिसणारे वर्ण दिले नाहींत. त्याविषयीं विचार करून वार्तिककारांनीं त्यांचा अंतर्भाव वर्णसमाम्नायामध्यें करावयास पाहिजे व तो अन्तस्थवर्णांमध्यें तसाच ऊष्मवर्णांमध्यें करावा असें प्रतिपादन केलें आहे.[2] तिसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे वर्णांना अर्थ असतो किंवा नाहीं हा. या बाबतींत वार्तिककारांनीं आपलें स्पष्ट मत दिलें नसलें तरी वर्णांना प्रत्येकीं स्वतंत्र अर्थ असतो या मताचें प्रथम प्रतिपादन करून अर्थ नसतो असें नंतर प्रतिपादन केल्यामुळें स्वभावतःच अर्थानें युक्त असलेल्या अशा शब्दांतील निरनिराळ्या वर्णांना प्रत्येकीं निरनिराळा अर्थ नसतो हेंच मत वार्तिककारांना इष्ट दिसतें.[3] याच वादाचा उल्लेख वार्तिककारांनीं अर्थवत्०(१।२।४५)या सूत्राचें व्याख्यान करतांना केला आहे; व त्या प्रसंगानें निपातांना अर्थ नसतो असें स्पष्ट म्हटलें आहे.[4] त्यावरून 'वर्णांना स्वतंत्र अर्थ नसतो, पण वर्णसमूहरूप धातू व प्रातिपदिकें यांना व त्यांना लागणाऱ्या प्रत्ययांना स्वतंत्र अर्थ असतो' असें वार्तिककारांचें स्पष्ट मत दिसून येतें. 'इ' यासारखे धातू व 'अ' यासारखीं जीं प्रातिपदिकें व अ, इ, उ ए यांसारखे जे प्रत्यय त्यांना वर्णरूप असूनही स्वतंत्र अर्थ असतो व त्याला कारण ते स्वतंत्र शब्द आहेत हेंच. प्रत्यय हे अर्थयुक्त स्वतंत्र शब्द आहेत हें पाणिनीचें मत आहे; अर्थात् त्यांचा स्वतंत्र प्रयोग आढळत नाहीं आणि त्यांना 'प्रातिपदिक' ही संज्ञा नसल्यामुळें त्यांना विभक्ति प्रत्यय किंवा तद्धित प्रत्यय लागत नाहींत ही गोष्ट निराळी.

## १२८. "प्रागुदञ्चौ विभजते..." या वार्तिकवचनाचें विवेचन.

पाणिनीच्या अष्टाध्यायीच्या पहिल्या पादावर विवेचनस्वरूप जरी ४०९ वार्तिकें असलीं तरी हस्तलिखित वार्तिकपाठामध्यें फक्त चवदाच वार्तिकें आहेत. प्रास्ताविक वार्तिक एकही नाहीं, त्याप्रमाणेंच शिवसूत्रांवरही वार्तिक नाहीं. अन्तरङ्ग बहिर्योगोप०(१।१।३६)या सूत्रावर 'अपुरीति

---

१. 'नाव्यपवृक्तस्यावयवे तद्विधिर्यथा द्रव्येषु' (माहेश्वर सूत्र ४ वा. ९) पहा.

२. माहेश्वरसूत्र ५ वा. ६-७ पहा.

३. माहेश्वरसूत्र ५ वार्तिकें ९-१५ पहा.

४. 'निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वम्' (१।२।४५ वा. १२) पहा.

वक्तव्यम्' या वार्तिकानें या वार्तिकपाठाला सुरुवात झाली आहे. हा वार्तिकपाठ त्रुटित आहे व आरंभींचीं कांहीं वार्तिकें त्यांत नाहींत असें मात्र म्हणतां येत नाहीं. कारण, अनुक्तदुरुक्तांश-पूरक अशा या वार्तिकपाठांत प्रास्ताविक असें कांहीं लिहावयाचें नाहीं; व शिवसूत्रांचीही अनुक्तदुरुक्तचिंतनरूप चर्चा करणें शक्य नाहीं. शिवाय, पाणिनीच्या पहिल्या पादामध्यें वृद्धि, गुण, संयोग वगैरे मुख्य मुख्य संज्ञांचाच प्रामुख्यानें विचार केला असल्यामुळें सूत्रार्थ-निश्चयस्वरूपाचीं किंवा व्याख्यानस्वरूपाचीं अनेक वार्तिकें लिहिणें शक्य झालें–फार काय, आवश्यकच झालें– तरी पूरक वार्तिकांची जरूर एकादी संज्ञा एखाद्या ठिकाणीं विवक्षित अर्थी किंवा विवक्षित शब्दांना आवश्यक असेल तरच लागली व सर्वनाम-संज्ञा व वृद्ध-संज्ञा यांबद्दलच थोडींशीं वचनें वार्तिककारांनीं केलीं. वार्तिककारांचे वेळीं तीय–प्रत्ययान्त शब्दांचीं रूपें सर्वनामांसारखीं दिसल्यामुळें त्यांना वैकल्पिक सर्वनामसंज्ञा वार्तिककारांनीं सांगितली. त्याप्रमाणें 'वृद्धाच्छः' (४।२।११४) या सूत्रानें शैषिक अर्थी 'छ' (ईय) प्रत्यय लागणें हें वैशिष्ट्य विशेषनामें व गोत्रनावें यांचे बाबतींतही दिसून आल्यामुळें त्याविषयींही वार्तिक-कारांनीं कांहीं वार्तिकें केलीं. 'स्थानिवदादेशो०' (१।१।५६) या सामान्य सूत्रानें त्याप्रमाणेंच 'अचः परस्मिन्पूर्वविधौ' (१।१।५७) या विशेष सूत्रानें सांगितलेल्या स्थानिवद्भावाला 'न पदान्त०' (१।१।५८) या सूत्रानें सांगितलेलीं अपवादस्थलें पुरेशीं न पडल्यामुळें त्या बाबतींतही "क्किलुगुपधात्व०" हें स्वतंत्र वचन वार्तिककारांनीं केलें व त्याप्रमाणेंच 'येन विधिस्तदन्तस्य'(१।१।७२)या सूत्रानें सांगितलेल्या तदन्तविधीला दोन[3] प्रतिषेधवचनें केलीं आणि 'यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे' हें वचन[4] सांगितलें. या प्रथमपादाच्या शेवटीं 'प्रागुदञ्चौ विभजते हंसः क्षीरोदकं यथा। विदुषां शब्दसिद्ध्यर्थं सा नः पातु इरावती' हें वार्तिक दिलें आहे. या कारिकामय वार्तिकापूर्वी प्रतीक-सूत्र दिलें नसलें तरी 'एङ् प्राचां देशे' (१।१।७५) या शेवटच्या सूत्रामध्यें सांगितलेला प्राग्देश (पूर्वेच्या लोकांचा देश) कोणता तें सांगण्याकरितां हें वचन केलें आहे व ऐतिहासिक दृष्ट्या या वार्तिकाला एक प्रकारचें महत्त्व आहे. ही कारिका महाभाष्यामध्यें जरी नसली तरी काशिका ग्रंथामध्यें ती दिली असल्यामुळें ती जुनी आहे हें निश्चित. इरावती या शब्दानें येथें लाहोरजवळील 'रावी' नदीचा उल्लेख केलेला आहे. या रावी नदीनें त्यावेळीं सांस्कृतिक दृष्ट्या व भाषादृष्ट्या भारताचे दोन विभाग

---

१. वाप्रकरणे तीयस्य ङित्सूपसंख्यानम् (१।१।३६ वा. ३), त्याप्रमाणेंच, वा नामधेयस्य वृद्धसंज्ञा वक्तव्या,' 'गोत्रान्तादसमस्तवत् प्रत्ययो भवतीति वक्तव्यम्,' 'जिह्वाकात्यहरितकात्यवर्जम्' (१।१।७३ वा. ५–८) पहा.

२. 'क्किलुगुपधात्वचङ्परनिर्ह्रासकुत्वेषूपसंख्यानम्' (१।१।५८ वा. २) पहा.

३. 'समासप्रत्ययविधौ प्रतिषेधः' आणि 'उगिद्वर्णग्रहणवर्जम्' (१।१।७२ वा. ३,४) पहा.

४. पा. सू. १।१।७२ वार्तिक २९.

५. इरावती या शब्दाचें प्राकृत भाषेमधील उच्चारण 'इरावई' असें होतें. त्यांतील प्रथम 'इ' चा लोप आणि अ+ई यांचा संधि ई होऊन 'रावी' हें रूप सिद्ध होतें. रावी नदीचा मार्ग बदलून झालेले दोन फाटे इतिहासप्रसिद्धच आहेत. 'द्वीरावतीको देशः' या जुन्या ग्रंथांतील उदाहरणामध्यें या दोन फाट्यांचा उल्लेख आहे.

झाले होते. त्यांना उदक् व प्राक् हीं नांवें दिलीं गेलीं होतीं आणि त्याचें कारण भारतीय संस्कृति, शास्त्रें व तत्वज्ञान यांचा प्रसार गांधार, शौरसेन, कोसल आणि मगध या चार मोठ्या विभागांतच झाला होता. गांधार देशाचे पश्चिमेस, व त्याप्रमाणें शौरसेन प्रांतांतील उज्जयिनीचे दक्षिणेस या संस्कृतीचा प्रसार नसल्यामुळें पश्चिमविभाग व दक्षिणविभाग या शब्दांची जरूर भासली नाहीं. रावी नदीच्या उत्तरेकडील किंवा वायव्येकडील विभागाला उत्तरविभाग नांव असे आणि रावी नदीच्या पूर्वेकडील किंवा आग्नेयीकडील विभागाला प्राग्विभाग म्हणत असत. भाष्यकारांनीं वार्तिककारांचा 'प्रियतद्धिता दाक्षिणात्याः' असा उल्लेख केला आहे त्यावरून वार्तिककारांचा निवासदेश 'प्रागुदञ्चौ विभजते०' या त्यांच्याच भाषेंत प्राग्देश असावा असें जरी अनुमान काढणें शक्य असलें व अद्यतनी भविष्यन्ती इत्यादि प्राग्देशीय संज्ञा जरी त्यांनीं बऱ्याच वापरल्या आहेत त्यावरून त्या अनुमानाला बळकटी मिळत असली, तरी उत्तरदेशांतील अध्ययनाध्यापनपरंपरेचें त्यांना पूर्ण ज्ञान होते हें अव्ययात् त्यप् ( ४।२।१०४ ) या सूत्रावरील वार्तिकें पाहिल्यास सहज ध्यानांत येण्याजोगें आहे.

## १२९. संज्ञाध्यायावरील उक्तचिंतनपर वार्तिकें.

संज्ञाध्याय-स्वरूपाच्या पहिल्या अध्यायापैकीं नवाह्निकी-भाष्य ज्यावर आहे त्या प्रथम पादाप्रमाणेंच बाकीच्या तीन पादांतील अनेक सूत्रांवर सूत्रार्थाचा निश्चय व विवेचन करण्या-करितां लिहिलेलीं बहुसंख्य वार्तिकें आढळून येतात. त्यांपैकीं गाङ्कुटादिभ्यो०, ( १।२।१ ), प्रथमानिर्दिष्टं० ( १।२।४३ ), सरूपाणां० ( १।२।६४ ) ऊकालोच्० ( १।२।२७ ), अर्थवत्० ( १।२ ।४५ ), भूवादयो० ( १।३।१ ) यथासंख्य० ( १।३।१० ), णेरणौ० ( १।३।६७), आ कडाराद्०( १।४।१ ), विप्रतिषेधे परं० ( १।३।२५ ), यस्मात्प्रत्यय० ( १।४।१३ ), कारके ( १।४।२३ ) आणि परः संनिकर्षः०( १।४।१०९ ) या सूत्रांवरील वार्तिकांमध्यें केलेलें विवेचन महत्त्वाचें आहे. "सरूपाणामेकशेष०" या एका सूत्रावर ५९ वार्तिकें आहेत व त्यांमध्यें शब्दांचा अर्थ कसा प्रतिपादन केला जातो याविषयीं विद्वत्तापूर्ण ऊहापोह केला आहे व पाणिनीच्या 'एकशेष' कल्पनेचें स्पष्टीकरण केलें आहे. "यथासंख्य०" व "विप्रतिषेधे०" या सूत्रांवरील बहुतेक वार्तिकें सूत्रप्रतिषेधस्वरूपाचीं आहेत. दुसऱ्या पादामध्यें सांगितलेले कित् व ङित् हे अतिदेशशब्द वास्तविक पाहतां जरी गुणवृद्धिनिषेधरूपी विशेष सांगणारे विशेषणशब्द असले तरी त्यांचा गुणप्रतिबन्धक संज्ञांच्या सारखाच पाणिनीनें उपयोग केला आहे; व ज्या प्रत्ययांना ज्या प्रसंगीं त्या संज्ञा लागतात त्यांचें परिगणन केलें आहे. ( १।२।१ -२६ ). कदाचित् गुणवृद्धिप्रतिबंधक या स्वरूपाची 'संक्रम' ही प्राचीन वैयाकरणांची संज्ञा पाणिनीचे मनांत असावी व पाणिनिव्याकरणांत त्या संज्ञेचें कार्य कांहीं ठिकाणीं क् अथवा ङ् हे अनुबन्ध लावून केलें असल्यामुळें व त्यामुळें त्या संज्ञेचे दोन विभाग करणें जरूर असल्या-मुळें पाणिनीनें संक्रम शब्दाचे ऐवजीं कित् व ङित् हे शब्द वापरले असावे. त्याप्रमाणेंच परस्मैपद व आत्मनेपद या संज्ञांच्याही व्याख्या पाणिनीनें दिल्या नाहींत. तिङ् प्रत्ययांपैकीं 'त'

---

१. व्या. महाभाष्य भाग १ पृष्ठ १८ पहा.

२. याविषयीं "एवं तर्हीहान्ये वैयाकरणा मृजेरजादौ संक्रमे विभाषा वृद्धिमारभन्ते।" ( महाभाष्य भाग १ पृष्ठ १२२ ) पहा. या वचनांत वार्तिककारांनीं 'संक्रम' शब्द वापरला आहे.

पासून 'महिङ्'पर्यंत नऊ प्रत्यय व 'आन' प्रत्यय यांना आत्मनेपद प्रत्यय म्हणावें व बाकींच्या तिङ् प्रत्ययांना परस्मैपद प्रत्यय म्हणावें एवढेंच त्यानें सांगितले आहे व धातुपाठांतील कोणत्या कोणत्या धातूंना परस्मैपद-प्रत्यय, आत्मनेपद-प्रत्यय किंवा दोन्ही प्रकारचे प्रत्यय लावावे तें साधारण रीतीनें 'अनुदात्तङित:०' 'शेषात् कर्तरि०'व'स्वरितञित:०'या सूत्रांमध्यें सांगितलें आहे. याही बाबतींत धातूंना लागणाऱ्या परस्मैभाष व आत्मनेभाष या प्राचीन वैयाकरणांच्या संज्ञा सूत्रकारांचे मनांत असाव्या; पण विशिष्ट अर्थी किंवा विशिष्ट उपसर्गांचा योग असतांना परस्मैभाष धातूंनाही तङ्प्रत्यय लागतात, व त्याचे उलट आत्मनेभाष धातूंनाही तिप्...मस् हे प्रत्यय लागतात या वैशिष्ट्याचीही त्याला जाणीव होती व अशा प्रसंगीं गम् हन् वगैरे धातूंना परस्मैभाष न म्हणतां आत्मनेभाष म्हणून संज्ञा बदलणें त्याला पसंत नसल्यामुळें त्यानें प्रत्ययांनाच परस्मैपद व आत्मनेपद संज्ञा दिल्या व त्या त्या विशिष्ट प्रसंगांचें परिगणन केलें.

## १३०. संज्ञाध्यायावरील अनुक्तदुरुक्तचिंतनपर वार्तिकें.

संज्ञाव्याख्यान—स्वरूपाच्या पहिल्या अध्यायांतील सूत्रांवरील एकंदर वार्तिकांची संख्या जरी ९७७ एवढी मोठी असली तरी हस्तलिखित वार्तिकपाठांत अवघीं ७० च वार्तिकें आढळतात. याला कारण संज्ञांचे बाबतींत अनुक्तदुरुक्तचिंतनपर विवेचनाला फारशी जागा नसते हें वर दिलेंच आहे. या सत्तर वार्तिकांपैकीं कांहीं वार्तिकें महाभाष्यामध्यें सांपडत नाहींत, पण काशिकेमध्यें तीं उद्धृत केलेलीं आहेत. वार्तिककारांचे वेळीं भाषेमध्यें बरेच फेरफार व नवीन शब्दप्रयोग आढळून आल्यामुळें त्यांना पाणिनिसूत्रांसारखींच पूरकस्वरूपाचीं वार्तिकें करावीं लागलीं हे वरतीं सांगितलेंच आहे. कित् व ङित् या पाणिनींच्या अतिदेशसंज्ञा कोणत्या प्रत्ययांना केव्हां लागतात याबद्दल पाणिनीनें सांगितलेलीं सूत्रें अपुरीं पडलीं म्हणून वार्तिककारांनीं 'व्यचेः कुटादित्वमनसि' व 'श्रन्थिग्रन्थि०' हीं वचनें केलीं. या वचनांबद्दल विशेष सांगावयाचा म्हणजे हीं वचनें काशिका ग्रंथांत आढळतात, पण महाभाष्यांत आढळत नाहींत व त्यामुळेंच पाणिनिसंप्रदायाचीं हीं वचनें नाहींत असें मानून ''श्रन्थिग्रन्थि... व्याकरणान्तरे'' असें भट्टोजी दीक्षितांनीं सिद्धान्तकौमुदींत विधान केलें आहे. अस्मदो द्वयोश्च (१।२।५९)या सूत्रावरील ''सविशेषणस्य प्रतिषेधो वक्तव्यः''व''युष्मदि गुरावेकेषाम्'' हीं वार्तिकें आणि त्याप्रमाणेंच त्यदादीनि सर्वैर्नित्यम् या सूत्रावरील 'त्यदादीनां मिथः सहोक्तौ यत्परं तच्छिष्यते', हेंही वार्तिक महाभाष्यामध्यें दिलें नाहीं. परस्मैपद व आत्मनेपद यांचे बाबतींतही पाणिनिसूत्रांमध्यें दिलेल्या अपवादांपेक्षां आणखी बरेच जास्त अपवाद वार्तिककारांना आढळून आले व ते सर्व हस्तलिखित वार्तिकपाठांत स्वतंत्र वचनरूपानें त्यांनीं सांगितले आहेत.

---

१. पा. सू. १।३।१२, १।३।७८ व १।३।७२.

२. परस्मैभाष व आत्मनेभाष या संज्ञा वार्तिककारांच्या वचनांमध्यें आढळतात व धातुपाठामध्यें पाणिनीनेंही त्या वापरल्या आहेत.

३. सिद्धान्तकौमुदी भ्वादिगणामध्यें 'दंशसञ्जस्वञ्जां शपि' व 'रञ्जेश्च' ( सू. ६।४।२५-२६ ) वरील विवेचन पहा.

४. '' न गतिहिंसार्थेभ्यः '' ( १।३।१५ ), '' आङो दोनास्यविहरणे '' ( १।३।२० ) '' क्रीडोनुसंपरिभ्यश्च '' ( १।३।२१ ), '' समो गम्यृच्छिभ्याम् '' ( १।३।२९ ) या सूत्रांवरील वार्तिकें पहा.

## १३१. पदविधिव्याख्यानाध्यायावरील वार्तिकें.

पदविधिव्याख्यानरूप दुसऱ्या अध्यायामध्येंही एकंदर ४२४ वार्तिकें आहेत व त्यांतीलही बहुसंख्य वार्तिकें सूत्रार्थव्याख्यानपर अशींच आहेत. 'समर्थः पदविधिः' या पहिल्याच सूत्रावर ३३ वार्तिकें आहेत व त्यांमध्यें सामर्थ्य शब्दाचा व्याकरणशास्त्रांत कसा अर्थ करावा याविषयीं एकार्थीभाव व व्यपेक्षा या पूर्व वैयाकरणांनीं दिलेल्या दोन अर्थांचें वार्तिककारांनीं पांडित्यपूर्ण व मार्मिक विवेचन केलें आहे. 'सुबामन्त्रिते पराङ्गवत्स्वरे' ( २।१।२ ) या सूत्रानें सांगितलेला पराङ्गवद्भाव व अनेकमन्यपदार्थे या सूत्रानें सांगितलेला बहुव्रीहि यांचें वार्तिककारांनीं केलेलें विवेचनही लक्षांत ठेवण्याजोगें आहे. याशिवाय चार्थे द्वन्द्वः ( २।२।२९ ), अनभिहिते ( २।३।१ ), प्रातिपदिकार्थलिङ्ग० ( २।३।४६ ) व द्विगुरेकवचनम् ( २।४।१ ) या सूत्रांच्या अर्थांचें वार्तिककारांनीं सुंदर विवेचन केलें आहे. हस्तलिखित वार्तिकपाठामध्यें या ४२४वार्तिकांपैकीं८९वार्तिकें दिलीं आहेत, व त्यांमध्यें विशेषतः भाषेमध्यें झालेला बदल आणि व नवीन प्रचारांत आलेले शब्द यांचेंच निदर्शन केलें आहे. समासांचे बाबतींत भाषेमध्यें घडून आलेले फरक कांहीं विधिवार्तिकें व कांहीं निषेधवार्तिकें देऊन स्पष्ट केले आहेत. त्यांमध्यें द्वन्द्व समासांत होणाऱ्या पूर्वनिपाता[1]विषयीं, अर्थशब्दाशीं होणाऱ्या नित्यसमासाविषयीं व शाकपार्थिवादि समानाधिकरण समासांविषयीं वार्तिककारांनीं दिलेलीं वचनें[2] विशेष विचार करण्याजोगीं आहेत. विभक्तिविधानाचे बाबतींतही भाषेमध्यें महत्त्वाचे फरक झालेले दिसतातः त्यांपैकीं तादर्थ्य या अर्थी चतुर्थी[3], प्रकृत्या वगैरे शब्दांचे बाबतींत तृतीया[4], निमित्त, कारण हेतु वगैरे[5] शब्दांचे बहुतेक सर्व विभक्तींत प्रयोग, ल्यप् प्रत्ययाचा लोप झाला असतां पंचमीचा प्रयोग[6] हे विशेष लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. लिंगांचे बाबतींतही अकारान्त द्विगुसमासांचे स्त्रीलिंगी प्रयोग वार्तिककारांचे वेळीं पुष्कळच रूढ झालेले असावे[7].

## १३२. कृत्तद्धितप्रत्यय-प्रकरणावरील वार्तिकें.

संज्ञा व पदविधि यांचें विवेचन असणाऱ्या अष्टाध्यायीच्या पहिल्या दोन अध्यायांत व्याकरणशास्त्रांतील महत्त्वाच्या बऱ्याच विषयांचें विवेचन होऊन गेल्यामुळें धातुसाधितें व नामसाधितें यांचें विवेचन असणाऱ्या तिसऱ्या चौथ्या व पांचव्या अध्यायांत अनुक्तदुरुक्तचिंतनपर वार्तिकांच्या संख्येचें प्रमाण जरी वाढलें असलें तरी महत्त्वाच्या सूत्रांवर वार्तिककारांनीं व्याख्यानरूप वार्तिकें बरींच लिहिलीं आहेत. त्यांपैकीं तिसऱ्या अध्यायांतील प्रत्ययः ( ३।१।१ ), आद्युदात्तश्च

---

१. याविषयीं "अल्पाच्तरम्" ( २।२।३४ ) या सूत्रावरील वार्तिकें ( ३–९ ) पहा.

२. या बाबतींत विशेषतः 'अर्थेन नित्यसमासः सर्वलिङ्गता च' ( २।१।३६ वा. ४,५ ), समानाधिकरणाधिकारे शाकपार्थिवादीनामुपसंख्यानमुत्तरपदलोपश्च ( १।१।६९ वा. ८ ) पहा.

३. 'चतुर्थीविधाने तादर्थ्य उपसंख्यानम्' ( २।३।१३ वा. १ ) पहा.

४. 'तृतीयाविधाने प्रकृत्यादिभ्य उपसंख्यानम्' ( २।३।१८ वा. १ ) पहा.

५. 'निमित्तकारणहेतुषु सर्वासां प्रायदर्शनम्' ( २।३।२३ वा. १ ) पहा.

६. 'पञ्चमीविधाने ल्यब्लोपे कर्मण्युपसंख्यानम्' ( २।३।२८ वा. १ ) पहा.

७. या बाबतींत 'अर्धर्चाः पुंसि च' ( २।४।३१ ) या सूत्रावरील 'वा स्त्रियाम्,' 'द्विगुः स्त्रियां च' व 'पात्रादिभ्यः प्रतिषेधः' हीं वार्तिकें पहा.

( ३।१।३ ), धातोः कर्मणः० ( ३।१।७ ), हेतुमति च ( ३।१।२६ ), कर्मवत् कर्मणा० ( ३।१।८७ ), वासरूपः० ( ३।१।९१ ), लटः शतृशानचौ० ( ३।२।१२४ ), आणि कर्तरि कृत् ( ३।४।६७ ) या सूत्रांवरील, त्याप्रमाणेंच चवथ्या व पांचव्या अध्यायांतील ङ्याप्प्रातिपदिकात् ( ४।१।१ ), स्त्रियाम् ( ४।१।३ ), तस्यापत्यम् ( ४।१।९२), एको गोत्रे ( ४।१।९३ ), जीवति तु० (४।१।१६३), अव्ययात् त्यप् (४।२।१०४) आणि तस्य भावस्त्वतलौ ( ५।१।११९ ) या सूत्रांवरील वार्तिककारांनीं केलेलें व्याख्यान चिकित्सक पद्धतीनें केलेलें आहे व चर्चाही फार मार्मिक आणि उद्बोधक आहे. अनुपसर्जनात् ( ४।१।१४ ), छन्दोब्राह्मणानि च० ( ४।२।६६ ), सायंचिरं० ( ४।३।२३ ), तस्य विकारः (४।३।१३४) या सूत्रांवरील वार्तिकांमध्यें निरनिराळ्या प्रकारच्या शंका उपस्थित करून त्यांचें निराकरण केलें आहे; त्याप्रमाणेंच उगितश्च ( ४।१।६ ) व पाककर्णपर्ण० ( ४।१।६४ ) या सूत्रांवरील विवेचनांत वार्तिककारांनीं सूत्रांच्या अतिव्याप्तीचा परिहार करण्याकरितां प्रतिषेधवचनेंही केलीं आहेत.

## १३३. धातू, तिङ्प्रत्यय व सुप्प्रत्यय यांविषयीं वार्तिककारांचें विवचत.

धातुसाधितें व नामसाधितें या बाबतींत वार्तिककारांचे वेळीं प्रचलित भाषेंत शब्दसमृद्धीची पुष्कळच वाढ झालेली दिसून येते. भाषेचें स्वरूप कायम असल्यामुळें सुप् प्रत्यय, तिङ् प्रत्यय, विभक्तींची संख्या व कालार्थवाचक लकार यांमध्यें व त्यामुळें होणाऱ्या आगम, आदेश वगैरे विकारांमध्यें फरक मुळींच झाला नाहीं; त्याप्रमाणेंच लौकिक व्यवहारामध्यें जरूर लागणाऱ्या धातूंच्या मानानें धातुपाठांतील धातूंची संख्या फारच मोठी असल्यामुळें धातूंच्या संख्येंतही वाढ झाली नाहीं. संस्कृत धातूंपासूनच, पण साधारणपणें उच्चारणास जरूर त्यापेक्षां जास्त बदल होऊन तयार झालेले. धातू व कांहीं देश्य धातू प्रचलित प्राकृत भाषामध्यें प्रचारांत आले होते व त्यांवरून त्यांना अनुरूप असे संस्कृत धातू प्रचारांत आणण्याचा प्रयत्न झाला होता पण त्याला धातुपाठांतील धातूंचें परिगणन व व्याकरणानुरूप प्रयोग करण्याची तीव्र इच्छा यांमुळें आळा बसला व 'आणवेइ','कुव्वइ' यांसारख्या नेहमीं प्राकृतांत प्रचारांत असलेल्या आणव आणि कुव्व या धातूंना अनुरूप अशा आणप व कुर्व या धातूंचीं कल्पना संस्कृतमध्यें करण्यांत आली नाहीं. 'भूवादिपाठः प्रातिपदिकाणपयत्यादिनिवृत्त्यर्थः' ( पा. सू. १।३।१ वा. १२ ) या वार्तिकावरून ही गोष्ट स्पष्टपणें कळून येते. धातुसाधित धातूंची सिद्धि करतांना पाणिनीनें सांगितलेल्या अर्थांचें मात्र वार्तिककारांच्या वेळीं नियन्त्रण झालेलें दिसून आलें व त्याला अनुसरून गुपेर्निन्दायाम्, तिजेः क्षमायाम् यांसारखीं वचनें वार्तिककारांना करावीं लागलीं.

## १३४. वार्तिकांमध्येंच आढळणारे कांहीं विशिष्ट कृत्प्रत्यय व तद्धितप्रत्यय.

धातुसाधितें (कृत्प्रत्ययान्त शब्द) व नामसाधितें (तद्धितप्रत्ययान्त शब्द) साधण्याकरितां पाणिनीनें सांगितलेल्या प्रत्ययांतही अगदीं किरकोळ स्वरूपाचीच वाढ झाली. उदाहरणार्थ— पचेलिम भिदेलिम यांसारखे शब्द वार्तिककारांचे वेळीं प्रचारांत आल्यामुळें तव्य, अनीय

---

१. गुपेर्निन्दायाम्, तिजेः क्षमायाम् यांसारखीं सात वार्तिकें काशिकेमध्यें दिलीं आहेत. हस्तलिखित वार्तिकपाठांत ' निन्दाक्षमाव्याधिप्रतीकारेषु सन्निष्यते ' हें एकच वार्तिक आहे. महाभाष्यामध्यें हीं वार्तिकें मुळींच आढळत नाहींत.

यांसारख्या एलिम ( केलिमर् ) प्रत्ययाची कल्पना करण्यांत आली. होतां होईल तों पाणिनीनेंच सांगितलेले कृत् व तद्धित प्रत्यय तसेच आगम व आदेश—कोठें कोठें इष्ट स्वर साधण्याकरितां फार तर अनुबंध बदलून—वार्तिककारांनीं आपल्या वेळीं प्रचारांत आलेले शब्द साधण्याकरितां उपयोगांत आणले. अगदीं थोड्याच ठिकाणीं निराळ्या प्रत्ययांची कल्पना केली. त्यांपैकीं रोगाख्यायां ण्वुल् बहुलम् ( ३।३।१०८ ) या सूत्रांवरील वार्तिकांमध्यें धातूचा अर्थ दाखविण्याकरितां धातूहून ण्वुल् होतो असें सांगितलें आहे व त्याबरोबर त्याच अर्थी इक् व श्तिप् हे प्रत्यय सांगितल्यानंतर अ इ उ क ख वगैरे वर्णवाचक शब्दांहून कार, व र या वर्णाहून इफ, त्याप्रमाणेंच मत्वर्थ या शब्दाहून छ सांगून झाल्यावर अज् वगैरे धातूंहून इण्, वप् वगैरे धातूंहून इञ्, कृष् वगैरे धातूंहून इक् व संपद् वगैरे धातूंहून क्विप् हे प्रत्यय सांगितले आहेत. यांमध्यें कार, इफ आणि छ हे नामाहून सांगावयाचे असल्यामुळें वास्तविक पाहतां तद्धित प्रत्ययामध्येंच ते सांगणें योग्य होतें. कदाचित् धातूहून धातूच्याच अर्थी प्रत्यय सांगितल्यानंतर वर्णाहून वर्णाच्याच अर्थी प्रत्यय सांगणें वार्तिककारांच्या मनांत आल्यामुळें त्यांनीं त्याच ठिकाणीं ते सांगितले असावे. तद्धितप्रकरणांत पितृव्यमातुल० ( ४।२।३६ ) या सूत्रावरील वार्तिकांत सोढ दूस, मरीस, पिज्ज व पेज, त्याप्रमाणेंच बहुलं छन्दसि ( ५।२।१२२ ) या सूत्रावरील वार्तिकांमध्यें वरील प्रत्ययांसारखेच आरकन्, इनच्, चालु, चेलु, ऊल, तप्, हे प्रत्यय सांगितले आहेत. वरील प्रकारच्या सर्व ठिकाणीं व्युत्पत्तीला योग्य दिसणाऱ्या धातूंना व प्रातिपदिकांना योग्य ते प्रत्यय स्वतंत्र वार्तिकें करून सांगितले आहेत. धातुसाधितें सांगणाऱ्या तिसऱ्या अध्यायावरील एकंदर६९९वार्तिक वचनांपैकीं १९१ वार्तिकें, त्याप्रमाणेंच नामसाधितें सांगणाऱ्या चौथ्या व पांचव्या अध्यायावरील एकंदर १०१८ वार्तिकवचनांपैकीं ४०० वार्तिकें हस्तलिखित वार्तिकपाठांत आढळतात.

## १३५. द्वित्व, संप्रसारण, एकादेश यांविषयीं वार्तिकवचनें

सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादांत प्रारंभीं द्वित्व, संप्रसारण, एकादेश इत्यादि महत्त्वाच्या विषयांचें सूत्रकारांनीं निरूपण केलें आहे. हे द्वित्व, संप्रसारण वगैरे विधी सांगणाऱ्या १७५ सूत्रांवरील एकंदर ३४५ वार्तिकांपैकीं ५० अनुक्तदुरुक्तचिंतनपर वार्तिकें सोडल्यास बाकीचीं सर्व वार्तिकें उक्तचिंतनपरच आहेत. त्यांपैकीं एकाचो द्वे० ( ६।१।१ ) अजादेः० ( ६।१।२ ) या सूत्रांवरील वार्तिकांमध्यें केलेलें द्वित्वाच्या स्वरूपाविषयीं विवेचन, व एकः पूर्वपरयोः (६।१।८३) आणि अन्तादिवच्च ( ६।१।८४ ) या सूत्रांवरील वार्तिकांमध्यें केलेलें एकादेशाच्या स्वरूपाचें विवेचन हीं दोन्हीं शास्त्रीय विवेचन या दृष्टीनें फार महत्वाचीं

---

१. केलिमर उपसंख्यानम् ( ३।१।९६ वा. १ ) पहा. 'कर्मकर्तरि केलिमर उपसंख्यानम्' असें वार्तिक हस्तलिखित वार्तिकपाठांत आढळतें.

२. धात्वर्थनिर्देशे ण्वुल्, इक्श्तिपौ धातुनिर्देशे, वर्णात्कारः, रादिफः, मत्वर्थाच्छः भसंज्ञा च वक्तव्या, इणजादिभ्यः, इञ् वपादिभ्यः, इक् कृष्यादिभ्यः, संपदादिभ्यः क्विप् ( ३।३।१०८ वा. १–९ ) पहा.

३. अवेर्दुग्धे सोढदूसमरीसचः, तिलान्निष्फलात् पिञ्जपेजौ ( ४।२।३६ वा. ५,६ ) पहा

४. शकवृन्दाभ्यामारकन्, फलबर्हाभ्यामिनच्, हृदयाच्चालुजन्यतरस्याम्, शीतोष्णतृप्रेभ्यस्तन्न सहते, हिमाच्चेलुः, बलादूलः, वाताद् समूहे च, पर्वमरुद्भ्यां तप ( ५।२।१२२ वा. ३–१० ) पहा.

आहेत. भाषादृष्टीनें द्वित्व, संप्रसारण, धात्वादेश, नामादेश एकादेश वगैरे बाबतींतही थोडेफार महत्वाचे फेरफार दिसून आले. द्वित्वाचे बाबतींत उब्ज्, ईर्ष्य्, कण्डूादि गणांतील स्वरादि धातू व स्वरादि नामधातू यांना द्विर्वचन करतांना कोणता द्वितीय एकाच्–भाग घ्यावा याविषयीं प्रचारांत असलेल्या प्रयोगांना अनुसरून वार्तिककारांनीं पूरक व नियामक वार्तिकें केलीं. त्याप्रमाणेंच चकुरि, जगुरि, चराचर, घनाघन, शीर्षक, नस्य इत्यादि शब्द साधण्याकरितांही वार्तिककारांना वचनें करावी लागलीं. संधींचे बाबतींतही गव्यूति, अक्षौहिणी, दशार्ण, तस्कर, बृहस्पति, शकन्धू, इत्यादि शब्द साधण्याकरितां स्वतंत्र वचनें वार्तिककारांनीं केलीं. यण्संधीचे बाबतींतही संधि न होतां इक् स्वराचें उच्चारण व त्याला होणारा ह्रस्व स्वर हें शाकल्याचें विशिष्ट मत म्हणून ज्याचा पाणिनीनें उल्लेख केला आहे तो शाकल–प्रकृतिभाव वार्तिककारांचे वेळीं फारच प्रचारांत होता व त्याचा 'शाकल' या नांवानें उल्लेख केला जात असे. वार्तिककारांनीं या शाकलसंधीलाही लोकांमधील प्रयोग पाहून " सिति शाकलं न " यासारखीं प्रतिषेधवचनें केलीं. णत्व व षत्व यांसंबंधींचीं वार्तिककारांचीं वचनें एका दृष्टीनें फार महत्वाचीं आहेत. "धात्वादेः षः सः" व "णो नः" (६।१।६३,६४) हीं सूत्रें विचारांत घेतल्यास पाणिनिप्रक्रियेप्रमाणें षकारादि व णकारादि धातूंना संस्कृत भाषेमध्यें मुळींच स्थान नाहीं, विशिष्ट प्रसंगीं रेफ किंवा षकाराचा योग आला असतां नकाराला णकार होतो, तसेंच, इण् स्वर किंवा क वर्गांतील व्यंजन यांचा योग आला असतां सकाराला षकार होतो, असें पाणिनीनें प्रतिपादन केलें आहे. हा सकाराला षकार किंवा नकाराला णकार कांहीं विशिष्ट धातूंचे बाबतींतच दिसून येतो व ज्या विशिष्ट धातूंचे बाबतींत तो दिसून येतो त्यांचें धातुपाठांत पाणिनीनें षकारादि अथवा णकारादि असें उच्चारण केलें आहे. या सर्व गोष्टींवरून अनुमान असें निघणें शक्य आहे कीं ज्यांचे बाबतींत हें णत्व किंवा षत्व दिसून येतें ते सर्व धातू पाणिनीच्या वेळच्या प्राकृत भाषांमध्यें षकारादि व णकारादि असेच असावे; षकारादि ष्ठीव्, ष्वष्क् वगैरे धातूंचा षकार व णकारादि नामधातूंचा णकार हे कायम ठेवावे असें वार्तिककारांनीं स्पष्टच सांगितलें आहे; यावरूनही प्राकृत भाषांमधील षकारादि व णकारादि धातू संस्कृतमध्यें घेतले असावे असें स्पष्ट होतें.

---

१. ईर्ष्यतेस्तृतीयस्य द्वे भवत इति वक्तव्यम्, कण्ड्वादीनां च तृतीयस्यैकाचो द्वे भवत इति वक्तव्यम्, वा नामधातूनाम्, यथेष्टं नामधातुष्विति वक्तव्यम् ( ६।१।३ वा. २–४ ) पहा.

२. द्विर्वचनप्रकरणे कृञादीनां के द्वे भवत इति वक्तव्यम्, चरिचलिपतिवदीनां अचि आक् चाभ्यासस्य, हन्तेर्घश्च, पाटेर्णिलुक् च दीर्घश्चाभ्यासस्योक् च ( ६।१।१२ वा. ५–८ ) पहा. त्याप्रमाणेंच, ये च तद्धिते ( ६।१।६१ ) आणि पद्दन्नोमास्० ( ६।१।६२ ) या सूत्रांवरील वार्तिकें पहा.

३. अध्वपरिमाणे च ( ६।१।७८ वा. ३ ), अक्षादूहिन्याम्... ( ६।१।८८ वा. ३–८ ) तद्बृहतोः करपत्योः० ( ६।१।१५३ वार्तिक ) पहा.

४. इकोऽसवर्णे शाकल्यस्य ह्रस्वश्च ( ६।१।१२५ ) आणि त्यावरील वार्तिकें सिन्नित्यसमासयोः शाकलप्रतिषेधः, ईषाअक्षादिषु च्छन्दसि प्रकृतिभावमात्रम् पहा.

५. 'इण्कोः,' 'नुम्विसर्जनीयशर्व्यवायेपि......शासिवसिघसीनां च ... ...उपसर्गात्सुनोति० ... ...वेः स्कभ्नातेर्नित्यम् ( ८।३।५७–७७ ) त्याप्रमाणेंच 'रषाभ्यां नो णः०,' 'अट्कुप्वाङ्०' ( ८।४।१,२ ) उपसर्गादसमासेपि **णोपदेशस्य** ( ८।४।१४ ) नेर्गदनद० ( ८।४।१७ ) इत्यादि सूत्रें पहा.

## १३६. स्वरप्रकरण, अलुक्समास, पुंवद्भाव, व मुमागम यांवरील वार्तिकें.

स्वरप्रकरणावर एकंदर १५५ वार्तिकें आहेत व त्यांपैकीं १३१ उक्तार्थचिंतनपर आहेत व २४ अनुक्तदुरुक्तचिंतनपर आहेत. वैदिक वाङ्मय हें निश्चितस्वरयुक्त जसेंच्या तसेंच राहिलें गेल्यामुळें स्वरांचे बाबतींत स्पष्टीकरणाकरितां कांहीं वार्तिकें अनुदात्तं पदमेकवर्जम् (६।१।१५४) इत्यादि सूत्रांवर लिहिलीं गेलीं. त्यांमध्यें शब्दसिद्धि करतांना ज्या क्रमानें सूत्रांची प्राप्ति येते त्याप्रमाणेंच स्वरांमध्यें बदल होतो व शेवटीं जो आगम अथवा आदेश होतो किंवा प्रत्यय लागतो त्याला अनुसरून शेवटचा स्वर कायम राहतो या तत्त्वाचें 'सतिशिष्टस्वरबलीयस्त्वम्' या शास्त्रीय संकेतामध्यें वार्तिककारांनीं स्वरसिद्धि करतांना प्रतिपादन केलें आहे.[1] हस्तलिखित वार्तिकपाठामध्यें स्वरप्रकरणावर अवघीं चोवीसच वार्तिकें आहेत व त्यांमध्यें कांहीं वैदिक शब्दांचे विशिष्ट प्रत्यय लागल्यासच इष्ट स्वर साधत असतील तर ते स्वर साधण्याकरितां त्या स्वरांचें विधान केलें आहे. सहाव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील अलुक्समास, पुंवद्भाव, मुमागम, व समासामध्यें पूर्वपदाला होणारे आदेश या बाबतींत वार्तिककारांचे वेळीं बरेच फरक दिसून आले. या पादावरील एकंदर १४० वार्तिकांपैकीं ६७ वार्तिकें हस्तलिखित वार्तिकपाठांत आढळतात. ओजसाकृत, जनुषान्ध, खेशय, वाचोयुक्ति, देवानांप्रिय, शुनःशेप, दिवोदास इत्यादि शब्द साधण्याकरितां केलेलीं पञ्चम्याः स्तोकादिभ्यः (६।३।२) षष्ठ्या आक्रोशे (३।२।२०) इत्यादि सूत्रांवरील वार्तिकें बरींच महत्त्वाचीं आहेत. पुंवद्भावाचे बाबतींतही तसिलादिष्वाकृत्वसुचः (६।३।३४), जातेश्च (६।३।४०), पुंवत्कर्मधारय० (६।३।४१) इत्यादि सूत्रांवरही पुंवद्भावाचीं विधायक व निषेधक वचनें भाषेमध्यें आढळून येणाऱ्या प्रयोगांना अनुसरून वार्तिककारांना करावीं लागलीं. आत्व, ह्रस्व व मुमागम या बाबतींतही अष्टाकपाल, द्वादश, द्वाविंशति, भ्रुकुटि, लोकंपृण, इत्यादि शब्द साधण्याकरितांही वार्तिककारांनीं अनेक वचनें[2] केलीं आहेत. यांशिवाय पाणिनीनें पृषोदरादि गणामध्यें साधारण नियमांनीं साधतां न येणारे पृषोदर इत्यादि विशिष्ट शब्द घातले आहेत त्यांमध्येंही षोडश, षोढा, दूडभ इत्यादि शब्दांच्या सिद्धीकरितां वार्तिककारांनीं पूरक वचनें[3] केलीं आहेत.

## १३७. अङ्गाधिकारावरील वार्तिकें.

अङ्गाधिकाराच्या पांच पादांवरील ६५९ वार्तिक-वचनांपैकीं हस्तलिखित सूत्रापाठांतील ११३ वचनें सोडल्यास बाकीचीं सर्व ५४६ वचनें उक्तचिंतनपरच आहेत. अंगाधिकारांतील सूत्रें हीं प्रकृतीला प्रत्यय जोडून शब्दनिष्पादन करण्याकरितां लिहिलेलीं नाहींत. तिसऱ्या, चौथ्या व पांचव्या अध्यायांत दिल्याप्रमाणें प्रत्यय जोडून शब्दनिष्पत्ति करतांना प्रकृतीमध्यें व प्रत्ययामध्यें जे विकार दिसून येतात ते सांगण्याकरितां अंगाधिकारांतील सूत्रें रचिलीं गेल्यामुळें वार्तिककारांचीं वार्तिकें हीं बहुतांशीं सूत्रार्थ व सूत्रप्रवृत्ति याविषयींचींच आहेत. उदाहरणांची सिद्धि करतांना योग्य प्रकारानें योग्य त्या विकाराची योजना होण्याकरितां आवश्यक त्या सूत्राची प्राप्ति घडवून आणणें हें काम जितकें महत्त्वाचें आहे तितकें कठिणही आहे. त्यामुळें वार्तिक-

---

१. ६।१।१५४ वा. ९ पहा.

२. याकरितां 'आन्महतः समानाधिकरणजातीययोः' (६।३।४५), द्व्यष्टनः संख्यायाम्० (६।३।४६) या सूत्रांवरील वार्तिकें पहा.

३. 'पृषोदरादीनि यथोपदिष्टम्' (६।३।१०८) या सूत्रावरील वार्तिकें (१–६) पहा.

कारांना या अंगाधिकारांतील सूत्रांवर सूत्रप्रातिनियामक वार्तिकेंही करावीं लागलीं व बऱ्याच ठिकाणीं त्यांनीं "न वा बहिरङ्गलक्षणत्वात्" या शब्दांनीं अन्तरङ्गबलीयस्त्वाचें प्रतिपादन करून, किंवा सूत्राचा योगविभाग करून इष्ट रूपें साधलीं आहेत. वैयाकरणपरंपरेंतील अध्ययनपद्धतीमध्यें अङ्गाधिकारभाष्याला विशेष प्रकारचें जें महत्त्व आलें आहे तें वार्तिककारांनीं अंगाधिकारांतील सूत्रांचें जें शास्त्रीय विवेचन केलें आहे त्यामुळेंच आहे. अङ्गस्य ( ६।४।१ ), अत एकहल्मध्ये० ( ६।४।१२० ), युवोरनाकौ ( ७।१।१ ), शीङो रुट् ( ७।१।६ ), अद्ड्डुतरादिभ्यः पञ्चभ्यः (७।१।२६), गमेरिट् परस्मैपदेषु (७।१।५८), तद्धितेष्वचामादेः (७।२।११७) या सूत्रांवरील वार्तिककारांचें विवेचन या बाबतींत फार महत्त्वाचें आहे. अंगाधिकारांतील आभीयासिद्धत्व-कल्पनेचा ऊहापोह वार्तिककारांनीं फारच मार्मिकपणें केला आहे. 'अभीय-प्रकरणा'-मधील (६।४।२२..१४२)दोन कार्यें एकदम उपस्थित झालीं असतां त्यांतील एक कार्य दुसऱ्या कार्याला असिद्ध होतें ही आभीयासिद्धत्वाची पाणिनीची मूळ कल्पना आहे व तिच्या मुळाशीं एका कार्यानें दुसऱ्या कार्याचा बाध न होतां दोन्ही कार्यें व्हावीं हा हेतु आहे. वार्तिककारांनीं या कल्पनेचें स्पष्टीकरण केलें आहे. कांहीं ठिकाणीं दोन कार्यें एकदम प्रवृत्त होत नाहींत; दोनही कार्यें इष्ट असतात; पण जें प्रथम प्राप्त होतें तें झाल्यास दुसऱ्या कार्याचें निमित्त नाहींसें झाल्यामुळें तें प्रवृत्त होत नाहीं. अशा ठिकाणीं झालेल्या कार्याचें असिद्धत्व मानिल्याशिवाय गत्यंतरच नसतें; व त्याप्रमाणें वार्तिककारांनीं तसें आभीयत्व मानावें असें म्हटलें आहे. ही जाताभीयासिद्धत्वकल्पना एका दृष्टीनें फार महत्त्वाची आहे. कारण बहिरङ्गासिद्धत्वाचीच नव्हे तर जातबहिरङ्गासिद्धत्वाची कल्पना या जाताभीयासिद्धत्वकल्पनेवरच आधारलेली आहे. आठव्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील द्विरुक्ति व सर्वनिघात या दोन प्रकरणांवर वार्तिक-कारांच्या ८७ वचनांपैकीं २७ वचनें हस्तलिखित वार्तिकपाठामध्यें आढळतात. द्विरुक्तीचे बाबतींत वार्तिककारांनीं आपल्या वेळीं प्रचारांत आलेल्या द्विरुक्तिस्थलांचें निदर्शन करण्या-करितां ' आनुपूर्व्ये द्वे भवतः ' इत्यादि वार्तिकें लिहून आनुपूर्व्य, आभीक्ष्ण्य, क्रियासमभिहार, अव्यक्तानुकरण, कर्मव्यतिहार इत्यादि अर्थ असतांनाही द्विरुक्तीचें विधान केलें आहे.

---

१. याकरितां १।१।४७ वा. ७, ३।१।३ वा. ९, ६।१।६५ वा. ५, ६।१।८४ वा. २३, ६।१।९२वा.४, ६।१।१११ वा. २, ६।१।१२३ वा.५, ६।१।२०१ वा.२, ६।२।२९ वा.२. ७।१।१४वा.२, त्याप्रमाणेंच १।२।४७ वा. ५, ६।१।१३२ वा. ७, ७।१।३७ वा. ३, ७।१।८९ वा. १, ७।२।१ वा. ४, ७।२।१०७ वा. ४, ८।२।२३ वा. ३, ८।२।४२ वा. ५, ८।३।१५ वा. २, १।१।५ वा. ३, १।४।२ वा. ८, ७।१।६ वा. ५, पहा. यांपैकीं 'आङि पररूपवचनं तु ज्ञापकमन्तरङ्गबलीयस्त्वस्य ६।१।१०६ वा. ९, हें वार्तिक विशेष लक्षांत घेण्याजोगें आहे.

२. याकरितां १।१।३ वा. ८, १।१।१७ वा. १, १।१।६१ वा. ३, २।४।२ वा. २, ३।१।६७ वा. ५, ३।४।२ वा. ६, ६।१।१ वा. ५, ६।१।३३ वा. १, ६।१।१०० वा. १, ६।३।९ वा. ३, ७।२।६३ वा. ३, ७।३।११६ वा. २, ७।३।११९ वा. १, ७।३।२३ वा. ६, ८।३।५९ वा. ६ ८।४।६ वा. ५ पहा.

३. याविषयीं ' असिद्धवदत्रा भात् ' ( ६।४।२२ ) सूत्रावरील वार्तिकें १–१० पहा.

४. याविषयीं ' प्रकारे गुणवचनस्य ' ( ८।१।१२ वा. ३–१० ) पहा.

## १३८. त्रिपादीवरील वार्तिककारांचीं वचनें.

त्रिपादी या नांवानें प्रसिद्ध असलेल्या अष्टाध्यायीच्या शेवटच्या तीन पादांवरील २७८ वार्तिकांपैकीं ७३ वार्तिकें हस्तलिखित वार्तिकपाठांत आढळतात. अङ्गाधिकारांतील वार्तिकांप्रमाणेंच त्रिपादींतील पुष्कळशीं वार्तिकें हीं रूपसिद्धीचे कामीं सूत्रांची प्राप्ति व पौर्वापर्य ठरविण्याकरितांच बहुधा लिहिलीं आहेत. शब्दनिष्पत्ति व शब्दसिद्धि सपाद सप्ताध्यायीमध्यें सांगून झाल्यानंतर क्रमप्राप्त म्हणून शब्दसांनिध्यामुळें होणारे फरक त्रिपादीमध्यें पाणिनीनें सांगितले आहेत. या तीन पादांतील कार्यें "विप्रतिषेधे परं कार्यम्" ( १।४।२ ) या पाणिनीनें दिलेल्या नियमाप्रमाणें रूपसिद्धीकरितां सांगितलेल्या सव्वासात अध्यायांतील कार्यांपेक्षां पूर्वीं झाल्यास अनिष्ट रूपें होऊं लागलीं; तीं न व्हावीं व इष्ट रूपें साधावीं या बुद्धीनें पाणिनीनें मागील सव्वासात अध्यायांच्या दृष्टीनें या तीन पादांविषयीं पूर्वत्रासिद्धम् ( ८।२।१ ) या सूत्रानें असिद्धत्वाची कल्पना केली आहे हें ( मागें पृ. १६२ ) सांगितलेंच आहे. या त्रिपादींतील महत्त्वाचीं कार्यें म्हणजे स्वरकार्यें ( ८।२।४–६,८।४।६६–६७ ), वर्णविकार ( ८।२।७--८१ ), प्लुत वगैरे कार्यें ( ८।२।८२--१०८ ), रुत्व वगैरे संधिकार्यें ( ८।३।१--३८ ) षत्व ( ८।३।३९--११७), णत्व (८।४।१--३९) आणि श्चुत्व वगैरे संधिकार्यें ( ८।४।४०--६५ ) हीं होत. यांपैकीं स्वरकार्यांविषयींचीं, षत्वाविषयींचीं व णत्वाविषयींचीं वार्तिकवचनें महत्वाचीं आहेत. स्वरितो वानुदात्ते पदादौ ( ८।२।६ ) या सूत्रावर वार्तिककारांनीं पूर्वत्रासिद्धम् या सूत्रानें सांगितलेलें असिद्धत्व घेतल्यास येणाऱ्या दोषांच्या परिहाराकरितां अनेक वचनें केलीं आहेत. पाणिनीनें केलेल्या असिद्धत्वकल्पनेनें बहुतेक ठिकाणीं जरी इष्टसिद्धि झाली तरी सपादींतील कांहीं कार्यें अशीं दिसून आलीं कीं जीं केलीं तर कांहीं ठिकाणीं त्रिपादींतील कार्यांचें निमित्त नाहींसें होऊन, तर कांहीं ठिकाणीं सपादींतीलही कार्यांचें निमित्त नाहींसें होऊन इष्ट कार्यें— विशेषतः एकादेशकार्यें--घडून येण्यास अडचण पडूं लागली. या अडचणीचा परिहार करण्यास पूर्वत्रासिद्धम् यासारखा 'षत्वतुकोरसिद्धः' (६।१।८५) हा नियम पाणिनीला करावा लागला. षत्व व तुग्विधि हीं पुष्कळ ठिकाणीं एकाच पदामध्यें प्रवृत्त होणारीं कार्यें असल्यामुळें व त्रिपादींतील कार्यें हीं बहुशः पदसिद्धीनंतर घडून येणारीं कार्यें असल्यामुळें त्रिपादीमध्यें त्यांचें विधान करण्यास अडचण पडूं लागली. या बाबतींत असेंही अनुमान काढणें शक्य आहे कीं ज्या ठिकाणीं तुगागम किंवा षत्व हें एकाच पदामध्यें आढळून येतें तेथें पुरातन वैयाकरणांनीं मूळचीं दोन पदें मानिलीं असावीं. पाणिनीनेंही ज्या सु वगैरे प्रत्ययांना षत्व होतें ते पुढें असतांना मागील अंगाला पदसंज्ञा सांगितली आहे; व पदपाठांतही अशा ठिकाणीं दोन पदें पाडलेलीं दिसतात. या असिद्धत्वकल्पनेसारखीच आतिदेशिक असिद्धत्वाची कल्पनाही असिद्धवदत्राभात् या सूत्रांत सांगितली आहे, व या कल्पनेवरूनच बहिरङ्गासिद्धत्वाची कल्पना भाष्यकारांनीं केलेली असावी.

## १३९. वार्तिककारांनीं उद्‌धृत केलेले लौकिक न्याय व शास्त्रसंकेत.

पाणिनिसूत्रांचा योग्य अर्थ लावून भाषेंतील सर्व शिष्टसंमत शब्द साधण्याकरितां वार्तिककारांना कोणत्या प्रकारचीं वार्तिकें करावीं लागलीं हें वर सांगितलेंच आहे. परंतु, वार्तिकांची जोड देऊन व सूत्रार्थ योग्य प्रकारें करूनही कांहीं शिष्टसंमत शब्द व प्रयोग

साधण्यास अडचणी आल्या व त्यांचें निवारण वार्तिककारांनीं कांहीं लोकसिद्ध न्याय व कांहीं शास्त्रसंकेत स्वीकारून केलें. वार्तिकांमध्यें ठिकठिकाणीं आढळणाऱ्या या लौकिकन्यायांची व शास्त्रसंकेतांची संख्या चाळीसचे वर जाते. वार्तिककारांनीं या लौकिक व शास्त्रीय न्यायांची व संकेतांची सिद्धि केली नाहीं व उपपत्तीही दिली नाहीं. लौकिकन्याय हे लोकांमध्यें प्रचलितच आहेत असें धरून व शास्त्रसंकेतांपैकीं पुष्कळसे संकेत इतर शास्त्रांत व वाङ्मयांत आले असल्यामुळें व्याकरणसूत्रांचें अध्ययन करणाऱ्यांना ते माहीतच आहेत असें समजून जशी जरूर पडली तसे ते त्यांनीं उद्धृत केले व सूत्रांच्या अर्थाची निश्चिति केली, इष्ट उदाहरणें साधलीं व अनिष्ट प्रयोगांचें निवारण केलें. भाष्यकारांनीं यांपैकीं बहुतेक न्यायांची व संकेतांची ज्ञापकानें किंवा अन्य रीतीनें सिद्धि केली आहे व योग्य उदाहरणेंही दिलीं आहेत. वार्तिककारांनीं मात्र अन्तरङ्गबलीयस्त्व व लिङ्गविशिष्टग्रहण या दोनच संकेतांचीं ज्ञापकानें सिद्धि केली आहे व संनिपात, लिङ्गविशिष्ट वगैरे थोड्या संकेतांचीं उदाहरणें दिलीं आहेत. या सर्व लौकिकन्यायांना व शास्त्रसंकेतांना महाभाष्यकारांनीं उपयोगांत आणिलेला 'परिभाषा' हा शब्द नंतरच्या वैयाकरणांकडून लावण्यांत आला. भाष्यकारांनीं या न्यायांमध्यें व संकेतांमध्यें पुष्कळच भर घातली. नंतरचे वैयाकरण सूत्रार्थनिश्चय व उदाहरणसिद्धि या बाबतींत या व इतर परिभाषांचा उपयोग ठिकठिकाणीं करूं लागले व त्यांनीं या परिभाषांचा संग्रह व विवेचन करून परिभाषाभास्कर, परिभाषावृत्ति, परिभाषेन्दुशेखर यांसारखे स्वतंत्र ग्रंथ लिहिले. हे न्याय व संकेत लोकप्रसृत व शास्त्रसिद्धच आहेत असें वार्तिककारांनीं गृहीत धरण्याचें कारण, परंपरागत अध्ययनाध्यापनपद्धतींत त्यांचा वेळोवेळीं उपयोग केला जात असावा हें असावें. कदाचित् व्याडिकृत परिभाषाविवरणग्रंथ व त्यासारखे इतर ग्रंथही वार्तिककारांचे वेळीं अस्तित्वांत व प्रचारांत असावे.

## १४०. वार्तिककारांचे व्याकरणविषयक मौलिक सिद्धान्त.

वार्तिककारांनीं वार्तिकें रचितांना पुढील ठळक ठळक सिद्धांत मूलभूत धरूनच आपलीं वार्तिकें रचिलीं आहेत: ( १ ) व्याकरण हें **अर्थयुक्त** शब्दांचें शास्त्र आहे; केवळ वर्णांचें किंवा ध्वनींचें शास्त्र नव्हे; ( २ ) शब्दांचा अर्थाशीं असलेला संबंध नित्य आहे; तो कोणत्याही व्यक्तीनें अंमलांत आणलेला नाहीं; ( ३ ) शुद्ध म्हणजे शिष्टसंमत अशा शब्दांची सिद्धि व अशुद्ध शब्दांचा परिहार याकरितां व्याकरणशास्त्राची प्रवृत्ति आहे. व्याकरण हें शब्दशास्त्र आहे असें म्हणण्यांत येतें व त्याचा अभिप्राय अर्थासहित शब्दांचें जरी व्याकरण हें शास्त्र असलें तरी या शास्त्राचे नियम सांगतांना शब्दालाच प्राधान्य दिलें जातें, अर्थाला दिलें जात नाहीं हा आहे. या बाबतींत "स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा" ( १।१।६८ ) हें पाणिनीचेंच सूत्र मुख्यतः प्रमाण आहे. व्याकरण हें शब्दशास्त्र असल्यामुळें आगम आदेश वगैरे कार्यें अ इ वगैरे वर्णांना आपाततः जरी सांगितलीं असलीं तरीं तीं कार्यें वस्तुतः अकारान्त, इकारान्त, अकारादि, इकारादि वगैरे शब्दांनाच होतात असा सूत्रकारांचा अभिप्राय 'येन विधिस्तदन्तस्य' ( १।१।७२ ) या सूत्रावरून स्पष्ट दिसून येतो. वार्तिककारांनीं अर्थयुक्त शब्दांचेंच व्याकरण हें शास्त्र आहे ही गोष्ट ध्यानांत ठेवूनच "अर्थवतो ह्यागमस्तद्गुणीभूतस्तद्ग्रहणेन गृह्यते" असें विधान केलें आहे. पाणिनीनें जरी लाघवाकडे लक्ष ठेवून एखाद्या स्वराला किंवा वर्णाला अमुक आदेश होतो किंवा अमुक आगम होतो असें म्हटलें तरी संपूर्ण अर्थवान् शब्दाच्या

स्वरूपांत त्यायोगानें फेरफार झाल्यामुळें वार्तिककारांनीं 'अर्थयुक्त शब्दाला आगम होतो व तो त्याचा अवयव समजला जातो' अशा अर्थाचें वचन केलें आहे. त्याप्रमाणेंच 'एकादा अवयव ज्यास्ती, कमी किंवा विकृत झाला तरी मूळचाच शब्द समजला जातो' या अर्थाचें 'एकदेशविकृतमनन्यवत्' असें वचन केलें आहे. तसेंच एकादा विशिष्ट वर्ण किंवा अक्षर शेवटीं किंवा आरंभीं असलेल्या शब्दाला कार्य सांगितलें असतां 'अर्थवान् शब्द हा जर तेवढ्याच वर्णाचा किंवा अक्षराचा झाला असेल तर त्याला तें कार्य करावें' या अर्थाचें 'व्यपदेशिवदेकस्मिन्' असेंही वचन केलें आहे. पाणिनीच्या शब्दशास्त्रामध्यें अर्थरहित शब्दांचा विचारच केला नाहीं असें वार्तिककारांचें ठाम मत होतें. पाणिनीनेंही 'येन विधिस्तदन्तस्य' (१।१७२) हा तदन्तविधि व 'अङ्गस्य' हा अधिकार सांगून तदन्तविधि करून तयार झालेल्या शब्दाला, त्याप्रमाणेंच प्रत्ययापूर्वीच्या अंगाला कार्यें सांगितलीं आहेत; यावरून त्याच्या मुळाशीं अर्थयुक्त शब्दालाच कार्यें करावी ही कल्पना त्याच्या मनांत असलीच पाहिजे, इतकेंच नव्हे, तर अशा रीतीनें कार्यें सांगण्यांत शब्दाचें नित्यत्व व शब्दाचा अर्थाशीं कायमचा संबंध हे सिद्धांतही त्याला अभिप्रेत असले पाहिजेत. हें मनांत आणूनच वार्तिककारांनीं "सिद्धे शब्दार्थसंबन्धे" हें आपलें पहिलें वार्तिक लिहिलें. याच सिद्धांताचा ज्यास्त विस्तार करून वार्तिककारांच्या नंतरच्या वैयाकरणांनीं 'अनागमकानां सागमका आदेशाः' असा संकेत घालून दिला.

## १४१. सूत्रवाक्यार्थव्यवस्थापक परिभाषावार्तिकें.

अर्थयुक्त शब्दालाच अर्थयुक्त आदेश होतात या संकेताला अनुसरूनच वार्तिककारांनीं 'नानर्थकेलोन्त्यविधिः' हें वचन केलें व त्याप्रमाणेंच 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादितदन्तविज्ञानम्' आणि 'यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे' ही वचनें केलीं. 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्', 'गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक् सुबुत्पत्तेः' व 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम्' या वचनांच्या मुळाशींही जेवढ्या अर्थयुक्त समूहाला सुप् किंवा तिङ् प्रत्यय लागतात तेवढ्याला प्रातिपदिक किंवा धातु या संज्ञा व्हाव्या हा वार्तिककारांचा अभिप्राय असावा. तदन्तविधीनें कार्याकरितां साभान्यरीत्या प्रत्ययान्त शब्दस्वरूप घेतलें असतां कांहीं ठिकाणीं अडचण येऊं लागली व तिचा परिहार 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' या वचनानें वार्तिककारांना करावा लागला. त्याप्रमाणेंच, 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्ग०' या वचनालाही 'विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणम्' या वचनानें पायबंध घालावा लागला. धातूंचे व प्रत्ययांचे बाबतींतही एकाच स्वरूपाच्या धातूला व प्रत्ययाला निरनिराळे अनुबंध जोडल्यानें दृश्यमान स्वरूपें निरनिराळीं झाल्यामुळें घोटाळा होऊं लागला व तो टाळण्याकरितांही वार्तिककारांना 'अनुबन्धस्यानेकान्तत्वम्' व 'अननुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य ग्रहणम्' हीं वचनें करावी लागलीं. शब्दस्वरूप निश्चित झालें असतांनाही मुख्य शब्दस्वरूप घ्यावें किंवा लाक्षणिक घ्यावें याविषयीं संशय दूर करण्याकरितां "लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्" हें वचन, तसेंच, आदि, अन्त्य, अनन्त्य या शब्दांनीं स्वर वगैरे कार्यें सांगितलीं असतां तीं कोणाला करावीं याविषयीं 'अन्त्यविकारे अन्त्यसदेशस्य' व 'हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवत्' हीं वचनें करावीं लागलीं. वर दिलेलीं सर्व वचनें सूत्राचा वाक्यार्थ निश्चित करण्याचे कामीं व सूत्राची प्रवृत्ति कोठें करावी व कोठें न करावीं हें ठरविण्याचे कामीं उपयुक्त होत असल्यामुळें

त्यांना सूत्रवाक्यार्थव्यवस्थापक परिभाषावचनें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

---

१. हीं सूत्रार्थव्यवस्थापक परिभाषावचनें पुढें दिल्याप्रमाणें वार्तिकें म्हणून व कंसांत दिल्याप्रमाणें परिभाषेन्दुशेखरांत परिभाषा म्हणून आढळतात.

(१) अर्थवतो ह्यागमस्तद्गुणीभूतस्तद्ग्रहणेन गृह्यते । १।१।२० वा. ५ ( यदागमास्तद्गुणीभूतास्तद्ग्रहणेन गृह्यन्ते । प. शे. परिभाषा. ११ ). व्याकरणसंप्रदायांत 'यदागम' परिभाषा या नांवानें ही उल्लेखिली जाते.

(२) एकदेशविकृतस्यानन्यत्वात्। माहे. सूत्र २ वा. ४; १।१।५६ वा. १०. (एकदेशविकृतमनन्यवत्। प. शे. परिभाषा ३७ ).

(३) तत्र व्यपदेशिवद्वचनम् । १।१।२१ वा. २, एकवर्णेषु व्यपदेशिवद्वचनात्। ६।१।१ वा. २. ( व्यपदेशिवदेकस्मिन् । प. शे. परि. ३० ). व्यपदेशिवद्भाव या नांवानें हा न्याय ओळखिला जातो.

(४) नानर्थकेऽलोन्त्यविधिरनभ्यासविकारे । १।१।६५ वा. २, ( प. शे. परि ९६. )

(५) सिद्धं तु प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादितदन्तविज्ञानात्। १।४।१३ वा ७. ( प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेस्तदन्तस्य ग्रहणम् । प. शे. परिभाषा २३. ) 'प्रत्ययग्रहणपरिभाषा' या नांवानें या परिभाषेचा उल्लेख करण्यांत येतो.

(६) यस्मिन्विधिस्तदादिरत्वे । १।१।२१ वा. ९; यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे १।१।७२ वा. २९ ( प. शे. परि. ३३. )

(७) ङ्याब्ग्रहणमनर्थकं प्रातिपदिकग्रहण लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणात् । ४।१।१। वा. ४ ( प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम् । परि शे. परि. ७१ ) लिङ्गविशिष्टपरिभाषा हें या परिभाषेचें सांप्रदायिक नांव आहे.

(८) गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनम् । ४।१।४८ वा. ४; (गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक् सुबुत्पत्तेः । प. शे. परि ७५.)

(९) कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि । १।४।१३ वा. ९. ( कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम् । प. शे. परि २८ ) कृद्ग्रहणपरिभाषा नांवानें ही परिभाषा ओळखिली जाते.

(१०) न वा निर्दिश्यमानस्यादेशत्वात् । ६।४।१३० वा ३. ( निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति । प. शे. परिभाषा १२). निर्दिश्यमान परिभाषा या नांवानें ही परिभाषा प्रसिद्ध आहे.

(११) न वा विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणात् । ७।१।१ वा १३; (विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणम् । प. शे. परि. ७२. )

(१२) अनुबन्धस्यानेकान्तत्वात् । १।१।२० वा. ८. अनुबन्धोऽन्यत्वकरः १।१।२६ वा. ३ (अनेकान्ता अनुबन्धाः । प. शे. परि. ४. )

(१३) अननुबन्धकग्रहणे हि न सानुबन्धकस्य । ४।१।१५ वा. २ (निरनुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य । प. शे. परि. ८१. )

(१४) सिद्धं तु लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणात् । ६।२।२ वा. २. (लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम् । प. शे. परि. १०५ ),

(१५) अनन्त्यविकारे अन्त्यसदेशस्य वा । ६।१।१३वा५(अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य । प. शे.परि.९५)

(१६) हल्स्वरप्राप्तौ वा व्यञ्जनमविद्यमानवत् । ६।१।२१९ वा. २ ( हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवत् । प. शे. परिः ८० )

(१७) प्रत्यवयवं च वाक्यपरिसमाप्तेः १।१।१वा.१२. (प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः । प. शे. परि १०७),

## १४२. सूत्रप्रवृत्तिव्यवस्थापक परिभाषावार्तिकें.

शिष्टसंमत अशा सर्व शब्दांची सिद्धि तसेंच शिष्टांना असंमत अशा सर्व शब्दांचें निराकरण पाणिनिसूत्रांनींच व्हावें, त्याकरितां होतां होईल तों निराळीं वचनें करावयास लागू नयेत हें मूलभूत धोरण मनांत ठेवूनच वार्तिककारांनीं वार्तिकवचनें करून पाणिनिसूत्रांचें व्याख्यान केलें व लौकिक न्यायांचा आणि शास्त्रसंकेतांचा अवलंब करून सूत्रांची व्याप्ति वाढविली आणि बरीचशीं उदाहरणें साधिलीं; तरी पण तसें करण्यांत कांहीं अनिष्ट ठिकाणींही सूत्रांची प्रवृत्ति होऊं लागली, ती न व्हावी याकारितां सूत्रप्रवृत्तीचें नियंत्रण करण्याचा त्यांना प्रयत्न करावा लागला; व तो त्यांनीं कांहीं लौकिक न्याय व कांहीं शास्त्रसंकेत घालून केला. संनिपातपरिभाषा या नांवानें व्याकरणतंत्रांत प्रसिद्ध असलेला लौकिक न्याय या बाबतींत फार महत्त्वाचा आहे. 'दोघांच्या संबंधामुळें अस्तित्वांत आलेला पदार्थ संबंधाच्या नाशाला कारणीभूत होत नाहीं' अशा आशयाचा "संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य" हा न्याय वार्तिककारांनीं उद्धृत केला आहे; इतकेंच नव्हे, तर त्याचीं अनेक[१] उदाहरणेंही दिलीं आहेत. या सर्व उदाहरणांमध्यें संनिपातपरिभाषेमुळें अनिष्ट सूत्राची प्रवृत्ति दूर करून इष्ट रूपें वार्तिककारांनीं साधून दाखविलीं आहेत. 'कृत्रिम संज्ञा व शब्दाचा नैसर्गिक अर्थ यांपैकीं कृत्रिमसंज्ञा ही मुद्दाम सांगितली असल्यामुळें प्रथम ध्यानांत येते' या आशयाचा न्याय "इतरथा ह्यसंप्रत्ययोऽकृत्रिमत्वाद्यथा लोके" या वार्तिकांत उद्धृत करून वार्तिककारांनीं 'संख्ययाव्यया०' (२।२।२५), 'संख्यापूर्वो द्विगुः' (।२१।५२) इत्यादि सूत्रांमध्यें संख्या शब्दानें 'संख्या' हा शब्द न घेतां संख्यावाचक एक, द्वि, त्रि, चतुर् वगैरे शब्द घ्यावे असें सांगितलें आहे. 'सामान्य तऱ्हेनें एकादा शब्द उच्चारला असतां सामान्य अर्थाचा वाचक असाच तो शब्द घ्यावा, त्याचे विशेष अर्थ दाखविणारे शब्द घेऊं नयेत' अशा तऱ्हेच्या "सामान्याभिधाने विशेषानभिधानम्" व "सामान्यातिदेशे विशेषानतिदेशः" ह्या लौकिक न्यायांचा अवलंब करूनही अनिष्ट ठिकाणीं येणारी सूत्रांची अतिव्याप्ति दूर केली आहे. त्याप्रमाणेंच 'गौण व मुख्य या दोन्ही अर्थीं एकादें कार्य संभवत असेल तर मुख्य अर्थच घ्यावा गौण अर्थ घेऊं नये' अशा आशयाचा लौकिक न्याय स्वीकारून "प्रधाने कार्यसंप्रत्ययाद्वा सिद्धम्" या वार्तिकानें इष्टसिद्धि केली आहे. 'ज्याला कार्य होतें तो त्या कार्याला निमित्त होऊं शकत नाहीं' त्याप्रमाणेंच 'बहुव्रीहि समासानें गुणीचें विधान केलें असतां गुणांचाही अंतर्भाव होतो' या अर्थाचे लौकिक न्याय "निमित्तस्य निमित्तिकार्यार्थत्वादन्यत्रापि" व "सिद्धं तु तद्गुणसंविज्ञानात्पाणिनेर्यथा लोके" या वार्तिकवचनांत वार्तिककारांनीं देऊन इष्ट प्रयोग व रूपें साधिलीं आहेत. अशा तऱ्हेनें, ज्या सूत्रांमुळें रूपें बिघडूं लागतात अशा सूत्रांची प्राप्ति दूर करण्याकरितां वार्तिककारांनीं वरतीं दिलेले न्याय स्वीकारून जीं वार्तिकवचनें लिहिलीं आणि इष्ट रूपें साधिलीं त्या सर्व वचनांना सूत्रप्रवृत्तिव्यवस्थापक[२] परिभाषा हा शब्द लावतां येईल.

---

१. याविषयीं १।१।३९ वा. ३–१६ पहा.

२. हीं सूत्रप्रवृत्तिव्यवस्थापक वार्तिकें व त्यांना अनुसरून नंतरच्या वैयाकरणांनीं दिलेल्या परिभाषा पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—

(१) न वा संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य १।३।३९ वा. ३. (संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य। प. शे. परिभाषा ८५) या परिभाषेला वैयाकरणसंप्रदायामध्यें 'संनिपातपरिभाष' नांव देण्यांत येतें.

## १४३. नित्यबलीयस्त्व आणि अन्तरङ्गबलीयस्त्व.

वर दिल्याप्रमाणें सूत्रार्थव्यवस्था व सूत्रप्रवृत्तिनियमन झालें खरें, पण पुष्कळ ठिकाणीं उदाहरणसिद्धीचे वेळीं दोन सूत्रांची एकदम प्रवृत्ति होऊं लागली व त्या बाबतींत पाणिनीचा " विप्रतिषेधे परं कार्यम् " ( १।४।२ ) हा साधारण नियम लागू केल्यास दोष येऊं लागले. हे दोष दूर करण्याकरितां " विप्रतिषेधे परं कार्यम् " या नियमाला प्रतिषेधवचनें करणें हा मार्ग वार्तिककारांना फारसा पसंत नव्हता व त्यामुळें दुसऱ्या कोणत्याही रीतीनें इष्टसिद्धि न झाल्यासच त्यांनीं प्रतिषेधवचनें केलीं. या प्रतिषेधवचनांना पूर्वविप्रतिषेध–वचनें म्हणण्याची नंतर प्रथा पडली. अशीं कांहीं वार्तिकवचनें मुख्यतः " विप्रतिषेधे परं कार्यम् " या सूत्रावर व इतरही कांहीं ठिकाणीं वार्तिककारांनीं दिलीं आहेत. पर कार्य केल्यास दोष येऊं लागले असतां प्रतिषेधवचनें न करितां ते दोष घालवण्याकरितां त्यांनीं लौकिक न्यायांचा अवलंब केला व प्रथमतः नित्यबलीयस्त्वाचें प्रतिपादन केलें. लोकांमध्येंही दोन कार्यें एकदम उपस्थित झालीं असतां त्यांपैकीं एक कार्य जर दुसऱ्या कार्याच्या आधींही होत असेल व मागाहूनही होत असेल तर तें अटळ म्हणून बलवत्तर मानण्यांत येतें; त्याप्रमाणेंच शास्त्रांतही मानून अशा कार्याला 'नित्य' हें नांव देण्यांत आलें. वार्तिककारांनीं नित्य शब्दाची व्याख्या दिली नसली तरी " कृताकृतप्रसङ्गित्वं नित्यत्वम् " ही नंतरच्या वैयाकरणांनीं दिलेली व्याख्या त्यांना अभिप्रेत असावी हें त्यांनीं दिलेल्या उदाहरणांवरून दिसून येतें. या नित्यबलीयस्त्वामुळें कांहीं ठिकाणीं जरी इष्टसिद्धी झाली तरी कांहीं ठिकाणीं एकदम प्रवृत्त झालेले दोनही विधी नित्य

---

( २ ) इतरथा ह्यसंप्रत्ययोऽकृत्रिमत्वाद्यथा लोके। १।१।२३ वा. ३. 'कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे कार्यसंप्रत्ययः' या शब्दांनीं ही परिभाषा भाष्यकारांनीं दिली आहे; परंतु ती अनावश्यक आहे असें सांगितलें आहे. म्हणून परिभाषेन्दुशेखरामध्यें नागेशांनीं ती दिली नसावी.

( ३ ) सामान्याभिधाने हि विशेषानभिधानम्। २।२।२४ वा ६. ही परिभाषा परिभाषेन्दुशेखरांत दिली नाही.

( ४ ) सामान्यातिदेशे विशेषानतिदेशः। ६।३।६७ वा. ३ ( परि. शे परि. १०१ )

( ५ ) प्रधाने कार्यसंप्रत्ययाद्वा सिद्धम्। ३।१।१ वा. ३ ( गौणमुख्ययोर्मुख्ये कार्यसंप्रत्ययः परि. शे. परि. १५ ). गौणमुख्यपरिभाषा या नांवानें ही परिभाषा ओळखिली जाते.

( ६ ) निमित्तस्य निमित्तिकार्यार्थत्वादन्यत्रापि। ३।१।१ वा. २ ( कार्यमनुभवन् हि कार्यी निमित्ततया नाश्रीयते ( प. शे. परि. १० )

( ७ ) सिद्धं तु तद्गुणसंविज्ञानात् पाणिनेर्यथा लोके। ६।१।१ वा. १५. (बहुव्रीहौ तद्गुणसंविज्ञानमपि। प. शे परि. ७७ ).

१. याविषयीं १।४।२ वार्तिकें ९–२५; २।४।१२ वा. २, २।४।८५ वा. १, ३।१।१२५ वा. ३, ३।३।४ वा. १, ३।४।७७ वा. ४, ४।१।७५ वा. १, ४।१।८५ वा. १०, ४।२।३९ वा. १, ४।२।१३७ वा. १, ५।१।२ वा. १, ५।१।११९ वा. ८, ५।३।७२ वा. ४, ५।४।४ वा १, ६।१।१२ वा. ९, ६।४।४८ वा. १, ७।१।९६ वा. १० पहा.

२. याविषयीं १।२।६ वा १, ३।१।७ वा. ९, ७।१।६ वा. ४ पहा.

ठरूं लागले, तर कांहीं ठिकाणीं दोनही अनित्य ठरूं लागले; व त्यामुळें बऱ्याच ठिकाणीं इष्ट रूप साधण्याकरितां विशिष्ट विधीला जागा देणें कठीण पडूं लागलें. अशा ठिकाणीं इष्ट रूप साधावें याकरितां वार्तिककारांनीं अन्तरङ्गबलीयस्त्व या लौकिक मार्गाचा स्वीकार केला, व अनेक इष्ट उदाहरणें सोधलीं. अन्तरङ्ग या शब्दाची व्याख्या वार्तिककारांनीं दिलेली नाहीं; नंतरच्या वैयाकरणांनीं दिलेले अन्तरङ्गत्वाचे प्रकारही त्यांनीं सांगितले नाहींत. तथापि लोकांमध्यें 'निकटसंबन्धयुक्त' हा अन्तरङ्ग शब्दाचा सर्वसाधारण प्रसिद्ध अर्थच त्यांना अभिप्रेत असावा. कदाचित् व्याडीच्या ग्रंथामध्यें अन्तरङ्गत्वाची कल्पना स्पष्ट केलेली असावी व अन्तरङ्गबलीयस्त्वाचीं उदाहरणेंही दिलीं असावीं.

## १४४. अपवादबलीयस्त्व आणि अनवकाशत्व.

अपवादबलीयस्त्वाचें विधान 'पूर्वत्रासिद्धम्' (८।२।१) या सूत्राचा अपवाद म्हणून "अपवादो वचनप्रामाण्यात्" (८।२।१ वा. २) या वचनानें वार्तिककारांनीं केलें आहे. "परवचनात् सिद्धमिति चेन्नापवादत्वात्" (१।१।४६ वा. २) तसेंच "अलोन्त्यस्यादेः-परस्यानेकाल्शित्सर्वस्येत्यपवादविप्रतिषेधात्सर्वादेशः" (१।१।५४ वा. १) या वार्तिकांमध्यें अपवाद बलीयस्वाचा उपयोगही त्यांनीं दिला आहे; व "सिद्धं त्वपवादन्यायेन" (१।३।९ वा. ७) या वार्तिकामध्यें 'अपवाद हा सर्वोपेक्षां ज्यास्त प्रबल ही ठरलेलीच गोष्ट' या रीतीनें अपवादाचा उल्लेख केला आहे. सामान्य रीतीनें एकादा नियम सांगितल्यानंतर विशिष्ट विधान जर केलें तर विशिष्ट विधानानें सामान्य नियमाचा बाध होतो व सामान्य विधि जरी पुन्हां अपवादविधीनंतर प्रवृत्त होऊं लागला तरी त्याचा विचार करावयाचा नाहीं हें अपवादबलीयस्त्वाचें स्वरूप वार्तिककारांना अभिप्रेत असावें. कारण, त्यांनीं 'न वा अनवकाशत्वात्' या वार्तिकवचनानेंही अपवादासारख्याच विशेष विधानाला अनवकाश हें नांव देऊन त्याचें प्राधान्य सांगितलें आहे. अपवादबलीयस्त्व व अनवकाशत्व यांमध्यें वार्तिककारांच्या मतानें अनवकाश विधीनंतर सामान्य विधि प्राप्त झाल्यास तो केला जातो पण अपवादविधीनें झालेला सामान्यविधीचा बाध कायमचाच होतो हा महत्त्वाचा भेद दिसून येतो. अपवादानें केलेल्या उत्सर्गविधीच्या

---

१. याविषयीं मागें पृ. २११ टीप १ पहा.

२. वार्तिककारांनीं 'अपवादविप्रतिषेध' हा शब्द आणखीदी दोन ठिकाणीं (अपवादविप्रतिषेधाद्धि तयोर्भावः ३।२।१०८ वा. ४, अनुवृत्तौ हि च्छोत्सर्गापवादविप्रतिषेधान्मयट् ४।३।१३२ वा. ६) वापरला आहे. अपवादन्याय (१।३।९ वा. ७), अपवादसमावेश (५।१।१२० वा. १, ५।१।१२५ वा. ३) व अपवादबाधन (३।१।१३४ वा. २) हेही शब्द वापरले आहेत. यावरून जरी अपवादबलीयस्त्व हा शब्द त्यांनीं वापरला नसला तरी पर, नित्य व अन्तरङ्ग या विधींनीं बाध केला असतां जसा तो कायमचा समजला जातो व बाध केलेला विधि नंतर होऊं शकत नाहीं त्याप्रमाणें अपवादानें बाध केलेला विधिही नंतर होऊं शकत नाहीं असा वार्तिककारांचा अभिप्राय आहे; म्हणूनच ज्या ठिकाणीं बाध झालेला विधि नंतर होणें इष्ट असतें त्या ठिकाणीं त्यांनीं अपवाद शब्द न वापरतां अनवकाश शब्द वापरला आहे. उदाहरणार्थ १।४।२ वा. ११, २।३।१ वा १०, ३।१।३१ वा. ४, ३।१।४५ वा. २, ४।२।१०४ वा. २५, ४।३।१५६ वा. ५, ६।१।९३ वा. ८, ७।१।८२ वा. १, ७।२।१०० वा. २, ७।३।९२ वा. २, ८।३।२३ वा. ५ पहा.

बाधाप्रमाणेंच परविधी, नित्यविधी व अन्तरङ्गविधी यांनींही केलेला बाध कायम स्वरूपाचाच असतो बाध झालेला विधि प्रवृत्त झाला तरी तो पुन्हां होऊं शकत नाहीं हेंच वार्तिककारांचें मत असावें व त्यामुळेंच त्यांना ' पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वा सिद्धम् ' असें कांहीं ठिकाणीं वार्तिक-वचन करून सांगावें लागलें. त्याप्रमाणेंच पर, नित्य, अन्तरङ्ग किंवा अपवाद म्हणून एका विधीनें केला जाणारा दुसऱ्या विधीचा बाध हा अभ्यासकार्याविषयीं विचारांत घेऊं नये अशा तऱ्हेचा " अभ्यासविकारेषु अपवादस्य उत्सर्गाबाधकत्वात् " ( ७।४।८२ वा. २ ) हा वरतीं दिलेल्या नित्य, अन्तरङ्ग व अपवाद यांच्या बलीयस्त्वांचा निषेधही वार्तिककारांना द्यावा लागला.

## १४५. सूत्रविप्रतिषेधव्यवस्थापक परिभाषावार्तिकें.

वार्तिककारांनीं वरतीं दिल्याप्रमाणें एकादा विधि जरी पर असला तरी नित्यत्वामुळें, अन्तरङ्गत्वामुळें, अपवादत्वामुळें किंवा अनवकाशत्वामुळें दुसरा विधि त्याच्यापेक्षां ज्यास्त प्रबळ होतो असें सांगितलें आहे. त्याप्रमाणेंच ' संप्रसारण व त्यामुळें होणारीं कार्यें हीं इतर विधी जरी पर असले तरी त्यांच्यापेक्षां ज्यास्त प्रबळ मानिलीं जातात ' (न वा संप्रसारण श्रयबलीयस्त्वात् ६।१।१७ वा. २ ), ' विभक्तिस्वरापेक्षां नञ्स्वर ज्यास्त प्रबळ समजला जातो ' ( विभक्तिस्वरान्नञ्स्वरो बलीयान् ६।१।१५४ वा. ९) 'उपपदविभक्तीपेक्षां कारकविभक्ति ज्यास्त प्रबळ समजली जाते' (उपपदविभक्तेः कारकविभक्तेर्बलीयस्त्वात् । २।३।१९ वा १)'निरनिराळ्या विभक्तींनीं केलेल्या निर्देशांपेक्षां पञ्चमीनिर्देश ज्यास्त प्रबळ समजला जातो ' ( उभयनिर्देशे विप्रतिषेधात्पञ्चमीनिर्देशः १।१।६७ वा. ३ ) या वार्तिकांनीं संप्रसारणविधी, कारकविभक्तींचे विधी व पञ्चमीनिर्देश यांचें बलीयस्त्व सांगितलें आहे. स्वरांचे बाबतींतही ' ज्या क्रमानें रूपसिद्धि करतांना प्रत्यय, आगम, आदेश वगैरे जोडले जातात त्या क्रमानेंच त्या प्रत्यय आगम व आदेश यांच्या अनुरोधानें ते स्वर बदलले जातात; व सर्वांत शेवटीं जो प्रत्यय, आगम, किंवा आदेश केला जातो त्याचा स्वर शेवटचा म्हणून टिकतो ' अशा आशयाचें ' सतिशिष्टस्वरबलीयस्त्वं च ' ( ६।१।१५४ वा. ९ ) हें वार्तिक केलें आहे. वरतीं दिलेल्या या सर्व वार्तिकवचनांना सूत्रैविप्रतिषेधव्यवस्थापक परिभाषा म्हणतां येण्यासारखें आहे.

---

१. याविषयीं ' पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वा सिद्धम् ' ७।१।८२ वा. ३, ७।२।१ वा. ३, ७।४।१० वा. ३ पहा.

२. हीं सूत्रविप्रतिषेधव्यवस्थापक वचनें पुढें दिल्याप्रमाणें आहेत. या वचनांना अनुसरून परिभाषेन्दुशेखरामध्यें दिलेल्या परिभाषा कंसांत दिल्या आहेत.

( १ ) नित्यत्वात् १।२।६० वा. ४, ३।१।७ वा. ९, ७।१।६ वा. ४, ( परान्नित्यं बलवत् । प. शे. परि. ४२ )

( २ ) अन्तरङ्गबलीयस्त्वात् ६।१।८४ वा. १५; ६।१।१०६ वा. ९ त्याप्रमाणेंच ' न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ' १।१।४७ वा. ७ इत्यादि. ( असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे । प शे. परि. ५० )

( ३ ) अपवादत्वात् १।१।४६ वा. २, अपवादविप्रतिषेधात् १।१।५४ वा. १, सिद्धं त्वपवादन्यायेन १।३।९ वा ७, ( पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः । प. शे परि. ६२, प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गोभिनिविशते प शे. परि. ६३)

## १४६. लक्ष्यासिद्धिव्यवस्थापक परिभाषावार्तिकें.

वर वर्णन केल्याप्रमाणें शिष्टसंमत शब्दांची पाणिनिसूत्रांप्रमाणें सिद्धि करणें हें प्रयोजन मनांत ठेवून सूत्रांचा व्यवस्थित अर्थ ठरविणें, अनिष्ट प्रयोग होऊं लागल्यास सूत्रप्रवृत्तीचें नियंत्रण करणें व सूत्रांचा विरोध आल्यास त्याचा परिहार करणें यांविषयीं लौकिक व शास्त्रीय न्याय लावून भाषेंतील बहुतेक शब्दांची उपपत्ति वार्तिककारांनीं जरी केली तरी सूत्रांचा योग्य अर्थ ठरवून सूत्रांचा उपयोग केला असतां कांहीं इष्ट शब्दांची सिद्धि सूत्रानुसार होईना, तसेंच कांहीं अनिष्ट रूपेंही होऊं लागलीं; व वार्तिककारांना या बाबतींत अमोघ उपाययोजना करणें भाग पडलें. वैदिक प्रयोगांविषयीं ‘ सूत्रविरोध असला तरी हरकत नाहीं, वैदिक प्रयोग हे सर्वथा प्रामाणिकच समजावे ’ असें “ इन्धेश्छन्दोविषयत्वाद् भुवो वुको नित्यत्वात्ताभ्यां किद्वचनानर्थक्यम् ” ( १।२।६ वा. १ ) या वार्तिकानें त्यांनीं सूचित केलें आहे. सूत्रांनीं न साधिले जाणाऱ्या भाषेंतील शब्दांविषयीं त्यांनीं पाणिनीनें आपल्या सूत्रांत त्यांचें उच्चारण केलें असल्यास तें सर्वथा प्रमाण धरून त्याला निपातन ही संज्ञा देऊन व ‘ निपातनात्सिद्धम् ’ असें वचन करून त्या शब्दांची उपपत्ति लाविली आहे.[1] तसें करितां न आल्यास एका सूत्राचीं दोन सूत्रें करून[2] सूत्रांची व्याप्ति वाढवणें; हा शेवटचा उपाय योजून इष्ट शब्द साधिले आहेत. त्याप्रमाणेंच, सूत्रांचा उपयोग केला असतां अनिष्ट शब्द साधिले गेल्यास त्यांचा प्रतिकार त्यांनीं ‘ अनभिधात् ’ असें

---

( ४ ) न वा अनवकाशत्वात् ३।१।३ वा. ४, ६।१।९२ वा. ८, ७।१।१०० वा. ८ ( अपवादो यद्यन्यत्र चरितार्थस्तर्ह्यन्तरङ्गेण बाध्यते । प. शे. परि. ६५; क्वचिदपवादविषयेऽप्युत्सर्गोऽभिनिविशते । प. शे. परि. ५८ )

( ५ ) पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वा सिद्धम् ७।१।८२ वा. ३, ८।२।१ वा. ३ ( पुनःप्रसङ्गविज्ञानात्सिद्धम् । प. शे. परि. ३९ ).

( ६ ) न वाभ्यासविकारेष्वपवादस्योत्सर्गाबाधकत्वात् ३।१।६ वा. २, ७।४।८२; ( अभ्यासविकारेषु बाध्यबाधकभावो नास्ति । प. शे. परि. ६६ ).

( ७ ) न वा संप्रसारणाश्रयबलीयस्त्वात् ६।१।१७ वा. ३. ( संप्रसारणं तदाश्रयं च कार्यं बलवत् । प. शे. परि ११९ ).

( ८ ) उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयस्त्वात् २।३।१९ वा. १ ( उपपदविभक्तेः कारकविभक्तिर्बलीयसी । प. शे. परि. ९४ ).

( ९ ) उभयनिर्देशे विप्रतिषेधात्पञ्चमीनिर्देशः १।१।६७ वा. ३ ( उभयनिर्देशे पञ्चमीनिर्देशो बलीयान् । प. शे. परि ७०. )

( १० ) विभक्तिस्वरान्नञ्स्वरो बलीयान् ६।१।१५४ वा. १३.

( ११ ) सतिशिष्टस्वरबलीयस्त्वं च ६।१।१५४ वा. ९.

१. याविषयीं ‘ निपातनात् स्यदादिषु ’ १।१।४। वा. ४, तसेंच ‘ निपातनात् सिद्धम् ’ २।४।२६ वा. ४, ६।२।२ वा. ५, ७।२।९९ वा. २ पहा.

२. एका सूत्राचीं दोन सूत्रें करणें याला ‘योगविभाग’ ही शास्त्रीय संज्ञा आहे. या योगविभागाविषयीं पृष्ठ २११ टीप २ पहा.

म्हणून केला आहे. सूत्राप्रमाणें जरी एकादा शब्द योग्य प्रकारें साधला गेला तरी त्याचा 'शिष्टप्रयोग कोठेंही न आढळणें' हा अनभिधान या शब्दाचा अर्थ आहे व वार्तिककारांच्या 'अनभिधानात्'[1] या वचनाचें, शिष्टप्रयोग नसल्यास तो शब्द शुद्ध किंवा प्रामाणिक समजूं नये, असें स्वारस्य आहे. या इष्टशब्दसिद्धि व अनिष्टशब्दनिवारण करणाऱ्या वार्तिकवचनांना लक्ष्योपपत्तिव्यवस्थापक[2] परिभाषा ही संज्ञा देतां येईल.

## १४७. वाक्यकार, भाष्यसूत्र, अनुस्मृति व अनुतंत्र या संज्ञांचें विवेचन.

महाभाष्यामध्यें कर्त्यांचें नांव न उच्चारतां उद्धृत केलेलीं सर्व वार्तिकवचनें कात्यायनानें रचिलीं असें गृहीत धरलें तरी महाभाष्यकारांपूर्वीं कात्यायनाचे समकालीन अथवा त्याचे पूर्वीं किंवा नंतर कात्यायनासारखे बरेच वार्तिककार होऊन गेले हें वरील विवेचनावरून स्पष्ट होतें. वाक्यकाराचीं म्हणून भर्तृहरि जिनेन्द्रबुद्धि, माधव, नागेशभट्ट इत्यादिकांनीं अनेक वचनें दिलीं आहेत. त्यावरून वाक्यकाराचीं[3] वार्तिकें म्हणूनही कांहीं वार्तिकें प्रसिद्ध होतीं; अथवा कात्यायनालाच वाक्यकार ही संज्ञा दिली गेली असावी असें दिसतें. महाभाष्यप्रदीपिकेमध्यें 'भाष्यसूत्रें' या नांवानेंही कांहीं वचनें उद्धृत केलीं आहेत. भाष्यसूत्रें या शब्दाचा भाष्यकारांनीं केलेलीं सूत्रासारखीं वचनें म्हणजे भाष्यकारांच्या इष्टी असा अर्थ भर्तृहरीला अभिप्रेत असावा. अथवा, भाष्यामध्यें पाणिनिसूत्रांसारखीं असलेलीं सूत्रें म्हणजे गुरुलाघवाचा विचार करून दिलेलीं इतर वैयाकरणांचीं सूत्रें असाही अर्थ असूं शकेल. भाष्यसूत्र या शब्दाच्या उपयोगावरून वार्तिकवचनांना त्या वेळीं पाणिनिसूत्रांच्या इतकेंच महत्त्व आलें होतें ही गोष्ट सिद्ध होते. यांशिवाय, अनुस्मृति व अनुतंत्र असेही शब्द वार्तिकांसारख्या वचनांना दिलेले आढळतात. अष्टाध्यायी ही स्मृति मानिली गेल्यानंतर व तिला व्याकरणतन्त्र अथवा व्याकरणशास्त्र हें नांव दिलें गेल्यानंतर अष्टाध्यायीच्या नंतर लिहिलेल्या वार्तिकवचनांना अनुतन्त्र आणि अनुस्मृति ह्या संज्ञा दिल्या गेल्या. वररुचि या नांवाचा उल्लेख महाभाष्यामध्यें वाररुच या शब्दानें केलेला आढळतो. परंतु

---

१. याविषयीं 'न वा अनभिधानात्' २।२।२४ वा. १६, २।३।१ वा. ८, २।३।७१ वा. १, ३।१।७ वा. ५ ३।२।१ वा. ५, ४।३।१५३ वा. ३ पहा.

२. या लक्ष्योपपत्तिव्यवस्थापक परिभाषा पुढीलप्रमाणें देतां येतील.

(१) इन्धेश्छन्दोविषयत्वात्० १।२।६ वा. १. 'छन्दसि दृष्टानुविधिः' अशा स्वरूपाचा परंपरागत स्पष्टीकरणाचा प्रघात आहे.

(२) निपातनात्सिद्धम्। २।४।२६ वा. ४ 'निपातनादिष्टसिद्धिः' अशा स्वरूपाचा परंपरागत स्पष्टीकरणाचा प्रघात आहे.

(३) योगविभागात् सिद्धम् १।१।३ वा. ८ (योगविभागादिष्टसिद्धिः परि. शे. परि. ११४)

(४) न वा अनभिधानात् ३।२।१ वा. ५.

३. "एषा भाष्यकारस्य कल्पना न वाक्यकारस्य" असे उद्गार भर्तृहरीनें महाभाष्यप्रदीपिकेमध्यें काढले आहेत; त्यावरून भाष्यकार व वाक्यकार हे निराळे, व वाक्यकार हा शब्द वार्तिककारांना अनुलक्षून असावा असें दिसतें. नागेशभट्टांनीहि प्रदीपोद्द्योतामध्यें 'वाक्यकारो वार्तिकमारभते' असें म्हटल आहे 'चुलुम्पादयो वाक्यकारीयाः' असें वाक्य माधवाच्या धातुवृत्तींत आढळतें.

महाभाष्यकारांनंतरच्या वैयाकरणांनीं व सायणाचार्यांसारख्या ग्रंथकारांनीं वररुचि व कात्यायन हे एकच समजून उल्लेख केले असल्यामुळें वररुचि हें वार्तिककारांचें व्यक्तिनाम व कात्यायन हें गोत्रनाम असावें व भाष्यकारांच्या वेळच्या प्रथेप्रमाणें भाष्यकारांनीं गोत्रनांवानेंच उल्लेख केला असावा. विक्रमादित्याच्या नऊ रत्नांपैकीं एक म्हणून समजलेला आणि वररुचि या नांवानें प्रसिद्ध असलेला वैयाकरण वररुचि हा कात्यायनापेक्षां निराळा हें सांगण्याची जरूर नाहीं. या वररुचीनें प्राकृत व्याकरण रचिलें असावें व "तेन प्रोक्तम्" या सूत्राच्या 'वाररुचो ग्रन्थः' या उदाहरणामध्यें हा वररुचि अभिप्रेत असावा. स्वर्गारोहणकाव्य नांवाचें एक काव्य वररुचीनें लिहिलें असें मानण्यांत येतें. 'भ्राज' श्लोक या नांवानें भाष्यकारांचे वेळीं प्रसिद्ध असलेले श्लोक कात्यायनानें केलेले होते असें कैयट हरदत्त, नागेश इत्यादि टीकाकारांचें म्हणणें आहे. कदाचित् विक्रमादित्याच्या धन्वन्तरि, क्षपणक वगैरे नऊ रत्नांचा उल्लेख त्यांच्या जीवनसमयाकडे लक्ष न देतां केवळ प्रसिद्ध महाविद्वान् म्हणून केला गेला असावा. प्रातिशाख्यकर्ता शाखाप्रवर्तक कात्यायन व वार्तिककार कात्यायन हे मात्र एकच असण्याचा बराच संभव आहे.

## १४८. कात्यायनाच्या वेळचे इतर वार्तिककार.

भाष्यकारांनीं वार्तिककारांचे जे नामनिर्देशपूर्वक उल्लेख केले आहेत त्यांपैकीं कात्यायन व कुणरवाडव हे दोनच व्यक्तिगत उल्लेख आहेत; भारद्वाजीय, क्रोष्ट्रीय व सौनाग हे उल्लेख वैयाकरण संप्रदायाचे आहेत. भारद्वाजीयांचीं म्हणून दहा वचनें महाभाष्यामध्यें उद्‌धृत केलीं आहेत. त्याप्रमाणें सौनागांची सात वचनें उद्‌धृत केलीं आहेत. संदर्भाकडे लक्ष दिलें असतां भाष्यकारांनीं आपल्या मताच्या समर्थनार्थ हीं वचनें उद्‌धृत केलीं आहेत असें दिसून येतें. या भारद्वाजीय, सौनाग व क्रोष्ट्रीय व्याकरणाध्यापनपरंपरांमध्यें पाणिनिसूत्रांचेंच स्पष्टीकरण केलें जात असावें, व त्या स्पष्टीकरणाचा सारांश या रूपानें वार्तिकें रचिलीं गेलीं असावीं; पण हीं वार्तिकें कात्यायनाच्या वार्तिकांपेक्षां ज्यास्त विस्तारानें केलीं असावीं असें त्या वार्तिकांच्या लेखनपद्धती-

---

१. " धन्वन्तरिः क्षपणकोमरसिंहशङ्कुवेतालभट्टघटकर्परकालिदासाः ।
ख्यातो वराहमिहिरो नृपतेः सभायां रत्नानि वै वररुचिर्नव विक्रमस्य "

हा श्लोक विक्रमादित्याच्या दरबारीं असलेल्या नऊ कवींची नावें संग्रथित करणारा म्हणून दिला जातो.

२. भारद्वाजीय वैयाकरणसंप्रदायाच्या वचनांचा भाष्यामध्यें दहा ठिकाणीं उल्लेख आला आहे. ' भारद्वाजीयाः पठन्ति ' असा आरंभ करून हीं वचनें दिलीं आहेत. त्यांपैकीं ' एकदेशविकृतेषूपसंख्यानम् । अनादेशत्वात्। रूपान्यत्वाच ' (१।१।५६ भाष्य) 'यक्चिणोः प्रतिषेधे०' (३।१।३८ भाष्य) 'णिश्रन्थिग्रन्थि०' ( ३।१।४८ भाष्य), ' णाविष्ठवत्० ( ६।४।१५५ भाष्य ) घुसंज्ञायां प्रकृतिग्रहणं शिद्विकृतार्थम् ( १।१। २० भाष्य) ही जरा महत्वाचीं आहेत. कारण, या ठिकाणीं कात्यायनाच्या वचनाला जरा जोड दिली आहे. यांशिवाय १।२।५६, १।१।१२, १।३।६७, ३।१।३८, ३।१।४८, ३।१।८९, ४।१।७९, ६।४।१५५, ६।४।४७ या सूत्रांवरील भाष्यामध्यें भारद्वाजीय वचनें दिली आहेत. सौनागांचीं वचनें २।२।१८, ४।१।७४ ४।१।८७, ४।३।१५५, ६।१।९६, ६।३।४३ या सूत्रांवरील भाष्यांत आढळतात. क्रोष्ट्रीयांचा उल्लेख १।१।३ सूत्रावरील भाष्यांत आढळतो, भाष्यकारांनी ह्या सर्व वार्तिकांचा उल्लेख आपल्या विधानांच्या समर्थनाकरितां केला आहे.

वरून दिसून येतें. क्रोष्ट्रीयांचा उल्लेख महाभाष्यांत फक्त एकदांच आला आहे व कुणरवाडवाचा दोन वेळां आला आहे; व त्यांतील विवेचनही पाणिनिसूत्रांतील पाठभेद दाखविण्याच्या तऱ्हेवरच आहे. या भारद्वाजीय, क्रोष्ट्रीय वगैरे वार्तिककारांशिवाय व्याघ्रभूति व वैयाघ्रपद्य हेही वार्तिककार महाभाष्यकारांपूर्वीं होऊन गेले. भट्टोजी दीक्षितांनीं ' द्विर्वचनेचि ' या सूत्राचें विवरण करतांना शब्दकौस्तुभामध्यें ' शुष्किका शुष्कजङ्घा च० ' हें श्लोकवार्तिक व्याघ्रभूतीचें आहे असें प्रतिपादन केलें आहे. व्याघ्रभूतीचीं श्लोकबद्ध वचनें काशिकेंत व शब्दकौस्तुभांत उद्धृत केलेलीं आढळतात; त्यावरून व्याघ्रभूतीनें पाणिनिसूत्रांवर श्लोकवार्तिकें रचिलीं असावीं असें दिसतें. यांशिवाय गोनर्दीय, गोणिकापुत्र, सौर्य भगवान्, कुणरवाडव यांचींही निराळी मतें म्हणून भाष्यकारांनीं दिलीं आहेत. यांपैकीं गोनर्दीय व गोणिकापुत्र या शब्दांनीं भाष्यकारांनीं स्वतःचाच उल्लेख केला आहे असें कैयटभट्ट व नागेश यांचें म्हणणें आहे. कांहीं वार्तिकें केवळ ' अपर आह ' असें म्हणून वार्तिककारांचा नामनिर्देश न करतां भाष्यकारांनीं दिलीं आहेत. भाष्यकारांनीं ' समो हिततततयोर्वा लोपः ( ६।१ ४० वा. १ ) या वार्तिकाला पोषक 'इहान्ये वैयाकरणाः समस्तते०' अशी ओळ लिहिली आहे. 'लुम्पेदवश्यमः कृत्ये तुंकाममनसोरपि । समो वा हिततततयोर्मांसस्य पचि युड्घञोः' ही मकाराचा लोप सांगणारी काशिकाकारांनीं उद्धृत केलेली कारिका भाष्यकारांचे पूर्वीच्या वैयाकरणांची आहे कां नंतर लिहिली आहे हें सांगतां येत नसलें तरी वरतीं दिलेल्या ' समस्तते ' या वार्तिकाच्या अनुवादरूपानें ती लिहिली आहे हें स्पष्ट आहे. याशिवाय कैयटभट्टांनीं अनेक ठिकाणीं पूर्वाचार्यांचे म्हणून कांहीं उतारे दिले आहेत.

## १४९. वार्तिककारांच्या कार्याचें महत्त्व.

एकंदरींत पाहतां पाणिनीय व्याकरण हें सर्वांगपरिपूर्ण व अत्यंत पद्धतशीर असल्यामुळें त्याचें अध्ययन उत्तरेकडील प्रांतांतच नव्हे तर सर्व देशभर चालू झालें व निरनिराळ्या विद्यापीठांतून विद्वान् आचार्योंनीं त्याचें अध्यापन चालू केलें व शिष्यांना दिलेल्या स्पष्टीकरणाचा सारांश वार्तिकरूपानें शिष्यांना तोंडपाठ करावयास लावून व्याख्यानपरंपरा चालू ठेवली हें खरें; पण या वार्तिककारांचें याहूनही मोठें कार्य म्हणजे त्यांनीं व्याकरणविषयक मूलभूत सिद्धांतांचें प्रसङ्गानें विवेचन केलें व वार्तिकवचनांची जोड देऊन पाणिनीय अष्टकाला शास्त्राचें स्वरूप दिलें हें होय. वैदिक व लौकिक वाक्यांचें यथार्थज्ञान होण्याकारितां शुद्ध शब्द कोणते व अपशब्द कोणते हें कळणें अत्यंत आवश्यक असल्यामुळें पाणिनीनें आपल्या अष्टाध्यायींत संज्ञा, परिभाषा, सामान्य नियम, अपवाद व प्रतिप्रसव देऊन शुद्ध शब्दांची सिद्धि केली आहे. वार्तिककारांनीं शास्त्राला आवश्यक जें तत्त्वप्रतिपादन तें जरी प्रत्यक्ष केलें नसलें तरी व्याकरणशास्त्राचीं मूलभूत तत्त्वें व त्यांचें स्वरूप यांचें विवेचन त्या त्या प्रसङ्गानें केलें आहे. ( १ ) शब्द व अर्थ हीं दोनच व्याकरणशास्त्रांतील मुख्य तत्त्वें आहेत; ( २ ) पुरुष व प्रकृति यांप्रमाणें तीं नित्यसंबद्ध आहेत; ( ३ ) अर्थासहित शब्दांचें यथार्थज्ञान होणें हेंच तत्त्वज्ञान व ( ४ ) अष्टाध्यायीमध्यें जे नियम सांगितले आहेत त्यांचा संपूर्ण अभ्यास हें त्या तत्त्वज्ञानाचें साधन हें महत्त्वाचें सिद्धान्तचतुष्टय त्यांनीं सूचित केलें आहे ही गोष्ट वार्तिकवचनांचा सूक्ष्म अभ्यास केल्यास सहज ध्यानांत येण्याजोगी आहे.

## १५०. महाभाष्यकारांच्या कार्याचें महत्त्व.

पाणिनीच्या अष्टकाला शास्त्राचें स्वरूप येण्यास वार्तिकवचनांची जरी बहुमोल मदत झाली तरी वार्तिवचनांचा संग्रह व व्याख्यान ज्यामध्यें केलें आहे अशा महाभाष्याला 'व्याकरण-शास्त्र' हें नांव यथार्थ होईल. कारण, महाभाष्य हा सूत्रें किंवा वार्तिकें यांप्रमाणें लघुवचनसंग्रह या स्वरूपाचा ग्रंथ नाहीं; त्यांतील सिद्धान्त हे शास्त्रोपयुक्त आहेत आणि प्रतिपादन तसेंच व्याख्यान शास्त्रीय पद्धतीनें केलेलें आहे. महाभाष्य हें वार्तिकवचनांचें व्याख्यान आहे असें म्हटलें तरी महा-भाष्याच्या योग्यतेची यत्किंचित् सुद्धां हानि होत नाहीं. आपाततः जरी महाभाष्य हा वार्तिकांवरील एक टीकाग्रंथासारखा ग्रंथ दिसला तरी वस्तुत: तो टीकाग्रंथ नाहीं. पाणिनीचें अष्टक हा जसा भाष्य-कारांचे वेळीं परंपरागत मुखोद्गत ग्रंथ होता त्याप्रमाणें वार्तिकांची स्थिति नव्हती. पाणिनिसूत्रांचें जें व्याख्यान निरनिराळ्या विद्याकेन्द्रांमध्यें होत होतें त्याचा सारांश म्हणून वार्तिकवचनें हीं पुष्कळ अंशीं समान पण क्रमामध्यें व शब्दरचनेमध्यें जरा भिन्नता असलेलीं अशीं निरनिराळ्या विद्याकेन्द्रांत पढवलीं जात असत. भाष्यकारांनीं या केन्द्रांना भेटी देऊन तेथील व्याकरणा-ध्यापनाचें सूक्ष्म अवलोकन करून निरनिराळ्या केन्द्रांतील सर्वसाधारण व्याख्यान साररूपानें संगृहीत करणारीं पुष्कळ वार्तिकें जमा केलीं, कांहीं स्वत: रचिलीं व त्यांची निवड करून त्यांच्या अनुरोधानें महत्त्वाच्या सूत्रांचें स्पष्टीकरण करण्याच्या हेतूनें महाभाष्य लिहिलें. हीं वार्तिकवचनें परंपरागत पठनामध्यें असल्यामुळें व निरनिराळ्या विद्याकेन्द्रांमध्यें तीं समान स्वरूपाचीं असल्यामुळें विशिष्ट वार्तिककर्त्याचा नामनिर्देश भाष्यकारांना करतां येईना, व त्याची जरूरही नव्हती. फक्त कांहीं विशिष्ट ठिकाणीं साधारणसंमत अर्थापेक्षां जरा निराळा अर्थ भाष्यकारांना सांगावयाचा असला तरच तेथें आपल्या मताच्या समर्थनार्थ नामनिर्देशपूर्वक वार्तिककारांचीं वचनें त्यांनीं उद्धृत केलीं आहेत. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे इतर शास्त्रावरील सूत्रांच्या मानानें पाणिनिसूत्रें जरी ज्यास्त स्पष्टार्थ व पद्धतशीर असलीं तरी त्यांच्या लाघवयुक्त रचनेमुळें विशिष्ट सूत्रांचा पाणिनीचे मनांतील बरोबर अर्थ कळणें जोंपर्यंत अध्यापकांची परंपरा कायम होती तोंपर्यंतच शक्य होतें. परंपरेचा लोप झाल्यानंतर ज्याप्रमाणें बादरायणसूत्रांचा सूत्रकारांना अभिप्रेत अर्थ कोणता होता याबद्दल कांहीं ठिकाणीं संशय येऊं लागला त्याप्रमाणेंच पाणिनिसूत्रांविषयींही झालें असतें. सुदैवानें वार्तिककारांनीं अध्यापकपरंपरेमध्यें प्रतिपादन केलेल्या पाणिनीला अभिप्रेत असलेल्या अर्थाचें टांचण केलें व महाभाष्यकारांनीं हीं सर्व टांचणें एकत्रित करून त्यांचें संपूर्ण व्याख्यान आपल्या सुंदर प्रसादयुक्त वाणीनें करणारा महाभाष्य ग्रंथ रचिला. महाभाष्यकारांच्या कार्याचें विवेचन करण्यापूर्वी महा-भाष्यांतील आन्हिकांचें क्रमशः विवेचन करणें उद्बोधक होईल म्हणून तें प्रथम करीत आहें:—

---

१. बादरायण सूत्रांवर शंकराचार्य, रामानुजाचार्य, पूर्णप्रज्ञाचार्य, वल्लभाचार्य, श्रीकण्ठाचार्य, निम्बार्क, भट्टभास्कर इत्यादि अनेक आचार्यांनीं लिहिलेले भाष्यग्रंथ हल्लीं उपलब्ध आहेत. मूळ सूत्रें जरी एकच असलीं तरी या भाष्यग्रंथांमध्यें प्रतिपादन केलेले वेदान्तविषयक सिद्धान्त पाहिले असतां अनेक ठिकाणीं मतभेद आढळून येतात. हे मतभेद किरकोळ स्वरूपाचे नसून मूलतत्त्वांविषयीं आहेत ही विचार करण्याजोगी बाब आहे. ज्या वेळीं बादरायण व्यासांनीं आपलीं सूत्रें रचिलीं त्या वेळीं मूलतत्वांच्या स्वरूपाविषयीं वैकल्पिक विचार त्यांना अभिप्रेत असावे असें मुळींच म्हणवत नाहीं. त्यांनीं चालू केलेली सूत्रार्थव्याख्यानाची परंपरा कालान्तरानें नष्ट झाली व त्यानंतरच शंकराचार्य वगैरे आचार्यांनीं आपल्या बुद्धिविभवानें व्याख्यानें लिहिलीं. या विद्वान् भाष्यकारांमधील मतभेद पाहिले असतां बादरायण व्यासांना कोणता अर्थ विवक्षित होता याविषयीं सांप्रत काळच्या विद्वानांना संशय येणें साहजिकच आहे.

## महाभाष्यकालखंड ( शकपूर्व २०० ते इ. स. ५०० )

### १५१. पस्पशाह्निक ( अ. १ पा. १ आन्हिक १ ). 'पस्पशा' या नांवाचें विवेचन.

व्याकरणमहाभाष्य हें पाणिनिसूत्रांवर रचिलें असल्यामुळें अर्थातच सूत्रपाठाप्रमाणें त्याचे आठ अध्याय व प्रत्येक अध्यायाचे चार पाद असे विभाग पडतात. प्रत्येक पादांतील प्रतिपाद्य विषयाचे प्रकरणात्मक भाग पाडून भाष्यकारांनीं स्वतः पोटविभाग केले आहेत व त्यांना **आन्हिक** हें नांव दिलें आहे. व्याकरणशास्त्रांत योग्य प्रवेश झालेल्या अत्यंत बुद्धिमान् शिष्याला **एका दिवसांत** जितका विषय प्रतिभासंपन्न गुरुजींनीं पढवितां येणें शक्य आहे तितका विषय साधारणतः या पोटविभागांत असल्यामुळें त्याला आन्हिक ( अह्ना निर्वृत्तम् ) असें भाष्यकारांनीं नांव दिलें असावें. अशीं ८५ आन्हिकें महाभाष्यांत आहेत. त्यांपैकीं पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादाचीं नऊ आन्हिकें आहेत. त्यांना **नवान्हिकी** ही संज्ञा देण्याचा वैयाकरणांचा प्रघात आहे. या नऊ आन्हिकांपैकीं पहिलें आन्हिक हें प्रस्तावनेसारखें आहे. भाष्यकारांनीं आन्हिकांना नांवें दिलीं नसलीं तरी या प्रस्तावनान्हिकाला 'पस्पशान्हिक' म्हणण्याचा वैयाकरणकुलांमध्यें प्रघात आहे. पस्पशान्हिक ही संज्ञा नागेशभट्टांच्या लिखाणांत आढळते; पण ती बरीच जुनी आहे. माघ कवीनें शिशुपालवध काव्यांत

> " अनुत्सूत्रपदन्यासा सद्वृत्तिः सन्निबन्धना।
> शब्दविद्येव नो भाति राजनीतिर**पस्पशा** " ( २।११२ )

या श्लोकांत 'अपस्पशा' या श्लिष्ट शब्दांत 'पस्पशा' ही संज्ञा या प्रस्तावनान्हिकाला लावलेली स्पष्ट दिसून येते. 'स्पश्' ग्रहण करणें या अर्थीं असलेल्या अप-उपसर्गपूर्वक स्पश् धातूहून स्त्रीलिंगी 'अ' प्रत्यय लावून व उपसर्गाच्या 'अ' काराचा लोप करून 'पस्पशा' हा शब्द साधला आहे व त्याचा अर्थ दुरून केलेली न्याहाळणी किंवा पहाणी असा आहे. 'स्पश्' धातूच्या यङ्लुगन्ताहून 'अ' हा प्रत्यय करून पस्पशा हा शब्द साधणें शक्य आहे; व तसा साधल्यास 'सूक्ष्म निरीक्षण' असा अर्थ होईल. पस्पशा या शब्दाचा हा यौगिक अर्थ या आन्हिकाला पूर्णपणें लागू पडतो. खरोखरीच व्याकरणशास्त्रांतील महाभाष्य या सर्वमान्य ग्रंथाला पस्पशा हें प्रस्तावनान्हिक उत्तम साजेसें आहे.

> " शास्त्रेष्वाद्यं व्याकरणं मुख्यं तत्रापि पाणिनेः।
> रम्यं तत्र महाभाष्यं रम्या तत्रापि पस्पशा "

असें वर्णन केल्यास तें या आन्हिकाला पूर्णपणें लागू पडतें.

---

१. मल्लिनाथानें या श्लोकाचें व्याख्यान पुढें दिल्याप्रमाणें केलें आहे:—" अनुत्सूत्रपदन्यासा अनुत्सृष्टसूत्राक्षरः इष्ट्युपसंख्याननैरपेक्ष्येण सूत्राक्षरैरेव सर्वार्थप्रतिपादको न्यासो वृत्तिव्याख्यानग्रन्थविशेषो यस्यां सा तथोक्ता ।......अन्यत्र सती वृत्तिः काशिकाख्यसूत्रव्याख्यानग्रन्थविशेषो यस्यां सा ।......अन्यत्र सन्निबन्धनं भाष्यग्रन्थो यस्यां सा । अपगतः स्पशः चारो यस्याः सा अपस्पशा चेत् । अन्यत्र अविद्यमानः पस्पशः शास्त्रारम्भसमर्थक उपोद्घातसंदर्भग्रन्थो यस्याः सा । अपस्पशा शब्दविद्येव व्याकरणविद्येव नो भाति न शोभते ।" 'पस्पशः' असा पुल्लिंगी 'पस्पश' शब्द मल्लिनाथानें घेतला आहे. वैयाकरण परंपरेमध्यें मात्र 'पस्पशा' असा स्त्रीलिंगी शब्द प्रचारांत आहे व 'उक्तं च पस्पशायाम्' अशा प्रकारचे वैयाकरणांचे प्रयोगही आढळतात.

## १५२. व्याकरणाध्ययनाचीं प्रयोजनें.

या पस्पशान्हिकांत प्रथमतः प्रस्तुत ग्रंथाचा, म्हणजे अर्थात् पाणिनीच्या अष्टाध्यायीचें व्याख्यान हें प्रस्तुत ग्रंथाचें स्वरूप असल्यामुळें अष्टाध्यायीचा, प्रतिपाद्य विषय कोणता हा विचार केलेला आहे व शब्दानुशासन हा विषय सांगितला आहे. शब्द याचा अर्थ ध्वनि असें सांगून द्रव्य, क्रिया, गुण व आकृति ( जाति ) यांचें शब्द उच्चारला असतां ज्ञान होतें म्हणून शब्द हा या द्रव्य वगैरेंपेक्षां निराळा पण त्यांचा वाचक असतो असें भाष्यकारांनीं प्रतिपादन केलें आहे. या प्रसंगीं प्रदीपकारांनीं हा वाचक शब्द म्हणजे क्षणिक ध्वनीपेक्षां निराळा स्फोटस्वरूप नित्य शब्द असें सांगून भर्तृहरीच्या वाक्यपदीयाचा आधार दिला आहे. शब्दकौस्तुभकारांनीं शब्द हा द्रव्य वगैरेंचा वाचक आहे हें खरें, पण तो शब्द म्हणजे ध्वनि नव्हे, तर स्फोट म्हणून शास्त्रकारांनीं वर्णिलेला नित्य शब्द असें सांगून स्फोटाचे वर्णस्फोट वगैरे आठ प्रकार दिले आहेत व मीमांसकमताचें खंडन केलें आहे. यानंतर भाष्यकारांनीं व्याकरणशास्त्राच्या अध्ययनाचीं प्रयोजनें दिलीं आहेत. 'प्रयोजन' हा शब्द भाष्यकारांनीं हेतु व उपयोग ( फायदा ) अशा दोन्ही अर्थी वापरला आहे. प्रथमतः वेदांचें रक्षण ( रक्षा ), वेदांतील वाक्यांचे जरूर तेथें विभक्तिविपरिणाम ( ऊह ) इत्यादि अध्ययनाचे हेतू सांगून झाल्यावर भाष्यकारांनीं 'तेऽसुराः०' इत्यादि वाक्यें देऊन त्यांत सांगितल्याप्रमाणें दुष्ट शब्द उच्चारल्यामुळें उच्चारणाऱ्याचा पराजय व नाश होतो परंतु शुद्ध शब्द उच्चारल्यामुळें चांगलें फल मिळतें, लोकांत उच्च स्थान मिळतें, ऋत्विजाचा मान मिळतो, वैदिक कर्में यथासांग करतां येतात, प्रायश्चित्तेष्टि करावी लागत नाहीं, मुखांतील स्थानांची शुद्धि होते, शब्दस्वरूपाचें यथार्थज्ञान होतें, वाग्देवी आपलें यथार्थस्वरूप दाखविते व त्यामुळें शब्दब्रह्माशीं ऐक्य होतें म्हणजे मोक्ष प्राप्त होतो अशीं व्याकरणाच्या अध्ययनाचीं फलें दिलीं आहेत. हीं सर्व फलें अर्थात् व्याकरण जाणणाऱ्यालाच मिळतात; पण पूर्वीसारखें अत्यावश्यक म्हणून वेदाध्ययनाप्रमाणें उपनयनानंतर लोक व्याकरणाध्ययन करीत नाहींत म्हणून वेदाध्ययन झाल्यानंतर वेदाचा अर्थ कळण्याकरितां व्याकरण शिका असें सांगणें सांप्रत इष्ट आहे असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. हीं व्याकरणाध्ययनाचीं प्रयोजनें कोणीं सांगितलीं—पाणिनीनें स्वतः, वार्तिककारांनीं, अथवा भाष्यकारांनीं स्वतः—याविषयीं टीकाकारांत मतभेद आहे. भाष्यकारांनीं स्वतः सांगितलेलीं नसावीं, कारण स्वतः बद्दल ते 'आचार्यः सुहृद् भूत्वा अन्वाचष्टे' असें म्हणणार नाहींत. 'अन्वाचष्टे' या शब्दावरून प्रथमतः पाणिनीनेंच तीं एखाद्या स्वतःच्या त्या वेळीं उपलब्ध असलेल्या ग्रंथांत घातलीं व आचार्योनीं म्हणजे त्या कालच्या प्रसिद्ध वैयाकरण व्याख्याकारांनीं त्यांचें अन्वाख्यान केलें असें म्हणणें शक्य आहे. वार्तिककारांनींही प्रथमतः स्वतः सांगितलीं नाहींत; कारण, 'सिद्धे शब्दार्थसंबन्धे' हें वार्तिककारांचें पहिलें वार्तिक आहे असें भाष्यकारच म्हणतात. कदाचित् 'अथ शब्दानुशासनम्' या वचनानें शब्दशास्त्रावरील आपल्या संग्रहग्रंथाला आरंभ करून त्यानंतर संग्रहकारांनीं

१. याविषयीं महाभाष्यप्रदीपांतील पुढील उतारा लक्षांत घेण्याजोगा आहे. "वैयाकरणा वर्णव्यतिरिक्तस्य पदस्य वाक्यस्य वा वाचकत्वमिच्छन्ति । वर्णानां प्रत्येकं वाचकत्वे द्वितीयादिवर्णोच्चारणानर्थक्यप्रसङ्गात् । आनर्थक्ये तु प्रत्येकमुत्पत्तिपक्षे यौगपद्येनोत्पत्त्यभावात् अभिव्यक्तिपक्षे तु क्रमेणैवाभिव्यक्त्या समुदायाभावादेकस्मृत्युपारूढानां वाचकत्वे सरो रस इत्यादावर्थप्रतिपत्त्यविशेषप्रसङ्गात्तद्व्यतिरिक्तः स्फोटो नादाभिव्यङ्ग्यो वाचको विस्तरेण वाक्यपदीये व्यवस्थापितः ॥

२. याविषयीं शब्दकौस्तुभांत आरंभींच दिलेलें 'स्फोटस्वरूपव्युत्पादन' प्रकरण पहावें.

'रक्षोहागम०' वगैरे वचनांनीं व्याकरणाचीं प्रयोजनें सांगितलीं असावीं. वार्तिककार व भाष्यकार दोघांनाही पाणिनीच्या अष्टकाला व्याकरण नांव योग्य आहे हें अभिप्रेत असावें असें 'सूत्रे व्याकरणे षष्ठ्यर्थोनुपपन्नः' या वार्तिक[३]वचनावरून व त्याच्या व्याख्यानावरून सूचित होतें.

## १५३. शब्दनित्यत्व.

शब्द हे अनन्त असल्यामुळें प्रत्येक शब्द उच्चारून सांगणें शक्य नाहीं; तसेंच जे शुद्ध शब्द नव्हेत ते सर्व अपशब्द असल्यामुळें सर्व अपशब्दांचें पठन त्याहूनही अशक्य आहे; म्हणून शब्द साधण्याकरितां कांहीं सामान्य नियम व त्यांना अपवाद सांगितले असतां अनेक शब्द थोड्या प्रयत्नानें साधले जात असल्यामुळें पाणिनीनें या पद्धतीचा स्वीकार करून आपला अष्टाध्यायी ग्रंथ रचिला. शब्द नित्य किंवा अनित्य याविषयीं दोन्ही मतें प्रचलित आहेत व व्याकरणशास्त्राला कोणतेंही मत चालेल असें सांगून व्याडीनें या बाबतींत विस्तृत विवेचन 'संग्रहांत' केलें आहे असा भाष्यकारांनीं हवाला दिला आहे. तरी पण, 'घटेन कार्यं करिष्यन्०' या वाक्[१]यावरून शब्दनित्यत्वाकडेच भाष्यकारांचा कल असावा असें दिसतें. वार्तिककारांनीं 'सिद्धे शब्दार्थसंबन्धे' या वार्तिकामध्यें शब्द नित्य आहेत अर्थ नित्य आहे व त्यांचा संबंधही नित्य आहे असें सांगितलें आहे व भाष्यकारांनीं द्रव्य हें परिणामिनित्य आहे,आणि आकृति ही एक व्यक्ति नाहींशी झाली तरी दुसऱ्या व्यक्तीमध्यें राहते म्हणून स्वरूप नित्य आहे, तेव्हां शब्दाचा अर्थ द्रव्य किंवा आकृति (जाति) कोणताही असो शब्दाचा अर्थ हा नित्यच आहे; तसेंच कुम्भार जसा घट तयार करतो तसे शब्द हे कोणी तयार करीत नाहींत म्हणूनही शब्द नित्य आहेत असें प्रतिपादन केलें आहे. कोणते शब्द उच्चारावे व कोणते न उच्चारावे हें जरी लोकव्यवहारावर अवलंबून असलें तरी शुद्ध शब्द उच्चारले तरच पुण्य लागतें हा नियम आहे; आतां, कांहीं शब्द व्याकरणसिद्ध असूनही लोकव्यवहारांत दृष्टीस पडत नाहींत याचें कारण त्या अर्थाचे दुसरे शब्द ज्यास्त प्रचारांत असतात; कांहीं शब्द एका प्रांतांत प्रचारांत असतात तर दुसऱ्या प्रांतांत नसतात असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. शेवटीं, भाष्यकारांनीं लक्ष्य म्हणजे शब्द व लक्षण म्हणजे त्याचें विवेचन करणारें पाणिनीचें सूत्र अशी 'व्याकरण' शब्दाची 'लक्ष्यलक्षणे व्याकरणम्' ही व्या[२]ख्या सांगून 'व्याकरणाचीं सूत्रें' या प्रयोगाचें समर्थन केलें आहे; व नंतर महेश्वरानें पाणिनीला जो 'अइउण्,' 'ऋलृक्' इत्यादि ध्वनींनीं अ, इ, उ वगैरे वर्णांचा डमरू वाजवून उपदेश केला तो शुद्ध वर्णांचाच केला, अस्पष्ट दोषयुक्त वर्णांचा केला नाहीं असें सांगून दुसऱ्या प्रत्याहाराह्निकाचा प्रस्ताव करून पहिलें प्रस्तावनाह्निक पुरें केलें आहे. व्याकरणशास्त्राला अधिकृत प्रस्तावना या दृष्टीनें हें आह्निक फार महत्वाचें आहे व भाषाही अतिशय सुंदर व हृदयंगम आहे. "घटेन कार्यं करिष्यन्०", "द्विविधा अपि हेतवो भवन्ति०" वगैरे वाक्यें तर वाचल्याबरोबर लक्ष्यांत राहतात. ग्रंथारंभीं न्यासकारांनीं शब्दानुशासन शब्दाच्या अर्थाविषयीं केलेलें विवेचन तसेंच, शब्दकौस्तुभकारांनीं नित्यशब्द म्हणजे स्फोट याविषयीं केलेलें विवेचन विद्वत्तापूर्ण व उद्बोधक आहे.

---

१. याविषयीं महाभाष्यभाषांतर भाग १ पृ. २५ पहा.

२. याविषयीं महाभाष्यभाषांतर भाग १ पृ. १७ पहा.

३. याविषयीं महाभाष्यभाषांतर भाग १ पृ. २७ पहा.

## १५४. प्रत्याहाराऩ्हिक ( अ.१ पा.१ आन्हिक २ ). अक्षरसमाम्नायांतील वर्णसंख्या व शिक्षेंतलि वर्णसंख्या.

दुसऱ्या आन्हिकाला प्रत्याहाराऩ्हिक हें नांव टीकाकारांनीं दिलें आहे. नटराजराज महेश्वर यानें आपलें नृत्य संपविल्यावर चौदा वेळां डमरूंतून निनाद काढून अइउण्, ऋलृक् इत्यादि चौदा सूत्रें पाणिनीला शिकविलीं अशी कथा आहे. या चौदा सूत्रांमध्यें नऊ स्वर व तेहतीस व्यंजनें दिलीं आहेत. या स्वरांना व व्यंजनांना मातृकावर्णही म्हणतात. ह्रस्व, दीर्घ, प्लुत, अनुनासिक वगैरे जे वर्णांचे गुण त्यांमुळें अ इ वगैरे वर्णांचे आ ई वगैरे अवांतर भेद होतात; व सूत्रांमध्यें मातृकावर्णांचें उच्चारण केलें असतां पृथक् उच्चारण न केलें तरी अवांतरभेदयुक्त वर्णही घेतले जातात असा पाणिनीनें उच्चारणलाघवाच्या दृष्टीनें शास्त्रसंकेत घालून दिला आहे. त्याप्रमाणेंच महेश्वराच्या चौदा सूत्रांतील कोणताही वर्ण घेऊन चौदा सूत्रांच्या शेवटीं असलेलें कोणतेंही व्यंजन त्याला जोडलें असतां जो शब्द तयार होतो त्याला संज्ञाशब्द समजून पहिल्या व मधल्या सर्व वर्णांचा त्यानें संग्रह होतो असाही संकेत त्यानें घालून दिला आहे. या संज्ञाशब्दांना प्रत्याहार हें नांव देण्यांत येतें; या प्रत्याहारांपैकीं ब्रेचाळीस प्रत्याहारांचा पाणिनीनें उपयोग केला आहे[3]. या प्रत्याहारांमध्यें सूत्रांतील शेवटच्या व्यंजनरूप ण् क् वगैरे वर्णांचा समावेश होत नाहीं; कारण, सूत्रांमध्यें क्रमानें वर्ण उच्चारले आहेत व त्यांत ते सांपडत नाहींत; शिवाय, सूत्रांमधील त्यांचा उच्चार गौण आहे व पाणिनितन्त्राप्रमाणें उच्चार झाल्याबरोबर त्यांचा लोपही होतो असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. पाणिनीच्या शिक्षेंत ६३ वर्ण—दुःस्पृष्ट ( ळ ) धरल्यास ६४ वर्ण—सांगितले आहेत. २२ स्वर, २५ व्यंजनें, ४ अंतस्थवर्ण, ४ ऊष्मवर्ण, ४ यम, जिह्वामूलीय, उपध्मानीय, अनुस्वार आणि विसर्ग हे ६३ वर्ण होतात व हे स्वतंत्र वर्ण गणले जातात. माहेश्वरसूत्रांमध्यें मात्र ९ स्वर व ३३ व्यंजनें एवढेच वर्ण असल्यामुळें जरी बावीस स्वर हे नऊ मूळ स्वरांचेच पोटभेद असल्यामुळें त्यांचा नऊ स्वरांमध्यें अंतर्भाव झाला तरी यम जिह्वामूलीय इत्यादि नऊ वर्णांचा ३३ व्यंजनांमध्येंच प्रथम अथवा शेवटीं अक्षरसमाम्नायामध्यें पाठ आहे अशी कल्पना केली पाहिजे असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे व भाष्यकारांनीं त्याचें मुद्देसूद विवेचन केलें आहे.

## १५५. संवृत ' अ 'काराविषयीं व ' लृ 'काराविषयीं विचार.

या आन्हिकांत कांहीं बारीक सारीक तांत्रिक प्रश्नांचीही भाष्यकारांनीं चर्चा केली आहे: अ हा वर्ण ' संवृत ' म्हणजे मुख संकुचित करून उच्चारला जातो व दीर्घ आ, प्लुत आ, तसेच इतर सर्व स्वर ' विवृत ' म्हणजे मुख पसरून उच्चारले जातात; म्हणून पाणिनिसूत्रांमध्यें ' अ 'काराला सांगितलेलीं कार्यें दीर्घ व प्लुत ' आ 'काराला होणार नाहींत या शंकेची विस्तृत चर्चा करून ' अ ' कार हा शास्त्रांत व लोकांत सर्व ठिकाणीं एकच आहे, परंतु सुबन्त व तिङन्त शब्द तयार होण्याचे पूर्वीं धातू, प्रातिपदिकें, प्रत्यय, आगम, आदेश इत्यादि ठिकाणीं त्याचा विवृत उच्चार होतो व शब्द तयार झाल्यावर त्या विवृत ' अ ' काराचे जागीं संवृत ' अ ' कार पाणिनीच्या ' अ अ इति ' ( ८।४।६८ ) या सूत्रानें होतो असें वार्तिक-

---

१. अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः ( पा. सू. १।१।६९ ) पहा.

२. आदिरन्त्येन सहेता ( पा. सू. १।१।७१ ) पहा.

३. याविषयीं मागें पृष्ठ १६४, टीप २ पहा.

कारांचें म्हणणें भाष्यकारांनीं स्पष्ट केलें आहे. ऋ व ऌ हे सवर्णस्वर असल्यामुळें ‘ऌ’काराचा ‘ ऋ ’कारामध्यें अंतर्भाव होतो म्हणून ऋऌक् या सूत्रांत ‘ऌ’कार घालण्याची जरूर नव्हती असा शंकाकाराच्या आक्षेपाचा अनुवाद प्रथम करून नंतर ऌकारानें आरंभ होणारे ऌतक वगैरे शब्द हे खरे ऌकारादि नव्हेत तर ‘ऋ’काराच्या दोषयुक्त उच्चारानें ते ऌकारादि समजले जातात; तसेंच क्लृप्ति वगैरे शब्दांतील ऌकार हा जरी खरा असला तरी शास्त्रदृष्ट्या “कृपो रो लः” (८।२।१८) हें सूत्र पूर्वीच्या सूत्रांना असिद्ध असल्यामुळें त्या सूत्रांतील कार्यांचे दृष्टीनें तेथें ऋकारच असतो; त्याप्रमाणेंच ऋतक वगैरे शब्दांच्या ऌतक वगैरे प्रकारांनीं होणाऱ्या बोबड्या अनुकरणामधील ऌकारसुद्धां खरा ऌकार नव्हे, कारण शुद्ध शब्दांचें अनुकरणसुद्धां अशुद्ध करतां उपयोगाचें नाहीं, अशुद्ध अनुकरण हा अपशब्दच होतो असें भाष्यकारांनीं स्पष्ट सांगितलें आहे. एकंदरींत पाहतां, लौकिक व वैदिक भाषेत आढळणारे ऌकार हे मूळचे ऋकारच समजून काम भागत असल्यामुळें ‘ ऋऌक् ’ या माहेश्वर सूत्रांत ऌकारोच्चारण व्यर्थ आहे असें जरी वार्तिककारांना म्हणतां येत असलें तरी वर दिल्याप्रमाणें एवढा खटाटोप करून ऌकार अनावश्यक आहे असें म्हणणें म्हणजे मोठ्या काठीवर चढून छोटें फळ मिळविण्यासारखें आहे असें भाष्यकारांनीं विनोदानें म्हटलें आहे.

## १५६. वर्णांच्या अर्थवत्त्वासंबंधीं विचार व पदाचें अर्थवत्व.

कांहीं वर्णांमधील एकादा भाग थेट दुसऱ्या एका स्वतंत्र वर्णासारखा दिसला तर त्या स्वतंत्र वर्णाला सांगितलेलीं कार्यें त्या भागाला करावीं किंवा नाहीं या प्रश्नाची भाष्यकारांनीं चर्चा केली आहे व वर्णाचा भाग वर्णामध्यें मिसळून गेला असल्यामुळें तो वेगळा काढतां येत नाहीं व म्हणून त्याला तीं कार्यें करतां येत नाहींत असें उत्तर दिलें आहे. अक्षरसमाम्नायामध्यें ह हा एकटाच वर्ण दोनदां उच्चारण्यांत आला आहे व त्याचा भाष्यकारांनीं उपयोग दाखविला आहे; तसेंच ‘ ह य व र ट् ’ या सूत्रामध्यें ‘ य व र ’ या क्रमापेक्षां ‘र य व’ हा क्रम बरा झाला असता किंवा नाहीं याही प्रश्नाचा भाष्यकारांनीं ऊहापोह केला आहे; व वर्णोच्चारणामधील क्रमच योग्य आहे असें म्हटलें आहे. प्रत्येक वर्णाला निरनिराळा अर्थ असतो किंवा नाहीं याविषयीं कांहीं ठिकाणीं वर्णांना अर्थ असलेला दृष्टीस पडतो, वर्ण बदलले कीं अर्थामध्यें बदल होतो, तसेंच समूहाला अर्थ असला तर ज्यांचा समूह बनलेला आहे त्या स्वतंत्र व्यक्तींनाही अर्थ असणें न्याय्य आहे असा लोकन्याय आहे हीं कारणें देऊन वर्णांना स्वतंत्र अर्थ असतो या मताचें भाष्यकारांनीं प्रथम प्रतिपादन केलें आहे व त्यानंतर प्रत्येक वर्णाला स्वतंत्र अर्थ नसतो हेंही मत सांगितलें आहे व त्याला ‘ वर्णांना प्रत्येकीं स्वतंत्र अर्थ असता तर त्या सर्व अर्थांचा मिळून शब्दाचा अर्थ झाला असता परंतु तसें दिसत नाहीं ’ हें प्रमाण दिलें आहे व त्याला पोषक वर्णक्रम बदलल्यास किंवा ज्यास्तीकमी वर्ण केले असतांसुद्धां अर्थ कायम राहतो असें कांहीं वेळां दृष्टीस पडतें हें कारण देऊन ‘विशिष्ट वर्णानुपूर्वी असलेल्या वर्णसमूहरूप शब्दाला अर्थ असतो ’ असें आपलें स्पष्ट मत भाष्यकारांनीं दिलें आहे.

## १५७. शिष्ट लोकांनीं केलेल्या व्याख्यानावरून संशयाचें निराकरण.

अइउण् व लण् या दोन सूत्रांमध्यें ण् हा वर्ण शेवटीं आढळतो; त्यामुळें अण् व इण् या प्रत्याहारांचे बाबतींत पहिला ण् घेऊन प्रत्याहार समजावा किंवा दुसरा ण् घेऊन

प्रत्याहार समजावा हा संशय येतो. इतर पुष्कळ व्यंजनें सूत्रांचे शेवटीं घालण्याजोगीं असतांनाही ज्या अर्थी णू हाच वर्ण दोनदां वापरला आहे त्या अर्थी 'पाणिनीच्या सूत्राच्या अर्थाविषयीं संशय आला असतां शिष्ट लोकांनीं केलेल्या व्याख्यानाप्रमाणें विशिष्ट अर्थ समजून संशयाचें निराकरण करावें, अर्थसंशयामुळें सूत्र हें केव्हांही अप्रमाण समजूं नये' ( व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्नहि संदेहादलक्षणम् ) असा पाणिनीच्या मनांतील अभिप्राय व्यक्त होतो असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. 'व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिः०' हें परिभाषारूप वचन महाभाष्यामध्यें अनेक ठिकाणीं संशयित स्थलीं संशयनिराकरणकरितां दिलेलें आढळून येतें. आन्हिकाचे शेवटीं भाष्यकारांनीं 'अक्षर' शब्दाची व्याख्या दिली आहे, व त्यावरील विवेचनाचे शेवटीं "ज्या ह्या वाणीमध्यें वेदरूपीं शब्दब्रह्म आहे त्या वाणीचा 'वर्णज्ञान करून देणारें शास्त्र' हा विषय आहे; या व्याकरणशास्त्राकरितां महेश्वरानें हा अक्षरसमाम्नायरूप उपदेश केला आहे" असें सांगून अइउण् इत्यादि चौदा सूत्रांमध्यें सांगितलेल्या अक्षरसमाम्नायाचें महत्त्व वर्णिलें आहे. आन्हिकाचे शेवटीं या अक्षरसमाम्नायाचें भाष्यकारांनीं केलेलें वर्णन अत्यंत चटकदार व बहारीचें असून भाष्यकारांच्या सुंदर लेखनशैलीचें ते उत्तम उदाहरण आहे. भर्तृहरीनें लिहिलेल्या महाभाष्यप्रदीपिका टीकेंत त्यांतील कांहीं शब्द उद्धृत करून विस्तार केला आहे.

## १५८. गुणवृद्धिसंज्ञान्हिक ( अधि० १ पा. १ आ. ३ ). वृद्धिरादैच् सूत्राच्या अर्थाविषयीं विचार.

या आन्हिकांत वृद्धि व गुण या शब्दांची व्याख्या दिली आहे व हे गुण व वृद्धि आदेश कोणाला व केव्हां होतात याविषयीं विवेचन केलें आहे. प्रथमतः 'वृद्धिरादैच्' ( सू. १ ) या सूत्रानें आ, ऐ आणि औ यांना सांगितलेली ही वृद्धि संज्ञा 'वृद्धि होते' अशा विधानानें झालेल्या आ, ऐ व औ यांना देण्यांत येते किंवा कोणत्याही ठिकाणच्या आ, ऐ व औ या स्वरांना ती संज्ञा देण्यांत येते याचा विचार करून दोन्ही पक्षीं गुण व दोष दाखविले आहेत व 'आ, ऐ व औ या स्वरांना वृद्धि म्हणावें' या दुसऱ्या पक्षाचें समर्थन केलें आहे व त्यावरील दोषांचें निराकरण केलें आहे. यानंतर भाष्यकारांनीं 'वृद्धिरादैच्' सूत्र हें आ, ऐ व औ यांना वृद्धि सांगणारें सूत्र आहे असें म्हटलें आहे व लोकामध्यें ज्याप्रमाणें व्यवहारावरून संज्ञा कळतात त्याप्रमाणें 'वृद्धिरादैच्' या सूत्राचे बाबतींतही 'आ, ऐ व औ यांना वृद्धि ही संज्ञा आहे हें आचार्यांच्या व्यवहारावरून कळतें' या वचनानें त्यास पुष्टि दिली आहे. प्रस्तुत सूत्रापूर्वी 'अथ संज्ञाः' अशा तऱ्हेचें अधिकारसूत्र घालण्याची कांहीं जरूर नाहीं; कारण पाणिनीसारखे पवित्र ऋषी सूत्रें सांगण्यास बसले असतां त्यांचे मुखांतून एकही निरर्थक शब्द निघावयाचा नाहीं अशी वस्तुस्थिति असल्यामुळें प्रस्तुत सूत्र हें संज्ञासूत्र आहे असेंच सिद्ध होतें. प्रस्तुत सूत्राचा 'वृद्धि शब्दानंतर आ, ऐ, औ यांचा प्रयोग करावा' अथवा 'वृद्धि शब्दाला आ, ऐ, औ हे आदेश होतात किंवा आगम

---

१. याविषयीं महाभाष्यप्रदीपिका लेखी बर्लिन येथील प्रत पृष्ठें ६०-६१ मधील दुसऱ्या आन्हिकाच्या विवरणाचे शेवटीं असलेला पुढील उतारा ध्यानांत घेण्याजोगा आहे:—सोयमक्षरसमाम्नायो वाक्समाम्नायः एतावती वाक्समाम्नाता एतावान् वाग्व्यवहारः पुष्पितः फलितो दृष्टादृष्टफलाभ्यामभ्युदयनिःश्रेयसाभ्यां चन्द्रतारकवत् प्रतिमण्डितः । एतदुक्तं भवति । यथैवेदमव्युच्छिन्नचन्द्रतारकादि एवमस्य वाग्व्यवहारस्य न कश्चित्कर्तास्ति इति अध्ययनं प्रति अपरः प्रोत्साह्यत इति ।

होतात किंवा विशेषण होतात' अशा तऱ्हेचा दुसरा कोणताही अर्थ करणें संभवत नाहीं. आतां 'वृद्धिरादैच्' हें संज्ञासूत्र आहे हें निश्चित; परंतु 'आ, ऐ, औ यांना वृद्धि म्हणतात' अथवा 'वृद्धीला आ, ऐ, औ म्हणतात' यांपैकीं कोणता अर्थ घ्यावा हा संशय आला असतां 'वृद्धि' हा शब्द लहान असल्यामुळें, तो आकृतिवाचक असल्यामुळें, व सूत्रपाठामध्यें तो पुन्हां पुन्हां आढळून येत असल्यामुळें, 'वृद्धि' शब्द हाच संज्ञावाचक आहे असें सिद्ध होतें. वाक्यामध्यें ज्याला संज्ञा द्यावयाची तो प्रथम व संज्ञाशब्द नंतर असें उच्चारण करण्याचा जरी प्रघात असला तरी येथें मंगलवाचक म्हणून वृद्धि शब्द प्रथम उच्चारला आहे. आतां, शब्द हे नित्य आहेत, तरी पण अस्तित्वांत असलेल्याच शब्दांपैकीं अमुक शब्दांना अमुक नांव द्यावें असा संज्ञा देण्याचा उपयोग असतो, संज्ञेमुळें शब्द तयार होत नसतात. नवे शब्द सांगणें हें व्याकरण शास्त्राचें काम नव्हे; तर, कोणते शुद्ध शब्द व कोणते अशुद्ध शब्द ते सांगणें हा व्याकरण शास्त्राचा उपयोग आहे. प्रस्तुत सूत्रामध्यें 'आत्' असें 'त'कार लावून उच्चारण करण्याचा हेतु 'वृद्धीनें आ होतो' असें म्हटलें असतां दोन मात्रा असलेला असाच 'आ' हा स्वर घ्यावा असा असला, व त्याप्रमाणें त्याच तकारामुळें ऐ व औ हेही तसेच घ्यावे असें जरी असलें तरी या सर्व गोष्टी **व्याख्यानानेंच** समजावयाच्या या सिद्धांताचें भाष्यकारांनीं येथें 'व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिः०' हा संकेत पुन्हां सांगून प्रतिपादन केलें आहे.

## १५९. 'इको गुणवृद्धी' सूत्राच्या अर्थाचें विवेचन.

'अदेङ् गुणः' हें सूत्र 'वृद्धिरादैच्' या सूत्रासारखेंच असल्यामुळें भाष्यकारांनीं त्याचें व्याख्यान न करतां 'इको गुणवृद्धी' (सू.३) या सूत्राच्याच व्याख्यानाला आरंभ केला आहे. प्रथमतः इकाला म्हणजे इ उ ऋ ऌ यांनाच गुण व वृद्धि हे आदेश होतात, आ ए इत्यादि स्वरांना तसेंच व्यंजनाना होत नाहींत अशा रीतीनें या सूत्रानें नियम घालून दिला आहे असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे व नंतर ज्या ठिकाणीं वृद्धि अथवा गुण शब्द उच्चारून वृद्धि अथवा गुण सांगितला असतो तेथेंच हे आदेश वर सांगितल्याप्रमाणें इ उ ऋ ऌ या स्वरांना होतात, इतर स्वरांना व व्यंजनांना होत नाहींत असें वृद्धि व गुण हे शब्द अनुवृत्तीनें येत असतां पुन्हां प्रस्तुत सूत्रांत ते शब्द उच्चारण्याचें प्रयोजन म्हणून दाखविलें आहे. यानंतर भाष्यकारांनीं 'इको गुणवृद्धी' हें प्रस्तुत सूत्र व्यवस्थापक सूत्र आहे असें म्हटलें आहे. अमक्याला अमुक आदेश होतो असें म्हटलें असतां तो अन्त्य वर्णाला होतो या अर्थाच्या 'अलोन्त्यस्य' (पा. सू. १।१।५२) या सर्वसामान्य व्यवस्थापक सूत्राशीं प्रस्तुत सूत्राच्या संबंधाचें भाष्यकारांनीं मार्मिक विवेचन केलें आहे व अलोन्त्यस्य या सूत्राचें प्रस्तुत सूत्र हें पूरक आहे अथवा अपवाद आहे, याविषयीं चर्चा करून "गुण होतो किंवा वृद्धि होते अशा शब्दांनीं गुण किंवा वृद्धि ज्या सूत्रामध्यें सांगितलेली असते त्या सूत्रामध्यें 'इकः' हें पद उपस्थित होतें आणि इकालाच तो गुण किंवा ती वृद्धि होते" अशा अर्थाचा स्वतंत्रपदोपस्थितिपक्ष सिद्धान्त म्हणून दिला आहे. या सूत्राच्या अर्थाविषयीं तच्छेष, तदपवाद इत्यादि सात पक्ष मांडून स्वतंत्रपदोपस्थितिपक्षाची मांडणी शब्दकौस्तुभांत भट्टोजी दीक्षितांनीं उत्तम रीतीनें केली आहे.

## १६०. संयोगादिसंज्ञान्हिक ( अ. १ पा. १ आन्हिक ४ ). गुणवृद्धिनिषेधस्थलांविषयीं विवेचन.

मागील आन्हिकामध्यें ‘ गुण होतो ’ किंवा ‘ वृद्धि होते ’ असें विधान करून गुण किंवा वृद्धि सांगितली असल्यास ती इ उ ऋ ऌ यांनाच होते असें सांगितल्यामुळें अष्टाध्यायींत निरनिराळ्या ठिकाणीं जें गुणाचें किंवा वृद्धीचें विधान केलें आहे त्याचा सामान्य निषेध या आन्हिकामध्यें “ न धातुलोप० ” ( १।१।४–६ ) इत्यादि तीन सूत्रांमध्यें सांगितला आहे; व त्यानंतर संयोग, अनुनासिक, आणि सवर्ण या संज्ञांचा विचार केला आहे. धातूच्या भागाचा ज्यामुळें लोप झाला आहे असा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना त्या आर्धधातुक प्रत्ययाच्या निमित्तानें धातूच्या स्वराला गुण किंवा वृद्धि होत नाहीं असें “न धातुलोप०” सू.४) या सूत्रानें सांगितलें आहे. वास्तविक पाहतां या सूत्राची उपयुक्तता फारच थोड्या ठिकाणीं आहे; उलट, या सूत्रामुळें कांहीं ठिकाणीं जेथें गुण किंवा वृद्धि व्हावयास पाहिजे तेथें ती होऊं शकत नाहीं असा दोष येतो म्हणून वार्तिककारांनीं मोजक्या कांहीं विशिष्ट उदाहरणांकरितांच हें सूत्र आहे असें नियमन केलें आहे व नंतर तींही उदाहरणें अन्य रीतीनें साधत असल्यामुळें या सूत्राची जरूर नाहीं असें सांगितलें आहे, व भाष्यकारांनीं तें स्पष्ट केलें आहे. “क्ङिति च” हें सूत्र गुण व वृद्धि यांचा अत्यंत व्यापक रीतीनें निषेध सांगतें. पण त्यांत सुद्धां वार्तिककारांनीं ‘क् किंवा ङ् यांच्या निमित्तानेंच गुण होऊं लागल्यास त्याचा निषेध करावा’ असें सांगितलें आहे व त्यामुळें उपधेला होणाऱ्या गुणाला उपधावर्ण हा निमित्ताच्या अगदीं निकट नसतो अशी जी अडचण येणें शक्य आहे ती दूर केली आहे. परंतु, भाष्यकारांनीं ‘ कार्यकालं संज्ञापरिभाषम् ’ या परिभाषेमुळें लघु उपधेला गुण सांगणाऱ्या सूत्राबरोबरच गुणनिषेध सांगणाऱ्या प्रस्तुत सूत्राचा वाक्यार्थ होत असल्यामुळें व ‘ रोरवीति ’ हें स्वतंत्र उदाहरण वैदिकप्रयोगरूप असल्यामुळें ‘ क् किंवा ङ् यांच्या निमित्तानेंच होणाऱ्या गुणाचा निषेध होतो ’ या वार्तिकाची जरूर नाहीं असें सांगितलें आहे. “इको गुणवृद्धी” (सू. ३) या परिभाषासूत्रामुळें होणाऱ्याच गुणवृद्धींचा क्ङिति च (सू.५) या प्रस्तुत सूत्रानें निषेध होत असल्यामुळें “ अचो ञ्णिति ” इत्यादि सूत्रांनीं सामान्यपणें स्वराला सांगितलेल्या वृद्धीचा प्रस्तुत सूत्रानें निषेध होत नाहीं. यानंतर “ दीधीवेवीटाम् ” (सू.६) या सूत्रांतील दीधी व वेवी हे वेदामध्येंच दिसणारे धातू असल्यामुळें त्यांना गुणनिषेध सांगण्याचें कारण नाहीं, त्याप्रमाणेंच, इट् आगम हा ‘ इ ’ असा ह्रस्व इकार या रूपानें सांगितला असल्यामुळें साहजिकच त्याला गुण न व्हावा असा सूत्रकारांचाच अभिप्राय दिसतो असें सांगून “ दीधीवेवीटाम् ” (सू. ६) या सूत्राचीही जरूर नाहीं असें भाष्यकारांनीं सुचविलें आहे.

## १६१. संयोग, अनुनासिक व सवर्ण या संज्ञांविषयीं विचार.

संयोगसंज्ञा सांगणाऱ्या “ हलोनन्तराः संयोगः ” (सू. ७) या सूत्राचें विवेचन करतांना त्यामध्यें ‘ अनन्तर ’ या शब्दाचा अंतर न ठेवतां उच्चारलेलीं व्यंजनें अथवा ज्यांमध्यें दुसऱ्या प्रकारचा वर्ण नाहीं अशीं व्यंजनें असा दोन्ही प्रकारचा अर्थ घेतां येईल असें सांगून दोन अथवा ज्यास्त व्यंजनांना मिळून संयोग ही संज्ञा व्हावी, प्रत्येक व्यंजनाला स्वतंत्रपणें होऊं नये याकरितां सूत्रांत ‘सह’ हा शब्द घालणें जरूर आहे काय याविषयीं विवेचन भाष्यकारांनीं केलें आहे. सूत्रकारांनीं सह किंवा प्रत्येकं या प्रकारचे शब्द फारच थोड्या ठिकाणीं

घातले आहेत. लोकव्यवहार पाहिला असतां सह किंवा प्रत्येकं असा स्पष्ट शब्द उच्चारला नसतांनाही ‘ प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः ’ या न्यायानें ‘ दश ब्राह्मणा भोज्यन्ताम् ’ असें सांगितलें असतां दहाही ब्राह्मणांना प्रत्येकीं स्वतंत्र भोजन दिलें जातें; त्याप्रमाणेंच ‘ समुदाये वाक्यपरिसमाप्तिः ’ या न्यायानें ‘ गर्गाः शतं दण्ड्यन्ताम् ’ अशी आज्ञा दिली असतां राजे लोकांना संपत्तीची जरूर असतांनाही सर्व गर्गांकडून मिळून शंभरच कार्षापण घेतले जातात. सूत्रांमध्येंही सह किंवा प्रत्येकं असा स्पष्ट शब्द उच्चारला नसल्यास वरील न्यायांचा अवलंब करून, व “ शिष्ट लोकांनीं केलेल्या व्याख्यानावरून संशयस्थलीं निर्णय करावा ” या अर्थाच्या “ व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिः० ” या वैयाकरण–संकेतास अनुसरून ‘ दोन किंवा अधिक व्यंजनांना मिळूनच संयोगसंज्ञा होते ’ असा भाष्यकारांनीं निर्णय दिला आहे; व पुष्कळ व्यंजनें जवळजवळ आलीं असतां ही संयोगसंज्ञा त्यांपैकीं कोणत्याही दोहोंना, तिघांना अथवा सर्वांना होऊं शकते प्रत्येकाला निराळी होत नाहीं असें म्हटलें आहे. संयोग संज्ञेनंतर भाष्यकारांनीं अनुनासिक संज्ञेचा विचार केला आहे ( सू. ८ ), व मुख आणि नासिका या दोहोंमधून उच्चारलेल्या वर्णाला अनुनासिक म्हणावें असा स्पष्ट निर्णय दिला आहे. तसेंच, अनुनासिक या संज्ञेमुळें वर्णांना अनुनासिकत्व द्यावयाचें, व अनुनासिकत्व असलेल्याच वर्णाला अनुनासिक ही संज्ञा द्यावयाची असा इतरेतराश्रय दोष दिसून येतो त्याचें निराकरण ‘ शब्द हे नित्य असल्यामुळें अनुनासिक वर्ण हे स्वतःसिद्धच आहेत, ते नवीन उत्पन्न केले जात नाहींत, संज्ञेनें फक्त ते तसे ओळखिले जातात’ अशा नेहमींच्याच प्रतिपादनपद्धतीनें केलें आहे.

## १६२. सावर्ण्यविचार.

अनुनासिक संज्ञेनंतर भाष्यकारांनीं सवर्ण संज्ञेचा विचार केला आहे (सू. ९). ज्या वर्णांचें आस्य म्हणजे उच्चारणाचें स्थान व साधन, त्याप्रमाणेंच प्रयत्न म्हणजे आभ्यन्तर प्रयत्न हे सारखे असतात ते सवर्ण समजावे अशी ‘ सवर्ण ’ संज्ञेची व्याख्या भाष्यकारांनीं दिली आहे. सूत्रामधील ‘ आस्य ’ हा शब्द यत्–प्रत्ययान्त ( आस्ये भवमास्यं ) घेऊन आस्य शब्दाचा अर्थ आस्यामध्यें म्हणजे मुखामध्यें उत्पन्न होणारें ( स्थान तसेंच करण ) असा केला आहे; त्याप्रमाणेंच यत्नस्य प्रारम्भः असा प्रयत्न शब्दाचा अर्थ करून प्रयत्न शब्दानें फक्त आभ्यन्तर प्रयत्नच घेतले जातात व बाह्य प्रयत्न निराळे असले तरी चालतात असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. यानंतर ऋ व ऌ या स्वरांचें सावर्ण्य सांगावें म्हणजे ऋकार उच्चारला असतां ऌकार घ्यावा असें वार्तिककारांचें म्हणणें सांगून ऋ व ऌ यांचा सवर्णदीर्घ ॠ असा संधिकार्यानें व्हावा असा सावर्ण्याचा उपयोग भाष्यकारांनीं दिला आहे. पाणिनीच्या प्रक्रियेंत दीर्घ ॡ नाहीं तथापि ज्यामध्यें दोन रेफ आहेत असा ॠ व ज्यामध्यें दोन लकार आहेत असा ॡ असे दोन मात्रा असलेले ॠ व ॡ ऋकाराच्या पुढें ऋ किंवा ऌ आला असतां सवर्णदीर्घ म्हणून करावे असें वार्तिककारांनीं ‘अकः सवर्णे दीर्घः’ या सूत्राचे बाबतींत वैकल्पिक विधान केलें असल्यामुळें ऋ व ऌ यांचें सावर्ण्य सांगण्याची जरूर नाहीं या शंकेचें भाष्यकारांनीं निराकरण केलें आहे, इतकेंच नव्हे तर सावर्ण्य सांगणें हें आवश्यक आहे व तें सांगितलें असतां द्विमात्रिक दीर्घांचें निराळें विधान करावयास नको असें म्हटलें आहे. आतां ऋ व ऌ यांचें सावर्ण्य घेतल्यास ऌकाराचें व्यवधान असतांनाही नकाराला णकार प्राप्त झाला असतां होऊं लागेल या दोषाचें निराकरण ‘ चुटुतुल० ’ व ‘ त्रिभिश्च मध्यमैर्वर्गैः० ’

या जुन्या वैयाकरणांच्या वार्तिकांमुळेंच होत आहे असें म्हटलें आहे. यानंतर "नाज्झलौ" (सू. १०) या सूत्रानें स्वर व व्यंजनें यांमध्यें सावर्ण्य असूं शकत नाहीं असें म्हटलें असतांनाही स्थान व प्रयत्न समान असल्यामुळें 'श'कार हा 'इ'कारच आहे असें समजून दोष येणें शक्य कसें आहे तें सांगून स्वरांचा प्रयत्न विवृत आणि श ष स ह यांचा प्रयत्न ईषद्विवृत असल्यामुळें तो दोष दूर होतो असें भाष्यकारांनीं दाखविलें आहे. शिवाय, 'वाक्यापरिसमाप्ति' या न्यायानें वर्णांचा उपदेश, इत्संज्ञा, प्रत्याहार, सवर्णसंज्ञा व सवर्णग्रहण हीं सर्व कार्यें क्रमानें पण सर्व एकामागून एक झाल्यावरच व्यवहार चालू होतो अशी वस्तुस्थिति असल्यामुळेंही 'श'-काराला 'इ'कार समजतां येणार नाहीं असेंही भाष्यकारांनीं म्हटलें आहे.

## १६३. प्रगृह्यादिसंज्ञाह्निक (अ. १ पा. १ आह्निक ५). प्रगृह्यसंज्ञेचें विवेचन.

या आन्हिकामध्यें प्रगृह्य संज्ञा (सू. ११-१९), घु संज्ञा (सू. २०), घ संज्ञा (सू. २२), संख्या संज्ञा (सू. २३--२५), व निपात संज्ञा (सू. २६) यांचा विचार केला आहे. या सर्व संज्ञा सूत्रकारांच्या पूर्वींच्या वैयाकरणांनीं कांहीं विशिष्ट शब्दांना सांगितलेल्या असाव्या. घु आणि घ यांशिवाय ह्या सर्व संज्ञा अन्वर्थही आहेत. या संज्ञासूत्रांच्या मध्येंच 'आद्यन्तवदेकस्मिन्' (सू. २१) हें सूत्र जरासें अप्रासंगिक दिसतें; परंतु संधिकार्यानें होणारे गुण व वृद्धि यांसारखे एकादेश झाल्यानंतर एकादेश हा पूर्वींच्या शब्दाच्या शेवटचा वर्ण समजावयाचा किंवा पुढील शब्दाचा पहिला वर्ण समजावयाचा अशी शंका आली असतां अशा ठिकाणीं दोनही प्रकारचे प्रघात आहेत हें सांगण्याकरितां हें सूत्र केलें आहे. प्रगृह्य ही संज्ञा जो स्वर संधिकार्य प्राप्त झालें असतांनाही कायम ठेविला जातो त्याला दिलेली आहे. द्विवचनाचीं ईकारान्त, ऊकारान्त व एकारान्त रूपें व कांहीं विशिष्ट शब्दस्वरूपें अर्थाविषयीं अडचण पडूं नये म्हणून वेदामध्यें व भाषेमध्यें संधिकार्य केल्याशिवाय उच्चारलीं जातात; त्यांना ही प्रगृह्य संज्ञा पूर्वाचार्यांनीं दिली आहे. 'ईदूदेत्०' (सू. ११) या सूत्रामध्यें ई, ऊ व ए यांचे पुढें सूत्रकारांनीं तकार उच्चारला आहे. त्याविषयीं विवेचन करतांना भाष्यकारांनीं प्रस्तुत सूत्राच्या अर्थाचे तीन प्रकार (१) ई, ऊ व ए अशा स्वराच्या रूपांचेंच द्विवचन (म्हणजे द्विवचनवाचक प्रत्यय) प्रगृह्य होतो, (२) ई, ऊ व ए ज्याच्या शेवटीं आहेत असें द्विवचन (म्हणजे द्विवचनप्रत्यय) प्रगृह्य होतो, (३) ई, ऊ अथवा ए ज्याच्या शेवटीं आहेत व द्विवचनप्रत्ययही ज्याच्या शेवटीं आहे असा शब्द प्रगृह्य होतो, अशा रीतीनें देऊन त्यांपैकीं मधला प्रकार कायम केला आहे. 'अदसो मात्' (सू.१२) या सूत्रानें अदस् शब्दाच्या रूपांमध्यें मकारापुढील ई, ऊ व ए हे स्वर प्रगृह्य होतात असें सांगितलें आहे. येथें अदस् शब्दांतील 'द'काराला 'म'कार सांगणारें त्रिपादींतील 'अदसोसे:०' (८।२।८०) सूत्र प्रकृत सूत्राला दिसत नसल्यामुळें प्रगृह्य संज्ञा करण्यास येणारी अडचण प्रगृह्य संज्ञेला 'म'कार हा निमित्तच असल्यामुळें मकार झालेला दिसतो असें प्रतिपादन करून भाष्यकारांनीं दूर केली आहे. शिवाय, कार्यकालपक्षीं "अदसो मात्" (१।१।१२) व "अदसोसेर्दादु दो मः" (८।२।८०) या सूत्रांचा वाक्यार्थ एकदम होत असल्यामुळेंही ही अडचण येत नाहीं असें म्हटलें आहे. "शे" (सू. १३) या सूत्रांत विभक्तिप्रत्ययांचे जागीं होणारा शे (ए) हा अर्थयुक्त विभक्तिप्रत्यय घ्यावयाचा असल्यामुळें 'काशे', 'वंशे' वगैरे ठिकाणच्या अर्थरहित 'शे' याला प्रगृह्य संज्ञा होत नाहीं. शेवटीं, 'निपात एकाजनाङ्' 'ओत' व 'उञः' (सू. १४,१५,१७) या सूत्रांमध्यें एकच स्वर

अशा स्वरूपाच्या निपाताला प्रगृह्य संज्ञा सांगितली आहे; व " ईदूतौ च०" (१८) या सूत्रानें सप्तम्यर्थी ईकारान्त अथवा ऊकारान्त शब्दाला प्रगृह्य संज्ञा सांगितली आहे. अर्थात्, असे शब्द वेदामध्येंच मिळतात.

## १६४. घु संज्ञेविषयीं विवेचन.

'दाधा घ्वदाप्'(सू.२०) या सूत्रानें दा व धा अशा दिसणाऱ्या धातूंना 'घु' ही संज्ञा सांगितली आहे. दा धातू ,धा धातू व शेवटच्या ए अथवा ऐ यांना आ आदेश झाल्यावर ज्यांचीं दा व धा अशीं रूपें होतात अशा धातूंनाही 'घु' ही संज्ञा द्यावी असें भारद्वाजीय वैयाकरणांचें मत भाष्यामध्यें दिलें आहे. त्यावरूनही जुन्या वैयाकरणांनीं दिलेली ही 'घु' संज्ञा असावी असें दिसतें. अन्वर्थक नसलेल्या टि घु भ घ या एकाक्षरी संज्ञा विशिष्ट शब्दांचें प्रथम अथवा अन्त्य अक्षर घेऊन प्रतिपादनलाघवाकरितां पूर्व वैयाकरणांनीं केल्या असाव्या. उदाहरणार्थ—धातु यांतील धू वर्ण घेऊन धुष्- ही संज्ञा, काल यांतील ल अक्षर घेऊन 'ल'कार व त्यालाच इत् वर्ण जोडून लट् लिट् इत्यादि संज्ञा, लघु यांतील अन्त्याक्षर घेऊन घु ही संज्ञा; तशीच दीर्घ यांतील अन्त्याक्षर घेऊन घ ही संज्ञा. घु ही संज्ञा 'दा' व 'धा' अशा अर्थयुक्त शब्दस्वरूपाला द्यावयाची आहे, दृ व धृ यांना णिच् पुढें असतांना वृद्धि झाल्यानंतर दार्, व धार् अशीं शब्दस्वरूपें होतात त्यांपैकीं 'दा' व धा या अर्थरहित अवयवांना द्यावयाची नाहीं असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. या प्रसंगानें आगम म्हणजे काय हा प्रश्न विचाराकरितां घेऊन आगम म्हणजे निराळा येऊन जोडला जाणारा भाग हा अर्थ जरी व्युत्पत्तिसिद्ध असला तरी तो घेतां येत नाहीं; कारण शब्द हे नित्य असल्यामुळें त्यांच्यांत विकृतीची कल्पनाच करतां येत नाहीं; म्हणून आगम याचा अर्थ आदेशाप्रमाणेंच एका शब्दाऐवजीं दुसऱ्या शब्दाचा प्रयोग असें भाष्यकारांनीं स्पष्ट म्हटलें आहे व त्याच्या समर्थनाकरितां

" सर्वे सर्वपदादेशा दाक्षीपुत्रस्य पाणिनेः ।
एकदेशविकारे हि नित्यत्वं नोपपद्यते "

हा पूर्ववैयाकरणांचा श्लोक उद्धृत केला आहे.

## १६५. आद्यन्तवद्भाव व व्यपदेशिवद्भाव.

आद्यन्तवदेकस्मिन् ( सू. २१ ) या सूत्रानें एकालाच तदादि तसेंच तदन्त – उदाहरणार्थ इ धातूलाच इकारादि तसेंच इकारान्त— म्हणतां येतें असें सांगितलें आहे. वार्तिककारांनीं या सूत्राची जरूर आहे इतकेंच नव्हे तर याच्यापेक्षांही सामान्य रीतीनें म्हणजे 'मुख्यार्थानें होणारीं कार्यें गौणार्थ घेऊन संभवनीय असलीं तर व्हावीं' या अर्थाचा व्यपदेशिवद्भावच आद्यन्तवद्भावा-ऐवजीं सांगावा असें म्हटलें आहे व 'इ' धातूला एकाच् म्हणून द्वित्व व्हावें, स् या प्रत्ययाला प्रत्ययाचा अवयव म्हणून षत्व व्हावें यांसारखे उपयोग दाखविले आहेत; त्यानंतर लोकामध्यें या गोष्टी अनुभवांतच येत असल्यामुळें व्यपदेशिवद्भावाचें मुद्दाम विधान करण्याची जरूर नाहीं असेंही वार्तिककारांनीं म्हटलें आहे व भाष्यकारांनीं एकच मुलगा असल्यास त्यालाच ज्येष्ठ

मुलगा म्हणतात, तसेंच एकच वर्ण असला तरी तो सुबन्त असल्यास त्यालाच पद म्हणतात अशीं उदाहरणें स्पष्टीकरणार्थ दिलीं आहेत. शिवाय, ज्याला पूर्वी कांहीं नाहीं तो आदि व पुढें कांहीं नाहीं तो अन्त अशी आदि आणि 'अन्त' या शब्दांची व्याख्या करून या सूत्राची जरूर नाहीं असेंही वार्तिककारांनीं म्हटलें आहे. भाष्यकारांनीं मात्र या ठिकाणीं 'गोनर्दीय म्हणतो' —असा उल्लेख करून 'दुसरा कोणी तत्सदृश असतांनाच पहिला व शेवटचा हे शब्द उपयोगांत आणले जातात' असें गोनर्दीयांचें म्हणून आपलें स्वतःचें मत स्पष्ट सांगून प्रस्तुत सूत्र आवश्यक आहे असें प्रतिपादन केलें आहे. शेवटीं, वार्तिककारांनीं या सूत्राचीं प्रयोजनें सांगितलीं आहेत व भाष्यकारांनीं प्रातिपदिक, प्रत्यय अथवा धातु एकवर्णात्मक असूनही त्यालाच आदि किंवा अंत मानून ज्या ठिकाणीं कार्यें झालेलीं आहेत अशीं उदाहरणेंही दिलीं आहेत.

## १६६. घ संज्ञा, संख्या संज्ञा व निष्ठा संज्ञा यांविषयीं विचार.

"तरप्तमपौ घः" (सू. २२) या सूत्रामध्यें तरप् व तमप् या प्रत्ययांना घ संज्ञा सांगितली आहे. ही संज्ञाही जुन्या वैयाकरणांची असावी. सूत्रामध्यें प् हा इत् वर्ण जोडून उच्चारण केलें असल्यामुळें तर या शब्दानें येथें पाणिनीनें सांगितलेला तरप् प्रत्यय घ्यावयाचा, नदीतर वगैरे ठिकाणचा 'तर' शब्द घ्यावयाचा नाहीं असें येथें वार्तिककारांनीं प्रतिपादन केलें आहे. यानंतर (सू. २३-२६) संख्यासंज्ञा व षट्संज्ञा हा संख्या संज्ञेचाच एक प्रकार यांचें विवरण चालूं करून 'कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमे कार्यसंप्रत्ययः' या न्यायानें बहु, गण वगैरे शब्दांना सांगितलेली कृत्रिम संख्यासंज्ञाच प्रथमतः ध्यानांत येईल व एक द्वि त्रि या स्वाभाविक संख्यावाचक शब्दांना संख्या ही संज्ञा होणार नाहीं म्हणून सूत्रामध्यें आणखी एक 'संख्या' शब्द घालणें जरूर आहे या वार्तिककारांच्या म्हणण्याला भाष्यकारांनीं उत्तर दिलें आहे व संदर्भ किंवा विशिष्ट उपयोग जेथें मनांत असतो तेथेंच कृत्रिम संज्ञा प्रथम ध्यानांत येते इतर ठिकाणीं स्वाभाविक अर्थच प्रथम ध्यानांत येतो, तेव्हां येथें दोन्ही प्रकारच्या संख्या मनांत येऊं शकतील असें म्हटलें आहे. शिवाय, संख्या ही मोठी संज्ञा दिली गेल्यामुळें ती अन्वर्थक घेणें योग्य आहे असाही भाष्यकारांनीं आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ शेरा मारला आहे. यानंतर अध्यर्ध, अर्धपूर्व, अधिक या शब्दांनाही संख्या म्हटलें असतां दुसरीकडे सूत्रांत ते घालण्याची जरूर नाहीं; तसेंच, बहु वगैरे शब्दही प्रस्तुत सूत्रांत नसते घातले तरी चाललें असते, ज्ञापकानेंच त्यांना संख्या संज्ञा आहे असें सिद्ध होतें, असेंही येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. 'ष्णान्ता षट्' (सू. २४) या सूत्रांत उपदेशीं षकारान्त व नकारान्त अशी संख्या घेणें जरी इष्ट असलें तरी 'उपदेशे' असा शब्द सूत्रांत घालण्याची जरूर नाहीं: संनिपातपरिभाषेमुळें व 'अष्टनो दीर्घात्' (६।१।१६८) या सूत्रांतील दीर्घ या शब्दावरून काढलेल्या ज्ञापकानेंच इष्ट उदाहरणें साधतील. शेवटीं 'क्तक्तवतू निष्ठा' (सू. २६) या सूत्रानें सांगितलेल्या निष्ठा संज्ञेचें विवरण करून क् या अनुबंधाचा लोप झाला तरी तो अनुबंध लावला होता या खुणेमुळें अनुबन्धसहित अशा क्त व क्तवतु या प्रत्ययांना निष्ठा संज्ञा करतां येईल; लोत, गर्त वगैरे शब्दांतील उणादि 'त' प्रत्ययाला करतां येणार नाहीं असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे व आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ कावळा उडून गेला तरी कावळा बसला आहे तें घर अशा रीतीनें दाखविलेलें घर आठवणींत राहतें हा दृष्टान्त दिला आहे.

## १६७. सर्वनामाव्ययादिसंज्ञान्हिक ( अ. १. पा. १ आन्हिक ६ ). सर्वनामसंज्ञेविषयीं विवेचन.

या आन्हिकामध्यें सर्वनाम, अव्यय, सर्वनामस्थान आणि विभाषा या संज्ञांचा विचार केला आहे. सूत्रांतील ' सर्वादि ' हा शब्द तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि समासानें साधिला असल्या-मुळें सर्वनाम ही संज्ञा सर्वादि गणामधील सर्व या शब्दाला व त्याचे नंतर उच्चारलेल्या इतर सर्व शब्दांना द्यावयाची आहे असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. सर्वनाम हा निपातन शब्द असल्यामुळें त्यांतील 'न'काराला 'ण'कार न होतां सर्वनाम हाच शुद्ध शब्द समजावावयाचा आहे. सूत्रकार जेव्हां एकादें निपातन सांगतात तेव्हां निपातनांत प्राप्त झालेल्या इतर विधींचा प्रति-षेध होत असल्यामुळें ते विधी करतांच येत नाहींत व ते विधी करून साधलेला शब्द अशुद्धच होतो. ' सर्व वगैरे सर्वनामशब्द कांहीं पदार्थांची अथवा व्यक्तींची संज्ञा असतील तर किंवा इतर शब्दांना विशेषण म्हणून ते वापरले जात असतील तर सर्वनामांना उद्देशून सांगितलेलीं कार्यें त्यांना होत नाहींत ' असें वचन करावें असें वार्तिककारांनीं सांगितलें आहे. भाष्यकारांनीं मात्र असें वचन करण्याची जरूर नाहीं असें म्हटलें आहे व ' पूर्वपरावर० ' ( १।१।३४ ) या सूत्रांतील ' असंज्ञायाम् ' या पदामुळें सर्व, विश्व वगैरे शब्द संज्ञावाचक असल्यास त्यांना सर्वनामसंज्ञा होत नाहीं; तसेंच ' अनुपसर्जनात् ' ( ४।१।१४ ) या सूत्राचा प्रस्तुत सूत्राशी संबंध केला जाईल त्यामुळेंही संज्ञारूप व समासांत असून विशेषण झालेल्या सर्व, विश्व इत्यादि शब्दांना सर्वनामसंज्ञेचा प्रतिबंध होईलच हीं कारणें दिलीं आहेत. तसेंच, 'सर्वनाम' या शब्दाचा योगार्थ सर्वांचें नाम असा घेतला असतां संज्ञा व उपसर्जन यांना सर्वनाम म्हणतांच येणार नाहीं; शिवाय, सर्वनाम ही मोठी संज्ञा अन्वर्थक समजल्यामुळेंसुद्धां संज्ञाशब्दांना सर्वनामसंज्ञा लागू होण्याची अतिव्याप्ति टळेल असेंही त्यांनीं म्हटलें आहे. यानंतर 'विभाषा दिक्समासे०'(सू.२८) या सूत्रांतील 'समासे' आणि 'बहुव्रीहौ' या पदांच्या प्रयोजनाविषयीं विवेचन करून दक्षिणदक्षिणस्यै यासारखा द्विर्वचनरूप लाक्षणिक बहुव्रीहि येथें घ्यावयाचा नाहीं; तसेंच, समासांमध्यें असलेल्या बहुव्रीहींमधील अन्तर वगैरे शब्दांना सर्व-नामकार्यें होत नाहींत असेंही येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. यानंतर 'न बहुव्रीहौ' (सू. २९) या सूत्राच्या विवेचनास आरंभ करून वास्तविक पाहतां या सूत्राची जरूर नाहीं असा भाष्यकारांनीं निर्णय दिला आहे: प्रथमतः, बहुव्रीहि समासामध्यें सर्वनाम व संख्या यांना पूर्वनिपात होतो असें वार्तिककारांनीं विधान केल्यामुळें सर्वनामशब्द समासाचे शेवटीं येण्याचा संभवच नाहीं व जरी कांहीं ठिकाणीं संभव दिसून आला तरी समासांतील सर्वनामशब्द उपसर्जन असल्यामुळें त्याला सर्वनामकार्यें होणार नाहींत. आतां, समास केल्यानंतर होणाऱ्या बहुव्रीहि संज्ञेपेक्षां सर्व-नामसंज्ञा अंतरंग असल्यामुळें तसेंच प्रक्रियावाक्यें ही समासासारखींच वाक्यें समजलीं गेल्या-मुळें बहुव्रीहि समासांतील सर्वनाम शब्दांना सर्वनामकार्यें होऊं लागतील तीं होऊं नयेत म्हणून ' न बहुव्रीहौ ' हा निषेध जरूर आहे असें जरी असलें तरी सर्वनाम-स्वर व अकच् प्रत्यय हे बहुव्रीहि समासांतील सर्वनामांना करणें इष्ट आहे असें गोनर्दीयाचें मत आहे; आणि स्वर व अकच् होण्याला ' न बहुव्रीहौ ' हें सूत्र प्रतिबंध करतें; एकंदरींत न बहुव्रीहौ या सूत्राची जरूर नाहीं. 'तृतीयासमासे'(सू. ३०) या सूत्रापासून 'अन्तरं बहिर्योगोप०' (सू. ३६) या सूत्रापर्यंत ज्या इतर शब्दांना विवक्षित अर्थीं व विवक्षित प्रसंगीं सर्वनामसंज्ञा होते असे कांहीं शब्द दिले आहेत. समासाच्या प्रक्रियावाक्यामध्यें ही सर्वनामसंज्ञा होते असा निष्कर्ष 'असमासे निष्कादिभ्यः' ( ५।१।२० ) या सूत्रांतील ' असमासे ' या पदावरून निघतो. या ठिकाणीं पाणिनीनें सूत्रपाठ

पूर्वी रचिला किंवा गणपाठ पूर्वी रचिला याविषयीं प्रासंगिक विवेचन करून गणपाठ पूर्वी रचिला असावा; तसेंच सर्वादि गणामध्यें त्यद् तद् वगैरे आठ सर्वनामांचे पूर्वी पूर्व पर वगैरे शब्द घातले असावे असेंही वार्तिककारांच्या वचनांवरून दिसून येतें असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे.

## १६८. अव्ययसंज्ञेविषयीं विवेचन.

'स्वरादिनिपातमव्ययम्' (सू. ३७) या सूत्रापासून 'अव्ययीभावश्च' (सू. ४१) या सूत्रापर्यंत अव्ययसंज्ञा ज्यांना होते ते शब्द दिले आहेत. येथें निपात व अव्यय या दोन निर-निराळ्या संज्ञा सांगण्याचें कारण काय व दोहींमध्यें फरक काय आहे यांविषयीं विचार करून लिंग व संख्या यांनीं युक्त अशा घट वगैरे अर्थाला द्रव्य म्हणतात; तसेंच च, वा इत्यादि शब्दांपासून समजल्या जाणाऱ्या लोकामध्यें लिंगसंख्यारहित अशा संबंध, विकल्प, समुच्चय इत्यादि अर्थांनाही द्रव्य म्हणतात; म्हणून द्रव्यवाचक शब्दापासून जरी लिंगसंख्यासहित किंवा लिंगसंख्यारहित दोन्ही प्रकारच्या अर्थांचा बोध झाला तरी अव्यय शब्दांपासून मात्र स्वभावतःच लिंगसंख्यारहित अशाच पदार्थांचा बोध होतो व त्यामुळेंच त्यांना लिंगवाचक व संख्यावाचक प्रत्यय लागत नाहींत असें 'अलिङ्गमसंख्यमिति वा' या वार्तिकांत वार्तिककारांनीं सांगितलें आहे. तसेंच कोणत्याही विशिष्ट विभक्तीचा अर्थ अव्यय शब्दांमध्यें नसल्यामुळें अव्ययांना विभक्तीचे प्रत्ययही न लागणें शक्य आहे असें भाष्यककारांनीं सांगितलें आहे; व हीच गोष्ट 'अव्ययादाप्सुपः'(२।४।८२) या सूत्रावरून दिसून येते असें म्हणणें शक्य आहे. वास्तविक पाहतां 'अव्ययादाप्सुपः' (२।४।८२) या सूत्रानें लिंगवाचक, वचनवाचक व विभक्तिवाचक प्रत्ययांचा लुक् होतो असें सांगितलें असल्यामुळें अव्ययांना लिंग-वाचक व विभक्तिवाचक प्रत्यय लागतात असें सूत्रकारांचें मत असावें असें मात्र दिसतें. स्वर्, वा यांसारख्या अव्ययांचे स्वर्ग, विकल्प वगैरे जे पर्याय शब्द त्यांमध्यें लिंगार्थ असल्यामुळें, त्या-प्रमाणेंच तत्र ततः यांसारख्या अव्ययांचे तस्मिन् तस्मात् इत्यादि जे पर्याय शब्द त्यांमध्यें विभ-क्तीचा अर्थ असल्यामुळें अव्ययांतही लिंगार्थ व विभक्त्यर्थ अंतर्भूत असतो असा सूत्रकारांचा 'अव्ययादाप्सुपः' हें सूत्र करण्यांत अभिप्राय असावा. ज्या अव्ययांच्या अर्थामध्यें लिंगाची कल्पना करतां येत नाहीं त्यांचे बाबतींत 'सामान्ये नपुंसकम्' यानें नपुंसकलिंगी प्रत्ययाचें विधान व 'प्रातिपदिकार्थ०' यानें प्रातिपदिक या अर्थी प्रथमा विभक्तीचें आणि द्वित्व व बहुत्व या कल्पनांच्या अभावीं प्रथमा विभक्तीच्याही एकत्ववाचक सु प्रत्ययाचें विधान पाणिनीला अभिप्रेत असावें. "सदृशं त्रिषु लिङ्गेषु०" या कारिकेंतील 'सदृशम्' व 'न व्येति' या पदांवरूनही 'लिंगामुळें, विभक्तीमुळें किंवा वचनामुळें अव्ययांच्या रूपामध्यें कोणताही फरक होत नाहीं, अव्ययांना लिंगवाचक विभक्तिवाचक व वचनवाचक प्रत्यय लागण्यास कांहीं हरकत नाहीं त्यांचा लोप होतो ही गोष्ट निराळी' असेंच सूचित होतें. याच प्रकरणामध्यें कुम्भकारेभ्यः, नगरकारेभ्यः इत्यादि ठिकाणीं एकारान्त प्रकृतीला 'कृन्मेजन्तः' (१।१।३९) या सूत्रानें अव्यय संज्ञा होत नाहीं याला कारण "संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य" ही परिभाषा सांगणें अत्यंत जरूर आहे असें म्हणून तिचीं अनेक उदाहरणें वार्तिककारांनीं दिलीं आहेत; व ही परिभाषा घेतली असतां कांहीं ठिकाणीं जे दोष येतात त्यांचें निराकरण करण्याकरितां कांहीं उपाययोजना करावी असें म्हटलें आहे. यानंतर 'सर्वमानस्थान' या संज्ञेचें लक्षण दिलें आहे व प्रसंगानें 'अनपुंसकस्य' हा समास असूर्यंपश्य, अश्राद्धभोजी, अपुनर्गेय यांसारखा आहे व

त्याचा अर्थ 'नपुंसकलिंगामध्यें सुट् म्हणजे सु औ इत्यादि जे पहिले पांच प्रत्यय त्यांना सर्वनामस्थानसंज्ञा होत नाहीं' असा दिला आहे. ही सर्वनामस्थानसंज्ञासुद्धां अन्वर्थ असावी. आन्हिकाचे शेवटीं पाणिनिसूत्रांमध्यें अनेक वेळां आढळून येणाऱ्या 'विभाषा' या शब्दाच्या अर्थाचें विवेचन करून 'न वेति विभाषा' (१।१।४४) या सूत्रांतील इति शब्दामुळें 'न' आणि 'वा' या पदांचा लोकामध्यें जो निषेधविकल्प हा अर्थ तोच विभाषा शब्दाचा अर्थ समजावा असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे व शब्दनित्यत्वपक्षीं तसेंच शब्दानित्यत्वपक्षीं विभाषा शब्दाच्या अर्थाचें विवेचन करून 'अप्राप्ते विभाषा' 'प्राप्ते विभाषा' व 'उभयत्र विभाषा' यांचीं उदाहरणें दिलीं आहेत.

## १६९. आगमादेशादिव्यवस्थान्हिक (अ. १ पा. १ आन्हिक ७) आगमस्वरूपविवेचन.

या आन्हिकामध्यें प्रथम संप्रसारणसंज्ञेचा विचार केला आहे व त्यानंतर संज्ञासूत्रांचा वाक्यार्थ करण्याकरितां उपयुक्त व आवश्यक असे नियम सूत्रकारांनीं दिले आहेत. या नियमांना व सूत्रांवरून अनुमानानें निघणाऱ्या यांसारख्या नियमांना परिभाषा ही अन्वर्थक संज्ञा मागाहून देण्यांत आली. संप्रसारण संज्ञा ही 'यकाराच्या जागीं इकार होतो' अशी वाक्यसंज्ञा आहे किंवा 'यकाराच्या जागीं होणाऱ्या इकाराला संप्रसारण म्हणावें' अशी वर्णसंज्ञा आहे याविषयीं दोनही तऱ्हा विवक्षित आहेत या वार्तिककारांच्या मताचें भाष्यकारांनीं येथें विवेचन केलें आहे व या दोनही प्रकारांवरील दोषांचें निराकरण केलें आहे. शब्द अनित्य आहेत या मतीं संप्रसारणआदेश व संप्रसारणसंज्ञा यांचे बाबतींत येणारा अन्योन्याश्रय दोष टाळण्याकरितां संप्रसारण ही भाविसंज्ञा घ्यावी असेंही भाष्यकारांनीं म्हटलें आहे व 'या सुताची साडी वीण' हा लौकिक दृष्टान्त देऊन सुंदर शब्दांमध्यें आपल्या म्हणण्याचें स्पष्टीकरण केलें आहे. यानंतर 'आद्यन्तौ टकितौ' (सू. ४६) या सूत्राचें विवरण करतांना भाष्यकारांनीं शब्द नित्य असल्यामुळें त्यांना आगम म्हणजे जोड कसा लावतां येईल ही लौकिक अडचण उपस्थित करून ज्या ज्या ठिकाणीं पाणिनीनें

१. सर्वनामस्थान ही पूर्व वैयाकरणांनीं दिलेली महासंज्ञा अन्वर्थक असल्यास ती कोणत्या रीतीनें अन्वर्थक आहे याचा खुलासा कोठेंही केलेला आढळत नाहीं. सर्वनामस्थान हा बहुव्रीहि समास घेतल्यास 'सर्वनाम आहे स्थान ज्यांचें असे' म्हणजे सर्वनामाऐवजीं उपयोगांत आणलेले असा अर्थ होणें शक्य आहे. राम, देव यांसारखे शब्द घेतल्यास द्वितीया-बहुवचनानंतरच्या शब्दस्वरूपांमध्यें राम + आन्, राम + एन, राम + आभ्याम् अशा रीतीनें राम हा नामावयव पहिला व (इदम् शब्दाला अ आदेश होतो ही विचारसरणी घेऊन अ हें सर्वनाम मानिल्यास) आन्, एन, आभ्याम् या स्वरूपाचा सर्वनामावयव दुसरा अशी कल्पना करणें शक्य आहे. अशी कल्पना केल्यास रामान्, रामेण इत्यादि रूपें राम हें नाम, अ हें सर्वनाम व आन् एन इत्यादि प्रत्यय या तिघांची मिळून झालेलीं आहेत असें मानितां येतें. रामः, रामौ इत्यादि पांच ठिकाणीं मात्र राम हें नाम व त्यानंतर स्, औ, अस् वगैरे प्रत्यय मिळून दोनच अवयव दिसतात. येथें 'अ' असा सर्वनामस्वरूप अवयव दिसत नाहीं; तरी पण प्रत्यय हा दुसरा अवयव सर्वनामाचेंही काम करीत असल्यामुळें त्याला 'सर्वनामस्थान' प्रत्यय म्हणजे सर्वनामाच्या जागीं असलेला प्रत्यय असें म्हणतां येणें शक्य आहे.

२. "तद्यथा। कश्चित् कंचित्तन्तुवायमाह। अस्य सूत्रस्य शाटकं वयेति। स पश्यति यदि शाटको न वातव्योऽथ वातव्यो न शाटकः, शाटको वातव्यश्चेति विप्रतिषिद्धम्। भाविनी खल्वस्य संज्ञाभिप्रेता स मन्ये वातव्यो यस्मिन्नुते शाटक इत्येतद्भवतीति"। (महाभाष्य भाषांतर भाग १ पृ. २७९–२८० पहा.)

आगम सांगितला आहे त्या त्या ठिकाणीं 'अनागमकानां सागमका आदेशाः' म्हणजे आगमरहित अशा शब्दाचे ठिकाणीं आगमसहित शब्द हा शुद्ध आहे अशी कल्पना करावी असें तिचें निवारण केलें आहे. शिवाय, प्रस्तुत 'आद्यन्तौ टकितौ' हें संज्ञासूत्र न घेतां परिभाषासूत्र घेतल्यास ज्या ठिकाणीं ट् अथवा क् ज्याचा इत् आहे असा शब्द उच्चारला असेल तेथें या सूत्रानें व्यवस्था होत असल्यामुळें कांहींच दोष येणार नाहीं असेंही भाष्यकारांनीं येथें म्हटलें आहे. सूत्रकार हे प्रथम शब्दाच्या मूळ स्वरूपाचा उपदेश करतात, त्यानंतर प्रत्ययाचा व त्यानंतर आगमांचा व आदेशांचा उपदेश करतात; उद्देश हा कीं हें सर्व वर्णन ध्यानांत येऊन नित्य शब्दाचें स्वरूप कळावें; परंतु वास्तविक पाहतां नित्य शब्द हाच खरा शब्द, आगम आदेश वगैरे सर्व काल्पनिकच आहेत असें येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. प्रकृतसूत्र हें षष्ठीप्रकरणांत घालावें व षष्ठी ही अवयवषष्ठी घ्यावी म्हणजे टित् किंवा कित् असा आगम ज्याला सांगितला असेल त्याचा तो आद्यावयव किंवा अंतावयव असाच होऊं शकेल असेंही आणखी एक स्पष्टीकरण भाष्यकारांनीं येथें दिलें आहे. यानंतर मित् आगमासंबंधीं विचार चालू करून अंत्य स्वराच्या पुढें मित् आगम जोडावा असें सांगणारें 'मिदचोन्त्यात्परः' (सू. १।१।४७) हें सूत्र 'षष्ठी स्थानेयोगा' (१।१।४९) या व 'प्रत्ययः', 'परश्च' (३।१।१,२) या सूत्रांचें अपवादसूत्र घ्यावयाचें असें सांगून सामान्य व विशेष या दोघांची एकदम प्राप्ति येऊन विशेष-शास्त्र होण्याची अशक्यता असेल तरच अपवादकल्पना करतां येते असें नसून तक्रकौण्डिन्यन्यायानें लोकांतल्याप्रमाणें दोन्ही कार्यांची शक्यता असून व दोघांना स्वतंत्र उदाहरणें मिळत असतांनाही अपवादकल्पना करतां येते व विशेषशास्त्र हें सामान्यशास्त्राचा अपवाद होऊं शकतें असें भाष्यकारांनीं येथें सांगितलें आहे.

## १७०. आदेशविचार.

'एच इग्घ्रस्वादेशे' (४८) या सूत्रापासून 'अनेकाल्शित् सर्वस्य' (५५) या सूत्रापर्यंत सूत्रकारांनीं आदेशांविषयीं विचार केला आहे. 'एच इग्घ्रस्वादेशे' या ठिकाणीं स्थानसाम्यामुळें इ व उ हेच ए ऐ ओ आणि औ यांचे ह्रस्व म्हणून घेतले जातात; ज्यास्त स्थानसाम्य असलें तरी अर्ध एकार व अर्ध ओकार घेतले जात नाहींत; कारण, अर्ध एकार आणि अर्ध ओकार हे विशिष्ट वेदशाखेंतीलच वर्ण आहेत. 'षष्ठी स्थानेयोगा' (४९) या सूत्रानें षष्ठीचे सामान्यतः जरी दहा अर्थ असले तरी व्याकरणशास्त्रामध्यें विशिष्ट कारणास्तव कांहीं अपवादस्थळें सोडून स्थाने-षष्ठीच सर्वत्र घ्यावयाची असा शास्त्रसंकेत आहे. ज्या ठिकाणीं अवयवषष्ठी घ्यावयाची असेल तेथें 'व्याख्यानतो विशेषप्रातिपत्तिः०' या न्यायास अनुसरून तशी घ्यावी. आतां व्याख्यानानेंच सर्व ठिकाणीं काम भागणें शक्य असूनही ज्या अर्थी सूत्रकारांनीं 'षष्ठी स्थानेयोगा' हें सूत्र केलें आहे त्या अर्थी 'सूत्रामध्यें स्थानीचें उच्चारण केलें असतां उच्चारलेल्या शब्दस्वरूपालाच आदेश होतात' ( निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति ) असें त्यांच्या कृतीवरून सुचविलें जातें. 'स्थानेन्तरतमः' ( सू. ५० ) या सूत्राचा स्थानी व आदेश यांचा यथासंख्य निर्देश नसेल तेथें विशेषतः उपयोग आहे असें प्रथमतः भाष्यकारांनीं सांगितलें आहे व नंतर 'अन्तरतमे' व 'अन्तरतमः' या दोन पाठांमुळें संभवणाऱ्या स्थानींपैकीं निवड करून जो स्थानी ज्यास्त सारखा असेल त्या स्थानीला आदेश करावा असा अर्थ करावयाचा अथवा आदेशांपैकीं निवड करून जो आदेश ज्यास्त सारखा असेल तो करावयाचा या दोन पक्षांचें विवेचन करून व दुसरा पक्ष जास्त प्रशस्त आहे असें सांगून प्रस्तुत सूत्र हें परिभाषासूत्र म्हणजे व्यवस्थापक सूत्र घ्यावें असें म्हटलें आहे. वास्तविक

पाहतां, जसें आपआपल्या योग्यतेप्रमाणें निरनिराळ्या दर्जाचे लोक समाजामध्यें विशिष्ट जागीं बसणें जेवणें इत्यादि व्यवहार करतात त्याप्रमाणेंच शास्त्रांतही होणें शक्य असल्यामुळें प्रस्तुत सूत्राची विशेष जरूर नाहीं असें म्हटलें तरी चालेल. यानंतर 'उरण् रपरः' (सू. ५१) या सूत्राच्या अर्थाविषयीं ऋकाराला गुण, वृद्धि अथवा इतर आदेश सांगितला असतां तो अण् हाच करावयाचा व तो रपर करावयाचा असा नियमपक्ष, किंवा ऋकाराला जो आदेश होत असेल तो रपर करावयाचा असा रपरपक्ष, या दोन्ही पक्षांचा विचार करून ऋकाराला गुण किंवा वृद्धि किंवा इतर आदेश करण्याचा विचार आला कीं रेफ जोडून तो आदेश करावयाचा असा अर्थ करून गुण सांगितला असतां स्थानेन्तरतमः या सूत्रानें अर् हाच गुण होतो असा ' प्रसङ्गे रपरत्वं ' हा पक्ष भाष्यकारांनीं ग्राह्य ठरविला आहे. यानंतर अणामुळें लागणारा हा रेफ पूर्वीच्या शब्दाचा अंत होतो अथवा पुढच्या शब्दाचा आदि होतो अथवा स्वतंत्रच राहतो या वार्तिककारांनीं दिलेल्या तीनही पक्षांवरील गुणदोषांचें विवेचन भाष्यकारांनीं केलें आहे; त्यावरून भाष्यकारांच्या मतें पूर्वीच्या शब्दाचा अंत्यावयव हा पक्ष सयुक्तिक आहे असें दिसतें. यानंतर 'अलोन्त्यस्य' (सू. ५२) 'ङिच्च' ( सू. ५३ ) 'आदेः परस्य' (सू. ५४) व 'अनेकाल्शित्सर्वस्य' (सू. ५५) या परिभाषा-सूत्रांची उपयुक्तता भाष्यकारांनीं दाखविली आहे व त्यांमध्यें 'अलोन्त्यस्य' हें सामान्यसूत्र मानून 'आदेः परस्य' व 'अनेकाल्शित्सर्वस्य' हीं अपवादसूत्रें समजावीं असें सांगितलें आहे.

## १७१. स्थानिवद्भावान्हिक ( अ. १ पा. १ आन्हिक ८ ). स्थानिवद्भावाचें स्वरूप-विवेचन.

या आन्हिकांत स्थानिवद्भाव या व्याकरणशास्त्रांतील महत्त्वाच्या अतिदेशाचें विवरण केलें आहे. लोकामध्यें ज्याप्रमाणें गुरुपुत्र हा गुरूप्रमाणें समजावा हा भावनारूप अतिदेश आहे त्याप्रमाणें आदेशाला स्थानीसारखा समजणें अशा तऱ्हेचा अतिदेश म्हणजे स्थानिवद्भाव अशी स्थानिवद्भावाची व्याख्या केली आहे. गुरुजींसारखा गुरुपुत्र समजावा असा न्याय लोकांमध्यें प्रसृत असल्यामुळें जरी लौकिक न्यायाचे जोरावरच आदेश हा स्थानीसारखा समजला गेला तरी शास्त्रामध्यें ' स्वं रूपं शब्दस्य० ' सू. १।१।६८ ) या सूत्रानें सर्वत्र स्वरूपविधि सांगितला असल्यामुळें येथें 'स्थानिवदादेशो०' या सूत्रानें कार्यातिदेशाकरितां मुद्दाम स्थानिवद्भाव सांगितला आहे असें जरी असलें तरी ' युष्मदस्मदोरनादेशे ' ( ७।२।८६ ) या सूत्रांतील अनादेशे शब्द व ' अदो जग्धिर्ल्यप् ति किति ' ( २।४।३६ ) या सूत्रांतील ल्यप् शब्द हे सूत्रांमध्यें जरूर नसूनही घातले असल्यामुळें ' आदेश हा स्थानीसारखा समजावा, अल्विधीचे बाबतींत मात्र तसा समजूं नये ' असें सिद्ध होतें व त्यामुळेंही प्रस्तुत सूत्राची जरूर नाहीं; तरी पण, स्पष्टप्रतिपत्त्यर्थ प्रस्तुत सूत्र केलें आहे असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. हा ' स्थानीसारखा ' या स्वरूपाचा अतिदेश सामान्य रीतीनें व विशेष रीतीनेंही होतो. विशेषातिदेश घेतला असतांना स्थानीमधील अल् वर्णांच्या अल्त्वानेंच होणाऱ्या विधींचा ' अनल्विधौ ' या पदानें निषेध होतो. या स्थानिवद्भावाचे बाबतींत एका भागामध्यें विकृत झालेलाही आदेश मूळ प्रकृतीप्रमाणें समजला जावा असें म्हणणें इष्ट आहे असें सांगून त्या बाबतींत भारद्वाजीय वैयाकरणांचा वार्तिकपाठ देऊन भाष्यकारांनीं त्यांचें मत दिलें आहे व ' अवयव हा समुदायाच्या

पोटांतच असतो ' ( एकदेशविकृतमनन्यवत् ) या स्वरूपाच्या लौकिक न्यायानें अशा प्रकारचा आदेश जरी स्थानिवद्भावाकारितां स्वीकारिला तरी ' अल्विधि ' हा शब्द ' विधिसूत्रांमध्यें स्पष्ट अल् उच्चारून त्याला सांगितलेलें कार्य ' या अर्थी घ्यावयास पाहिजे असा इषारा दिला आहे. या स्थानिवद्भावरूपी आदेशाच्या स्वीकारामुळें शब्दाच्या नित्यत्वाला बाध येत नाहीं ही गोष्ट उपाध्यायाचे जागीं शिष्य आला आहे असें म्हटलें असतां उपाध्याय तेथें पूर्वी आलेलाच असला पाहिजे असें नसतें या लौकिकन्यायावरून स्पष्ट केली आहे. तसेंच, बुद्धिविपरिणाम म्हणजे अमक्याचे ठिकाणीं अमुक समजावा या लौकिक न्यायानेंही अमुक शब्दाचे ठिकाणीं अमुक शब्द समजावा असें म्हणतां येत असल्यामुळें स्थानिवद्भावानें शब्दनित्यत्वाला बाध येत नाहीं. यानंतर, सामान्यनियमाला बाजूला सारून जेव्हां अपवादविधि होतो तेव्हां अपवादविधि केल्या-नंतर शास्त्रानें तयार झालेल्या शब्दाला स्थानिवद्भावातिदेशानें सामान्यविधि झाला असतां तयार होणाऱ्या शब्दासारखा मानिल्यास येणारे अनेक दोष वार्तिककारांनीं दाखविले आहेत व भाष्यकारांनीं त्यांचें निराकरण केलें आहे.

## १७२. अनल्विधौ या स्थानिवद्भावनिषेधाचा प्रतिप्रसव.

'अचः परस्मिन्०' ( सू. ५७ ) हें सूत्र मागील सूत्रांत अल्विधीचे बाबतींत स्थानिवद्भाव होत नाहीं असें जें सांगितलें आहे त्याला अपवाद म्हणून केलें आहे. या सूत्रांतील प्रत्येक पदाची उपयुक्तता दाखवून ' पूर्वविधौ ' या पदाचे दोन अर्थ करून आदेशापेक्षां पूर्व किंवा निमित्तापेक्षां पूर्व यांपैकीं कोणालाही कार्य कर्तव्य असतां स्थानिवद्भाव होतो असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे; तसेंच, निमित्तापेक्षां पूर्वाला कार्य होण्याचे बाबतींत ' पट्व्या ' हें मूर्धाभिषिक्त उदाहरण म्हणून दिलें आहे. यानंतर " स्तोष्याम्यहं पादिकं० " या श्लोकांत पादिकं, औदवाहिकं इत्यादि उदाहरणें दिलीं आहेत. ' पट्व्या ' हें उदाहरण ' अन्तरङ्ग ' परिभाषेनें साधतां येण्याजोगें आहे, व ' अन्तरङ्ग ' परिभाषा ही अवश्य स्वीकारिलीच पाहिजे. लोकामध्यें सुद्धां मनुष्य सकाळीं उठून स्वतःचें शौचमुखमार्जन करतो व नंतर स्नेहीसोबती यांच्या कामाला लागतो. शास्त्रामध्यें सुद्धां प्रातिपदिक हें प्रथम सामान्य अर्थ दाखवितें, त्यामुळें त्या अर्थानें युक्त अशा व्यक्तीची कल्पना येते; पदार्थ व्यक्त झाल्यानंतर त्यामधील लिंग आणि संख्या यांची कल्पना येते; व लिंग आणि संख्या यांचा योग झाल्यावरच त्या पदार्थाचा बाह्य अर्थाशीं संबंध मनांत येतो. येथें भाष्यकारांनीं प्रातिपदिकाच्या अर्थाचीं सामान्य ( जाति ), व्यक्ति, लिंग, संख्या व बाह्यार्थयोग हीं जीं पांच अंगें त्यांचा निर्देश मोठ्या खुबीनें केला आहे. या पांच अंगांचाच स्वार्थ, द्रव्य, लिंग, संख्या व कारक या शब्दांनीं प्रातिपदिकार्थ म्हणून भाष्यकारानंतरचे वैयाकरण उल्लेख करूं लागले. शेवटीं स्थानिवद्भाव याचा अर्थ आदेशाला स्थानीसारखा समजणें किंवा आदेश असिद्ध होतो असें मानणें यांविषयीं विचार करून 'आदेश असिद्ध होतो ' याऐवजीं ' शास्त्र असिद्ध होतें ' या स्वरूपाचा वार्तिककारांनीं सांगितलेला शास्त्रातिदेशपक्ष स्वीकारावा म्हणजे शास्त्र असिद्ध समजलें गेल्यामुळें 'स्थानी गेला नाहीं आणि आदेश आला नाहीं' अशी भावना होऊन स्थानीच्या निमित्तानें कार्य होऊं शकेल व आदेशाच्या निमित्तानें प्राप्त झालेलें कार्य होणार नाहीं अशीं दोन्ही कामें साधतील असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे.

## १७३. रूपस्थानिवद्भाव.

'न पदान्तद्विर्वचन०' (सू. ५८) या सूत्रानें पदान्तविधि, द्विर्वचनविधि वगैरे दहा प्रकारचे विधी सांगितले आहेत व ते कर्तव्य असतांना मागील सूत्रानें प्राप्त झालेला स्थानिवद्भाव होत नाहीं असें सांगितलें आहे. या प्रस्तुत सूत्रांतील विधि हा शब्द 'विधीयते सः' म्हणजे 'कार्य' या अर्थी कर्मणि प्रत्यय असलेला असा घ्यावयाचा किंवा 'विधान' या अर्थी भावे प्रत्यय असलेला असा घ्यावयाचा याविषयीं विचार करून भावसाधन विधि शब्द घेणें बरें असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. स्वर, दीर्घ, आणि यलोप यांचे ठिकाणीं प्रकृत सूत्रानें स्थानिवद्भावाचा निषेध सांगितल्यामुळें कांहीं उदाहरणांमध्यें अडचण येते व त्याकरितां लोपरूप अजादेशाला स्थानिवद्भाव होत नाहीं असें स्पष्ट विधान करावें असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे पण तशा विधानाशिवायही काम भागणें शक्य आहे असें भाष्यकारांनीं दाखविलें आहे. शेवटीं 'त्रिपादींतील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं (पूर्वत्रासिद्धे च न स्थानिवत् पा. सू. १।१।५८ वा. ३) असें ज्यास्त सांगण्याची जरूर आहे; कारण जरी किरकोळ थोडेसे दोष असले तरी उपयोग पुष्कळच आहेत' असें जें वार्तिककारांनीं म्हटलें आहे त्याचा भाष्यकारांनीं स्वीकार केला आहे. 'द्विर्वचनेचि' (सू. ५९) या सूत्राच्या अर्थाचें विवेचन करतांना स्थानिवद्भाव प्रकरणामधील या सूत्रानें येथें रूपातिदेश घ्यावयास पाहिजे असें सूत्रांतील 'अचि' या पदावरून ज्ञापित होतें व त्यामुळें 'नड्वलोदकं पादरोगः', 'आयुर्धृतम्' इत्यादि उदाहरणांप्रमाणें द्विर्वचन म्हणजे द्विर्वचनाचें निमित्त असा अर्थ करून 'द्वित्वनिमित्त अच् पुढें असतांना मागें अचाला झालेल्या आदेशाला स्थानीचें रूप प्राप्त होतें' असा सूत्राचा अर्थ समजावा असें वार्तिककारांनीं प्रतिपादन केलें आहे. तरी पण, कांहीं ठिकाणीं—उदाहरणार्थ णिजन्ताहून सन् प्रत्यय केला असतांना—द्वित्वनिमित्त अच् पुढें नसल्यामुळें रूपातिदेश होऊं शकणार नाहीं व त्यामुळें अशा ठिकाणीं इष्ट रूप साधण्याकरितां साधा स्थानिवद्भाव मुद्दाम सांगावा लागेल अशी अडचण दाखवून 'ओः पुयण्ज्यपरे' (७।४।८०) या सूत्रानें 'साधा स्थानिवद्भावही द्विर्वचनेचि या सूत्रानें होतो' असें सूचित केलें आहे असेंही येथें वार्तिककारांनीं म्हटलें आहे, व या सूत्रानें दोन्ही प्रकारचा स्थानिवद्भाव होतो असें प्रतिपादन केलें आहे. शेवटीं भाष्यकारांनीं या सूत्राचीं विवक्षित उदाहरणें साधण्याकरितां 'द्विर्वचनं यणयावादेश०' (पा. सू. ६।१।१२ वार्तिक ९) हें स्वतंत्र वार्तिकवचनच उपयोगीं पडत असल्यामुळें या सूत्राची मुळींच जरूर नाहीं अशा मताचें विवेचन करून प्रस्तुत सूत्र ठेवावें व त्याच्या मदतीला 'ओः पुयण्ज्यपरे' हें सूत्र घ्यावें म्हणजे सर्व इष्ट रूपें साधतील असें म्हणून हें स्थानिवद्भावान्हिक पुरें केलें आहे.

## १७४. परिभाषासूत्रान्हिक (अ. १ पा. १ आन्हिक ९). प्रत्ययलक्षण.

या आन्हिकामध्यें प्रत्ययलक्षण, टि व उपधा या संज्ञा, आगम व आदेश यांची व्यवस्था, प्रत्याहार, व वृद्ध संज्ञा, यांचा विचार केला आहे; त्यामुळें या आन्हिकाला परिभाषासूत्रान्हिक नांव दिलें तरी चालेल. 'अदर्शनं लोपः' (सू. ६०) या सूत्रामध्यें लोप शब्दाची अदर्शन ही व्याख्या दिली आहे तिचा विचार करून केवळ एकादा वर्ण किंवा शब्द दिसत नाहीं म्हणून तेथें त्याचा लोप झाला आहे असें समजून चालणार नाहीं; कारण, पुढील 'प्रत्ययलोपे०' (सू. ६२) या सूत्रानें त्यास प्रत्ययलक्षण झाल्यास अनेक दोष येतील असें सांगून 'प्रसक्तस्य' म्हणजे प्रसंग आला

असतांनाही उच्चार न करणें अशी लोप या शब्दाची वार्तिककारांनीं व्याख्या दिली आहे व दोषांचा परिहार केला आहे. 'प्रत्ययस्य लुक्श्लुलुपः' ( सू. ६१ ) या सूत्रामधील प्रत्ययस्य या शब्दाच्या प्रयोजनाचा वार्तिककारांनीं विचार केला आहे व सूत्रामध्यें 'प्रत्ययस्य' हा शब्द घातला नसता तर कोठें दोष आले असते तें सांगितलें आहे. भाष्यकारांनीं या दोषांचें निराकरण करतांना प्रसंगानें 'उणादि प्रत्ययांना प्रत्यय ही संज्ञा देणें इष्ट नाहीं, वास्तविक पाहतां उणादि प्रत्यय लागून तयार झालेले शब्द हे अव्युत्पन्नच मानावे' असें म्हटलें आहे. 'प्रत्ययलोपे०' ( सू. ६२ ) व 'न लुमताङ्गस्य' ( सू. ६३ ) या सूत्रांमध्यें पाणिनिसूत्रांतील स्थानिवद्भावा-सारख्याच प्रत्ययलक्षण नांवाच्या शास्त्रसंकेताचा विचार केला आहे. या प्रत्ययलक्षणामुळें प्रत्ययाचा लोप म्हणजे अदर्शन जेथें असेल तेथें प्रत्ययाचा लोप झाला असतांनाही तो प्रत्यय ज्यांना निमित्त आहे अशीं कार्यें होऊं शकतात. प्रत्ययाला लुक्, श्लु अथवा लुप् या शब्दांनीं सांगितलेल्या अदर्शनालाही ही लोपसंज्ञा दिली जाते व त्यामुळें तेथेंही प्रत्ययाच्या निमित्तानें कार्यें होऊं शकतात; फक्त तेथें अंगकार्यांचा निषेध केला आहे. प्रत्ययलक्षण हा स्थानिवद्भावा-सारखाच अतिदेश असल्यामुळें स्थानिवद्भाव व प्रत्ययलक्षण हे दोन्ही एकाच सूत्रानें सांगितले असतां जे दोष येतील त्यांचें विवेचन वार्तिककारांनीं केलें आहे व भाष्यकारांनीं त्याचें स्पष्टीकरण देऊन स्वतंत्र सूत्रांनीं केलेली सूत्रकारांची व्यवस्था ठीक आहे असें सांगितलें आहे. 'प्रत्ययाच्या निमित्तानें अंगाला कार्य करणें झाल्यास प्रत्ययलक्षण होत नाहीं' या निषेधाचीं ठळकठळक उदाहरणें वार्तिककारांनीं दिलीं आहेत; तसेंच अंगकार्यांशिवाय स्वरकार्यें हीं कर्तव्य असतील तर कांहीं ठिकाणीं हा निषेध इष्ट आहे असें सांगितलें आहे; तसेंच अंगाधिकाराच्या बाहेरील स्वराशिवाय इतरही कांहीं कार्यें कर्तव्य असतांना प्रकृत निषेध न येतां प्रत्ययलक्षण होणें इष्ट आहे असेंही सांगितलें आहे. 'न लुमताङ्गस्य' याऐवजीं 'न लुमता तस्मिन्' असें सूत्र केल्यास कांहीं उदाहरणें साधतील पण इतरही कांहीं दोष येतील त्या सर्वांचा विचार करून भाष्यकारांनीं शेवटीं 'लुक्, श्लु आणि लुप् या शब्दांनीं ज्या प्रत्ययाचें अदर्शन झालें असेल तो प्रत्यय पुढें असतांना जें अंग त्याला कार्य कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं' असा न 'लुमताङ्गस्य' या सूत्राचा अर्थ करावा व जे किरकोळ दोष येतील ते घालविण्याकरितां यत्न करावा असा निर्णय दिला आहे. यानंतर प्रत्ययाचा लोप अनेक ठिकाणीं शब्दाच्या शेवटच्या अक्षराला किंवा उपान्त्य वर्णाला सांगितला असल्यामुळें तशा अक्षराला व वर्णाला होणाऱ्या टि व उपधा या संज्ञांचीं लक्षणें 'अचोन्त्यादि टि' आणि 'अलोन्त्यात्पूर्व'० ( सू. ६४ व ६५ ) यांमध्यें सूत्रकारांनीं सांगितलीं आहेत व त्यांचें भाष्यकारांनीं विवेचन केलें आहे.

### १७५. शब्दस्वरूपग्रहणसंकेत.

'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' ( सू. ६६ ) व 'तस्मादित्युत्तरस्य' ( सू. ६७ ) या सूत्रांमध्यें सूत्रपाठांत सप्तमी विभक्तींत उच्चारण केलें असतां तो शब्द अव्यवहित असा पुढें असतांना, व पञ्चमी विभक्तींत उच्चारण केलें असतां अव्यवहित असा मागें असतांना सूत्रांनीं सांगितलेलीं तीं तीं कार्यें करावीं असे परिभाषारूप नियम सूत्रकारांनीं दिले आहेत. 'तस्मिन्निति०' या सूत्रांतील 'निर्दिष्टे' शब्दावरून अव्यवहितत्व सुचविलें जातें असें सांगून ज्या सूत्रांमध्यें सप्तमी व पञ्चमी या दोन्ही विभक्तींमध्यें शब्द घातलेले आढळतात तेथें पञ्चमी ज्यास्त प्रबळ समजून अव्यवहित पर अशा शब्दस्वरूपाला कार्य करावें असा वार्तिककारांनीं खुलासा केला आहे व निरनिराळीं सूत्रें उदाहरणादाखल दिलीं आहेत. 'स्वं रूपं०' ( सू. ६८ ) या सूत्रामध्यें पाणिनि-

सूत्रांचा अर्थ करण्याकरितां घ्यावा लागणारा एक महत्त्वाचा संकेत सांगितला आहे. पाणिनीचें व्याकरण हें शब्दानुशासन म्हणजे शब्दशास्त्र असल्यामुळें 'सूत्रामध्यें अग्नि, दधि, कलि, शुक्र, अशा रीतीनें विशिष्ट शब्दाचें उच्चारण करून कार्यें सांगितलीं असतां तीं त्या शब्दस्वरूपालाच होतात, त्या शब्दाचेच अर्थी असलेल्या वह्नि, वैश्वानर इत्यादि इतर शब्दांना तीं होत नाहींत' अशा आशयाच्या प्रस्तुत सूत्रामध्यें सांगितलेल्या 'शब्दस्वरूपग्रहणसंकेता'चें स्वरूप भाष्यकारांनीं स्पष्ट केलें आहे. पाणिनीच्या सूत्रामध्यें साधारणपणें सर्वत्र हा संकेत पाळला जातो, पण याला 'नदीभिश्च' (२।१।२०) 'चतुष्पाद्भ्यो ढञ्' (४।१।१३५) 'चतुष्पादो गर्भिण्या' (२।१।७१) 'क्षुद्राभ्यो वा' (४।१।१३१) यांसारखीं अपवादस्थलेंही पुष्कळच आढळून येतात. या ठिकाणीं नदी शब्दानें कोणतेही गङ्गा यमुना इत्यादि विशिष्ट नदीवाचक शब्द, चतुष्पाद् शब्दानें गो वगैरे चतुष्पाद्प्राणिवाचक शब्द व क्षुद्र शब्दानें दासी वगैरे क्षुद्रव्यक्तिबोधक शब्द घेतले जातात; नदी, चतुष्पाद्, क्षुद्र, हे शब्द घेतले जात नाहींत. या सूत्रावर सित्तद्विशेषाणां०, पित्पर्यायवचनस्य०, जित्पर्यायवचनस्यैव०, झित्तस्य० (वार्तिकें ५,६,७,८) हीं चार वार्तिकें एक प्रकारानें विशेष महत्वाचीं आहेत. या वार्तिकांमधील सित्, पित्, जित् व झित् या चार शब्दांनीं 'विभाषा वृक्षमृग०' (२।४।१२) या सूत्रांतील वृक्ष शब्द, 'स्वे पुषः' (३।४।४०) या सूत्रांतील स्व शब्द 'सभा राजा०' (२।४।२३) या सूत्रांतील राजन् शब्द व 'पक्षिमत्स्य०' (४।४।३५) या सूत्रांतील मत्स्य शब्द हे अनुक्रमें समजावयाचे आहेत. इतकेंच नव्हे, तर वृक्ष व मत्स्य या शब्दांनीं त्यांचे विशेष सांगणारे शब्द व तसेंच स्व आणि राजन् या शब्दांनीं त्यांचे पर्यायशब्द घ्यावयाचे आहेत असें वार्तिककारांनींच सांगितलें आहे. वार्तिककारांनीं स् प् ज् आणि झ् असे वर्ण शेवटीं असलेले सित् पित् जित् व झित् असे शब्द येथें उच्चारले आहेत त्यावरून पाणिनीचे कालीं महत्वाच्या शब्दांचे विशेष सांगणारे शब्द तसेच पर्याय सांगणारे शब्द ज्यांमध्यें ओळीनें एकामागून एक घातले आहेत असे निघण्टूमध्यें दिले आहेत त्यांसारखे गण त्या वेळीं विद्वानांना मुखोद्गत असावे, व या गणांमध्यें केव्हां केव्हां न्यग्रोधस्, पिप्पलस्, प्लक्षस् अशा तऱ्हेनें सकार, तसेंच स्वप्, निजप्, अशा तऱ्हेनें पकार असे इत् वर्ण जोडून त्या त्या शब्दांचा पाठ केला असावा. पाणिनीनेंही 'नन्दिग्रहिपचादिभ्यो०' (३।१।१३४) या सूत्रांतील पचादि गणामध्यें नदट्, चरट्, गरट्, तरट्, चोरट्, देवट् अशीं ट् इत्संज्ञक असलेलीं प्रातिपदिकें घातलीं आहेत त्यावरून वरील विधानास एक प्रकारची पुष्टि मिळते.

### १७६. सावर्ण्यग्रहण.

'अणुदित् सवर्णस्य०' (सू. ६९) हें वर्णांचे सवर्णवर्ण सांगणारें महत्त्वाचें सूत्र आहे. अण् म्हणजे अ इ वगैरे महेश्वराच्या सूत्रांमध्यें उच्चारलेले नऊ स्वर व ह् य् व् र् ल् हीं पांच व्यंजनें. पाणिनिसूत्रांमध्यें जेथें जेथें यांपैकीं कोणत्याही स्वराचें किंवा व्यंजनाचें उच्चारण केलें आहे तेथें तेथें अ इ इत्यादि वर्णांनीं जातिग्रहण सूत्रकारांना अभिप्रेत असल्यामुळें त्या वर्णांनीं त्यांचे ऱ्हस्व दीर्घ वगैरे सर्व प्रकार घ्यावे असा अणुदित्० या सूत्राचा अर्थ आहे. प्रत्यय, आगम, आदेश इत्यादि कांहीं ठिकाणीं सवर्णग्रहण इष्ट नसतें हें पाहून प्रत्यय या शब्दामध्येंच प्रत्यय, आगम इत्यादिकांचा अंतर्भाव व्हावा या दृष्टीनें प्रत्यय शब्दाचा 'प्रतिपदोक्त सांगितलेला' हा अर्थ भाष्यकारांनीं केला आहे व 'भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न' ही परिभाषा सूत्रांतील 'अप्रत्ययः' या शब्दानें सूचित होते असेंही म्हटलें आहे. ज्या ठिकाणीं अ, इ इत्यादि वर्णांनीं जातीचें ग्रहण इष्ट नसेल तेथें त्या वर्णांपुढें सूत्रामध्यें 'त'कार जोडलेला

असतो; व 'ज्या वर्णाला तकार जोडला असेल तो वर्ण उच्चारण्यास जेवढा काल लागतो तेवढ्या कालांतच उच्चारले जाणारे त्याचे उदात्त, अनुदात्त, स्वरित, अनुनासिक इत्यादि पोटभेद घ्यावे; त्याचे ह्रस्व, दीर्घ, प्लुत इत्यादि पोटभेद घेऊं नये' असें 'तपरस्तत्कालस्य' (सू.७०) या पुढील सूत्रामध्यें सूत्रकारांनींच सांगितलें आहे. उच्चारणाऱ्या व्यक्तीच्या द्रुत व विलंबित गतीनें उच्चारणास जरी ज्यास्त काल लागला तरी तेथें वर्णस्वरूप कायमच राहतें, त्यांत बदल होत नाहीं असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे व चालणाऱ्यांच्या गतीमुळें जलदी किंवा उशीरां मनुष्य पोंचला असतां कोस योजन वगैरे अंतर कमीजास्त होत नाहीं असा दृष्टांत दिला आहे. द्रुत व विलंबित गतीनें शब्दाचा गुण जो ध्वनि त्याच्या उच्चारणास जरी कमी-ज्यास्ती वेळ लागून त्यामध्यें बदल झाला तरी स्फोटस्वरूप नित्य असा जो खरा शब्द त्याच्या-मध्यें उच्चारणाऱ्याच्या द्रुत व विलंबित गतीनें कांहींही बदल होत नाहीं असें येथें भाष्य-कारांनीं स्पष्ट प्रतिपादन केलें आहे. ' आदिरन्त्येन सहेता ' ( सू. ७१ ) या सूत्रामध्यें लाघव-प्रधान अशा पाणिनीच्या व्याकरणशास्त्रांतील ' प्रत्याहार ' या महत्वाच्या संज्ञेचें स्पष्टीकरण केलें आहे.

## १७७. तदन्तविधि.

' येन विधिस्तदन्तस्य ' ( सू. ७२ ) या सूत्रानें पाणिनिसूत्रांचा अर्थ करण्याकरितां उपयोगीं पडणाऱ्या 'तदन्तविधि' नांवाच्या महत्त्वाच्या संकेताचें निरूपण केलें आहे. कोणत्याही विशेष्याला सूत्रामध्यें वर्ण, प्रत्यय इत्यादि प्रकारचें विशेषण दिलें असेल तर त्या ठिकाणीं विशेष-णान्त शब्दसमुदाय घ्यावा असा थोडक्यांत या सूत्राचा अर्थ आहे. या सूत्राचा उपयोग जरी अनेक ठिकाणीं असला तरी हा तदन्तविधि घेतल्यास कांहीं ठिकाणीं दोष येतात म्हणून वार्तिक-कारांनीं ज्या ठिकाणीं दोष येतात अशीं सर्व स्थलें म्हणजे समासविधि, प्रत्ययविधि, उगिताचें उच्चारण, तसेंच वर्णाचें उच्चारण, हीं सांगून त्या ठिकाणीं तदन्तविधि घेऊं नये असें म्हटलें आहे, व या परिभाषेच्या उपयोगाचीं मुख्य मुख्य अशीं अनेक स्थळें दाखविलीं आहेत. ज्या ठिकाणीं शब्दाला प्रत्यय पुढें न लागतां तो शब्दामध्येंच शिरतो अशा ठिकाणीं शिरलेल्या अकच् वगैरे प्रत्ययांसह जो शब्द तयार होतो तो मूळच्या शब्दासारखाच समजला जातो व त्यामुळें मूळच्या शब्दाला अव्यय, सर्वनाम इत्यादि ज्या संज्ञा असतात त्या त्यालाही होतात, तेथें प्रकृत सूत्रानें कांहींही अडचण येत नाहीं हें लहान नद्या जरी येऊन आंत प्रविष्ट झाल्या तरी गंगा, सिंधू वगैरे मूळ नद्यांचीं नांवें कायमच राहतात हा दृष्टान्त देऊन भाष्यकारांनीं स्पष्ट केलें आहे. येथें वार्तिककारांनीं या सूत्राचीं अनेक प्रयोजनें दाखविलीं आहेत व या परिभाषासूत्रासारखा व तितकाच महत्त्वाचा 'यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे' हाही संकेत सांगणें जरूर आहे असें म्हटलें आहे. 'वृद्धिर्यस्याचामादिः', 'त्यदादीनि च' व 'एङ् प्राचां देशे' ( सू. ७३, ७४, ७५ ) या तीन सूत्रांमध्यें सूत्रकारांनीं वृद्ध या संज्ञेचें लक्षण दिलें आहे व ज्या शब्दाचा पहिला स्वर आ, ऐ किंवा औ आहे असे शब्द, त्यद् तद् इत्यादि सर्वनामें व पूर्वेकडील देशांमध्यें प्रचलित असलेलीं ए अथवा ओ याही स्वरांनीं सुरू होणारीं विशेष-नामें यांना ' वृद्ध ' ही संज्ञा दिली आहे. वार्तिककारांनीं ' ही वृद्ध संज्ञा घेण्याविषयीं व्यंजनांचा विचार करूं यये ' असें सांगून व्यंजनांनीं आरंभ होणाऱ्या गार्ग्य वगैरे शब्दां-

---

१. याविषयीं विवेचन मागें पृ. १६४ परि. ७६ मध्यें केलें आहे.

मधील पहिला स्वर हा वृद्धिसंज्ञक असल्यामुळें त्या शब्दांना ही 'वृद्ध' संज्ञा होते असें प्रतिपादन केलें आहे. त्याप्रमाणेंच 'विशेषनामें व गोत्रप्रत्ययान्त उत्तरपद असलेलीं नामें यांनाही वृद्ध ही संज्ञा विकल्पानें करावी' असें म्हटलें आहे. 'एङ् प्राचां देशे' या सूत्रामध्यें प्राग्देश शब्दानें कोणते देश विवक्षित आहेत याचें विवेचन 'प्रागुदञ्चौ विभजते०' या श्लोकवार्तिकांत केलें आहे; पण तें वार्तिक भाष्यकारांनीं दिलें नाहीं.

## नवान्हिकी समाप्त.

## १७८. ङित्किदतिदेशान्हिक (अ. १ पा. २ आन्हिक १). ङित् व कित् या अतिदेशांचें विवेचन.

गुण किंवा वृद्धि होऊं नये म्हणून पाणिनीनें ङ् अथवा क् जोडूनच कांहीं प्रत्ययांचें विधान केलें आहे व त्या सर्व प्रत्ययांना ङित् अथवा कित् या नांवानें उल्लेख करण्याचा प्रघात आहे. पण कांहीं विशिष्ट धातूंच्या पुढें ङित् किंवा कित् यांपेक्षां निराळे प्रत्यय पुढें असतांनाही गुण किंवा वृद्धि होत नाहींत असें भाषेंतील वैशिष्ट्य दिसून आल्यामुळें पाणिनीनें अशा प्रत्ययांचें परिगणन करून कांहीं प्रत्यय ङित्प्रत्ययांसारखे समजावे व कांहीं प्रत्यय कित्प्रत्ययांसारखे समजावे असें सांगितलें आहे. पाणिनीनें जरी त्या त्या सूत्रांमध्यें ङिद्वत् किंवा किद्वत् अशा रीतीनें वत् प्रत्यय न लावतां ङित् किंवा कित् असाच शब्दप्रयोग केला असला तरी 'देवदत्त सिंह आहे' इत्यादि प्रकारच्या लोकव्यवहाराप्रमाणें अमुक प्रत्यय हा ङित् होतो, अमुक प्रत्यय हा कित् होतो असें सांगणारीं सर्व सूत्रें ङित् व कित् या पदांनीं ङितासारखा व कितासारखा असा अतिदेशच सांगतात; संबंध किंवा आदेश किंवा संज्ञा सांगत नाहींत. या अतिदेशानें होणाऱ्या ङित् व कित् प्रत्ययांमुळें मागील प्रकृतीला जीं कार्यें होतील तीं करावयाचीं असतात; हे प्रत्यय प्रत्यक्ष ङित् किंवा कित् नसल्यामुळें ते शेवटीं असलेल्या 'चुकुटिष' यासारख्या धातूंना ङित् समजून आत्मनेपद वगैरे कार्यें करावयाचीं नाहींत हें येथें भाष्यकारांनीं स्पष्ट केलें आहे. 'सार्वधातुकमपित्' (सू. ४) या सूत्राचा पिद्भिन्न सार्वधातुक प्रत्यय ङित् होतो असा पर्युदास घेऊन अर्थ केला असतां एकादेशस्थलीं कांहीं दोष येतात; तसेंच, पित् सार्वधातुक ङित् होत नाहीं असा प्रतिषेध घेऊन अर्थ केला असतांही इतर कांहीं ठिकाणीं दोष येतात. या सर्व दोषांचें निराकरण भाष्यकारांनीं स्थानिवद्भावानें केलें आहे. 'इन्धिभवतिभ्यां च' (सू. ६) हें सूत्र न केलें असतां चालेल या वार्तिककारांच्या म्हणण्याचें भाष्यकारांनीं समर्थन केलें आहे. 'इको झल्' (सू. ९) या सूत्रानें सांगितलेलें इगन्त धातूपुढील झलादि सन् प्रत्ययाचें कित्व, 'स्थाघ्वोरिच्च' (सू. १७) या सूत्रांतील इकाराचें तपरत्व, व 'न क्त्वा सेट्' (सू. १८) येथील क्त्वा शब्दाचा उपयोग यांविषयीं एकामागून एक केवळ तांत्रिक अडचणी व त्यांचे परिहार सांगणारीं श्लोकवार्तिकें देऊन भाष्यकारांनीं त्यांचें विवरण केलें आहे. हीं पूर्वपक्षउत्तरपक्षरूप श्लोकवार्तिकें कात्यायनाचीं नसावीं; इतर वार्तिककारांनीं, संग्रहकारांनीं किंवा भाष्यकारांनींही तीं रचिलेली असणें शक्य आहे. हीं विवरणें जरी तांत्रिक स्वरूपाचीं असलीं तरी शास्त्राभ्यास करणाऱ्यांना विद्वत्सभांमध्यें तीं फार उपयुक्त असल्यामुळें

१. याविषयीं विवेचन मागें पृ. २०२ परि. १२८ मध्यें केलें आहे.

कालांतरानें विद्वानांच्या पांडित्यपरीक्षणाचे कामीं त्यांचा फार उपयोग होऊं लागला व त्यामुळें अशा तऱ्हेच्या विवेचनांत भरही पडूं लागली.

## १७९. उदात्त, अनुदात्त वगैरे स्वरांचें विवेचन.

'ऊकालोऽज्झ्रस्वदीर्घप्लुतः' ( सू. २७ ) या सूत्रामध्यें स्वरांना लागणाऱ्या ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत या संज्ञांचें विवेचन केलें आहे. या संज्ञा तीन असल्यामुळें ज्यांना ह्या संज्ञा द्यावयाच्या ते एकमात्रिक, द्विमात्रिक आणि त्रिमात्रिक असे तीन प्रकारचे स्वरच 'ऊ' या पदानें घ्यावयाचे व त्याकरितां उ, ऊ, ऊ३ या तीन 'उ'कारांचा द्वन्द्व समास सूत्रांतील 'ऊ' या पदानें घ्यावयाचा असें भाष्यकारांनीं येथें सांगितलें आहे; तसेंच, सूत्रांतील काल शब्दाचा उपयोग तपरोच्चारणासारखा समजावयाचा असेंही त्यांनीं सांगितलें आहे. या ह्रस्व, दीर्घ व प्लुत उच्चारणांचे बाबतींत निरनिराळ्या वक्त्यांना जरी त्यांच्या द्रुत मध्य व विलंबित वृत्तींमुळें कमीजास्ती वेळ लागला तरी त्या वृत्तींमुळें त्या त्या वर्णांच्या स्वरूपामध्यें फरक होत नाहीं. 'अचश्च' ( सू. २९ ) या परिभाषासूत्रानें 'ऱ्हस्व, दीर्घ अथवा प्लुत शब्द उच्चारून ऱ्हस्व, दीर्घ अथवा प्लुत स्वराचें जेथें विधान केलें असेल तेथें तो ऱ्हस्व दीर्घ अथवा प्लुत अचाला म्हणजे स्वराला होतो' असें सांगितलें आहे. 'अचश्च' हें सूत्र 'अलोन्त्यस्य' (१।१।५२) या सूत्राचें परिपूरक सूत्रही नव्हे व त्याचा अपवादही नव्हे असा येथें भाष्यकारांनीं खुलासा केला आहे. यानंतर पुढील बारा (सू. २९-४०) सूत्रांचें विवेचन करतांना वेदामध्यें प्रामुख्यानें आढळून येणाऱ्या उदात्त, अनुदात्त व स्वरित या तीन स्वरांच्या स्वरूपाविषयीं भाष्यकारांनीं विवेचन केलें आहे. प्रथमतः, उदात्त वगैरे स्वरांच्या सांनिध्यामुळें व्यंजनें स्वरयुक्त भासतात, वास्तविक पाहतां व्यंजनांचें स्वरयुक्त उच्चारण होत नाहीं इतकेंच नव्हे तर अचाशिवाय म्हणजे अ आ इ ई इत्यादि स्वरांशिवाय त्यांचें उच्चारणही नीट होऊं शकत नाहीं असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. सूत्रकारांनीं 'उच्चैरुदात्तः' म्हणजे मोठ्या आवाजाला उदात्त म्हणावें व 'नीचैरनुदात्तः' म्हणजे बारीक आवाजाला अनुदात्त म्हणावें असें सांगितलें आहे. लोकांमध्येंही शब्द उच्चारतांना शरीरावयवांचा दीर्घपणा, ध्वनीचा रूक्षपणा, व कंठांतील मोकळ्या भागाचा संकोच हें मोठ्या आवाजाचें स्वरूप, व त्याचे उलट अवयवाचा शिथिलपणा, ध्वनीचा कोमलपणा व कंठांतील मोकळ्या भागाचा विकास हें बारीक आवाजाचें स्वरूप अशीं स्वरूपें दिसलीं तरी तीं सर्व ठिकाणीं लागू पडत नाहींत; कारण, मोठा व बारीक आवाज प्राणवायूच्या संचारावर अवलंबून असल्यामुळें कांहीं माणसांचा आवाज स्वभावतःच मोठा असतो व कांहींचा लहान असतो. वरील वस्तुस्थिति लक्षांत घेऊन आवाज मोठालहान कसाही असो, उच्चार करतांना जिभेचा स्पर्श कंठ वगैरे स्थानांच्या वरच्या बाजूला झाल्यास तें उच्च उच्चारण (उदात्त) व खालच्या बाजूला झाल्यास तें नीच उच्चारण ( अनुदात्त ) व या दोहोंचें मिश्र उच्चारण तें स्वरित असें स्पष्टीकरण भाष्यकारांनीं केलें आहे; तसेंच स्वरिताच्या आरंभींच्या अर्धमात्रिक भागाला उदात्त म्हणण्यांत येतें असाही खुलासा केला आहे.

## १८०. एकश्रुतीचें विवेचन.

'एकश्रुति दूरात्संबुद्धौ' ( सू. ३३ ) या सूत्रांत दूर अंतरावरून हांक मारली असतां संबोधनाचें उच्चारण 'एकश्रुति' होतें असें एकश्रुति उच्चारणाचें वर्णन केलें आहे. थोडक्यांत

म्हणावयाचें म्हणजे आपण नेहमीं बोलतों त्या वेळीं उदात्त, अनुदात्त या विशिष्ट स्वरांशिवाय होणारें जें उच्चारण त्यालाच 'एकश्रुति' हें नांव देण्यांत आलें आहे. प्रस्तुत सूत्राचें विवेचन करतांना एकश्रुति उच्चारण म्हणजे मुखस्थानांच्या ऊर्ध्वभागीं व अधोभागीं मिळून झालेलें एकश्रुति उच्चारण हें एक व 'उच्चैस्तरां वा वषट्कारः'...... 'उदात्तस्वरितपरस्य सन्नतरः' (सूत्रें ३५-४०) या सूत्रांमध्यें वर्णन केलेलीं उदात्त, उदात्ततर, अनुदात्त, अनुदात्ततर, स्वरित आणि स्वरितामधील अनुदात्तानें युक्त उदात्त अशीं सहा उच्चारणें मिळून सात स्वर कांहीं वैयाकरण मानतात असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. गाण्याच्या हल्लीं प्रचलित असलेल्या सात स्वरांशीं हे स्वर जुळवून पाहतां भाष्यकारांचे वेळीं सप्तस्वरयुक्त गान प्रचलित असावें असें दिसतें. 'यज्ञकर्मण्यजप०', 'उच्चैस्तरां०', 'विभाषा छन्दसि' आणि 'स्वरितात्संहितायाम०' (सू. ३४, ३५, ३६, ३८) या चार सूत्रांमध्यें एकश्रुति उच्चारण केव्हां केलें जातें हें सूत्रकारांनीं सांगितलें आहे. 'सुब्रह्मण्या' नांवाच्या वेदशाखेमध्यें एकश्रुतीच्या ऐवजीं स्वरिताला उदात्त केला जातो असेंही सूत्रकारांनीं म्हटलें आहे, व वार्तिककारांनीं कोणत्या प्रसंगीं तसा उदात्त केला जातो त्याचा खुलासा केला आहे. 'अपृक्त एकाल्०' (सू. ४१) व 'तत्पुरुषः समानाधिकरण:०' (सू. ४२) या सूत्रांमध्यें 'अपृक्त' व 'कर्मधारय' या संज्ञा सूत्रकारांनीं सांगितल्या आहेत. कर्मधारय ही महासंज्ञा पूर्वाचार्यांनीं दिलेलीच सूत्रकारांनीं घेतली असावी. ही संज्ञा कां देण्यांत आली असावी याचें विवेचन भाष्यकारांनीं केलें नाहीं व इतरत्र कोठें आढळत नाहीं. 'प्रथमानिर्दिष्टं०' व 'एकविभक्ति०' (सू. ४३, ४४) या दोन सूत्रांमध्यें सूत्रकारांनीं उपसर्जनाचे दोन प्रकार दिले आहेत व भाष्यकारांनीं ही महासंज्ञा अन्वर्थक आहे असें सांगून लोकांतल्याप्रमाणेंच अप्रधान शब्द हा साधारणतः उपसर्जन असतो असें म्हटलें आहे.

### १८१. प्रातिपदिकसंज्ञान्हिक (अ. १ पा. २ आन्हिक २). प्रातिपदिक संज्ञा.

या आन्हिकांत साधारणतः प्रातिपदिक व त्याचें स्वरूप यांचा विचार केला असल्यामुळें याला प्रातिपदिकसंज्ञान्हिक म्हणतां येईल. 'अर्थवदधातु०' व 'कृत्तद्धित०' (सू. ४५-४६) या दोन सूत्रांमध्यें ज्याला प्रत्यय पुढें लाविला जातो असें—तद्धितप्रत्ययान्त, कृत्प्रत्ययान्त, सामासिक, अथवा केवल—जें अर्थयुक्त शब्दस्वरूप त्याला प्रातिपदिक ही संज्ञा पाणिनीय व्याकरणांत दिली आहे. धातू व प्रत्यय यांना मात्र ही प्रातिपदिक संज्ञा दिली जात नाहीं. सूत्रकारांनीं दिलेल्या प्रातिपदिक शब्दाच्या व्याख्येवरून अर्थयुक्त शब्दाचे मुख्यतः दोन प्रकार पडतात; एक धातु व दुसरा प्रातिपदिक. आकाङ्क्षा, योग्यता व संनिधि यांनीं सहित व अर्थयुक्त अशा अनेक पदांचा समुदाय मिळून वाक्य होतें व त्यामुळें अशा

---

१. याविषयीं विवेचन मागें पृ. १६६ परि. ७८ मध्यें केलें आहे.

२. याविषयीं संक्षिप्त विवेचन डॉ. फ्रँक्लिन् एड्गरटन् यांनीं अमेरिकन ओरिएन्टल सोसायटी जर्नलच्या १९५२ एप्रिल जूनच्या अंकामध्यें निबंध लिहून केलें आहे (अ. ओ. सो. जर्नल भाग ७२). लेखकानेंही भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूट ऍनल्स भाग ३३ सन १९५२ च्या अंकामध्यें 'कर्मधारय संज्ञा' या मथळ्याखालीं पृष्ठें २३८-२४४ मध्यें शास्त्रीयदृष्ट्या विवेचन केलें आहे.

वाक्याला जरी अर्थ असला तरी तो पदांच्याच अर्थाचा संसर्ग अशा रूपानें असतो; तो स्वतंत्र निराळा नसतो; म्हणून वाक्याला प्रातिपदिक संज्ञा देतां येत नाहीं. शिवाय पदसमूहाला जर प्रातिपदिक म्हणावयाचें तर समासरूपी समुदायालाच म्हणावें, दुसऱ्या समुदायाला म्हणूं नये असें 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रांतील 'समास' या शब्दावरून सूचित होतें. तसेंच, 'आख्यातमाख्यातेन०' (२।१।७२ वार्तिक) व 'जहि कर्मणा०' (६।१।७२ गणसूत्र) यांनीं क्रियापदाशीं मुद्दाम समास सांगितला असल्यामुळें समासाशिवाय इतर ठिकाणीं क्रियापदाला प्रातिपदिक संज्ञा होत नाहीं हें सूचित होतें. विभक्तिप्रत्यययुक्त अशा प्रातिपदिकापासून जरी अर्थ मनांत येत असला व विभक्तिप्रत्ययानें रहित अशा प्रातिपदिकाचा जरी प्रयोग होत नसला तरी प्रातिपदिकाला अर्थ असतो हें अन्वयव्यतिरेकांवरून सहज लक्षांत येतें. पदामधील निरनिराळ्या वर्णांना अर्थ असतो किंवा नाहीं हा विचार प्रत्याहाराह्निकांत करून वर्ण अनर्थक आहेत असें जरी वार्तिककारांनीं ठरविलें असलें तरी वर्णसमूहाला अर्थ असल्यामुळें वर्णांना अर्थ असलाच पाहिजे या विचाराला तेथें उत्तर दिलें नाहीं तें येथें दिलें आहे; व अवयव जरी विशिष्ट कार्य करण्याला असमर्थ असले तरी अवयवांचा संघात तें काम करूं शकतो असा दृष्टान्त देऊन वर्ण अनर्थक असले तरी हरकत नाहीं असें भाष्यकारांनीं त्याचें स्पष्टीकरण केलें आहे

## १८२. प्रातिपदिकांचे अर्थ, लिंग व संख्या.

प्रातिपदिक हें अर्थयुक्त असेंच शब्दस्वरूप असलें पाहिजे या नियमाला निपात हे अपवाद आहेत. निपात जरी अर्थरहित असले तरी त्यांना प्रातिपदिक म्हणावें ( निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वम् ) असें वार्तिककारांनीं सांगितलें आहे. निपातांना विभक्तिप्रत्यय जोडून त्या प्रत्ययांचा लुक् करावा; विभक्तिप्रत्यय जोडल्यामुळें निपातांना पदसंज्ञा होऊं शकेल व पदसंज्ञा झाल्यावर निपातांना योग्य ते स्वर मिळतील व त्यांचे पुढील क्रियापदाला सर्वनिघात होऊं शकेल असे निपातांना प्रातिपदिक संज्ञा देण्याचे भाष्यकारांनीं उपयोग सांगितले आहेत. 'अर्थवत्०' (सू. ४५) या सूत्रांतील 'अप्रत्ययः' या पदाचा अर्थ प्रतिषेध घेऊन करावा किंवा पर्युदास घेऊन करावा हा विचार करून दोन्ही पक्षीं 'ह्रस्वो नपुंसके०' (सू.४७) या सूत्रानें काण्डे, कुड्ये इत्यादि ठिकाणीं ह्रस्व प्राप्त होतो तो न व्हावा म्हणून 'ह्रस्वो नपुंसके०' या सूत्रामध्यें 'प्रातिपदिकस्य' याच्याऐवजीं 'यत्तस्य' पाठ घेणें बरें असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. 'ह्रस्वो नपुंसके०' या सूत्रांत 'प्रातिपदिकस्य' हें पद घातलें असल्यामुळें क्रियापदांना कर्ता अथवा कर्म यांचे निमित्तानें लिंगाविवक्षा आहे असें मानिलें तरी रमते, भूयते इत्यादि ठिकाणीं ह्रस्व होत नाहीं. अव्ययें हीं प्रातिपदिकें असूनही 'दोषा', 'नाना' इत्यादि ठिकाणीं नपुंसक ह्रस्व होत नाहीं; कारण, अव्ययापासून मनांत येणारा अर्थ लिंगरहित असतो हें 'न वा लिङ्गाभावात्' ( १।२।४७ वा. ४ ) या वार्तिकानें स्पष्ट सांगितलें आहे. क्रियापदांप्रमाणेंच कांहीं अव्ययें प्रामुख्यानें विभक्त्यर्थ दाखवितात, तर कांहीं अव्ययें क्रियाही दाखवितात असें जरी असलें तरी विभक्त्यर्थ आणि क्रिया यांचे ठिकाणीं लिंगकल्पना व संख्याकल्पना नसल्यामुळें अव्ययें हीं लिंगसंख्यारहितच असतात असें सांगून भाष्यकारांनीं वार्तिककारांच्या म्हणण्याचें समर्थन केलें आहे. 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' ( सू. ४८ ) या सूत्रानें उपसर्जन असलेल्या 'गो' या शब्दाला व स्त्रीलिंगी शब्दांना ह्रस्व सांगितला आहे. स्त्रीलिंगी शब्द याचा अर्थ 'स्त्रियाम्' या अधिकारांत सांगितलेला स्त्रीप्रत्यय ज्यांच्या शेवटीं आहेत असे शब्द असा वार्तिककारांनीं

केला आहे; त्यामुळें उणादि ' ई ' प्रत्यय शेवटीं असलेल्या लक्ष्मी वगैरे शब्दांना ह्रस्व होत नाहीं. ' लुक्तद्धितलुकि ' व ' इद् गोण्याः ' ( सू. ४९,५० ) या सूत्रांनीं तद्धित प्रत्ययाचा लुक् झाल्यावर स्त्रीप्रत्ययाचाही लुक् होतो व गोणी यांतील दीर्घ ' ईकाराला ' ह्रस्व इ होतो असें सांगितलें आहे. ' इद्गोण्याः ' हें सूत्र जरी महत्त्वाचें नसलें तरी त्या सूत्रांतील ' इत् ' शब्दाच्या उपयोगाविषयीं एक श्लोकबद्ध वार्तिक भाष्यकारांनीं दिलें आहे; यावरून भाष्यकारांचे वेळीं पाणिनिसूत्रांचा अभ्यास जोरानें चालू होता व सूत्राच्या अर्थाविषयीं व पदांच्या उपयुक्तते-विषयीं पूर्वपक्षोत्तरपक्षरूपानें विस्तृत चर्चा होत असे असें स्पष्ट दिसून येतें. अशा तऱ्हेचीं श्लोकबद्ध वार्तिकें अनेक सूत्रांवर भाष्यकारांनीं उद्धृत केलीं आहेत. त्यांवरून पाणिनिसूत्रांचें श्लोकबद्ध व्याख्यानही भाष्यकारांचे वेळीं ग्रंथरूपानें असणें शक्य आहे. महाभाष्यदीपिकेमध्यें भर्तृहरीनें अशा वार्तिकांविषयीं ' श्लोकवार्तिक ' शब्दाचा प्रयोग केला आहे त्यावरून वरील विधानाला पुष्टि मिळण्यासारखी आहे.

## १८३. प्रत्ययाचा लुप् झाल्यानंतर प्रातिपदिकाचें स्वरूप.

' लुपि युक्तवद् व्यक्तिवचने ' ( सूत्र ५१ ) या सूत्रापासून ' कालोपसर्जने च तुल्यम् ' ( सू. ५७ ) या सूत्रापर्यंत सात सूत्रांमध्यें प्रत्ययाचा लुप् झाला असतांना प्रातिपदिकाचें स्वरूप कसें राहतें याविषयीं विवेचन केलें आहे. प्रत्ययाचा लुप् झाल्यावर ज्या प्रकृतीला तो प्रत्यय लावला होता त्या प्रकृतीच्या अर्थाला अनुसरून लिंग आणि वचन यांची व्यवस्था करावी असें 'लुपि युक्तिवत्०' या सूत्राचें तात्पर्य आहे. अशा शब्दाच्या विशेषणांनाही विशेष्याचेच लिंगवचन-वाचक प्रत्यय लावावे; विशेषण शब्द जर जातिवाचक असेल तर मात्र त्याला स्वतःच्याच लिंग-वचनाप्रमाणें प्रत्यय लागतात असें ' विशेषणानां चाजातेः ' ( सू. ५२ ) या सूत्रांत सांगितलें आहे. या नियमांना वार्तिककारांनीं कांहीं अपवादस्थलें सांगितलीं आहेत. उदाहरणार्थ—हरीतकीचीं फलें या अर्थीं ' हरीतक्यः ' असा प्रयोग होतो. ' तदशिष्यं० ' ( सू. ५३ ) पासून ' कालोपसर्जने० ' ( सू. ५७ ) या सूत्रापर्यंत पांच सूत्रामध्यें ' लुपि युक्तवत्० ' या सूत्रानें सांगितलेल्या ' युक्तवद्भावा'चें प्रयोजन वास्तविकरीत्या कांहीं नाहीं; कारण, शब्दांना स्वभावतःच अर्थ असतो व त्याप्रमाणें लिंगवचनें होतात असें सूत्रकारांनींच सांगितलें आहे व आपणच रचिलेलें 'लुपि युक्तवत्०(सू. ५१)' हें सूत्र व्यर्थ आहे असें म्हटलें आहे. अशा तऱ्हेचें सूत्रकारांनीं केलेलें सूत्रवैयर्थ्याचें विवेचन सूत्रपाठांत येथेंच सांपडतें यावरून ' लुपि युक्तवत्० ' व 'विशेषणानां०' हीं दोन सूत्रें पाणिनीनें पूर्ववैयाकरणांना मान देऊन त्यांनीं रचिलेलीं म्हणून जरी आवश्यक नसलीं तरी घेतलीं असावीं व 'तदशिष्यं०' इत्यादि पांच सूत्रांमध्यें त्यांवर चर्चा केली असावी. अथवा पाणिनीच्या सूत्रांचा अभ्यास चालू झाल्यावर या दोन सूत्रांवर टीकारूप व्याख्यान पुढील पांच सूत्रामध्यें वार्तिककारांनीं केलें असावें व सूत्रपाठ कायम होण्याचे पूर्वी ' तदशिष्यं० ' इत्यादि पांच वार्तिकेंच सूत्रपाठामध्यें समाविष्ट केलीं गेलीं असावीं. ' जात्या-

---

१. याविषयीं " यदेवोक्तं वाक्यकारेण वृत्तिसमवायार्थ उपदेश इति तदेव श्लोकवार्तिककारोऽप्याह—इष्टबुद्ध्यर्थं निवृत्तकलादिकानिति । लध्वर्थं वोपदिश्यत इति । अनेन चानुबन्धासङ्गं प्रदर्शयति अनुबन्ध-करणार्थं चेति । " ( महाभाष्यदीपिका पृ. ६० ) पहा. या ठिकाणीं भर्तृहरीनें महाभाष्यामध्यें उद्धृत केलेल्या ' अक्षरं न क्षरं विद्यात्० ' आणि ' वर्णज्ञानं वाग्विषयः० ' या पूर्ववार्तिककारांच्या दोन श्लोकांना ' श्लोक-ार्तिक ' म्हटलें आहे.

ख्यायाम्० ' ( सू. ५८ ) या सूत्रापासून ' तिष्यपुनर्वस्वोः० ' ( सू. ६३ ) या सूत्रापर्यंत सहा सूत्रांमध्यें शब्दाच्या अर्थाला अनुसरून ज्या ठिकाणीं लिंगवचनें दृष्टीस पडत नाहींत असे कांहीं शब्द दिले आहेत. त्यांपैकीं ' अस्मद् ' हा एक शब्द आहे; त्याचा ' वयं ' असा प्रयोग बोलणारा एक अथवा दोन असतांनाही होतो असें सूत्रकारांनीं म्हटलें आहे. तसेंच, कांहीं नक्षत्रवाचक शब्दांच्या बाबतींतही वस्तुस्थितीला धरून वचनाचा प्रयोग होत नाहीं असेंही म्हटलें आहे. कदाचित् वेदकालीं नक्षत्रांच्या योगतारा विचारांत घेऊन व तिष्य आणि पुनर्वसु दोन्ही मिळून एक नक्षत्रविभाग मानून बहुवचन केलें असणें शक्य आहे; तसेंच विशाखा नक्षत्राच्या दोन योगतारा विचारांत घेऊन द्विवचन केलें जात असावें.

## १८४. एकशेषान्हिक ( अ. १ पा. २. आन्हिक ३. ). एकशेष शब्दाच्या अर्थाविषयीं भिन्नभिन्न मतें.

या महत्त्वाच्या आन्हिकामध्यें एकशेषाचें मार्मिक विवेचन केल्यामुळें त्याला एकशेषान्हिक म्हणतां येणें शक्य आहे. प्रथमतः वार्तिककारांनीं एक शब्द एकच पदार्थ दाखवूं शकतो असें असल्यामुळें द्विवचनान्त व बहुवचनान्त शब्दप्रयोगांवरून समजून येणारे दोन किंवा दोहींहून ज्यास्त अर्थ दाखविण्यास वास्तविक पाहतां जितके पदार्थ तितक्याच शब्दांची जरूर आहे, परंतु लोकव्यवहारामध्यें एकच शब्द दिसून येतो म्हणून सूत्रकारांना एकशेषाचें विधान करावें लागलें असें म्हटलें आहे. 'एकशेष' शब्दाचा बरोबर अर्थ कोणता आहे याविषयीं निरनिराळीं मतें वार्तिककारांनीं दिलीं आहेत व भाष्यकारांनीं त्यांचें सुंदर स्पष्टीकरण केलें आहे. ' बहुवचन दाखविण्याकरितां एकापुढें एक ठेवलेल्या एकाच स्वरूपाच्या अनेक शब्दांपैकीं एकच शिल्लक राहतो' असा अर्थ केल्यास शब्दसमूहाला फक्त समासामध्येंच प्रातिपदिक संज्ञा होते असा नियम असल्यामुळें त्या अनेक शब्दांना मिळून प्रातिपदिक संज्ञाच करतां येणार नाहीं; व त्यामुळें त्यांना विभाक्तिप्रत्ययच लावितां येणार नाहीं. आतां, ही अडचण टाळण्याकरितां 'विभक्तिप्रत्ययासहित अनेक शब्दांपैकीं एकच शिल्लक राहतो' असा अर्थ केला तर, एकाशिवाय बाकीचीं शब्दस्वरूपेंच फक्त नाहींशीं झाल्यामुळें शब्द एक शिल्लक राहील पण प्रत्यय मात्र सर्व शिल्लक राहतील व एकच शब्द व त्याचेबरोबर अनेक विभाक्तिप्रत्यय या सर्वांना मिळून एकशेष म्हणण्याची पाळी येईल. आतां 'पुन्हां पुन्हां उच्चारलेल्या शब्दांचा समास होतो आणि त्या शब्दांपैकीं एकच शब्द शिल्लक राहतो ' असा अर्थ केला तर विभक्तिप्रत्ययांचा लुक् होऊन ते नाहींसे होतील व शेवटीं योग्य तो एकच विभक्तिप्रत्यय लागेल हें जरी शक्य असलें तरी समास झाल्यामुळें त्या शब्दाला समासस्वर होईल, तसेंच, त्या शब्दाला समासान्त म्हणून सांगितलेले प्रत्यय लागतील हे दोष राहतील; येवढेंच नव्हे, तर तिङन्त शब्दस्वरूपांचा समास होत नसल्यामुळें पचति च पचति च यांचें एकशेषानें पचतः असें रूप होणार नाहीं; व तसें रूप साधावयाचें म्हटल्यास तिङन्तांचा समास सांगावा लागेल. आतां वरील पक्षांतील दोष टाळण्याकरितां राम स् राम स् राम स् अशी स्थिति असतांना समास होण्यापूर्वींच एकशेष होतो म्हणून एकच शब्द ठेवला व विभक्ति प्रत्ययांचा लुक् सांगितला तरी एकशेष झाल्यावर विभक्ति प्रत्ययांचा एकदां लुक् झाल्यामुळें द्विवचनप्रत्यय, बहुवचनप्रत्यय वगैरे प्रत्यय पुन्हां निराळे सांगावे लागतील व तशा ठिकाणीं प्राप्त झालेल्या द्वन्द्व संज्ञेचा निषेध सांगावा लागेल. आतां 'विभक्त्यन्त शब्दांचें अनेक वेळां उच्चारण करून एकच विभक्त्यन्त शब्द कायम ठेवणें' अशी एकशेष शब्दाची व्याख्या केल्यास ब्राह्मणाभ्यां ब्राह्मणाभ्यां (देहि) या

तृतीयान्त व चतुर्थ्यन्त पदांचाही एकशेष होऊं लागेल; त्याप्रमाणेंच 'मापणारा' या अर्थाचा मातृ शब्द व जननी या अर्थाचा मातृ शब्द यांचें विभक्त्यन्त मातृभ्याम् हें रूप सारखें असल्यामुळें मातृभ्याम् मातृभ्याम् या भिन्नार्थी व भिन्नलिंगी शब्दांचाही एकशेष होऊं लागेल; व द्वन्द्व संज्ञा प्राप्त झाल्यामुळें तिचा निषेध सांगावा लागेल व योग्य त्या विभक्तिप्रत्ययाचेंही पुन्हां विधान करावें लागेल.

## १८५. एकशेष शब्दाची व्याख्या.

या सर्व पक्षांचें विवेचन करून भाष्यकारांनीं वर दाखविलेले सर्व दोष न येतील अशा रीतीनें शब्दस्वरूपाला प्राधान्य देऊन एकशेष शब्दाची व्याख्या केली आहे; व एकविभक्तौ याचा 'विभक्तीची विवक्षा असतांना' असा अर्थ करून 'विवक्षित विभक्तिप्रत्यय लागण्याच्या पूर्वी समान शब्दस्वरूप असणाऱ्या अनेक प्रातिपदिकांपैकीं एक शिल्लक राहणें' अशी 'एकशेष' शब्दाची व्याख्या दिली आहे. अशी व्याख्या केली असतां एकशेषापूर्वींचे शब्द विभक्त्यन्त नसल्यामुळें बाकीचे शब्द नाहींसे झाल्यानंतर जो एक शब्द राहील त्याला प्रातिपदिक ही संज्ञा होईल; व त्या प्रातिपदिकाच्या विवक्षित अर्थाप्रमाणें त्याला विभक्तिप्रत्ययही जोडले जातील. पच् वगैरे धातूंमध्यें स्वभावतःच लिंग व संख्या नसल्यामुळें पचतः, पचन्ति इत्यादि ठिकाणीं एकशेष होत नाहीं. ज्याप्रमाणें रामौ, रामाः हीं एकशेष होऊन साधिलेलीं रूपें आहेत तशीं पचतः पचन्ति हीं नाहींत. त्या ठिकाणीं तिङ् प्रत्ययाचा अर्थ जो कर्ता अथवा कर्म त्याच्या संख्येप्रमाणें व स्वरूपाप्रमाणें धातूहून पुरुष व संख्या यांचा वाचक तिङ् प्रत्यय केला जातो. वरतीं विवेचन केलें आहे त्यास अनुसरून एकशेषामध्यें अर्थ निराळे असूनही प्रातिपदिकरूपी शब्द सरूप असल्यास माषाः अक्षाः इत्यादि ठिकाणीं एकशेष होतो असें वार्तिककारांनीं सांगितलें आहे. माष शब्दाचे उडीद, मासा (वजन $\frac{1}{12}$ तोळा) व व्रीहिविशेष असे तीन अर्थ आहेत; तसेंच फासा, बिब्बा आणि गाडीचा कणा असे तीन अक्ष शब्दाचे अर्थ आहेत. माषाः व अक्षाः या शब्दांनीं अनुक्रमें ते सर्व घेतले जातात. काव्यामध्यें श्लेषाच्या उदाहरणामध्यें असा एकशेष आढळून येतो. शब्द भिन्न असून त्यांचा अर्थ एकच असेल तरही वक्रदण्डौ कुटिलदण्डौ, या ठिकाणीं एकशेष होऊन वक्रदण्डाः अथवा कुटिलदण्डाः असा प्रयोग होतो. त्याप्रमाणेंच निरनिराळे पुरुष दाखविणाऱ्या एकाच धातूच्या तिङन्तांचा ( क्रियापदांचा ) एकशेष होतो असेंही वार्तिककारांनीं सांगितलें आहे.

## १८६. जात्यभिधानपक्षीं व व्यक्त्यभिधानपक्षीं एकशेषाच्या आवश्यकतेचें विवेचन.

एक शब्द एकच व्यक्ति दाखवितो असें **व्यक्त्यर्थप्रधान** मत घेतलें असतां अनेक व्यक्तींचें प्रतिपादन करावयास अनेक शब्दांची जरूर असते त्यामुळें तेथें एकशेष व्यावाच लागतो. पण सहविवक्षा असतांना एकच शब्द अनेक अर्थांचें प्रतिपादन करूं शकतो; म्हणजे बह्वर्थप्रतिपादकता ही मूळचीच आहे असें **जात्यर्थप्रधान** मत घेतल्यास एकशेषाची जरूरच नाहीं. विवक्षित अर्थाचा बोध करून देणें हा शब्दस्वभावच आहे असें वार्तिककारांनीं प्रति-

---

१. भर्तृहरीनें वाक्यपदीयाच्या तिसऱ्या कांडामध्यें 'वृत्तिसमुद्देश' प्रकरणांत एकशेषाचें शास्त्रीय विवेचन केलें आहे.

पादन केलें आहे. जाति व व्यक्ति असे शब्दाचे स्वभावतःच दोन अर्थ होतात व शास्त्रांतही ते मानिले जातात. व्यक्ती जरी निरनिराळ्या असल्या तरी त्यांमध्यें असणारी एकच प्रकारची बुद्धि, गो वगैरे शब्द उच्चारले असतां त्यांवरून पांढरी गाय काळी गाय, वगैरे व्यक्तिगत भेद मनांत न येणें, एकाच शब्दप्रयोगावरून त्या शब्दानें दाखविल्या जाणाऱ्या सगळ्या व्यक्तींचें होणारें ज्ञान, तसेंच ब्राह्मणो न हन्तव्यः ( ब्राह्मणाला मारूं नये ), सुरा न पेया ( दारू पिऊं नये ) यांसारखे धर्मशास्त्रांतील जातिवाचक प्रयोग यांवरून सिद्ध होणाऱ्या ' शब्द हे सामान्यार्थाचेंच प्रतिपादन करितात ' या वाजप्यायनाच्या जातिपक्षाचें वार्तिककारांनीं विवेचन केलें आहे. त्यानंतर संग्रहकार व्याडि यांचा व्यक्तिपक्ष मांडला आहे; व त्याला ब्राह्मणी, ब्राह्मणौ इत्यादि शब्दप्रयोगांवरून होणारें व्यक्तिगत लिंगसंख्यांचें ज्ञान, व्यक्तीला उद्देशून सांगितलेलीं वैदिक विधिवाक्यें, शब्दांनीं सांगितलेल्या उत्पत्ति विनाश इत्यादि धर्मांचें व्यक्तीमध्येंच आढळून येणारें अस्तित्व वगैरे समर्थक हेतू दिले आहेत. यानंतर लिंग व संख्या हीं जरी व्यक्तिगत असलीं तरी व्यक्तीच्या संबंधामुळें जातीमध्येंही तीं तात्पुरतीं मानिलीं जाणें शक्य आहे असें प्रतिपादन केलें आहे व जातिपक्षीं शब्दाला लिंग व संख्या यांचा योग न होणें ही अडचण दूर केली आहे.

## १८७. शास्त्रीय लिंगकल्पनेचें विवेचन.

वार्तिककारांनीं या ठिकाणीं लिंगकल्पनेचें थोडक्यांत विवेचन केलें आहे व भाष्यकारांनीं त्याचें मुद्देसूद स्पष्टीकरण केलें आहे. लोकांमध्यें लिंगकल्पना ही जरी पुरुष व स्त्री या नैसर्गिक भेदावर अवलंबून असली तरी शास्त्रीय कार्यें कर्तव्य असतांना शास्त्रीय लिंगकल्पनेवरच शब्दाचें लिंग अवलंबून असतें. वैयाकरणांनीं या बाबतींत 'प्रवृत्ति' म्हणजे उद्युक्त होणें हें पुल्लिंगाचें गमक व 'स्त्यान' म्हणजे जुळणें हें स्त्रीलिंगाचें गमक म्हणून घेतलें आहे. वार्तिककारांनीं 'संस्त्यानप्रसवौ लिङ्गम्' (म. भा. भाषांतर, भाग ४ पृ. १९) या शब्दांमध्यें शास्त्रीय लिंगाची परंपरागत कल्पना मांडली आहे. तसेंच ' संस्त्याने स्त्यायतेर्ड्रट् स्त्री, सूतेः सप्प्रसवे पुमान् ' या श्लोकार्धांत स्त्री व पुमान् या शब्दांची व्युत्पत्ति सांगितली आहे. व भाष्यकारांनीं प्रसव या शब्दाचा प्रवृत्ति हा अर्थ केला आहे. वाढ व ऱ्हास हें प्रवृत्तीचें चिन्ह दिसून येतें. लिंग ठरविणें हे लोकांचें विवक्षेवर अवलबून असतें. शेवटीं, शब्दाचे जाति व व्यक्ति असे दोनही अर्थ असतात; त्यांमध्यें कोणाला प्राधान्य व कोणाला गौणत्व द्यावयाचें हें लोकविवक्षेवर अवलंबून असतें. शब्दाच्या अर्थामध्यें प्रवृत्ति ही प्राधान्यानें विवक्षित असल्यास तो शब्द पुल्लिंगी मानिला जातो, व स्त्यान म्हणजे जुळणी हा अर्थ विवक्षित असल्यास तो शब्द स्त्रीलिंगी समजला जातो. प्रवृत्ति व स्त्यान यांचे अभावीं शब्द नपुंसकलिंगी समजला जातो. ' वृद्धो यूना० ' व ' पुमान् स्त्रिया ' ( सू ६५,६७ ) या सूत्रांमध्यें दोन अथवा आधिक भिन्नभिन्न शब्दस्वरूपांमध्यें केव्हां केव्हां एकशेष दृष्टीस पडतो असें सांगितलें आहे. या एकशेषांत जरी शब्दस्वरूप

---

१. या ओळींत ' सू ' धातूहून प्रसव या अर्थी पुमान् शब्द साधतो (सूतेः प्रसवे पुमान् ) असें म्हटलें आहे; प्रत्यय कोणता तें सांगितलें नाहीं; व सप् या राहिलेल्या शब्दाचें विवेचनही केलें नाहीं उणादि-सूत्र ' पातेर्डुमसुन् ' ( ४।१७७ ) असें आहे. त्यावरून सू धातूला ' डुमसुन् ' हा प्रत्यय लागून ' सू ' धातूमधील सकाराला ( सः ) ' पू'कार ( पृ ) होतो असें या ओळींचें तात्पर्य दिसतें व त्या अनुरोधानें ' सःप् ' असा मूळ पाठ व ' सूतेः सःप् प्रसवे पुमान् ' अशी मूळची ओळ असावी.

भिन्न असलें तरी दोन्ही शब्दांची जाति एकच असते व प्रधान असा पुल्लिंगी शब्द शिल्लक राहतो असें दृष्टोत्पत्तीस येतें. भ्रातृ आणि स्वसृ, पुत्र आणि दुहितृ, तसेंच श्वश्रू आणि श्वशुर या शब्दांचेही एकशेष होतात व प्रधान असा पुल्लिंगी शब्द शिल्लक राहतो व त्याला अनुसरून पुल्लिंगी प्रयोग होतो; वचन मात्र अर्थातच द्विवचन होतें. येथें दिलेल्या पितृ आणि मातृ, भ्रातृ आणि स्वसृ इत्यादि शब्दांविषयीं विशेष लक्षांत ठेवावयाची गोष्ट म्हणजे पितृ भ्रातृ इत्यादि शब्दांना टाप् ङीप् यांसारखा स्त्रीप्रत्यय जोडून स्त्रीत्ववाचक शब्द केव्हांही होत नसतो, व स्त्रीत्वविवक्षा असतांना मातृ स्वसृ इत्यादि स्वतंत्र शब्दच वापरले जातात. शेवटीं 'त्यदादीनि०' ( सू. ७२) या सूत्रामध्यें सामान्य अर्थाचे वाचक जे सर्वनाम शब्द त्यांचा विशेषवाचक अशा कोणत्याही नामाशीं एकशेष होतो व तेथें सर्वनाम शब्दच शिल्लक राहतो असें सूत्रकारांनीं सांगितलें आहे, व आपलें एकशेष प्रकरण पुरें केलें आहे. हें एकशेष प्रकरण पाणिनिव्याकरणाचें वैशिष्टय आहे. पूर्ववैयाकरणांच्या ग्रंथांत एकशेषकल्पना नव्हती असें दिसतें.

## १८८. धातुलक्षणाह्निक ( अ. १ पा. ३ आह्निक १ ). धातुसंज्ञाविवेचन.

पहिल्या दोन पादांमध्यें शुद्ध शब्द कोणते व अशुद्ध शब्द कोणते हें कळणें असें व्याकरणशास्त्राचें प्रयोजन सांगितलें. त्याप्रमाणेंच, शुद्ध शब्दांची संपूर्ण यादी देणें जरी अशक्य असलें तरी कांहीं सामान्यनियम व कांहीं अपवाद सांगून शुद्ध शब्दांचें ज्ञान करून देणें शक्य आहे असेंही सांगितलें. हे नियम व अपवादही थोडक्यांत देतां यावे म्हणून कांहीं शास्त्रीय संज्ञा व परिभाषा करणें इष्ट असल्यामुळें व्याकरणशास्त्रांतील मुख्य मुख्य संज्ञा व परिभाषा सांगितल्या व त्यानंतर शुद्ध शब्दाच्या सामान्य स्वरूपाचें विवेचन केलें. या शुद्ध शब्दांचे मुख्य मुख्य प्रकार म्हणजे प्रातिपदिकें, धातू आणि प्रत्यय, व प्रातिपदिकांचे कृदन्त, तद्धितान्त आणि समास हे अवांतर प्रकार सूत्रकारांना अभिप्रेत असावे असें 'अर्थवदधातु०' व 'कृत्तद्धित०' (१।२।४५, ४६) या सूत्रांवरून दिसून येतें. पुष्कळशीं प्रातिपदिकें धातुसाधित असल्यामुळें प्रथमतः धातूंच्या स्वरूपाबद्दल विवेचन करणें जरूर आहे व तें या पादाच्या पहिल्या आन्हिकामध्यें केलें असल्यामुळें या आन्हिकाला 'धातुलक्षणान्हिक' हें नांव देतां येणें शक्य आहे. 'भूवादयो धातवः' ( १।३।१ ) या सूत्राचें व त्यावरील वार्तिकांचें भाष्यकारांनीं केलेलें विवरण फार मार्मिक आहे. वरवर पाहिलें असतां 'भूवादयो०' या सूत्राचा अर्थ 'भू' या धातूला आरंभ करून गणपाठामध्यें दिलेल्या सर्व शब्दस्वरूपांना धातू म्हणावें असा होतो; पण या अर्थानें सर्व कार्य भागत नाहीं व 'धातु' या संज्ञेचें लक्षणही सांगितलें जात नाहीं. शिवाय केवळ गणपाठांतील शब्दोच्चारणांवरून प्रथम भू धातू, त्यानंतर एध् धातू अशा रीतीनें वेगवेगळीं धातुस्वरूपें समजणेंही कठिण आहे. या ठिकाणीं सूत्रपाठापेक्षां गणपाठ निराळा व तो सूत्रपाठापूर्वी पाणिनीनें रचिला असावा असा निष्कर्ष सूत्रांतील 'आदि' या शब्दावरून मोठ्या खुबीनें भाष्यकारांनीं काढला आहे. धातु म्हणजे काय तें समजल्यानंतरच धातुपाठांतील धातू वेगवेगळे काढणें शक्य होतें म्हणून धातु म्हणजे क्रिया दाखविणारा शब्द असें लक्षण भाष्यकारांनीं प्रथम दिलें आहे. ही क्रिया पचति, पठति वगैरे प्रत्ययान्त शब्दांहूनच भाषेमध्यें जरी कळते तरी अन्वयव्यतिरेकांवरून पच्, पठ् इत्यादि धातूच क्रिया दाखवितात; तसेंच प्रत्यय किंवा उपसर्ग हे त्या क्रियेचे विशेष प्रकार दाखवितात असें भाष्यकारांनीं स्पष्ट सांगितलें आहे. आतां क्रिया दाखविणारा शब्द म्हणजे धातु असें धातूचें लक्षण केल्यास अस्, भू, विद् ( विद्यते ) या केवळ भाव किंवा सत्ता

दाखविणाऱ्या धातूंना ' धातु ' ही संज्ञा देण्यास अडचण पडेल म्हणून ' भाव ' या अर्थाला जो दाखवितो तो धातु असें लक्षण केलेलें बरें असें सांगून शिजविणें, पढविणें याही क्रिया भवति या क्रियेचा ' कर्ता ' होऊं शकल्यामुळें त्यांनाही भाववाचक म्हणण्यास हरकत नाहीं असें भाष्यकारांनीं प्रतिपादन केलें आहे. शिवाय वार्ष्यायणि नामक आचार्योंनीं सहा प्रकारचे भाव सांगितले आहेत; त्यांमध्यें सत्ता हा एक प्रकार स्पष्ट सांगितला आहे. शेवटीं ' क्रिया ' या अर्थाचें जो प्रतिपादन करतो तो, अथवा ' भाव ' या अर्थाचें जो प्रतिपादन करतो तो धातु अशा दोन्ही व्याख्या भाष्यकारांनीं दिल्या आहेत; आणि ' भूवादयो० ' या सूत्राचा अर्थ भू म्हणजे भाव ( सत्ता ), व त्याप्रमाणेंच सत्तासाध्य क्रिया ( भाव्यते यः ) असा दोनही प्रकारचा घेऊन तो प्रतिपादन करणारे जे शब्द ( भू इति अर्थं ये वदन्ति ते भूवादयः ) त्यांना धातू म्हणावें, व ते ' भू 'ला आरंभ करून दिलेले व ' वा ' धातूसारखे असे गणपाठांत सांगितले आहेत असा अभिप्रेत अर्थ मोठ्या खुबीनें काढला आहे.

## १८९. इत्संज्ञाविवेचन.

' उपदेशेजनुनासिक इत् ' ( सू. २ ) या सूत्रापासून ' लशक्वतद्धिते ' ( सू. ८ ). या सूत्रापर्यंत सात सूत्रांमध्यें पाणिनीच्या व्याकरणांत पदोपदीं आढळून येणाऱ्या ' इत् ' या संज्ञेचा विचार केला आहे. गणपाठामध्यें उच्चारलेले धातू, सूत्रपाठामध्यें उच्चारलेलीं प्रातिपदिकें, प्रत्यय, निपात, आगम व आदेश यांचे शेवटीं असलेलीं व्यंजनें आणि त्यांमधील अनुनासिक उच्चारलेले स्वर यांना साधारणतः ही इत् संज्ञा सांगितली आहे; व या इत्संज्ञेला कांहीं अपवादस्थलेंही सांगितलीं आहेत धातूच्या आरंभीं असणारीं ञि, टु, डु हीं अक्षरें व प्रत्ययाच्या आरंभीं असलेले चवर्ग आणि टवर्ग यांतील वर्ण यांना ही इत्संज्ञा होते. हे जे इत् वर्ण किंवा अक्षरें यांच्या निमित्तानें कार्यें होतात; स्वतः मात्र तीं लुप्त होतात म्हणजे तीं काढून टाकल्यानंतर राहणारे शब्द हेच धातू , प्रत्यय, आगम, आदेश असे समजले जातात. इत् हा शब्द जाणें या अर्थाच्या ' इ ' धातूपासून साधला असल्यामुळें ज्याचा लोप होतो तो इत् असा सहजच मनांत अर्थ येतो हे इत्संज्ञक वर्ण ( अनुबन्ध ) ज्या वर्णांना जोडले जातात त्यांचे ते अवयव म्हणून समजले जावे किंवा नाहीं याबद्दल विवेचन करून ते अवयव होतात हें मानणेंच योग्य अशा वार्तिककारांनीं काढलेल्या निष्कर्षाचा भाष्यकारांनीं खुलासा केला आहे ' यथासंख्यमनुदेशः ' ( सू. १० ) या सूत्राचा विचार करतांना सूत्रकारांनीं जितके स्थानी तितकेच आदेश सांगितले असतां ते अनुक्रमें समजले जावे असें सांगितलें आहे; त्याचें विवरण करून उद्देश व अनुदेश यांमधील संख्यासाम्य हें शब्दानें घेतलें असतां कांहीं दोष येतात व अर्थानें घेतल्यासही कांहीं दोष येतात त्या सर्वांचा परिहार करतां येत नाहीं तरी शब्दतः किंवा अर्थतः कसेंही संख्यासाम्य असून एकाच सूत्रामध्यें उभयतांचें उच्चारण असलें तरच त्यांचा क्रमानें संबंध करावा असा निर्णय वार्तिककारांनीं काढला आहे. ' स्वरितेनाधिकारः ' ( सू. ११ ) या सूत्रानें सांगितलेल्या अधिकार या संज्ञेचें विवेचन करतांना स्वरित या धर्मानें युक्त जो शब्द त्याला अधिकार म्हणावें अशी व्याख्या दिली असतां स्वरित शब्दानें अधिकाराचा प्रारंभ समजावा किंवा अन्त समजावा असे प्रश्न उपस्थित होतात व त्यांचा निर्णय करण्यास व्याख्यानाशिवाय दुसरा निश्चित मार्ग नाहीं असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे व अधिकारगति, अधिक कार्य, आणि अधिक कार अशीं तीन प्रकारचीं स्वरित धर्मानें उच्चारण करण्याचीं प्रयोजनें सांगितलीं आहेत व स्पष्टीकरणाकरितां उदाहरणेंही दिलीं आहेत.

## १९०. आत्मनेपदपरस्मैपदाह्निक ( अ. १. पा. ३. आह्निक २. ). आत्मनेपदी आणि परस्मैपदी धातू.

' अनुदात्तङित आत्मनेपदम् ' ( सू. १२ ) पासून ' लुटि च क्लृपः ' ( सू. ९३ ) या सूत्रापर्यंत सर्व सूत्रांमध्यें आत्मनेपदी, परस्मैपदी आणि उभयपदी म्हणून लोकांमध्यें प्रसिद्ध असलेल्या धातूंविषयीं व त्यांच्या पदांविषयीं विचार केला आहे. भाषेमध्यें कांहीं धातूंच्या पुढें अठरा तिङ् प्रत्ययांपैकीं परस्मैपद म्हणून पाणिनीनें उल्लेख केलेले ' ति ' पासून ' मस् ' पर्यंत असलेले नऊच प्रत्यय दृष्टीस पडतात; तर कांहींच्या पुढें ' त ' पासून ' महिङ् ' पर्यंत असलेले नऊच दृष्टीस पडतात; तर, इतर कांहींच्या पुढें सर्व अठराही प्रत्यय दृष्टीस पडतात. याच्या मुळाशीं धातूचा अर्थ जी क्रिया तिचें फल स्वतः कर्त्याला मिळावयाचें असेल तर आत्मनेपद-प्रत्यय लागणें आणि दुसऱ्याला मिळावयाचें असेल तर परस्मैपदप्रत्यय लागणें हा विचार असावा असें ' स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफले ' ( १।३।७२ ) या सूत्रावरून दिसून येतें. या विचारसरणीचें निरीक्षण केल्यास जे केवळ आत्मनेपदी धातू आहेत त्यांचें फल स्वभावतः बहुतांशीं कर्त्याकडेच जाणारें असतें; व जे केवळ परस्मैपदी असतात त्यांचें इतरांकडे जाणारें असतें अशीच मूळ कल्पना जरी असली तरी प्रचलित लौकिक भाषेमधील प्रयोग तसेच वैदिक प्रयोगही पाहिले असतां पाणिनीनें उभयपदी म्हणून दिलेल्या धातूंचे बाबतींतही ' क्रिया-फलास अनुसरून पद ' हें तत्त्व तंतोतंत पाळलेलें दिसत नाहीं. परस्मैपदी म्हणून दिलेल्या गम्, स्था इत्यादि धातूंना, त्याप्रमाणेंच उभयपदी म्हणून दिलेल्या कृ, हृ, भृ, इत्यादि धातूंना विशिष्ट उपसर्गांचा योग असतांना किंवा विशिष्ट अर्थीं फक्त आत्मनेपदप्रत्ययच लागतात; त्याचे उलट आत्मनेपदी अथवा उभयपदी धातूंना विशिष्ट उपसर्गांचा योग असतांना किंवा विशिष्ट अर्थीं फक्त परस्मैपदीच प्रत्यय लागतात असें पुष्कळ ठिकाणीं आढळून येतें. पाणिनीनें वैदिक प्रयोगांकडे व आपल्या वेळच्या लौकिक प्रयोगांकडे लक्ष देऊन सर्व मूल-धातूंचें परिगणन धातुपाठांत केलें आहे व परस्मैपदी धातूंची संख्या मोठी असल्यामुळें केवळ आत्मने-पदी धातूंना ङ् किंवा अनुदात्त अच् अनुबन्ध व उभयपदी धातूंना ञ् किंवा स्वरित अच् अनु-बन्ध खुणेचे वर्ण म्हणून जोडले आहेत. मूळ धातू कोणत्याही पदाचा असो, क्रियापदा-पासून भाव किंवा कर्म हा अर्थ अभिप्रेत असल्यास, त्याप्रमाणें कांहीं विशिष्ट धातू सोडून क्रियाविनिमय अर्थ असल्यास धातूंना सदा आत्मनेपदीच प्रत्यय लाविले जातात ( सू. १३, १४ ). इच्छा या अर्थीं धातूला सन् प्रत्यय लागून जो सन्नन्त धातु होतो त्याला मूळ धातूच्या प्रमाणेंच परस्मैपदी अथवा आत्मनेपदी प्रत्यय लागतात ( सू. ६२ ). तसेंच, कोणत्याही धातूला ' प्रयोजना ' या अर्थीं णिच् प्रत्यय लाविला असतां क्रियाफल कर्त्या-कडे जाणारें असल्यास आत्मनेपदी, नाहींतर परस्मैपदी प्रत्यय लागतात ( सू. ७४ ). धातूला ' आम् ' प्रत्यय लावून त्याचे पुढें कृ धातूचा लिटाचा प्रयोग करून परोक्षभूताचा अर्थ जेव्हां व्यक्त केला जातो तेव्हां मूळ धातूला ज्या पदाचे प्रत्यय लागतात त्याच पदाचे कृ धातूलाही लागतात; परंतु आम् प्रत्ययानंतर भू अथवा अस् धातूच्या लिटाचा प्रयोग केल्यास फक्त पर-स्मैपदीच प्रत्यय लागतात ( सू. ६३ ). सकर्मक धातूचें कर्म कर्त्याप्रमाणें वापरलें गेल्यास धातूला प्रयोजक णिच् प्रत्यय जोडला जातो व त्याचेपुढें फक्त आत्मनेपदी प्रत्ययच लाविले जातात ( सू. ६७ ). धातूंच्या पदामध्यें होणारा बदल पाणिनीनें सूत्रपाठांत अत्यंत परिश्रम-

पूर्वक दाखविला आहे; तरी पण भाषेमध्यें कालान्तरानें होणाऱ्या फरकांमुळें वार्तिककारांच्या वेळीं आणखीही कांहीं ठिकाणीं पदभेद दृष्टीस पडल्यामुळे त्यांची वार्तिककारांनीं स्वतंत्र वार्तिक-वचनें करून नोंद केली आहे.

## १२१. विप्रतिषेधान्हिक ( अ. १ पा. ४ आन्हिक १ ). संज्ञाविप्रतिषेध.

दोन संज्ञासूत्रें अथवा विधिसूत्रें एकदम एका ठिकाणीं प्रवृत्त झालीं तर त्यांपैकीं एकाच सूत्राला वाव द्यावा व तसा दिल्यास तो कोणत्या सूत्राला द्यावा, अथवा दोन्ही सूत्रांनाही पर्यायानें ( विकल्पानें ) वाव द्यावा, अथवा पाळीपाळीनें एकानंतर दुसऱ्या सूत्राला वाव द्यावा याबद्दल या आन्हिकामध्यें विचार केला असल्यामुळें याला विप्रतिषेधान्हिक नांव देणें शक्य आहे. या आन्हिकांत जरी संज्ञा-सूत्रांविषयीं ' आकडारादेका संज्ञा ' ( सू. १ ) हें व इतर सूत्रांविषयीं ' विप्रतिषेधे परं कार्यम् ' ( सू. २ ) हें अशीं दोनच सूत्रें आहेत तरी वार्तिककारांनीं विप्रतिषेधाचे बाबतींत संपूर्ण सूत्रपाठांतील सर्व महत्त्वाचीं स्थळें विचारांत घेऊन सूत्रकारांचा अभिप्राय व्यक्त केला आहे व भाष्यकारांनीं त्या अभिप्रायाचें संपूर्ण विवरण केलें आहे. विशेषतः भाष्यकारांनीं " इहभवता द्वौ हेतू व्यपदिष्टौ " ( सू. १।४।२ वा. ७ ) अशा रीतीनें वार्तिककारांचा उल्लेख करून त्यांनीं दाखविलेल्या अडचणींचा परिहार " पठिष्यति ह्याचार्यः सकृद्गतौ··· " असें म्हणून केला आहे. यावरून सूत्रांवर आक्षेप काढणारे व भवत् या शब्दानें ज्यांचा भाष्य-कारांनीं उल्लेख केला आहे त्या वार्तिककारांपेक्षां सूत्रपूरणार्थक वार्तिकें सांगणारे वार्तिककार निराळे असावे असें दिसून येतें. हे सूत्रपूरणाकरितां वार्तिकें सांगणारे, आचार्य अथवा भगवान् शब्दानें ज्यांचा उल्लेख महाभाष्यकारांनीं केला आहे ते, महर्षि कात्यायन असावे. या ठिकाणीं वार्तिककारांनीं ' एकसंज्ञाधिकारे ' ( वा. २ ), व ' परवचने ' ( वा. ९ ) या शब्दांनीं प्रस्तुत सूत्राचे बाबतींत असलेल्या पाठभेदाचा उल्लेख केला आहे व भाष्यकारांनीं ' आ कडारादेका संज्ञा ' ( सू. १ ) या ऐवजीं ' प्राक् कडारात् परं कार्यम् ' असा पाठभेद प्रत्यक्ष शब्दांत देऊन त्याचें विवेचन केलें आहे ही लक्षांत घेण्याजोगी गोष्ट आहे. यावरून भाष्यकारांचे वेळीं सूत्रपाठामध्यें पाठांतरें होती व सूत्रपाठ पूर्णपणें निश्चित होऊन त्याचें वेदाङ्ग या रूपानें पठण चालू झालें नव्हतें असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. वार्तिककारांनीं ' एका संज्ञा ' हा पाठ घेतल्यास कोणते दोष येतील ते प्रथम दाखविले आहेत ( वार्तिकें ३–८ ); व नंतर ' परं कार्यम् ' हा पाठ घेऊन ' पर संज्ञा करावी ' असा अर्थ केला असतां येणारेही दोष दाखविले आहेत ( वार्तिकें ९--२३ ). यांपैकीं बऱ्याच दोषांचा भाष्यकारांनीं परिहार केला आहे. शेवटीं प्रस्तुत सूत्रानें केलेला एकसंज्ञेचा नियम कोठें इष्ट व आवश्यक आहे हें वार्तिककारांनीं दाखविलें आहे ( वार्तिकें २४–४४ ); व कांहीं ठिकाणीं उदाहरणें दिलीं आहेत. संज्ञासूत्राविषयीं विप्रतिषेधाचा विचार केला असतां अंगसंज्ञा व भ अथवा पद या संज्ञा, कर्मधारयसंज्ञा व तत्पुरुषसंज्ञा अशा तऱ्हेच्या आपाततः विरुद्ध संज्ञांचा निर्देश करून दोनही संज्ञा घेणें इष्ट असूनही त्या होऊं शकत नाहींत या वार्तिककारांनीं दाखविलेल्या अडचणीचा परिहार करून ' एका संज्ञा ' व ' परं कार्यम् ' यांपैकीं कोणताही पाठ घेतला असतां त्या त्या विवक्षित संज्ञांचा समावेश होऊं शकतो हें भाष्यकारांनीं फारच मार्मिकपणें दाखवून दिलें आहे. या ठिकाणीं प्रत्येक वार्तिकाच्या विवरणांत जवळ जवळ त्याच त्याच वाक्यांची पुनरुक्ति भाष्य-

कारांनीं केली असली तरी त्यांच्या सुंदर लेखनशैलीमुळें त्यांनीं केलेलें विवरण वाचतांना कंटाळा तर येत नाहींच, परंतु एक प्रकारची मजाच वाटते. अशा तऱ्हेचें विवरण भाष्यामध्यें अनेक ठिकाणीं आढळून येतें.

## १९२. संज्ञासमावेशविचार.

एकंदरींत पाहतां, या कडाराधिकारामध्यें ( १।४।१ ते २।२।३८ ) ज्या संज्ञा सांगितल्या आहेत त्यांपैकीं एका संज्ञेवर दुसरी संज्ञा अवलंबून असल्यास, किंवा 'च' शब्द उच्चारून समन्वयानें अथवा 'वा' शब्द उच्चारून विकल्पानें सूत्रकारांनीं दोन्ही संज्ञा सांगितल्या असल्यास एका शब्दाला दोन संज्ञा होतात; तसें नसेल तर, जी संज्ञा पर असेल किंवा अनवकाश म्हणजे अपवादभूत असेल ती एकच होते. वार्तिककारांनीं 'अर्थवत् प्रातिपदिकम्' व 'गुणवचनं च' ( वार्तिकें ३९, ४० ) या दोन वचनांनीं अर्थयुक्त शब्दस्वरूपाला प्रातिपदिक संज्ञा व गुणवचन संज्ञा अशा दोन्ही संज्ञा दिल्या आहेत; व 'समासकृत्तद्धित'...... 'एकद्रव्योपनिवेशिनी संज्ञा' ( वार्तिकें ४१-४४ ) या वार्तिकांनीं समास, कृत्, तद्धित, अव्यय, सर्वनाम, जाति, संख्या, डु (षट्), आणि संज्ञा याही संज्ञा सांगितल्या आहेत. वास्तविक पाहतां 'अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' ( १।२।४५ ) असें पाणिनीचें सूत्रच असल्यामुळें 'अर्थवत्प्रातिपदिकम्' या वार्तिकाची जरूरच नाहीं. त्याप्रमाणेंच, समासकृत्तद्धित... ( वा. ४१-४३ ) याही तीन वार्तिकांची जरूर नाहीं; कारण या वार्तिकांमध्यें पाणिनीनेंच वेगवेगळ्या ठिकाणीं सांगितलेल्या समास, कृत् ( कृदन्त ), तद्धित ( तद्धितान्त ), अव्यय, सर्वनाम आणि संख्या या संज्ञाच सांगितल्या आहेत; व त्यांना प्रातिपदिक हीही संज्ञा होईलच. यांशिवाय जाति आणि डु ( षट्संज्ञा ) या वेगळ्या संज्ञा सांगितल्या आहेत. 'एकद्रव्योपनिवेशिनी संज्ञा' (वा.४४ ) या वार्तिकामध्यें 'संज्ञा' शब्दाची व्याख्या दिली आहे. हीं सहा वार्तिकें कशाकरितां सांगितलीं व त्यांचा अर्थ काय हें एक प्रकारचें गूढच आहे. भाष्यकारांच्या मतें या वार्तिकांचा अर्थ थोडक्यांत पुढें दिल्याप्रमाणें आहे. 'अर्थयुक्त शब्दाला प्रातिपदिक म्हणावें' ( वा. ३९ ); 'अर्थयुक्त शब्दाला गुणवचनही म्हणावें' ( वा. ४० ); याशिवाय, 'समास, कृत्, तद्धित, अव्यय आणि सर्वनाम याही संज्ञा सांगाव्या, तसेंच सर्वलिंगीं नसलेल्या शब्दाला जाति म्हणावें' ( वा. ४१ ); 'संख्या संज्ञाही सांगावी' ( वा ४२ ); 'षट्संज्ञेचे ऐवजीं पूर्ववैयाकरणांनीं दिलेली डु ही संज्ञाही सांगावी' ( वा. ४३ ); 'एका द्रव्यावर अवलंबून असणाऱ्या शब्दार्थाला संज्ञा म्हणावें' ( वा. ४४ ); या संज्ञा वरील वार्तिकांमध्यें ज्या क्रमानें सांगितल्या आहेत तो क्रम घेऊन पुढील संज्ञेनें मागील संज्ञेचा बाध करावा व 'गुणवचन' या संज्ञेचा पुढील सर्वच संज्ञांनीं बाध व्हावा असा वार्तिककारांचा अभिप्राय येथें भाष्यकारांनीं सांगितला आहे. संज्ञासमावेश हा संदर्भ लक्षांत घेतां या संज्ञांचा येथें निर्देश करण्यांत वार्तिककारांचा कांहीं निराळाही अभिप्राय असणें शक्य आहे: '( धातु व प्रत्यय सोडून बाकीच्या सर्व ) अर्थयुक्त शब्दांना प्रातिपदिक म्हणावें' ( वा. ३९ ) कारण, सूत्रकारांनीं स्पष्ट सांगितल्याप्रमाणें धातु व प्रत्यय यांना प्रातिपदिक म्हणतां येणार नाहींच; 'गुणवाचक शब्दांनाही प्रातिपदिक म्हणावें' ( वा. ४० ); 'समास, कृदन्त, तद्धितान्त, अव्यय आणि सर्वनाम यांनाही प्रातिपादिक ही संज्ञा समास वगैरे संज्ञा असूनही ज्यास्त द्यावी; तसेंच सर्वलिंगी न चालणाऱ्या जातिशब्दालाही प्रातिपदिक म्हणावें' ( वा. ४१ ); 'संख्यावाचक शब्दांनाही प्रातिपदिक ही ज्यास्त संज्ञा द्यावी' (वा. ४२); 'डु या नांवानें ओळखिले जाणारे

व ज्यांची रूपें तिन्ही लिंगीं सारखीच होतात असे जे षकारान्त व नकारान्त संख्याशब्द त्यांनाही प्रातिपदिक म्हणावें ' ( वा. ४३ ); तसेंच, ' एका द्रव्यावर स्वतंत्र रीतीनें व पूर्णत्वानें राहणारी जी संज्ञा तिचे वाचक जे शब्द त्यांनाही प्रातिपदिक म्हणावें ' ( वा. ४४ ); अशा रीतींनेंही या सहा वार्तिकांचा अर्थ असणें शक्य आहे. जाति, गुण, क्रिया व संज्ञा हीं शब्दांचीं चार प्रवृत्तिनिमित्तें जरी असलीं तरी सामान्य तऱ्हेनें बोलावयाचें म्हटल्यास जाति गुण क्रिया-व संज्ञा हे शब्दार्थांचे चार प्रकार देण्यांत येतात. वस्तुत: जातिवाचक, गुणवाचक, क्रिया-वाचक व संज्ञावाचक असे शब्दांचे चार प्रकार होतात. त्यांपैकीं क्रियावाचक शब्दांना धातु ही संज्ञा सांगितलीच आहे. प्रत्यय जरी कांहीं जातिवाचक व कांहीं गुणवाचक असले तरी त्यांना प्रातिपादिक संज्ञा होत नाहीं असा स्पष्ट निषेध सांगितला आहे. एकंदरींत जातिवाचक, गुणवाचक व संज्ञावाचक शब्दांना प्रातिपदिक संज्ञा सांगण्याकरितां वरील वार्तिकवचनें केलीं असावीं. निपात शब्द हे जाति, गुण इत्यादि चारांपैकीं कोणाचेच वाचक नसल्यामुळें त्यांना प्रातिपदिक संज्ञा सांगण्याकरितां ' निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वम् ' असें स्वतंत्र वचन वार्तिककारांनीं केलें आहे.

## १९३. सूत्रविप्रतिषेधविचार.

' विप्रतिषेधे परं कार्यम् ' ( सू. २ ) या सूत्रांत दोन सूत्रांमध्यें विप्रतिषेध म्हणजे विरोध आला असतांना व दोन्ही सूत्रांनीं सांगितलेलीं कार्यें एकदम होणें अशक्य असतांना अष्टाध्यायी-सूत्रपाठामध्यें पुढें उच्चारलेल्या सूत्राला ज्यास्त प्राधान्य द्यावें व मागील सूत्राचा बाध करावा असा सामान्य नियम सांगितला आहे. लोकामध्येंही कोणीही मनुष्य पूर्वीं बोललेले शब्द किंवा केलेलें काम लक्षांत घेऊनच पुढें बोलतो, किंवा काम करतो; म्हणून पुढील शब्द किंवा काम हें ज्यास्त विचारानें केलेलें समजलें जातें. पुढील सूत्रानें कार्य झाल्यानंतर मागील सूत्र लागू पडल्यास त्यालाही अवसर देण्यांत येतो ( पुनःप्रसङ्गविज्ञानात् सिद्धम् ). प्रस्तुत ' विप्रतिषेधे परं ' हा नियम सर्वच ठिकाणीं पाळला जाणें शक्य नसल्यामुळें कडाराधिकारामध्यें ( १।४।१ ते २।२।३८ ), आभीयाधिकारामध्यें ( ६।४।२२ ते ६।४।१७५ ) तसेंच त्रिपादीमध्यें ( ८।२।१ ते ८।४।६८ ) असलेल्या सूत्रांचे बाबतींत निराळी व्यवस्था सांगितली आहे. अंगाधि-कारामध्येंही ( ६।४।१ ते ७।४।९७ ) साधारणपणें प्रथम सांगितलेल्या विधीला प्राधान्य दिलें जातें; इतरही पुष्कळ ठिकाणीं पर असलेला विधी बाजूला सारला जातो. या ' पूर्वविप्रति-षेधाची ' अनेक उदाहरणें वार्तिककारांनीं निरनिराळ्या ठिकाणीं दिलीं आहेत. भाष्यकारांनीं मात्र अशा ठिकाणीं प्रस्तुत सूत्रांतील 'पर' या पदाचा 'इष्ट' हा अर्थ घेणें शक्य आहे व प्रस्तुत सूत्रानेंच व्यवस्था होणेंही शक्य आहे असें म्हटलें आहे. कांहीं ठिकाणीं पर कार्य बाजूला सारण्या-करितां लौकिक न्यायास अनुसरून एक सबळ कारण मिळतें; तें म्हणजे अंतरंगत्व. वार्तिककारांनीं 'अन्तरङ्ग कार्य हें बहिरङ्ग कार्यापेक्षां ज्यास्त प्रबल असतें' असें म्हणून बहिरङ्ग कार्याला बाजूला सारिलें आहे. पहिल्यानें जें लक्षांत येतें तें अन्तरङ्ग व मागाहून जें लक्षांत येतें तें बहिरङ्ग, तसेंच ज्याला कमी जागा लागते तें अन्तरङ्ग व ज्याला ज्यास्ती जागा लागते तें बहिरङ्ग, त्याप्रमाणेंच जें एकाच पदामध्यें असतें तें अन्तरङ्ग व ज्याला दोन पदांची जरूर लागते तें बहिरङ्ग अशा अनेक रीतींनीं शास्त्रामध्यें अन्तरङ्गबहिरङ्गत्वाचा विचार केला आहे. परिभाषेन्दुशेखरामध्यें नागेशभट्टांनी अन्तरङ्गत्वाचे अनेक प्रकार देऊन विस्तृत विवेचन केलें आहे. वार्तिककारांनीं ' अन्तरङ्गबलीयस्त्वाचीं ' अनेक उदाहरणें दिलीं आहेत ( वार्तिकें ९-२४ ). त्यांचें विवरण

करताना भाष्यकारांनीं ' अन्तरङ्गं बलीयः ' एवढ्यानेंच काम भागत नाहीं; तर ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' म्हणजे अन्तरङ्ग कार्य कर्तव्य असतांना होणारें किंवा झालेलें कार्य असिद्ध असतें ' असा परिभाषारूप सामान्य नियमच घेतला पाहिजे व सूत्रकारांनीं तो ' वाह ऊठ् ' या सूत्रावरून सुचविलाच आहे असें म्हटलें आहे. हा सामान्य नियम घेतल्यास कांहीं दोष येतील ते घालविण्याकरितां ' अचाचें आनन्तर्य असलेलें कार्य कर्तव्य असतांना ही अन्तरङ्गपरिभाषा प्रवृत्त होत नाहीं ' ( नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रक्लृप्तिः ) अशी निषेधरूप दुसरीही परिभाषा ' षत्वतुकोरसिद्धः ' (६।१।८५) या सूत्रावरून सूचित होते असेंही भाष्यकारांनीं सांगितलें आहे.

## १९४. नद्यादिसंज्ञान्हिक ( अ. १ पा. ४ आन्हिक २ ). नदीसंज्ञेचें विवेचन.

या आन्हिकांत प्रथमतः ( सू. ३–९ ) नदीसंज्ञेचा विचार केला आहे; त्यानंतर ( सू. १०--१२ ) लघु व गुरु या संज्ञांचा विचार करून ' यस्मात्प्रत्यय० ' ( सू. १३ ) या सूत्रांत अङ्गसंज्ञेचा विचार केला आहे; व त्यानंतर ( सू. १४–१८ ) भ संज्ञा आणि पद-संज्ञा यांचें विवेचन केल्यानंतर वचनांचा विचार केला आहे. एकंदरींत, सुबन्त व तिङन्त शब्दांमधील जे अङ्ग व प्रत्यय असे दोन विभाग त्यांना लागणाऱ्या महत्त्वाच्या संज्ञांचा येथें विचार केला आहे. नदी संज्ञा ही स्त्रीलिंगवाचक नामालाच देण्यांत येते. ज्या शब्दांच्या शेव-टच्या स्वराला इयङ् व उवङ् होतात असे स्त्री या शब्दाशिवाय बाकीचे सर्व शब्द सोडून राहि-लेल्या सर्व ईकारान्त व ऊकारान्त स्त्रीलिंगवाचक शब्दांना ही नदी संज्ञा दिली आहे. ज्या शब्दांना इयङ् व उवङ् होतात अशांना आम् प्रत्यय व ङित् प्रत्यय पुढें असतांना ही नदी संज्ञा विकल्पानें होते; तसेंच ह्रस्व-इकारान्त व ह्रस्व उकारान्त स्त्रीलिंगी शब्दांनाही आम् व ङित् प्रत्यय पुढें असतांना विकल्प सांगितला आहे. नदी संज्ञा न झाल्यास ह्रस्व इकारान्त व उकारान्त शब्दांना ' घि ' संज्ञा होते. नदी हा शब्द अन्वर्थ शब्दासारखाच घेतला आहे शब्द साधा असो अथवा सामासिक असो नदी संज्ञा ही स्त्रीलिंगवाचकच शब्दांना होते असा वैयाकरणांचा कटाक्ष आहे. याला अपवाद म्हणून वार्तिककारांनीं सामासिक शब्द जरी पुंल्लिंगवाचक झाला तरी समासांतील शेवटचा शब्द जर नदीसंज्ञक असेल तर तेथें ' नदी ' संज्ञा करावी, तसेंच ग्रामणी, सेनानी यांसारखे जे शब्द साधारणतः पुंल्लिंगवाचक असतात त्यांचा जरी स्त्रीलिंगी प्रयोग झाला तरी तेथें ' नदी ' संज्ञा करूं नये असें सांगितलें आहे. नदी हा शब्द नद ( नदट् ) या प्रतिपदिकाला स्त्रीलिंगी ' ई ' प्रत्यय लागून झाला आहे. शेवटच्या ' ई 'का-राला व ' ऊ 'काराला इयङ् व उवङ् आदेश ज्यांना होतात अशा शब्दांचा ' ई 'कार अथवा ' ऊ 'कार धातूंचाच झालेला असतो; तेव्हां ' ई ' हा स्त्रीत्ववाचक प्रत्यय म्हणजे ' नदी ' या शब्दामध्यें जसा आहे तसा ज्या शब्दांचें शेवटीं आहे त्यांना ' नदी ' शब्द म्हणावें अशी मूळ कल्पना असावी. ' षष्ठीयुक्तश्छन्दसि वा ' ( सू. ९ ) या सूत्रामध्यें षष्ठ्यन्त शब्दाच्या पुढील ' पति ' शब्दाला वेदामध्यें विकल्पानें ' घि ' ही संज्ञा सांगितली आहे. या ठिकाणीं भाष्यकारांनीं पति या शब्दाविषयींच विकल्प होतो असें नाहीं तर वेदामध्यें दृष्टीस पडणाऱ्या रूपांच्या अनुरोधानें अनेक विधी विकल्पानें होतात असें सांगून उदाहरणेंही दिलीं आहेत.

## १९५. अंग, पद, भ, बहुवचन, द्विवचन आणि एकवचन या संज्ञांविषयीं विचार.

' यस्मात्प्रययविधि० ' ( सू. १३ ) या सूत्रामध्यें अंगसंज्ञेचा विचार केला आहे. ज्या शब्दस्वरूपापुढें प्रत्यय जोडिला जातो तें जें प्रत्ययापर्यंतचें शब्दस्वरूप त्याला अंग म्हणतात

अशी ' अङ्ग ' या शब्दाची व्याख्या आहे; त्यामुळें प्रत्यय जोडल्यानंतर अंगाच्या स्वरूपांत आगम, विकरण वगैरे आल्यामुळें कांहीं फरक झाला तरी चालतो. ही ' अङ्ग ' संज्ञा व्याकरणशास्त्रांत फार महत्वाची आहे; कारण, अशा अङ्गांना प्रत्यय पुढें असतांना अनेक कार्यें सूत्रकारांनीं अध्याय ६ पाद ४ आरंभापासून सातव्या अध्यायाच्या अखेरपर्यंत पांच पादांमध्यें सांगितलीं आहेत. या अंगाधिकाराच्या पांच पादांमध्यें विशिष्ट वर्णाला किंवा अक्षराला कार्य सांगितलें असतां तो वर्ण किंवा ते अक्षर अंगाला विशेषण झाल्यामुळें ' येन विधिस्तदन्तस्य ' ( १।१।७२ ) या परिभाषासूत्रानें तें कार्य तो वर्ण किंवा तें अक्षर शेवटीं असलेल्या अंगाला होतें एवढेच नव्हे, तर प्रत्ययाला उद्देशून कार्य सांगितलें असतां ज्या प्रकृतीहून तो प्रत्यय केला तिला आरंभ करून त्या प्रत्ययाच्या अखेरपर्यंत शब्दस्वरूप घ्यावें अशी व्यापक परिभाषाही प्रकृत सूत्रांतील ' यस्मात्प्रययविधिस्तदादि प्रत्यये ' या शब्दांवरून वार्तिककारांनीं काढली आहे व तिचे अनेक उपयोग दाखविले आहेत, व अपवादस्थलेंही दिलीं आहेत. ' सुप्तिङन्तं पदम् ' ...' अयस्मयादीनि च्छन्दसि ' (सू १४–२० ) या सूत्रांमध्यें पद व भ या संज्ञांचें विवेचन केलें आहे. पद ही संज्ञा मुख्यतः प्रातिपदिकाचें सुबन्त रूप व धातूचें तिङन्त रूप यांना उद्देशून केली असली तरी सर्वनामस्थान प्रत्यय सोडून व भ संज्ञेचा विषय सोडून सुप् प्रत्ययाच्या मागील प्रातिपदिकालाही ती सांगितली आहे. वेदामध्येंही अशा तऱ्हेची पदसंज्ञा झालेलें पद मूळच्या स्वरूपांत असेल तेव्हां दाखविण्याचा प्रघात दृषद्भ्याम् , पृत्सु अशा प्रकारच्या ठिकाणीं दृषद् भ्याम् तसेंच पृत् सु अशीं स्वतंत्र पदें पाडण्यावरून दिसून येतो. ' बहुषु बहुवचनम् ' व 'द्व्येकयोर्द्वि०' (सू.२१–२२) या सूत्रांमध्यें वचनांचें विवेचन केलें आहे. सु औ अस् वगैरे सुप् प्रत्यय व ति तः अन्ति वगैरे तिङ् प्रत्यय यांची कामगिरी ज्या शब्दांपुढें ते प्रत्यय लाविले जातात त्या शब्दांच्या अर्थाची संख्या दाखविणें आणि त्यांचा वाक्यांतील क्रियेशीं किंवा इतर अर्थाशीं संबंध दाखविणें अशी दोन प्रकारची असल्यामुळें कारक व संख्या असे दोन विभक्त्यर्थ मानिले जातात. प्रस्तुत दोन सूत्रांमध्यें संख्यावाचक वचनांचा विचार केल्यानंतर भाष्यकारांनीं पुढील आन्हिकांत कारकांचा स्वतंत्रपणें विचार केला आहे.

## १९६. कारकान्हिक ( अ. १ पा. ४ आन्हिक ३ ). कारक संज्ञेचा अर्थ.

क्रियेचें साधक अथवा उपकारक अशी ' कारक ' या शब्दाची सर्वसामान्य व्याख्या सूत्रकारांना अभिप्रेत असावी. ' कारक ' या शब्दाची व्युत्पत्ति पाहिली असतां ' जो करतो तो कारक ' ( करोतीति कारकः ) अशी असल्यामुळें जरी ती प्रत्यक्ष कर्त्याला लागू होत असली तरी मुख्य क्रिया ही नेहमी अनेक अवांतर क्रियांचा समूह मिळून होत असल्यामुळें त्या त्या अवांतर क्रियांना प्राधान्य दिलें असतां त्या अवांतर क्रियांच्या कर्त्यांनाही कारक संज्ञा देतां येते. उदाहरणार्थ—' गच्छति ' यांतील गमनक्रिया अथवा ' पचति ' यांतील पाकक्रिया घेतल्यास ती गमनक्रिया अथवा पाकक्रिया कोठून, कोणाकरितां, कशानें, कोठें तसेंच कोणाला होते व ती कोण करतो हें पाहिल्यास निरनिराळे अर्थ ती क्रिया घडवून आणण्याच्या कामीं उपयोगीं पडतात व ते अर्थही एक प्रकारें अवांतर क्रिया करीत असल्यामुळें त्या त्या अवांतर क्रियेचे कर्ते होऊं शकतात, व त्यामुळें त्यांनाही कारक ( करोतीति कारकम् ) असें म्हणतां येतें. वार्तिककारांनीं येथें पाक ही क्रिया उदाहरणार्थ घेऊन कर्त्यानें केलेला पाक, अधिकरणानें केलेला पाक, त्याप्रमाणेंच करणानें केलेला पाक हे कसे निराळे असतात तें दाखवून त्या त्या पाकांच्या दृष्टीनें अधिकरण व करण यांनाही वक्त्याची इच्छा असल्यास कर्ता कसें म्हणतां

येईल तें दाखविलें आहे; व ' शितावरून भाताची परीक्षा ' ( पर्याप्तो ह्येकः पुलाकः स्थाल्या निदर्शनाय ) या न्यायानें अपादान वगैरे इतर कारकांनाही इच्छा असल्यास कर्तृत्व देतां येईल असें भाष्यकारांनीं त्याचें स्पष्टीकरण केलें आहे. कर्ता शब्दाची व्याख्या सूत्रकारानीं ' स्वतन्त्रः कर्ता ' अशी केली आहे; व कर्ता जवळ असतांना जरी इतर कारकें परतन्त्र असलीं तरी बोलणाऱ्याच्या इच्छेनुरूप कर्त्याला बाजूला सारून इतर कारकांनाही स्वातंत्र्य देऊन कर्ता करण्यांत येतें हें भाष्यकारांनीं राजा जवळ असतांना अमात्य वगैरे लोक जरी परतन्त्र असले तरी राजा दूर असतांना त्यांना त्यांचे विषयांत स्वातंत्र्यच असतें हा दृष्टान्त देऊन सुंदर रीतीनें प्रतिपादन केलें आहे.

## १९७. अपादान, संप्रदान, करण व अधिकरण या कारकांविषयीं विचार.

कारके ( सू. २३ ) हें अधिकारसूत्र आहे. त्यामध्यें ' कारके ' येथें सप्तमी विभक्ति आहे तरी तिचा प्रथमेसारखा अर्थ करावा व ' कारकम् ' अशी दरेक पुढील सूत्रांमध्यें अनुवृत्ति करावी, व ' कारक संज्ञा होते ' असा अर्थ करून अपादान, संप्रदान वगैरे संज्ञांना ' कारक ' असें म्हणावें असा ' संज्ञापक्ष ' येथें भाष्यकारांनीं दिला आहे; त्याप्रमाणेंच कारके येथील सप्तमी विभक्तीचा ' क्रियाविषय असतांना ' असा अर्थ करून क्रियेलाही कारक म्हणतां येईल असा ' विषयपक्ष ' ही दिला आहे. ' ध्रुवमपायेऽपादानम् '......' भुवः प्रभवः ' ( सूत्रें २४–३१ ) या सूत्रांमध्यें अपादान संज्ञेचा विचार केला आहे. ज्याच्यापासून दुसरी वस्तु दूर जाते त्या स्थिर पदार्थाला ' अपादान ' म्हणावें असें अपादानाचें लक्षण सांगून भाष्यकारांनीं अशा तऱ्हेचें ' अपादान ' भीत्रार्थानां भयहेतुः ' इत्यादि सातही ( सू. २५–३१ ) सूत्रांमध्यें संभवत असल्यामुळें तीं सूत्रें लिहिलीं नसतीं तरी चाललें असतें असें म्हटलें आहे. ' कर्मणा यमभि०'...' अनुप्रतिगृणश्च ' ( सू. ३२–४१ ) या सूत्रांमध्यें ' संप्रदान ' संज्ञेचा विचार केला आहे. ' कर्मणा० ' ( सू. ३२ ) या सूत्रामध्यें कर्म या शब्दाचा ' क्रियेचें ईप्सिततम ' अशी व्याख्या केलेलें कर्म असा अर्थ घेतां येईल व ' क्रिया ' हाही नेहमींचा अर्थ घेतां येईल;

---

१. या ' कारक ' संज्ञेचा विचार भर्तृहरीनें वाक्यपदीय कांड ३ मध्यें ' दिक्समुद्देश ' प्रकरणांत खुलासेवार केला आहे. भर्तृहरीनें दिक् ही सर्वव्यापक स्वतंत्र शक्ति मानिली आहे. या दिक्शक्तीमुळें क्रियेचीं निरनिराळीं स्वरूपें अभिव्यक्त होतात. ' व्यतिरेकस्य यो हेतुरवधिप्रतिपाद्ययोः । ऋज्वित्येव यतोऽन्येन विना बुद्धिः प्रवर्तते ।। कर्मणो जातिभेदानामभिव्यक्तिर्यदाश्रया । या स्वैरुपाधिभिर्भिन्ना शक्तिर्दिगिति कथ्यते ।। ' अशी दिक् शक्तीची व्याख्या भर्तृहरीनें दिली आहे. ( वा. प. कांड ३ समुद्देश ६ श्लोक २,३ ), या दिक्शक्तीमुळेंच पूर्वेकडील, पश्चिमेकडील, पुढचा, मागचा, बाजूचा वगैरे अपारमार्थिक लौकिक व्यवहार चालू राहतात. दिक्शक्तीमुळें घडून येणाऱ्या निरनिराळ्या क्रियांच्या कर्त्यांना कारक अथवा साधन ही संज्ञा दिली जाते. साधन शब्दाची भर्तृहरीनें ' क्रियाणामभिनिष्पत्तौ सामर्थ्यं साधनं विदुः ' ( वा. प. ३।७।१ ) अशी व्याख्या दिली आहे. या शक्तीचे लोकामध्यें सहा प्रकार दिसून येतात असे भर्तृहरीनें ' निमित्तभेदादेकैव भिन्ना शक्तिः प्रतीयते । षोढा कर्तृत्वमेवाहुस्तत्प्रवृत्तेर्निबन्धनम् ' ( वा. प. ३।७।३७ ) या कारिकेंत स्पष्ट म्हटलें आहे. या क्रियासाधनांचे अथवा कारकांचे भर्तृहरीनें कर्म, कर्ता, हेतु ( करण ), संप्रदान, अपादान, आणि अधिकरण असे सहा प्रकार वर्णिले आहेत ( ३।७।४४ ); कर्माचे निवर्त्य, विकार्य आणि प्राप्य असे तीन प्रकार दिले आहेत; संप्रदानाचे तसेच अपादानाचेही त्यानें तीन तीन प्रकार दिले आहेत.

व तो घेतल्यास युद्धाय संनह्यते, पत्ये शेते या ठिकाणीं युद्धाय आणि पत्ये यांना संप्रदान संज्ञा होईल. ‘ साधकतमं करणम् ’ ( सूत्र ४२ ) या सूत्रामध्यें करण या शब्दाची व्याख्या क्रियेचें अत्यंत साधक अशी दिली आहे. या सूत्रांत ‘ साधक ’ या शब्दानेंच ‘ अतिशय साधक ’ असा अर्थ लौकिक व्यवहारांत मनामध्यें येतो त्याप्रमाणें तो घेतां येत असतांनाही सूत्रकारांनीं ‘ साधकतम ’ शब्द घातल्यावरून या कारक-प्रकरणामध्यें विशेष शब्द उच्चारला असल्याशिवाय तरतमभाव ध्यावयाचा नाहीं असें सूचित होतें; व त्यामुळें ‘ सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतराः ’ या ठिकाणीं गौण रीतीनें केवळ काल्पनिकच संयोगवियोग असूनही सांकाश्य शब्दाला अपादान संज्ञा होते; त्याप्रमाणेंच ‘ गङ्गायां गावः ’ येथेंही ‘ गङ्गा ’ या शब्दाला अधिकरण संज्ञा होते.

### १९८. ‘ कर्म ’ कारक व अकथित कर्म.

‘ कर्तुरीप्सिततमं कर्म ’ ( सू. ४९ ) या सूत्रांत ‘ कर्त्याला जें अत्यंत इष्ट तें कर्म ’ अशी ‘ कर्म ’ संज्ञेची व्याख्या केली आहे. त्यानंतर ‘ तथायुक्तं चानीप्सितम् ’ ( सू. ५० ) या सूत्रामध्यें कर्त्यानें केलेल्या क्रियेचा संबंध ज्याच्याशीं घडतो अशा अनीप्सित कारकालाही ‘ कर्म ’ ही संज्ञा सांगितली आहे; व विषं भक्षयति, चौरान् पश्यति, अहिं लङ्घयति हीं उदाहरणें दिलीं आहेत. ‘ अकथितं च ’ ( सू ५१ ) या सूत्रांत लोकामध्यें ज्यांना द्विकर्मक धातू म्हणतात त्यांचा विचार केला आहे. ‘ अकथित ’ याचा अपादान वगैरे संज्ञांनीं रहित असा अर्थ करून मुख्य कर्माचें निमित्तभूत किंवा त्याच्याशीं संबद्ध अशा पदार्थाला अपादान वगैरे कारक संज्ञा प्राप्त न झाल्यास किंवा प्राप्त झाल्या असतांनाही त्यांची तशी विवक्षा न केल्यास त्या पदार्थाला अकथित कर्म म्हणावें असा या सूत्राचा अर्थ भाष्यकारांनीं केला आहे. अशा प्रकारचें अकथित कर्म व मुख्य कर्म हीं दोन्ही ‘ कर्मणि द्वितीया ’ ( २।३।२ ) या सूत्रानें द्वितीया विभक्तींत घातलीं जातात व ज्या धातूंशीं त्यांचा योग होतो त्या दुह्, याच् वगैरे धातूंना द्विकर्मक म्हणण्यांत येतें. कर्मणि प्रयोगामध्यें मुख्य कर्म प्रथमेंत घालावें व गौण कर्माहून षष्ठी विभक्ति करावी असें कांहीं वैयाकरण म्हणतात; तर इतर प्रख्यात वैयाकरण याच्या उलट गौण कर्माहून प्रथमा विभक्ति करावी व प्रधानकर्म द्वितीया विभक्तींतच ठेवावें असें म्हणतात. अकर्मक धातूंशीं संबद्ध कालवाचक, देशवाचक, भाववाचकप्रत्ययान्त तसेंच गन्तव्यमार्गवाचक अशा शब्दांनाही कर्मसंज्ञा होते व या गौण कर्माला ‘कल्म’ असेंही म्हणतात. भाष्यकारांनीं हें सर्व विवरण जुन्या वैयाकरणांच्या याविषयींच्या कारिका देऊन केलें आहे; व शेवटीं ‘ नेताऽश्वस्य स्रुघ्नं ’, व ‘ नेताऽश्वस्य स्रुघ्नस्य ’ यांतील कोणता प्रयोग बरोबर आहे असा प्रश्न उपस्थित करून दोन्ही प्रयोग होऊं शकतात असें स्वतःचें मत ‘ उभयथा गोणिकापुत्रः ’ या वाक्यांत दिलें आहे. ‘ गतिबुद्धि० ’ ( सू. ५२ ) या सूत्रामध्यें धातूंना णिच् प्रत्यय लावल्यानंतर व णिजन्त धातूच्या प्रयोजकाला ‘ कर्ता ’ ही संज्ञा झाल्यानंतर पूर्वीच्या कर्त्याला धातू हा गत्यर्थक, बुद्ध्यर्थक, भक्षणार्थक, शब्दकर्मक अथवा अकर्मक असल्यास ‘ कर्म ’ ही संज्ञा होते असें सांगितलें आहे. ‘ स्वतन्त्रः कर्ता ’ ( सू. ५४ ) या सूत्रामध्यें ‘ कर्ता ’ या शब्दाची स्वतन्त्र म्हणजे क्रिया करण्याविषयीं मुख्यत्वानें विवक्षित अशी व्याख्या दिली आहे; व हें स्वातन्त्र्य गौण रीतीनें कां होईना, पण प्रयोज्य कर्त्याला असल्यामुळें त्याला ‘ कर्ता ’ ही संज्ञा होते; पण त्याला ‘ गतिबुद्धि ’ या सूत्रानें कर्मसंज्ञा न झाल्यास तो कर्ता अनभिहित असल्यामुळें त्याहून तृतीया विभक्ति होते.

## १९९. निपाताह्निक ( अ. १ पा. ४. आह्निक ४. ) निपातसंज्ञेचें विवेचन.

या आह्निकांत निपात, परस्मैपद, आत्मनेपद, वचन, विभक्ति, पुरुष, संहिता व अवसान या संज्ञांचा जरी विचार केला असला तरी प्रामुख्यानें ' प्राग्रीश्वरान्निपाताः ' (सू. ५६) ......' अधिरीश्वरे ' ( सू. ९७ ) या सूत्रांमध्यें निपातांचा विचार केला असल्यामुळें या आह्निकाला निपाताह्निक म्हणतां येईल. ' प्राग्रीश्वरान्निपाताः ' ( सू. ५६ ) या सूत्रांत सरळ ईश्वर शब्द उच्चारण्याऐवजीं ' रीश्वर ' शब्द सूत्रकारांनीं कां घातला त्याचें विवेचन 'रीश्वरादीश्वरो मा भूत्० ' ही जुनी कारिका उद्धृत करून केलें आहे; व प्राक् हा स्पष्ट शब्द सूत्रामध्यें घातल्यामुळें निपात ही संज्ञा उपसर्ग, गति व कर्मप्रवचनीय या संज्ञांचे बरोबर होऊं शकते असें अनुमान काढलें आहे. प्र वगैरे शब्दांना क्रियायोग असतांना निपात या संज्ञेशिवाय उपसर्ग ही संज्ञा होऊं शकते, क्रियायोग नसतांना विशिष्ट अर्थीं प्र वगैरेंना कर्मप्रवचनीय ही संज्ञाही निपात या संज्ञेबरोबरच होते, उपसर्गांना गति हीही संज्ञा होते. 'चादयोऽसत्त्वे' ( सू. ५७ ) या सूत्रांतील ' असत्त्वे ' या शब्दाच्या अर्थाचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं ' सत्त्व ' या शब्दाचे ' द्रव्य ' व ' भाव ' असे दोनही अर्थ दिले आहेत. द्रव्य या अर्थीं सत्त्व हा शब्द सद् या धातूपासून साधतां येतो व ज्याच्यामध्यें जाति, गुण वगैरे धर्म राहतात तें म्हणजे द्रव्य ( सीदन्ति अस्मिञ्जात्यादयस्तद् द्रव्यं ) असा अर्थ करतां येतो. सतो भावः सत्त्वम् अशा रीतीनें अस् धातूपासून ' भाव ' या अर्थींही सत्त्व शब्द साधतां येतो. अशा रीतीनें सत्त्व शब्दाचे द्रव्य व भाव असे दोन्ही अर्थ घेतल्यास जगांतील सर्व पदार्थांचा त्यामध्यें संग्रह झाल्यामुळें ' असत्त्व ' या शब्दानें काय समजावें याविषयीं सहजच संशय येतो. ' असत्त्वे ' या ठिकाणीं प्रतिषेध घ्यावा किंवा पर्युदास घ्यावा याविषयीं विवेचन करून जरी प्रतिषेध बरा असें भाष्यकारांनीं म्हटलें असलें तरी ' असत्त्व ' या शब्दानें कोणता अर्थ घ्यावा याविषयीं त्यांनीं कांहींही खुलासा केला नाहीं. तरी पण, वार्तिककारांनीं 'निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वम् '(१।२।४५ वा. १२) असें वचन केल्यावरून असत्त्व याचा अर्थ 'सत्त्वाभाव' म्हणजे अनर्थकत्व हा वार्तिककारांना इष्ट असावा असें दिसतें; व सत्त्वाभाव याचा अनर्थकत्व हा अर्थ कसा होऊं शकतो हें दाखविण्याकरितांच भाष्यकारांनीं या ठिकाणीं सत्त्व शब्दाचे द्रव्य व भाव असे दोन्ही अर्थ होतात असें प्रतिपादन केलें असावें. ' कर्मप्रवचनीयाः ' ( सू. ८३ ) हें अधिकारसूत्र करून त्याच्या पुढें ' अनुर्लक्षणे '......' अधिरीश्वरे ' ( सू. ८४—९७ ) या सूत्रांनीं अनु, उप इत्यादि निपातांना निरनिराळ्या अर्थीं कर्मप्रवचनीय संज्ञा सांगितली आहे. ही कर्मप्रवचनीय संज्ञा झाली असतांना या अनु, उप वगैरे निपातांना क्रियेचा योग नसल्यामुळें उपसर्ग व गति या संज्ञा होत नाहींत. कर्मप्रवचनीय ही संज्ञा अन्वर्थ आहे. येथें कर्म या शब्दाचा अर्थ क्रिया जरी असला तरी कर्मप्रवचनीय या संज्ञेचा अर्थ ' ये क्रियां प्रोक्तवन्तः, ये संप्रति क्रियां नाहुः, ये अप्रयुज्यमानस्य क्रियामाहुस्ते कर्मप्रवचनीयाः ' म्हणजे ' प्रकृत प्रयोगामध्यें क्रियावाचक धातूचा योग नसतांनाही जे क्रियेचा संबंध दाखवितात ते कर्मप्रवचनीय ' असा भाष्यकारांनीं केला आहे व कर्मप्रवचनीय संज्ञा असतांना उपसर्ग संज्ञा कां होत नाहीं तें स्पष्ट केलें आहे. भर्तृहरीनें निपात आणि कर्मप्रवचनीय या संज्ञांचे बाबतींत विद्वत्तापूर्ण विवेचन वाक्यपदीय कांड २ श्लोक १८९—२०६ यांमध्यें केलें आहे.

---

१. याविषयीं विस्तृत विवेचन मागें प्रस्तावना पृष्ठ ७७ परि. १२ मध्यें आलें आहे.

## २००. परस्मैपद व आत्मनेपद या संज्ञांविषयीं विवेचन.

'लः परस्मैपदम्' व 'तङानावात्मनेपदम्' (सू. ९९, १००) या सूत्रांमध्यें परस्मैपद व आत्मनेपद या संज्ञांचा विचार केला आहे; व त्यानंतर 'तिङस्त्रीणि त्रीणि०'...... 'शेषे प्रथमः' (सू. १०१—१०८) या सूत्रांमध्यें पुरुष, विभक्ति व वचन या संज्ञांचा विचार केला आहे. परस्मैपद व आत्मनेपद या संज्ञा मूळच्या अन्वर्थ असाव्या; व पाणिनीनें सांगितल्याप्रमाणें क्रियेचें फल कर्त्यास स्वतःला मिळावयाचें असेल तर आत्मनेपद प्रत्यय व दुसऱ्यास मिळावयाचें असेल तर परस्मैपद प्रत्यय धातूला जोडिले जावे अशी मूळ व्यवस्था असावी. उभयपदी धातूंच्या बाबतींत ही व्यवस्था थोडीफार दृष्टीस पडते. उदाहरणार्थ, याच् धातू हा उभयपदी असला तरी याचनेचें फल हें बहुधा स्वतःलाच मिळावयाचें असल्यामुळें त्याहून आत्मनेपदीच प्रत्यय होतात. जे धातू केवल परस्मैपदी किंवा केवल आत्मनेपदी आहेत त्यांचे बाबतींत वरील व्यवस्था शक्य नसली तरी साधारणपणें त्या धातूंच्या क्रियेचें फल स्वतःला किंवा दुसऱ्याला जाणें जसें शक्य असेल त्या दृष्टीनें त्यांचे पुढें लागणाऱ्या प्रत्ययांचें पद अंमलांत आलें असावें. उदाहरणार्थ, गम् व त्याचे समानार्थक धातू बहुशः परस्मैपदी आढळून येतात; एध्, वृध्, स्पर्ध्, वगैरे धातू बहुशः आत्मनेपदी आढळून येतात. वचनांचे बाबतींत एक, दोन व बहु हा क्रम नैसर्गिकच आहे व त्याप्रमाणें तीन वचनें भाषेंत उपयोगांत आलीं; परंतु कालांतरानें बोलणारांची संख्या वाढल्यामुळें व भाषेचा प्रचार समाजांतील खालच्या वर्गापर्यंत पोचल्यामुळें भाषा सुटसुटीत करण्याकडे लोकांची प्रवृत्ति झाली व आत्मनेपद प्रत्यय, दहा लकारांपैकीं कांहीं लकार, चतुर्थी विभक्ति व द्विवचनप्रत्यय यांचा प्रचार प्राकृत भाषांत पार नाहींसा झाला. प्रथम, मध्यम, व उत्तम या पुरुषांचे बाबतींत विचार केला असतां मनुष्यस्वभावाचें अवलोकन केल्यास मनुष्य आपले भोंवतीं चोहीकडे प्रथम पाहतो व म्हणून त्याचे मनांत इतरांचा विचार प्रथम येतो, नंतर तो शेजाऱ्याजवळ आपले विचार प्रगट करतो व नंतर स्वतः मनन करतो या लौकिक व्यवहारास अनुसरूनच प्रथम पुरुष, नंतर मध्यम पुरुष, व नंतर उत्तम पुरुष ही व्यवस्था वैयाकरणांनीं केली असावी. तत् त्वं असि, अहं ब्रह्मास्मि या उपनिषद्महावाक्यांचा क्रमही या बाबतींत लक्षांत घेण्याजोगा आहे. पुरुषव्यत्यय होऊन प्रथमपुरुष, द्वितीयपुरुष, व तृतीयपुरुष अशी हल्लींच्या देशी भाषांमध्यें आढळून येणारी व्यवस्था हा केवळ इंग्रजी भाषेचा परिणाम आहे हें स्पष्ट दिसून येतें.

पहिला अध्याय (संज्ञाध्याय) समाप्त.

---

१. भर्तृहरीनें परस्मैपद व आत्मनेपद या संज्ञांना 'उपग्रह' म्हटलें आहे व त्यांविषयीं विवेचन वाक्यपदीयाच्या तिसऱ्या काण्डामधील उपग्रहसमुद्देशामध्यें केलें आहे. (वा. प. ३।१२।१–२७)

२. वचन संज्ञेविषयीं विवेचन भर्तृहरीनें वाक्यपदीयाच्या तिसऱ्या काण्डामधील संख्यासमुद्देशांत केलें आहे. (वा. प ३।११।१–३२)

३. पुरुषसंज्ञेचें विवेचन भर्तृहरीनें वाक्यपदीयाच्या तिसऱ्या काण्डामधील पुरुषसमुद्देशांत केलें आहे (वा. प. ३।१०।१–९)

## २०१. समर्थान्हिक ( अ. २ पा. १ आन्हिक १ ) सामर्थ्य शब्दाचा अर्थ.

पहिल्या अध्यायामध्यें संज्ञांचा विचार केल्यानंतर या दुसऱ्या अध्यायामध्यें सुबन्त व तिङन्त पदांच्या कार्यांचा विचार केला आहे व पदांच्या सर्व कार्यांविषयीं सामर्थ्य असेल तरच तीं कार्यें करावीं असा दंडक घातला आहे. सामर्थ्य म्हणजे काय याविषयीं या पहिल्या आन्हिकामध्यें विचार केला असल्यामुळें या आन्हिकाला सामर्थ्यान्हिक म्हणतां येईल. या आन्हिकांत 'समर्थः पदविधिः' ( सू. १ ) हें एकच सूत्र आहे; व त्याला 'समर्थसूत्र' म्हणण्याचा वैयाकरणांचा प्रघात आहे. हें समर्थसूत्र 'अधिकार'सूत्र समजून पुढील दरेक सूत्रांत त्याची अनुवृत्ति ध्यावी, किंवा 'परिभाषा'सूत्र समजून् अष्टाध्यायीमध्यें ज्या ज्या सूत्रांत पदाला उद्देशून कार्य सांगितलें असेल त्या त्या सूत्रांत ज्या दोन पदांना उद्देशून कार्य सांगितलें आहे त्यांमध्यें 'सामर्थ्य' असल्याशिवाय तें कार्य करावयाचें नाहीं असा अर्थ करावा या दोनही विकल्पांचा विचार केला आहे; व दोन्ही विकल्पांतील गुणदोष दाखविले आहेत. तसेंच 'सामर्थ्य' या शब्दाचा अर्थ समास वगैरे वृत्तींमध्यें आढळणारा 'एकार्थीभाव' संबंध हा अर्थ घ्यावा किंवा वाक्यांत आढळून येणारा पदांमधील 'व्यपेक्षा'संबंध हा अर्थ घ्यावा याविषयीं विचार केला आहे व परिभाषासूत्र घेऊन एकार्थीभावरूप सामर्थ्य घ्यावें असा निर्णय दिला आहे. पूर्वीच्या वाक्यांतील शेवटच्या शब्दाचा पुढील वाक्यांतील आरंभींच्या शब्दाशीं जरी कसाबसा संबंध दाखवितां आला तरी त्या दोन शब्दांमध्यें सामर्थ्य नसल्यामुळें समास होत नाहीं असें येथें भाष्यकारांनीं स्पष्ट म्हटलें आहे व पुष्कळ उदाहरणेंही दिलीं आहेत. 'सह सुपा' ( २।१।४ ) या सूत्रानंतर 'अनेकमन्यपदार्थे' ( २।२।२४ ) या सूत्रापर्यंत दरेक समाससूत्रामध्यें 'सुप् सुपा समस्यते' अशीं पदें अनुवृत्तीनें येत असल्यामुळें बहुव्रीहि द्वन्द्व वगैरे समासांशिवाय बाकी सर्व समास हे दोनदोन पदांचेच होत असल्यामुळें ज्या पदांचा समास करावयाचा त्यांतील कोणतेंही पद इतर पदाशीं संबद्ध असल्यास तें संबद्ध पद सापेक्ष म्हणून असमर्थ झाल्यामुळें समासास येणाऱ्या अडचणीचा येथें भाष्यकारांनीं विचार केला आहे; व समासाकरितां योजिलेल्या पदांपैकीं मुख्य पद जर बाहेरील शब्दाशीं संबद्ध असेल तर अर्थ समजण्यास कांहीं त्रास पडत नसल्यामुळें अशा ठिकाणीं समास होतो, त्याप्रमाणेंच गुरुपुत्रः दासभार्या इत्यादि ठिकाणीं गुरु दास वगैरे शब्द गौण असून इतर शब्दाशीं जरी संबद्ध असले तरी ते गुरु दास वगैरे शब्द कोणाचा गुरु, कोणाचा दास या रीतीनें स्वभावतःच सापेक्ष असल्यामुळें सापेक्ष असूनही त्यांचा पुत्र भार्या वगैरे शब्दांशीं समास होऊं शकतो असा निर्णय भाष्यकारांनीं दिला आहे. वास्तविक रीतीनें पाहिल्यास कोणत्याही पदांचा समास होतांना समासाचा अर्थ सहज कळण्याजोगा असणें ( अर्थगमकत्व ) ही बाब अत्यंत आवश्यक गणली जाते व त्यामुळें 'समर्थ' पदाचा प्रस्तुत सूत्रामध्यें विशेष उपयोग नाहीं असेंही येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे.

## २०२. सामासिक पदाच्या अर्थाविषयीं विचार.

धातु, प्रत्यय, नामें, सर्वनामें, अव्ययें, निपात इत्यादि भाषेमधील सर्व शब्द स्वभावतःच अर्थयुक्त असतात. दरेक ठिकाणीं त्यांचे अर्थ सांगणें शक्यही नसतें व त्याची कांहीं उपयुक्तताही नसते. पदें निरनिराळीं ठेऊन बोलणें ( अवृत्तिपक्ष ) किंवा त्यांचा समास करून बोलणें ( वृत्तिपक्ष ) हें बोलणाऱ्याच्या इच्छेवर अवलंबून असतें. समास केला असतां समासांतील

प्रत्येक पदाचा जो स्वाभाविक अर्थ असतो तोच जरा विशेषरूपानें म्हणजे इतर अर्थांशीं संबद्ध अशा रूपानें समजला जातो. एकंदरींत, निरनिराळ्या पदार्थांचें एकवटणें म्हणजे एकार्थीभाव हा ' सामर्थ्य ' शब्दाचा अर्थ घेतां येतो; त्याप्रमाणेंच, निरनिराळ्या पदांचें संबंधामुळें अडकून राहणें म्हणजे व्यपेक्षा हाही ' सामर्थ्य ' या शब्दाचा अर्थ घेतां येतो. आतां, पदाला सांगितलेला सर्वानुदात्त स्वर, त्याप्रमाणेंच युष्मद् व अस्मद् शब्दांना सांगितलेले ते मे वगैरे आदेश हे पदांना सांगितलेले विधी ( पदविधि ) असल्यामुळें प्रस्तुत परिभाषासूत्रामुळें त्यांना सामर्थ्याची जरूर लागेल व तसें व्यपेक्षारूप सामर्थ्य असल्यास भिन्न भिन्न वाक्यांमध्येंही ते होऊं लागतील; परंतु ते न होणें इष्ट असल्यामुळें वार्तिककारांनीं 'समानवाक्यामध्येंच निघात व हे आदेश होतात' (वा. ११) असें वचन केलें आहे. वार्तिककारांनीं प्रसंगानें या ठिकाणीं वाक्य शब्दाची व्याख्या ' अव्यय, कारक व विशेषणें यांनीं युक्त क्रियापद ' अशी केली आहे; व भाष्यकारांनीं कारकें, अव्ययें इत्यादि सर्व क्रियेचीं विशेषणेंच असल्यामुळें विशेषणयुक्त क्रिया म्हणजेच वाक्य अशी सुटसुटीत व्याख्या दिली आहे. यानंतर भाष्यकारांनीं तीन अथवा अधिक पदांचा सामासिक शब्द एकदम सर्व पदांचा समास करून साधावा किंवा दरेक वेळीं दोन दोन पदें घेऊन त्यांचे समास करून साधावा याविषयीं विवेचन करून दोनही पक्षीं केव्हां केव्हां व कशीं कशीं भिन्न रूपें व भिन्न स्वर होतील तें दाखविलें आहे व प्रचारामध्यें जशीं रूपें किंवा स्वर असतील त्या अनुरोधानें त्या त्या ठिकाणीं समास करावे असें सांगितलें आहे.

## २०३. अव्ययीभावसमासान्हिक ( अध्याय २ पा. १ आन्हिक २ ). पराङ्गवद्भाव व साधारणसमास यांविषयीं विचार.

या अध्यायांत मुख्य मुख्य पदकार्यांचा विचार केला आहे. त्यांपैकीं पहिल्या पादाच्या या दुसऱ्या आन्हिकामध्यें पराङ्गवद्भाव, अव्ययीभाव आणि तत्पुरुषाचे कांहीं प्रकार यांचा विचार केला आहे; परंतु, प्रामुख्यानें अव्ययीभावाचा विचार केला असल्यामुळें याला अव्ययीभावसमासान्हिक हें नांव देतां येण्यासारखें आहे. प्रथमतः 'सुबामन्त्रिते०' (सू. २) या सूत्रानें सांगितलेल्या ' पराङ्गवद्भाव ' नांवाच्या समासासारख्याच वेदामध्यें आढळणाऱ्या पदवृत्तीचें विवेचन केलें आहे. संबोधन शब्दाशीं त्याच्या पूर्वीं आलेल्या व त्याचें निमित्तीभूत अशा शब्दाचें स्वराकरितां एकत्रित होणें म्हणजे दोन्ही शब्द एकत्रित करून 'आमन्त्रितस्य च' (६।१।१९४, यानें पहिल्या शब्दाला आद्युदात्त करणें व पहिल्या शब्दांतील राहिलेले सर्व स्वर व दुसऱ्या शब्दांतील सर्व स्वर अनुदात्त करणें हें ' पराङ्गवद्भावाचें ' थोडक्यांत स्वरूप देतां येईल. लोकामध्येंही संबोधनाचे बाबतींत असा आद्युदात्त स्वर आढळून येतो. अशा तऱ्हेनें संबोधनानंतरचा संबोधनाशीं संबद्ध शब्दही संबोधन शब्दाशीं स्वराकरितां एकत्रित झालेला आढळून येतो असें ' परमपि च्छन्दसि ' ( सू. २ वा ६) येथें वार्तिककारांनीं सांगितलें आहे व त्याला 'पूर्वाङ्गवद्भाव' हें नांव देतां येण्याजोगें आहे. ' प्राक्कडारात्समासः ' ( सू ३ ) हें अधिकारसूत्र आहे व त्या सूत्रापासून ' कडाराः कर्मधारये ' ( २।२।३८ ) या सूत्रापर्यंत पहिल्या व दुसऱ्या दोनही पादांतील त्या त्या सूत्रांनीं सांगितलेल्या पदकार्यांना ' समास ' ही संज्ञा दिली आहे; व ' प्राक् ' या शब्दाच्या जोरावर मधल्या सर्व सूत्रांमध्यें सांगितलेल्या अव्ययीभाव तत्पुरुष वगैरे संज्ञा या समास संज्ञेचा बाध न करतां जादा म्हणून दिल्या जातात असें सांगितलें आहे. ' एकत्र बसविलेले शब्द ' या अर्थी ' समास ' ही अन्वर्थ संज्ञा आहे; अर्थात् ज्यांचा समास होतो तीं दोन्ही पदें त्यांमध्यें सामर्थ्य असतांनाच संबद्ध होतात व त्यांना ' समास ' ही संज्ञा दिली

जाते. ' सह सुपा ' ( सू. ४ ) या सूत्रानें कोणत्याही सुबन्ताचा दुसऱ्या सुबन्ताशीं समास होतो असें अत्यन्त सामान्य रीतीनें सांगितलें आहे. 'सह सुपा' या सूत्राचीं 'सह' आणि ' सुपा ' अशीं निरनिराळीं सूत्रें पाडावीं, ' सह ' या सूत्राचा वरतीं दिल्याप्रमाणें अर्थ करावा व 'सुपा' या सूत्राचा 'सुबन्ताबरोबर सुबन्त हें समाससंज्ञक होतें' असा अर्थ करून जो समास साधण्याला दुसरें कोणतेंही सूत्र लागू पडत नाहीं तेथें या सूत्राचा उपयोग करून समास साधावा असें येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे व ' पुनरुत्स्यूतम् ' व ' पुनर्निष्कृतम् ' यांसारखीं उदाहरणें दिलीं आहेत. वार्तिककारांनीं ' इवेन विभक्त्यलोपः० ' ( सू. ४ वा. २ ) या वार्तिकानें ' इव ' या शब्दाशीं सुबन्ताचा समास होतो; पण तेथें पूर्वपदाच्या विभक्तिप्रत्ययाचा लोप होत नाहीं व पूर्वपदाचाच स्वर समास झाल्यावर कायम राहतो असें सांगितलें आहे.

## २०४. अव्ययीभाव समास.

'अव्ययीभावः' (सू. ५) या अधिकारसूत्रापासून 'अन्यपदार्थे च संज्ञायाम्' ( सू. २१ ) या सूत्रापर्यंत सर्व सूत्रांत अव्ययीभाव समास केव्हां व कोठें होतो तें सांगितलें आहे. अव्ययीभाव ही अन्वर्थ संज्ञा असल्यामुळें अव्ययीभाव समासाला स्वाभाविकच ही संज्ञा होऊं शकते असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. भाष्यकारांचे वेळीं ' विभाषापपरिबहिरञ्चवः पञ्चम्या ' (सू. ११) असें एकच सूत्र म्हणून पठण केलें जात होतें. भाष्यकारांनीं 'विभाषा' हें सूत्र निराळें करावें व त्याचा अर्थ ' येथून पुढें सांगितलेले सर्व समास विकल्पानें होतात ' असा करावा असें म्हटलें आहे. वास्तविक पाहतां, दोन अथवा अधिक शब्दांचा एकार्थीभाव विवक्षित असल्यासच समास होतो, नाहीं तर वाक्यच उपयोगांत आणिलें जातें असा 'समर्थ' शब्दानें नियमच घालून दिला असल्यामुळें समास करणें किंवा न करणें हें वक्त्याच्या इच्छेवरच अवलंबून असतें म्हणून सर्वच समास वैकल्पिक होतात; तरी पण, भाष्यकारांनीं ' विभाषा ' असें निराळें सूत्र पाडून त्याची अनुवृत्ति समास सांगणाऱ्या दरेक सूत्रांत घ्यावी असें म्हटलें आहे, यांत त्यांचा हेतु शास्त्रदृष्ट्या विकल्प सांगणें हा आहे. एकंदरींत पाहतां, एकार्थीभावाची विवक्षा असतांना अर्थाच्या दृष्टीनें तत्पुरुष किंवा बहुव्रीहि वगैरे जो समास करणें योग्य असतें तोच समास सांगितलेला असतो; व ज्या ठिकाणीं तो अर्थ प्रतिपादन करूं शकतील असे दोन समास असूं शकतात तेथें उदाहरणार्थ 'पारे मध्ये षष्ठ्या वा' या सूत्रांत सूत्रकारांनीं ' वा ' शब्द घातलेलाच असतो व त्यामुळें दोन्ही समास होऊं शकतात. एकदरींत ' विभाषा ' (सू ११) हें सूत्र जरी स्वतंत्र केलें तरी तें अनुवादात्मकच आहे. आतां, विभाषा हें सूत्र व्यर्थ दिसतें म्हणून तें नियमार्थ आहे असें समजल्यास या ' विभाषा० ' (सू. ११) सूत्राच्या पूर्वींच्या सूत्रांनीं सांगितलेले समास नित्य आहेत असा ' विभाषा ' या सूत्राचा नियमरूप अर्थ हे तो व अधिहरि, निर्मक्षिकम्, शाकप्रति वगैरे समास नित्य होतात. असा नियमरूप अर्थ केल्यानें ज्याप्रमाणें कृष्णं श्रितः, वृकाद् भीतः वगैरे विग्रहवाक्यें समासाचा अर्थ दाखवितात त्याप्रमाणें हरेः अधि, मक्षिकाणां निर्गतिः, शाकं प्रति वगैरे वाक्यें समासाचा अर्थ दाखवूं शकत नाहींत. स्वपदांनीं विग्रह नसणें हें नित्यसमासाचें वैशिष्ट्य आहे. आतां, कांहीं ठिकाणीं--उदाहरणार्थ कष्टश्रित, अरण्यगत वगैरे उदाहरणामध्यें—एकार्थीभावाची विवक्षा असतांना तत्पुरुष समास करावा किंवा बहुव्रीहि समास करावा अशी शंका येते तेथें दोन्ही समासांपासून तोच अर्थ मनांत येत असेल तर जो सूत्रकारांनीं विशेष रीतीनें सांगितला असेल तोच समास करावा; पण ज्या ठिकाणीं —उदाहरणार्थ, सखि, बन्धु, शत्रु वगैरे उत्तरपद असलेल्या उदाहरणांमध्यें—

अर्थामध्यें भेदाची थोडीशी छटा असेल तेथें विवक्षित अर्थास अनुसरूनच समास करावा. वेदामध्यें अशा इन्द्रशत्रुः वगैरे ठिकाणीं उदात्त वगैरे स्वरांच्या योगानें कोणता समास विवक्षित आहे तें ठरवितां येतें; पण भाषेमध्यें स्वरयुक्त उच्चारण नसल्यामुळें संशयाला जागा मिळते.

## २०५. समासांचे चार मुख्य प्रकार.

भाष्यकारांनीं कोणत्या समासामध्यें कोणत्या पदाला प्राधान्य असतें याचा विचार करून समासांचे चार प्रकार केले आहेत. पूर्वपदाला जेथें प्राधान्य असतें तो अव्ययीभाव, उत्तरपदाला प्राधान्य असतें तो तत्पुरुष, दोन्ही पदांना प्राधान्य असतें तो द्वन्द्व व दोन्ही पदांना प्राधान्य नसतें तो बहुव्रीहि. द्विगु व कर्मधारय यांचा तत्पुरुष समासांतच अंतर्भाव होतो. उपपदतत्पुरुष, व एकदेशितत्पुरुष हे तत्पुरुषाचेच केवळ अवांतर प्रकार आहेत. समासांचीं हीं नांवें विशिष्ट तऱ्हेनें अन्वर्थक आहेत. 'तस्य पुरुषः' याप्रमाणें ज्यांचा विग्रह व अर्थ असतो ते तत्पुरुष समास, बहवो व्रीहयो यस्य यासारखा ज्यांचा विग्रह असतो व अर्थ असतो ते बहुव्रीहि समास, द्वन्द्व म्हणजे दोघांचा समूह अशा प्रकारचा ज्यांचा अर्थ असतो ते द्वन्द्व समास व जो समास अव्यय होतो तो अव्ययीभाव समास. 'द्वितीया श्रितातीत०' (सू. २४)......'पात्रेसमितादयश्च' (सू ४८) या सूत्रांमध्यें 'द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पञ्चमी व सप्तमी या पांच विभक्तींच्या तत्पुरुषसमासाचें, व पूर्वकालैक०' (सू. ४९) 'व दिक्संख्ये' (सू. ५०) या दोन सूत्रांमध्यें समानाधिकरणतत्पुरुष या समासांचें विवेचन केलें आहे. 'अन्नेन व्यञ्जनम्' (सू ३४) व 'भक्ष्येण मिश्रीकरणम्' (सू. ३५) या सूत्रांमध्यें अन्न व भक्ष्य या अर्थांच्या तृतीयान्त करणवाचक नामांचा व्यञ्जनवाचक व मिश्रीकरणवाचक सुबन्तांशीं सूत्रकारांनीं समास सांगितला आहे. या प्रसंगानें भाष्यकारांनीं कारकांचें सामर्थ्य क्रियेशींच असतें, क्रियावाचकाशिवाय इतर शब्दांचें तें एकमेकाशीं नसतें या वार्तिककारांच्या वचनास अनुसरून अन्नवाचक (दधि वगैरे शब्द) व भक्ष्यवाचक (गुड वगैरे शब्द) यांचा 'शिंपडलेला' (उपसिक्त), 'मिसळलेला' (संसृष्ट) वगैरे अर्थाशीं असलेला जो संबंध त्याच्या जोरावर दधि गुड अशा शब्दांचा दह्यानें शिंपडलेला, गुळाशीं मिसळलेला अशा तऱ्हेचा अर्थ घेऊन दधि गुड वगैरे शब्दांचा ओदनः धानाः वगैरे शब्दांशीं समास करावयाचा असतो असें स्पष्ट सांगितलें आहे. 'चतुर्थी तदर्थार्थ०' (सू. ३६) या सूत्राचें विवेचन करतेवेळीं 'तदर्थ' शब्दाचा अर्थ करतांना वार्तिककारांनीं 'चतुर्थ्यन्त विकृतिवाचक शब्दाचा प्रकृतिवाचकाबरोबर समास होतो' असें जें म्हटलें आहे तें प्रकृत सूत्रांत बलि व रक्षित हे शब्द मुद्दाम सांगण्यानेंच सुचविलें जातें असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे; तसेंच, अर्थ 'या शब्दाशीं नित्य चतुर्थीसमास होतो व तो कोणत्याही लिंगाचा होतो' या स्वतंत्र वार्तिकवचनाच्या आवश्यकतेचा विचार करून हें वार्तिक करणें इष्ट आहे असें दाखविलें आहे.

## २०६. समानाधिकरणतत्पुरुषान्हिक (अ. २ पा. १ आन्हिक ३). द्विगु समास.

या आन्हिकांत द्विगु व कर्मधारय या तत्पुरुषाच्या दोन पोटभेदांचा विचार केला आहे. 'तत्पुरुषः' (२।१।२२—२।२।२२) या अधिकारांत सांगितलेल्या समासामध्यें दोन्ही पदें समानाधिकरण म्हणजे एका विभक्तीनें उच्चारिलेलीं असल्यास त्या तत्पुरुषाला कर्मधारय संज्ञा दिली आहे व पहिलें पद संख्यावाचक असल्यास त्याला द्विगु ही संज्ञा दिली आहे.

एक या शब्दाचा समानाधिकरण अशा शब्दाशीं 'पूर्वकालैकसर्वजरत्०' (सू. ४९) या सूत्रानें सांगितलेला समास, कोणत्याही संख्येचा समानाधिकरण शब्दाशीं संज्ञा अर्थ असतांना 'दिक्संख्ये०' (सू. ५०) या सूत्रानें सांगितलेला समास, व 'तद्धितार्थोत्तरपद०' (सू. ५१) या सूत्रानें तद्धितार्थी अथवा उत्तरपद पुढें असतांना अथवा समाहार अर्थ असतांना सांगितलेला समास या तिन्ही सूत्रांनीं सांगितलेल्या तिन्ही समासांमध्यें जर पहिलें पद संख्यावाचक असेल तर त्या समासाला द्विगु म्हणावयाचें अथवा 'तद्धितार्थोत्तरपद०' या एकाच सूत्रानें सांगितलेल्या समासांत पहिलें पद संख्यावाचक असेल तर त्याला द्विगु म्हणावयाचें या दोन्ही पक्षांचा विचार करून कोणताही पक्ष घेण्यास हरकत नाहीं असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे; तसेंच, समाहार शब्दाचा 'जमवलेल्या वस्तू' असा, अथवा 'जमवा-जमव' असा अर्थ घ्यावा याविषयींही विचार करून 'कोणत्याही सामान्य धर्मानें सारख्या अशा अनेक पदार्थांचा एक वर्ग करणें' हा समाहार शब्दाचा अर्थ घ्यावा असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे.

## २०७. कर्मधारय समास.

'उपमानानि सामान्य०' (सू. ५५) या सूत्रांतील 'सामान्यवचन' या शब्दाचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं उपमान व उपमेय यांमध्यें पर्यायशब्दांप्रमाणें अत्यंत साम्यही असतां उपयोगाचें नाहीं किंवा गो आणि अश्व यांमध्यें जसा आहे तसा अत्यंत भेदही असतां कामा नये; कांहीं विशिष्ट गुणांचे बाबतींत साम्य पाहिजे असें सांगून 'सामान्यवचन शब्द' म्हणजे उपमान व उपमेय या दोन्ही ठिकाणचा साधारणधर्म दाखविणारा शब्द अशी व्याख्या केली आहे. 'उपमितं व्याघ्रादिभिः०' (सू. ५६) या सूत्रानें सांगितलेल्या उपमेय-समासाचें विवेचन करतांना साधारणधर्माचा प्रयोग केला तर उपमेय हें सापेक्ष होत असल्यामुळें समास होणार नाहीं म्हणून 'सामान्याप्रयोगे' हा शब्द सूत्रांत उच्चारण्याचें कारण नाहीं असें असूनही ज्याअर्थी 'सामान्याप्रयोगे' हा शब्द सूत्रकारांनीं घातला आहे त्याअर्थी विशेष्य सापेक्ष असलें तरी समास होऊं शकतो असें सूत्रकारांच्या बोलण्याचें तात्पर्य निघतें; म्हणून त्याकरितां मुद्दाम स्वतंत्र वचन करण्याचें कारण नाहीं असें भाष्यकारांनी येथें सांगितलें आहे. 'विशेषणं विशेष्येण बहुलम्' (सू. ५७) या सूत्रानें विशेषणाचा विशेष्याशीं सामान्य तऱ्हेनें समास सांगितला आहे. लोकांतील व्यवहार पाहिल्यास द्रव्यवाचक शब्दाचा साक्षात् क्रियेकडे अन्वय असल्यामुळें तो प्रधान व विशेष्य असतो व गुणवाचक शब्द विशेषण असतो; पण, दोन्ही शब्द गुणवाचक असल्यास संशय येतो व विवक्षेवरूनच त्यांमधील प्रधान कोण हें ठरवावयाचें असतें. 'पूर्वापर०' इत्यादि (सू. ५८-७२) सूत्रांनीं सांगितलेले समास 'विशेषणाचा विशेष्याशीं समास होतो' (सू. ५७) या सामान्य सूत्रानेंच होऊं शकत असले तरी व्याकरणशास्त्र हें फार विस्तृत आहे व वेदाच्या सर्व शाखांमधील शब्द कळण्याला तें फार उपयोगी आहे म्हणून सर्वसाधारण लोकांना विशेषणविशेष्यभावयुक्त शब्दांचे कोठें समास होतात व कोठें होत नाहींत हें स्पष्ट समजावें म्हणून 'विशेषणं०' या सूत्रांत 'बहुलम्' शब्द घालून संग्रहार्थ 'पूर्वापर०' इत्यादि सूत्रें सूत्रकारांनीं केलीं आहेत. 'क्तेन नञ्विशिष्टेनानञ्' (सू. ६०) या सूत्रानें नञ् लागलेल्या व नञ् न लागलेल्या क्त-प्रत्ययान्ताचे 'कृताकृतम्' यासारखे समास सांगितले आहेत. 'वर्णो वर्णेन' (सू. ६९) या सूत्राचें विवेचन करतांना सर्वधन, सर्वबीज इत्यादि बहुव्रीहि समासां-वरूनच सर्वधनी, सर्वबीजी अशा तऱ्हेच्या मतुप्प्रत्ययान्त कर्मधारय समासाचा अर्थ कळत

असल्यानें अशा ठिकाणीं बहुव्रीहि करावा असें जरी असलें तरी अर्थविवक्षेस अनुसरून कर्मधारय करून त्याला इन् प्रत्ययही लावितां येतो असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. कांहीं ठिकाणीं उदाहरणार्थ, कृष्णसर्प (काळे साप असलेला) व कृष्णसर्पवान् ( कृष्णसर्प जातीचे साप असलेला ) या शब्दांमध्यें अर्थभेदही दृष्टीस पडतो व त्याप्रमाणें समास होतो. एकंदरींत अर्थविवक्षा हीच कोणता समास करावयाचा त्याचें मुख्य गमक म्हणून समजली जाते हा अंतिम निष्कर्ष भाष्यकारांनीं येथें दिला आहे.

## २०८. व्यधिकरणतत्पुरुषसमासान्हिक ( अ. २ पा. २ आन्हिक १ ) एकदेशितत्पुरुष व नञ्तत्पुरुष.

या अधिकरणामध्यें तत्पुरुषसमासाच्या एकदेशितत्पुरुष, नञ्तत्पुरुष, षष्ठीतत्पुरुष व उपपदतत्पुरुष या प्रकारांचा विचार केला आहे. ' पूर्वापर० ' ( सू. २ ) या सूत्रानें पूर्व, अपर, अर्ध इत्यादि शब्दांशीं सांगितलेला एकदेशिसमास हा एकवचनी नामाबरोबरच होतो असें ' एकाधिकरणे ' या शब्दावरून स्पष्ट होतें; व ' अर्धं पिप्पल्याः ' या अर्थींच ' अर्धपिप्पली ' हा समास होतो; 'अर्धं पिप्पलीनाम् ' या अर्थीं होत नाहीं. ' द्वितीयतृतीय० ' ( सू. २ ) या सूत्रामध्यें सूत्रकारांनीं 'अन्यतरस्याम्' हा शब्द घातला आहे त्यावरून उत्सर्ग व अपवाद हे दोन्ही वैकल्पिक असतांना अपवादशास्त्र हें विकल्पानें प्रवृत्त होत असलें तरी उत्सर्गशास्त्र हें कायमचें दूर सारलें जातें असा निष्कर्ष भाष्यकारांनीं काढला आहे व त्याचीं उदाहरणेंही दिलीं आहेत. ' कालाः परिमाणिना ' (सू. ५) या सूत्राच्या ' मासो जातस्य यस्य असौ मासजातः ' या उदाहरणामध्यें मास हा काल मनुष्याचें परिमाण कसें होऊं शकेल याचा विचार करतांना भाष्यकारांनीं सूर्याच्या गतिरूप क्रियेनें जसे मास वर्ष वगैरे व्यवहार होतात त्याप्रमाणेंच मनुष्याच्या जन्मास येणें या क्रियेनेंही महिना, वर्ष वगैरे व्यवहार होण्यास कांहींही अडचण नाहीं असें मोठ्या खुबीनें सांगितलें आहे व मूर्त वस्तूंची वृद्धि व ऱ्हास ज्याच्यामुळें होतात तो काल अशी काल या शब्दाची व्याख्या दिली आहे. ' नञ् ' ( सू. ६ ) या सूत्राचें विवरण करतांना अब्राह्मण वगैरे नञ्समास हे तत्पुरुषसमास असल्यामुळें त्यांचे बाबतींत उत्तरपदार्थाचें प्राधान्य हें कसें दाखवितां येतें व समासाचा अर्थ काय होतो याचें विवेचन भाष्यकारांनीं केलें आहे. या ठिकाणीं प्रसंगानें ब्राह्मण शब्द हा विशिष्ट गुणसमुदाय दाखवितो असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे; व त्या गुणांपैकीं बाह्य गुण ' तपः श्रुतं च योनिश्च० ' या श्लोकामध्यें, व आभ्यंतर गुण ' गौरः शुच्याचारः० ' या वाक्यामध्यें दिले आहेत. नञ्-समासामध्यें पूर्वपदाला प्राधान्य दिल्यास तसेंच उत्तरपदालाही प्राधान्य दिल्यास अब्राह्मण या शब्दापुढें विशिष्ट लिंगवाचक व वचनवाचक प्रत्यय कसे लावण्यांत येतात याविषयीं दोन मार्ग भाष्यकारांनीं दाखविले आहेत. ( १ ) कोणताही शब्द हा स्वभावतःच विशिष्ट लिंग व वचन दाखवूं शकतो; ( २ ) शब्दाचा अर्थ जर गुण असला तर त्या गुणाच्या आश्रयाच्या लिंगवचनांप्रमाणें लिंगवचनें होतात.

## २०९. षष्ठीतत्पुरुष.

' षष्ठी '...... ' नित्यं क्रीडाजीविकयोः' ( सू. ८ -१७ ) या सूत्रांमध्यें षष्ठीसमास व त्याचे अपवाद यांचें विवेचन केलें आहे. 'षष्ठी' ( सू. ८ ) या सूत्रानें अन्वययोग्य सुबन्ताबरोबर षष्ठयन्ताचा विकल्पानें तत्पुरुष समास होतो असें सामान्य रीतीनें सांगितलें असलें तरी याजक वगैरे शब्द, निर्धारणवाचक शब्द, गुणवाचक शब्द, अव्ययें, समानाधिकरण म्हणजे एकार्थ-

प्रतिपादक शब्द, पूजार्थक अथवा अधिकरणार्थक क्तप्रत्ययान्त शब्द, व 'उभयप्राप्तौ कर्मणि' ( २।३।६६ ) या सूत्रानें सांगितलेली षष्ठी शेवटीं असलेले शब्द, यांच्याशीं षष्ठ्यन्ताचा समास होत नाहीं असा समासाचा निषेध सूत्रकारांनींच केला आहे. वरतीं निर्दिष्ट केलेल्यांपैकीं बऱ्याचशा ठिकाणीं 'सापेक्ष पदार्चे दुसऱ्या पदार्शी सामर्थ्य असूं शकत नाहीं व सामर्थ्य नसतांना समास होत नाहीं' या नियमानेंच[1] काम भागण्यासारखें आहे असें भाष्यकारांनीं दाखविलें आहे. 'कुगतिप्रादयः' ( सू. १८ ) या सूत्रानें कु हा शब्द, गतिसंज्ञक शब्द, व प्र वगैरे शब्द यांचा अन्वययोग्य शब्दांबरोबर नित्य म्हणजे अस्वपदविग्रह समास सांगितला आहे. या ठिकाणीं 'प्र' वगैरे अव्ययांचा समास ते कर्मप्रवचनीय असल्यास करूं नये असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे; तसेंच, प्र वगैरे शब्दांचा समास झाला तर कोणत्या अर्थी होतो तें सांगितलें आहे. या ठिकाणीं भाष्यकारांनीं सौनाग वैयाकरणांनीं या बाबतींत खुलासेवार उदाहरणें देऊन केलेलें स्पष्टीकरण सौनागांचीं वार्तिकें[2] सांगून जसेंच्या तसेंच दिलें आहे. 'उपपदमतिङ्' ( सू. १९ ) या सूत्रानें उपपदाचा तिङन्तव्यतिरिक्त अन्वययोग्य अशा सुबन्ताबरोबर सांगितलेला व लोकामध्यें उपपदतत्पुरुष म्हणून प्रसिद्ध असलेला जो समास त्याचें विवरण करतांना भाष्यकारांनीं 'सह सुपा' ( सू. २।१।४ ) या सामान्य अधिकाररूप सूत्रानें सुबन्ताशींच सर्व समास होत असल्यामुळें सूत्रांतील अतिङ् या पदाचा उपयोग नाहीं असें असूनही सूत्रकारांनीं 'अतिङ्' पद घातलें आहे त्यावरून प्रस्तुत सूत्रांत 'सह सुपा' या सूत्रांतून 'सुपा' हें पद अनुवृत्तीनें येत नाहीं व विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वीच उपपदाचा तिङन्ताशिवाय इतर शब्दाशीं समास होतो असें सुचविण्याचा सूत्रकारांचा आशय आहे असें म्हटलें आहे; व 'गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक् सुबुत्पत्तेः' ही वेगळी परिभाषा सांगण्याचें कांहीं कारण नाहीं असेंही दाखविलें आहे. कृत्प्रत्ययांनीं प्रतिपादन केलेला धात्वर्थ हा द्रव्याप्रमाणें होतो व त्यामुळें कृदन्त शब्दाला लिंगवचनप्रत्यय लागू शकतात[3]. तसेंच, उपसर्ग हा क्रियेचें विशेषण असतो तरी पण कारक हें क्रियेला उत्पन्न करणारें असल्यामुळें धातूचा प्रथम कारकाशीं संबंध होतो व नंतर उपसर्गाशीं संबंध होतो असेंही येथें भाष्यकारांनीं स्पष्ट सांगितलें आहे.

## २१०. अनेकपदसमासाह्निक ( अ. २ पा. २ आह्निक २ ). बहुव्रीहि समास.

या आह्निकांत अनेक पदांचे समास म्हणजे बहुव्रीहि आणि द्वन्द्व यांचा विचार केला आहे. 'अनेकमन्यपदार्थे' ( सू. २४ ) या सूत्रामध्यें आपल्यापेक्षां निराळा अर्थ दाखवीत असतांना दोन किंवा अधिक सुबन्त शब्दांचा विकल्पानें समास होतो व त्याला बहुव्रीहि म्हणावें

---

१. या नियमाचें विवेचन भाष्यकारांनीं समर्थाह्निकामध्यें केलें आहे. ( म. भा. भाषांतर भाग २, पृष्ठें २२९—२३२ पहा )

२. स्वती पूजायाम्, दुर्निन्दायाम्, आङ् ईषदर्थे, कुः पापार्थे, प्रादयो गताद्यर्थे प्रथमया इत्यादि वार्तिकें सौनागांचीं म्हणून भाष्यकारांनीं उद्धृत केलीं आहेत. ( म. भा. भाषांतर भाग २, पृष्ठें ३५०–३५१ पहा. )

३. 'कृदभिहितो भावो द्रव्यवद् भवति' असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. ( म भा. भाषांतर भाग २ पृष्ठ ३५२ पहा ) हें वचन भाष्यकारांची इष्टि आहे किंवा वार्तिककारांचें वचन आहे हें कळणें कठीण आहे. भर्तृहरीनें या वचनाचा खुलासा पुढे दिल्याप्रमाणें केला आहे:—

"यथैवाविषयं ज्ञानं न किंचिदवभासते । तथा भावोऽप्यसंसृष्टो न कश्चिदुपलभ्यते"॥ (वा. प. ३।२।८). यावरून पाक, कृति इत्यादि शब्द हे द्रव्यांप्रमाणें क्रियेचें परिनिष्ठित स्वरूप अभिव्यक्त करतात व त्यामुळें त्यांना लिंगसंख्यावाचक प्रत्यय लागतात.

असें सांगितलें आहे; व भाष्यकारांनीं 'सुसूक्ष्मजटकेशेन', 'सुनताजिनवाससा' इत्यादि उदाहरणेंही दिलीं आहेत. सूत्रांतील 'अनेकम्' या पदानें बहुव्रीहि समासांतील सर्व पदें प्रथमानिर्दिष्ट असल्यामुळें त्या सर्वांना उपसर्जन हें नांव देण्यांत येतें व त्यामुळें उपसर्जनाला सांगितलेलीं कार्यें कोणत्याही पदाला होऊं शकतात असें वार्तिककारांनीं सांगितलें आहे. तसेंच, या बहुव्रीहि समासांतील पदांनीं अन्य पदार्थ दाखविला गेल्यामुळें 'उक्तार्थानामप्रयोगः' या प्रसिद्ध वैयाकरणसंकेतामुळें अन्य पदार्थ पुन्हां सांगतां येणार नाहीं ही अडचण दाखवून बहुव्रीहि समासामध्यें 'चित्रगु' वगैरें शब्दांनीं अन्य पदार्थ केवळ सामान्य रीतीनेंच दाखविला जातो तेव्हां त्याचें विशेष रीतीनें प्रतिपादन करण्याकरितां देवदत्त वगैरे शब्दांनीं अन्य पदार्थ उच्चारण्यास कांहीं हरकत नाहीं असें तिचें निराकरण केलें आहे. अथवा, बहुव्रीहि समासानें षष्ठी ( अस्य ) किंवा सप्तमी ( अस्मिन् ) या विभक्तींच्या अर्थाचाच संबंध दाखविला जातो म्हणून संबंधी पदार्थ दाखविण्याकरितां देवदत्त वगैरे शब्दांचा खुशाल प्रयोग करावा व विभक्तीच्या अर्थाचा संबंध जरी दाखविला गेला तरी ज्याप्रमाणें गुणवाचक शब्दाला गुणाच्या आश्रयवाचक शब्दाचीं लिंगवचनें दिलीं जातात त्याप्रमाणेंच बहुव्रीहि समासाला संबंधी जो अन्य पदार्थ त्याचीं लिंगवचनें दिलीं जातील असेंही वार्तिककारांनीं सांगितलें आहे. यानंतर वार्तिककारांनीं 'बहुव्रीहिः समानाधिकरणानाम्'...... 'न वाऽव्ययत्वात्' ( वार्तिकें १०-२२ ) या वार्तिकांनीं लोकांमध्यें कोठें व कसा बहुव्रीहि समास केलेला आढळतो तें पाहून कोठेंकोठें व कोणत्या अर्थीं बहुव्रीहि करावा तसेंच तो केव्हां करूं नये हें सांगितलें आहे. बहुव्रीहि समासांतील पदें समानाधिकरण म्हणजे एका पदार्थाला दाखविणारीं असावीं लागतात; म्हणून 'पञ्चभिः भुक्तमस्य' या अर्थीं बहुव्रीहि करूं नये असें वार्तिककारांनीं सांगितलें आहे; व त्याला अपवाद म्हणून 'सप्तम्युपमान०' (वा. १२) ...'सप्तम्यन्त अथवा उपमान हें पूर्वपद असतांना बहुव्रीहि करावा व पूर्वपदांतील उत्तरभागाचा लोप करावा; तसेंच, प्र, परा वगैरेंनीं आरंभिलेल्या धातुसाधिताचाही इतर पदाबरोबर बहुव्रीहि करावा व धातुसाधिताचा लोप करावा' अशा रीतीनें विशिष्ट बहुव्रीहि समास सांगितले आहेत; व भाष्यकारांनीं त्यांचें स्पष्टीकरण करून कण्ठेकालः, उष्ट्रमुखः, प्रपर्णः, अपुत्रः इत्यादि उदाहरणें दिलीं आहेत. बहुव्रीहि समासांतील शब्दांसंबंधीं वार्तिककारांनीं अशा प्रकारचे निर्बन्ध घातले; अर्थाविषयीं नियम घालतांना मतुप् प्रत्ययाचा अर्थ बहुव्रीहि समासामुळें व्यक्त होत असेल तरच बहुव्रीहि करावा असा सर्वसाधारण नियमही त्यांनीं घातला आहे. भाष्यकारांनीं या ठिकाणीं वरील वार्तिकांचें विवेचन केल्यानंतर त्या वेळीं काव्यामध्यें आढळणाऱ्या किंसब्रह्मचारी, असिद्वितीय, संकर्षणद्वितीय, अर्धतृतीय इत्यादि बहुव्रीहि समासांचें मार्मिक विवेचन करून त्यांची कशी सिद्धि करावी तें दाखविलें आहे. 'संख्ययाव्ययासन्ना०' ( सू २५ ) या सूत्रामध्यें एक विशेष प्रकारचा बहुव्रीहि समास सांगितला आहे. हा बहुव्रीहि 'संख्याबहुव्रीहि' या नांवानें ओळखिला जातो. या बहुव्रीहीच्या द्विदशाः, त्रिदशाः, उपदशाः, आसन्नविंशाः वगैरे उदाहरणांचें

---

१. काशी येथील मुद्रित प्रतींत "सुसूक्ष्मजटकेशेन सुनताजिनवाससा। समन्तशितिरन्ध्रेण द्वयोर्वृत्तौ न सिध्यति" असा संपूर्ण श्लोक आढळतो. काशिकेमध्यें 'पुत्री पर्वतराजस्य कुतो हेतोर्विवाहिता' असें उत्तरार्ध मिळतें. कदाचित् "सुसूक्ष्म .. विवाहिता" हा जुन्या काव्यांतील श्लोक भाष्यकारांचे वेळीं प्रचलित असावा व "सुसूक्ष्म ... न सिध्यति" हें श्लोकवार्तिक असावें

भाष्यकारांनीं विद्वत्तापूर्ण विवेचन करून हीं उदाहरणें साधण्याकारितां ‘संख्ययाऽव्यया०’ हें सूत्र कसें आवश्यक आहे तें दाखविलें आहे. शेवटीं, प्रस्तुत सूत्रानें सांगितलेला संख्याबहुव्रीहि, ‘दिङ्नामान्यन्तराले’ (सू. २६) या सूत्रानें सांगितलेला दिग्बहुव्रीहि व ‘तेन सह०’ (सू. २८) यानें सांगितलेला सहबहुव्रीहि यांची सिद्धि ‘अनेकमन्यपदार्थे’ (सू २४) या सूत्रानेंच होत असतां ते बहुव्रीहि समास मुद्दाम कां सांगितले याचा खुलासा केला आहे.

## २११. द्वन्द्वसमास.

‘चार्थे द्वन्द्वः’ (सू. २९) या सूत्रानें द्वन्द्व हा एक महत्त्वाचा समास ‘च’ या शब्दाच्या अर्थीं सांगितला आहे. ‘च’ या निपाताचे समुच्चय, अन्वाचय, इतरेतरयोग आणि समाहार असे चार अर्थ आहेत. त्यांपैकीं समुच्चय व अन्वाचय हे अर्थ असतांना ज्या वस्तूंचा समुच्चय अथवा अन्वाचय असतो त्यांमध्यें परस्परांची अपेक्षा नसल्यामुळें सामर्थ्य नसतें, म्हणून द्वन्द्व समास होऊं शकत नाहीं, व इतरेतरयोग आणि समाहार हे अर्थ असतांना सामर्थ्य असल्यामुळें द्वन्द्व समास होतो, असा भाष्यकारांनीं खुलासा केला आहे. अर्थ दाखविण्याची शक्ति शब्दामध्यें स्वभावतःच असते (अभिधानं पुनः स्वाभाविकम् वा. १५), व तिच्यामुळें शब्दाच्या एक किंवा अनेक अर्थांचा बोध होतो: ‘द्यावा च क्षामा’ या ठिकाणीं द्यावा आणि क्षामा यांतील प्रत्येक शब्दापासून स्वर्ग व पृथ्वी या दोहींचा बोध होतो; ‘द्यावा च क्षामा’ हें वाक्य असूनही येथें एका शब्दापासून दोन वस्तूंचा बोध होतो, तर घटपटौ अशा द्वन्द्व समासामध्यें घट या शब्दापासून घट व पट या दोन्ही वस्तूंचा बोध होण्यास कांहींही हरकत नाहीं; त्याप्रमाणेंच पट या शब्दापासूनही तेच दोन्ही अर्थ मनांत येण्यास कांहीं हरकत नाहीं; अशा रीतीनें वर्णन केलेला ‘एका पदापासून एकाच वेळीं अनेक अर्थांचा बोध होणें’ हा वार्तिककारांपूर्वींच्या वैयाकरणांनीं दिलेला ‘युगपदधिकरणवचनतापक्ष’ स्वीकारून वाक्यामध्यें पृथक् उच्चारलेल्या अनेक पदांपैकीं प्रत्येकापासून आपला स्वतःचा व इतर पदांचाही अर्थ मनांत येत असल्यास त्या ठिकाणीं द्वन्द्व समास होतो व तसा मनांत येत नसल्यास वाक्यच कायम राहतें अशा तऱ्हेची कांहीं वैयाकरणांची विचारसरणी वार्तिककारांनीं येथें दिली आहे. भाष्यकारांनीं हा ‘युगपदधिकरणवचनतापक्ष’ क्लिष्ट असल्यामुळें व लोकांतील अनुभव त्याला अनुसरून येत नसल्यामुळें या विचारसरणीविषयीं आपली नापसंती व्यक्त केली आहे. ‘उपसर्जनं पूर्वम्’ (सू. ३०) या सूत्रापासून ‘कडाराः कर्मधारये’ (सू. ३८) या सूत्रापर्यंत नऊ सूत्रांमध्यें समास केला असतां समासामध्यें प्रथम कोणतें पद ठेवावें व नंतर कोणतें ठेवावें याविषयीं विचार केला आहे व त्याविषयीं कांहीं साधारण नियम घालून दिले आहेत. घिसंज्ञक शब्द, स्वरादि असून स्वरान्त शब्द, व कमी स्वर ज्यामध्यें आहेत असे शब्द साधारणतः प्रथम ठेविले जातात असें सूत्रकारांनीं सांगितलें आहे त्याचा स्वीकार करून आणि अर्थाचे बाबतींतही विचार केला जातो व वयानें, मानानें, विद्येनें किंवा क्रमानें श्रेष्ठ अशा व्यक्तीचा वाचक शब्दही प्रथम ठेविला जातो असें म्हणून वार्तिककारांनीं येथें सूत्रकारांच्या विधानाला पुरवणी जोडली आहे.

## २१२. विभक्तिनिरूपणाह्निक- १ (अ. २ पा. ३ आह्निक १). अनभिहित कर्म व संप्रदान यांना लागणाऱ्या विभक्ती.

पहिल्या अध्यायामध्यें संज्ञा सांगून झाल्यानंतर—विशेषतः प्रातिपदिकसंज्ञा व कर्ता कर्म वगैरे कारक-संज्ञा सांगून झाल्यानंतर—व दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या दोन पादांमध्यें

समास सांगून झाल्यानंतर शुद्ध व सामासिक शब्दांना लागणाऱ्या विभक्तींचा क्रमप्राप्त विचार या तिसऱ्या पादामध्यें केला आहे. या पादांतील तीनही आन्हिकांमध्यें विभक्तींचाच विचार केला असल्यामुळें या तिन्ही आन्हिकांना विभक्तिनिरूपणान्हिक हेंच नांव देणें योग्य आहे. दुसऱ्या अध्यायांतील 'समर्थः पदविधिः' (२।१।१) या सूत्राची व्याख्या करतांना वार्तिककारांनीं अव्यय, कारक व कारकविशेषणें यांनीं युक्त जें क्रियापद त्याला वाक्य म्हणावें अशी वाक्याची व्याख्या दिली आहे; व त्याच ठिकाणीं क्रियापद व त्याच्याशीं संबद्ध पदें मिळून वाक्य होतें असेंही वार्तिककारांनीं सांगितलें आहे. दरेक वाक्यामध्यें एक क्रियापद व त्याच्याशीं प्रत्यक्षसंबद्ध कर्ता व कर्म हीं कारकें व या दोन कारकांच्या द्वारें संबद्ध इतर कारकें असू शकतात व या सर्वांचीं विशेषणेंही असू शकतात सूत्रकारांनीं अपादान, संप्रदान वगैरे कारकांच्या व्याख्या देतांना अर्थाकडे लक्ष देऊन क्रियेशीं संबद्ध पदार्थांना कारक ही संज्ञा दिली आहे; व कारकांचे अपादान संप्रदान, अधिकरण, करण, कर्म व कर्ता असे सहा प्रकार दिले आहेत. भाष्यकारांनीं अपादान, संप्रदान इत्यादि प्रकारच्या ज्या शक्ती शब्दामध्यें असतात त्यांनाच कारक म्हणणें योग्य आहे असें जरी सांगितलें आहे तरी पण, प्रातिपदिकरूपी पदार्थांमध्यें असणाऱ्या या शक्ती निरनिराळ्या विभक्तिप्रत्ययांनीं दाखविल्या जातात म्हणून व्यवहारांत पदार्थांना तसेंच विभक्तींनाही कारक संज्ञा देण्याचा प्रघात पडला आहे. या अपादान, संप्रदान, अधिकरण, करण, कर्म व कर्ता या सहा शक्ती क्रमानें पञ्चमी, चतुर्थी, सप्तमी, तृतीया, द्वितीया व प्रथमा या विभक्तींनीं साधारणतः दाखविल्या जातात. भर्तृहरीनें वाक्यपदीयाच्या तिसऱ्या कांडामध्यें या कारकशक्तींचें विद्वत्तापूर्ण विवेचन केलें आहे. पाणिनीनें 'कारके' (१।४।२३) हें अधिकारसूत्र करून त्यानंतर कारकसंज्ञा सांगतांना अपादान, संप्रदान, करण, अधिकरण, कर्म व कर्ता हा क्रम स्वीकारला आहे. अर्थात् हा क्रम स्वीकारतांना क्रियेला ज्यास्तींत ज्यास्त दूरचें अपादान कारक प्रथम घालून ज्यास्तींत ज्यास्त निकट संबद्ध कर्ता शेवटीं ठेवला आहे. या कारकांना साधारणतः लागणाऱ्या विभक्ती सांगतांना मात्र त्यानें पंचमी, चतुर्थी, तृतीया, सप्तमी, द्वितीया व प्रथमा अशा क्रमानें त्या सांगितल्या नाहींत; पण त्यांना पंचमी, चतुर्थी अशीं संख्यावाचक नामें त्यानेंच दिलीं असल्यामुळें त्याला कारकार्थाच्या महत्त्वावर आधारलेला प्रथमा, द्वितीया, असा क्रम अभिप्रेत होता असें दिसतें. भर्तृहरीनें कारकशक्ती व त्यांना दाखविणाऱ्या विभक्ती यांचें विवेचन करतांना तिसऱ्या कांडामध्यें प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी व सप्तमी असाच क्रम स्वीकारलेला आहे, व सिद्धान्तकौमुदी वगैरे प्रकरणग्रंथांमध्यें तोच क्रम घेतला आहे. लोकांमध्येंही नंतरच्या व्याकरणकारांनीं तोच क्रम उचललेला दिसतो. क्रियापदांतील तिङ् प्रत्यय हे कर्तरि प्रयोगांत कर्त्याचा बोध करतात, कर्मणि प्रयोगांत कर्माचा बोध करतात व भावे प्रयोगांत फक्त भाव म्हणजे क्रिया दाखवितात. कर्त्याचा अथवा कर्माचा बोध तिङ् प्रत्ययानें झाला असतां त्याला अभिहित म्हणण्यांत येतें व त्याहून 'प्रातिपदिकार्थ०' (२।३।४६) या सूत्रानें प्रथमा विभक्तीच केली जाते. ज्या वेळीं कर्ता अभिहित नसतो त्या वेळीं त्याहून तृतीया विभक्ति होते; व कर्म अभिहित नसतें त्यावेळीं त्याहून द्वितीया विभक्ति केली जाते. कर्तरि, कर्मणि, करणे, अधिकरणे हे शब्द उच्चारून सांगितलेल्या कृत् प्रत्ययांनीं 'पाचक', 'कृत' इत्यादि कृदन्त शब्दांमध्यें कर्ता, कर्म इत्यादि प्रकारचा कारकार्थ अभिहित होत असल्यामुळें कृदन्त शब्दाहून 'प्रातिपदिकार्थ०' या सूत्रानें प्रथमा विभक्ति होते. पाक, कृति इत्यादि ठिकाणीं कृत् प्रत्ययाचा जरी भाव म्हणजे क्रिया हाच अर्थ असला तरी तो भाव द्रव्यासारखा समजला जातो (कृद-

भिहितो भावो द्रव्यवद् भवति ) असा वैयाकरणसिद्धान्त असल्यामुळें पाक, कृति इत्यादि शब्दांना लिंगवाचक व वचनवाचक प्रत्यय लागतात.

## २१३. कारकविभक्ती व उपपदविभक्ती.

कृदन्त शब्दांमधील धातूनें बोधित जी क्रिया तिच्या कर्ता व कर्म या कारकांना बहुशः षष्ठी ही कारक विभक्ति लागते हा सामान्य नियम सूत्रकारांनीं 'कर्तृकर्मणोः कृति' (३।३।६५) या सूत्रानें घालून दिला आहे. जर कृत् प्रत्यय हा लकार, उक, तुम् त्वा वगैरे अव्यय, निष्ठा प्रत्यय, खलर्थ प्रत्यय, किंवा तृन् प्रत्यय असेल तर मात्र तो कृत्प्रत्यय कर्तृवाचक असल्यास तेथें कर्मकारक हें कृत्प्रत्ययानें अनभिहित होत असल्यामुळें ओदनं पचन्, ओदनं पेचिवान्, कटं चिकीर्षुः इत्यादि ठिकाणीं ' कर्मणि द्वितीया ' ( सू. २ ) या सूत्रानें कृदन्त शब्दाच्या कर्म-कारकाहून द्वितीया विभक्ति होते; व तो कर्मवाचक असेल तर तेथें कर्तृकारक अनभिहित असल्यामुळें देवदत्तेन कृतः कटः, ईषत्पानः सोमो भवता इत्यादि ठिकाणीं ' कर्तृकरणयोस्तृ-तीया ' ( सू. १८ ) या सूत्रानें कृदन्त शब्दाच्या कर्तृकारकाहून तृतीया विभक्ति होते. कारक-बोधक प्रातिपदिकाहून केलेल्या व कारकाचा अर्थ दाखविणाऱ्या विभक्तींना कारकविभक्ति म्हणतात; व कारकाशिवाय इतर अर्थी केलेल्या विभक्तींपैकीं उपपद निमित्तभूत होऊन विभक्ति-प्रत्यय लागत असल्यास त्यांना उपपदविभक्ती म्हणतात व बाकीच्या सर्व ठिकाणच्या विभक्ति-प्रत्ययांना, विशेषतः संबन्धसामान्यवाचक षष्ठी वगैरे विभक्तिप्रत्ययांना, ' शेषे विभक्ति ' म्हण-तात. निपातांना कर्मप्रवचनीय संज्ञा झाली असतां त्या निपातांशीं संबद्ध अशा प्रातिपदि-काला ' कर्मप्रवचनीययुक्ते द्वितीया ' ( सू. ८ ) या सूत्रानें द्वितीया ही उपपदविभक्ति लागते. गत्यर्थ धातूंच्या कर्माहून द्वितीया किंवा चतुर्थी ही कारकविभक्ति होते. संप्रदानकारकाहून चतुर्थी ही कारकविभक्ति होते. उत्पातानें सुचविलेलें फल दाखविणाऱ्या शब्दांहूनही ' वाताय कपिला विद्युत्० ' इत्यादि ठिकाणीं चतुर्थी विभक्ति होते. त्याप्रमाणेंच ' नमःस्वस्तिस्वाहा० ' ( सू. १६ ) या सूत्रानें नमः स्वस्ति वगैरे शब्दांशीं संबद्ध अशा शब्दाहून नमो देवेभ्यः, स्वस्ति प्रजाभ्यः इत्यादि ठिकाणीं चतुर्थी विभक्ति होते. वाताय, देवेभ्यः, प्रजाभ्यः या ठिकाणची चतुर्थी ही उपपदविभक्ति समजली जाते.

## २१४. विभक्तिनिरूपणान्हिक–२ ( अ २ पा. ३ आन्हिक २ ) अनभिहित कर्ता, करण, अपादान व अधिकरण यांना लागणाऱ्या विभक्ती.

' कर्तृकरणयोस्तृतीया ' ( सू. १८ ) या सूत्रानें तिङ् प्रत्यय, कृत् प्रत्यय इत्यादिकांनीं अनभिहित अशा कर्तृवाचक व करणवाचक शब्दांहून तृतीया ही कारकविभक्ति सांगितली आहे. ' सहयुक्तेऽप्रधाने ' ( सू. १९ ) या सूत्रानें सह अव्ययाचा योग असलेल्या अप्रधान शब्दाहून तसेंच ' इत्थंभूतलक्षणे ' ( सू. २१ ) या सूत्रानें खूण दाखविणाऱ्या शब्दाहून तृतीया विभक्ति सांगितली आहे. ' हेतौ ' ( सू २३ ) या सूत्रानें हेतुवाचक शब्दाहून तृतीया विभक्ति सांगितली आहे; व तो हेतु सांगणारा शब्द गुणवाचक असेल व स्त्रीलिंगी नसेल तर विकल्पानें तृतीया व पंचमी या विभक्ती सांगितल्या आहेत. ' सर्वनाम्नस्तृतीया च ' ( सू. २७ ) या सूत्रानें 'हेतु' या शब्दापूर्वी सर्वनाम शब्द असेल तर दोन्ही शब्दांना तृतीया व षष्ठी या विभक्ती

---

१. मागें पृष्ठ २७३ टीप ३ पहा.

विकल्पानें सांगितल्या आहेत. या 'सह' शब्दाचा व 'हेतु' शब्दाचा योग असतांना सांगितलेल्या विभक्तींना उपपदविभक्ती म्हणतां येईल. 'अपादाने पञ्चमी' (सू. २८) या सूत्रानें अपादानार्थी असलेल्या शब्दाहून पंचमी ही कारकविभक्ति सांगितली आहे. 'अन्यारादितर०' (सू. २९) या सूत्रानें अन्य, आरात्, वगैरे शब्दांचा योग असतांना पञ्चमी, 'पृथग्विना०' (सू. ३२) या सूत्रानें पृथग् विना व नाना यांचा योग असतांना पञ्चमी अथवा तृतीया, त्याप्रमाणेंच दूर अन्तिक हे शब्द व या अर्थाचे इतर शब्द यांचा योग असतांना पंचमी अथवा षष्ठी (सू. ३४), तसेंच स्वामिन्, ईश्वर इत्यादि शब्दांचा योग असतांना षष्ठी अथवा सप्तमी (सू. ३९) या उपपदविभक्ती सांगितल्या आहेत. सूत्रकारांनीं स्तोक, अल्प, कृच्छ्र व कतिपय हे शब्द सत्त्ववाचक नसल्यास (असत्त्ववचनस्य) त्यांहून करण हा अर्थ असतांना विकल्पानें पञ्चमी विभक्ति सांगितली आहे (सू. ३३) व काशिकाकारांनीं 'स्तोकान्मुक्तः' 'अल्पान्मुक्तः' हीं उदाहरणें व 'स्तोकेन विषेण हतः,' 'अल्पेन मधुना मत्तः' हीं प्रत्युदाहरणें दिलीं आहेत. 'करणे च स्तोकाल्प......असत्त्ववचनस्य' (सू. ३३) या सूत्राचें भाष्यकारांनीं व्याख्यान केलें नसल्यामुळें 'असत्त्ववचन' शब्दाचा भाष्यकारांना, कैयटभट्टांना व नागेशभट्टांना काय अर्थ अभिप्रेत असावा हें कळण्याला मार्ग नाहीं. अधिकरणवाचक कारकाहून सप्तमी विभक्ति होते (सू. ३६) 'यस्य च भावेन०' (सू. ३७) या सूत्रानें क्रियेनें समजलेली क्रिया दाखविणाऱ्या क्रियावाचक शब्दाहून सप्तमी विभक्ति होते. दोन क्रियापदें घालून दोन वाक्यें उच्चारण्याऐवजीं या सप्तमीचा लाघवाकरितां लोकामध्यें व काव्यामध्यें अनेक ठिकाणीं उपयोग केलेला आढळून येतो. या सप्तमीला 'सतिसप्तमी' हें नांव रूढ झालेलें आहे.

## २१५. विभक्तिनिरूपणाह्निक–३. (अ. २ पा. ३ आह्निक ३) प्रथमा विभक्तीविषयीं विवेचन.

'प्रातिपदिकार्थ०' (सू. ४६) या सूत्रानें निव्वळ प्रातिपदिकार्थ, लिङ्ग, परिमाण अथवा संख्या दाखविणें झाल्यास प्रातिपदिकाहून प्रथमा विभक्ति करावी असें सांगितलें आहे. व त्याचीं उच्चैः, कृष्णः, द्रोणो व्रीहिः, एकः अशीं उदाहरणें भाष्यकारांनीं दिलीं आहेत. या सर्व ठिकाणीं जरी प्रातिपदिकार्थ वगैरे त्या त्या अर्थी प्रथमा केली असली तरी वाक्याला आवश्यक

---

१. पाणिनीनें 'चादयेऽसत्त्वे' (१।४।५७) या ठिकाणीं 'असत्त्व' हा शब्द घातला आहे; या ठिकाणीं असत्त्व शब्दाचा अर्थ काय घ्यावा अशी जरी शंका आली तरी पण प्रस्तुत 'करणे च०' या सूत्रांत 'असत्त्ववचन' शब्द वापरला आहे त्यावरून 'पर्युदासानें 'सत्त्वभिन्न सत्त्वरहित' असा अर्थ घ्यावा लागतो. सत्त्व शब्दाचा 'द्रव्य' म्हणजे 'धर्मांचें अधिष्ठान' असा अर्थ घेतल्यास 'अद्रव्य' शब्दाचा द्रव्यभिन्न द्रव्यसदृश म्हणजे केवल धर्म असा अर्थ घेतां येईल अर्थात् धर्माशिवाय द्रव्य असूं शकत नाहीं व द्रव्याशिवाय धर्म असूं शकत नाहीं; म्हणून द्रव्यकल्पना पूर्ण गुणीभूत असून केवळ धर्मकल्पना केल्यास त्या धर्मकल्पनेला असत्त्व म्हणतां येईल व 'असत्त्व' या शब्दाचा धर्ममात्र म्हणजे 'केवल धर्म' असा अर्थ घेतां येईल, काशिकाकारांनीं या बाबतींत दिलेलें 'यदा तु धर्ममात्रं करणतया विवक्ष्यते न द्रव्यं, तदा स्तोकादीनामसत्त्ववचनता' हें स्पष्टीकरण विचारांत घेण्याजोगें आहे. ज्याप्रमाणें थोडक्यांत सुटला या अर्थाच्या 'स्तोकान्मुक्तः' या प्रयोगांत 'स्तोकात्' हा शब्द केवल धर्मवाचक (गुणवाचक) आहे त्याप्रमाणें करोति, पचति इत्यादि तिङन्त शब्द केवल क्रियावाचक आहेत असेंही म्हणतां येण्यासारखें आहे.

म्हणून ' अस्ति ' यासारखें सामान्य क्रियापद अध्याहृत घ्यावें लागत असल्यामुळें त्या अस्ति या क्रियापदाचा कर्ता म्हणून त्याच्याशीं संबद्ध अशी ही प्रथमा सर्व ठिकाणीं कारकविभक्तीच होईल असें शेखरकार वगैरे नव्या परंपरेच्या वैयाकरणांचें मत आहे. वार्तिककारांनीं वीरः पुरुषः वगैरे उदाहरणांमध्यें विशेषणसांनिध्यानें जेथें पुरुष वगैरे विशेष्य शब्दांमध्यें प्रातिपदिकार्थापेक्षां ज्यास्त अर्थ असतो तेथें 'मात्र' या शब्दामुळें 'प्रातिपदिकार्थ०' या सूत्रानें प्रथमा होणार नाहीं अशी शंका काढून, अधिक अर्थ हा वाक्यार्थरूपानें मनांत येतो, शब्दार्थरूपानें मनांत येत नाहीं असें उत्तर दिलें आहे. भाष्यकारांनीं अथवा 'अभिहिते प्रथमा' असें लक्षण करावें व तिङ् प्रत्यय, कृत् प्रत्यय, तद्धित प्रत्यय, अथवा समास यांनीं कर्ता, कर्म, करण, संप्रदान इत्यादि प्रकारचा अर्थ अभिहित म्हणजे सांगितला गेला असल्यास प्रथमा करावी, व वृक्षः प्लक्षः वगैरे ठिकाणीं केवळ प्रातिपदिकच उच्चारलेलें दिसलें तरी तेथें 'अस्ति' वगैरे सामान्य क्रिया दाखविणारें क्रियापद अध्याहृत घ्यावें असा वार्तिककारांचा अभिप्राय दाखविला आहे. अशा रीतीनें ' अस्ति ' क्रियापद अध्याहृत घेऊन व्यवस्था केल्यास ' प्रासादे आस्ते ' यासारख्या उदाहरणांमध्यें अधिकरण हा अर्थ घञ् प्रत्ययानें अभिहित असल्यामुळें जरी आस्ते या क्रियेचें अधिकरण अनभिहित असलें तरी प्रासाद या शब्दाहून प्रथमा विभक्तीच होईल, सप्तमी होणार नाहीं अशी शंका काढली आहे व ' तिङ्समानाधिकरणे प्रथमा ' असा 'अभिहिते प्रथमा' याचा अर्थ करून तिङ् प्रत्ययानें दाखविलेला जो पदार्थ तो जर कर्ता या पदानें दाखविला असेल तर प्रथमा विभक्ति करावी असें सुचविलें आहे. परंतु, त्यांनीं या बाबतींतही ' ओदनं पचति देवदत्तः ' या ठिकाणीं ' तिप्तस्० ' या सूत्राचें अपवादसूत्र जें ' लटः शतृशानचा० ' त्याला जागा दिल्याशिवाय पचति येथें ' ति ' हा प्रत्यय व्हावयाचा नाहीं अशा प्रकारची एक निराळीच अडचण दाखविली आहे. भाष्यकारांनीं येथें सूक्ष्म विचार करून ' कर्मणि द्वितीया ' वगैरे विभक्ती सांगणाऱ्या सूत्रांच्या अर्थाविषयीं **प्रत्ययनियम** पक्ष घ्यावा किंवा **अर्थनियम** पक्ष घ्यावा या दोन विकल्पांमुळें, तसेंच 'लटः शतृशानचौ०' या सूत्रांतील अप्रथमा या पदाचा अर्थ **पर्युदासानें** करावा अथवा **प्रतिषेधानें** करावा या दोन विकल्पांमुळें होणाऱ्या चार पक्षांचें सुंदर विवेचन केलें आहे व अर्थनियमाबरोबर पर्युदासपक्षच घेतल्यास दोष येतो म्हणून तेवढा पक्ष सोडून इतर कोणताही पक्ष घ्यावा असें सांगितलें आहे. ' षष्ठी शेषे ' ( सू. ६० ) या सूत्रानें सामान्य संबंध दाखविण्याकरितां षष्ठी विभक्तीचें विधान केलें आहे. या सूत्राचा ' कर्म करण वगैरे जे सहा कारकार्थ त्यांपेक्षां निराळा अर्थ' असा शेष शब्दाचा अर्थ करून राहिलेल्या अर्थीं म्हणजे सामान्य संबंध या अर्थीं षष्ठी विभक्ति करावी असा अर्थ घेतां येतो; त्याप्रमाणेंच, द्वितीया तृतीया वगैरे विभक्तींचे प्रत्यय ज्या ठिकाणीं प्राप्त होत नाहींत त्या ठिकाणीं षष्ठी विभक्तीचे प्रत्यय करावे असाही अर्थ घेतां येतो. ' क्रियेवांचून द्रव्यांचा एकमेकाशीं संबंध होऊं शकत नसल्यामुळें संबंध दाखविण्याकरितां क्रिया ही आवश्यकच आहे; प्रत्यक्ष ती दाखविली नसल्यास तिची कल्पनाच करावी लागते ' असें कांहीं वैयाकरण मानतात; त्यांच्या मतानें 'राज्ञः पुरुषः' येथें संप्रदानक्रिया असते; व त्यामुळें पुरुष हा वास्तविक रीत्या संप्रदानकारक असतो; तसेंच, 'वृक्षस्य शाखा' येथें अधिकरणक्रिया असते व वृक्ष हा अधिकरणकारक असतो. या वैयाकरणांचें मत स्वीकारल्यास कारकाची अविवक्षा घेतल्यासच ' षष्ठी शेषे ' या सूत्राचें प्रयोजन देतां येतें असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. ' ज्ञोऽविदर्थस्य करणे ' ( सू. ५१ ) या व याच्या पुढील सूत्रांमध्यें कर्म वगैरे कारकांची अविवक्षा असाच शेष या शब्दाचा अर्थ घ्यावा लागतो.

## २१६. एकवद्भावान्हिक ( अ. २ पा. ४ आन्हिक १ ) एकवद्भाव.

दुसऱ्या अध्यायाच्या चवथ्या पादामध्यें दोन आन्हिकें आहेत. त्यांपैकीं पहिल्या आन्हिकामध्यें द्विगु व द्वन्द्व या समासांच्या पुढील एकवचनाचा प्रामुख्यानें विचार केला असल्यामुळें या आन्हिकाला एकवद्भावान्हिक असें नांव देतां येणें शक्य आहे. ‘ द्विगुरेकवचनम् ’ ( सू १ ) या सूत्रांतील ‘ द्विगु ’ हा शब्द द्विगूचा अर्थ या अर्थी वापरला आहे; व त्यामुळें द्विगु समासाचा जो समाहार हा अर्थ तो एकत्वसंख्येनें युक्त समजावा असा या सूत्राचा अर्थ होतो व समासाच्या पुढें एकवचनाचा प्रत्यय लागतो. या बाबतींत द्विगु समासाचा समाहार अर्थ असल्यामुळें सहजच एकवचनी प्रत्यय लागतो म्हणून त्याकरितां ‘द्विगुरेकवचनम्’ हें प्रस्तुत सूत्रच करावयास नको असें कांहीं वैयाकरणांचें मत आहे. ‘ द्वन्द्वश्च प्राणितूर्य० ’ ( सू. २ )......‘ विभाषा समीपे ’ ( सू. १६ ) या सूत्रांमध्यें प्राण्यंगें, सेनांगें, खेडेगावांचीं नांवें, क्षुद्रजन्तू, नित्यविरोधी प्राणी, अबहिष्कृत शूद्र इत्यादि विशिष्ट अर्थी असलेल्या शब्दांच्या द्वन्द्वसमासालाही एकवद्भाव सांगितला आहे; व वृक्ष, मृग, तृण, धान्य, पशु, पक्षी वगैरे अर्थांना दाखविणाऱ्या विशेष शब्दांच्या बाबतींत एकवद्भावाचा विकल्प सांगितला आहे. वास्तविक पाहतां, समाहार हा अर्थ विवक्षित असतांना एकवद्भाव होतोच, असें असूनही सूत्रकारांनीं ज्या अर्थी ‘ द्वन्द्वश्च प्राणितूर्य० ’ इत्यादि सूत्रांनीं एकवद्भाव सांगितला आहे त्या अर्थी वरील ठिकाणीं तो एकवद्भाव आवश्यक होतो व विकल्प सांगणाऱ्या ‘विभाषा वृक्षमृग०’ इत्यादि तीन सूत्रांनीं ( सूत्रें १२, १३, १६ ) सांगितलेल्या ठिकाणीं मात्र तो विकल्पानें होतो असें या सूत्रांचें तात्पर्य भाष्यकारांनीं दिलें आहे.

## २१७. सामासिक शब्दाच्या लिंगाविषयीं विचार.

‘ स नपुंसकम् ’......‘अर्धर्चाः पुंसि च’ ( सू. १७ ३१ ) या सूत्रांमध्यें द्विगु, द्वन्द्व व कांहीं विशिष्ट तत्पुरुष समास यांच्या लिंगाविषयीं सूत्रकारांनीं विवेचन केलें आहे. द्विगु समास, समाहारार्थी द्वन्द्व समास, व अव्ययीभाव समास हे सदा नपुंसकलिंगी असतात. त्याप्रमाणेंच उपज्ञा, उपक्रम, छाया, सभा, सेना, सुरा, शाला व निशा हे शब्द शेवटीं असलेले तत्पुरुष कांहीं विशिष्ट ठिकाणीं नपुंसकलिंगी होतात. इतरेतरद्वन्द्व समास व तत्पुरुष समास या समासांमध्यें शेवटच्या पदाचें जें लिंग असतें त्याप्रमाणें समासाचें लिंग समजलें जातें. वार्तिककारांनीं तत्पुरुष समासांपैकीं प्राप्त, आपन्न अथवा अलं हें प्रथम पद असलेले तत्पुरुष व गतितत्पुरुष या समासांमध्यें पूर्वपदाच्या लिंगाप्रमाणें लिंग समजलें जातें असें सांगितलें आहे. वास्तविक पाहतां, ‘ परवल्लिङ्गं० ’ ( सू. २६ ) या सूत्रामध्यें ‘ तत्पुरुष ’ हें पद घातलें नाहीं तर तत्पुरुष समासापैकीं फक्त जो पूर्वपदाला प्राधान्य असलेला एकदेशितत्पुरुष समास त्याचे बाबतींतच उत्तरपदाप्रमाणें लिंग होतें असें सांगावें लागेल; इतर तत्पुरुषांमध्यें उत्तरपदाला प्राधान्य असल्यामुळें त्याच्या लिंगाप्रमाणेंच समासाचें लिंग सहजच विशिष्ट प्रयत्न केल्याशिवाय होऊं शकेल; एकदेशितत्पुरुष समासाचे बाबतींतही एकदेशितत्पुरुष समास कर्मधारय समासाप्रमाणें सोडवल्यास त्याच्या लिंगाबद्दलही पूर्वपदाप्रमाणें लिंग होतें असें निराळें विधान करावयास नको असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. ‘ पूर्ववदश्ववडवौ ’......‘ अर्धर्चाः पुंसि च ’ ( सू. २७–३१ ) या सूत्रांमध्यें विशिष्ट शब्द शेवटीं असलेले तत्पुरुष विशिष्ट लिंगींच आढळतात असें सूत्रकारांनीं सांगितलें आहे. उदाहरणार्थ—रात्र, अह्न व अह हे शब्द शेवटीं

असलेले तत्पुरुष सदा पुल्लिंगींच असतात; अकारान्त द्विगु समास स्त्रीलिंगींच आढळून येतो; अपथ शब्द नपुंसकलिंगींच असतो; अर्धर्च, कार्षापण, गोमय, सार इत्यादि शब्द पुल्लिंगीं व नपुंसकलिंगींही आढळतात. 'इदमोन्वादेशे०' ( सू. ३२ ) या सूत्रामध्यें 'इदम्' या शब्दाला व 'एतदस्त्रतसो०' या सूत्रामध्यें 'एतद्' या शब्दाला विशिष्ट प्रसंगीं 'अश्' आदेश सांगितला आहे.

## २१८. धातूंना, प्रातिपदिकांना व प्रत्ययांना होणारे आदेश.

'आर्धधातुके' ( सू. ३५ ) हें अधिकारसूत्र सांगून 'वा यौ' ( सू. ५७ ) या सूत्रापर्यंत मधील सर्व सूत्रांमध्यें आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना धातूंना होणारे आदेश सूत्रकारांनीं सांगितले आहेत. त्यांपैकीं अस् धातूला भू, ब्रू धातूला वच्, चक्ष् धातूला ख्या हे कोणताही आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना होतात; बाकीचे आदेश विशिष्ट प्रसंगीं होतात. उदाहरणार्थ—तकारादि कित्प्रत्यय किंवा ल्यप् प्रत्यय पुढें असतांना अद् धातूला जग्ध्, पण लुङ् व सन् प्रत्यय कर्तव्य असतांना घस्; लिङ् प्रत्यय कर्तव्य असतांना हन् धातूला वध; लुङ् कर्तव्य असतांना इ ( इण् ) धातूला गा, पण णि व सन् कर्तव्य असतांना गम्. 'आर्धधातुके' या अधिकारसूत्राचा 'आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना पुढील सूत्रांमध्यें सांगितलेले आदेश होतात' असा अर्थ केला असतां पूर्वींचे म्हणजे स्थानिभूत जे अस्, अद्, चक्ष् इत्यादि धातू त्यांच्या निमित्तानेंच इष्ट नसलेला 'ऋहलोर्ण्यत्' ( ३।१।१२४ ) या सूत्रानें सांगितलेला ण्यत् प्रत्यय होऊं लागेल अशी अडचण येथें वार्तिककारांनीं दाखविली आहे; व तिचा परिहार करण्याकरितां 'सार्वधातुके न' असा सूत्रपाठ करावा लागेल असें म्हटलें आहे. भाष्यकारांनीं 'आर्धधातुके' ही विषयसप्तमी घेऊन वरील अडचण दूर होईल किंवा 'आर्धधातुके' या ऐवजीं 'आर्धधातुकासु' असें म्हणण्यानेंही इष्टसिद्धि होईल असें म्हटलें आहे. 'अदो जग्धिः०' ( सू. ३६ ) या सूत्रामध्यें तकारादि आर्धधातुक पुढें असतांना ( ति किति ) एवढेंच म्हटल्यानें काम भागत असतांना 'ल्यप्' हा शब्द भाष्यकारांनीं सूत्रामध्यें घातला आहे यावरून 'ल्यप् आदेश जरी बहिरंग असला तरी अंतरंग विधींना मागें सारून तो होतो ( अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो ल्यप् बाधते ) असें परिभाषारूप ज्ञापन भाष्यकारांनीं येथें दिलें आहे. हें ज्ञापन सांगणाऱ्या त्या वेळच्या वैयाकरणांच्या तोंडीं असलेले दोन श्लोक[१] येथें भाष्यकारांनीं उद्धृत केले आहेत. मागें सांगितल्याप्रमाणें हे श्लोक भर्तृहरीनें आपल्या महाभाष्यदीपिकेमध्यें निर्दिष्ट केलेलीं श्लोकवार्तिकेंही असण्याचा संभव आहे. 'गाङ् लिटि' ( सू. ४९ ) या सूत्रामध्यें सूत्रकारांनीं 'गा' आदेशाचे ऐवजीं, ङ् अनुबन्धाची जरूर नसतांनाही तो जोडून, गाङ् आदेश उच्चारला आहे यावरून 'अनुबन्धयुक्त आदेश सांगितला असतां स्थानींतील अनुबन्धावर अवलंबून असलेलें कार्य आदेशाला करतां येत नाहीं' ( सानुबन्धकस्यादेशे इत्कार्यं न भवति ) असें ज्ञापन निघतें पण तें घेतल्यास कांहीं इष्ट उदाहरणें साधत असलीं तरी बरेच दोष येतात असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. कदाचित् बरेच दोष येतात म्हणूनच हा ज्ञापितार्थ

---

१. "जग्धिविधिर्ल्यपि यत्तदकस्मात्सिद्धमदस्ति कितीति विधानात् ।
हिप्रभृतींस्तु सदा बहिरङ्गो ल्यब् हरतीति कृतं तदु विद्धि" ॥ १ ॥

एष एवार्थः

"जग्धौ सिद्धेऽन्तरङ्गत्वात्ति कितीति ल्यबुच्यते ।
ज्ञापयत्यन्तरङ्गाणां ल्यपा भवति बाधनम्" ॥ २ ॥

( महाभाष्य भाषांतर भाग २ पृ. ४८४-४८५ पहा. )

परिभाषा म्हणून परिभाषेन्दुशेखरामध्यें नागेशभट्टांनीं दिला नसावा. 'अजेर्व्यघञपोः' (सू. ५६) या सूत्राची व्याख्या करतांना फक्त घञ् व अप् यांशिवाय कोणताही आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना 'अज्' धातूला 'वी' हा आदेश होतो असें म्हटल्यास समाजः, समजनं, समज्या यांसारखीं कांहीं इष्ट रूपें साधणार नाहींत; इतकेंच नव्हे तर संवीतिः प्रवेता यांसारखीं अनिष्ट रूपें होऊं लागतील ही आपत्ति टाळण्याकरितां मागील सूत्रांतून 'वा' हा शब्द येथें अनुवृत्तीनें आणून व्यवस्थितविभाषेनें जरूर असेल तेथेंच वी आदेश करावा इतर ठिकाणीं करूं नये असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे; व त्याच्या समर्थनार्थ परस्परांशीं उपरोधिक बोलणाऱ्या वैयाकरण व सूत यांचा छोटासा मनोरंजक संवाद दिला आहे व त्यावरून वैयाकरणांनीं फक्त सूत्रें पाहून रूपें साधून तींच शुद्ध आहेत असें म्हणूं नये; तर **प्रचलित भाषेकडे लक्ष देऊन भाषेमध्यें प्रसृत असलेलीं रूपें साधण्याकडे व दुष्ट रूपें वगळण्याकडे लक्ष देऊन सूत्रांचा अर्थ करावा असें सूचित केलें आहे.**

## २१९. प्रत्ययलोपान्हिक (अ. २ पा. ४ आन्हिक २). तद्धित प्रत्ययाचा लोप झाला असतां होणाऱ्या कार्यांचें विवेचन.

या आन्हिकामध्यें तद्राज, गोत्रापत्य, व अपत्य या अर्थाच्या तद्धित प्रत्ययांचा, सुप् प्रत्ययांचा, शप् विकरणाचा, सिच् प्रत्ययाचा, आम् प्रत्ययाचे पुढील प्रत्ययांचा, तसेंच अव्यया-पुढील आप् व सुप् प्रत्ययांचा सूत्रकारांनीं जो लुप् सांगितला आहे त्याचें भाष्यकारांनीं विवेचन केलें आहे म्हणून या आन्हिकाला प्रत्ययलोपान्हिक नांव देतां येणें शक्य आहे. 'तद्राजस्य बहुषु०' (सू. ६२) या सूत्राचें विवेचन करतांना प्रथमतः 'बहुषु' या पदाचा 'बहुत्व संख्येनें युक्त प्रत्यय' असा सहज अर्थ होत असतांना वार्तिककारांनीं समासानें दाख-विलेलें बहुत्व असतांनाही प्रस्तुत सूत्रानें लोप होऊं लागेल अशा समजुतीनें तशा ठिकाणीं लोपाचा प्रतिषेध करावा असें म्हटलें आहे. याविषयीं 'वार्तिककार या ठिकाणीं चुकले' अशा तऱ्हेचें उद्गार न काढतां मोठ्या बहुमानानें 'उपाय योजिलेला असतांनासुद्धां क्वचित् एकादे वेळीं आचार्य प्रश्न उपस्थित करतात' एवढेंच भाष्यकारांनीं म्हटलें आहे. सूत्रांतील 'बहुषु' या शब्दाचा (१) बहुत्व संख्येनें युक्त प्रत्यय म्हणजे बहु अपत्यें इत्यादि प्रकारच्या अर्थीं केलेला प्रत्यय पुढें असतांना असा अर्थ करावयाचा, किंवा (२) अङ्गान् अतिक्रान्तः अत्यङ्गः इत्यादि ठिकाणीं अङ्ग, वङ्ग वगैरे शब्दांपुढें जसा दिसून येतो तसा बहुवचन-प्रत्यय पुढें असतांना असा अर्थ करावयाचा या दोन्ही मतांचें साधकबाधक प्रमाणें देऊन भाष्यकारांनीं उत्तम विवरण केलें आहे व प्रत्ययार्थावरील बहुत्व असतांना लुक् होतो हें मत ज्यास्ती ग्राह्य असें ठरविलें आहे. या ठिकाणीं 'गर्गवत्सवाजाः' इत्यादि द्वन्द्व समासांमध्यें प्रत्ययार्थावर एकत्व आहे म्हणून गार्ग्य वगैरे शब्दांपुढील अपत्यप्रत्ययाचा लुक् होणार नाहीं या शंकेचें निरसन 'द्वंद्वांतील प्रत्येक शब्द बहुत्व दाखवूं शकतो' या आशयाचा मागें परि. २११ मध्यें वर्णिलेला **युगपदधिकरणवचनतापक्ष** घेऊन केलें आहे. तसेंच लग्नाची सोयरीक दाखविणाऱ्या

---

१. एवं हि कश्चिद्वैयाकरण आह । कोऽस्य रथस्य प्रवेतेति । सूत आह । आयुष्मन्नहं प्राजितेति । वैयाकरण आह । अपशब्द इति । सूत आह । **प्राप्तिज्ञो देवानांप्रियो न त्विष्टिज्ञ इष्यत एतद्रूप-मिति** । वैयाकरण आह । अहो खल्वनेन दुरुतेन बाध्यामह इति । सूत आह । न खलु वेञः सूतः सुवतेरेव सूतो यदि सुवतेः कुत्सा प्रयोक्तव्या दुःसूतेनेति वक्तव्यम्" (म. भा. भाषांतर भाग २, पृष्ठे ४९१-४९२ पहा).

अत्रिभरद्वाजिका, वसिष्ठकश्यपिका, भृग्वङ्गिरसिका इत्यादि शब्दांचे ठिकाणीं अपत्यप्रत्ययाचा लुक् कसा होऊं शकतो याविषयीं फारच मार्मिक विवेचन केलें आहे. गार्गी च वात्स्यश्च वाज्यश्च या ठिकाणीं समासाचें रूप कसें व्हावें याविषयीं विवेचन करतांना गार्गी हा एकच शब्द स्त्रीलिंगी आहे; तेव्हां 'तद्राजस्य०' या प्रस्तुत सूत्रांत अस्त्रियाम् हा पर्युदास घेतल्यास अपत्य-प्रत्ययांचा लुक् होऊन गर्गवत्सवाजाः असें रूप व्हावें, कां प्रतिषेध घेतल्यास लुक् होणार नाहीं म्हणून गार्गीवात्स्यवाजाः असें रूप व्हावें या शंकेचें उत्तर भाष्यकारांनीं 'देवच हें जाणूं शकेल' असें फारच मनोरंजक रीतीनें दिलें आहे.

## २२०. विकरणांचा, आम् प्रत्ययापुढील प्रत्ययांचा व अव्ययापुढील आप् व सुप् प्रत्ययांचा लोप झाला असतां होणाऱ्या कार्यांचें विवेचन.

'यङोचि च' (सू. ७४) या सूत्राचें व्याख्यान करतांना वार्तिककारांनीं सनीस्रसः व दनीध्वसः यांसारखीं उदाहरणें साधावीं म्हणून 'ऊतोचि' म्हणजे अच् प्रत्यय पुढें असतांना यङाचा लुक् ऊ हा स्वर मागें असेल तरच करावा असें सांगितलें आहे. भाष्यकारांनी सनीस्रंसः व दनीध्वंसः हींच उदाहरणें इष्ट असल्यामुळें 'ऊतोचि' या वार्तिकाची जरूर नाहीं असें म्हटलें आहे. 'आमः' या सूत्राचें विवेचन करतांना 'आम् प्रत्ययाच्या पुढील प्रत्ययाचा लुक् होतो' असा सूत्राचा अर्थ असल्यामुळें लकाराला तिङ् आदेश होण्यापूर्वींच लकाराचा लुक् होतो व आम् अन्तीं असलेला शब्द तिङन्त होऊं शकत नाहीं; लकार हा कृत् प्रत्यय असल्यामुळें आमन्त शब्द कृदन्त अव्यय होतो व त्यामुळें त्याच्यापुढें सुप् प्रत्यय लागून त्यांचा लुक् होतो असें वार्तिककारांनीं येथें सांगितलें आहे. आम् शेवटीं असलेला शब्द सुबन्त झाल्यामुळें त्याच्या पुढील 'चकार', व 'बभूव' यांसारख्या तिङन्ताला सर्वनिघात होतो. आम्-प्रत्ययान्त व त्यापुढील तिङन्त हीं निरनिराळीं पदें असल्यामुळेंच 'तं पातयां प्रथममास पपात पश्चात्' असे प्रयोग कवी करूं शकले तरी 'कृञ्चानुप्रयुज्यते लिटि' (३।१।४०) या सूत्रांत अनुप्रयोग शब्द असल्यामुळें त्या पदांचें जोडून उच्चारण केलेलेंच बरें. 'अव्ययादाप्सुपः' (सू. ८२) या सूत्राचें विवेचन करतांना वार्तिककारांनीं अव्ययांना लिंग नसल्यामुळें आप् (स्त्रीलिंगवाचक प्रत्यय) हा शब्द सूत्रांत उच्चारण्याची जरूर नाहीं असें म्हटलें आहे. आप् प्रत्यय उच्चारण्याची जशी जरूर नाहीं तशी सुप् प्रत्ययही उच्चारण्याची जरूर नाहीं; कारण, अव्ययाला एक दोन अशा संख्येचाही योग नसतो असें असून सुद्धां ज्याअर्थीं आप् व सुप् यांचा लुक् सूत्रकार सांगतात त्या अर्थीं जो 'पद' म्हणून समजला जात नाहीं अशा शब्दाचा प्रयोग करतां येत नाहीं (अपदं न प्रयुञ्जीत) असा दण्डक असल्यामुळें व सुप् प्रत्यय केल्याशिवाय पद ही संज्ञाच होऊं शकत नसल्यामुळें कोणताही अर्थ निमित्त म्हणून न धरतां अव्ययाहून सुप् प्रत्यय होतात व त्यांचा लुक् होतो; तसेंच असा प्रत्यय होण्यास अर्थनियमपक्षीं किंवा प्रत्ययनियमपक्षीं कोणतीही अडचण येत नाहीं असा भाष्यकारांनीं येथें सूत्रकारांचा अभिप्राय दिला आहे.

**दुसरा अध्याय (पदविध्यध्याय) समाप्त.**

---

१. "किं पुनरत्रार्थसतत्त्वम् । देवा एतज् ज्ञातुमर्हन्ति" (म. भा. भाषांतर भाग २, पृष्ठ ५०३ पहा).

## २२१. सन्प्रत्ययान्हिक ( अ. ३ पा. १ आन्हिक १ ). प्रत्यय शब्दाचा अर्थ.

सूत्रकारांनीं पहिल्या अध्यायामध्यें व्याकरणशास्त्राला उपयुक्त अशा संज्ञा सांगितल्या आहेत. त्यानंतर दुसऱ्या अध्यायामध्यें पदांचें विवरण केलें आहे म्हणजे समासानें दोन अथवा अधिक पदें जोडलीं गेल्यास तो समास कोणत्या अर्थीं असतो व पदें पृथक् असल्यास त्यांचा एकमेकांशीं अथवा क्रियेशीं कसा संबंध असतो हें सांगितलें आहे. तिसऱ्या अध्यायामध्यें धातूहून साधलीं जाणारीं जीं तिङन्त व कृदन्त पदें त्यांचा विचार केला आहे. या पहिल्या अधिकरणांत प्रत्ययाची व्याख्या व सामान्यतः प्रत्ययांचे स्वर सांगून इच्छार्थीं 'सन्' प्रत्ययाचें विवेचन केलें आहे. म्हणून या आन्हिकास सन्प्रत्ययान्हिक म्हणतां येणें शक्य आहे. 'प्रत्ययः' ( सू. १ ) या अधिकारसूत्रामध्यें भाष्यकारांनीं ' प्रत्यय ' या संज्ञेचें विवेचन केलें आहे. 'प्रत्ययः' एवढेंच मोघम अधिकारसूत्र असल्यामुळें पुढील सूत्रांमध्यें आढळणाऱ्या शब्दांपैकीं कोणत्या शब्दाला प्रत्यय म्हणावें हा संशय साहजिकच येणें शक्य आहे, व त्याचें निवारण सूत्रामध्यें जो निमित्ती, पूर्वीं न उच्चारलेला, प्रधान असा शब्द असतो त्यालाच प्रत्यय संज्ञा द्यावी असें म्हणून वार्तिककारांनीं केलें आहे. कांहीं सूत्रांमध्यें फक्त विकार व आगमच सांगितले आहेत; पण ते विकार व आगम 'अमक्याला अमुक होतें' अशा रीतीनें षष्ठी विभक्तीनें सांगितले असल्यामुळें व प्रत्यय हा नेहमीं अमक्यापुढें अमुक होतो अशा रीतीनें पञ्चमी विभक्तीनें सांगितला असल्यामुळें विकार व आगम यांना प्रत्यय ही संज्ञा होत नाहीं. अशा रीतीनें प्रत्यय कोणता तें समजतें. अथवा, प्रत्यय ही अन्वर्थ संज्ञा असल्यामुळें जो अर्थ दाखवितो तो प्रत्यय, अथवा ज्याचा अर्थ प्रकृतीनें दाखविला जातो तो प्रत्यय, अशी प्रत्यय शब्दाची व्याख्या होत असल्यामुळें प्रत्यय कोणता तें समजण्यास अडचण येत नाहीं.

## २२२. प्रत्ययाचें परत्व व आद्युदात्तत्व.

' परश्च ' ( सू. २ ) या सूत्रानें प्रत्यय नेहमीं पुढें ठेविला जातो असें सांगितलें आहे. अमक्यापुढें अशी पंचमी विभक्ति उच्चारून प्रत्यय सांगितले असल्यामुळें, तसेंच जेथें प्रत्यय प्रकृतीच्या मागें किंवा मध्यें होतात तेथें ते तशा रीतीनें स्पष्ट सांगितले असल्यामुळें वास्तविक पाहतां ' परश्च ' या सूत्राची जरूर नाहीं; शिवाय, क्विप् व क्विन् यांसारख्या प्रत्ययांचा जरी सर्वलोप झाला तरी पकार व नकार जोडलेले असे प्रत्यय पुढें असतांना विशिष्ट स्वर वगैरे कार्यें होतात असें सांगितलें असल्यामुळें प्रत्यय हे प्रकृतीच्या पुढें जोडले जातात असें सिद्धही होतें; तरी पण प्रकृतीच्या पुढें प्रत्यय लागतात हें सांगणारें प्रस्तुत ' परश्च ' हें सूत्र पाहिजे. कारण,कांहीं ठिकाणीं जिच्यापुढें प्रत्यय दिसत नाहीं अशी प्रकृतीच बभ्रुः, मण्डुः, लमकः इत्यादि ठिकाणीं दृष्टीस पडते; त्याप्रमाणेंच ज्याच्या मागें प्रकृति नाहीं असा प्रत्ययच द्वयसं ( किमत्र द्वयसं),तिथी (कात्र तिथी) इत्यादि ठिकाणीं दृष्टीस पडतो; म्हणून केवल प्रकृति किंवा केवल प्रत्यय यांचा वाक्यामध्यें प्रयोग होतो अशी समजूत होणें शक्य आहे; परंतु तशी समजूत न व्हावी व प्रत्ययासहितच प्रकृतीचा प्रयोग करावा व प्रकृतीसहितच प्रत्ययाचा प्रयोग करावा असा नियम आहे हें कळण्याकरितांच ' परश्च ' सूत्र मुद्दाम केलें आहे असें येथें वार्तिककारांनीं सांगितलें आहे. ' आद्युदात्तश्च ' ( सू. ३ ) या सूत्रामध्यें प्रत्ययाचा आदि स्वर उदात्त होतो असें सांगितलें आहे. सूत्रकारांना ज्या ज्या ठिकाणीं प्रत्ययाला स्वरित किंवा अनुदात्त सांगावयाचा असतो त्या त्या ठिकाणीं त्यांनीं तो सांगितला असल्यामुळें राहिलेला उदात्त सांगण्याचें कारण नसलें तरी

प्रत्ययामध्यें अनेक स्वर असल्यास पहिलाच स्वर उदात्त होतो हें सांगणें हा या सूत्राचा मुख्य उपयोग आहे. या तिसऱ्या अध्यायांतच ' प्रत्यय होतो व तो आद्युदात्त होतो, सुप् व पित् प्रत्यय मात्र अनुदात्त होतात' अशा रीतीनें प्रत्यय व स्वर एकदम सांगण्याचा सूत्रकारांचा मुख्य हेतु म्हणजे प्रत्ययविशिष्ट प्रकृतीला आद्युदात्त किंवा अंतोदात्त होऊं नये असा असावा. आतां प्रस्तुत सूत्रानें प्रत्ययांना उदात्त सांगण्यामुळें प्रत्ययांना लागणारे आगम अनुदात्त व्हावे हा सूत्रकारांचा हेतु असेल असें म्हणावें तर ज्ञापकामुळें तसेंच 'आगमा अनुदात्ताः' असें स्वतंत्र विधान असल्यामुळेंही आगम हे सर्वानुदात्त होतात हें सिद्ध करतां येतें; इतकेंच नव्हे, पण आगम हे प्रत्ययस्वराचे बाबतींत असून नसल्यासारखे समजावे असेंही विधान करावें लागत आहे.

## २२३. सन्नन्त धातूंविषयीं विचार.

'गुप्तिज्किद्भ्यः सन्' व 'मान्बध०' (सू. ५-६) या सूत्रांनीं गुप् वगैरे धातूंहून स्वार्थी सन् प्रत्यय सांगितला आहे. सूत्रांतील 'कर्म' या शब्दानें क्रिया दाखविली असल्यामुळें व उपसर्ग केवळ द्योतक असून केवळ धातूचाच क्रिया हा अर्थ असल्यामुळें 'धातोः कर्मणः०' (सू. ७) या सूत्रामध्यें 'धातोः' या पदाचा कांहीं उपयोग नाहीं असें वैयाकरणांचें मत म्हणून भाष्यकारांनीं दिलें आहे. वास्तविक पाहतां, उपसर्ग जरी द्योतक असले तरी उपसर्ग व धातु हे दोन्ही मिळून विशिष्ट क्रिया प्रकाशित करीत असल्यामुळें उपसर्गसहित धातूचाच क्रिया अर्थ आहे असा स्वतःचा सिद्धान्त भाष्यकारांनीं दिला आहे व 'धातोः' या शब्दाची उपयुक्तता सिद्ध केली आहे. आतां, उपसर्गसहित धातूमधील फक्त धातूलाच 'सन्' हा प्रत्यय जोडिला जातो; कारण, सूत्रांतील 'धातोः' ही अवयवषष्ठी असल्यामुळें क्रियावाचक शब्दाचा अवयव जो धातु त्याहून इच्छा या अर्थीं सन् प्रत्यय होतो असा सूत्राचा अर्थ आहे. वास्तविक पाहतां, इच्छेचा कर्ता व ज्या क्रियेची इच्छा केली जाते तिचा कर्ता स्वभावतः एकच असल्यामुळें 'कर्मणः' व 'समानकर्तृकात्' या पदांची जरूर नाहीं. तसेंच, व्याकरणामध्यें वृत्तिपक्ष आणि अवृत्तिपक्ष हे दोन्ही स्वीकारले असल्यामुळें वृत्ति करणें किंवा न करणें हें वक्त्याच्या इच्छेवर अवलंबून असल्यामुळें सूत्रामध्यें 'वा' या शब्दाचाही कांहीं उपयोग नाहीं; तेव्हां 'धातोरिच्छायाम्' एवढ्या सूत्रानेंच काम भागेल असेंही भाष्यकारांनीं म्हटलें आहे. यानंतर वार्तिककारांनीं अचेतन कर्ता असतांनाही 'सन्' प्रत्यय केलेला दृष्टीस पडतो, कारण जिच्यामुळें इच्छा व्यक्त होते अशी प्रवृत्ति चेतनांचे व अचेतनांचे ठिकाणीं दृष्टीस पडते हें दिलें आहे. तसेंच, सर्वच वस्तू एका दृष्टीनें चेतन मानिल्या जाऊं शकतात असेंही म्हटलें आहे, व 'कंसकाः सर्पन्ति' यासारखीं उदाहरणेंही दिलीं आहेत. यानंतर ग्रामं गन्तुमिच्छति या वाक्यांत 'ग्रामं' हें गम् धातूचें कर्म व ग्राम आणि गमनक्रिया ही दोन्ही इष् धातूचीं कर्में असल्यामुळें 'इष्यते ग्रामो गन्तुम्' हा प्रयोग होण्यास कांहीं हरकत नाहीं असेंही येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे.[1]

---

१. भाष्यकारांनीं या बाबतींत केलेलें "अथेह ग्रामं गन्तुमिच्छतीति कस्य किं कर्म । इषेरुभे कर्मणी ।......एवं तर्हि गमेर्ग्रामः कर्म इषेर्गमिः कर्म ।.. ..एवं तर्हि गमेर्ग्रामः कर्म इषेरुभे कर्मणी" ॥ (म. भा. भाषांतर भाग ३ पृष्ठें ३०-३१) हें विवरण फार मार्मिक आहे व एका दृष्टीनें तें अत्यन्त सूचक आहे. भाष्यकारांची येथील विचारसरणी पाहिल्यास कारकत्व हा धर्म क्रियेशीं असलेल्या संबंधाला अनुसरून असल्यामुळें ज्याप्रमाणें कृदन्त नामें हीं वाक्यांतील क्रियेचीं कारकें होऊं शकतात त्याप्रमाणें, अव्ययांवरही

## २२४. क्यजादिप्रत्ययान्हिक ( अ. ३ पा. १ आन्हिक २ ). क्यच् व क्यङ् प्रत्यय.

या अधिकरणामध्यें (सूत्रें ८–२६) क्यच् वगैरे प्रत्ययांचा विचार केला असल्यामुळें याला क्यजादिप्रत्ययान्हिक असें नांव दिलें असतां चालेल. क्यच् प्रत्यय सांगणाऱ्या 'सुप आत्मनः क्यच्' (सू. ८) या सूत्रामध्यें ' आत्मनः ' हें पद घातल्यामुळें आपणाला स्वतःला अमुक असावें अशी इच्छा असतांनाच क्यच् प्रत्यय होतो. या सूत्रांत ' सुपः ' हें पद असल्यामुळें सुबन्तालाच क्यच् प्रत्यय लागतो व त्यामुळें क्यच् प्रत्यय पुढें असलेल्या शब्दाला पद म्हणतां येतें; अर्थात् ' क्य ' पुढें असतांना नकारान्त प्रातिपदिकाला पद संज्ञा होते असें सांगणाऱ्या ' नः क्ये '(१।४।४५) या सूत्राची जरूर नाहीं; तरी पण ज्या अर्थी तें सूत्र केलें आहे त्या अर्थी क्यच् किंवा क्यङ् पुढें असतांना नकार शेवटीं असेल तरच 'पद' ही संज्ञा होते इतर ठिकाणीं होत नाहीं असा नियम केला जातो. ' महान्तं पुत्रं इच्छति ' या ठिकाणीं पुत्र शब्द हा महत् या समानाधिकरण विशेषण शब्दाशीं संबद्ध असल्यामुळें ' पुत्रं ' या शब्दाहून क्यच् होत नाहीं व महान्तं पुत्रीयति असा भलता प्रयोग होत नाहीं. याच कारणामुळें ऋद्धस्य राज्ञः पुरुषः येथें राजन् व पुरुष यांचा समास होत नाहीं; तसाच ऋद्धस्य उपगोः अपत्यम् येथें तद्धित प्रत्यय ( अण् ) होत

---

कर्तृत्व कर्मत्व वगैरे धर्म राहत असल्यामुळें कृदन्त अव्ययेसुद्धां वाक्यांतील क्रियेचीं कारकें होऊं शकतात. अर्थात् कृदन्त अव्ययांतील धात्वर्थ जी क्रिया तिच्याशीं संबद्ध अशी कारकें वाक्यांत असूं शकतात. ' ग्रामं गन्तुं इच्छति ' या ठिकाणीं गन्तुं हे ' इच्छति ' याचें कर्मकारक आहे; व ग्रामं हें गन्तुं याचें म्हणजे गन्तुं यामधील गमन क्रियेचें कर्मकारक आहे; व तें अनभिहित कर्म असल्यामुळें त्याहून द्वितीया विभक्ति झाली आहे. गन्तुं हेंही इच्छति येथील क्रियेचें अनभिहित कर्मकारक आहे व त्याहूनही द्वितीया विभक्ति झाली पाहिजे म्हणून ' गन्तुम् ' याहून द्वितीया विभक्ति झाली आहे व तिचा 'अव्ययादाप्सुपः' यानें लुक् झाला आहे असें मानणें भाग आहे. इंग्रजी मराठी वगैरे भाषांकडे लक्ष दिल्यास तुमुनन्त शब्दाच्या अर्थीं योजले जाणारे जाणें (to go) येणें (to come) करणें (to do) हे जे शब्द त्यांचा कर्ता व कर्म अशा रीतीनें प्रयोग होतोच, इतकेंच नव्हे तर ' जाण्यानें काम झालें ', ' जाण्यांत फायदा नाहीं ' इत्यादि वाक्यांमध्यें या शब्दांचा करणकारक, अधिकरणकारक असाही प्रयोग होतो, व इतर नामांप्रमाणें त्यांनाही विभक्तिप्रत्यय लागतात. कर्मणि प्रयोगामध्यें इष् धातूचीं जी गन्तुं व ग्रामं हीं दोन कर्में त्यांपैकीं गौण कर्म ग्राम हें इष्यते यानें अभिहित झाल्यामुळें ' ग्रामो गन्तुमिष्यते ' असा प्रयोग होतो असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. याच विचार-सरणीचा अवलंब करून गन्तुं हें ' इष्यते ' याचें अभिहित कर्म मानिल्यास व ग्रामं हें ' गन्तुं ' याचें अनभिहित कर्म मानिल्यास ' ग्रामं गन्तुमिष्यते ' हाही प्रयोग होऊं शकतो व म्हणूनच भट्टोजी दीक्षितांनीं ' ग्रामो गन्तुमिष्यते ' व ' ग्रामं गन्तुमिष्यते ' हे दोनही प्रयोग होतात असें म्हटलें असावें. नागेशभट्ट वगैरे नव्या वैयाकरणांनीं मात्र " प्रधानेतरयोर्यत्र० " या कारिकेचा उल्लेख करून ज्या ठिकाणीं एकादें कारक दोन क्रियांशीं संबद्ध होऊन त्याला निरनिराळ्या विभक्ती लागण्याचा प्रसंग येईल तेथें प्रधान क्रियेमुळें असलेल्या कारकत्वाला अनुसरून विभक्तिप्रत्यय लागतात असा नियम घातला आहे व ग्रामो गन्तुमिष्यते हा एकच प्रयोग ग्राह्य धरला आहे. भाष्यकारांचें या बाबतींत स्पष्ट मत दिसून येत नसलें तरी त्यांना दोन्ही प्रयोग मान्य असावे असें दिसतें. " पातुं न प्रथमं व्यवस्यति जलम् " येथें पातुं याचें जलं हें अनभिहित कर्म आहे. तसेंच " शक्यं च श्वमांसादिभिरपि क्षुधं प्रतिहन्तुम् " असा प्रयोग केल्यास क्षुधं हे अनभिहित कर्म होईल; पण क्षुधं याचे ऐवजीं क्षुत् प्रयोग केल्यास क्षुत् व शक्यं यांमधील विशेषणविशेष्यभावसंबंधामुळें शक्या हा प्रयोग करणें भाग पडतें, व " शक्यं च ... क्षुत् प्रतिहन्तुम् " येथें शक्यं याचें स्पष्टीकरण ' सामान्ये नपुंसकम् ' या सूत्रानेंच करावें लागतें.

नाहीं. ज्याला विशेषण लागलें आहे अशा शब्दाशीं समास वगैरे कोणतीही वृत्ति होत नाहीं; तो शब्द कर्म, करण, इत्यादि प्रकारचें कारक होऊं शकतो, व त्याला द्वितीया वगैरे विभक्ती लागतात व त्याच्या विशेषणांनाही त्याच विभक्ती लागतात. महान्तं पुत्रमिच्छति येथें जरी ' क्यच् ' प्रत्यय होऊन 'महान्तं पुत्रीयति' असा प्रयोग झाला नाहीं तरी ' माणवकं मुण्डं करोति' येथें 'माणवकं मुण्डयति' अशी वृत्ति होते; कारण, माणवकं मुण्डयति यापासून विवक्षित अर्थ कळतो म्हणजे या ठिकाणीं **सापेक्षता** असली तरी **गमकत्व** आहे. क्यच् प्रत्ययाचा इच्छा हा अर्थ क्यजन्त धातूमध्यें अंतर्भूत झाल्यामुळें क्यजन्त धातू हे अकर्मक होतात असें असलें तरी ' माणवकं पुत्रमिव आचरति ' या अर्थाच्या ' पुत्रीयति माणवकं ' या ठिकाणीं उपमान कर्म धातूमध्यें अंतर्भूत होतें व उपमेय कर्म बाहेर राहतें व त्याला द्वितीया होते. त्याप्रमाणेंच, ' अपि काकः श्येनायते ' या ठिकाणीं उपमेय कर्ता बाहेर प्रथमेंत राहतो. ' मुण्डयति माणवकं ' येथेंही मुण्ड हें सामान्य कर्म अंतर्भूत होतें व विशेष कर्म माणवकं हें द्वितीयेंत बाहेर राहतें. येथें करोति म्हणजे करतो या क्रियेचा मुण्ड याच्याशीं जसा संबंध आहे तसा माणवक याच्याशीं नाहीं; कारण, माणवक कांहीं केला जात नाहीं, मुण्ड केला जातो म्हणून मुण्ड हें पद सापेक्ष समजलें जात नाहीं अशी ही विचारसरणी आहे. अथवा मुण्ड या शब्दाहून मुद्दाम ' णिच् ' प्रत्यय सांगितला असल्यामुळें जरी मुण्ड हा गुणवाचक शब्द गुणीची ज्याला अपेक्षा आहे असा असला तरी वृत्ति होते असेंही म्हणतां येईल. इष्टः पुत्रः, इष्यते पुत्रः या वाक्यांचा अर्थ ' पुत्रीयितः, ' ' पुत्रीय्यते ' या शब्दांपासून समजला जात नसल्यामुळें ' पुत्रीयित ' वगैरे प्रयोग होत नाहींत. वार्तिककारांनी येथें मकारान्त शब्द व अव्ययें यांहून ' क्यच् ' झालेला दृष्टीस पडत नाहीं असें सांगितलें आहे.

## २२५. काम्यच्, क्यष् , णिङ् व यङ् प्रत्यय.

' काम्यच ' ( सू. ९ ) या सूत्रानें क्यच् प्रत्ययासारखा इच्छा याच अर्थीं ' काम्यच् ' प्रत्यय सांगितला आहे. सूत्रामध्यें ' काम्यच् ' याच्या पूर्वीं ' च् ' या व्यंजनाचें उच्चारण केलें असल्यामुळें ' लशक्वतद्धिते ' ( १।३।८ ) या सूत्रानें ' काम्यच् ' यांतील क् याला इत्संज्ञा होत नाहीं. ' उपमानादाचारे ' ( सू. १० ) व त्यावरील ' अधिकरणाच्च ' हें वार्तिक यांनीं उपमानभूत कर्म किंवा अधिकरण यांहून आचार या अर्थीं क्यच् सांगितला आहे. ' कर्तुः क्यङ् सलोपश्च ' ( सू. ११ ) या सूत्रानें उपमान असलेल्या कर्त्याहून आचार या अर्थीं क्यङ् प्रत्यय सांगितला आहे व ज्याला क्यङ् जोडावयाचा त्या सुबन्ताच्या शेवटीं ' स 'कार असल्यास त्याचा लोप होतो असें सांगितलें आहे. या ठिकाणीं वार्तिककारांनीं ओजस् व अप्सरस् यांतील सकाराचा लोप नित्य होतो व इतर ठिकाणीं विकल्पानें होतो असें सांगितलें आहे. आचार या अर्थीं गल्भ, क्लीब व होड यांहून क्यङ् विकल्पानें करावा असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे. ' भृशादिभ्यो० ' ( सू. १२ ) या सूत्रानें भृश वगैरे शब्दांहून अभूततद्भाव या अर्थीं क्यङ् प्रत्यय सांगितला आहे. सूत्रांतील ' अच्वेः ' या पदाचा ' च्विभिन्न च्विसदृश ' असा अर्थ अभूततद्भावानें दाखविला जातो. या भृशादि गणामध्यें अभि सु वगैरे उपसर्ग हे प्रकृतीला विशेषणें लावून अभिमनस् सुमनस् वगैरे शब्द उपसर्गासहित दिले आहेत; तेव्हां ' अभिमनस् सुमनस् वगैरे प्रकृतींहून अभिमनाय वगैरे क्यजन्त धातू होतात ' असा अर्थ करावयाचा, किंवा मनस् या प्रकृतीला अभिभवन सुभवन वगैरे उपसर्गासहित भू धातूच्या अर्थीं क्यच् प्रत्यय जोडल्यामुळें ' मनाय हा धातु

होतो व त्याला अभि सु वगैरे उपसर्ग जोडिले जातात ' असा अर्थ करावयाचा या दोन पक्षांचा भाष्यकारांनीं विचार केला आहे व दोन्ही पक्षीं येणाऱ्या अडचणी दूर करून कोणताही पक्ष घेतला तरी चालेल असें म्हटलें आहे. अर्थात्, धातुपाठामध्यें ' संग्राम ' असा धातु उच्चारल्यामुळें फक्त संग्राम या एकाच उपसर्गसहित धातूला द्वित्व होतें व अट् आगम मागें लागतो, अभिमनस् वगैरे धातूंच्या उपसर्गरहितच भागाला अट् आगम लागतो व द्वित्व होतें हें येथें भाष्यकारांनीं स्पष्ट केलें आहे. ' लोहितादि० ' ( सू. १३ ) या सूत्रानें लोहित वगैरे शब्दांहून, तसेंच ' डाच् ' प्रत्यय शेवटीं असलेल्या प्रकृतीहून क्यष् प्रत्यय लागून धातू तयार होतात व त्यांना दोन्ही पदांचे तिङ् प्रत्यय लागतात. ' कष्टाय क्रमणे ' ( सू.१४ ) या सूत्रानें ' कष्ट ' या अर्थी असलेल्या प्रातिपदिकाहून वाईट मार्गानें जाणें या अर्थी, त्याप्रमाणेंच ' कर्मणो रोमन्थ० ' इत्यादि सूत्रांनीं ( सू. १५-२१ ) कर्मवाचक रोमन्थ, बाष्प इत्यादि शब्दांहून, तसेंच क्रिया या सामान्य अर्थी शब्द, वैर, कलह वगैरे प्रातिपदिकांहून क्यङ् सांगितला आहे व मुण्ड, मिश्र वगैरे शब्दांहून णिच् सांगितला आहे. ' धातोरेकाचो० ' ( सू. २२ ) या सूत्रानें व्यंजनानें आरंभ होणाऱ्या व एकच स्वर असलेल्या धातूंहून क्रियासमभिहार म्हणजे सर्वांशानें किंवा वारंवार क्रिया करणें या अर्थी यङ् प्रत्यय सांगितला आहे. या ठिकाणीं प्र + अट् अशा उपसर्गसहित धातूंहून क्रियासमभिहार या अर्थाचा बोध होत असला तरी धातूचाच तो अर्थ असतो, उपसर्ग हा फक्त तो अर्थ दाखवतो म्हणून धातूलाच यङ् प्रत्यय लागतो, व त्यामुळें द्वित्व आणि अट् आगम धातूलाच होतात असें भाष्यकारांनीं स्पष्ट केलें आहे; तसेंच, या यङ् प्रत्ययासंबंधीं प्रयोग बघूनच यङ् प्रत्यय कोठें लागतो व कोठें लागत नाहीं हें ठरवावयाचें असल्यामुळें एकाच् व हलादि धातूंहूनच यङ् होतो ही अट कडकपणें पाळतां येत नाहीं असेंही सांगितलें आहे.

## २२६. णिच् प्रत्यय.

' सत्यापपाश० ' ( सू. २५ ) या सूत्रानें सत्याप वगैरे शब्द व चुर् आरंभीं असलेले धातुपाठांतील धातू यांहून, व ' हेतुमति च ' ( सू. २६ ) या सूत्रानें प्रयोजकाची प्रेरणा या अर्थी कोणत्याही धातूहून, ' णिच् ' प्रत्यय सांगितला आहे. सूत्रांतील ' हेतुमति ' हा शब्द धातूला विशेषण घ्यावा म्हणजे ही प्रेरणा ज्याला णिच् प्रत्यय लाविला जातो तो धातू दाखवितो असा अर्थ करावा, किंवा ' हेतुमति ' हा शब्द णिच् या प्रत्ययाला विशेषण समजावा म्हणजे णिच् प्रत्यय हाच प्रयोजकाची प्रेरणा दाखवितो असा अर्थ करावा या प्रश्नाचें उद्बोधक विवेचन भाष्यकारांनीं दोन्ही पक्षांतील गुणदोष दाखवून केलें आहे व दोन्ही पक्ष स्वीकारतां येतील असें म्हटलें आहे. कर्त्याचा प्रयोजक साधारणतः चेतनच पदार्थ असतो, तरी पण ' भिक्षा वासयन्ति ', ' कारीषोऽग्निरध्यापयति ' असे प्रयोग आढळत असल्यामुळें ' हेतुमति ' या शब्दांतील हेतु शब्द हा केवळ ' निमित्त ' या अर्थीं घ्यावा असें वार्तिककारांचें म्हणणें आहे. भाष्यकारांनीं मात्र मोठ्या खुबीनें अचेतन वस्तूंमध्येंही प्रयोजक व्यापार दृष्टीस पडत असल्यामुळें ' हेतुमत् ' या शब्दाचा प्रयोजक पदार्थ हा अर्थ घेण्यास कांहीं हरकत नाहीं असें सांगितलें आहे. या बाबतींत शांकरब्रह्मसूत्रभाष्य अध्याय २ पाद २ सूत्र २ यावरील विवरण फार मार्मिक आहे. ' पृच्छतु मा भवान् ' येथें प्रेरणा हा अर्थ गम्यमान आहे म्हणून णिच् प्रत्यय व्हावा; पण तो कां होत नाहीं याविषयीं भाष्यकारांनीं विवेचन केलें आहे. त्याप्रमाणेंच स्वस्थ आपल्या घरीं बसलेल्या मनुष्याविषयीं ' पञ्चभिर्हलैः कर्षति ' हा प्रयोग, तसेंच यजमान हा

यजन करीत नसतांनासुद्धां 'पुष्यमित्रो यजति', 'याजका याजयन्ति' यांसारखे प्रयोग कृष् व यज् हे धातू अनेक क्रियांचा समूह दाखवीत असल्यामुळें होऊं शकतात असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. 'सूत्रं करोति सूत्रयति' यासारख्या प्रयोगांकरितां 'करतो' या अर्थीं सूत्र या कर्मकारकाहून, 'कंसवधमाचष्टे कंसं घातयति' यासारख्या प्रयोगांकरितां 'सांगतो' या अर्थी आख्यानवाचक कृदन्ताहून, तसेंच, सूर्यमुद्गमयति, पुष्येण योजयति या ठिकाणीं त्या त्या विशिष्ट अर्थीं, णिच् सांगणें जरूर आहे असा प्रश्न उपस्थित करून या सर्व ठिकाणीं 'कर्त्याचा प्रयोजक' याच अर्थी प्रकृत सूत्रानें णिच् होऊं शकेल असा निर्णय भाष्यकारांनीं दिला आहे. कंसवध, बलिबन्ध वगैरे नाटकांचे प्रयोग भाष्यकारांचे वेळीं केले जात होते; तसेंच कंस, बलि इत्यादिकांचें काम करणारीं पात्रें होतीं, चित्रेंही होतीं, वर्णनात्मक पुराणेंही होतीं, इतकेंच नव्हे, तर नट, चित्रकार व पौराणिक हे आपलें काम अत्यंत कुशलतेनें करीत होते हें भाष्यांतील उल्लेखांवरून स्पष्ट दिसून येतें.

## २२७. विकरणान्हिक-१ (अ. ३ पा. १ आन्हिक ३). यक्, आय, इयङ् व णिङ् प्रत्यय.

या आन्हिकामध्यें (सूत्रें २७-४२) स्वार्थीं म्हणजे धातूच्याच अथा होणाऱ्या यक्, आय, इयङ्, व णिङ् या प्रत्ययांचें, त्याप्रमाणेंच विशिष्ट लकारांचे प्रत्यय पुढें असतांना होणाऱ्या स्य, तास्, सिप् व आम् या विकरणांचें विवेचन केलें आहे; व पुढील आन्हिकामध्यें लुङ् प्रत्ययापूर्वीं होणारा च्लि विकरण व त्याचे आदेश, त्याप्रमाणेंच यक्, शप्, श्यन्, श, श्ना, श्नम्, या विकरणांचें विवेचन केलें आहे म्हणून या दोन्ही आन्हिकांना विकरणान्हिक हें नांव देतां येईल. 'कण्ड्वादिभ्यो यक्' (सू २७) या सूत्रामध्यें यक् प्रत्यय लागलेले कण्डूय वगैरे धातू व त्या धातूंहून साधतां न येणारीं कण्डू वगैरे ऊकारान्त प्रातिपदिकें ही दोन्ही विवक्षित आहेत असें भाष्यकारांनीं सागितलें आहे; व त्याच अर्थाचा जुन्या वैयाकरणांचा 'धातुप्रकरणाद्धातुः कस्य चासज्जनादपि । आह चायमिमं दीर्घं मन्ये धातुर्विभाषितः' हा श्लोक उद्धृत केला आहे. 'कमेर्णिङ्' (सू ३०) या सूत्रामध्यें णिङ् प्रत्ययामध्यें ण् व ङ् हे दोन इत्संज्ञक वर्ण जोडल्याबद्दल साधकबाधक विचार करून ङ् इत् असल्यामुळें णिङन्त धातूंहून आत्मनेपद होतें व ण् जोडल्यामुळें अकाराला वृद्धि होते असा निर्णय दिला आहे. 'आयादय आर्धधातुके वा' (सू. ३१) या सूत्रामध्यें हे आय, इयङ् व णिङ् प्रत्यय आर्धधातुक प्रत्यय जोडावयाचा असतांना विकल्पानें लागतात, म्हणजे, गोपाय व गुप् अशा प्रकारचे दोन दोन धातू समजले जातात; व सार्वधातुक प्रत्ययाचे वेळीं गोपाय, ऋतीय, कामय, असे एकेकच होतात. भाष्यकारांनीं येथें 'आर्धधातुके' या पदाचा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना होऊन गेलेल्या आय या प्रत्ययाची विकल्पानें निवृत्ति होते असा अर्थ केल्यास गुप्तिः जुगोप हीं रूपें साधत नाहींत; उलट, गोपा व गोपांचकार अशीं भलतींच रूपें होऊं लागतात; तसेंच विकल्पानें प्रवृत्ति होते असा अर्थ केल्यास गोपाया व गोपायांचकार हीं रूपें साधत नाहींत; व उलट, गोपयति व जुगोपाय अशीं भलतींच रूपें होऊं लागतात अशा तऱ्हेचें विवेचन करून 'आर्धधातुके' ही विषयसप्तमी समजावी व आर्धधातुक प्रत्यय केल्यावर जे आय वगैरे प्रत्यय व्हावयाचे असतात ते आर्धधातुक प्रत्यय पुढें जोडण्यापूर्वींच होतात असा अर्थ करावा असें म्हणून सर्व दोषांचें निवारण केलें आहे.

## २२८. स्य, ताम्, सिप् व आम् विकरण.

'सनाद्यन्ता धातवः' ( सू. ३२ ) या सूत्रानें धातूंना सन्, णिच्, यङ्, यक् व आय हे प्रत्यय लागून झालेले धातुसाधित शब्द, तसेंच सुबन्तांना क्यच्, काम्यच्, क्यङ्, क्यष्, णिङ् व णिच् हे प्रत्यय लागून झालेले नामसाधित शब्द, या सर्वांना 'धातु' अशी संज्ञा सांगितली आहे. या ठिकाणीं भाष्यकारांनीं 'प्रत्ययाला कार्य सांगितलें असतां तें प्रत्ययान्ताला होतें' या सामान्य नियमामुळें 'सनादयो धातवः' असें सूत्र करून काम भागत असतांनाही अन्त शब्द ज्यास्त घालण्यांत सूत्रकारांचा उद्देश 'संज्ञासूत्रांमध्यें हा तदन्तविधीचा सामान्य नियम घ्यावयाचा नाहीं' असें सुचविणें हा आहे असें सांगितलें आहे. येथें प्रसंगानें शप् प्रत्ययाचा श इत्संज्ञक असतांना त्या शप् प्रत्ययाचे अपवाद जे श्यन् श्ना वगैरे प्रत्यय त्यांना सूत्रकारांनीं 'श्' हा इत्संज्ञक वर्ण जोडला आहे यावरून 'उत्सर्गाचें कार्य अपवादाचे ठिकाणीं करतां येत नाहीं' असें सूचित होतें असेंही भाष्यकारांनीं सांगितलें आहे. 'स्यतासी ऌलुटोः'...... 'अभ्युत्सादयां०' ( सू. ३३-४२ ) या सूत्रांमध्यें ऌट् अथवा ऌङ् प्रत्यय पुढें असतांना धातू व प्रत्यय यांमध्यें 'स्य' हा विकरण, लेट् प्रत्यय पुढें असतांना सिप्, व लिट् प्रत्यय पुढें असतांना आम्, असे विकरण सूत्रकारांनीं सांगितले आहेत. या ठिकाणीं भाष्यकारांनीं शप्, श्यन्, स्य इत्यादि विकरणांमधील बाध्यबाधकभावाचा विचार करून स्य, तास् आणि च्लि हे विकरण लकारावस्थेंतच ऌट् वगैरे प्रत्यय पुढें असतांना लागतात; व शप् श्यन् वगैरे विकरण लकाराला तिप् तस् वगैरे आदेश झाल्यानंतरच लागतात असें सांगितलें आहे. 'कास्प्रत्ययादाम०' ( सू. ३५ ) या सूत्राची व्याख्या करतांना भाष्यकारांनीं प्रत्ययान्त धातूंहून आम् हा विकरण होतो असें म्हणण्याऐवजीं अनेकाच् धातूंहून आम् प्रत्यय होतो असें म्हणावें असें सांगितलें आहे. "इजादेश्च गुरुमतोऽनृच्छः' ( सू. ३६ ) या सूत्राचें विवेचन करतांना 'अनृच्छः' हें पद घालण्यांत सूत्रकारांचा उद्देश 'छ्'ला तुक् आगम केल्यामुळें पूर्वीचा इच् स्वर गुरु झाला असतांना इच्छ्, उच्छ् वगैरे धातूंहून आम् होतो असें सुचवावयाचें हा दिसतो; त्याप्रमाणेंच, ईहांचक्रे वगैरे उदाहरणांमध्यें आम्-प्रत्ययान्त शब्दांहून काल, कारक वगैरे विशेष अर्थांची प्रतीति होत नसल्यामुळें ती होण्याकरितां सामान्य क्रिया दाखविणाऱ्या कृ, भू अथवा अस् या धातूंचा अनुप्रयोग करून त्याला इष्ट काल व कारक यांना अनुसरून प्रत्यय लावणें भागच असल्यामुळें 'कृञ्चानुप्रयुज्यते लिटि' (सू. ४०) हे सूत्र व्यर्थच आहे; तरी पण ज्या अर्थी तें सूत्र केलें आहे त्या अर्थी आम्-प्रत्ययान्ताच्या व कृ भू अथवा अस् या धातूंच्या मध्यें व्यवधान नसावें हाही सूत्रकारांचा अभिप्राय दिसतो असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे.

## २२९. विकरणाह्निक—२ (अ. ३ पा. १ आह्निक ४). लुङ् प्रत्ययापूर्वी लागणारा च्लि विकरण व त्याचे आदेश.

'च्लि लुङि'.........'चिण्भावकर्मणोः' ( सू. ४३-६६ ) या सूत्रांनीं लुङ् पुढें असतांना 'च्लि' हा सामान्य विकरण व त्याला निरनिराळ्या वेळीं होणारे सिच् वगैरे आदेश सांगितले आहेत. 'सार्वधातुके यक्'......'लिङ्याशिष्यङ्' ( सू. ६७-८६ ) या सूत्रांनीं कर्मणि अथवा भावे प्रयोगामध्यें 'यक्', व कर्तरि प्रयोगामध्यें शप् श्यन्, श्नु, श, श्नम्, उ व श्ना हे निरनिराळे विकरण सांगितले आहेत, व वेदामध्यें कांहीं ठिकाणीं आढळणारा 'शायच्' हा एक ज्यास्त विकरण सांगितला आहे. 'च्लि' या विकरणाला च् आणि इ

हे ' इत् ' करण्याचें प्रयोजन सांगून 'च्लि' ला होणारे क्स, चङ्, अङ् व चिण् हे आदेश कां सांगितले याचें विवेचन करतांना ' च्लि ' प्रत्यय न सांगतां सिच् हा सामान्य विकरण व क्स चङ् वगैरे आदेश त्यालाच विशिष्ट ठिकाणीं सांगितले असते तरी चाललें असतें असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. वार्तिककारांनीं स्पृश्, मृश् इत्यादि धातूंहून विकल्पानें सिच् होतो असें कां सांगितलें आहे त्याचें विवेचन करून अस्पृक्षत्, अस्प्राक्षीत् व अस्पार्क्षीत् अशीं तीन रूपें होण्याकरितां ' स्पृशमृशकृषतृपदृपः सिज्वा ' ( सू. ४४ वा. ७ ) या वार्तिकाची जरूर आहे असें भाष्यकारांनीं दाखविलें आहे. ' श्लिष आलिङ्गने ' ( सू. ४६ ) या सूत्राचें विवेचन करतांना वार्तिककारांनीं आलिङ्गन हाच अर्थ असतांना श्लिष् धातूला क्स विकरण लागतो; इतर अर्थीं परस्मैपदप्रत्यय पुढें असतांना अङ्, व आत्मनेपदप्रत्यय पुढें असतांना सिच्, व भाव किंवा कर्म या अर्थी त हा प्रत्यय असतांना कोणत्याही अर्थीं चिण्, अशा रीतीनें हे विकरणादेश होतात असें सांगितलें आहे. ' णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ् ' ( सू. ४८ ) या सूत्रानें णिजन्त धातू व श्रि, द्रु, आणि स्रु धातू यांहून कर्तरि प्रयोगांमध्यें ' च्लि ' ला ' चङ् ' सांगितला आहे. वार्तिककारांनीं कम् धातूहूनही चङ् करावा असें सांगितलें आहे; व भाष्यकारांनीं 'नाकमिष्टसुखं यान्ति०' हा त्यावेळचा प्रचलित श्लोक देऊन जे ' अचीकमत ' प्रयोग करतात ते स्वर्गाला रथांतून जातात, जे ' अचकमत ' म्हणतात ते पायीं जातात, व जे ' अकमिष्ट ' म्हणतात ते मुळींच जात नाहींत अशी विनोदात्मक टीका केली आहे. या ठिकाणीं वार्तिककारांनीं ' कर्मच कर्ता असेल तेव्हां म्हणजे कर्मकर्तरि प्रयोगामध्यें ( अचीकरत कटः स्वयमेव यासारख्या ठिकाणीं ) चङ् व्हावा म्हणून ण्यन्त धातूंहून च्लिला चङ् होतो असें सांगावें ' असें वार्तिक केलें आहे; यासंबंधीं भाष्यकारांनीं तसें विशेष रीतीनें सांगण्याची जरूर नाहीं; कर्मकर्तरि प्रयोगामध्यें क्रियेचा व्यापार कर्मावर असल्यामुळें कर्माला कर्तृत्व आहेच म्हणून ' णिश्रिद्रु०' या सूत्रानें आपोआपच चङ् होईल असें म्हटलें आहे.

## २३०. कर्मणि प्रयोग व भावे प्रयोग यांमधील वचनांचा विचार.

' सार्वधातुके यक् ' ( सू. ६७ ) या सूत्रानें भावे प्रयोग व कर्मणि प्रयोग यांमध्यें सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना धातूंहून यक् विकरण होतो असें सांगितलें आहे. भाष्यकारांनीं प्रसंगानें या ठिकाणीं वचनांचा विचार केला आहेः—भावे प्रयोगांत कर्ते अनेक असले तरी 'आस्यते भवद्भिः ' वगैरे ठिकाणीं क्रियापदाला फक्त एकवचनाचाच प्रत्यय लागतो; कारण तेथें भाव हा एकच असतो व तिङ् प्रत्ययापासून होणारा क्रियेचा बोध हा धातूहून होणाऱ्या क्रियेच्या बोधासारखा असतो. कर्मणि प्रयोगांत सर्व वचनें दृष्टीस पडतात; कारण कर्में एक किंवा अनेक कितीही असूं शकतात. भाववाचक कृदन्ताहूनही पाकः पाकौ पाकाः इत्यादि ठिकाणीं सर्व वचनें दृष्टीस पडतात; कारण, भावही अनेक असूं शकतात. शिवाय, क्रियापदानें दाखविलेला भाव हा विशिष्ट स्वरूपाचा व कालाचाच असतो; कारण, तिङ् प्रत्ययानें क्रियेचा काल, क्रिया करणारा पुरुष आणि क्रियेचें फल कोणाला जाते ती व्यक्ति या

१. " नाकमिष्टसुखं यान्ति सुयुक्तैर्वडवारथैः ।
अथ पत्काषिणो यान्ति येऽचीकमतभाषिणः ॥ "
असा संपूर्ण श्लोक भाष्यकारांनीं येथें दिला आहे. ( भाषांतर भाग ३ पृ. १२३ पहा. )

दाखविल्या जातात. पण, पाक वगैरे भाव हे प्रकारभेदामुळें व देशकालभेदामुळें अनेक असूं शकतात. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे कृत् प्रत्ययानें दाखविलेल्या भावाचा द्रव्याप्रमाणें बोध होतो; व तो द्रव्याप्रमाणें कर्ता कर्म करण वगैरे कारकेंही होऊं शकतो. विशेष महत्त्वाची गोष्ट लक्षांत घ्यावयाची म्हणजे— भावेप्रयोगांमध्यें तङ् प्रत्ययानें दाखविलेल्या भावाशीं कर्त्याचा संबंध होतो, पण भाव या अर्थी होणाऱ्या घञ् वगैरे कृत् प्रत्ययांनीं दाखविलेल्या भावाशीं कर्त्याचा संबंध होत नाहीं; तो भाव धातुवाच्य जी क्रिया तिच्याशीं संबंध पावतो व तो लिंग व संख्या यांनीं युक्त असूं शकतो.

## २३१. शप्, श्यन् इत्यादि विकरण व त्यांचा व्यत्यय.

भाष्यकारांनीं भाव, कर्म व कर्ता हे अर्थ यक् शप् वगैरे विकरणांचे असतात कां तिङ् प्रत्ययांचे असतात या प्रश्नाचा विचार केला आहे; व जेव्हां भाव किंवा कर्म या अर्थी लकार करण्यांत येतो तेव्हां कर्ता या अर्थी विकरण समजावा, व जेव्हां कर्ता या अर्थी लकार करण्यांत येतो तेव्हां भाव किंवा कर्म या अर्थी विकरण समजावा अशी व्यवस्था शक्य असली तरी भाव, कर्म व कर्ता हे तिङ् प्रत्ययाचेच अर्थ असतात असें मानणेंच योग्य आहे असें सांगितलें आहे. वार्तिककारांनीं येथें जसा भावे व कर्मणि या प्रयोगांमध्यें यक् प्रत्यय होतो तसा कर्मकर्तरि प्रयोगांतही व्हावा म्हणून वचन करावें असें म्हटलें आहे ( ३।१।६७ वा. ३ ). त्यावर भाष्यकारांनीं कर्मकर्तरि प्रयोगामध्यें यक् झाल्यास ' एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ', ' नास्य किंचिद् रुजति रोगः ' इत्यादि भावकर्तरि प्रयोगांतही तो होऊं लागेल, पण तो होणें इष्ट नाहीं असें दाखवून ' कर्तरि शप् ' ( सू. ६८ ) या सूत्राचा विभाग सुचवून योगविभागानें कर्मकर्तरि प्रयोगांत यक् होतो, व भावकर्तरि प्रयोगांत होत नाहीं अशी व्यवस्था केली आहे. प्रसंगानें भाष्यकारांनीं या ठिकाणीं श्यन् वगैरे विकरण हे शप् या विकरणाचे आदेशच मानिले पाहिजेत, अपवाद मानतां येत नाहींत असें म्हटलें आहे. ' कर्तरि शप् ' ( सू ६८ ) या सूत्रानें कर्त्रर्थ सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना धातूला शप् विकरण लागतो असें सांगून दिवादि गणांतील धातूंना श्यन्, स्वादि गणांतील धातूंना श्नु, तुदादि गणांतील धातूंना श, रुधादि गणांतील धातूंना श्नम्, तनादि गणांतील धातूंना उ, व क्र्यादि गणांतील धातूंहून श्ना असे विकरण सांगितले आहेत ( सूत्रें ६९-८३ ). वेदामध्यें श्ना विकरणाचे ऐवजीं ' शाय ' विकरण होतो इतकेंच नव्हे तर विकरणांचा व्यत्यय म्हणजे कोणत्याही विकरणाऐवजीं दुसरा कोणताही विकरण दृष्टीस पडतो असें 'व्यत्ययो बहुलम्' (सू ८५) या सूत्रानें सांगितलें आहे. भाष्यकारांनीं या ठिकाणीं विकरणांचाच व्यत्यय होतो इतकेंच नव्हे तर व्याकरणशास्त्रांतील निरनिराळ्या अनेक विधींचाही व्यत्यय होतो असें सांगून अनेक ठळकठळक उदाहरणें दिलीं आहेत. भाष्यकारांनीं कोणत्या विधींचा मुख्यतः व्यत्यय होतो हें दाखविणारी ' सुप्तिङुपग्रहलिङ्गनराणां कालहलच्स्वरकर्तृयङां च। व्यत्ययमिच्छति शास्त्रकृदेषां सोऽपि च सिध्यति बाहुलकेन ' ही जुन्या वैयाकरणांची कारिकाही उद्धृत केली आहे.

## २३२. कर्मवद्भावान्हिक ( अ. ३ पा. १ आन्हिक ५ ). कर्मकर्तरि प्रयोग.

' कर्मवत्कर्मणा तुल्यक्रियः' ( सू. ८७ )......' कुषिरजोः प्राचां०' ( सू. ९० ) या चार सूत्रांनीं या आन्हिकामध्यें कर्मवद्भावाचें विवेचन केलें असल्यामुळें या आन्हिकाला कर्मवद्भावान्हिक म्हणणें योग्य आहे. ' कर्मवत्कर्मणा ' ( सू. ८७ ) या सूत्रानें ' कर्मावर असणारी

जी क्रिया तीच ज्याची क्रिया आहे असा कर्ता कर्माप्रमाणें समजावा ' या शब्दांनीं हा कर्मवद्भाव सांगितला आहे. ' पच्यते तण्डुल: ' ( तांदूळ शिजतो ), ' भिद्यते कुसूलः' ( कणिंग मोडते ) अशा तऱ्हेचीं कर्मवद्भावाचीं उदाहरणें प्रसिद्ध आहेत. क्रिया व तिचीं साधनें व त्यांचीं विशेषणें दाखविणारा शब्दसमूह मिळून वाक्य होतें. ' देवदत्तः स्थाल्यां काष्ठैः ओदनं पचति ' या वाक्यांत पाक म्हणजे शिजविणें या क्रियेचा देवदत्त हा कर्ता आहे; पण पाक ही क्रिया स्थाली या अधिकरणाच्या वैशिष्ट्यामुळें कर्त्याला श्रम न पडतां होत असेल तर ' स्थाली पचति ' ( थाळीच शिजते ) असें म्हणण्याचा प्रघात आहे. त्याप्रमाणेंच, करण म्हणजे साधन जीं लाकडें तीं उत्तम असतील तर 'काष्ठानि पचन्ति' असेंही म्हटलें जातें व तांदूळच जर उत्तम शिजाळू असतील तर 'तण्डुलाः पच्यन्ते' असें म्हटलें जातें, वरील सर्व ठिकाणीं खरा कर्ता देवदत्तच आहे, पण साधनांचें वैशिष्ट्य दाखविण्याकरितां देवदत्त या कर्त्याची विवक्षा केली नाहीं, म्हणजे त्याच्याकडे लक्ष दिलें नाहीं, तर साधन हेंच कर्ता समजलें जातें. या साधनांपैकीं कर्मसाधन हेंच कर्ता म्हणून समजलें असतां क्रियापदांतील प्रत्ययानें तें दाखविलें जातें म्हणून त्याहून प्रथमा विभक्ति होते व धातूहून यक् प्रत्यय व आत्मनेपद हीं होतात. अशा प्रयोगालाच लोकांमध्यें कर्मकर्तरि प्रयोग म्हणतात. कर्माला कर्ता समजल्यामुळें धातू अकर्मक समजला जातो व अकर्मक धातूंचा जसा ' स्थीयते माणवकेन ' यासारखा भावे प्रयोग होतो त्याप्रमाणें ' पच्यते तण्डुलैः' असा भावेप्रयोगही होऊं शकतो. या ठिकाणीं धातूचा अर्थ जो भाव अथवा क्रिया ती कर्मामध्यें असली तरच हा कर्मवद्भाव करावा कर्त्यामध्यें असेल तर करूं नये असें वार्तिककारांनीं सांगितलें आहे. धातूचा क्रिया म्हणजे व्यापार हा अर्थ असतो व तो व्यापार कर्ता हाच करीत असतो. हा धातूचा व्यापार म्हणजे भाव चलनवलनात्मक असल्यास त्याला क्रिया हें नांव देण्यांत येतें. हा व्यापार सकर्मक धातूंमध्यें कांहीं ठिकाणीं कर्त्यांत आढळून येतो तसाच कांहीं ठिकाणीं कर्मामध्येंही आढळून येतो. अकर्मक धातूंमध्यें मात्र कर्त्यामध्येंच आढळून येतो. एकंदरींत धातूंचे चार प्रकार होतात :—(१) कर्तृस्थभावक, उदाहरणार्थ—चिन्तयति मन्त्रयते इत्यादि; (२) कर्तृस्थक्रियक, उदाहरणार्थ–गच्छति, धावति, हसति वगैरे; (३) कर्मस्थभावक, उदाहरणार्थ–आसयति शाययति ( बालकम् ) वगैरे; (४) कर्मस्थक्रियक, उदाहरणार्थ-अवरुणद्धि ( गाम् ), करोति ( कटम् ) वगैरे; भाष्यकारांनीं जेथें कर्म हें आपल्यांतील क्रियेच्या योगानें कर्त्यासारखें क्रियाश्रय होतें व म्हणून कर्ता म्हटलें जातें अशा अर्थीच्या प्रस्तुत सूत्रांतूनच वाक्यकार जें म्हणतात तें निष्पन्न होत असल्यामुळें ' कर्मस्थभावकानां कर्मस्थक्रियाणां च ' ( सू.८७ वा. ३ ) या वार्तिकाची वास्तविक जरूर नाहीं; तें केवळ स्पष्टार्थ आहे असें सांगितलें आहे. या कर्मकर्तरि प्रयोगामध्यें कर्माला कर्ताही समजल्यामुळें धातूहून कर्त्रर्थी चङ् प्रत्यय, शप् विकरण व कृत् प्रत्यय हीं कार्यें होतात, म्हणून अचीकरत कटः स्वयमेव, नमते दण्डः स्वयमेव, भिदुरं काष्ठं स्वयमेव असे प्रयोग दृष्टीस पडतात. वार्तिककारांनीं दुह् पच् वगैरे द्विकर्मक धातूंनाही गौण कर्माची कर्ता म्हणून विवक्षा केल्यास ' दुग्धे गौः पयः' अशा ठिकाणीं कर्मवद्भाव होतो असें सांगितलें आहे.

## २३३. ' धातोः ' या अधिकाराची मर्यादा व प्रयोजनें.

धातोः ( सू. ९१ ) हें अधिकारसूत्र आहे. येथून पुढें सांगितलेले सर्व प्रत्यय धातूच्या पुढें जोडण्यांत येतात. हा ' धातोः ' अधिकार तिसऱ्या अध्यायाच्या शेवटपर्यंत आहे किंवा

लकाराला आदेश सांगणाऱ्या ' लस्य ' ( ३।४।७७ ) या सूत्रापूर्वीपर्यंतच आहे या प्रश्नाचा येथें भाष्यकारांनीं विचार केला आहे; व अध्याय संपेपर्यंत आहे असें असल्यास विकरणांनीं मध्यें व्यवधान आल्यामुळें पचति पठति या ठिकाणीं लकाराला तिङ् आदेश होणार नाहींत अशी जी अडचण येते तिचा परिहार सांगून अध्याय संपेपर्यंत हा अधिकार आहे असा निर्णय दिला आहे. तव्यत् वगैरे प्रत्यय धातूलाच लागणें, ' स्वप् 'च्या ऐवजींचे ' सुप् ' ( सुव ) वगैरे अपभ्रंशरूप धातूंहून तिङ् प्रत्यय न होणें, धातूला अंगसंज्ञा होणें, धातूहून केलेल्या प्रत्ययांना कृत्संज्ञा होणें, व या अधिकारांत सप्तमी विभक्तीनें उच्चारलेल्या शब्दाला पुढील सूत्रानें उपपद संज्ञा होणें, हे पांच प्रकारचे ' धातोः ' या अधिकाराचे उपयोग वार्तिककारांनीं दाखविले आहेत. ' तत्रोपपदं० ' ( सू. ९२ ) या सूत्रामध्यें उपपद या संज्ञेची व्याख्या दिली आहे. उपपद ही महासंज्ञा अन्वर्थ असल्यामुळें धातूच्या जवळचें व धातूशीं संबद्ध असेंच उपपद घेणें जरूर आहे; म्हणून उपपद आणि क्रिया यांमध्यें सामर्थ्य असावें लागतें हें मुद्दाम सांगण्याची जरूर नाहीं. शिवाय, उपपद हें पद असल्यामुळें ' समर्थः पदविधिः ' या परिभाषेच्या जोरावरच उपपद व धातु यांमध्यें सामर्थ्य असावें लागतें हें स्पष्ट आहे. प्रसंगानें भाष्यकारांनीं येथें ' काशस्य कटीकारः ' ( गवताचें चटईसारखें आसन करणारा ) या अर्थीं ' काशस्य कटीकारः ' अशी कृद्वृत्ति होऊं शकते, किंवा ' काशस्य ' या बाहेरच्या शब्दाची ' कटी ' या शब्दाला अपेक्षा असल्यामुळें ' कटीकारः ' अशी कृद्वृत्ति येथें होत नाहीं असा प्रश्न उपस्थित करून गोनर्दीयाला म्हणजे स्वतःला हा प्रयोग इष्ट आहे असें आपलें मत दिलें आहे. भाष्यकारांचे वेळीं लोकांमध्यें 'काशस्य कटीकारः' हा शब्द प्रचलित असल्यामुळें हें मत दिलें असावें. ' कृदतिङ् ' ( सू. ९३ ) या सूत्रानें या सूत्रानंतर सांगितल्या जाणाऱ्या तिङ् प्रत्यय सोडून बाकीच्या सर्व प्रत्ययांना कृत् ही संज्ञा सूत्रकारांनीं सांगितली आहे.

## २३४. कृत्यप्रत्ययान्हिक ( अ. ३ पा. १ आन्हिक ६ ) 'वासरूप'विधि.

एका धातूहून एके वेळीं एकाच अर्थीं बाध्यबाधकभाव बाजूला ठेवून कोणकोणते कृत्प्रत्यय होऊं शकतात यासंबंधीं 'वासरूपविधि' म्हणून वैयाकरणांमध्यें प्रसिद्ध असलेल्या 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' ( सू. ९४ ) या सूत्रामध्यें सूत्रकारांनीं दिलेल्या संकेताचें निरूपण करून 'कृत्याः'...'चित्याग्नि०' (९५–१३२) या सूत्रांमध्यें 'कृत्य' प्रत्ययांचें विवेचन केल्यामुळें या आन्हिकाला कृत्यप्रत्ययान्हिक हें नांव देतां येईल. ' धातोः या अधिकारामध्यें उत्सर्ग प्रत्ययापेक्षां निराळ्या स्वरूपाचा अपवाद प्रत्यय हा उत्सर्ग प्रत्ययाचा विकल्पानें बाध करतो ' असा या ' वासरूप ' विधीचा सामान्य अर्थ आहे. या वासरूप विधीचा ' अस्त्रियाम् ' या शब्दानें प्रतिषेध केला आहे. ' अस्त्रियाम् ' याचा अर्थ स्त्रीत्व गम्यमान असतांना वासरूपविधि घेऊं नये असा करावा किंवा स्त्रीप्रत्ययांसंबंधीं वासरूपविधि घेऊं नये असा करावा याचें विवेचन करून ' स्त्रियाम् ' ( ३।३।९४ ) या अधिकारांत सांगितलेल्या स्त्रीप्रत्ययांना हा नियम लागू करूं नये असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. या वासरूपविधीमुळें भाव व कर्म या अर्थीं कृत्य प्रत्यय करून चेतव्यम् चयनीयम् चेयम् अशीं तीन रूपें, त्याप्रमाणेंच पचः पक्ता पाचकः यासारखीं तीन कर्तरि कृदन्तें, तशींच भूतिः भवनं भावः यासारखीं तीन भावार्थी कृदन्तें होऊं शकतात. अनुबन्ध म्हणजे इत्संज्ञक वर्ण सोडून प्रत्ययाचें जें स्वरूप राहील त्यावरूनच प्रत्ययांचें स्वरूप एक आहे कां निराळें आहे हें ठरवावें; तसेंच, मूळ लकार हा एकच स्वरूपाचा

असल्यामुळें लकाराच्या आदेशांना हा वासरूपविधि लागू करूं नये असें सूत्रकारांच्या लिहिण्यावरून ज्ञापित होतें असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे.

**२३५. कृत्यप्रत्यय.**

'तव्यत्तव्यानीयरः' (सू ९६)......'मृजेर्विभाषा' ( सू. १५३ ) या सूत्रांमध्यें मुख्यतः भाव व कर्म या अर्थीं कोणत्याही धातूहून तव्य व अनीय हे प्रत्यय, अजन्त धातूहून यत्, वद् भू व हन् यांहून सुबन्त उपपद असतांना क्यप्, इ स्तु शास् वृ दृ आणि जुष् या धातूंहून ण्यत् प्रत्ययाचा बाध करून क्यप्, तसेंच ऋ उपधेला असणारे धातू व खन् मृज् वगैरे धातू यांहून क्यप् प्रत्यय, असे प्रत्यय सांगितले आहेत; व 'राजसूयसूर्य०'.....'छन्दसि निष्टर्क्य०' (सू. ११४–१२३ ) या सूत्रांमध्यें राजसूय, सूर्य, कुप्य, पुष्य, युग्य, इत्यादि शब्द क्यप्–प्रत्ययान्त निपातनें म्हणून सांगितलीं आहेत. 'ऋहलोर्ण्यत्'......'चित्याग्निचित्ये च' (सू. १२४-१३२ ) या सूत्रांमध्यें ऋकारान्त व व्यंजनान्त धातूंहून ण्यत्, अवश्यकर्तव्य या अर्थीं उकारान्त धातूंहून, तसेंच, वप् रप् लप् वगैरे धातूंहून ण्यत्, व आनाय्य, प्रणाय्य, चित्य वगैरे निपातनें सांगून हें कृत्य प्रकरण सूत्रकारांनीं पुरें केलें आहे. यानंतर कर्ता या अर्थी सामान्यतः कोणत्याही धातूहून ण्वुल् व तृच् प्रत्यय, नन्द् वगैरे धातूंहून ल्यु ( अक ) प्रत्यय, ग्रह् वगैरे धातूंहून णिनि ( इन् ) प्रत्यय, व पच् वगैरे धातूंहून अच्, हे प्रत्यय सांगितले आहेत. वार्तिककारांनीं ण्वुल् हा प्रत्यय सकर्मक धातूंहूनच करावा असें नियंत्रण घातलें आहे. अच् प्रत्यय हा पुष्कळच ठिकाणीं आढळत असल्यामुळें वार्तिककारांनीं ण्वुल् व तृच् या प्रत्ययांसारखा अच् प्रत्यय हा वाटेल त्या धातूहून करावा असें सांगितलें आहे. 'इगुपधज्ञाप्रीकिरः कः'......'गेहे कः' ( सू. १३५–१४४ ) या सूत्रांमध्यें अच् प्रत्ययाच्या स्वरूपाचेच असल्यामुळें त्याचे अपवाद म्हणून, इक् उपधेला असलेले धातू व ज्ञा प्री आणि कृ धातू यांहून क प्रत्यय, पा घ्रा ध्मा धे दृश् तसेच उपसर्गरहित लिम्प् विन्द् वगैरे जे धातू त्यांहून श प्रत्यय, व ज्वल् धातूपासून कस् धातूपर्यंत सांगितलेले जे धातू त्यांहून मागें उपसर्ग नसेल तर ण प्रत्यय, व उपसर्ग असेल तर अच् प्रत्यय, असे प्रत्यय सूत्रकारांनीं सांगितले आहेत. शेवटीं, शिल्पी म्हणजे कलाकार या अर्थीं ज्या धातूहून दृष्टीस पडेल त्या नृत् खन् वगैरे धातूंहून ष्वुन् प्रत्यय, गा धातूहून कर्ता या अर्थी थकन् व ण्युट्, हा धातूहून ण्युट्, व प्रु सृ आणि लू या धातूंहून वुन्, हे प्रत्यय सांगून सूत्रकारांनीं पहिला पाद पुरा केला आहे.

**२३६. सामान्यकालार्थक–कर्तरिकृत्प्रत्ययान्हिक ( अ. ३ पा. २ आन्हिक १ ).**

'कर्मण्यण्'......'त्यदादिषु दृशो०' ( सू. १–६० ) या सूत्रांमध्यें सूत्रकारांनीं बहुधा कर्मवाचक सुबन्त शब्द उपपद असतांना व कांहीं विशिष्ट ठिकाणीं करणवाचक, अधिकरणवाचक इत्यादि प्रकारचे शब्द उपपद असतांना धातूंहून कर्ता या अर्थीं अण् वगैरे प्रत्यय सांगितले आहेत; व त्यानंतर 'सत्सूद्विष०'......'आत्ममाने खश्च' ( ६१–८३ ) या सूत्रांमध्यें उपसर्ग किंवा इतर सुबन्त शब्द उपपद असतांना विशिष्ट धातूंहून विशिष्ट प्रत्यय कर्ता या अर्थीं सांगितले आहेत. वर्तमान, भूत अशा प्रकारचा विशिष्ट कालाचा निर्देश केला नसल्यामुळें हे प्रत्यय सामान्य काल दाखविणारे व कर्ता या अर्थीं सांगितले असल्यामुळें या आन्हिकाला सामान्यकालार्थक–कर्तरिकृत्प्रत्ययान्हिक हें नांव देतां येण्यासारखें आहे. 'कर्म-

ण्यण्’ (सू. १) या सूत्रानें कर्मवाचक शब्द उपपद असतांना कुम्भकार, नगरकार इत्यादि अनेक शब्द साधण्याकरितां सामान्यतः सर्व धातूंहून अण् हा प्रत्यय सांगितला आहे; व त्याच स्वरूपाचे त्याला अपवाद म्हणून विशिष्ट धातूंहून विशिष्ट प्रत्यय अशा रीतीनें क, अच्, ण, ड, टक्, ट, खश् अशा प्रकारचे ‘अ’ या सामान्य स्वरूपाचे प्रत्यय सांगितले आहेत. सूत्रांतील ‘कर्मणि या शब्दाचें स्पष्टीकरण करतांना निर्वर्त्य, विकार्य आणि प्राप्य या कर्मांच्या तीन प्रकारांपैकीं निर्वर्त्य अथवा विकार्य कर्म उपपद असेल तरच धातूंहून अण् प्रत्यय करावा किंवा प्राप्य कर्मही चालेल या प्रश्नाचें विवेचन वार्तिककारांनीं उदाहरणें देऊन केलें आहे व अभिधान म्हणजे प्रयोग मिळतील त्या अनुरोधानें कोणत्याही प्रकारचें कर्म घ्यावें; पण प्रयोग न मिळतील तेथें अण् वगैरे प्रत्यय करूं नये असा निर्णय दिला आहे. शील्, कामय्, भिक्ष् व आचर् या धातूंहून अण् प्रत्यय न करतां ण करावा म्हणजे मांसशीला मांसकामा वगैरे प्रयोग साधतील असेंही वार्तिककारांनीं सांगितलें आहे. ‘आतोनुपसर्गे कः (सू. ३) या सूत्रानें उपसर्गरहित ‘आ’कारान्त धातूला अण् प्रत्ययाऐवजीं ‘क’ प्रत्यय लागतो व गोदः कम्बलदः अशीं रूपें होतात. या ठिकाणीं वार्तिककारांनीं जर ‘आ’कारान्त धातू संप्रसारणयोग्य असेल तर मात्र प्रह्वः आह्वः अशा प्रकारचीं रूपें साधावीं या दृष्टीनें क प्रत्ययाच्या ऐवजीं ड प्रत्यय करावा असें म्हटलें आहे. भाष्यकारांनीं येथें ड हा प्रत्यय न लागतां संप्रसारण होऊन सुद्धां आह्वः प्रह्वः अशीं रूपें होतील हें दाखविण्याकरितां पूर्वपक्षोत्तरपक्षरूप मजेदार विवरण नेहमीं-प्रमाणें केलें आहे व त्याचा संक्षेप शेवटीं दोन कारिका देऊन केला आहे. या कारिका आपल्या विवरणाचा संक्षेप म्हणून भाष्यकारांनींच रचिल्या असाव्या. या कारिकांमध्यें अनुष्टुप्, आर्या व वैतालीय या तीन वृत्तांचे चरण मिसळलेले आहेत. भाष्यकारांचे वेळीं प्राकृत काव्यांमध्यें अशा तऱ्हेचें निरनिराळ्या वृत्तांचें मिश्रण असलेलीं गीतें प्रचलित होतीं. ‘भगवान् कात्यः’ या पदांनीं वार्तिककार कात्यायनांचा या कारिकांमध्यें गौरवपूर्ण उल्लेख आहे व त्यामध्यें ‘सर्वत्र प्रसारणिभ्यो डः’ (३।२।३ वा. १) या वार्तिकाचें समर्थन केलें आहे.

### २३७. अण् प्रत्ययाचे अपवादप्रत्यय.

या सामान्य अण् प्रत्ययाला विशिष्ट स्थलीं विशिष्ट धातूंहून क अच् ण इत्यादि अपवाद--प्रत्यय दिले आहेत (सू. ३–५५). उदाहरणार्थ—उपसर्गरहित आकारान्त धातूंहून ‘क’ प्रत्यय. हा ‘क’ प्रत्यय भाव या अर्थी व्हावा याकरितां ‘सुपि स्थः’ या सूत्राचीं वार्तिककारांनीं दोन सूत्रें केलीं आहेत व भाष्यकारांनीं ‘सुपि’ याचा अर्थ कोणत्याही प्रकारचें सुबन्त उपपद असतांना धातूहून क हा प्रत्यय होतो असा अर्थ करून कच्छपः द्विपः

---

१. “नित्यं प्रसारणं ह्वो यण् वार्णादाङ्गं न पूर्वत्वम्।
योनादिष्टादचः पूर्वस्तत्कार्ये स्थानिवत्त्वं हि ॥ १ ॥
प्रोवाच भगवान् कात्यस्तेनासिद्धिर्यणस्तु ते।
आतः को लिण्णैङः पूर्वः सिद्ध आह्वस्तथा सति ॥ २ ॥

(म. भा. भाषांतर भाग ३ पृ. २०८)

२. हें वार्तिक हस्तलिखित वार्तिकपाठांतही दिलें आहे. येथें भगवान् कात्याचें वार्तिक म्हणून भाष्य-कारांनीं या वार्तिकाचा उल्लेख केला आहे. यावरून हस्तलिखित वार्तिकपाठ कात्यायनाचा असावा या मागें (पृ. १९५,१९६) केलेल्या विधानास पुष्टि मिळते.

हे शब्द साधले आहेत व ' स्थः ' याचा अर्थ स्था धातूहून भाव या अर्थी ' क ' प्रत्यय होतो असा करून आखूत्थः व श्येनोत्थः यांसारखे शब्द साधले आहेत. या ठिकाणीं भाष्यकारांनीं ' जेथें अर्थनिर्देशाशिवाय सूत्रकार प्रत्यय सांगतात तेथें ते प्रत्यय प्रकृतीच्या अर्थी होतात' ( अनिर्दिष्टार्थाः प्रत्ययाः स्वार्थे भवन्ति ) असा वैयाकरण--संकेत सांगितला आहे. वार्तिककारांनीं आपल्या वेळीं प्रचारांत असलेले मूलविभुज ( रथ ), नखमुच ( धनुष्य ), काकगुह ( तीळ ), सरसीरुह ( कमळ ) वगैरे शब्द साधले जावे या दृष्टीनें ' कप्रकरणे मूलविभुजादिभ्य उपसंख्यानम् ' ( सू. ५ वा. २ ) हें वार्तिक केलें आहे. ' क ' या प्रत्ययासारखाच अच् हा प्रत्यय कर्ता या अर्थी कर्मवाचक उपपद असतांना 'हृ' धातूहून उचलणें या अर्थाशिवाय इतर अर्थ असतांना सांगितला आहे; त्याप्रमाणेंच स्तम्ब व कर्ण उपपद असतांना, अनुक्रमें रम् व जप् या धातूंहूनही अच् प्रत्यय सांगितला आहे; व वार्तिककारांनीं शक्ति लाङ्गूल वगैरे उपपदें असतांना ग्रह् धातूहूनही अच् प्रत्यय करावा असें म्हटलें आहे. यानंतर अधिकरणवाचक शब्द उपपद असतांना चर् धातूहून, व कर्मवाचक शब्द उपपद असतांना क्रियेचें करण अथवा कर्त्याचा स्वभाव दाखविला जात असल्यास तसेंच दिवा विभा इत्यादि उपपदें असतांना ' कृ ' धातूहून, ट हा प्रत्यय सांगितला आहे. त्याप्रमाणेंच, विशिष्ट शब्द उपपद असतांना कृ, हृ व ग्रह् या धातूंहून सूत्रकारांनीं इन् प्रत्यय सांगितला आहे; व त्यानंतर जनमेजय, स्तनंधय, मुष्टिंधम, अभ्रंलिह मितंपच, अरुंतुद, असूर्यंपश्य, प्रियंवद, पुरंदर, सर्वंसह इत्यादि शब्द साधण्याकरितां अनेक निरनिराळ्या धातूंहून निरनिराळे कर्मवाचक शब्द उपपद असतांना ' खश् ' प्रत्यय सांगितला आहे. वार्तिककारांनीं त्यांच्या वेळीं प्रचारांत आलेले वातमज, शुनिंधय, विहंगम वगैरे शब्द साधण्याकरितां त्या त्या धातूंहून तीं तीं उपपदें असतांना खश् प्रत्यय सांगितला आहे. ' संज्ञायां भृतॄ० ' ( सू. ४६ ) या सूत्रानें कर्मवाचक अथवा इतर सुबन्त शब्द उपपद असतांना भृ, तॄ, वृ, जि वगैरे धातूंहून रथंतर, पतिंवरा, युगंधर इत्यादि संज्ञाशब्द सिद्ध करण्याकरितां खच् प्रत्यय सांगितला आहे. 'आढ्यसुभग०' ( सू. ५६ ) या सूत्रानें कर्मवाचक आढ्य वगैरे शब्द उपपद असतांना व अभूततद्भाव हा अर्थ गम्यमान असतांना कृ धातूहून करण या अर्थी ख्युन् प्रत्यय सांगितला आहे. ' त्यदादिषु० ' ( सू. ६० ) या सूत्रानें त्वादृशः मादृशः, त्वादृक्, मादृक् इत्यादि शब्द साधण्याकरितां त्यद् तद् वगैरे सर्वनामें उपपद असतांना ' दृश् ' या धातूहून ' कन् ' आणि क्विन् हे प्रत्यय सांगितले आहेत. यानंतर ' सत्सूद्विष० ' इत्यादि (सू. ६१–८३) सूत्रांनीं उपसर्ग किंवा इतर सुबन्त शब्द उपपद असतांना सद् सू वगैरे धातूंहून क्विप्, लोकांमध्यें भज् धातूहून व वेदामध्यें सह् आणि वह् या धातूंहून ण्वि, ' आ'कारान्त धातूंहून मुख्यतः, व प्रयोगाला अनुसरून कोणत्याही धातूहून, मन्, क्वन्, वन् आणि विच् हे प्रत्यय सांगितले आहेत. शेवटीं, ताच्छील्य हा अर्थ गम्यमान असतांना व सुबन्त शब्द उपपद असतांना कोणत्याही धातूहून कर्ता या अर्थीं णिनि प्रत्यय सांगून सूत्रकारांनीं हें सुबन्त उपपद असलेल्या धातूंहून कर्ता या अर्थीं होणाऱ्या प्रत्ययांचें प्रकरण संपविलें आहे.

## २३८. भूतकालप्रत्ययान्हिक (अ. ३ पा. २ आन्हिक २) भूतकालक्रियावाचक प्रत्यय.

' भूते ' ( सू. ८४ ) या अधिकारसूत्रानें आरंभ करून आन्हिक संपेपर्यंत सर्व सूत्रांनीं ( सू. ८४–१२२ ) भूतकालची क्रिया दाखविणारे प्रत्यय सांगितले असल्यामुळें या आन्हिकाला भूतकालप्रत्ययान्हिक हें नांव देतां येणें शक्य आहे. हे प्रत्यय मुद्दाम ' भूते ' असा अधिकार-

सूत्रानें आरंभ करून सांगण्याचा हेतु भूतकालाची विवक्षा असतांनाच या प्रत्ययांनीं इतर सामान्यकालवाचक प्रत्ययांचा बाध व्हावा, तसेंच वर्तमान किंवा भविष्यकालाची विवक्षा असल्यास इतर प्रत्यय व्हावे, हा वार्तिककारांनीं दिला आहे; व कुमारघाती, शीर्षघाती, आखुहा इत्यादि शब्द भूतकालाची विवक्षा नसतांनाच होतात असें म्हटलें आहे. 'ब्रह्मभ्रूण०' ( सू. ८७ ) या सूत्रानें भूतकालाची क्रिया दाखवावयाची असतांना ब्रह्म भ्रूण अथवा वृत्र उपपद असलेल्या हन् धातूहून क्विप् प्रत्यय सांगितला आहे. 'निष्ठा' ( सू. १०२ ) या सूत्रानें सकर्मक धातूहून कर्म या अर्थी, व अकर्मक धातूहून भाव या अर्थी क्त, आणि कोणत्याही धातूहून कर्ता या अर्थी क्तवतु हे भूतकालक्रियावाचक प्रत्यय सांगितले आहेत. वार्तिककारांनीं क्रियेचा प्रारंभ गम्यमान असतांनाही हे निष्ठाप्रत्यय होतात असें म्हटलें आहे. वेदामध्यें सामान्यभूतकालाची विवक्षा असतांना लिट्, कानच् व क्वसु हे प्रत्यय सांगितले आहेत. भाषेमध्यें मात्र सद् वस् आणि श्रु या धातूंहूनच जरी हे प्रत्यय सांगितले असले तरी इतर धातूंहूनही ते कांहीं ठिकाणीं झालेले दृष्टीस पडतात. 'लुङ्' ( सू. ११० ) या सूत्रानें सामान्यभूतकालीं 'लुङ्' हा प्रत्यय सांगितला आहे; व 'अनद्यतने लङ्' ( सू. १११ ) या सूत्रानें अद्यतन नसलेल्या भूतकालीं लङ् प्रत्यय सांगितला आहे. या ठिकाणीं वार्तिककारांनीं सामान्यभूतकालवाचक लुङ् प्रत्यय व सामान्यभविष्यकालवाचक लृट् प्रत्यय यांचा अनद्यतनभूतकालवाचक लङ् व अनद्यतनभविष्य-कालवाचक लुट् या प्रत्ययांनीं बाध होत असल्यामुळें अनद्यतनभविष्यकालविषयक लुट् प्रत्ययाविषयीं जरी कांहीं विशेष अडचण आली नाहीं तरी भूतकालची क्रिया केव्हां घडून गेली हें निश्चित माहीत असल्यामुळें अद्यतन क्रिया नसल्यास नेहमीं लङ् प्रत्ययानें लुङ् प्रत्ययाचा बाध होऊं लागेल ही अडचण उपस्थित करून काल हा विवक्षाधीन असतो म्हणून सामान्यभूतकालची विवक्षा असल्यास लुङाचा प्रयोग होण्यास कांहींही हरकत नाहीं असें म्हटलें आहे.

## २३९. परोक्ष शब्दाचा अर्थ.

'परोक्षे लिट्' ( सू. ११५ ) या सूत्रानें क्रिया आपले देखत घडली नसल्यास लिटाचा प्रयोग करावा असें सांगितलें आहे. या ठिकाणीं भाष्यकारांनीं 'परोक्षे' या शब्दाचें गंमतीदार विवेचन केलें आहे : क्रिया ही प्रत्यक्ष कधींच नसते ती सदा परोक्षच असते; तरी, परोक्ष शब्दाच्या अर्थाचें विवेचन करतांना कांहीं वैयाकरणांचें मत शंभर वर्षांपूर्वींची क्रिया परोक्ष समजावी असें आहे, तर कांहींचें मत एक हजार किंवा त्याहून अधिक वर्षांच्या पूर्वींच्या क्रियेला परोक्ष म्हणावें असें आहे, कांहींच्या मतें दोन चार दिवसांच्या पूर्वींच्या क्रियेस परोक्ष म्हणण्यास हरकत नाहीं, तर इतर कांहीं वैयाकरण पडद्याआड घडलेल्या क्रियेलाही परोक्ष म्हणण्यास तयार आहेत, अशा भिन्नभिन्न मतांचें प्रदर्शन करून कोणतेंही मत घेतलें तरी उत्तम-पुरुषांत लिटाचा प्रयोग केव्हांही करतां येणार नाहीं असें येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. झोपेमुळें किंवा उन्मादामुळें किंवा गैरशुद्धीमुळें कर्त्याला आपण काय केलें याची जाणीव नसतांना घडलेल्या गोष्टींबद्दल उत्तम पुरुषाचा प्रयोग शक्य आहे असें सांगून 'सुप्तोऽहं किल विललाप' यासारखीं उदाहरणें भाष्यकारांनीं दिलीं आहेत. या ठिकाणीं भाष्यकारांनीं झोपेंतच काय, पण जागेपणींसुद्धां मन एकाद्या विषयांत फार रंगलें असल्यास शेजारीं काय चाललें आहे याची जाणीव नसते हें शाकटायनाला शेजारून गाड्या गेल्या असतांना कांहीं सुद्धां कळलें नाहीं असें उदाहरण देऊन प्रतिपादन केलें आहे. शकटानां अयनं शकटायनम्, शकटायनं यो न जज्ञे

स शाकटायनः अशा रीतीनें शाकटायन हें टोपण नांव प्रचारांत आलें असावें असें दिसतें. या ठिकाणीं स्वतः केलेली एकादी गोष्ट कर्त्याला दडवावयाची असेल तेव्हांही लिटाचा प्रयोग दृष्टीस पडतो असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे.

## २४०. वर्तमान कालाची व्याख्या.

'वर्तमाने लट्' (सू. १२३) या सूत्रानें वर्तमानकालीं धातूहून लट् प्रत्यय होतो असें विधान केलें आहे. वास्तविक पाहतां, भूतकालवाचक प्रत्यय पुरे झाल्यामुळें हें अधिकरण संपवून, प्रस्तुत सूत्र हें वर्तमानकालवाचक प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रांना आरंभ करणारें असल्यामुळें पुढच्या अधिकरणांत घालावयास पाहिजे, असें असतांनाही भाष्यकारांनीं तें या अधिकरणांतच घातलें आहे याला कारण प्रत्यक्ष वर्तमानकालवाचक प्रत्ययांना सुरुवात 'लटः शतृ०' (सू. १२४) या पुढील सूत्रापासूनच होते हें असावें. 'वर्तमाने लट्' (सू. १२३) या प्रस्तुत सूत्राचें व्याख्यान करतांना वार्तिककारांनीं कालाचें सामान्य विवेचन केलें आहे; व क्रिया सुरू झाल्यापासून ती संपेपर्यंत जो काल तो वर्तमानकाल अशी वर्तमान-कालाची व्याख्या दिली आहे. भाष्यकारांनीं या ठिकाणीं 'इहाधीमहे' (येथें आम्ही अध्ययन करीत असतों), 'इह पुष्यमित्रं याजयामः' (येथें आतांच आम्ही पुष्यमित्र राजाकरितां यज्ञ करूं) अशीं उदाहरणें दिलीं आहेत. तसेंच, 'स्रवन्ति नद्यः' (नद्या वहात आहेत) हेंही उदाहरण देऊन सतत चालू असल्यामुळें ज्या क्रियांविषयीं भूतकाल व भविष्यकाल असूं शकत नाहीं अशा क्रिया दाखविण्याकरितांही वर्तमानकावाचक लट् प्रत्ययाचा प्रयोग होतो असें म्हटलें आहे. क्रिया चालू असतांना इतर क्रियांमुळें तिला व्यत्यय आला तरीही लट् प्रत्ययाचा प्रयोग होतो असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे. तिष्ठन्ति पर्वताः, स्थास्यन्ति पर्वताः, व तस्थुः पर्वताः असे तीनही कालचे प्रयोग कधींकधीं केलेले दिसतात त्याला कारण बोलणाऱ्याचा विशिष्ट कालही लक्षांत घेऊन हे प्रत्यय केले जातात असें भाष्यकारांनीं दिलें आहे. शेवटीं भूतकाल व भविष्यकाल यांमधील संधिकाल हा क्षणभरही टिकत नसल्यामुळें वर्तमान काल हा वास्तविक पाहतां असूं शकतच नाहीं असें म्हणणाऱ्या, व सूक्ष्म कालखण्ड योगी प्रत्यक्ष जाणतात व आपणही अनुमानानें जाणूं शकतों असें म्हणणाऱ्या, या दोन वैयाकरणांचा एक मनोरंजक श्लोकबद्ध संवाद देऊन भाष्यकारांनीं हें आन्हिक पुरें केलें आहे.

---

१ अपर आह—नास्ति वर्तमानः काल इति । अपि चात्र श्लोकानुदाहरन्ति—

"न वर्तते चक्रमिषुर्न पात्यते, न स्यन्दन्ते सरितः सागराय ।
कूटस्थोयं लोको न विचेष्टितास्ति यो ह्येवं पश्यति सोऽप्यनन्धः ॥ १ ॥
मीमांसको मन्यमानो युवा मेधाविसंमतः ।
काकं स्मेहानुपृच्छति 'किं ते पतितलक्षणम्' ॥ २ ॥
अनागते न पतसि अतिक्रान्ते च काक न ।
यदि संप्रति पतसि सर्वो लोकः पतत्ययम् । हिमवानपि गच्छति ॥ ३ ॥
अनागतमतिक्रान्तं वर्तमानमिति त्रयम् ।
सर्वत्र च गतिर्नास्ति गच्छतीति किमुच्यते ॥ ४ ॥
क्रियाप्रवृत्तौ यो हेतुस्तदर्थं यद्विचेष्टितम् ।
तत्समीक्ष्य प्रयुञ्जीत गच्छतीत्यविचारयन् ॥ ५ ॥

**२४१. वर्तमानकालवाचककृत्प्रत्ययान्हिक ( अ. ३ पा. २ आन्हिक ३ ). सत् प्रत्यय व ताच्छीलिक प्रत्यय.**

या आन्हिकांत प्रथमतः ( सू. १२४–१३४ ) 'सत्' प्रत्ययांचा विचार केला आहे; त्यानंतर ( सू. १३५–१७८ ) विशिष्ट धातूंहून तृन्, इष्णुच्, युच्, आलुच् इत्यादि प्रत्यय, व साधारणतः कोणत्याही धातूहून क्विप् प्रत्यय, या ताच्छील्य वगैरे अर्थी होणाऱ्या प्रत्ययांचा विचार केला आहे; व शेवटीं ( सू. १७९–१८८ ) करण या अर्थी ष्ट्रन् व 'ञि' इत्संज्ञक असलेल्या धातूंना लागणाऱ्या, तसेंच मति बुद्धि व पूजा अर्थ असलेल्या कोणत्याही धातूंना लागणाऱ्या, क्त प्रत्ययाचा विचार केला आहे. हे सर्व प्रत्यय वर्तमानकालींच होणारे असल्यामुळें या आन्हिकाला वर्तमानकालवाचककृत्प्रत्ययान्हिक म्हणतां येईल. लट् प्रत्ययाला आदेश म्हणून सांगितलेले, व सत् प्रत्यय ज्यांना नांव दिलें आहे असे वर्तमानकालवाचक 'शतृ' व 'शानच्' हे प्रत्यय सर्व धातूंहून होतात. 'सत्' म्हणजे वर्तमानकालवाचक अशी अन्वर्थ संज्ञा 'तौ सत्' ( सू. १२७ ) या सूत्रानें सांगितली आहे; तरी पण, सूत्रामध्यें 'तौ' हा शब्द मुद्दाम घातल्यामुळें हे प्रत्यय भविष्यकालीं व ताच्छील्य वगैरे कोणत्याही अर्थी झाले तरी यांना 'सत्' म्हणावें व सत् प्रत्ययांना उद्देशून जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं करावीं असें भाष्यकारांनीं येथें सांगितलें आहे. 'लटः शतृशानचौ०' ( सू. १२४ ) या सूत्रामध्यें 'अप्रथमासमानाधिकरणे' हा शब्द घातला असल्यामुळें 'पचन् देवदत्तः' यासारखे प्रथमा विभक्तींत प्रयोग होत नाहींत असें सूत्रकारांना अभिप्रेत असलें तरी तसे प्रयोग भाषेमध्यें पुष्कळ आढळतात. सूत्रकारांनीं हे प्रयोग होत नाहींत हें सांगण्याचा हेतु पचन् व पचन्तौ यांचा अर्थ पचति व पचतः यांसारखाच असल्यामुळें, पचति देवदत्तः व पचतौ देवदत्तयज्ञदत्तौ हेच प्रयोग करणें बरें असा असावा. 'पूङ्यजोः शानन्' व 'ताच्छील्य०' (सू. १२८, १२९) या सूत्रांत केवळ स्वरभेदाकरितां शानच् प्रत्ययाचे ऐवजीं शानन् व चानश् असे प्रत्यय सांगितले आहेत व त्यांनाही सत् प्रत्यय म्हणावें असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. 'आक्वेस्तच्छील०'......'भ्राजभास०' ( सू. १३४–१७७ ) या सूत्रांमध्यें कर्ता अर्थ असून ताच्छील्य वगैरे अर्थ गम्यमान असतांना निरनिराळ्या धातूंहून इष्णुच्, क्स्नु, घिनुण् वगैरे सोळा निरनिराळे प्रत्यय सांगितले आहेत; त्यांमध्यें अलंकृ निराकृ प्रजन् इत्यादि धातूंहून इष्णुच्, धातुपाठामध्यें शम् धातु आरंभीं असलेल्या आठ धातूंहून तसेंच संपृच् अनुरुध् वगैरे सूत्रांत उच्चारलेल्या ३८ धातूंहून घिनुण् (इन्), निन्द् हिंस् इत्यादि धातूंहून वुञ्, चलन व शब्द या अर्थाच्या अकर्मक धातूंहून तसेंच व्यंजनादि आत्मनेपदी धातूंहून युच्, व सनन्त धातूंहून उ, हे प्रत्यय प्रामुख्यानें दृष्टीस पडतात. 'अन्येभ्योपि०' ( सू. १७८ ) या सूत्रानें प्रयोगाला अनुसरून कोणत्याही धातूहून क्विप् प्रत्यय सांगितला आहे. पण वार्तिककारांनीं मात्र 'हा क्विप् केवल धातूलाच लावावा उपसर्ग किंवा इतर उपपद शब्द धातूचे पूर्वी असेल तर लावूं नये' असा निर्बन्ध घातला आहे. यांशिवाय त्या त्या सूत्रामध्यें दिलेल्या विशिष्ट धातूंहून क्नु, उकञ्, षाकन्, इनि, आलुच्, क्वरच्, घुरच्, क्मरच्, ऊक, र, कि, आरु, कु, वरच् इत्यादि अनेक प्रत्यय

---

अपर आह अस्ति वर्तमानः काल इति । आदित्यगतिवन्नोपलभ्यते । अपि चात्र श्लोकमुदाहरन्ति—

बिसस्य वाला इव दह्यमाना न लक्ष्यते विकृतिः संनिपाते ।

अस्तीति तां वेदयन्ते विभावाः सूक्ष्मो हि भावोऽनुमितेन गम्यः ॥ ६ ॥

( म. भा. भाषांतर भाग ३ पृ. २५६–२५७ )

सांगितले आहेत. शेवटीं 'धः कर्मणि ष्ट्रन्' ......'मतिबुद्धि०' (सू. १८१–१८८) या सूत्रांनीं कर्म या अर्थीं धा धातूंहून, व करण या अर्थीं दा, नी, शस्, यु इत्यादि अनेक धातूंहून ष्ट्रन् प्रत्यय, व शेवटीं कर्ता या अर्थीं मति बुद्धि अथवा पूजा अर्थ असलेल्या धातूंहून क्त प्रत्यय सांगून हा पाद पुरा केला आहे.

## २४२. भाववाचककृत्प्रत्ययान्हिक (अ. ३ पा. ३ आन्हिक १) उणादिप्रत्यय.

या आन्हिकांत 'उणादयो बहुलम्' (सू. १) या सूत्रामध्यें उणादिप्रत्ययांचा उल्लेख करून त्यानंतर 'भविष्यति गम्यादयः'......'अनद्यतने लुट्' (सू. २–१५) या सूत्रांमध्यें भविष्यकालवाचक प्रत्यय सांगितले आहेत; व त्यानंतर कालसामान्यविवक्षा असतांना होणारे घञ् अप् वगैरे अनेक प्रत्यय विवक्षित धातूंहून विवक्षित अर्थीं सांगितले आहेत. पण प्रामुख्यानें भाव या अर्थीं घञ् अप् क्तिन् अ वगैरे प्रत्यय सांगितले असल्यामुळें या आन्हिकाला भाववाचककृत्प्रत्ययान्हिक नांव देतां येईल. 'उणादयो बहुलम्' (सू. १) या सूत्रानें 'उणादि प्रत्यय वर्तमानकालीं होतात व ते बाहुल्येंकरून होतात' असें सांगितलें आहे. भाष्यकारांनीं सूत्रांतील 'बहुलम्' या शब्दाच्या अर्थाचें व प्रयोजनाचें मार्मिक विवेचन केलें आहे. भाषेचा विस्तार व शब्दसमृद्धि पाहिली असतां जरी निरुक्तकार हे प्रत्येक शब्द धातुसाधित असलाच पाहिजे असें म्हणतात व वैयाकरणांमध्यें शाकटायनाचें तसें मत असलें तरी निरनिराळे शब्द पाहून व पुष्कळ शब्दांमध्यें समान अर्थाचा समान शब्दविभाग शोधून काढूनच प्रकृति व प्रत्यय यांची कल्पना करणें योग्य आहे, शब्दाच्या एका तुकड्याला धातु व दुसऱ्या तुकड्याला प्रत्यय कल्पून दरेक शब्दाची व्युत्पत्ति देणें योग्य नव्हे असें येथें भाष्यकारांनीं सुचविलें आहे. भाष्यकारांच्या वेळीं व त्यापूर्वीं, नाम म्हटलें कीं तें धातूपासून साधलें गेलें असलेंच पाहिजे हा 'व्युत्पन्नपक्ष', व नाम हें धातुसाधित असलेंच पाहिजे असा नियम नाहीं संज्ञावाचक नामें व इतरही अनेक नामें हीं धातुसाधित नसतात हा 'अव्युत्पन्नपक्ष', असे दोनही पक्ष प्रचलित होते. भाष्यकारांनीं कांहीं वेळां जरी उणादि प्रत्यय लावून सिद्ध झालेले शब्दही व्याकरण-दृष्ट्या 'धातुसाधित' व्युत्पन्न शब्द मानावे असें म्हटलें असलें तरी त्यांचा कल एकंदरींत उणादिशब्द हे अव्युत्पन्न आहेत, उणादि प्रत्ययांनीं दिलेली व्युत्पत्ति काल्पनिकच आहे असें सुचविण्याकडेच दिसतो. वार्तिककारांचेंही तेंच मत असावें; कारण, 'कृवापा०' या पहिल्याच सूत्रानें 'वायु' हा शब्द साधला जात असतांनासुद्धां त्यांनीं तो अज् धातूहून साधण्याकरितां मुद्दाम वार्तिक केलें आहे. कांहीं वैयाकरण उणादिप्रत्ययांनीं शब्द साधण्याची दिशा दाखवून दिली आहे तिला अनुसरून भाषेंतील सर्व शब्द साधतां येतील व तसे ते साधिले पाहिजेत असें म्हणतात. हे उणादि प्रत्यय साधारणपणें वर्तमानकाल दाखवितात, कधींकधीं भूतकालींही ते होतात व गमिन् वगैरे शब्दांमधील इन् वगैरे प्रत्यय भविष्यकालही दाखवितात असें 'भूतेपि दृश्यन्ते' व 'भविष्यति गम्यादयः' (सू. २, ३) या सूत्रांमध्यें, तसेंच संप्रदान व अपादान

---

१. "बाहुलकं प्रकृतेस्तनुदृष्टेः प्रायसमुच्चयनादपि तेषाम् ।
कार्यसशेषविधेश्च तदुक्तं नैगमरूढिभवं हि सुसाधु ॥ १ ॥
नाम च धातुजमाह निरुक्ते व्याकरणे शकटस्य च तोकम् ।
यन्न विशेषपदार्थसमुत्थं प्रत्ययतः प्रकृतेश्च तदूह्यम् ॥२॥
संज्ञासु धातुरूपाणि प्रत्ययाश्च ततः परे ।
कार्याद्विद्यादनूबन्धमेतच्छास्त्रमुणादिषु ॥३॥ (म. भा. भाषांतर भाग ३ पृ. २८४–२८५)

या अर्थांशिवाय इतर अर्थी ते होतात असें 'ताभ्यामन्यत्रोणादयः' ( ३।७।७५ ) या पाणिनिसूत्रामध्यें सांगितलें असल्यामुळें हीं उणादिसूत्रें पाणिनीच्या पूर्वी रचिलीं गेलीं हें निर्विवाद आहे. या उणादिसूत्रांचा पांच अध्याय असलेला पाठ प्रसिद्ध आहे; व शेखरकारांना तो संमत आहे; दहा अध्याय असलेला पाठ प्रक्रियाकौमुदीकारांनीं घेतला आहे.

**२४३. भावे प्रत्यय.**

'यावत्पुरा०'...'लिङ् चोर्ध्वे०' ( सू. ४-९ ) या सूत्रांनीं यावत्, पुरा, कदा' कर्हि वगैरे उपपदें असतांना व भविष्यकालची विवक्षा असतांना लट् प्रत्यय सांगितला आहे' 'तुमुन्ण्वुलौ०' ( सू. १० ) या सूत्रानें क्रियेकरतां केलेली हेतुभूतक्रिया उपपद असतांना फलभूतक्रिया दाखविणाऱ्या कोणत्याही धातूहून तुमुन् व ण्वुल् हे प्रत्यय होतात असें सांगितलें आहे. 'लृट् शेषे च' (सू. १३) या सूत्रानें सामान्य भविष्यकालीं लृट प्रत्यय सांगितला आहे व शेषे शब्दामुळें म्हणा किंवा लृट् व शेषे अशीं दोन सूत्रें केल्यामुळें म्हणा, क्रियार्थक क्रिया गम्यमान असतांना, तसेंच सामान्य भविष्यकालविवक्षा असतांनाही हा लृट् प्रत्यय होतो. 'अनद्यतने लुट्' ( सू. १५ ) या सूत्रानें आजचा भविष्यकाल नसेल तर लुट् प्रत्यय सांगितला आहे. 'भावे' ( सू. १८ ) या सूत्रानें भाव या अर्थीं कोणत्याही धातूहून 'घञ्' प्रत्यय सांगितला आहे; व त्यानंतर 'अकर्तरि०'....'परौ भुवोवज्ञाने' ( सू. १९-५५ ) यांमध्यें कर्तृभिन्नकारक अथवा भाव या अर्थीं विशिष्ट धातूंहून विशिष्ट अर्थ गम्यमान असतांना घञ् प्रत्यय सांगितला आहे. भाष्यकारांनीं 'भाव' या शब्दाचें व्याख्यान करतांना या ठिकाणीं 'भावे' असा पुंल्लिंगी एकवचनी शब्द घातल्यामुळें भाववाचक कृदन्ताहून पुल्लिंगीं एकवचनींच प्रत्यय होतात असें समजूं नये; लिंगवचनप्रत्यय लावल्याशिवाय भाषेमध्यें शब्दाचें उच्चारण करूं नये म्हणून भावे हा पुंल्लिंगी एकवचनी प्रयोग केला आहे; सूत्रांमध्यें जशी लिंगविवक्षा दिली असेल त्याप्रमाणें लिंगप्रत्यय लावून व भिन्नभिन्न भाव असल्यामुळें तीनही वचनाचे प्रत्यय लावून भाववाचक कृदन्तांचा प्रयोग केला जातो असें सांगितलें आहे. भाव व कर्तृभिन्नकारक या अर्थीं स्वरूपानें अ हाच प्रत्यय पण इकारान्त धातूहून अच् असा उच्चारलेला प्रत्यय 'एरच्' (सू.५६) या सूत्रानें सांगितला आहे. त्याप्रमाणेंच ऋकारान्त व उकारान्त धातूंहून 'ऋदोरप्' (सू.५७) या सूत्रानें अप् प्रत्यय सांगितला आहे. इत्संज्ञक डु अक्षर लावून उच्चारण केलेल्या कृ, पच् इत्याहि धातूंहून 'क्त्रि' ( त्रिम ) प्रत्यय होतो व उपसर्ग पूर्वी असलेल्या घुसंज्ञक ( दा व धा ) धातूंहून 'कि' प्रत्यय होतो. 'स्त्रियां क्तिन्'......'आक्रोशे नञ्यनिः' ( सू. ९४-११२ ) या सूत्रांमध्यें भाव किंवा कर्तृभिन्नकारक या अर्थीं सामान्यतः सर्व धातूंहून क्तिन् प्रत्यय व विशिष्ट धातूंहून क्यप्, श, अ, अङ्, युच्, ण्वुल्, इञ्, ण्वुच् व अनि हे प्रत्यय सांगितले आहेत; हे प्रत्यय शेवटीं असलेले शब्द स्त्रीलिंगीं चालतात. भाव याच अर्थीं सामान्यतः सर्व धातूंहून क्त व ल्युट् हे प्रत्यय नपुंसकलिंगाची विवक्षा असतांना सांगितले आहेत; तसेंच, करण किंवा अधिकरण या अर्थीं पुंल्लिंगाची विवक्षा असतांना व संज्ञाशब्द सिद्ध होत असतांना कोणत्याही धातूंहून ल्युट् प्रत्यय व घ प्रत्यय होतात. करण किंवा अधिकरण या अर्थी साधारणतः व्यञ्जनान्त धातूंहून घञ् प्रत्यय होतो; व ईषद्, दुस् किंवा सु उपपद असतांना व दुःख अर्थ गम्यमान असतांना साधारणतः कोणत्याही धातूहून खल् प्रत्यय होतो. एकंदरींत या अधिकरणामध्यें भाव करण किंवा अधिकरण या अर्थी २८ निरनिराळे प्रत्यय सांगितले आहेत. त्यांपैकीं पुंल्लिंगीं

१. याविषयीं विवेचन मागें पृ. १६० परि. ७० व टीप १ मध्यें केलें आहे.

घञ्, स्त्रीलिंगीं क्तिन्, व नपुंसकलिंगीं क्त व ल्युट् हे प्रत्यय, विशिष्ट अपवादस्थलें सोडल्यास, सर्व धातूंहून होतात.

**२४४. लकारार्थाह्निक ( अ. ३ पा. ३ आन्हिक २ ). विशिष्ट अर्थी विशिष्ट लकारांचे प्रयोग.**

या आन्हिकामध्यें ज्या लकारांचे अर्थ पूर्वीं सांगितले नाहींत अशा लकारांचे अर्थ सांगितले आहेत; तसेंच कोणत्या विशिष्ट प्रसंगीं व अर्थीं सामान्यतः सांगितलेल्या एका लकार-प्रत्ययाऐवजीं दुसरा लकारप्रत्यय होतो हेंही या आन्हिकांत सांगितलें आहे, म्हणून या आन्हिकाला लकारार्थान्हिक हें नांव देतां येईल. भाष्यकारांनीं या आन्हिकांत उदाहरणा-करितां म्हणून जीं वाक्यें दिलीं आहेत त्यांवरून संस्कृत ही बोलभाषा म्हणून प्रचलित असतांना लोकांमध्यें बोलले जाणाऱ्या भाषासौष्ठवयुक्त वाक्प्रचारांची चांगलीच कल्पना येईल. उदाहरणार्थ—केव्हां आलास? याला उत्तर म्हणून असलेल्या 'हा येतोच आहे' अशा अर्थाचें 'आगच्छन्तमेव मां विद्धि', 'अयमागच्छामि' हे प्रयोग, तसेंच, केव्हां जाणार? याला उत्तर 'हा निघालोंच' या अर्थाचे 'एष गच्छामि' यासारखे प्रयोग 'वर्तमानसामीप्ये वर्तमानवद्वा' ( सू. १३१ ) या सूत्रानें सांगितले आहेत. त्याप्रमाणेंच, आशंसा म्हणजे न मिळालेली वस्तु मिळण्याची इच्छा हा अर्थ गम्यमान असतांना भूतकाळीं व वर्तमानकाळीं सांगितलेले प्रत्यय होतात असें 'आशंसायां भूतवच्च' ( सू. १३२ ) या सूत्रानें सांगितलें आहे. त्यामुळें 'उपाध्यायश्चेदागतः, आगच्छति, आगमिष्यति वा, व्याकरणमध्येष्यामहे' असे प्रयोग होतात. या आशंसा अर्थीं लिङ् प्रत्ययही होतो असें 'आशंसावचने लिङ्' ( सू. १३४ ) या सूत्रानें सांगितलें आहे. 'लिङ्निमित्ते लृङ् क्रियातिपत्तौ' या सूत्रामध्यें वरतीं दिलेल्या लिङ् प्रत्ययाऐवजीं क्रिया झाली नसेल किंवा होणारी नसेल तर लृङ् प्रत्यय सांगितला आहे. 'हेतुहेतुमतोर्लिङ्' ( सू. १५६ ) या सूत्रानें कार्यकारणभाव दाखविणाऱ्या दोन्ही क्रियावाचक धातूंहून लिङ् प्रत्यय होतो असें सांगितलें आहे; उदाहरणार्थ 'अनेन चेद्यायान्न शकटं पर्या-भवेत्'. इच्छार्थक धातु उपपद असेल तर धातूहून लिङ् प्रत्यय होतो व तुमुन् प्रत्ययही होतो. उदा० भोक्तुमिच्छति अथवा भुञ्जीय इतीच्छति देवदत्तः. हा लिङ् प्रत्यय विधि निमन्त्रण आमन्त्रण वगैरे अर्थींही सांगितला आहे; व याच अर्थीं लोट् प्रत्ययही सांगितला आहे. 'प्रैषातिसर्ग०' ( सू. १६३ ) या सूत्रानें प्रैष, अतिसर्ग व प्राप्तकाल या अर्थीं लोट् प्रत्यय होतो, अथवा कृत् प्रत्ययही होतात, व क्रिया थोड्या कालानंतर होणारी असेल तर लिङ् प्रत्ययही होतो असें सांगितलें आहे. अर्ह म्हणजे योग्यता या अर्थींही धातूहून लिङ् प्रत्यय, कृत्य प्रत्यय, व तृच् प्रत्यय होतात; कृत्य प्रत्यय आवश्यक या अर्थींही होतात. काल, समय व वेला हे शब्द उपपद असतांनाही धातूहून तुमुन् प्रत्यय होतो; तसेंच, 'माङ्' हें उपपद असतांना लुङ्, व 'मा स्म' उपपद असतांना लङ्ही होतो.

**२४५. केवलभावार्थककृत्प्रत्ययान्हिक ( अ. ३ पा. ४ आ. १ ) क्त्वा, णमुल् व तुमुन् प्रत्यय.**

या आन्हिकांत विशिष्ट काल किंवा विशिष्ट कारक या अर्थांचा उल्लेख न करतां केवलभावार्थक कृत्-प्रत्यय व लकारादेश सांगितले असल्यामुळें याला केवलभावार्थककृत्प्रत्ययान्हिक म्हणतां येईल. 'धातुसंबन्धे प्रत्ययाः'...'समुच्चये सामान्यवचनस्य' ( सू. १–५ ) या सूत्रांमध्यें विशिष्ट प्रसंगीं होणारे विशिष्ट लकारादेश सांगितले आहेत. 'छन्दसि लुङ्लङ्लिटः'...

'सृपितृदोः कसुन्' (सू. ६–१७) या सूत्रांमध्यें वेदामध्यें आढळून येणारे लिङ् प्रत्ययाचे अर्थीं लेट् प्रत्यय, तुम् प्रत्ययाच्या अर्थीं से असे वगैरे प्रत्यय, कृत्य प्रत्ययांचे ऐवजीं तवै केन् इत्यादि प्रत्यय, भाव या अर्थीं तोसुन् प्रत्यय, इत्यादि विशिष्ट प्रत्यय सांगितले आहेत. त्यानंतर 'अलंखल्वोः०' (सू १८) या सूत्रानें अलं अथवा खलु उपपद असतांना प्रतिषेध या अर्थीं 'क्त्वा' प्रत्यय, तसेंच 'समानकर्तृकयोः पूर्वकाले' (सू. १९) या सूत्रानें कर्ता एकच असतांना पूर्वकालची क्रिया दाखविणाऱ्या धातूंहूनही 'क्त्वा' हा प्रत्यय सांगितला आहे. वार्तिककारांनीं या ठिकाणीं 'व्यादाय स्वपिति' (तोंड उघडें ठेवून झोंपतो) अशा उदाहरणांमध्यें तोंड उघडणें ही झोंपण्यानंतरची क्रिया असतांनाही क्त्वा प्रत्यय होतो असें दाखवून उत्तरकालची क्रिया दाखविणाऱ्या धातूंहूनही क्त्वा प्रत्यय सांगावा कां असा प्रश्न उपस्थित केला आहे; व त्यास उत्तर देतांना भाष्यकारांनीं तोंड उघडणें ही पूर्वकालचीच क्रिया आहे असें मोठ्या मजेदार रीतीनें सांगितलें आहे. 'आभीक्ष्ण्ये णमुल् च'...'अन्वच्यानुलोम्ये' (सू. २२-६४) या सूत्रांमध्यें विशिष्ट अर्थीं विशिष्ट धातूंहून 'णमुल्' प्रत्यय सांगितला आहे. आभीक्ष्ण्य या अर्थीं णमुल् केला असतांना णमुलन्त शब्दाचें द्विरुच्चारण होतें. 'निमूलसमूलयोः कषः' (सू. ३४) या व याच्या पुढील सूत्रांनीं णमुल् केला असतां ज्यांहून णमुल् केला असेल त्याच धातूंचा क्रियापद अथवा कृदन्त म्हणून प्रयोग करावा लागतो. सूत्रकारांनीं या णमुल् प्रत्ययाचे विधानाकरितां जवळजवळ चाळीस सूत्रें लिहिलीं आहेत यावरून त्यांचे वेळच्या प्रचलित संस्कृत भाषेमध्ये णमुल्-प्रत्ययान्त शब्दांचा पुष्कळच प्रचार असावा असें दिसतें. 'शकधृषज्ञाग्ला०' (सू. ६५) या सूत्रानें शक् धृष् वगैरे धातू उपपद असतांना क्रियार्थक क्रिया पाहिजे हा निर्बन्ध न लागतां कोणत्याही धातूहून तुमुन् प्रत्यय होतो असें सांगितलें आहे. 'कर्तरि कृत्' (सू. ६७) या सूत्रानें या तिसऱ्या अध्यायामध्यें सांगितलेले सर्व प्रत्यय कर्म, करण, अधिकरण असे विशिष्ट अर्थ सांगितले नसल्यास कर्ता या अर्थीं होतात असें सांगितलें आहे. हें सूत्र केलें नसतें तर विशिष्ट अर्थ न देतां 'गुप्तिज्किद्भ्यः सन्' इत्यादि सूत्रांनीं सांगितलेले सन् वगैरे प्रत्यय जसे स्वार्थीं होतात तसेच अर्थ न देतां सांगितलेले इतरही प्रत्यय धातूच्या स्वतःच्या अर्थीं झाले असते असें येथें वार्तिककारांनीं म्हटलें आहे. भाष्यकारांनीं वार्तिककारांच्या म्हणण्याचें सूक्ष्म विवेचन करून धातूच्या आभ्यंतर व बाह्य या दोन प्रकारच्या भावांपैकीं 'भावे' या अर्थीं सांगितलेले प्रत्यय बाह्य भाव या अर्थीं होतात, म्हणून प्रस्तुत सूत्र न केल्यास अर्थ न देतां सांगितलेले प्रत्यय धातूचा अर्थ जो आभ्यंतर भाव त्या अर्थीं होऊं लागतील, ते तसे न व्हावे याकरितां प्रस्तुत सूत्र केलें आहे असा वार्तिककारांचा अभिप्राय दाखविला आहे. 'लः कर्मणि च भावे च०' (सू. ६९) या सूत्रामध्यें कर्ता कर्म व भाव हे लकाराचे सामान्य अर्थ दिले आहेत; व सकर्मक धातूहून लकारयुक्त प्रत्यय हे कर्ता किंवा कर्म या अर्थीं होतात, आणि अकर्मक धातूहून ते कर्म किंवा भाव या अर्थीं होतात असें सांगितलें आहे. 'तयोरेव०' (सू. ७०) या सूत्रानें कृत्य, क्त व खल् यांच्या अर्थीं सांगितलेले प्रत्यय अकर्मक धातूंहून भाव या अर्थीं व सकर्मक धातूंहून कर्म या अर्थींच होतात असें सांगितलें आहे. फक्त 'कर्मांचा प्रारंभ' या अर्थीं सांगितलेला क्त प्रत्यय कर्ता या अर्थीं होतो. 'ताभ्यामन्यत्र०' (सू. ७५) या सूत्रानें उणादि प्रत्यय हे संप्रदान व अपादान या अर्थांशिवाय इतर अर्थीं होतात असें सांगितलें आहे. यानंतर शेवटीं 'लस्य' (सू. ७७) या सूत्रापासून पाद संपेपर्यंत निरनिराळे लकारादेश सांगून सूत्रकारांनीं हा तिसरा अध्याय पुरा केला आहे.

**तिसरा अध्याय (तिङ्कृत्प्रत्ययाध्याय) समाप्त.**

## २४६. स्त्रीप्रत्ययान्हिक-१ (अ. ४ पा. १ आन्हिक १). 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या सूत्राच्या आवश्यकतेचें विवेचन.

या आन्हिकांत (सू. १-१४) व पुढील आन्हिकांत (सू. १५-८१) स्त्रीलिंगार्थी सामान्यतः होणाऱ्या टाप् व ङीप् या प्रत्ययांचा विचार केला आहे म्हणून या दोन्ही आन्हिकांना स्त्रीप्रत्ययान्हिक नांव देतां येईल. 'ङ्याप्प्रातिपदिकात्' (सू. १) हें अधिकारसूत्र आहे; व त्यामुळें यापुढें चौथ्या व पांचव्या या दोनही अध्यायांत सांगितलेले सर्व प्रत्यय हे ङीप्रत्ययान्त व आप्प्रत्ययान्त स्त्रीलिंगी शब्द व कोणतेंही प्रातिपदिक यांहून होतात; धातूहून किंवा ङी व आप् यांशिवाय इतर कोणताही प्रत्यय लावलेल्या प्रत्ययान्त शब्दाहून होत नाहींत. सूत्रकार जेव्हां जेव्हां प्रत्यय सांगतात तेव्हां तेव्हां त्यांचा अर्थही सांगतात; म्हणून योग्य व विवक्षित अर्थ संभवत असतांनाच प्रत्यय होत असल्यामुळें धातूहून स्त्रीप्रत्यय व तद्धितप्रत्यय होणारच नाहींत तेव्हां ङी व आप् हे शब्द येथें प्रस्तुत सूत्रांत उच्चारण्याचा उपयोग नाहीं असें असूनही सूत्रकारांनीं ते शब्द कां घातले हा प्रश्न उपस्थित करून ङीप्रत्ययान्त व आप्प्रत्ययान्त शब्दांना अङ्ग भ व पद वा संज्ञा व्हाव्या हा उपयोग वार्तिककारांनीं दिला आहे. परंतु या बाबतींतही चौथ्या व पांचव्या अध्यायांत सांगितलेले अण्, अच्, टाप् व ङीप् तसेच स्वार्थी प्रत्यय सुद्धां ते ते शब्द उच्चारून त्यांना किंवा त्या अर्थीं होतात असें विधान केलें असल्यामुळें त्या भ पद वगैरे संज्ञाही प्रत्ययाचे मागील शब्दालाच होतील, त्याकरितां प्रस्तुत सूत्राची जरूर नाहीं असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. कंसीय व परशव्य या शब्दांतील छ व यत् यांचा लुक् व्हावा, कंस व परशु या शब्दांमधील उणादि प्रत्यय जे स व शु यांचा लुक् होऊं नये, हा 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या पदाचा उपयोग वार्तिककारांनीं दाखविला आहे पण त्या बाबतींत उणादि शब्द हे व्युत्पन्न प्रातिपदिकें म्हणून समजावयाचे नाहींत असें आपलें ठाम मत भाष्यकारांनीं सांगून स व शु यांचा लुक् न होणें हाही उपयोग म्हणून सांगतां येणार नाहीं असें म्हटलें आहे. यानंतर वृद्ध किंवा अवृद्ध शब्द, अवर्णान्त शब्द, अनुदात्तादि शब्द इत्यादिकांना सांगितलेले प्रत्यय प्रातिपदिकांहूनच झाले पाहिजेत याकरितां प्रस्तुत सूत्राची जरूर आहे असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे व त्याचें भाष्यकारांनीं उदाहरणें देऊन विवेचन केलें आहे.

## २४७. 'लिङ्गविशिष्ट' परिभाषा.

यानंतर ङी व आप् या शब्दांच्या उपयुक्ततेबद्दल विचार करून 'प्रातिपदिकाला उद्देशून होणारें कार्य जरी प्रातिपदिक हें लिङ्गप्रत्यययुक्त असलें तरी त्याला करावें' ही परिभाषा स्वीकारणें अवश्य असल्यामुळें ङी व आप् शब्द सूत्रांत घालण्याची आवश्यकता नाहीं हें वार्तिककारांचें म्हणणें भाष्यकारांनीं मान्य केलें आहे. 'लिङ्गविशिष्ट' परिभाषा म्हणून वैयाकरणसंप्रदायामध्यें प्रसिद्ध असलेल्या या परिभाषेची भाष्यकारांनीं अनेक उदाहरणें देऊन तिची उपयुक्तता प्रस्थापित केली आहे व थोडे जें कांहीं दोष येतात ते सर्व दाखविले आहेत. भाष्यकारांनीं येथें दोष थोडे असले तरी परिभाषा घेतलीच पाहिजे; कारण, याचक फार आहेत म्हणून स्वयंपाक करावयाचें कोणी सोडीत नाहींत, किंवा हरणें आहेत म्हणून यव पेरावयाचे कोणी

सोडीत नाहींत असें मजेदार रीतीनें प्रतिपादन केलें आहे. भाष्यांतील या ठिकाणचें विवरण फार मुद्देसूद आहे इतकेंच नव्हे तर तें भाष्यकारांचे नजरेपुढें सर्व अष्टाध्यायी कशी जागृत होती त्याचें उत्कृष्ट निदर्शन आहे. ही ‘ लिंगविशिष्ट ’ परिभाषा स्वीकारल्यास ‘ ङ्याप् ’ शब्दाची जरूर नाहीं; तरी पण कालितरा, हरिणितरा या उदाहरणांमध्यें ‘ काल ’ या शब्दाहून गुणप्रकर्ष दाखविणारा ‘तर’ हा प्रत्यय आणि स्त्रीत्व दाखविणारा ‘टाप् ’ प्रत्यय एकदम प्राप्त होतात व परत्वास्तव ‘ तर ’ हा प्रत्यय अगोदर होऊन रूप बिघडतें हा मोठा दोष राहतो असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे व त्याचें निवारण टाप्, ङीप् वगैरे स्त्रीप्रत्यय हे स्वार्थींच असल्यामुळें व स्त्रीत्व हा अर्थ प्रातिपदिकामध्येंच अंतर्भूत झालेला असल्यामुळें तद्धितप्रत्ययापूर्वींच ते होतात, असें सागून केलें आहे. कालितरा व कालितमा या शब्दांमध्यें काळेपणा या अर्थानें अप्रधान जो काळेपणा हा गुण त्याचा प्रकर्ष जरी असला तरी तेथें तर व तम हे प्रत्यय शुक्लतर, शुक्लतम या ठिकाणीं होतात त्याप्रमाणेंच होऊं शकतात, असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. तसेंच, विभक्तिप्रत्यय पुढें असतांना ही ‘ लिंगविशिष्ट ’ परिभाषा घेऊं नये असेंही भाष्यकारांनीं सांगितलें आहे.

## २४८. प्रातिपदिकापासूनच स्त्रीत्वाचा बोध.

‘ स्वौजसमौट्० ’ ( सू. २ ) या सूत्रानें स्त्रीप्रत्ययान्त शब्दांना व प्रातिपदिकांना कारक व संख्या या अर्थांचे द्योतक विभक्तिप्रत्यय सांगितले आहेत; व त्यानंतर ‘ स्त्रियाम् ’...... ‘ दैवयज्ञि० ’ ( सू. ३-८१ ) या सूत्रांनीं स्त्रीत्वाची विवक्षा असतांना होणारे टाप् ङीप् वगैरे स्त्रीप्रत्यय सांगितले आहेत. जाति गुण क्रिया अथवा संज्ञा यांपैकीं कोणता तरी एक विशिष्ट धर्म, धर्मी ( द्रव्य ), लिङ्ग, संख्या, आणि कारक हे पांच प्रातिपदिकार्थ म्हणून प्रसिद्ध आहेत; व सुप्प्रत्ययान्त प्रातिपदिक उच्चारतांच एकामागून एक या क्रमानें जरी ते मनांत येणारे असले तरी लोकव्यवहारामध्यें ते एकदम मनांत आल्यासारखे वाटतात. ‘ अपदं न प्रयुञ्जीत ’ हा वैयाकरणांचा दंडक असल्यामुळें प्रातिपदिकाचा प्रयोग सुप् प्रत्यय लावूनच होतो. सुप् प्रत्यय हे प्रातिपदिकाच्या वर दिलेल्या पांच अर्थांपैकीं संख्या व कारक या अर्थांचे द्योतक असतात असें अन्वयव्यतिरेकांवरून सिद्ध होतें. कांहीं वैयाकरणांच्या मतें कारकत्व धर्म हा सुप् प्रत्ययांचा वाच्यार्थ असतो. तीन लिंगांपैकीं पुल्लिंग व नपुंसकलिंग गम्यमान असतांना पाणिनीनें जरी सु औ जस् वगैरे विभक्ति-प्रत्ययांना कांहीं विशिष्ट आदेश सांगितले असले तरी पुल्लिंग व नपुंसकलिंग या अर्थीं त्यानें एकही प्रत्यय सांगितला नाहीं. स्त्रीलिंगद्योतक आ ( टाप्, डाप्, चाप् ) ऊङ्, व ई ( ङीप्, ङीष्, ङीन् ) हे प्रत्यय सुद्धां स्वरान्त शब्दांपैकीं सर्व अकारान्त, व मातृ दुहितृ वगैरे शब्दांशिवाय सर्व ऋकारान्त शब्द, व व्यंजनान्तांपैकीं पुष्कळसे नकारान्त प्रातिपदिकांहूनच सांगितले असल्यामुळें व इतर सर्व स्त्रीलिंगी प्रातिपदिकांहून स्त्रीप्रत्ययाशिवाय स्त्रीत्व या अर्थाचा बोध होत असल्यामुळें जसे स्वार्थ ( जाति गुण वगैरे धर्म ) व द्रव्य हे प्रातिपदिकाचेच अर्थ समजले जातात तसा लिंग हाही प्रातिपदिकाचाच अर्थ समजला जातो. अर्थात् जेथें स्त्रीप्रत्यय लागलेला दृष्टीस पडतो तेथें तो स्त्रीप्रत्यय कप् वगैरे तद्धित प्रत्ययांप्रमाणें स्वार्थींच लाविला जातो असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे.

## २४९. लिंगकल्पना

संस्कृत भाषेमध्यें तीन लिंगें, तीन वचनें व तीन पुरुष दृष्टीस पडतात. त्यांपैकीं लिंगाचा विचार शब्दाचें स्वरूप लक्षांत घेऊन केल्यास वैदिक वाङ्मयामध्यें आकारान्त व ईकारान्त शब्द

हे बहुशः स्त्रीलिंगीं आढळतात; अर्थाकडे लक्ष देऊन लिंगाचा विचार केल्यास प्रकाश, ओजस्विता, राकटपणा वगैरे धर्म असलेले पदार्थ पुल्लिंगीं आढळतात. याचे उलट अंधकार, दुर्बलता, संकोच, कोमलता वगैरे धर्मांनीं युक्त स्त्रीलिंगीं आढळतात. सजीव प्राण्यांमध्येंही साधारणपणें या व यासारख्याच धर्मांमुळें पुरुष व स्त्री यांमधील अंतर दिसून येतें. अर्थात् सजीव प्राण्यांविषयीं लौकिक प्रत्यक्ष लिंग लक्षांत घेऊनच वैदिक व लौकिक वाङ्मयामध्यें तद्वाचक शब्दांचें लिंग दिलेलें आढळून येतें. भाष्यकारांनीं या दोन्ही गोष्टी लक्षांत घेऊन ' स्त्रियाम् ' ( सू.३ ) या सूत्राचें व्याख्यान करतांना ' स्तनकेशवती स्त्री स्यात्......तटे च सर्वलिङ्गानि दृष्ट्वा कोऽध्यवसास्यति ' हे पांच श्लोक देऊन ' संस्त्याने स्त्यायतेर्ड्रट् स्त्री सूतेः सप् प्रसवे पुमान् । संस्त्यानप्रसवौ लिङ्गमास्थेयौ स्वकृतान्ततः ॥ ' हा शास्त्रीय रीत्या निर्णयात्मक श्लोक दिला आहे. लोकांमध्यें स्तन व लांबलचक केस असणें हें स्त्रीचें लक्षण व लंव असणें हें पुरुषाचें लक्षण अशा प्रामुख्यानें दिसणाऱ्या चिन्हांनीं व्यक्तीचें लिंग ठरतें व त्याला अनुसरूनच शब्दांचें लिंग असतें असें मानिल्यास स्त्रीवेषधारी नट या अर्थाच्या ' भ्रूकुंस ' या शब्दाला स्त्रीलिंगी प्रत्यय लावावे लागतील; तसेंच, खरकुटी व वध्रिका यांना पुंल्लिगी शब्द बनवावे लागतील. शिवाय, खट्वा वृक्ष वगैरे अचेतन वस्तूंमध्यें वर दिलेलीं चिन्हें मुळींच दिसत नसल्यामुळें खट्वा वगैरे शब्दांच्या लिंगाचें समर्थन करतां येणार नाहीं; त्याप्रमाणेंच 'तट' या शब्दांत दिसणाऱ्या तीन लिंगांचेंही समर्थन करणें कठीण आहे. स्त्री व पुरुष यांमधील नैसर्गिक भेद दाखविणारीं शारीरिक लक्षणें जरी लिंगकल्पनेच्या मुळाशीं घेतलीं तरीसुद्धां ज्या ठिकाणीं तीं लक्षणें स्पष्टपणें दिसूं शकत नाहींत अशा क्षुद्र जंतूंचे बाबतींत मत्कुण, पतङ्ग, सर्प, वृश्चिक इत्यादि शब्दांचे प्रयोग फक्त पुल्लिंगींच दृष्टीं पडतात; यूका, लिक्षा, वम्री, गोधा, पल्ली, इत्यादि शब्दांचे फक्त स्त्रीलिंगींच प्रयोग दृष्टीं पडतात. एकंदरींत लौकिक लिंगावरून शब्दाचें लिंग प्रचारांत आलें नाहीं असें पाहून भाष्यकारांनीं "संस्त्यानप्रसवौ लिङ्गम्" अशी शास्त्रीय व्याख्या दिली आहे.

## २५०. ' लिङ्ग ' शब्दाची शास्त्रीय व्याख्या.

' संस्त्यानप्रसवौ लिङ्गम् ' या व्याख्येप्रमाणें संस्त्यान म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, वगैरे गुणांचे संकोच, अपचय, ऱ्हास या प्रकारचे धर्म ज्या वस्तूंमध्यें दिसतात त्या वस्तूंचें प्रति-

१. स्तनकेशवती स्त्री स्याल्लोमशः पुरुषः स्मृतः ।
उभयोरन्तरं यच्च तदभावे नपुंसकम् ॥ १ ॥
लिङ्गात् स्त्रीपुंसयोर्ज्ञाने भ्रूकुंसे टाप् प्रसज्यते ।
नत्वं खरकुटीः पश्य खट्वावृक्षौ न सिध्यतः ॥ २ ॥
नापुंसकं भवेत्तस्मिन् तदभावे नपुंसकम् ।
असत्तु मृगतृष्णावद् गन्धर्वनगरं यथा ॥ ३ ॥
आदित्यगतिवत्सन्न वस्त्रान्तर्हितवच्च तत् ॥
तयोस्तु तत्कृतं दृष्ट्वा यथाकाशेन ज्योतिषः ॥ ४ ॥
अन्योन्यसंश्रयं त्वेतत् प्रत्यक्षेण विरुध्यते ॥
तटे च सर्वलिङ्गानि दृष्ट्वा कोऽध्यवसास्यति ॥ ५ ॥
संस्त्यानप्रसवौ लिङ्गम् आस्थेयौ स्वकृतान्तः ।
संस्त्याने स्त्यायतेर्ड्रट् स्त्री सूतेः सप्प्रसवे पुमान् ॥ ६ ॥
तस्योक्तौ लोकतो नाम गुणो वा लुपि युक्तवत् ॥

पादन करणाऱ्या शब्दांचा स्त्रीलिंगी प्रयोग होतो; प्रसव म्हणजे शब्द वगैरे गुणांचे वृद्धि, उपचय, विकास इत्यादि धर्म ज्या वस्तूंत आढळतात तद्वाचक शब्दांचा पुल्लिंगी प्रयोग होतो व ज्यांमध्यें दोन्ही आढळत नाहींत अशा वस्तूंचे बोधक शब्द नपुंसकलिंगीं चालतात असा सिद्धान्त भाष्यकारांनीं मांडला आहे. संघात या अर्थाच्या 'स्त्यै' या धातूहून ड्रट् व ङीप् प्रत्यय होऊन स्त्री शब्द साधला आहे; व पुंस् शब्द सू धातूहून डुमसुन् प्रत्यय व सकाराला पकार आदेश होऊन साधला आहे. 'संस्त्याने स्त्यायतेर्ड्रट् स्त्री, सूतेः सप् ( सऽप् ) प्रसवे पुमान्' या वचनांतील 'सप्' याचा अर्थ 'स'काराला 'प'कार असा प्रदीपकारांनीं दिला आहे. तो तसाच पाहिजे हें खरें; पण 'सस्य प् सप्' असें सामासिक पद येथें घ्यावें, किंवा सस्य या अर्थी 'स' हें लुप्तषष्ठीयुक्त पद घ्यावें याचा उलगडा टीकाग्रंथांमध्यें केला नाहीं. कदाचित् सः ( सकारस्य ) प् ( पकारः ) या अर्थी सऽप् ( सूतेः सऽप्प्रसवे ) असा मूळचा पाठ असावा. संस्त्यान म्हणजे गुणांचा अपकर्ष व प्रसव म्हणजे गुणांचा उत्कर्ष हे अर्थ भाष्यकारांनीं दिले असल्यामुळें शब्द स्पर्श रूप इत्यादि गुणांचे मुळाशीं असलेल्या तमस्, रजस् व सत्त्व या सांख्यप्रक्रियेंतील तीन गुणांशीं अनुक्रमें स्त्रीलिंग पुंलिंग व नपुंसकलिंग या कल्पनांचा संबंध त्या वेळच्या वैयाकरणांच्या मनांत असणें शक्य आहे. 'सत्त्वप्रधानानि नामानि' हें जुनें वचनही या बाबतींत लक्षांत घेण्याजोगें आहे. याविषयीं भर्तृहरीचें वाक्यपदीय, हरदत्ताची पदमंजरी कैयटभट्टांचा प्रदीप व नागेशभट्टांचा उद्द्योत यांमध्यें केलेलें विवेचन परिशीलन करण्याजोगें आहे.

## २५१. 'स्त्रियाम्' या सूत्राचा अर्थ.

'स्त्रियाम्' ( सू. ३ ) या सूत्रांतील 'स्त्रियाम्' या पदाचा 'स्त्री हा अर्थ विवक्षित असतांना' असा अर्थ करावा, अथवा 'स्त्रीसमानाधिकरण जें प्रातिपदिक त्याहून' असा अर्थ करावा या दोनही पक्षांचें विवेचन करून त्यांवर येणाऱ्या दोषांचें निवारण करून कोण-

---

१. वाक्यपदीयाच्या तिसऱ्या कांडामध्यें लिंगसमुद्देश या प्रकरणांत लिंगकल्पनेविषयीं भर्तृहरीनें विद्वत्तापूर्ण ऊहापोह केला आहे व टीकाकार हेलाराजांनीं त्याचें स्पष्टीकरण केलें आहे. ( वाक्यपदीय ३।१३ पहा. )

" भाष्ये तु—आविर्भावस्तिरोभावः स्थितिश्चेत्यनपायिनः । धर्मा मूर्तिषु सर्वासु लिङ्गत्वेनानुदर्शिताः ॥ आविर्भाव उपचयः पुंस्त्वम्, तिरोभावोपचयः स्त्रीत्वम्, अन्तरालावस्था स्थितिर्नपुंसकत्वमित्यर्थः । कस्य पुनराविर्भावादिकं लिङ्गम् । सत्त्वरजस्तमसां गुणानां तत्परिणामरूपाणां च तदात्मकानां शब्दस्पर्शरूपरसगन्धानाम् । शब्दादिसङ्घातरूपाश्च सर्वा मूर्तयः प्रतिक्षणपरिणामस्वभावाश्च सत्त्वादयो गुणा न स्वस्मिन्नात्मनि मुहूर्तमपि अवतिष्ठन्ते एवं शब्दादय आकाशादयो घटादयश्च । उक्तं च—' सर्वमूर्त्यात्मभूतानां शब्दादीनां गणे गणे । त्रयः सत्त्वादिधर्मास्ते सर्वत्र समवस्थिताः ' इति । ' क्वथितोदकवच्चैषामनवस्थितवृत्तिता । अजस्रं सर्वभावानां भाष्य एवोपवर्णिता ' इति च । तथा ' रूपस्य चात्ममात्राणां शुक्लादीनां प्रतिक्षणम् । काचित्प्रलीयते काचित्कथंचिदभिवर्धते ' इति । ' प्रवृत्तिमन्तः सर्वे हि तिसृभिश्च प्रवृत्तिभिः । सततं न वियुज्यन्ते वाचश्चैवात्र संभवः ' इति च । टाबाद्यन्तः शब्द एवैता अवस्था गोचरयतीत्यर्थः ॥" ( पदमञ्जरी उत्तरार्ध, पृष्ठें १४, १५ पहा. )

" सत्त्वादीनामाविर्भावादिरूपः प्रवृत्तिशब्दवाच्यो नित्यः परिणामः इत्यर्थः । पुरुषो यद्यप्यपरिणामी तथापि भोक्तृत्वात् तद्धर्मापन्न इव भवति । तदुक्तं हरिणा प्रवृत्तिरिति सामान्यं लक्षणं तस्य कल्प्यते । आविर्भावस्तिरोभावः स्थितिश्चेत्यथ भिद्यते ॥ प्रवृत्तिमन्तः सर्वेऽर्थाः तिसृभिश्च प्रवृत्तिभिः । सततं न वियुज्यन्ते वाचश्चैवात्र संभवः ॥" ( महाभाष्यप्रदीप पा. सू. ४।१।३ व त्यावरील उद्द्योत पहा ).

ताही पक्ष घेण्यास हरकत नाहीं असें जरी भाष्यकारांनीं सुचविलें असलें तरी 'स्त्रियाम्' हा शब्द 'प्रातिपदिकात्' या अनुवृत्तीनें आलेल्या शब्दाचें विशेषण असल्यामुळें स्त्री या अर्थानें युक्त जें प्रातिपदिक त्याहून टाप् ङीप् इत्यादि प्रत्यय होतात हा सिद्धान्तपक्ष म्हणून भाष्यकारांनीं दिला आहे; व असा अर्थ घेतला असतां स्त्री या अर्थाचा प्रातिपदिकांतच समावेश होत असल्यामुळें टाप् ङीप् इत्यादि प्रत्यय स्वार्थी म्हणजे प्रातिपदिकाच्या अर्थी होतात असा निष्कर्ष काढला आहे. यानंतर 'अजाद्यतष्टाप्'......'डाबुभाभ्यामन्यतरस्याम्' (सू. ४–१३) या सूत्रांमध्यें अज वगैरे जातिवाचक शब्द व अकारान्त प्रातिपदिकें यांहून टाप् प्रत्यय, तसेंच उ ऋ किंवा ऌ ज्यांचा इत् आहे असे प्रत्यय लावलेले जे शब्द, त्याप्रमाणेंच ऋकारान्त व नकारान्त शब्द, हे जर स्त्रीवाचक असतील तर त्यांहून ङीप् प्रत्यय होतो असें सांगितलें आहे. स्वसृ, मातृ, यातृ, दुहितृ व ननान्दृ हे पांच ऋकारान्त शब्द व पञ्चन् सप्तन् अष्टन् वगैरे संख्यावाचक शब्द अपवाद म्हणून दिले आहेत. स्वसृ दुहितृ वगैरे शब्द हे अमुकाची स्त्री किंवा अमक्याची बायको या संबंधानें युक्त नसतात, तसेंच पञ्चन् सप्तन् वगैरे शब्द हे ज्यांची संख्या अभिप्रेत असते त्या व्यक्ती अत्यंत गौण रीतीनें दाखवितात, मुख्यार्थानें ते संख्याच दाखवितात हीं या ठिकाणीं स्त्रीप्रत्यय न होण्याचीं कारणें असावीं. वर (सू ४–१३) मध्यें दिलेले टाप् व ङीप् प्रत्यय ज्या स्त्रीत्व अर्थ असलेल्या प्रातिपदिकांना लागतात त्या प्रातिपदिकांहून किंवा तीं प्रातिपदिकें शेवटीं असलेल्या शब्दांहून स्त्रीत्वविवक्षा असतांना ते प्रत्यय झालेच पाहिजेत; मग तीं प्रातिपदिकें गौण असोत किंवा प्रधान असोत.

**२५२. स्त्रीप्रत्ययाह्निक–२ (अध्याय ४ पा. १ आन्हिक २) स्त्रीत्व अर्थाचें प्रतिपादन.**

पहिल्या आन्हिकामध्यें विशिष्ट शब्दांचे पुढें स्त्रीत्वविवक्षा असतांना सर्वदा आढळून येणारे स्त्रीप्रत्यय दिले आहेत; या आन्हिकामध्यें सांगितलेले स्त्रीप्रत्यय ज्या प्रातिपदिकांहून सांगितले आहेत तीं प्रातिपदिकें दुसऱ्या प्रातिपदिकांना उपसर्जन नसतांनाच होतात. साधारणपणें स्त्रीप्रत्यय हे अमुकाची किंवा अमुक जातीची स्त्री या अर्थी होतात; पण कांहीं वेळां अमुकाची बायको या विवक्षित अर्थींच ते होतात. 'टिड्ढाणञ्०'......'कौरव्य०' (१५–१९) या सूत्रांमध्यें कांहीं विवक्षित प्रत्यय लागून तयार झालेल्या प्रातिपदिकांना स्त्रीत्वविवक्षा असतांना ङीप् प्रत्यय सांगितला आहे. जे कृत् अथवा तद्धित प्रत्यय लाविले असतां तयार झालेले कृदन्त अथवा तद्धितान्त शब्द स्त्रीलिंगामध्यें ईकारान्त दिसतात त्या सर्व प्रत्ययांना ट् हा इत् वर्ण सूत्रकारांनीं जोडला आहे. गोत्रप्रत्यय यञ् शेवटीं असलेल्या गार्ग्य वगैरे शब्दांना ङी हा स्त्रीप्रत्यय लागतो पण त्याच्या पूर्वी पौर्वात्य वैयाकरणांच्या मतानें 'ष्फ' म्हणजे आयन हा आणखी एक स्त्रीप्रत्यय लागतो व गार्ग्यायणी वगैरे रूपें होतात असें 'यञश्च'...'कौरव्य०' (१६–१९) या सूत्रांमध्यें सांगितलें आहे; व भाष्यकारांनीं उदाहरणें देऊन तें स्पष्ट केलें आहे. येथील विवेचनावरून सूत्रकार वार्तिककार व भाष्यकार यांचे वेळीं संस्कृत भाषा व्यवहारांत चांगलीच प्रचलित होती असें दिसून येतें. ष्फ या स्त्रीलिंगद्योतक प्रत्ययाला तद्धित संज्ञा सूत्रकारांनीं दिली आहे म्हणून ष्फ म्हणजे आयन शेवटीं असलेल्या शब्दाला प्रातिपदिक म्हणतां येतें व स्त्रीत्वविवक्षा असल्यामुळें त्याहून 'षिद्गौरादिभ्यश्च' (सू. ४१) या सूत्रानें आणखी एक स्त्रीप्रत्यय (ङीष्) होतो व गार्ग्यायणी वगैरे रूपें सिद्ध होतात. स्त्रीत्व या गुणाला लिंग व वचन संभवत नसल्यामुळें स्त्रीप्रत्ययान्त शब्दाला लिंगवचनप्रत्यय लागणार नाहींत अशी भाष्यकारांनीं येथें शंका उपस्थित केली आहे व गुण हा ज्या द्रव्यावर

राहतो त्या द्रव्याचें लिंग व वचन त्या गुणवाचक शब्दाचे बाबतींत समजलें जातें, इतकेंच नव्हे, तर चिकीर्षा जिहीर्षा वगैरे शब्दांमध्यें 'अ' या प्रत्ययानें प्रतिपादित जो भाव तो जसा निराळा न राहतां द्रव्यामध्यें अन्तर्भूत होतो त्याप्रमाणें स्त्रीत्व हा भावसुद्धां द्रव्यासारखा होतो. द्रव्य हें अनेक गुणांचा समूह असल्यामुळें एका शब्दामध्यें दोन स्त्रीप्रत्यय होण्यास कांहींही हरकत नाहीं, तसेंच भाववाचक कृदन्त शब्दांना प्रातिपदिक म्हणण्यासही कांहीं हरकत नाहीं असें येथें भाष्यकारांनीं स्पष्ट प्रतिपादन केलें आहे.

## २५३. अनुपसर्जन प्रातिपदिकाहून होणारे स्त्रीप्रत्यय.

'वयसि प्रथमे' ( सू २० ) या सूत्रानें वार्धक्याशिवाय अन्य वय ज्या शब्दापासून समजतें त्या कुमार वगैरे शब्दांहून ङीप् प्रत्यय सांगितला आहे. 'केवलमामक'...'अन्तर्वत्०' ( ३०–३२ ) या सूत्रांमध्यें केवल, मामक वगैरे शब्दांहून ङीप् प्रत्यय सांगितला आहे. तसेंच गर्भिणी याच अर्थी 'अन्तर्वत्नी' व भर्तृयुक्त याच अर्थी 'पतिवत्नी' शब्द नुक् आगमासहित ङीप् प्रत्यय लागून तयार होतात असें म्हटलें आहे. पत्नी हा शब्द यज्ञ करणाऱ्याची बायको या अर्थींच वापरावा असें जरी सूत्रकार सांगत असले तरी 'यज्ञ' या शब्दानें स्मार्तयज्ञरूप ऐश्वर्याचा बोध होत असल्यामुळें गृहस्थाश्रमी मनुष्याची बायको या अर्थीं पत्नी हा शब्द वापरण्यांत येतो असें भाष्यकारांनीं सांगून पत्नी या शब्दाच्या उपयोगाबाबत कालान्तरानें पडलेला फरक निदर्शनास आणिला आहे. 'षिद्गौरादिभ्यश्च' (सू. ४१) या सूत्रानें ज्यांचा षकार इत्संज्ञक आहे असे प्रत्यय शेवटीं असलेले जे नर्तक वगैरे शब्द त्यांना, तसेच गौर, मत्स्य, मनुष्य, हय, गवय, हरिण, नट इत्यादि शंभरांपेक्षां ज्यास्त शब्दांना स्त्रीलिंगविवक्षा असतांना ङीष् प्रत्यय सांगितला आहे. 'वोतो गुणवचनात्' (सू. ४४) या सूत्रानें गुणवाचक उकारान्त गुरु लघु पटु मृदु वगैरे शब्दांहून ङीष् प्रत्यय विकल्पानें सांगितला आहे. भाष्यकारांनीं या ठिकाणीं गुण शब्दाची व्याख्या देणारे निरनिराळ्या मतांच्या वैयाकरणांचे दोन श्लोक दिले आहेत व त्यांमध्यें द्रव्याला धरून असणारा, निरनिराळ्या जातींच्या द्रव्यांवर आढळून येणारा, द्रव्यावरून नाहींसा होणारा व द्रव्यावर उत्पन्न होणारा सर्व लिंगांचा वाचक व द्रव्यापेक्षां निराळा असा जो धर्म तो गुण अशी गुण या शब्दाची व्याख्या दिली आहे. 'पुंयोगादाख्यायाम्' (सू. ४८) या सूत्रांत स्त्रीधर्मयुक्त किंवा स्त्रीजातियुक्त या साधारण अर्थीं नव्हे, तर ( अमुकाची ) बायको या अर्थीं ङीष् प्रत्यय सांगितला आहे. या ङीष् प्रत्ययाला गोपालक वगैरे कांहीं शब्द भाष्यकारांनीं अपवाद म्हणून दिले आहेत. या ठिकाणीं अमुकाची स्त्री असा विवक्षित अर्थ असल्यामुळें 'तस्येदम्' (४।३।१२०) या सूत्रानें 'त्याचा' या अर्थीं प्रष्ठ (पुढारी), प्रचर (पांथस्थ) इत्यादि शब्दांहून अण् प्रत्यय होऊन नंतर स्त्री या अर्थीं ङीप् होऊन प्राष्ठी प्राचरी वगैरे रूपें होतील व प्रष्ठी प्रचरी इत्यादि इष्ट रूपें साधण्याकरितां तद्धित प्रत्ययाचा लुक् सांगावा लागेल अशी शंका उपस्थित करून प्रस्तुत सूत्रानें स्त्री या अर्थीं मुद्दाम स्त्रीप्रत्यय सांगितल्यामुळें तद्धित प्रत्यय न होतां 'त्याची स्त्री' एवढ्या अर्थी स्त्रीप्रत्यय होण्यास कांहीं हरकत नाहीं असें वार्तिककारांनीं उत्तर दिलें आहे. शिवाय, भर्त्याला पुढारी या अर्थानें लावलेला प्रष्ठ हा शब्द लक्षणेनें त्याच्या स्त्रीलाही लावतां येईल; पण प्रष्ठ हा शब्द लक्षणेनें प्रष्ठाची स्त्री या अर्थीं समजल्यास तो शब्द साधतेवेळींच स्त्रीत्वबोधक टाप् प्रत्यय लागून प्रष्ठा ( प्र+स्था+अ+आ ) असेंच रूप होईल अशी शंका आल्यास तिचें निवारण 'गति कारक व उपपद यांचा कृदन्ताशीं समास सुप् प्रत्यय लावण्यापूर्वींच होतो' असें परिभाषारूप वचन सांगून वार्तिककारांनीं केलें आहे व या वचनाचीं प्रयोजनेंही दिलीं आहेत.

## २५४. गुण व जाति या शब्दांच्या व्याख्या.

'इन्द्रवरुण०' (सू. ४९) या सूत्रांत इन्द्र वरुण भव शर्व रुद्र मृड मातुल आणि आचार्य या शब्दांहून 'त्यांची स्त्री' या अर्थी, व हिम अरण्य यव यवन या शब्दांहून स्त्रीत्वविवक्षा असतांना, ङीप् प्रत्यय होतो व त्या शब्दांना आन् (आनुक्) असा आगम पुढें लागतो. 'इन्द्राणां इयम्', 'वरुणानां इयम्' अशा रीतीनें मानार्थी बहुवचनान्त इन्द्राणाम् व वरुणानाम् यांच्या पुढें इयम् शब्द आल्यावर इन्द्राणीय् वरुणानीय् यांसारखा विशिष्ट संधी होऊन व यकाराचा लोप होऊन इन्द्राणी व वरुणानी शब्द मूळ प्रचारांत आले असावे. याच रीतीनें 'प्राचां ष्फ तद्धितः' (सू. १७) 'उदीचां वृद्धादगोत्रात्' (सू. १५७) 'प्राचामवृद्धात् फिन् बहुलम्' (सू. १६०) या सूत्रांनीं साधलेले गार्ग्यायणी, आम्रगुप्तायनि, ग्लुचुकायनि वगैरे शब्दही मूळच्या षष्ठीबहुवचनाच्या पुढें 'त्याचा' या अर्थी असलेला इय प्रत्यय ठेविल्यावर संधि व वर्णव्यत्यय होऊन झाले असावे व अशा शब्दांचा प्रचार पाणिनि व पतञ्जलि यांच्या तक्षशिला देशाच्या बाहेर पूर्वेकडील प्रांतांत प्रामुख्यानें झालेला असावा. 'स्वाङ्गाच्चोपसर्जनाद्०'...'दीर्घजिह्वी च छन्दसि' (सू. ५४–५९) या सूत्रांमध्यें प्राण्यंग-वाचक शब्द शेवटीं असलेल्या प्रातिपदिकाहून विकल्पानें ङीष् प्रत्यय सांगितला आहे व त्याला कांहीं अपवादही दिले आहेत. 'जातेरस्त्रीविषयात्०' (सू. ६३) या सूत्रानें नित्यस्त्रीलिंगी नसणाऱ्या व ज्याच्या उपधेला यकार नाहीं अशा जातिवाचक शब्दाहून स्त्रीत्वविवक्षा असतांना ङीष् प्रत्यय सांगितला आहे. येथें भाष्यकारांनीं थोडा फार फरक असलेल्या निर-निराळ्या वैयाकरणांनीं दिलेल्या जाति शब्दाच्या दोन व्याख्या देऊन 'विशेष प्रकारच्या आकारामुळें समजला जाणारा, एकदां सांगितला असतां इतर ठिकाणीं समजण्याजोगा व ज्याचा वाचक शब्द गुणवाचक शब्दासारखा सर्वलिंगी नसतो अशा धर्माला जाति म्हणतात; तसेंच, गोत्रवाचक व चरणवाचक शब्दही जातिशब्द समजावे' अशा अर्थाची पहिली व्याख्याच भाष्यकारांनीं ज्यास्त पसंत केलेली दिसते. भाष्यकारांनीं येथें केलेलें विवेचन पाहिल्यास एकंदरींत असें दिसून येईल कीं अमुक जातीची स्त्री (कुमारी अथवा प्रौढ स्त्री) अथवा अमक्याची मुलगी नात किंवा बायको किंवा अमक्याच्या कुटुंबातली किंवा विद्यावंशातली स्त्री अशा रीतीनें भाष्य-कारांचे वेळीं स्त्रियांचा उल्लेख करण्याचा प्रचार लोकांमध्यें असला पाहिजे; व म्हणूनच गोत्र व चरण यांचा जातीच्या लक्षणामध्यें अंतर्भाव केलेला दिसतो. 'अणिञोरनार्षयो:०' (सू. ७८) या सूत्रानें अपत्य या अर्थाचे जे अण् व इञ् हे सामान्य प्रत्यय त्यांचे जागीं स्त्रीत्वविवक्षा असतांना ष्यङ् हा तद्धित प्रत्यय सांगितला आहे. या सूत्राचें विवेचन भाष्यकारांनीं पूर्वपक्षोत्त-रपक्षरूप कारिका देऊन केलें आहे.

## २५५. प्राग्दीव्यतीयतद्धितप्रत्ययान्हिक (अ. ४ पा. १ आन्हिक ३). प्राग्दीव्यतीय सामान्य अर्थी तद्धितप्रत्यय.

पाणिनीनें चौथ्या व पांचव्या अध्यायांमध्यें प्रातिपदिकांना लागणाऱ्या स्त्रीप्रत्ययांविषयीं व तद्धितप्रत्ययांविषयीं विचार केला आहे. 'समर्थानां प्रथमाद्वा' (सू. ८२) या सूत्रानें तद्धित प्रत्यय होण्यासाठीं पद समर्थ असलें पाहिजे अशी अट घातली आहे. 'समर्थः पदविधिः' (२।१।१) या सूत्रानें सांगितलेलें सामर्थ्य ज्याला तद्धित प्रत्यय लागतो त्या प्रातिपदिकांत असतेंच, तें पुन्हां सांगण्याची जरूर नाहीं; तेव्हां प्रस्तुत सूत्रांतील समर्थ शब्दाचा अर्थ संधिकार्यें वगैरे करून तयार झालेला सूत्थित, वीक्षमाण यांसारखा शब्द असा घ्यावा

असें येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. 'प्राग्दीव्यतोण्' (सू. ८३) या सूत्रानें या तद्धितप्रकरणामध्यें 'तेन दीव्यति' या सूत्रापर्यंत जेथें नुसता अर्थ सांगितला असेल व प्रत्यय सांगितला नसेल तेथें अण् या सामान्य प्रत्ययाचा विधि समजावा असें सांगितलें आहे. 'दीव्यत्' हा शब्द 'दीव्यति' याकरितां सूत्रकारांनीं घातला आहे; त्यावरून 'एकदेशविकृतमनन्यवत्' ही परिभाषा सूचित होते असें येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. 'दित्यदित्यादित्य०'......'स्त्रीपुंसाभ्यां' (सू. ८५-८७) या सूत्रांनीं ण्य, अञ्, नञ् व स्नञ् हे प्रत्यय विशिष्ट शब्दाहून अण् प्रत्ययाचे अपवाद म्हणून सांगितले आहेत. 'द्विगोर्लुगनपत्ये' या सूत्रानें, 'पुढें होणारा तद्धितप्रत्यय निमित्त असतांना 'तद्धितार्थोत्तरपद०' या सूत्रानें सांगितलेला द्विगु समास झाला असेल व तो प्रत्यय अपत्य अर्थाशिवाय इतर अर्थीं असेल व त्याचा स्वरानें आरंभ होणारा असेल तर त्याचा लुक् करावा' असें सांगितलें आहे. प्रत्ययाचा लुक् झाल्यामुळें त्या प्रत्ययामुळें मागें होणारी वृद्धि वगैरे आदेशही होत नाहींत; म्हणून पञ्चकपालः (पञ्चसु कपालेषु संस्कृतः) येथें आदि अकाराला वृद्धि झालेली दिसत नाहीं. भाष्यकारांनीं येथें तद्धितप्रत्ययान्त एकटाच पञ्चकपालः असा शब्द होतो; त्याचें विग्रहवाक्य मात्र 'पञ्चसु कपालेषु संस्कृतः' असें असूं शकतें; तसेंच 'पञ्चकपाले संस्कृतः अथवा पञ्चकपाल्यां संस्कृतः' असेंही पण असूं शकतें असें म्हटलें आहे व असें होण्याला अविरविकन्याय समर्थक दृष्टान्त म्हणून दिला आहे. अवेः मांसम्, तसेंच अविकस्य मांसम् या दोन्ही विग्रहवाक्यांनीं दाखविलेली 'आविकम्' ही एकच तद्धितवृत्ति होते, 'आवम्' असा शब्दप्रयोग कधींही होत नाहीं. गोत्रेऽलुगचि (सू. ८९) यानें गोत्रप्रत्ययान्तांहून अजादि प्राग्दीव्यतीय प्रत्यय करावयाचा असेल तर गोत्रापत्य अर्थीं सांगितलेल्या तद्धित प्रत्ययाचा बहुत्वविवक्षा असतांना होणारा लुक् करूं नये असें सांगितलें आहे. भाष्यकारांनीं या सूत्राचें विवेचन श्लोकवार्तिकें उद्धृत करून त्यांचें विवरण करून खुलासेवार केलें आहे व प्रचलित प्रयोगांकडे लक्ष देऊन अत्रिभरद्वाजिका, वसिष्ठकश्यपिका, भृग्वङ्गिरसिका, कुत्सकुशिकिका हे प्रयोग साधले आहेत. त्याप्रमाणेंच 'यूनि लुक्' (सू. ९०) या सूत्रानें सांगितलेल्या युवप्रत्ययाच्या लुकाविषयींही विद्वत्तापूर्ण विवेचन केलें आहे. 'तस्यापत्यम्' (सू. ९२) या सूत्रानें अपत्यार्थक सामान्यरीत्या अण् प्रत्ययाचें, व 'एको गोत्रे' या सूत्रानें गोत्रापत्य या अर्थीं एकच प्रत्यय करावा, अपत्याचें अपत्य असा अर्थ असला तरी दोन करूं नये अशा रीतीनें अपत्यार्थक प्रत्ययांचें,विधान केलें असलें तरी हीं सूत्रें भाष्यकारांनीं याच आन्हिकांत घेतलीं आहेत. वास्तविक पाहतां अपत्यप्रत्यय, गोत्रप्रत्यय व युवप्रत्यय यांचें विवेचन पुढील आन्हिकांत केलें आहे त्याबरोबरच त्यापूर्वी या दोन सूत्रांचें विवेचन करणें ज्यास्त स्वाभाविक झालें असतें. कदाचित् अपत्य व गोत्रापत्य यांच्या अर्थाचें विवेचन या आन्हिकांत करून त्या अर्थीं होणारे विशिष्ट प्रत्ययच पुढील आन्हिकांत घेणें हें त्यांना ज्यास्त प्रशस्त वाटलें असावें. 'तस्येदम्' या अर्थाच्या सामान्य अण् प्रत्ययानें काम भागत असतां 'तस्यापत्यम्' हे निराळें सूत्र कां केलें याचें विवेचन पूर्व वैयाकरणांचें 'तस्येदमित्यपत्येपि०' हें श्लोकवार्तिक उद्धृत करून भाष्यकारांनीं केलें आहे व अपत्य ही संज्ञा मुलाला एकट्याला द्यावी किंवा मुलगा नातू पणतू या सर्वांना द्यावी याचेंही मार्मिक विवेचन केलें आहे. जरी हे अपत्यप्रत्यय संज्ञाकारीचा म्हणजे मूळपुरुषाचा वाचक जो शब्द त्याहूनच होत असले तरी ते क्वचित् जातिशब्द, सर्वनामशब्द, यांहूनही होतात असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे व असे प्रत्यय जेथें झाले आहेत तीं उदाहरणें दाखविण्याकरितां 'कुतश्चरति मायूरिः केन कापिञ्जलिः कृशः। आहेयेन च दष्टस्य पाञ्चिः सुतसमो मतः' ही जुनी कारिका उद्धृत केली आहे.

## २५६. अपत्यप्रत्ययान्हिक ( अ. ४ पा. १ आन्हिक ४ ). 'अपत्य' संज्ञेचा अर्थ.

अपत्य शब्दाचा प्रत्यक्ष अपत्य ( मुलगा अथवा मुलगी ) असा नियंत्रित अर्थ न घेतां मुलगा नातू पणतू वगैरे कितवाही वंशज घ्यावयाचा, पण गोत्र शब्द अपत्याचें विशेषण असल्यास मुलगा व मुलगी वगळून बाकीचे सर्व पुढील वंशज घ्यावयाचे अशा रीतीनें अपत्य व गोत्रापत्य शब्दांचे व्याकरणशास्त्रांतील पारिभाषिक अर्थ भाष्यकारांनीं स्पष्ट केले आहेत. विवाहापूर्वी कन्या ही पितृवंशांतील अपत्य म्हणून समजली जाते; व त्याप्रमाणेंच अपत्यप्रत्यय अथवा गोत्रापत्यप्रत्यय लागून तद्वाचक गार्गी, दाक्षी यांसारखे शब्द वापरण्यांत येतात; पण विवाहानंतर तिचा पितृवंशाला अनुलक्षून गोत्रप्रत्ययान्त शब्दानें उल्लेख करून 'तिचें स्त्री–अपत्य' या अर्थी 'गोत्रस्त्रियाः कुत्सने ण च' (सू. ४।१।१४७) या सूत्रानें 'ण' प्रत्यय लागून गार्गा दाक्षा वगैरे रूपें होतात किंवा नाहीं याविषयीं भाष्यकारांनीं येथें प्रश्न उपस्थित केला आहे; व मातृवंश व पितृवंश दोन्ही मानण्यांत येत असल्यामुळें गोत्रप्रत्ययान्त गार्गी शब्दाहून पुढें 'अपत्य स्त्री' या अर्थी प्रत्यय होण्यास 'गोत्राद्यूनि अस्त्रियाम्' ( सू. ४।१।९४ ) या सूत्रांतील अस्त्रियाम् हा शब्द आड येतो व त्यामुळें गार्गा असा प्रयोगच होत नाहीं असें 'अपर आह' या शब्दांनीं आपलें स्वतःचें मत दिलें आहे. मातृवंशाला अनुलक्षून प्रत्यय होत नसतात असें मानिल्यास गार्गा हा प्रयोगच होणार नाहीं; गार्गीपुत्री प्रयोग होईल. भाष्यकारांचे वेळीं बहुधा गोत्रप्रत्ययान्त स्त्रीवाचक शब्दांचे पुढें पुत्र किंवा कन्या शब्द जोडूनच दाक्षिपुत्र इत्यादि शब्द उपयोगांत येत असावे. या अपत्यप्रत्ययांचे बाबतींत फिञ् फिन्, ष्फञ् इत्यादि प्रत्ययांचा विप्रतिषेधानें विधि कात्यायनानें सांगितला आहे; त्यावरून पूर्वेकडील देशांत हे प्रत्यय प्रामुख्यानें उपयोगांत येत असत असें दिसतें. प्रथमतः ऋषितुल्य बापाच्या नांवावरून मुलाचें नांव पडे व त्यानंतर तें नांव उपनामासारखें होऊन वंशजाला दिलें जाई; वंशामध्यें बापलेक, चुलतेपुतणे, भाऊभाऊ या नात्याचे, किंवा कोणीही अत्यंत जवळचे दोन वंशज, उल्लेख करण्याइतके प्रसिद्ध समकालीन झाल्यास धाकट्याचा उल्लेख गोत्रप्रत्ययान्ताला आणखी एक प्रत्यय लावून केला जाई. पाणिनीनें या प्रत्ययाला युवसंज्ञा दिली आहे. उत्तरेकडील मूळ प्रदेशांत वैदिक वाङ्मयास अनुसरून मोठ्याही व्यक्तींचा देवांच्या नांवांप्रमाणेंच एकवचनानें उल्लेख होत असे व त्यामुळें गोत्रप्रत्ययान्त नांवाच्या शेवटीं य किंवा इ येत असे; पण पूर्वेकडील देशांमध्ये सन्मानवाचक बहुवचनानें उल्लेख होत असल्यामुळें गोत्रप्रत्ययान्त नांवें साधारणतः आयन किंवा आयनि शेवटीं असलेलीं दिलीं जात. 'अत इञ्', 'शिवादिभ्योण्' इत्यादि सूत्रांनीं सांगितलेले अपत्यवाचक इ व अ हे प्रत्यय मूळचे षष्ठीसंबंधबोधक प्रत्ययच असावे. प्राकृत भाषांमध्यें स्त्रीलिंगी नामांनंतर षष्ठीच्या एकवचनाचे प्रत्यय म्हणून त्यांचे प्रयोग आढळतात. 'गर्गादिभ्यो यञ्' यानें गोत्र या अर्थी सांगितलेला यञ् हा प्रत्यय इ आणि अ प्रत्यय मिळून झालेला असावा असें दिसतें.

## २५७. अपत्यवाचक प्रत्यय.

स्त्रीप्रत्ययान्त नांवांच्या पुढें साधारणतः ढक् ( एय ) प्रत्यय लागून दात्तेय, गाङ्गेय अशीं रूपें प्रचारांत असत; पण बहुशः गोत्रनांवानेंच उल्लेख करण्याची प्रथा असे. गोत्रनांव हें बरोबरीच्या अनेक वंशजांना समानच असल्यामुळें इतर वंशजांपासून भेद दाखविण्याकरितां कधीं कधीं मातेच्या नांवापुढें पुत्र सुत इत्यादि शब्द जोडून दाक्षीपुत्र, सत्यवतीसुत वगैरे प्रयोग

केले जात असत. बाप फार प्रसिद्ध नसल्यास किंवा ऋषितुल्य मूळ पुरुषावरून गोत्रनांव पडलेंच नसल्यास आईच्या नांवापुढें ढक् द्रक् वगैरे प्रत्यय जोडून संज्ञा दिल्या जात असत. 'सुधातुरकङ् च' ( सू. ९७ ) या सूत्रानें सांगितलेला अकङ् आदेश व त्याप्रमाणेंच आर एर वगैरे प्रत्ययांतील र किंवा ल हा हीनतेचा किंवा लहानपणाचा निदर्शक म्हणून समजला जात असे. भ्रातृव्य वगैरे शब्दांतील व्य या प्रत्ययांतील वि हा विरोधदर्शक भाग असल्यामुळें साधारणतः संपत्तीमुळें भावाभावांचे किंवा चुलत्यापुतण्यांचे संबंध चांगले नसल्यासच भ्रातृव्य व पितृव्य शब्दांचे प्रयोग होत असत; नाहींतर भ्रातुष्पुत्र, भ्रातृसुत, ज्येष्ठपिता, चुल्लपिता, कनिष्ठपिता असे प्रयोग होत असत. पाणिनीनें 'गोत्रे कुञ्जादिभ्यश्च्फञ्'......'वतण्डाच्च' (सू. ९८-१११) व त्यानंतर ' शिवादिभ्योण् ' .....' रेवत्यादिभ्यष्ठक् ' ( सू ११२-१४६ ) या सूत्रांनीं पुरुषवाचक व स्त्रीवाचक शब्दांहून अपत्यार्थी प्रत्यय सांगितले आहेत. त्यानंतर 'गोत्रस्त्रियाः कुत्सने ण च'......'फाण्टाहृति०,' (सू. १४७-१५०) या चार सूत्रांनीं गोत्रप्रत्ययवाचक नांवाहून ण वगैरे प्रत्यय सांगून पुढील सूत्रांनीं सू. १५१-१६१ सामान्य अपत्यार्थवाचक प्रत्यय सांगितले आहेत. त्यानंतर 'गोत्र' व 'युवन्' शब्दांची शास्त्रीय व्याख्या ' अपत्यं पौत्रप्रभृति गोत्रम्' ......'यूनश्च कुत्सायाम्' (सू. १६२-१६७) या सूत्रांमध्यें देऊन त्यानंतर'जनपदशब्दात्०', ......'साल्वावयव०'(सू १६८ १७३) या सूत्रांनीं देशावरून पडलेल्या क्षत्रियवाचक शब्दाहून अपत्यार्थी अञ् वगैरे तद्राजसंज्ञक प्रत्यय सांगून सूत्रकारांनीं अपत्यप्रत्ययप्रकरण पुरें केलें आहे. भाष्यकारांनीं अपत्यप्रत्ययान्त, गोत्रप्रत्ययान्त व युवप्रत्ययान्त शब्दांचीं त्या वेळीं प्रचलित असलेलीं अनेक उदाहरणें देऊन विद्वत्तापूर्ण विवेचन केलें आहे व दोन प्रत्यय एकाच उदाहरणामध्यें प्राप्त झाल्यास भाषेंतील प्रयोगांकडे लक्ष देऊन निर्णय दिला आहे. भाष्यकारांनीं दिलेल्या अनेक उदाहरणांचें सूक्ष्म अवलोकन करून त्या वेळच्या पूर्वेकडील व उत्तरेकडील देशामध्यें व्यक्तींचा कसा उल्लेख केला जात असे याविषयीं अभ्यास करणें मनोरंजक आहे.

**२५८. रक्ताद्यर्थकप्रत्ययान्हिक ( अ. ४ पा. २ आन्हिक १ ). रक्त, समूह, अध्येतृ वगैरे अर्थी प्रत्यय.**

चौथ्या अध्यायाच्या पाहिल्या पादामध्यें अपत्यप्रत्यय सांगून झाल्यानंतर पाणिनीनें राहिलेल्या तीन पादांमध्यें व पांचव्या अध्यायाच्या पहिल्या दोन पादांमध्यें व्यक्तिवाचक शब्दाहून व्यक्तीशीं विशिष्ट प्रकारांनीं संबद्ध वस्तू या अर्थी, तसेंच वस्तुवाचक शब्दांहून त्यांच्याशीं निरनिराळ्या प्रकारानीं संबद्ध व्यक्ती या अर्थी प्रत्यय सांगितले आहेत. या प्रत्ययांचें व भाष्यकारांनीं केलेल्या विवेचनाचें सूक्ष्म अवलोकन केल्यास भाष्यकारांच्या वेळच्या समाजस्थितीचें यथार्थ वर्णन देतां येणें शक्य आहे. प्रथमत पहिल्या दोन सूत्रांमध्यें निरनिराळे रंग या अर्थी असलेल्या शब्दांहून त्या रंगांनीं रंगविलेलें वस्त्र वगैरे या अर्थी अण् ठञ् वगैरे प्रत्यय दिले आहेत. वार्तिककारांनीं शकल, कर्दम, नीली, पीत वगैरे विशिष्ट शब्दांहून ठक्, अन्, कन् इत्यादि प्रत्यय सांगितले आहेत त्यांपैकीं शकल व कर्दम शब्द 'लाक्षारोचनाट्ठक्' (सू २ ) या भाष्यकारांनीं दिलेल्या सूत्रांत समाविष्ट होऊन ' लाक्षारोचनाशकलकर्दमाट्ठक् ' असें सूत्र हल्लीं म्हटलें जातें. ' नक्षत्रेण युक्तः कालः '... ' द्वन्द्वाच्छः ' ( सू ३-६) या सूत्रांवरील भाष्यकारांच्या विवेचनावरून नक्षत्रवाचक शब्दांहून कालवाचक शब्द त्या कालीं कसे उपयोगांत येत असत त्याची कल्पना येण्यासारखी आहे; त्याप्रमाणेंच ' दृष्टं साम '...... ' वामदेवाड्ड्यड्ड्यौ ' (सू. ७-९ )

या सूत्रांवरील विवेचनावरून प्रसिद्ध ऋषींनीं केलेल्या सामगायनाची व सामांच्या नांवांची यथायोग्य कल्पना येते. 'दृष्टं' या शब्दावरून पाणिनिकालीं निरनिराळे ऋषी साममंत्र रचीत नसत पण वेदमंत्रच यज्ञांचे वेळीं गानपद्धतीनें म्हणत असत असें स्पष्ट दिसतें. 'परिवृतो रथः'... 'क्षीराड्ढञ्' ( सू १०–२० ) या सूत्रांनीं पदार्थवाचक शब्दांहून त्यांनीं वेष्टिलेला ( रथ ), त्यांमधून काढून ठेवलेला, इत्यादि अर्थीं विशिष्ट प्रत्यय सांगितले आहेत. त्यानंतर पौर्णमासीवाचक शब्दांहून महिन्यांचीं नांवें तसेंच देवतावाचक शब्दांहून 'त्यांचा भक्त' या अर्थींचे शब्द २१–३५ सूत्रांमध्यें दिले आहेत. त्यानंतर समूहार्थी तसेंच राहण्याचा देश या अर्थीं अण्, वुञ् वगैरे प्रत्यय सांगितले आहेत 'खण्डिकादिभ्यश्च' ( सू. ४५ ) या सूत्राचें विवेचन करतांना 'धेनुरनञि कमुत्पादयति' हें आपिशलीचें सूत्र भाष्यकारांनीं उद्धृत केलें आहे; त्यावरून आपिशलीचें व्याकरण त्या कालीं उपलब्ध होतें हें स्पष्ट दिसतें. त्यानंतर क्रीडासाधन या अर्थी असलेल्या शब्दांहून क्रीडा या अर्थाचे शब्द सिद्ध केले आहेत व त्यानंतर 'तें अध्ययन करतो व जाणतो' या अर्थीं निरनिराळ्या ग्रंथवाचक शब्दांहून 'अध्ययन करणारा' या अर्थाचे शब्द साधिले आहेत. भाष्यकारांनीं येथें दिलेल्या अनेक उदाहरणांवरून त्यांचे वेळच्या आख्यायिका, इतिहास, पुराण इत्यादि निरनिराळ्या विषयांवरील ग्रंथसमृद्धीची व शिकविल्या जाणाऱ्या निरनिराळ्या अंगविद्या, क्षत्रविद्या इत्यादि विद्यांची कल्पना येते. 'सवार्तिकः', 'ससंग्रहः' या उदाहरणांमध्यें व्याडीच्या संग्रहग्रंथाचा व वार्तिकग्रंथाचा उल्लेख असावा असें दिसतें. 'छन्दोब्राह्मणानि०'(सू. ६६) या सूत्राच्या भाष्यकारांनीं केलेल्या विवेचनावरून व 'याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधः' या वार्तिकवचनावरून, ऋषिदृष्ट पुराण ब्राह्मणग्रंथ अपौरुषेय मानण्यांत आले असल्यामुळें कठाः वगैरे शब्द अध्ययन करणारे या अर्थींच उपयोगांत होते, व याज्ञवल्क्य सौलभ वगैरे शब्द त्यावेळीं त्या त्या ऋषींनीं रचिलेले ब्राह्मण ग्रंथ या अर्थीं प्रचलित होते; तसेंच कण्वादि गणांत घातले असल्यामुळें अण् प्रत्यय लागून साधलेले याज्ञवल्क, सौलभ वगैरे शब्द पाराशरिन्, काश्यपिन् यांसारखे अध्ययन करणारे या अर्थीं उपयोगांत होते असें स्पष्ट होतें. 'तदस्मिन्नस्तीति देशे०'...'अदूरभवश्च' ( सू. ६७–७० ) या चार सूत्रांत दिलेल्या 'तें जेथें आहे तें, त्यानें निर्माण केलेलें, त्याचें निवासभूत, त्याच्या जवळचें,' या चार अर्थीं होणारें प्रत्यय 'ओरञ्' ... 'नडादीनां कुक् च' ( सू. ७१–९१ ) या सूत्रांमध्यें सांगितले आहेत. या प्रत्ययांना चातुरर्थिक प्रत्यय असें मागाहून संबोधण्यांत आलें. सूत्रकारांनीं, वार्तिककारांनीं व भाष्यकारांनीं येथें केलेल्या खुलासेवार विवेचनाचा व त्यांनीं दिलेल्या अनेक स्थलांच्या नांवांचा सूक्ष्म विचार केल्यास हे तिघेही वैयाकरण विपाश् नदीच्या लगतच्या प्रदेशांत राहणारे होते—निदान तेथें त्यांनी अध्ययन केलेलें होतें—व त्यांचा त्या स्थलांशीं पूर्ण परिचय होता असें स्पष्ट दिसून येतें.

## २५९. शेषार्थप्रत्ययाह्निक (अ. ४ पा. २ आह्निक २) शैषिक प्रत्यय.

'शेषे' ( सू. ९२ ) या सूत्राचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं शेष अर्थ कोणते समजावयाचे व प्रस्तुत सूत्र कशाकरितां केलें आहे हें स्पष्ट केलें आहे. या प्रस्तुत सूत्रानंतर अधिकरण संपेपर्यंत व पुढील अधिकरणांतही 'विभाषा पूर्वाह्णापराह्णाभ्याम्' (४।३।२४) या सूत्रापर्यंत सूत्रकारांनीं विशिष्ट शब्दांहून विशिष्ट अर्थी होणारे शेषार्थक घ, ख, य, खञ्, ढकञ्, ढक्, त्यक्, त्यप्, अञ्, अण्, छ वगैरे अनेक प्रत्यय सांगितले आहेत; व त्यानंतर 'तत्र

जातः ' इत्यादि अर्थ एकामागून एक सांगितले आहेत; व अर्थ सांगतांना एखाद्या विशिष्ट अर्थींच होणारे प्रत्यय तो अर्थ सांगितल्यानंतर लागलींच सांगितले आहेत. या विशिष्ट शब्दांहून सांगितलेल्या विशिष्ट प्रत्ययांमध्यें नदी वगैरे शब्दांहून ढक् प्रत्यय सांगितला आहे (सू. ९७). या नदी वगैरे शब्दांमध्यें वाराणसी, अवन्ती, कौशाम्बी वगैरे त्या वेळच्या मोठ्या नगरींचा उल्लेख आहे. अव्ययसंज्ञक शब्दांहून त्यप् हा साधारण प्रत्यय सांगून ( सू. १०४ ) तत्रत्य, क्वत्य, अत्रत्य, अमात्य, इत्यादि शब्दांची सिद्धि केली आहे. 'अव्ययात्त्यप्' ( सू. १०४ या सूत्राचें विवेचन करतांना कांहीं ठिकाणीं निरनिराळे प्रत्यय सांगणारीं दोन कार्यें एकदम प्रवृत्त झालीं असतां त्या दोन प्रत्ययांपैकीं कोणता प्रत्यय करावा ही व्यवस्था वार्तिककारांनीं केली आहे; व तिचें स्पष्टीकरण करतांना भाष्यकारांनीं वाहीक देशामधील अनेक खेडेगांवांचा उल्लेख केला आहे. त्यांपैकीं त्या वेळच्या नांवांनीं आज प्रसिद्ध गांव नाहींच; परंतु, पातानप्रस्थ, नान्दीपुर, आरात्, कार्स्तीर, दासरूप्य, शाकल, सौसुक, इत्यादि नांवें लक्षांत घेण्याजोगीं आहेत.

## २६०. जाताद्यर्थप्रत्ययान्हिक ( अ. ४ पा. ३ आन्हिक १ ) जात वगैरे अर्थीं प्रत्यय.

या आन्हिकामध्यें 'शेषे' (सू.४।२।९२) या अधिकारसूत्रांत शेष या पदानें इष्ट असलेल्या जात, प्रायभव वगैरे अर्थांचें विवेचन प्रामुख्यानें केलें असल्यामुळें या आन्हिकाला जाताद्यर्थप्रत्ययान्हिक म्हणतां येईल. 'युष्मदस्मदोः०'...'तवकममकौ०' ( सू. १-३ ) या सूत्रांनीं युष्मद् व अस्मद् या शब्दांहून शेषार्थीं खञ् व छ प्रत्यय सांगितले आहेत. 'अर्धाद्यत्' सू. ४) पासून 'विभाषा पूर्वाह्णापराह्णाभ्याम्' ( सू. २४ ) या सूत्रांनीं विशिष्ट प्रकृतींहून शेषार्थीं यत्, ठक् वगैरे प्रत्यय सांगितले आहेत. 'तत्र जातः' ( सू. २५ ) या सूत्रानें 'तेथें झालेला' या अर्थीं कोणत्याही शब्दाहून सामान्यतः 'अण्' प्रत्यय सांगितला आहे. भाष्यकारांनीं या ठिकाणीं 'जातः' हा अर्थ सांगण्याचें प्रयोजन कोणतें हा विचार करून 'अर्थ सांगितले तरी लोकप्रयोगांना अनुसरून जरूर ते शब्द साधावे व लोकांमध्यें प्रयोग नसल्यास सूत्रानें जरी शब्द साधले गेले तरी ते अर्थाभिधान करण्यास अक्षम म्हणून स्वीकारूं नये' असें स्पष्ट सांगितलें आहे. 'प्रायभवः' (सू. ३९) या सूत्रानें 'बहुतेक तेथें असणारा' या अर्थीं अण प्रत्यय सांगितला आहे. भाष्यकारांनीं 'तत्र भवः' (सू. ५३) या सूत्रानें काम भागत असतां 'प्रायभवः' हें सूत्र कशाकरितां केलें तें सांगितलें आहे. 'अन्तःपूर्वपदाट्ठञ्' ( सू. ६० ) या सूत्रानें 'अन्तः' हा शब्द पूर्वपद असलेल्या सामासिक शब्दांहून ठञ् प्रत्यय सांगितला आहे; भाष्यकारांनीं येथें आध्यात्मिक, आधिदैविक, ऐहलौकिक परकीय, बाह्य, दैव्य, पाञ्चजन्य वगैरे शब्दांची सिद्धि करण्याकरितां 'समानस्य तदादेश्च' इत्यादि तीन श्लोकवार्तिकें उद्धृत केलीं आहेत. 'तस्य व्याख्यान इति०' ( सू. ६६ ) या सूत्रानें 'व्याख्यान करणारा ग्रंथ' या अर्थीं प्रतिपाद्यविषयकवाचक शब्दांहून सामान्यतः अण् प्रत्यय सांगितला आहे. भाष्यकारांनीं व्याख्यान शब्दाच्या या अर्थाचें उदाहरणें देऊन स्पष्टीकरण केलें आहे. 'अधिकृत्य कृते ग्रन्थे' ( सू. ८७) या सूत्रानें प्रतिपाद्यविषयवाचक शब्दांहून 'ग्रन्थ' या अर्थीं सामान्यतः अण् प्रत्यय सांगितला आहे; वार्तिककारांनीं आख्यायिकारूप ग्रंथ असल्यास प्रत्ययाचा लुक् सांगितला आहे; व भाष्यकारांनीं वासवदत्ता भैमरथी हीं उदाहरणें दिलीं आहेत. 'तेन प्रोक्तम्' (सू. १०१) या सूत्रानें 'प्रोक्त' या अर्थीं अण् प्रत्यय सामान्यतः सांगितला आहे; भाष्यकारांनीं प्रोक्त या अर्थाचें विवेचन करतांना वेद व त्यांचा अर्थ हे नित्य आहेत तरी पण अक्षरांची आनुपूर्वी अनित्य असल्यामुळें

वेदांचें प्रवचन होतें; व त्यामुळें काठकं, कालापकं, मौदकं, पैप्पलादकम् असे शब्दप्रयोग होतात असें सांगितलें आहे. कठ, कलाप वगैरे वेदशाखाप्रवर्तक ऋषींनीं अक्षरानुपूर्वी ठरविल्यामुळें त्यांनीं उच्चारलेल्या मंत्रसमूहाला काठकम्, कालापकम् वगैरे नांवें देण्यांत येतात; तसेंच प्रोक्त याचा ‘ पढविलेला ग्रंथ ’ असा अर्थ असल्यामुळें माथुरानें पढविलेल्या वृत्तीला ‘माथुरी’ वृत्ति ही संज्ञा दिली जाते असेंही भाष्यकारांनीं येथें सांगितलें आहे, व ‘ पढविलेला ’ हा अर्थ घेतल्यामुळें ‘ कृते ग्रन्थे ’ ( सू.१३६ ) हें सूत्र असूनही प्रस्तुत सूत्र कसें आवश्यक आहे तें दाखविलें आहे.

## २६१. विकाराद्यर्थकप्रत्ययान्हिक ( अ. ४ पा. ३ आन्हिक २ ). विकारार्थी प्रत्यय.

या आन्हिकांत प्रारंभीं ‘तस्य इदम्’ (त्याचें हें ) या अर्थीं जरी अण्, यत् वगैरे शेषार्थक प्रत्यय सांगितले असले तरी त्यानंतर शेषाधिकार पुरा करून ‘तस्य विकारः’ या सूत्रापासून विकारार्थक प्रत्यय प्रामुख्यानें सांगितले असल्यामुळें या आन्हिकाला विकाराद्यर्थकप्रत्ययान्हिक नांव देणें शक्य आहे. ‘ तस्येदम् ’ (सू. १२० ) या सूत्रानें ‘त्याचें हें’ असें मोघम सांगितलें असल्यामुळें वार्तिककारांनीं हें या सर्वनामानें कोणकोणते पदार्थ घेणें इष्ट आहे त्यांचें परिगणन केलें आहे ‘द्वन्द्वाद्वुन्०’ सू.१२५) या सूत्रानें द्वन्द्वसमासाहून वैर व सोयरीक संबंध या अर्थीं वुन् प्रत्यय सांगितला आहे. काकोलूकिका, अत्रिभरद्वाजिका, वसिष्ठकश्यपिका वगैरे शब्द त्या वेळीं फार प्रचारांत होते असें यावरून स्पष्ट होतें. रैवतिक वगैरे शब्दांहून सूत्रकारांनीं ‘त्याचें हें’ या अर्थीं छ प्रत्यय सांगितला आहे. भाष्यकारांनीं कौपिञ्जल, हास्तिपद व आथर्वणिक या शब्दांहून अण् सांगणारें व आथर्वणिक यांतील इक याचा लोप सांगणारें अशीं ‘कौपिञ्जलहास्तिपदादण्’ व ‘आथर्वणिकस्येकलोपश्च’ हीं दोन वार्तिकवचनें येथें दिलीं आहेत. हल्लीं मात्र हीं वार्तिकवचनें सूत्रपाठांत समाविष्ट केलीं गेलीं आहेत. ‘ तस्य विकारः ’ ( सू १३४ ) या सूत्रापासून पुढें पाद संपेपर्यंत सामान्यतः अण्, व विशिष्ट ठिकाणीं त्याला अपवाद विकारार्थक प्रत्यय सांगितले आहेत; व मधून मधून कांहीं सूत्रांमध्यें विकार व अवयव या दोन्ही अर्थीं प्रत्यय सांगितले आहेत. अवयव या अर्थीं प्रत्यय मात्र प्राणि, औषधि व वृक्ष या अर्थीं असलेल्या शब्दांहूनच होतात. ‘ अनुदात्तादेश्च ’ ( सू. १४० ) या सूत्राचें व्याख्यान करतांना भाष्यकारांनीं शेषनिघात हा पदाला सांगितला असला तरी सुप् किंवा तिङ् प्रत्यय लागून पदसंज्ञा होण्यापूर्वींही तो करण्यांत येतो हें ज्ञापकानें सिद्ध केलें आहे. अर्थात् पदसिद्धि करतेवेळी उदात्त प्रत्ययामुळें किंवा उदात्त आदेशामुळें वारंवार शेषनिघात झाला तरी सतिशिष्टस्वरबलीयस्त्वामुळें शेवटचा शेषनिघात कायम राहतो.

## २६२. प्राग्वहतीयप्राग्घितीयप्रत्ययान्हिक ( अ. ४ पा. ४ आन्हिक १ ). प्राग्वहतीय व प्राग्घितीय प्रत्यय.

या आन्हिकांत सूत्रकारांच्या १४४ सूत्रांपैकीं फक्त एकोणीस सूत्रांचेंच भाष्यकारांनीं व्याख्यान केलें आहे. प्राग्वहतेष्ठक् ( सू. १ ) या अधिकारसूत्रानें पुढील ( सू. २ ते ७३ ) सूत्रांमध्यें दिलेल्या तेन दीव्यति, तेन खनति, तेन संस्कृतम्, तेन तरति इत्यादि अर्थीं दुसरा प्रत्यय सांगितला नसल्यास सर्व प्रातिपदिकांहून सामान्यतः ठक् प्रत्यय सांगितला आहे. त्यानंतर ‘प्राग्घिताद्यत्’ (सू ७५) या अधिकारसूत्रानें पाद संपेपर्यंत (सू ७६ ते १४४) सर्व सूत्रांमध्यें ‘तद् वहति ’ वगैरे अर्थीं यत् हा सामान्य प्रत्यय सांगितला आहे. वार्तिककारांनीं ठक् प्रकरणामध्यें माशब्द वगैरेहून ‘तदाह’ (तें सांगतो) या अर्थीं, प्रभूत वगैरे शब्दांहून ‘आह’ या अर्थीं, तसेंच

परदार वगैरे शब्दांहून 'गच्छति' या अर्थीही ठक् प्रत्यय सांगा ग असें म्हटलें आहे. 'प्रयच्छति गर्ह्यम्' (सू. ३०) या सूत्राचें व्याख्यान करतांना दिल्या जाणाऱ्या द्रव्याला गर्ह्य शब्द कसा लागतो याविषयीं भाष्यकारांनीं विवेचन केलें आहे. 'अस्तिनास्तिदिष्टं मतिः' (सू. ६०) या सूत्राचा अर्थ मति शब्दापूर्वी इति शब्द घालून 'अस्ति इति अस्य मतिः' या रीतीनें करावा असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. 'छत्त्रादिभ्यो णः' (सू. ६२) या सूत्राची व्याख्या करतांना भाष्यकारांनीं छत्त्र शब्दाच्या अर्थाचें मार्मिक विवरण करून छात्त्र शब्दाचा गुरूचीं छिद्रें म्हणजे दोष झांकणारा असा अर्थ करून दाखविला आहे; त्याप्रमाणेंच 'संज्ञायां जन्या' (सू. ८२) व 'गृहपतिना संयुक्ते ञ्यः' (सू. ९०) या सूत्रांचें विवेचन करून 'जन्या' व 'गार्हपत्य' या शब्दांचा अर्थ स्पष्ट केला आहे.

## चौथा अध्याय समाप्त.

## २६३. आर्हीयार्थप्रत्ययान्हिक (अ. ५, पा. १ आन्हिक १). 'क्रीत' अर्थापूर्वींच्या अर्थीं सामान्यतः 'छ' प्रत्यय.

'प्राक् क्रीताच्छः' (सू. १) या सूत्रापासून 'तेन क्रीतम्' (सू. ३७) या सूत्रांतील 'क्रीतम्' या अर्थापूर्वी जेथें जेथें प्रत्यय न सांगतां अर्थ सांगितला असेल तेथें 'छ' हा प्रत्यय होतो; पण, उकारान्त नामें व गो वगैरे शब्द यांहून 'यत्' प्रत्यय होतो. (सू. २) 'नभ्य' हा शब्द साधण्याकरितां गो वगैरे शब्दांमध्यें नाभि शब्द घातला आहे; पण या ठिकाणीं 'यत्' प्रत्यय होण्यास अडचण येते; कारण, नभ्य या शब्दापासून नाभीची प्रकृति हा अर्थ दाखविला जात नाहीं. भाष्यकारांनीं 'सिद्धं तु शाखादिषु०' या वार्तिकवचनानें ही अडचण कशी दूर होते तें स्पष्ट केलें आहे. 'खलयवमाष०' (सू. ७) या सूत्रांत ब्रह्मन् शब्द ब्रह्मण्य हें रूप साधण्याकरितां घातला आहे; पण ब्राह्मण शब्दाहूनही यत् प्रत्यय होऊन ब्रह्मण्य हेंच रूप व्हावयास पाहिजे; त्याप्रमाणें वृष आणि वृषन् या दोनही शब्दांचें वृष्य रूप होणें जरूर आहे. भाष्यकारांनीं नेहमींच्या अविरविकन्यायाचा अवलंब करून वृष्णे हित व वृषाय हितं तशींच ब्रह्मणे हितं व ब्राह्मणाय हितम् अशीं दोन दोन वाक्यें होतात पण तद्धितवृत्ति मात्र वृष्य व ब्रह्मण्य अशी एकेकच होते असें सांगितलें आहे. 'आत्मन्विश्व०' (सू. ९) या सूत्रानें 'भोग' हें उत्तरपद असलेल्या शब्दाहून 'ख' प्रत्यय सांगितला आहे; पण तो होण्यास अडचण येते; कारण, पितृभोगीण, मातृभोगीण वगैरे उदाहरणांमध्यें पितृ व मातृ यांना हितकारक पितृभोग व मातृभोग यांना नव्हे—असा अर्थ असतो. भाष्यकारांनीं भोग शब्दाचा उपभोग या अर्थाशिवाय द्रव्य म्हणजे शरीर हाही अर्थ असतो व तो येथें घ्यावा असें सांगून ही अडचण दूर केली आहे. भोगीनर् हा प्रत्यय सांगून ही अडचण दूर होणें शक्य आहे असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे; त्यावरून पूर्ववैयाकरणांनीं भोगीनर् प्रत्यय सांगितला असावा असें दिसतें. 'तदर्थं विकृतेः प्रकृतौ'...'परिखाया ढञ्' (सू. १२ ते १७) या सूत्रांमध्यें विकृतिवाचक शब्दांहून छ वगैरे प्रत्यय सांगितले आहेत. 'आर्हादगोपुच्छ०' (सू. १९) या सूत्रानें 'आर्हात्०' या प्रस्तुत सूत्रापासून 'तदर्हति' (सू. ६३) या सूत्रापर्यंत मधील सूत्रांनीं जे अर्थ सांगितले आहेत त्या अर्थीं ठक् प्रत्यय सांगितला आहे. प्रस्तुत सूत्राची व्याख्या करतांना भाष्यकारांनीं संख्या ही भेददर्शक व परिमाण हें इयत्तादर्शक असा संख्या व परिमाण या शब्दांच्या अर्थांतील फरक स्पष्ट केला आहे; व प्रसंगानें उन्मान, परिमाण व प्रमाण या शब्दांचे अर्थ स्पष्ट केले आहेत.

'अर्हति' या अर्थापर्यंतच्या क्रीतं वगैरे सर्व अर्थांना आर्हीय अर्थ ही संज्ञा देण्यांत येते. या सर्व अर्थांमध्यें क्रीतं या अर्थी छ अथवा यत् प्रयत्य लागून सिद्ध होणारे शब्द पुष्कळच आहेत व त्यांचा अभ्यास केल्यास त्या वेळच्या समाजांत होणाऱ्या अनेक व्यवहारांची चांगलीच कल्पना येण्याजोगी आहे. शत्य, शतिक, साहस्र, नैष्किक, द्विशूर्प, विंशतिक, त्रिंशत्क, कार्षापणिक प्रतिक, अध्यर्धसुवर्ण, द्विशतमान, द्विशातमान, द्विकाकिणीक, द्विशाण, माषिक, मौद्गिक इत्यादि उदाहरणें या बाबतींत चांगलींच उद्बोधक होतील. द्वित्रिपूर्वादण् च' (सू. ३६) हें मूळचें 'शाणाद्वा' (सू. ३५) या सूत्रांवरील वार्तिकच सूत्रपाठांत अन्तर्भूत झालेलें दिसतें 'तेन क्रीतम्' (सू ३७) 'तस्य निमित्त०' (सू ३८) इत्यादि सूत्रांनीं निरनिराळे आर्हीय अर्थ सांगितले आहेत. हे अर्थ शेषाधिकार संपल्यानंतर सांगितले आहेत; त्यामुळें शैषिक प्रत्यय या आर्हीय अर्थी लागत नाहींत.

## २६४. भावार्थकप्रत्ययान्हिक (अ. ५. पा. १ आन्हिक २). कालवाचक शब्दांना लागणारे प्रत्यय.

या आन्हिकांत प्रथमतः पङ्क्ति विंशति वगैरे निपातनें व नंतर राहिलेले आर्हीय अर्थ व इतर अर्थ सांगितले असले, व शेवटीं 'तस्य भावस्त्वतलौ' (सू ५।१।११९) इत्यादि सूत्रांनीं भावार्थक प्रत्यय सांगितले असले तरी भाववाचक प्रत्ययांना प्राधान्य असल्यामुळें या आन्हिकाला भावार्थकप्रत्ययान्हिक म्हणतां येईल. 'पङ्क्तिविंशति०' (सू. ५९) या सूत्रामध्यें पङ्क्ति, विंशति, इत्यादि शब्द निपातन म्हणून दिले आहेत. या शब्दांच्या व्युत्पत्तीविषयीं व अर्थाविषयीं भाष्यकारांनीं विवेचन केलें आहे; व हे शब्द अव्युत्पन्न जरी मानिले तरी ते गुणवचनही आहेत; परंतु रूढिशब्दांप्रमाणें त्यांचें लिंग व संख्या नियत असल्यामुळें ज्या द्रव्यावर ते गुण म्हणून राहतात त्या द्रव्याच्या लिंगवचनाप्रमाणें त्यांचीं लिंगवचनें नसतात असें सांगितलें आहे. विंशतिर्ब्राह्मणाः या ठिकाणीं विंशति शब्दाचा स्त्रीलिंगी एकवचनीच प्रयोग होतो. 'छेदादिभ्यो नित्यम्' (सू ६४) व 'पन्थो ण नित्यम्' (सू ७६) या सूत्रांमध्यें 'नित्य' हा शब्द घातल्यामुळें विराग व पथिन् या शब्दांना विरङ्ग व पन्थ हे सांगितलेले आदेश झाल्यास प्रत्यय झालाच पाहिजे, नुसताच आदेश होऊन विरङ्गं अर्हति व पन्थं गच्छति अशीं वाक्यें होत नाहींत असें भाष्यकारांनीं 'नित्यं' या शब्दाचें प्रयोजन दिलें आहे. 'उत्तरपथेनाहृतं च' (सू. ७७) या सूत्राचें व्याख्यान करतांना भाष्यकारांनीं वारिपथिक, जाङ्गलपथिक, आजपथिक, शाङ्कुपथिक, स्थालपथं मधुकम् वगैरे उदाहरणें दिलीं आहेत; त्यावरून त्या वेळच्या जलमार्ग, स्थलमार्ग वगैरे मार्गांची व त्यावरून नेआण होणाऱ्या ज्येष्ठमध मिरे वगैरे पदार्थांची कल्पना येते. 'कालात्' (सू. ७८) या सूत्राच्या पुढील सूत्रांमध्यें निर्वृत्तम् (सू. ७९) अधीष्ट, भृत, भूत, भावी (सू. ८०) इत्यादि अर्थी सामान्यतः ठञ्, व विशिष्ट ठिकाणीं यत्, खञ् वगैरे प्रत्यय सांगितले आहेत. 'तेन तुल्यं क्रिया चेद्वतिः' (सू. ११५) आणि 'तत्र तस्येव' या सूत्रांनीं औपम्य गम्यमान असतांना वति (वत्) प्रत्यय सांगितला आहे. प्रातिपदिक हे गुणसमुदायरूप असल्यामुळें गुणांनीं तुल्यता असणें शक्य आहे, सूत्रांमध्यें क्रियेनें तुल्यता सांगितली आहे ती कशी संभवते ही शंका उपस्थित करून भाष्यकारांनीं येथें क्रिया हा एक प्रकारचा द्रव्यधर्मच असल्यामुळें ती द्रव्याच्या अनेक धर्मांपैकीं एक धर्म होऊं शकते व क्रियारूप धर्मामुळें तुल्यता संभवते असें तिचें निराकरण केलें आहे.

## २६५. भावार्थक तद्धितप्रत्यय.

'तस्य भावस्त्वतलौ' (सू. ११९) या सूत्रानें भाव म्हणजे स्वभाव या अर्थी प्रातिपदिकाहून त्व आणि तल् (ता) प्रत्यय सांगितले आहेत. वार्तिककारांनीं या ठिकाणीं भाव याचा अर्थ अभिप्राय घेतां येत नाहीं असें सांगून ज्या गुणाच्या भावामुळें म्हणजे अस्तित्वामुळें द्रव्याला तद्वाचक शब्द लागू पडतो तो द्रव्याचा स्वतःचा भाव म्हणजे स्वभाव हा 'भाव' या शब्दाचा अर्थ दिला आहे. भाष्यकारांनीं भाव' शब्दाच्या या अर्थाचे विवरण करतांना द्रव्य आणि गुण यांच्या व्याख्या देऊन त्यांच्या स्वरूपाचें स्पष्टीकरण केलें आहे. शब्द स्पर्श रूप रस व गन्ध हे मुख्य गुण व त्यांहून जें निराळें तें द्रव्य असें सांगून जरी द्रव्य हें गुणांहून पृथक् म्हणजे निराळें उपलब्ध होत नसलें तरी तें गुणांहून भिन्न आहे असें अनुमानानें सिद्ध होतें असें या ठिकाणीं भाष्यकारांनीं दाखवून दिलें आहे; व 'यस्य गुणान्तरेष्वपि प्रादुर्भवत्सु तत्त्वं न विहन्यते तद् द्रव्यम्' त्याप्रमाणेंच 'गुणसंद्रावो द्रव्यम्' अशा 'द्रव्य' या शब्दाच्या व्याख्या दिल्या आहेत. भाष्यकारांनीं येथें 'गुण' या शब्दाचे निरनिराळे अर्थ सांगितले आहेत. भाव हा द्रव्याचा गुणच झाल्यामुळें गुणवाचक शुक्ल वगैरे शब्दांहून 'भाव' या अर्थी हे त्व व तल् प्रत्यय होणार नाहींत या शंकेचें निराकरण शुक्ल वगैरे शब्द हे द्रव्यवाचक शब्दही असतात असें म्हणून केलें आहे. अब्राह्मणत्वम् अब्राह्मणता इत्यादि ठिकाणीं ब्राह्मणत्वाचा अभाव असा जरी अर्थ असला तरी त्व आणि तल् यांचा स्वर समासानंतरही कायम रहावा या दृष्टीनें अ+ब्राह्मण+त्व अशी स्थिति असतांना 'त्व' शीं संबद्ध जरी 'ब्राह्मण' हा शब्द असला तरी त्याचा नञाशीं समास पूर्वविप्रतिषेधानें होतो असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. 'पृथ्वादिभ्य इमनिज्वा'... 'ब्रह्मणस्त्वः' (सू. १२२ ते १३६) या सूत्रांनीं त्व व तल् यांचेच अर्थी विशिष्ट शब्दांहून इमनिच्, ष्यञ्, यत्, ढक्, अण्, वुञ्, छ आणि त्व हे प्रत्यय सांगितले आहेत. 'गुणवचनब्राह्मणादिभ्यः कर्मणि च' (सू. १२४) या सूत्रानें ब्राह्मण शब्दाहून स्वभाव व कर्म या दोन्ही अर्थी ष्यञ् प्रत्यय सांगितला आहे. वार्तिककारांनीं येथें चातुर्वर्ण्य वगैरे शब्दही असेच सांगावे असें म्हटलें आहे. चतुर्वर्ण असे ष्यञ्प्रत्ययरहित शब्द उच्चारून त्यांना ष्यञ् होतो असें म्हणण्याऐवजीं वार्तिककारांनीं चातुर्वर्ण्य असे शब्द उच्चारले आहेत त्यावरून चातुर्वर्ण्य, चातुराश्रम्य इत्यादि ठिकाणचा ष्यञ् स्वार्थी होतो असें वैयाकरणांचें मत आहे. व काशिकाकारांनीं वार्तिकामध्यें 'स्वार्थे' हा शब्द घालून 'चातुर्वर्ण्यादीनां स्वार्थे उपसंख्यानम्' असें वार्तिक दिलें आहे.

## २६६. प्रकीर्णार्थकतद्धितप्रत्ययान्हिक (अ. ५. पा. २ आन्हिक १). प्रकीर्णार्थक तद्धितप्रत्यय.

महत्त्वाचे बहुतेक अर्थ सांगून झाल्यानंतर सूत्रकारांनीं बाकीचे अर्थ व त्या-अर्थी होणारे प्रत्यय या आन्हिकांत सांगितले आहेत. 'धान्यानां भवने॰' (सू. १) या सूत्रानें धान्यवाचक शब्दाहून त्याचें उत्पत्तिक्षेत्र या अर्थी 'खञ्' हा सर्वसाधारणप्रत्यय सांगितला आहे. भाष्यकारांनीं धान्य शब्दाची व्याख्या दिली आहे; व यजुर्वेदाच्या चमका-नुवाकामध्यें दिलेल्या बारा धान्यांना पांच इतर धान्यें मिळवून सतरा धान्यें आहेत असें म्हटलें आहे. या आन्हिकांतील १ ते ३८ सूत्रांनीं व त्यावरील वार्तिकांनीं सांगितलेल्या शब्दां-

पैकीं संमुखीन, अयानयीन, परोवरीण, परंपरीण, समांसमीना ( गौः ), आगवीन, व्रात, हैयंगवीन, पक्षति, विशाल, विशंकट, चिल्ल, ऊरुद्वयस, वितस्ति, या शब्दांचे सिद्धीविषयीं भाष्यकारांनीं थोडेंफार विवेचन केलें आहे. ' यत्तदेतेभ्यः० ' (सू. ३९) या सूत्रानें परिमाण या अर्थी यत्, तत् व एतत् या सर्वनाम शब्दांहून मतुप् प्रत्यय सांगितला आहे; वार्तिककारांनीं वेदामध्यें सादृश्य या अर्थी युष्मद् व अस्मद् शब्दांहून मतुप् होतो असें म्हटलें आहे. यानंतर ' संख्याया अवयवे तयप् '... . ' षष्ठ्यादेश्चासंख्यादेः ' ( सू. ४२ ते ५८ ) या सूत्रांनीं संख्यावाचक शब्दांहून विशिष्ट अर्थी तयप्, ड, मयट्, डट्, तीय इत्यादि प्रत्यय सांगितले आहेत. ' मतौ छः सूक्तसाम्नोः ' ( सू. ५९ ) या सूत्राचें व्याख्यान करतांना भाष्यकारांनीं वैदिक शब्दांपेक्षां भाषेंतील शब्द हे अगदीं निराळे, किंवा कांहीं किरकोळ बाबतींत विसदृश असले तरी तेच, या प्रश्नाचा उद्बोधक विचार केला आहे. ' अध्यायानुवाकयोर्लुक् '...... ' इन्द्रियमिन्द्रलिङ्ग० ' ( सू. ६० ते ९३ ) या सूत्रांनीं निरनिराळ्या अर्थी साधिलेल्या अनेक शब्दांपैकीं भाष्यकारांनीं शीतक, उष्णक, अधिक, पार्श्वक, आयःशूलिक, षट्क, श्रोत्रिय, क्षेत्रिय इत्यादि शब्दांच्या व्युत्पत्तीविषयीं व अर्थाविषयीं थोडेसें विवेचन केलें आहे.

## २६७. मत्वर्थीयप्रत्ययान्हिक ( अ. ५ पा. २ आन्हिक २ ) मत्वर्थीय प्रत्यय.

या आन्हिकांत ' तदस्यास्त्यस्मिन्० ' आणि ' रसादिभ्यश्च ' ( सू. ९४–९५ ) या सूत्रांनीं ' तें ज्याचें आहे ' या अर्थी मतुप्, व त्यानंतरच्या सर्व सूत्रांनीं मतुप् प्रत्ययाच्या अर्थी विशिष्ट शब्दांहून लच्, इलच् श, न, विन्, इन्, इलच्, उलच्, र, म, व, वल, इन्, ठन्, इत्यादि प्रत्यय सांगितले असल्यामुळें या आन्हिकाला मत्वर्थीयप्रत्ययान्हिक नांव देतां येईल. हा मतुप् प्रत्यय सर्व प्रातिपदिकांहून होतो व तो वर्तमानकालची सत्ता दाखवितो. भूतकालची किंवा भविष्यकालची सत्ता दाखविणें झाल्यास त्याकरितां आसीत् अथवा भविष्यति यांसारख्या शब्दांचा प्रयोग करून गोमान् आसीत् अथवा यवमान् भविष्यति असा शब्दप्रयोग करावा लागतो. चित्रगुः या ठिकाणीं जरी मतुप् प्रत्ययाचा अर्थ आहे तरी तो अर्थ बहुव्रीहि समासानें सांगितला गेल्यामुळें तो अर्थ पुन्हां दाखवितां येत नाहीं व त्यामुळें मतुप् प्रत्यय लागून चित्रगुमान् असा प्रयोग होत नाहीं. अर्थात् ' चित्रगु असे अनेक गवळी ज्या ग्रामांत आहेत असा ग्राम ' या अर्थी चित्रगुमान् ग्रामः हा प्रयोग होईल; कारण तेथे दोन भिन्नभिन्न मतुबर्थ दाखवावयाचे आहेत. दण्डिमती शाला, हस्तिमती उपत्यका हे प्रयोग होतातच. मात्र दोन मतुबर्थ असूनही तोच प्रत्यय दोनदां होत नाहीं; व 'गोमद्वान् देशः' अशा तऱ्हेचा प्रयोग होत नाहीं. या मतुबर्थ प्रत्ययांचे बाबतींत भाष्यकारांनीं नुसती वस्तू जवळ असणें उपयोगाचें नाहीं; पण ती प्राचुर्यानें असली पाहिजे असें म्हटलें आहे. प्राचुर्य नसलें तरी निंदा, प्रशंसा, नित्ययोग, अतिशायन किंवा संसर्ग गम्यमान असतांना ककुदावर्ती, रूपवान्, कण्टकी ( वृक्षः ), उदरिणी ( कन्या ), दण्डी या ठिकाणीं मतुबर्थी प्रत्यय होतो. गुणवाचक शुक्ल कृष्ण वगैरे शब्दांहून मतुप् प्रत्यय झाल्यास त्याचा लुक् होतो व गुणवाचक शब्दापासूनच गुणीचा बोध होतो. मतुप् प्रत्ययाच्या खालोखाल अकारान्त प्रातिपदिकाहून होणारे इन् व इक, त्याप्रमाणेंच अस् शेवटीं असलेल्या प्रातिपदिकाहून विन् हे प्रत्ययही भाषेमध्यें पुष्कळ ठिकाणीं आढळून येतात. मतुबर्थी मतुप् प्रत्ययांशिवाय इतर प्रत्यय लागून झालेल्या सूत्रसिद्ध शब्दांशिवाय वार्तिककारांनीं वचनें करून विषुण, द्वुण, वार्त

ज्यौत्स्न, तामिस्र, खर, मुखर, कुञ्जर, नगर, रथो, सुमङ्गली, मेधिर, हिम्य, गुण्य, आमयाविन्, कृन्दारक, फलिन, बर्हिण, शीतालु, वातुल, पर्वत, मरुत्त, इत्यादि अनेक शब्दांची सिद्धि केली आहे.

## २६८. विभक्तिसंज्ञकप्रत्ययान्हिक ( अ. ५ पा. ३ आन्हिक १ ) विभक्तिसंज्ञक तद्धितप्रत्यय.

या आन्हिकांत सर्वनाम, किं व बहु या शब्दांना तस् त्र वगैरे प्रत्यय लागून जे अव्ययरूप शब्द तयार होतात त्यांचें विवेचन केलें आहे. हे तस् त्र वगैरे प्रत्यय विभक्त्यन्त नामांहून सांगितले आहेत, व त्यांना विभक्ति अशी संज्ञा दिली आहे; म्हणून या आन्हिकाला विभक्तिसंज्ञक-प्रत्ययान्हिक म्हणतां येईल. या प्रत्ययांना विभक्तिसंज्ञा दिली गेल्यामुळें या प्रत्ययांच्या शेवटच्या सकार व मकार यांना इत्संज्ञा होत नाहीं; पण विभक्ती पुढें असतांना त्यद् वगैरे सर्वनामांना सांगितलेलीं कार्यें होतात, व विभक्तिप्रत्ययांना सांगितलेले स्वरही होतात. या तस् त्र वगैरे प्रत्ययांना कांहींही अर्थ सांगितलेला नसल्यामुळें या प्रत्ययांच्या पूर्वीं असलेल्या ज्या प्रथमा द्वितीया वगैरे विभक्ति-प्रत्ययांहून हे सांगितले आहेत त्या विभक्ति-प्रत्ययांचाच अर्थ यांना असतो असें समजलें जातें व म्हणूनच हे प्रत्यय स्वार्थीं म्हणून म्हटले जातात. विभक्तिसंज्ञक प्रत्यय शेवटीं असलेल्या या शब्दांना ' तद्धितश्चासर्वविभक्तिः ' ( सू. १।१।३८ ) या सूत्रानें अव्ययसंज्ञा होते. भाषेमध्यें इतर तद्धितप्रत्ययान्त शब्दांपेक्षां यांचे प्रयोग पुष्कळच ज्यास्त आढळून येतात. ' इदम इश् '...' सर्वस्य सः० ' ( सू ३-६ ) या सूत्रांनीं हे विभक्ति प्रत्यय पुढें असतांना इदम् एतद् व सर्व या शब्दांना होणारे आदेश सांगितले आहेत. 'पञ्चम्यास्तसिल्'...'था हेतौ च च्छन्दसि ' ( सू ७-२६ ) या सूत्रांनीं निरनिराळ्या सर्वनामांहून निरनिराळ्या विभक्तींच्या पुढें हे प्रत्यय सांगितले आहेत. 'दिक्शब्देभ्यः०'...'विभाषाऽवरस्य' (सू. २७-४१) या सूत्रांनीं होणारे या विभक्ति-प्रत्ययांसारखेच विभक्त्यन्त दिक्-शब्दांहून स्वार्थीं अस्तात्, अतस्, आत् एनप् वगैरे प्रत्यय सांगितले आहेत; व हे प्रत्यय शेवटीं असलेल्या पुरस्तात्, पुरतः, पश्चात्, उत्तरेण वगैरे शब्दांनाही ' तद्धितश्चासर्वविभक्तिः ' या सूत्रानें अव्यय संज्ञा होते. ' संख्याया विधार्थे धा' व 'अधिकरणविचाले च' (सू ४२,४३) या सूत्रांनीं संख्यावाचक शब्दाहून प्रकार या अर्थीं धा प्रत्यय सांगितला आहे. हा धा प्रत्यय शेवटीं असलेले शब्दही अव्ययें होतात. 'याप्ये पाशप् ' ( सू. ४७ ) या सूत्रानें निंदा गम्यमान असतांना पाशप् प्रत्यय सांगितला आहे. ही निंदा ज्या धर्माच्या योगानें त्या शब्दाचा प्रयोग होतो त्या धर्माची असली पाहिजे असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे.

## २६९. आतिशायनिकप्रत्ययान्हिक (अ. ५ पा. ३ आन्हिक २) आतिशायनिक तद्धितप्रत्यय.

सूत्रकारांनीं येथपर्यंत निरनिराळ्या अर्थीं निरनिराळे तद्धित प्रत्यय देऊन अनेक तद्धितान्त नामें व अव्ययें कशीं होतात तें सांगितलें. प्रस्तुत आन्हिकामध्यें साध्या नामांना, तसेंच तद्धितान्त नामांना व क्रियापदांना सुद्धां लागणाऱ्या अतिशायन म्हणजे दोघांत सरसपणा किंवा अनेकां-मध्यें श्रेष्ठपणा दाखविणाऱ्या तद्धित प्रत्ययांचें निरूपण केलें आहे. भाष्यकारांचे वेळीं अतिशायन

शब्द विद्वत्सभांमध्यें फारसा वापरण्यांत नसावा म्हणून त्याच्या अर्थाचें विवेचन करतांना त्यांनीं 'देश्याः सूत्रनिबन्धाः क्रियन्ते' असा शेरा मारून प्रकर्ष व अतिशय हे पर्याय शब्द दिले आहेत. हा अतिशय म्हणजे प्रकर्ष गुणांचे बाबतींतच दिसून येतो व तो दाखवितांना निरनिराळ्या व्यक्तींमधील समान अशा एकाच गुणाचा विचार केला जातो; म्हणून गुणवाचक व क्रियावाचक शब्दांनाच आतिशायनिक प्रत्यय जोडले जातात. गुणाला प्राधान्य देऊन द्रव्यवाचक शब्दाचा प्रयोग केल्यास द्रव्यवाचक शब्दालाही आतिशायनिक प्रत्यय जोडले जातात. स्त्रीलिंगी शब्दाचा गुणप्रकर्ष दाखवावयाचा असल्यास स्त्रीप्रत्ययान्त शब्दाला आतिशायनिक प्रत्यय जोडला जातो; व त्यामुळें कालितरा कालितमा अशीं रूपें होतात; कालतरा कालतमा होत नाहींत. या गुणवाचक आतिशायनिक प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दांना गुणाच्या आश्रयाला अनुरूप लिंगप्रत्यय व वचनप्रत्यय लाविले जातात. 'अजादी गुणवचनादेव' (सू ५८) या सूत्रानें ईयस् व इष्ठ हे प्रत्यय गुणवाचक शब्दांनाच लागतात असा नियम घालून दिला आहे. 'प्रशस्यस्य श्रः'....'युवाल्पयोः कनन्यतरस्याम्' (सू. ६०-६५) या सूत्रांनीं इष्ठ व ईयस् प्रत्ययांपूर्वी प्रशस्य वृद्ध वगैरे शब्दांना होणारे आदेश सांगितले आहेत.

## २७०. रूप, कल्प, क इत्यादि प्रत्यय.

'प्रशंसायां रूपप्' (सू. ६६) या सूत्रानें प्रशंसा या अर्थीं रूपप् हा स्वार्थी प्रत्यय सांगितला आहे. भाष्यकारांनीं येथें आख्यान शब्दांमध्यें क्रिया प्रधान असते व त्यामुळें पचतिरूपम् या रूपप्रत्ययान्त क्रियावाचक पदाला लिंगवाचक प्रत्ययाचा प्रश्नच येत नाहीं; साधनास अनुसरून वचनप्रत्यय मात्र लागतात व पचतोरूपम्, पचन्तिरूपम् असे प्रयोग होतात; नामाविषयीं विचार केल्यास नाम हें द्रव्यप्रधान असल्यामुळें द्रव्यास अनुसरून लिंगवचनप्रत्यय लागतात व वैयाकरणरूपः वगैरे प्रयोग होतात असें सांगितलें आहे. 'ईषदसमाप्तौ०' व 'विभाषा सुपो०' (सू. ६७, ६८) या सूत्रांनीं कल्प, देश्य, देशीय, आणि बहु हे प्रत्यय 'थोडकेंसें अपुरें' या अर्थीं सांगितले आहेत. अज्ञात, कुत्सित अल्प, ह्रस्व वगैरे अर्थीं प्रातिपदिकाहून 'क' व सर्वनाम शब्दांहून 'अकच्' हे प्रत्यय सांगितले आहेत. त्याप्रमाणेंच अनुकम्पा, कुत्सा, अथवा संज्ञा गम्यमान असल्यास किंवा 'त्यासारखी प्रतिकृति' हा अर्थ गम्यमान असल्यास कन् प्रत्यय होतो व त्यामुळें शब्द आद्युदात्त होतो. भाष्यकारांनीं कुत्सितक व अनुकम्पितक या ठिकाणीं कुत्सित व अनुकम्पित या शब्दांनींच कुत्सा व अनुकम्पा हे अर्थ दाखविले गेल्यामुळें त्याच अर्थीं पुन्हां क प्रत्यय होणार नाही अशी मजेदार शंका काढली आहे व प्रथमतः त्या शंकेला कुत्सित शब्दाहून अनुकम्पा या अर्थीं व अनुकम्पित शब्दाहून कुत्सा या अर्थी प्रत्यय होण्यास हरकत नाहीं असें उत्तर दिलें आहे. पण पूर्ववैयाकरणांच्या 'स्वार्थमभिधाय शब्दो०' या दोन कारिका देऊन शास्त्रीय रीत्या या शंकेचें मार्मिक निराकरण केलें आहे : शब्द हा कोणाचीही अपेक्षा न धरतां जाति गुण वगैरे प्रवृत्तिनिमित्ताचें प्रतिपादन करतो, व त्यानंतर आश्रयद्रव्याचें प्रतिपादन करतो व त्यानंतर लिंग संख्या व कारक यांचें प्रतिपादन करतो; या पांच अर्थांनीं शब्दार्थाचें पूर्ण प्रतिपादन होतें; व त्यानंतर शब्दाचा बाह्य अर्थाशीं संबंध होऊन त्याचे योगानें बाह्य पदार्थांमुळें होणाऱ्या कुत्सा, अनुकम्पा, लघुता, गुरुता वगैरे गुणांचें भान होतें व त्याला अनुसरून क, कन् वगैरे प्रत्यय लागतात असें भाष्यकारांनीं येथें स्पष्ट म्हटलें आहे.

**२७१. स्वार्थबोधकतद्धितप्रत्ययाह्निक ( अ. ५ पा. ४ आह्निक १ ). स्वार्थी तद्धित व समासान्त प्रत्यय.**

या आह्निकांत बहुतेक ठिकाणीं अर्थ दिल्याशिवाय विशिष्ट प्रातिपदिकांहून तद्धित प्रत्यय सांगितले आहेत. प्रत्ययाला स्वतःचा अर्थ नसल्यास प्रकृतीचाच अर्थ त्याला असतो असा वैयाकरणसमय असल्यामुळें या प्रत्ययांना स्वार्थे प्रत्यय म्हणतात. कांहीं ठिकाणीं सूत्रकारांनीं प्रत्ययाला अर्थ दिला नाहीं पण तद्धितान्त शब्दाहून विशिष्ट अर्थ गम्यमान असला पाहिजे असें म्हटलें आहे. अशा ठिकाणींही विशिष्ट अर्थ प्रकृतीचाच असल्यामुळें प्रत्यय हा स्वार्थींच होतो असें म्हणतां येतें. 'अषडक्षाशितंगु०' (सू. ७) या सूत्रानें अधि उत्तरपद असलेल्या समासाहून ख हा स्वार्थी प्रत्यय सांगितला आहे. या ठिकाणीं राजाधीन वगैरे उदाहरणांमध्यें राज्ञः अथवा राज्ञि अधि असा विग्रह लोकांमध्यें आढळत नसल्यामुळें अधि याला उत्तरपद म्हणतां येणार नाहीं, व त्यामुळें ख प्रत्यय होणार नाहीं अशी शंका घेऊन हा ख प्रत्यय नित्य आहे व त्यामुळें समास नित्य होतो म्हणून स्वपदविग्रह दाखवितां येत नाहीं असें उत्तर दिलें आहे. भाष्यकारांनीं या ठिकाणीं नित्यप्रत्ययांचें परिगणन केलें आहे. 'णचः स्त्रियामञ्' (सू. १४) या सूत्राचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं अञ् प्रत्यय स्वार्थी असल्यामुळें व णच् प्रत्यय हा स्त्रीलिंगीच सांगितला असल्यामुळें 'स्त्रियाम्' हा शब्द व्यर्थ होतो व त्यामुळें 'क्वचित् स्वार्थिक प्रत्यय हे मूळ शब्दाच्या लिंगवचनांचें अतिक्रमणही करतात' असें सिद्ध केलें आहे. 'एकस्य सकृच्च' (सू. १९) या सूत्राचें व्याख्यान करितांना क्रियेची अभ्यावृत्ति म्हणजे पुन्हां पुन्हां आवृत्ति ही 'एक' या शब्दाचे बाबतींत शक्य नसल्यामुळें 'एक' या शब्दाला सकृद् आदेश होण्यास अडचण येते अशी भाष्यकारांनीं शंका उपस्थित केली आहे; व अभ्यावृत्ति शब्द अनुवृत्त न होतां एकटा क्रिया हा शब्दच अनुवृत्त होतो असें म्हटलें आहे. प्रसंगानें येथें भाष्यकारांनीं पाक, याग वगैरे कृदन्त म्हणजे धातुसाधित नामांमध्यें क्रियार्थ हा द्रव्यार्थाला गौण होऊन द्रव्यार्थासारखा होतो; पण कर्तुम्, कृत्वा वगैरे अव्ययांमध्यें क्रियार्थ हा क्रियार्थासारखाच राहतो असें सांगून व अभ्यावृत्ति शब्दाचा अभिमुखप्रवृत्ति असा अर्थ करून एकच वेळां क्रियेची अभिमुख प्रवृत्ति गम्यमान असतांना 'एक' या शब्दाला सकृत् आदेश होतो असा वाक्यार्थ केला आहे. 'तद्युक्तात् कर्मणोण्' (सू ३६) या सूत्रावर वार्तिककारांनीं वचनें करून कुलाल, वरुड वगैरे शब्दांहून स्वार्थी अण् प्रत्यय सांगितला आहे; भाग, रूप, नाम व मित्र यांहून धेय प्रत्यय सांगितला आहे; व सांनाय्य, आनुषक्, वैकृत, आग्रहायण, आग्रायण, सांतपन वगैरे निपातनें सांगितलीं आहेत. 'कृभ्वस्तियोगे संपद्यकर्तरि च्विः' (सू. ५०) या सूत्रानें सूत्रकारांनीं च्वि हा स्वार्थी प्रत्यय सांगितला आहे. या ठिकाणीं वार्तिककारांनीं 'अभूततद्भावे' असें सूत्रांत पद घालावें असें म्हटलें आहे व हल्लींच्या सूत्रपाठांत तें घातलें गेलें आहे. 'समासान्ताः' (सू. ६८) या अधिकारसूत्रानंतर पाद संपेपर्यंत सूत्रकारांनीं विवक्षित समासांच्या शेवटीं डच्, अ, अच्, टच्, षच्, कप् वगैरे समासान्त प्रत्यय सांगितले आहेत. या समासान्त प्रत्ययांची नित्य-प्रत्ययांमध्यें भाष्यकारांनीं गणना केली आहे व त्यामुळें विग्रह वाक्यांमध्यें पूर्वपद व समासान्तरहित उत्तरपद अशीं पदें दाखविलीं जातात.

**चौथा व पांचवा अध्याय ( तद्धिताध्याय ) समाप्त.**

---

## २७२. द्विर्वचनान्हिक ( अ. ६ पा. १ आन्हिक १ ) द्विर्वचननिरूपण.

धातू व प्रातिपदिक यांना कृत् व तद्धित प्रत्यय लागून तयार झालेल्या कृदन्त व तद्धितान्त प्रातिपदिकांना विभक्तिप्रत्यय लावल्यानंतर, पण विभक्तिप्रत्ययामुळें त्यांना अथवा त्यांचेमुळें विभक्तिप्रत्ययांना होणारीं कार्यें सांगण्यापूर्वीं, त्या प्रातिपदिकांना होणारीं सामान्य कार्यें व स्वर हे या सहाव्या अध्यायाच्या तीन पादांमध्यें सांगितले आहेत. त्यांपैकीं या प्रथम आन्हिकांत द्विर्वचनाचें विवेचन केल्यामुळें या आन्हिकाला द्विर्वचनान्हिक नांव देतां येईल. 'एकाचो द्वे प्रथमस्य' व 'अजादेर्द्वितीयस्य' (सू. १, २) हीं व्यवस्थापक स्वरूपाचीं अधिकारसूत्रें समजलीं जातात व त्यांनीं 'लिटि धातो०'...'चङि' (सू ८-११) या सूत्रांनीं धातूला सांगितलेलें द्विर्वचन धातूच्या पहिल्या एकाच् भागाला, व धातू दोन किंवा अधिक स्वरांनीं युक्त व स्वरानें आरंभ होणारा असल्यास दुसऱ्या एकाच् भागाला होतें अशी व्यवस्था घालून दिली आहे. या ठिकाणीं 'एकाच्' भाग म्हणजे एका ( पहिल्या अथवा दुसऱ्या ) स्वराच्या मागील व पुढील सर्व व्यंजनें घेऊन झालेला भाग असा अर्थ भाष्यकारांनीं दिला आहे व अशीं सर्व व्यंजनें घेण्याला 'व्यञ्जनानि नटभार्यावद् भवन्ति' असा मनोरंजक दृष्टान्त दिला आहे. धातू एकस्वरयुक्त नव्हे तर एक स्वराचाच बनलेला, उदाहरणार्थ 'इ', असेल तर व्यपदेशिवद्भावानें त्यालाही 'एकाच्' म्हणावें असें सांगितलें आहे. हें द्विर्वचन स्थाने-द्विर्वचन समजावें किंवा द्विःप्रयोगरूप द्विर्वचन समजावें याविषयीं वार्तिककारांनीं दिलेल्या दोन पक्षांचें विवेचन करून द्विःप्रयोगरूप द्विर्वचन समजणें बरें असें भाष्यकारांनीं सुचविलें आहे. 'न न्द्राः संयोगादयः' (सू ३) या सूत्रानें द्वित्व ज्याला करावयाचें तो द्वितीय एकाच् भाग व्यंजनसंयोगानें आरंभ होणारा असा असेल तर पहिलें व्यंजन न् द् किंवा र असल्यास त्याला द्वित्व करूं नये असें सांगितलें आहे. 'पूर्वोऽभ्यासः'....'तुजादीनां०' (सू. ४-७) या सूत्रांनीं अभ्यास व अभ्यस्त संज्ञा सांगितल्या आहेत. या संज्ञांचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं अभ्यस्त संज्ञा ही दोनही उच्चारणांना मिळून होते, त्याकरितां सूत्रामध्यें 'सह' शब्द घालण्याची जरूर नाहीं असें सांगितलें आहे. 'लिटि धातोरनभ्यासस्य' (सू. ८) या सूत्रांतील पदांच्या आवश्यकतेचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं 'वेदामध्यें द्वित्वविकल्पच सांगावा' या वार्तिक-वचनाचें समर्थन करून द्वित्व न झाल्याचीं याचिषामहे, दाति, दातु इत्यादि अनेक उदाहरणें दिलीं आहेत. 'सन्यङोः' (सू. ९) या सूत्राच्या अर्थाविषयीं 'सन् व यङ् पुढें असतांना द्वित्व होतें' किंवा 'सन्नन्त व यङन्त यांना द्वित्व होतें' या दोन्ही पक्षांचा विचार करून सन्नन्ताला व यङन्ताला द्वित्व होतें म्हणजे दोनदां प्रयोग होतो असा सूत्रार्थ भाष्यकारांनीं निश्चित केला आहे. यानंतर भाष्यकारांनीं 'दाश्वान्साह्वान्०' (सू. १२) या सूत्रांतील दाश्वान् साह्वान् व मीढ्वान् या निपातनांचें विवेचन करून द्वित्वाबरोबर प्राप्त होणाऱ्या यण्, अव्, संप्रसारण, गुण इत्यादि विधींचा विप्रतिषेध आला असतां पौर्वापर्य ठरवून हें द्वित्वान्हिक पुरें केलें आहे.

## २७३. संप्रसारणान्हिक ( अ. ६ पा. १ आन्हिक २ ) संप्रसारणनिरूपण.

या आन्हिकांत संप्रसारणाचें विवेचन केलें असल्यामुळें याला संप्रसारणान्हिक हें नांव दिलें आहे. संप्रसारणालाच प्रसारण हें नांव वार्तिककारांनीं दिलें आहे. इ, उ, ऋ, ऌ यांचे पुढें स्वर येऊन झालेल्या अंतस्थ वर्णांचें पुन्हां इ+अ, उ+अ, ऋ+अ अशा रीतीनें प्रसारण

होणें ही कल्पना या संज्ञेच्या मुळाशीं असावी. ‘ ष्यङः संप्रसारणं० ’ ( सू. १३ ) या सूत्रानें ष्यङ्-प्रत्ययान्त शब्दाला सांगितलेलें संप्रसारण-कार्य हें ष्यङ् प्रत्ययांतील यकाराला ‘ निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति ’ या परिभाषेच्या योगानें होतें. तदन्तविधीनें सबंध शब्दस्वरूपाला आदेश प्राप्त झाला तरी सूत्रानें स्थानीचें स्वरूप निर्दिष्ट असल्यास निर्दिष्ट भागालाच आदेश करावा असें सांगणारें ‘ निर्दिश्यमानस्यादेशत्वात् ’ ( ६।४।१३० वा. ३ ) हें वार्तिकवचन या परिभाषेच्या मुळाशीं आहे. या ठिकाणीं ‘ अनन्त्यविकारे अन्त्यसदेशस्य ( कार्यं भवति ) ’ या परिभाषेनेंही काम भागतें, व या परिभाषेचीं अनेक उदाहरणाकरितां जरूरी असल्यामुळें हीच घ्यावी असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. ही परिभाषा स्वीकारिल्यास कांहीं दोष येतात पण ते घालविण्याकरितां यत्न करणें भाग आहे. ‘ लिट्यभ्यासस्योभयेषाम् ’ ( सू. १७ ) या सूत्रांतील उभयेषाम् या पदाच्या उपयुक्ततेचें विवेचन करतांना वार्तिककारांच्या ‘संप्रसारणाश्रयबलीयस्त्वात्’ (सू. १७ वा. २) या वचनाच्या आधारानें ‘ संप्रसारणं तदाश्रयं च कार्यं बलवत् ’ या परिभाषावचनाचें भाष्यकारांनीं विधान केलें आहे; व अनेक उदाहरणें दिलीं आहेत. ‘ अपस्पृधेथाम्० ’ ( सू. ३६ ) या सूत्रामध्यें संप्रसारणासारखींच कार्यें जेथें होतात असे कांहीं निपातन शब्द दिले आहेत. ‘ न संप्रसारणे संप्रसारणम् ’ ( सू. ३७ ) या सूत्राचा विचार करतांना ‘ न संप्रसारणे० ’ हें निषेधसूत्रच ‘ पर यणाला संप्रसारण होतें, पूर्व यणाला होत नाहीं ’ असें सुचवितें असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे.

## २७४. आत्वसत्वनत्वाद्यादेशान्हिक ( अ. ६ पा. १ आन्हिक ३ ) षोपदेश धातू व णोपदेश धातू.

या आन्हिकामध्यें विशिष्ट धातू व प्रातिपदिकें यांना तसेंच त्यांच्या अवयवभूत वर्णांना होणारें आदेश दिले आहेत; पण त्यांमध्यें धातूंच्या शेवटच्या एच् स्वराला होणारें आत्व व धातूच्या आदि षकाराला होणारें सत्व व णकाराला होणारें नत्व हीं मुख्य असल्यामुळें या आन्हिकाला आत्वसत्वनत्वाद्यादेशान्हिक म्हणतां येईल. ‘ आदेच उपदेशेऽशिति ’ ( सू. ४५ ) या सूत्राच्या अर्थाचा विचार करतांना भाष्यकारांनीं ‘ उपदेशीं जो एच् वर्ण त्याला आ आदेश होतो’ असा, अथवा ‘उपदेशीं जो एजन्त धातू त्याला म्हणजे त्याच्या अन्त्य वर्णाला आ आदेश होतो’ असा अर्थ करावा याविषयीं विवेचन करून दोन्ही पक्षावरील दोष दाखवून ते दूर केले आहेत; व दुसऱ्या पक्षाला ज्यास्त मान्यता दाखविली आहे. तसेंच, सूत्रांतील ‘अशिति’ याचा अर्थ निषेधरूपानें घ्यावा किंवा पर्युदासरूपानें घ्यावा याविषयींही विचार केला आहे. ‘ मीनातिमिनोति० ’ ( सू. ५० ) या सूत्राच्या अर्थाचें विवेचन करतांना या सूत्रानें सांगितलेला ‘ आ ’ आदेश उपदेशावस्थेमध्येंच होणें इष्ट आहे व त्याकरितां ‘ आदेच उपदेशेऽशिति ’ ( सू. ४५ ) या सूत्रांतून उपदेशे हें पद ‘मीनाति०’ या सूत्रांत अनुवृत्तीनें घ्यावें; उपदेशे हें पद त्या सूत्रांत एका कामाकरितां व येथें दुसऱ्या कामाकरितां असलें तरी हरकत नाही असें भाष्यकारांनीं येथें समर्पक दृष्टांत देऊन सांगितलें आहे. सूत्रकारांनीं‘पद्दन्नोमास्०’ (सू.६२) या सूत्रानें पाद दन्त इत्यादि नामांना होणारे पद् दत् इत्यादि आदेश सांगितले आहेत व त्यानंतर ‘ धात्वादेः षः सः ’ व ‘ णो नः ’ ( सू. ६३, ६४ ) या सूत्रांनीं धातूंच्या आदि षकाराला ‘ स, ’ व णकाराला ‘ न ’ हे आदेश सांगितले आहेत. शस् व त्यानंतरच्या प्रत्ययांचे पूर्वीं पद् दत् यांसारखे आदेश, त्याप्रमाणें नपुंसकलिंगी नामांची तृतीया एकवचनानंतरचीं पुंल्लिंगी रूपांप्रमाणें होणारीं रूपें यांवरून त्या वेळच्या प्रचलित भाषांमध्यें कर्ता व

कर्म या कारकांच्या प्रथमा व द्वितीया या विभक्तींशिवाय बाकी इतर विभक्तींचे प्रत्यय लागतांना कांहीं शब्दांचे बाबतींत पूर्वीच्या शब्दांचे कांही वर्ण गाळून थोडक्यांत उच्चारण केलें जात असे, तसेंच नपुंसकलिङ्गाच्या वैशिष्ट्याकडे लक्ष दिलें जात नसे असें दिसून येतें; व म्हणूनच शस् प्रत्ययानंतरच्या प्रत्ययांपूर्वींच फक्त कांहीं प्रातिपदिकांचे प्रयोग आढळून आल्यामुळें पहिल्या पांच प्रत्ययांना यच्चयावत् सर्व प्रादिपदिकांपुढें दिसणारे प्रत्यय म्हणून 'सर्वनामस्थान' प्रत्यय अशी संज्ञा दिली गेली असावी. 'सार्वधातुक' या संज्ञेचेंही या रीतींनें विवेचन करणें शक्य आहे. षकारादि व णकारादि उच्चारण त्या वेळच्या प्रांतीय प्राकृत भाषांमध्यें प्रायशः प्रचारांत असल्यामुळें व संस्कृतामध्येंही इण् व क-वर्गीतील व्यंजनांपुढील सकाराचे स्थानीं षकाराचें उच्चारण तसेंच रेफ व ष यांचे पुढें नकाराचे स्थानीं णकाराचें उच्चारण झाल्यामुळें पाणिनीनें पुष्कळसे धातू मूळचे षकारादि व णकारादि म्हणूनच सांगितले आहेत. त्यानें जे सकारादि व नकारादि सांगितले ते जुन्या वैदिक संस्कृतांतून प्रचारांत आलेले होते. याच्या उलट ज्यांच्या षकाराला सकार होत नाहीं असें वार्तिककारांनीं विधान केलें आहे ते ष्ठिव् ष्वष्क् वगैरे धातू तसेच षकारादि नामधातू हे प्राकृतप्रचुरच होते अशीं अनुमानें काढण्यास हरकत दिसून येत नाहीं. षकारोपदेश व णकारोपदेश धातूंचें भाष्यकारांनीं परिगणन केलें आहे. 'लोपो व्योर्वलि'......'शेश्छन्दसि बहुलम्' (सू. ६५-६९) या सूत्रांनीं विशिष्ट ठिकाणीं सूत्रकारांनीं विशिष्ट वर्णांचा लोप सांगितला आहे व त्यानंतर 'संहितायाम्' (सू ७१) हें अधिकार सूत्र करून दोन पदांचें अत्यंत संनिकृष्ट उच्चारण झालें असतां मध्यें येणाऱ्या तकार आगमाचें विधान केलें आहे व शेवटीं 'य' या कृत्य प्रत्ययाच्या पूर्वी धातूच्या शेवटच्या वर्णाला होणारें विकार सांगितले आहेत. या सर्वांनें निरूपण करून, व लोपो व्योर्वलि सू. ६५) आणि 'शेश्छन्दसि०' (सू ६९) या सूत्रांची अनावश्यकता दाखवून भाष्यकारांनीं हें तिसरें आन्हिक पुरें केलें आहे.

**२७५. एकादेशान्हिक (अ. ६ पा. १ आन्हिक ४). एकादेशस्वरूपनिरूपण.**

या आन्हिकांत 'एकः पूर्वपरयोः' (सू ८३) असें अधिकार सूत्र करून त्यानंतर 'आद् गुणः' (सू ८६) 'वृद्धिरेचि' (सू. ८७) इत्यादि सूत्रांनीं पूर्व व पर अशा दोन वर्णांचे ठिकाणीं एक वर्ण असा एक आदेश सांगितला असल्यामुळें या आन्हिकाला 'एकादेशान्हिक' म्हणतां येईल. 'अन्तादिवच्च' (सू. ८४) या सूत्रानें शास्त्रीय विधींचे बाबतींत एकादेश हा पूर्व व पर दोघांना मिळून झालेला असल्यामुळें जरूरीप्रमाणें तो पूर्वीच्या शब्दस्वरूपाच्या शेवटचा अथवा पुढील शब्दस्वरूपाच्या आरंभींचा असा समजला जातो; एकाच वेळीं दोन्ही तऱ्हेचा समजला जात नाहीं. या एकादेशाचे बाबतींत सूत्रकारांचें एक महत्त्वाचें विधान म्हणजे षत्व व तुक् आगम कर्तव्य असतांना 'षत्वतुकोरसिद्धः' (सू. ८५) या सूत्रानें सांगितलेलें एकादेशाचें असिद्धत्व. या एकादेशाच्या असिद्धत्वामुळें कोसिचत् इत्यादि ठिकाणीं 'ओ' हा एकादेश केल्यावर मागें ओ हा इण् वर्ण आल्यामुळें षत्व प्राप्त होतें तें होत नाहीं. त्याप्रमाणेंच अधीत्य या ठिकाणीं ई हा एकादेश केल्यावर मागील ऱ्हस्व इकार गेल्यामुळें तुक् आगम होण्याला आलेली अडचण दूर होऊन तो होऊं शकतो. या एकादेशाच्या असिद्धत्वाविषयीं विचार केल्यास सहज ध्यानांत येईल कीं स्वतंत्र रीतीनें पदसिद्धि प्रथम होते; व नंतर मागील पदाच्या शेवटचा वर्ण व पुढील पदाचा पहिला वर्ण हे दोन्ही मिळून एक झाल्यावर त्या एकादेश वर्णामुळें पुढल्या किंवा मागच्या पदांत बिघाड

करतां येत नाहीं; अथवा एकादेश अगोदर केल्यास एकादेश करण्यापूर्वी असलेल्या वर्णामुळें प्राप्त झालेलें कार्य एकादेश झालाच नाहीं असें समजून करतां येतें. भाष्यकारांनीं एकादेशाच्या स्वरूपाचें विवरण लौकिक दृष्टान्त देऊन मार्मिकपणानें केलें आहे. अन्तादिवद्भावाचेंही विवरण करतांना पूर्वान्तवद्भावाचीं व परादिवद्भावाचीं उदाहरणें देऊन अन्तादिवद्भाव जेथें येणें इष्ट नाहीं अशीं स्थळेंही भाष्यकारांनीं दाखविलीं आहेत सूत्रकारांनीं 'आद् गुणः' 'वृद्धिरेचि' (सू. ८६, ८७) इत्यादि सूत्रांनीं गुण, वृद्धि, पररूप, वगैरे कार्यें सांगितलीं आहेत. वार्तिककारांनीं सूत्रांनीं सिद्ध न होणारे असे अक्षौहिणी, स्वैर, सुखार्त, दशार्ण, मनीषा, शकन्धु, सीमन्त वगैरे शब्द साधण्याकरितां वार्तिकवचनें केलीं आहेत.

## २७६ पूर्वसवर्णपररूपप्रकृतिभावान्हिक (अ. ६ पा. १ आन्हिक ५) पूर्वसवर्ण, पररूप व प्रकृतिभाव यांविषयीं विचार.

या आन्हिकांत पूर्वसवर्ण, पररूप, नत्व, उत्त्व, अवङ्, प्रकृतिभाव, सुट् आगम इत्यादि अनेक कार्यांचें विवेचन केलें असलें तरी पूर्वसवर्ण, पररूप, व प्रकृतिभाव यांचा प्रामुख्यानें विचार केला असल्यामुळें याला पूर्वसवर्णपररूपप्रकृतिभावान्हिक हें नांव देण्यास हरकत नाहीं. प्रथमयोः पूर्वसवर्णः (सू. १००) या सूत्रांत प्रथमयोः या पदानें पहिल्या दोन विभक्ती घ्यावयाच्या अथवा पहिले दोन प्रत्यय घ्यावयाचे याचा विचार करून भाष्यकारांनीं पहिल्या दोन विभक्ती घ्यावयाच्या असा निर्णय दिला आहे. 'तस्माच्छसो नः पुंसि' (सू. १०१) या सूत्राचा अर्थ करतांना अर्थाला प्राधान्य देऊन पुरुषबहुत्व घ्यावयाचें अथवा शब्दाला प्राधान्य देऊन पुल्लिंगी शब्दाहून केलेला बहुवचनप्रत्यय घ्यावयाचा याविषयीं विवेचन करतांना दोन्ही पक्षांचे बाबतींत पूर्ववैयाकरणांचीं वार्तिकें उद्धृत केलीं आहेत, व थोडे दोष असलेला पक्ष स्वीकारावा व दोषांचें निराकरण करावें असें म्हटलें आहे. 'संप्रसारणाच्च' (सू. १०६) या सूत्रानें सांगितलेल्या पूर्वरूपाचा स्थानी, व संप्रसारण आदेश हे दोन्ही एकाच अंगामध्यें असणें जरूर आहे असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे; व वेदामध्यें हें पूर्वरूप विकल्पानें म्हणजे दृष्टीस पडेल तेथेंच होतें असें म्हटलें आहे. या सूत्राचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं रूपसिद्धि करतांना एकाचवेळीं प्राप्त होणाऱ्या कार्यांचें पौर्वापर्य ठरविलें आहे; व तें ठरवितांना अन्तरङ्ग कार्य हें सर्वांत प्रबल ठरतें या आशयाच्या अन्तरङ्गबलीयस्त्वाचा पुरस्कार केला आहे. हा अन्तरङ्गबलीयस्त्व-न्याय वार्तिककारांनीं या ठिकाणीं ज्ञापकानें सिद्ध केला आहे व त्याचीं अनेक उदाहरणें दाखविलीं आहेत. 'नान्तःपादमव्यपरे' (सू. ११३) या सूत्रानें आरंभ करून 'ऋत्यकः' (सू. १२६) या सूत्रापर्यंत सर्व सूत्रांनीं या प्रकरणांत व मागें प्राप्त झालेल्या संधिकार्यांचा विशिष्ट ठिकाणीं निषेध केला आहे. 'नान्तःपादम्०' या सूत्राच्या अर्थाचें विवरण करतांना वार्तिककारांनीं भाष्यकारांनीं व कैयटभट्टांनीं ए व ओ यांना संधिकार्य होत नाहीं अशा प्रकारचा अर्थ केला आहे. काशिकाकारांनीं व सिद्धान्तकौमुदीकारांनीं 'प्रकृत्यान्तःपादमव्यपरे' असा पाठ घेऊन व्याख्या केली आहे; व नागेशांनीं उद्योतामध्यें 'न' च्या ऐवजीं 'प्रकृत्या' पाठ घेतला असतां कांहीं अडचण येत नाहीं असें म्हटलें आहे. काशिकाकारांनीं 'नान्तःपादम्०' असा सूत्रपाठ कांहीं लोक घेतात व संहितायाम् या अधिकारांत सांगितलेल्या सर्व संधिकार्यांचा निषेध सांगणारें हें सूत्र आहे असें म्हणतात' असें विधान केलें आहे. यावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं भाष्यकारांचे वेळीं पाणिनिसूत्रांचे बाबतींत थोडेसे पाठभेद त्यांनीं दाखविले आहेत ते होतेच, पण त्यानंतरही कांहीं पाठभेद प्रचलित झाले व काशिकाकारांचे पूर्वी

हल्लीं प्रचलित असलेला सूत्रपाठ निश्चित करण्यांत आला. ' प्रकृत्या ' हा पाठ अंमलांत आल्यानंतरच या प्रकरणाला ' प्रकृतिभाव ' असें नांव देण्यांत आलें असावें. ' अवङ् स्फोटायनस्य ' ( सू. १२१ ) या सूत्रामधील स्फोटायन पदावरून स्फोटसिद्धान्त भाष्यकारांचे वेळीं वैयाकरणांमध्यें प्रसृत होता व स्फोटायन ऋषी हा शब्दस्फोट प्रतिपादन करणारा एक वैयाकरण होता असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. या प्रकृतिभाव प्रकरणांत प्लुत व प्रगृह्य स्वरांना प्रकृतिभाव सांगणारें ' प्लुतप्रगृह्या अचि नित्यम् ' (सू. १२५ ) हें महत्त्वाचें सूत्र आहे. त्याप्रमाणेंच 'इकोऽसवर्णे०' व 'ऋत्यकः' ( सू. १२७, १२८ ) या शाकल्याचार्यांच्या मतानें प्रकृतिभाव सांगणाऱ्या दोन सूत्रांनाही एक प्रकारचें महत्त्व आहे. शाकल हें वाहीक देशांतील एक नगर म्हणून भाष्यकारांनीं उल्लेख केला आहे. वाहीक देश हा त्या वेळच्या भारताच्या उत्तरेकडील विभागांतील पश्चिमेकडचा प्रांत होता व अतिशय निकट असल्यामुळें त्यावेळच्या शिष्टोच्चारणांतील संस्कृत भाषेवर या वाहीक प्रांतांतील उच्चारणवैशिष्ट्याचा बराच परिणाम झाला होता. अर्थबोध सुलभ व्हावा म्हणून विशिष्ट ठिकाणीं इ उ ऋ लृ यांचें संधीशिवाय समासामध्येंही उच्चारण हें वाहीक देशांतील एक भाषावैशिष्ट्य असावें; व या वैशिष्ट्याला 'शाकल' हें नांव वार्तिककारांचे वेळीं देण्यांत आलें असावें. ' सुट् कात्पूर्वः ' ( सू. १३५ ) या सूत्रापासून पाद संपेपर्यंत दोन पदांमध्यें येणाऱ्या सकार आगमाचें विशिष्ट ठिकाणीं विधान सूत्रकारांनीं केलें आहे, व लोकामध्यें सुट् आगमानें युक्त अनेक शब्द साधून उरलेल्या शब्दांचा पारस्कर गणामध्यें समावेश केला आहे. या ठिकाणीं भाष्यकारांनीं रूपसिद्धि करतांना धातूला उपसर्ग मागें लावून मग तिङ् प्रत्यय लावावे किंवा कारकवाचक प्रत्यय प्रथम लावून रूप सिद्ध झाल्यानंतर मागें उपसर्ग लावाला याचा विचार करून दोन्ही पक्षांमध्यें युक्तिवाद व ग्राह्यभाग असला तरी उपसर्ग मागें आहे असें समजूनच कर्त्रर्थीं किंवा कर्मार्थीं तिङ् प्रत्यय लाविले जातात असें विधान केलें आहे. यावरून ' पूर्वं धातुरुपसर्गेण युज्यते पश्चात्साधनेन ' हा पक्ष त्यांना ज्यास्त संमत होता असें दिसून येतें.

**२७७. उदात्तादिस्वरविधानान्हिक. (अ. ६ पा. १ आन्हिक ६ ) सामान्य स्वरविधी.**

धातूंना प्रत्यय लावून कृदन्त प्रातिपदिकें व प्रातिपदिकांना तद्धित प्रत्यय लावून तद्धितान्त-प्रातिपदिकें कशीं होतात, तसेंच धातूंना तिङ् प्रत्यय लावून तिङन्तपदें व प्रातिपदिकांना सुप् प्रत्यय लावून सुबन्त पदें कशीं होतात हें सूत्रकारांनीं तिसऱ्या, चौथ्या, व पांचव्या अध्यायांत सांगितलें. वाक्यामध्यें प्रयोग करतांना पदांचें स्वरसहित उच्चारण होत असल्यामुळें पदांच्या स्वरांचें विवेचन करणें क्रमप्राप्त झालें व तें या पहिल्या पादाच्या राहिलेल्या भागांत व पुढील पादांमध्यें सूत्रकारांनीं केलें आहे. एकश्रुति म्हणजे स्वररहित उच्चारण जरी यज्ञकर्मांमध्यें तसेंच इतर श्रौत व स्मार्त कर्मांमध्यें केव्हां केव्हां केलें जात असलें तरी वेदांचें पठनपाठन सस्वरच करण्यांत येत असे. लोकांच्या प्रचलित भाषेमध्येंही उदात्त अनुदात्त व स्वरित या सर्वांचें उच्चारण वेदमंत्रांच्या उच्चारणासारखें स्पष्ट होत नसलें तरी आघातयुक्त उदात्त स्वराचें उच्चारण दरेक सुबन्त व तिङन्त पदामध्यें केलें जात असे; म्हणूनच सूत्रकारांनीं शब्दसिद्धि व रूपसिद्धि करतांना भाषेंतील शिष्टप्रयुक्त सर्व शब्दांचें विवेचन केलें आहे व वैदिक शब्दांचें ठिकठिकाणीं दिसून येणारें वैशिष्ट्य दाखविलें आहे; त्याप्रमाणेंच स्वरांचे बाबतींतही भाषेमधील स्वरांचें विवेचन या व पुढील आन्हिकांमध्यें सूत्रकारांनीं केलें आहे व वैदिक शब्दांचें

आढळून येणारें वैशिष्ट्य दाखविलें आहे. या पादामधील ६६ स्वरसूत्रांपैकीं ‘ अनुदात्तं पदमेकवर्जम् ’ ( सू. १५८ ), ‘ अनुदात्तस्य च यत्रोदात्तलोपः ’ ( सू. १६१ ) आणि धातोः ( सू. १६२ ) हीं तीन अत्यंत सामान्य स्वरूपाचीं स्वरविधिसूत्रें आहेत. बाकींच्या सूत्रांपैकीं कांहीं सूत्रें विशिष्ट प्रत्ययांना च्, ञ्, त्, न्, ल् इत्यादि विशिष्ट इत् वर्ण जोडल्यामुळें विशिष्ट स्वर सांगणारीं आहेत,तर इतर कांहीं सूत्रांमध्यें विशिष्ट प्रत्ययामुळें विशिष्ट प्रकृतींना होणारे स्वर सांगितले आहेत हे स्वर वेदामध्यें व भाषेमध्यें सारखेच आढळून येतात. ‘अक्षेश्छन्दसि०’ ( सू. १७० ) ‘ ङ्याश्छन्दसि० ’ इत्यादि तीन सूत्रें ( सू १७८–१८० ), ‘ अन्तश्च तवै० ’ ( सू २०० ), ‘ जुष्टार्पिते च च्छन्दसि ’ ( सू. २०९ ) आणि ‘ नित्यं मन्त्रे ’ सू. २१० ) हीं सातच सूत्रें केवळ वेदामधील स्वरवैशिष्ट्य दाखविणारीं आहेत. प्रत्ययांचें स्वरवैशिष्ट्य सांगणाऱ्या सूत्रांमधील ‘सावेकाचस्तृतीयादिर्विभक्तिः’ (सू १६८), ‘अन्तोदात्तादुत्तरपदाद्०’ ( सू. १६९ ) ‘ शतुरनुमो नद्यजादी ’ ( सू. १७३ ) ‘ ह्रस्वनुड्भ्यां मतुप् ’ ( सू. १७६ ) ‘तास्यनुदात्तेत्०’ ( सू. १८६ ) आणि ‘ आदिः सिचोन्यतरस्याम् ’ (सू. १८७) हीं सूत्रें ज्यास्त महत्वाचीं आहेत. विशिष्ट तऱ्हेच्या शब्दांचे स्वर सांगणाऱ्या सूत्रांमध्यें ‘अभ्यस्तानामादिः’, ( सू. १८९ ) व ‘ आमन्त्रितस्य च ’ हीं दोन विशेष महत्वाचीं आहेत.

## २७८. पूर्वपदस्वरनिरूपणान्हिक ( अ. ६ पा. २ आन्हिक १ ) पूर्वपदप्रकृतिस्वराचें विवेचन.

या आन्हिकांत व पुढील आन्हिकांत सामासिक शब्दांच्या स्वरांचा विचार केला आहे. समासाचा शेवटचा स्वर उदात्त असतो असा साधारण नियम असला तरी समासांतील पूर्वपदाचा स्वर कांहीं ठिकाणीं कायम राहतो, कांहीं ठिकाणीं पूर्वपदाचा आदि उदात्त होतो तर कांहीं ठिकाणीं अन्त उदात्त होतो. पूर्वपदाच्या स्वराचा या आन्हिकांत प्रामुख्यानें विचार केल्यामुळें याला पूर्वपदस्वरनिरूपणान्हिक नांव देतां येईल. ‘ बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम् ’ ( सू. १ ) या सूत्रानें बहुव्रीहि समासामध्यें पहिल्या पदाचे स्वर कायम राहतात असें म्हटलें आहे. पीताम्बर, हर्यश्व इत्यादि समानाधिकरण–बहुव्रीहि समासांमध्यें उत्तर पदाचा कांहीं महत्त्वाचा विशेष विशेषणरूप पूर्वपदानें सांगितला असल्यामुळें पूर्वपदाचा स्वर कायम राहणें साहजिकच आहे. समानाधिकरण तत्पुरुष समासामध्यें सुद्धां कुमार, महत् यांसारख्या पूर्वपदालाच अर्थदृष्ट्या महत्त्व असल्यास पूर्वपदाचा स्वर कायम राहतो असें ‘ कुमारश्च ’...‘ कुरुगार्हपत० ’ ( सू. २६–४२ ) या सूत्रांवरून दिसून येतें. व्यधिकरण तत्पुरुष समासांमध्येंही पुष्कळ ठिकाणीं तुल्य या अर्थाचे शब्द, अव्यय शब्द, उपमान शब्द, तृतीयान्त शब्द, द्वितीयान्त शब्द, तादर्थ्यचतुर्थ्यन्त शब्द, सप्तम्यन्त शब्द व कृत्यप्रत्ययान्त शब्द हे पूर्वपद असल्यास अर्थमहत्त्वामुळें त्यांचे स्वर कायम राहतात ( सू. २ ). गतिसंज्ञक पूर्वपदाचेही कर्मवाचक क्त-प्रत्ययान्त उत्तरपद असतांना स्वर कायम राहतात ( सू. ४९ ). त्याप्रमाणेंच तवै–प्रत्ययान्त उत्तरपदाचे व त्यापूर्वीच्या गतिवाचक पूर्वपदाचे स्वर दोन्ही पदांना अर्थदृष्ट्या महत्त्व असल्यामुळें कायम राहतात. ( सू. ५१ ) ‘ अनिगन्तोऽञ्चतौ० ’ ( सू. ५२ ) या सूत्राचें विवेचन करतांना दोन निरनिराळ्या सूत्रांनीं सांगितलेल्या स्वरांची एकदम प्राप्ति आली असतां कोणत्या सूत्राला प्राधान्य द्यावें तें सांगितलें आहे. ‘ न्यधी च ’...‘ राजा च प्रशंसायाम् ’ ( ५३–६३ ) या सूत्रांमध्येंही पूर्वपदप्रकृतिस्वराचीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. ‘ आदिरुदात्तः ’ ( सू. ६४ ) हें अधिकार-सूत्र करून ‘ न भूताधिक० ’ ( सू. ९१ ) या सूत्रापर्यंत सर्व सूत्रांनीं वर दिलेलें अर्थ-

प्राधान्याचें धोरण लक्षांत घेऊनच पूर्वपदाच्या आदीला उदात्त सूत्रकारांनीं सांगितला आहे; तसेंच 'अन्तः'...'उत्तरपदवृद्धौ सर्वं च' (९२-१०५) या सूत्रांमध्यें पूर्वपदाच्या अन्ताला उदात्त सांगितला आहे. 'बहुव्रीहौ विश्वं०'...'निष्ठोपसर्ग०' (सू. १०६-११०) या सूत्रांनीं बहुव्रीहीला सामान्यतः सांगितलेल्या पूर्वपदप्रकृतिस्वराचे कांहीं अपवाद सांगितले आहेत. यानंतर 'उत्तरपदादिः' (सू. १११) हें अधिकारसूत्र करून पाद संपेपर्यंत म्हणजे प्रस्तुत आन्हिकाचा राहिलेला भाग व पुढील सपूर्ण आन्हिक यांमध्यें उत्तरपदाचे स्वर सांगितले आहेत; अर्थात् या ठिकाणीं पूर्वपदाला सर्वनिघात होतो.

## २७९. उत्तरपदस्वरनिरूपणान्हिक (अ.६ पा.२ आन्हिक २) उत्तरपदस्वराचें निरुपण.

मागील आन्हिकांत सूत्रकारांनीं उत्तरपदस्वर सांगण्यास आरंभ करून कांहीं सूत्रांनीं उत्तरपदाला आद्युदात्त सांगितल्यानंतर उत्तरपदाला प्रकृतिस्वर सांगण्यास आरंभ करून एकदम मध्येंच तें आन्हिक पुरें केलें आहे; व या आन्हिकाला सुरुवात केली आहे. या आन्हिकामध्यें उत्तरपदाच्याच स्वरांचें निरूपण चालू असल्यामुळें याला उत्तरपदस्वरनिरूपणान्हिक नांव देतां येईल. प्रस्तुत आन्हिक फारच लहान आहे; व प्रकरणही मागील आन्हिकांतीलच चालू आहे; म्हणून मागील आन्हिकांतच याचा सहज अंतर्भाव झाला असता व तसा करणें इष्टही झालें असतें. तरी पण 'गतिकारकोपपदात् कृत्' (सू. १३९) या सूत्राचें विवरण करावयाचें असल्यामुळें व तें करतांना 'यत्क्रियायुक्ताः प्रादयः तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवतः' या महत्त्वाच्या सिद्धान्ताचें प्रतिपादन करावयाचें असल्यामुळें हें आन्हिक निराळें केलें असावें. 'उभे वनस्पत्यादिषु युगपत्' व 'देवताद्वन्द्वे च' (सू. १४०,१४१) या दोन सूत्रांनीं अर्थमहत्त्व असतांना दोन्ही पदांचे स्वर जेथें कायम राहतात अशीं उदाहरणें दिलीं आहेत. या आन्हिकांत भाष्यकारांनीं जरी अवघ्या दहाच सूत्रांवर व्याख्या केली असली तरी निरनिराळे विधी व अपवाद सांगणारीं एकंदर एकसष्ट सूत्रें आहेत. 'आद्युदात्तं द्व्यच् छन्दसि' (सू. ११९) यासारखीं दोनचार सूत्रें सोडल्यास या व पूर्वींच्या दोनही आन्हिकांमधील जवळजवळ दोनशें सूत्रें लौकिक व वैदिक दोन्हीं प्रकारच्या शब्दांचे स्वर सांगणारीं आहेत; यावरून पाणिनिकालीं लोकामध्येंही सस्वर पदोच्चारण होत असे हें सिद्ध होतें. सामासिक शब्दांचें इतकें सांग विवेचन करूनही 'परादिश्छन्दसि बहुलम्' (सू. १९९) या शेवटच्या सूत्रामध्यें हे समासस्वर सूत्रांमध्यें सांगितल्याप्रमाणेंच वेदामध्यें आढळून येतात असें नाहीं असें प्रतिपादन करण्याकरितां सूत्रकारांनीं सूत्रामध्यें 'बहुलम्' हें पद घातलें आहे; व भाष्यकारांनीं 'परादिश्च परान्तश्च पूर्वान्तश्चापि दृश्यते । पूर्वादयश्च दृश्यन्ते व्यत्ययो बहुलं स्मृतः' असें 'बहुलम्' या शब्दाचें व्याख्यान केलें आहे.

## २८०. स्वरावरून अर्थपरीक्षण.

पाणिनीनें सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील उत्तरार्धामध्यें तिङन्त व सुबन्त शब्दांच्या स्वरांचें विवेचन केलें आहे व दुसऱ्या पादामध्यें सामासिक शब्दांच्या स्वरांचें विवेचन केलें आहे. हें विवेचन करतांना नेहमींच्या विवेचनपद्धतीप्रमाणें त्यानें कांहीं सामान्य नियम व कांहीं अपवाद दिले आहेत. पाणिनिकालीं स्वरयुक्त शब्दोच्चारण हें कांहीं विशिष्ट वैदिक ग्रंथ व विशिष्ट वैदिक कर्में यांशिवाय वैदिक भाषेमध्यें सर्वत्र उपलब्ध असल्यामुळें व शिष्टलोकव्यवहारांतही स्वभावतःच शब्दोच्चारण स्वरयुक्त होत असल्या-

मुळें सामान्य नियम व त्याला बारीकसारीक अनेक अपवाद सांगून पाणिनीला स्वरविवेचन करतां आलें. पाणिनीच्या नंतर लवकरच बहुजनसमाजाच्या व्यवहारांमध्यें संस्कृतभाषेचें स्थान स्वररहित प्रांतीय संस्कृत भाषांनीं व प्राकृतभाषांनीं घेतलें. ग्रंथनिर्मिति संस्कृत भाषेंत चालू राहिली; पण त्या भाषेमध्यें तसेंच विद्वत्सभांमधील व पाठशालांमधील भाषेमध्येंही स्वराकडील लक्ष कमी झालें, हें वार्तिककार व भाष्यकार यांनीं स्वरप्रक्रिया व वैदिकी प्रक्रिया यांचें विवेचन फारच थोडक्यांत केलें आहे यावरून स्पष्ट दिसून येतें. भाष्यकारांच्या कालानंतर संस्कृत भाषेचें अध्ययन व अध्यापन हें बहुतांशीं शास्त्रीय व लौकिक संस्कृत वाङ्मयापुरतेंच मर्यादित राहिलें व वेदग्रंथांना स्थान वेदपाठी लोकांच्या पठनपाठनामध्येंच राहिलें. याचा परिणाम असा झाला कीं, व्याकरणग्रंथनिर्मिति व अध्ययनाध्यापन यांमध्यें स्वर व वैदिकी प्रक्रिया यांचेकडे लोकांचें पूर्ण दुर्लक्ष झालें व व्यवहारांतील शब्दोच्चारण स्वररहितच झालें. त्यामुळें पाणिनीनें दिलेलीं स्वरकार्यें करून सिद्ध झालेले सस्वर शब्द प्रयोगांमध्यें कसे उपलब्ध होतात हें पाहणें झाल्यास हल्लीं उपलब्ध असलेल्या सस्वर संहिता व ब्राह्मण ग्रंथ यांचा स्वरदृष्ट्या सूक्ष्म अभ्यास करणें जरूर आहे. अर्थात् हें काम केवल वैयाकरण अथवा केवल मीमांसक, निरुक्तिज्ञ, भाषाशास्त्रज्ञ अथवा शब्दार्थचिकित्सक विद्वानाकडून होण्यासारखें नाहीं. कमींतकमी म्हणजे उपलब्ध वेदवाङ्मयाचा संपूर्ण अभ्यास व प्रातिशाख्यामधील व पाणिनिसूत्रांमधील स्वरप्रकरणाचें संपूर्ण परिशीलन केलेल्या व कामापुरती मीमांसा व श्रौत यांची माहिती असलेल्या विद्वानाकडूनच हें काम होणें शक्य आहे. ऋग्वेदसंहितेसारखा एकादा उत्तम ग्रंथ घेऊन पाणिनिसूत्रांप्रमाणें स्वरसिद्धि कोठें आढळून येत नाहीं किंवा आढळून आल्यास वेदभाष्यकारांनीं दिलेल्या अर्थापेक्षां निराळा अर्थ घ्यावा लागतो काय व तो घेतल्यास जेथें जेथें तो शब्द दृष्टीस पडतो तेथें तेथें तो अर्थ लागू पडतो काय या व यासारख्या प्रश्नांचेंच विवेचन केल्यास एकादा मोठा निबंध किंवा लहानसा ग्रंथच लिहावा लागेल; व तसा कोणी लिहिल्यास वेदग्रंथाचा अभ्यास करण्याच्या हल्लींच्या ज्या पद्धती उपलब्ध आहेत त्यांमध्यें एका नव्या पण अत्यंत महत्त्वाच्या पद्धतीची भर पडेल. या पद्धतीचा अवलंब करून अर्थचिकित्सा केल्यास पाणिनीनें अर्थाकडे पूर्ण लक्ष देऊन स्वरविवेचन केलें असल्यामुळें स्वरदृष्ट्या जर निराळा अर्थ घेणें भाग पडेल तर तो इतर अर्थापेक्षां ज्यास्त ग्राह्यच ठरेल यांत शंका नाहीं. अर्थाकडे लक्ष देऊनच वेदद्रष्ट्या ऋषींनीं वेदमन्त्र रचिले व योग्य स्वरानें युक्तच उच्चारण वैदिक ऋषी करीत असत; याला पुरावा इन्द्रशत्रु शब्दाचें उच्चारण चुकीचें झाल्यामुळें वृत्र हा इन्द्राचा शत्रू होण्याऐवजीं इन्द्रच त्याचा शत्रू ( मारणारा ) झाला ही आख्यायिका सर्वश्रुतच आहे.

## २८१. स्वराविषयीं सामान्य विचार.

व्यवहारामध्यें लोक बोलत असतात त्या वेळीं त्यांचेकडून त्यांना न कळतां त्या भाषेचें सस्वरच उच्चारण होत असतें. वृत्तबद्ध काव्यनिर्मितीचे वेळीं कवींकडून उदात्तासारखा जो मुख्य स्वर असतो त्याचेकडे लक्ष देऊनच छन्दोनिर्मिति केली जाते. कवी हे लौकिकप्रयोगामध्यें जसा हा मुख्य स्वर म्हणजे आघात आढळून येत असेल त्याप्रमाणेंच त्याचें उच्चारण काव्यगायनांत होईल अशीच काव्यरचना करीत असतात. मराठी, गुजराती, इंग्रजी कोणतीही भाषा घ्या; दोन किंवा अधिक अक्षरांच्या शब्दाचें उच्चारण करतांना विशिष्ट एकाच स्वरावर आघात देऊन लोक उच्चार करतात. सामान्यतः हा आघात गुरु स्वरावर दिलेला असतो व

जोडशब्द अथवा सामासिक शब्द असल्यास दुसरें अर्थ साधारणतः अर्थदृष्ट्या ज्यास्त महत्त्वाचें असल्यामुळें हा आघात दुसऱ्या अर्धावर आढळून येतो. कधींकधीं पहिलें अर्ध अर्थदृष्ट्या ज्यास्त महत्त्वाचें असेल तर त्यामध्येंही हा आघात दिसून येतो. प्रत्ययांना प्रकृतीपेक्षां अर्थदृष्ट्या ज्यास्त महत्त्व असल्यामुळें प्रत्ययस्वर हा साधारणतः आघातयुक्त म्हणजे उदात्त आढळून येतो. मराठी गुजराती वगैरे बोलभाषांमध्यें प्रथमा व द्वितीया विभक्तींच्या एकवचनाला बहुशः प्रत्यय नसल्यामुळें मूळ शब्दाचाच आघात कायम राहतो; व मूळ शब्द ह्रस्वान्त असल्यास त्याच्या पूर्वीच्या गुरु स्वराचें आघातयुक्त उच्चारण होतें. संस्कृतमध्यें प्रथमा व द्वितीया विभक्तींच्या प्रत्ययांचा प्रातिपदिकाच्या शेवटच्या स्वराशीं एकादेश संधि झाल्यास प्रातिपदिकाचा अन्त्य स्वर गुरु होतो व त्याचा उदात्त स्वर कायम राहतो. अनेक पदें मिळून झालेल्या वाक्याचा उच्चार करतांना भाषेमध्यें कांहीं शब्दांना–विशेषतः क्रियापदांना–कर्त्याच्या मानानें कमी महत्त्व आल्यामुळें त्यांचें आघातरहित म्हणजे सर्वानुदात्त उच्चारण होतें; पण, यदि वगैरे पदें घातल्यामुळें वाक्यार्थामध्यें क्रियापदाला प्राधान्य आल्यास क्रियापदाचें आघातयुक्त उच्चारण होतें. हाक मारतांना पहिल्या अक्षरावर साधारणपणें जोर ज्यास्त असल्यामुळें आद्य स्वराचें उदात्त उच्चारण आढळून येतें.

## २८२. अलुक्समासान्हिक ( अ. ६ पा. ३ आन्हिक १ ) अलुक् समासाचें विवेचन.

समास हें वाक्यांतील निरनिराळ्या संबद्ध पदांच्या प्रयोगाचें एक वैशिष्ट्य थोड्या फार प्रमाणांत सर्व भाषांमध्यें आढळून येतें. सामासिक शब्दांमध्यें दोन संबद्ध पदें एकाजवळ एक ठेवलीं जातात, व त्या दोन पदांतील संबंध दाखविणारा विभक्ति–प्रत्यय उच्चारला जात नाहीं. वाक्यांतील सर्व पदें एकमेकांशीं संबद्ध असतात, व हा संबंध विभक्तिप्रत्ययांनीं दाखविला जातो; हा संबंध अत्यंत प्रसिद्ध असल्यास किंवा संदर्भावरून त्याचें ज्ञान होणें सहज शक्य असल्यास विभक्तिप्रत्यय गाळला जातो व दोन किंवा अधिक पदें एकाजवळ एक—संधिकार्य होत असल्यास संधिकार्य करूनच – उच्चारलीं जातात; या विभक्तिप्रत्ययांशिवाय संधिकार्य करून एकामागून एक उच्चारलेल्या पदांना समास म्हणतात. समासांतील सर्व शब्दांचें मिळून एकच पद समजलें जातें, व त्या सामासिक पदामध्यें एकच उदात्त स्वर असतो. कधीं कधीं समासाची उपयुक्तता कायम ठेवून मधला विभक्ति प्रत्यय न गाळतां दोन पदांचें समासासारखेंच उच्चारण पदांचा क्रम कायम ठेवून करण्यांत येतें; व या उच्चारणास अलुक्समास म्हणतात. पाणिनीनें हे अलुक्-समास प्रस्तुत आन्हिकामध्यें सांगितले असल्यामुळें या आन्हिकाला अलुक्समासान्हिक नांव देतां येईल. ‘ अलुगुत्तरपदे ’ ( सू. १ ) या अधिकाररूप पहिल्या सूत्रांत उत्तरपद पुढें असतांना समास केला तरी विभक्तिप्रत्ययाचा लुक् होत नाहीं असें सांगितलें आहे; व केव्हां कोणत्या विभक्तीचा, व कोणत्या शब्दाला ती विभक्ति लागली असतांना, व कांहीं ठिकाणीं कोणत्या अर्थीं तो लुक् होतो हें ‘ पञ्चम्याः स्तोकादिभ्यः ’......‘ विभाषा स्वसृपत्योः ’ ( सू. २-२४ ) या सूत्रांमध्यें सांगितलें आहे. या अलुक्-समासामध्यें जी विभक्ति व वचन कायम राहतात त्यांना अनुसरूनच त्या सामासिक शब्दाचा साधारणपणें अर्थ असतो. उदाहरणार्थ–गोषुचरः, आत्मनेभाषः, प्रावृषिजः या शब्दांचा अर्थ गोचरः, आत्मभाषः किंवा प्रावृड्जः यांसारखा नसतो; तसाच गवि चरः किंवा आत्मभ्यो भाषः किंवा प्रावृट्सु जातः यांसारखाही नसतो. विभक्तिप्रत्यय व वचनप्रत्यय यांना अनुसरून तो रूढार्थासारखा असतो. कधीं कधीं युधिष्ठिर, आत्मनेपद, स्तम्बेरम, इत्यादि समासांचा संज्ञारूप अर्थही दिसून येतो.

## २८३. पुंवद्भावान्हिक ( अ. ६ पा. ३ आन्हिक २ ) पुंवद्भाव संज्ञेचा अर्थ व विवेचन.

ज्याप्रमाणें विभक्तिप्रत्ययाचा अलुक् हें समासाचें एक वैशिष्ट्य आहे त्याप्रमाणेंच पुंवद्भाव म्हणजे पूर्वपदाचें स्त्रीलिंगी रूप जाऊन पुंलिंगी रूप येणें हेंही एक वैशिष्ट्य आहे; व या पुंवद्भावाचें विवेचन या आन्हिकामध्यें प्रामुख्यानें केलें असल्यामुळें याला पुंवद्भावान्हिक म्हणतां येईल. कर्मधारय व बहुव्रीहि समास हे कांहीं विशिष्ट उदाहरणें सोडल्यास समानाधिकरण असतात; म्हणजे यांतील समासघटक शब्द एकच व्यक्ती दाखवीत असल्यामुळें त्यांना समान विभक्तिप्रत्यय लागलेले असतात. समास झाल्याबरोबर विभक्तिप्रत्ययांचा लुक् होतोच; पण स्त्रीत्वार्थी असलेल्या टाप् ङीप् इत्यादि प्रत्ययांचाही लोप झालेला दृष्टीस पडतो. पाणिनीनें या स्त्रीप्रत्ययाच्या लोपाचें लोप म्हणून वर्णन केलें नाहीं. त्यानें स्त्रीप्रत्ययान्त सामासिक शब्दाला पुंवद्भाव होतो असें सांगितलें आहे. हा पुंवद्भाव कार्यातिदेश न घेतां रूपातिदेशच घ्यावयाचा असतो. ' स्त्रियाः पुंवत् भाषितपुंस्कात्० ' ( सू. ३४ ) या सूत्रानें हा पुंवद्भाव समानाधिकरण अशा भाषितपुंस्क शब्दाला सांगितला आहे. समान अर्थी जो शब्द स्त्रीलिंगी व पुंल्लिंगी चालतो त्या शब्दाला भाषितपुंस्क म्हणावें असा भाषितपुंस्क शब्दाचा अर्थ भाष्यकारांनीं दिला आहे. विशेषण शब्द घातल्यास अतिव्याप्ति दोष येतो, व गुणवचन शब्द घातल्यास अव्याप्ति दोष येतो हें लक्षांत घेऊन जरी पाणिनीनें भाषितपुंस्क शब्द सूत्रामध्यें घातला असला तरी केवळ स्त्रीजातीवरच राहणारे गर्भ धारण करणें, प्रसूत होणें इत्यादि धर्म दाखविणाऱ्या शब्दांचा पुलिंगी प्रयोग करणें शक्य नसल्यामुळें गर्भिणी भार्या यस्य, प्रसूता भार्या यस्य या अर्थी पुंवद्भाव होऊन गर्भिभार्यः, प्रसूतभार्यः अशीं रूपें होणें शक्य नाहीं अशी अडचण येथें भाष्यकारांनीं दाखविली आहे; व गर्भिभार्यः, प्रसूतभार्यः अशीं इष्ट रूपें होण्याकरितां यत्न करावा असें सांगितलें आहे. सूत्रांतील ' स्त्रियाः ' या शब्दाचा ' स्त्रीप्रत्ययाचा ' असा अर्थ करावयाचा, अथवा ' स्त्रीलिंगी शब्दाचा ' असा अर्थ करावयाचा, अथवा 'स्त्रीलिंगी अर्थाचा' असा अर्थ करावयाचा याचें विवेचन करून ' स्त्रीलिंगी शब्दाचा ' असा अर्थ करणें चांगलें असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. ' तसिलादिषु आ कृत्वसुचः ' ( सू ३५ ) या सूत्रानें तसिल् प्रत्ययाला आरंभ करून कृत्वसुच् प्रत्ययापर्यंत सांगितलेल्या प्रत्ययांपूर्वी स्त्रीलिंगी शब्दाला पुंवद्भाव होतो असें सांगितलें आहे वार्तिककारांनीं या सर्व प्रत्ययांपूर्वीं पुंवद्भाव आढळून येत नसल्यामुळें व इतर कांहीं प्रत्ययांपूर्वीं आढळून येत असल्यामुळें प्रत्ययांचें परिगणन केलें आहे. जातिवाचक शब्दाला हा पुंवद्भाव होत नाहीं; गुणवाचक शब्दांचे बाबतींतच तो विशेषतः दिसून येतो. कुक्कुटाण्ड, मृगपद, काकशाव इत्यादि ठिकाणीं कुक्कुटी, मृगी, काकी या शब्दांना पुंवद्भावाचें विधान वार्तिककारांनीं केलें आहे.

## २८४ उत्तरपदनिमित्तकादेशान्हिक ( अ. ६ पा. ३ आन्हिक ३ ) उत्तरपदनिमित्तानें होणारे आदेश.

उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदांना होणाऱ्या कार्यांचा विचार सहाव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादामध्यें केला आहे. त्यांमध्येंही अलुक् समासांचा विचार पहिल्या आन्हिकामध्यें केला आहे, दुसऱ्या आन्हिकामध्यें पुंवद्भावाचा विचार केला आहे व या तिसऱ्या आन्हिकांत आत्व, ह्रस्व, इत्यादि कार्यांचा विचार केला आहे. ' आन्महतः० ' ( सू. ४६ ) या सूत्रानें महत्

शब्दाला समानाधिकरण उत्तरपद असतांना आत्व सांगितलें आहे; म्हणजे महत् शब्दाला महा आदेश सांगितला आहे. भाष्यकारांनीं या ठिकाणीं महद्‌भूतः चन्द्रमाः या उदाहरणांत आत्व कां होत नाहीं याचा विचार जुनीं श्लोकवार्तिकें उद्धृत करून केला आहे. विशिष्ट शब्दांपूर्वी किंवा प्रत्ययांपूर्वी ‘हृदयस्य हृल्लेख०’ (सू. ५०) या सूत्रानें हृदय शब्दाला हृद्, ‘पादस्य पदाजि०’......‘वा घोष०’ (५१-५६) या सूत्रांनीं पाद शब्दाला पद्, त्याप्रमाणेंच ‘उदकस्योदः०’......‘मन्थौदन०’ (सू. ५७-६०) या सूत्रांनीं उदक शब्दाला उद् असे आदेश सांगितले आहेत. ‘इको ह्रस्वोऽङ्यो गालवस्य’......‘खित्यनव्ययस्य’ (सू. ६१-६६). या सूत्रांनीं पूर्वपदाच्या शेवटीं असलेल्या दीर्घ स्वराला ह्रस्व सांगितला आहे. ‘अरुर्द्विषदजन्तस्य मुम्’.....‘रात्रेः कृति विभाषा’ (सू. ६७-७२) या सूत्रांनीं विशिष्ट कृत्प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला मुम् आगम सांगितला आहे. ‘नलोपो नञः’ ......‘नगोऽप्राणिषु०’ या सूत्रांनीं ‘न’ या पूर्वपदांतील नकाराचा लोप, त्याप्रमाणेंच ‘सहस्य सः०’ ......‘वोपसर्जनस्य’ (सू ७८-८२) या सूत्रांनीं सह शब्दाला स आदेश सांगितला आहे. ‘समानस्य छन्दसि०’......‘दृग्दृशवतुषु’ (सू. ८४-८९) या सूत्रांनीं समान शब्दाला स आदेश सांगितला आहे. यानंतर सर्वनामें व कांहीं इतर शब्द यांना विशिष्ट उत्तरपद पुढें असतांना विशिष्ट आदेश सांगूनही कांहीं अगदींच विशिष्ट आदेश ज्यांच्या पूर्वपदाला होतात असे शब्द पृषोदरगणामध्यें घातले आहेत; व त्यानंतर ‘संहितायाम्’ (सू. ११४) हें अधिकारसूत्र करून दोन शब्दांचें अत्यन्त सांनिध्य असतांना होणारीं तुगागम वगैरे कार्यें सांगून सूत्रकारांनीं हा सहाव्या अध्यायाचा तिसरा पाद पूर्ण केला आहे. भाष्यकारांनीं ‘पृषोदरादीनि यथोपदिष्टम्’ (सू १०९) या शेवटच्या सूत्रांतील ‘यथोपदिष्टम्’ पदाचें व्याख्यान करतांना शिष्टांनीं प्रयोग केलेले शब्द शुद्ध समजावे असें सांगून आर्यावर्तामध्यें राहणारे सदाचारसंपन्न लोक हे शिष्टलोक अशी व्याख्या केली आहे व आर्यावर्ताच्या हिमालय व पारियात्र या उत्तर-दक्षिण सीमा तसेंच कालकवन व अदर्श या पूर्व-पश्चिम सीमा दिल्या आहेत. यावरून गांधार, कुरु, शूरसेन, मालव, सांकाश्यक, कोसल व साकेत हे प्रांत आर्यावर्तांत समाविष्ट होत असत व त्या प्रांतांतील भाषा व शब्दोच्चारण हीं शिष्टप्रयुक्त समजलीं जात असत. आर्यावर्ताच्या बाहेर पश्चिमेकडे वाहीक, सौवीर व सिंधु, दक्षिणेकडे दक्षिणापथ, पूर्वेकडे मगध अङ्ग, वङ्ग, कलिङ्ग, व उत्तरेकडे कम्बोज या प्रांतांतील संस्कृत भाषा पाणिनीय व्याकरणाला बऱ्याच ठिकाणीं सोडून असे व त्या भाषेंतील जे कांहीं प्रयोग आर्यावर्तामध्यें प्रचारांत आले होते त्यांचाच समावेश आपल्या व्याकरणामध्यें सूत्रकारांनीं वार्तिककारांनीं व भाष्यकारांनीं त्या प्रांतांचा नामनिर्देश करून केला आहे. भाष्यकारांचे वेळीं वाहीक, मगध, कलिङ्ग इत्यादि देशांतील संस्कृत भाषा व शब्दोच्चारण जरी शास्त्रशुद्ध नसलीं व लोकांचें आचरणही आर्यावर्तांतील लोकांच्या इतकें शुद्ध नसलें तरी तेथील लोकांविषयीं तिरस्कारयुक्त भावना नव्हती. कलिङ्गेष्ववात्सीः । ‘नाहं कलिङ्गाञ् जगाम’ या उदाहरणवाक्यांत त्याप्रमाणेंच ‘वाहीका नाम ते देशा न तत्र दिवसं वसेत्’ या कर्णपर्वांतील श्लोकामध्यें आढळून येणारा कलिङ्ग, वाहीक इत्यादि देशांतील लोकांविषयीं अनादर हा भाष्यकारांचे नंतर कांहीं शतकांनीं लोकांमध्यें दिसून आला.

---

## अङ्गाधिकार

### २८५. दीर्घाद्यङ्गकार्यान्हिक (अ. ६ पा. ४ आन्हिक १) अङ्गाधिकाराचें सामान्य-विवेचन.

सूत्रकारांनीं सहाव्या अध्यायाच्या चौथ्या पादाच्या पहिल्या 'अङ्गस्य' (सू. ६।४।१) या सूत्रापासून सातवा अध्याय संपेपर्यंत सर्व सूत्रांनीं प्रत्ययामुळें मागील अंगाला होणारीं कार्यें व अंगामुळें पुढील प्रत्ययाला होणारीं कार्यें सांगितलीं असल्यामुळें या पांच पादांना अंगाधिकार ही संज्ञा वैयाकरण संप्रदायामध्यें दिली जाते. महाभाष्याच्या निरनिराळ्या प्रकरणांपैकीं नवान्हिकी व अंगाधिकार हीं प्रकरणें मुख्य व महत्त्वाचीं गणिलीं जातात व या दोन प्रकरणांचेंच अध्यापन प्रामुख्यानें केलें जातें. अष्टाध्यायीच्या पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादावरील भाष्याचीं नऊ आन्हिकें अथवा प्रकरणें असल्यामुळें पहिल्या पादावरील भाष्याला नवान्हिकी ही संज्ञा दिली जाते. या नवान्हिकी प्रकरणामध्यें व्याकरणाच्या मुख्य मुख्य सिद्धांतांचें भाष्यकारांनीं केलेलें विवेचन वाचीत असतां भाष्यकारांच्या अगाध पांडित्य, प्रतिभासंपत्ति व विद्वत्ता या गुणांचें सुंदर मीलन दृष्टोत्पत्तीस येतें. अंगाधिकार प्रकरणाला रूपसिद्धीचे दृष्टीनें फार महत्त्व आहे. भाष्यकारांनीं अंगाधिकाराचें निरूपण करतांना कांहीं ठिकाणीं रूपसिद्धीचे वेळीं निरनिराळ्या कार्यांची प्राप्ति, त्यांमध्यें दिसून येणारा विरोध व त्याचा परिहार यांविषयीं केलेलें विवरण अत्यंत पाण्डित्यपूर्ण आहे व तें वाचतांना त्यांची विलक्षण सूत्रोपस्थिति व बुद्धिकौशल्य यांचा पदोपदीं अनुभव येतो. 'अङ्गस्य' (सू. १) या सूत्रांतील अङ्गस्य ही षष्ठी स्थानषष्ठी समजावी अथवा अवयवषष्ठी समजावी याविषयीं विवेचन करतांना भाष्यकारांनीं संबन्धसामान्यवाचक षष्ठी घ्यावी असा निर्णय देऊन सर्व अडचणी दूर केल्या आहेत. या अंगाधिकारांतील कार्यांचें वैशिष्ट्य म्हणजे त्यांची विविधता. कांहीं रूपें साधतांना रूपसिद्धि होतोंपर्यंत दहाचे वर सूत्रांचा उपयोग करावा लागतो व तितक्याच किंवा त्याहूनही अधिक सूत्रांचा परिहार करावा लागतो. हा परिहार सूत्रकारांनीं या चवथ्याच पादामध्यें आभीयासिद्धत्वाची व एकादेशशास्त्राची असिद्धता सांगून केला आहे. 'पूर्वत्रासिद्धम्' (सू. ८।२।१) या सूत्रानें सांगितलेल्या असिद्धत्वामुळें तर अनेक ठिकाणीं अनिष्ट कार्यांचा परिहार केलाच आहे. याशिवाय सूत्रकारांनीं 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हा विरोध-परिहाराचा राजमार्ग करून दिलाच आहे. वार्तिककारांनीं पूर्वीं सांगितलेलें कार्यही अनेक ठिकाणीं करावें म्हणून मुद्दाम सांगितलें आहे व भाष्यकारांनीं तशा ठिकाणीं व अन्य कांहीं ठिकाणींही 'विप्रतिषेधे परं कार्यम्' (सू. १।४।२) या सूत्रांतील 'पर' शब्दाचा इष्ट अर्थ करून 'विप्रतिषेधे०' सूत्रानेंच तें कार्य करतां येतें असें म्हटलें आहे. या मार्गाशिवाय नित्यबलीयस्त्व व अंतरङ्गबलीयस्त्व हेही मार्ग वार्तिककारांनीं इष्ट कार्यें घडवून आणण्याकरितां दाखविले आहेत; व भाष्यकारांनीं बहिरङ्गासिद्धत्वही कित्येक ठिकाणीं सांगितलें आहे. एकंदरींत, अंगाधिकार भाष्याचा पूर्ण अभ्यास केल्यास प्रयोगांमध्यें आढळून येणाऱ्या कोणत्याही प्रकारच्या शब्दाची पाणिनिप्रक्रियेप्रमाणे रूपसिद्धी करतां येण्यास मुळींच अडचण पडत नाहीं हें अंगाधिकारभाष्याच्या पठनपाठनाचें विशिष्ट उपयुक्तत्व आहे. भाष्यकारांनीं अंगाधिकारांतील सूत्रांचे व्याख्यानास उपयुक्त अशीं पूर्वाचार्यांचीं श्लोकवार्तिकें अनेक ठिकाणीं उद्धृत केलीं आहेत व अनेक परिभाषावचनेंही सूत्रांवरून ज्ञापकानें सिद्ध केलीं आहेत.

उदाहरणार्थ प्रस्तुत आह्निकांतच ' नामि ' ( सू. ३ ) ' सौ च ' ( सू. १३ ) ' श्वोः शूठ्० ' ( सू. १९ ) या सूत्रांवर श्लोकरूप वार्तिकें देऊन भाष्यकारांनीं पूर्वपक्षोत्तरपक्षरूप विवेचन केलें आहे. कांहीं ठिकाणीं पूर्वत्रासिद्धत्व, योगविभाग, नियमविधि व भूतपूर्वगति यांचा अवलंब करून तर इतर कांहीं ठिकाणीं संनिपातपरिभाषा, निर्दिश्यमानपरिभाषा, अननुबन्धक-परिभाषा व तदनुबन्धकपरिभाषा यांचा उपयोग करून रूपसिद्धि केली आहे. ' अङ्गस्य ' या अधिकाराचीं प्रयोजनेंही वार्तिककारांनीं ( सू ६।४।१ वा. ५-१० ) या वार्तिकवचनांनीं सांगितलीं आहेत; व ' अर्थवत्० ' आणि ' प्रत्ययग्रहणे० ' या परिभाषांचा उपयोग केल्यास ' अङ्गस्य ' या अधिकाराची जरूर नाहीं असें म्हटलें आहे; व भाष्यकारांनीं वार्तिककारांच्या म्हणण्याला अनुमोदन दिलें आहे.

## २८६. आभीयासिद्धत्वाह्निक ( अ. ६ पा. ४ आह्निक २ ).

या आह्निकांत प्रथमतः ' असिद्धवदत्राभात् ' ( सू. २२ ) या सूत्रानें आभीयाधिकारां-तील सूत्रें ( सू २२-१२८ ) एकमेकांना असिद्ध होतात असें सांगून ' श्नान्नलोपः ' इत्यादि ( सू. २३-३३ ) सूत्रांनीं नकाराचा लोप, 'शास इदङ्हलोः' इत्यादि ( सू ३४-४५ ) सूत्रांनीं धातूंच्या अवयवांना होणारे आदेश, तसेंच ' आर्धधातुके ' ( सू. ४६ ) हें अधिकारसूत्र सांगून आर्धधातुक प्रत्यय करावयाचा असतांना होणारीं कार्यें जरी सांगितलीं असलीं तरी आभीया-सिद्धत्व-कल्पनेचें विवेचन प्रामुख्यानें केलें असल्यामुळें याला आभीयासिद्धत्वाह्निक म्हणतां येईल. या आभीयासिद्धत्व अधिकाराचें स्वरूप, त्याची उपयुक्तता व त्याची मर्यादा यांविषयीं वार्तिककारांचीं वार्तिकवचनें व श्लोकवार्तिकें उद्धृत करून संपूर्ण विवेचन भाष्यकारांनीं केलेलें आहे. या आभीयाधिकारांतील एक कार्य होऊन गेल्यावर तें असिद्ध समजलें गेल्यामुळें या अधिकारांतीलच दुसरें कार्य आदेशाच्या निमित्तानें आल्यास तें होत नाहीं, व स्थानीच्या निमित्तानें आल्यास तें होऊं शकतें; असें या अधिकाराचें थोडक्यांत स्वरूप सांगतां येईल. या अधिकारांतीलच दोन कार्यें एकदम प्रवृत्त झाल्यास परत्वानें व्यवस्था करावी; त्याप्रमाणेंच समानाश्रय आभीयकार्यांविषयींच हें आभीयासिद्धत्व स्वीकारावें असें येथें भाष्यकारांनीं स्पष्ट सांगितलें आहे. ' जनसनखनां सञ्झलोः ' ( सू. ४२ ) या सूत्राचें विवेचन करतांना भाष्य-कारांनीं ' सन् अथवा झल् पुढें असतांना ' असा अर्थ करावा, किंवा ' झलादि सन् पुढें असतांना ' असा अर्थ करावा अशा दोन्ही पक्षांचा विचार करून योगविभागानें इष्टसिद्धि केली आहे. ' आर्धधातुके ' ( सू. ४६ ) या अधिकारसूत्रांतील ' आर्धधातुके ' या पदाचा आर्धधातुक पुढें असतांना असा स्वाभाविक अर्थ पुढील सूत्रांमध्यें पुष्कळ ठिकाणीं घेतां येतो; पण कांहीं ठिकाणीं तसा अर्थ घेतल्यास प्रत्यय लागून त्याला आर्धधातुक संज्ञा होण्यापूर्वींच कांहीं अनिष्ट कार्यें होऊं लागतात, तीं न व्हावीं याकरितां 'आर्धधातुके' याचा अर्थ 'आर्धधातुक-विषये' असा भाष्यकारांनीं केला आहे; व आर्धधातुके या अधिकाराचीं प्रयोजनें दिलीं आहेत. 'भ्रस्जो रोपधयो०' (सू. ४७) या सूत्राचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं 'भ्रस्जो रोपधयोर्लोपः आगमो रम् विधीयते ' हें भारद्वाजवार्तिक उद्धृत केलें आहे; यावरून भारद्वाजीय व्याकरण भाष्यकारांचे वेळीं लोकामध्यें प्रचलित होतें असें दिसतें. याविषयीं मागें परि. १४८ मध्यें सविस्तर विवेचन केलें आहे.

## २८७ आभीयकार्यान्हिक (अ. ६ पा. ४ आन्हिक ३). आभीयाधिकारांतील अंगकार्यें.

'स्यसिच्सीयुट्तासिषु०' (सू. ६२) या सूत्रांत सूत्रकारांनीं भावे किंवा कर्मणि प्रयोगामध्यें स्य सिच् सीयुट् व तास् हे प्रत्यय पुढें असतांना उपदेशीं स्वरान्त धातू व हन्, ग्रह् आणि दृश् धातू हे अनिट् असले तरी त्यांना इट् आगम व चिण् पुढें असतांना होणारीं जीं वृद्धि वगैरे कार्यें तीं होतात असें सांगितलें आहे. भाष्यकारांनीं चिण्वद्भाव म्हणून प्रसिद्ध असलेल्या या अतिदेशाचीं प्रयोजनें पूर्ववैयाकरणांचा एक श्लोक उद्धृत करून सांगितलीं आहेत. 'दीङो युडचि क्ङिति'...'एरनेकाचः०' (सू. ६३-८२) या सूत्रांनीं विशिष्ट आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना मागील अंगाला होणारीं कार्यें सांगितलीं आहेत; व त्यानंतर 'ओः सुपि' ...'छन्दस्युभयथा' (८३-८६) या सूत्रांनीं सुप् प्रत्यय पुढें असतांना होणारीं अंगकार्यें सांगितलीं आहेत. 'दोषो णौ'...'खचि ह्रस्वः' (सू. ९०-९४) या सूत्रांनीं णिच् पुढें असतांना विशिष्ट धातूंना होणारीं अंगकार्यें सांगितलीं आहेत; व त्यानंतर ह्रस्व, उपधालोप, विशिष्ट प्रत्ययांना होणारे विशिष्ट आदेश, विशिष्ट प्रत्ययांचे लोप, वगैरे अनेक अंगविधी सांगून एत्वाभ्यासलोप नांवानें प्रसिद्ध असलेले लिट् प्रत्ययांपूर्वींच होणारे भात्वादेश सांगितले आहेत. 'अत उत्सार्वधातुके' (सू. ११०) या सूत्रानें कृ धातूच्या अकाराला उकार सांगून सार्वधातुक कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना कुर् असें धातुस्वरूप झाल्यामुळें कुर्व् असा संस्कृत धातू व कुव्व् असा प्राकृत धातू असे दोन धातू भाष्यकारांच्या वेळीं लौकिक प्रयोगांत असावे असें दिसून येतें. जैन संस्कृत टीकावाङ्मयामध्यें कुर्वणा, विकुर्वणा या शब्दांचे प्रयोग अनेक ठिकाणीं दिसून येतात.

## २८८. भसंज्ञिताङ्गकार्यान्हिक (अ.६, पा. ४, आन्हिक ४) भसंज्ञा झालेल्या अंगाला होणारीं कार्यें.

'भस्य' (१२९) या अधिकारसूत्रापासून पाद संपेपर्यंत सर्व कार्यें भसंज्ञक अंगाला सांगितलीं असल्यामुळें या आन्हिकाला भसंज्ञिताङ्गकार्यान्हिक म्हणतां येईल. प्रातिपदिकांना विभक्तिप्रत्यय लागून होणाऱ्या सुबन्त शब्दांचे विभक्तिदृष्ट्या तीन विभाग पाडतां येतील. सु औ वगैरे पहिल्या पांच विभक्तिप्रत्ययांना सर्वनामस्थानविभक्ति ही संज्ञा पाणिनीय व्याकरणामध्यें दिली आहे. त्यानंतर सप्तमी–बहुवचनापर्यंतच्या विभक्तिप्रत्ययांपैकीं व्यंजनानें आरंभ होणाऱ्या विभक्तिप्रत्ययांपूर्वीच्या अंगाला पदसंज्ञा दिली आहे; व स्वरानें आरंभ होणाऱ्या प्रत्ययांचे मागील अंगाला 'भ' ही संज्ञा दिली आहे. प्रत्ययापूर्वीच्या अंगाच्या दृष्टीनें उल्लेख करावयाचा म्हटल्यास सर्वनामस्थानपूर्व अंग, भसंज्ञक अंग, व पदसंज्ञक अंग असे सुप् प्रत्ययापूर्वीच्या अंगाचे तीन प्रकार दृष्टीस पडतात. सुबन्त रूपांकडे लक्ष दिल्यास भाषेंतील पुंलिंगी, स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी सर्व शब्दांचीं रूपें सर्वनामस्थानविभक्तिप्रत्यय शेवटीं असलेलीं आढळून येतात; अंगाला भ अथवा पदसंज्ञा झाली असतां नपुंसकलिंगी नामांचीं पुंलिंगी नामासारखींच रूपें आढळून येतात; तर, पद् दत् नस् वगैरे शब्दांचीं रूपें फक्त त्या शब्दांना भ अथवा पदसंज्ञा झाली असतांनाच आढळून येतात. पदसंज्ञा झाली असतांना वेदाच्या पदपाठामध्यें अंगाचें स्वरूप मूळ प्रातिपदिकाच्या स्वरूपासारखें टिकून असल्यास पदपाठकारांना वेदाच्या पदपाठामध्यें अंग व प्रत्यय अशीं दोन पदें पाडलेलीं दृष्टीस पडतात.

भसंज्ञक अंगाला या अधिकरणांत सांगितलेले निरनिराळे आदेश सबंध अंगाला होऊं नयेत याकरितां ' निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति ' या परिभाषेचा अवलंब भाष्यकारांनीं अनेक ठिकाणीं केला आहे; व अंगकार्यें म्हणून सांगितलेले असले तरी अंगाच्या सूत्रनिर्दिष्ट भागालाच त्या त्या सूत्रांनीं सांगितलेले आदेश होतात असें म्हटलें आहे. 'वाह ऊठ्' ( सू. १३२) या सूत्राचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं सूत्र व्यर्थ आहे असें दाखवून सूत्राची उपयुक्तता प्रस्थापित करण्याकरितां 'असिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षणे' अशी बहिरङ्गासिद्धत्व सांगणारी परिभाषा ज्ञापित केली आहे. 'आतो धातोः' ( सू. १४० ) या ठिकाणीं 'धातोः' पद घालूं नये कारण धातुभिन्न अशा क्त्वा वगैरे प्रत्ययशब्दांचीं क्त्वः वगैरे रूपें होणें इष्ट आहे असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. ' नस्तद्धिते ' ( सू. १४४ ) या सूत्राचें व्याख्यान करतांना वार्तिककारांनीं सब्रह्मचारिन् पीठसर्पिन् इत्यादि अनेक शब्द देऊन त्यांच्या ' टि ' भागाचा लोप अण् हा ढित् प्रत्यय नसला तरी होतो; तसेंच चर्मन् अश्मन् इत्यादि शब्दांच्याही ' टि ' भागाचा विशिष्ट अर्थीं लोप होतो असें सांगितलें आहे. इष्ठ, इम, व ईयसू हे प्रत्यय पुढें असतांना ' तुरिष्ठे-मेयस्सु ' ( सू. १५४) या सूत्रानें ' तृ ' प्रत्ययाचा, व ' टेः ' ( सू. १५५ ) या सूत्रानें ' टि ' भागाचा लोप सांगितला आहे. वार्तिककारांनीं या ठिकाणीं प्रातिपदिकाला 'णि' प्रत्यय लावून नामधातू केल्यास ' इष्ठ ' प्रत्यय पुढें असतांना प्रातिपदिकाला जीं कार्यें होतात तीं करावीं असें सांगितलें आहे; व पुंवद्भाव, र आदेश, टि भागाचा लोप इत्यादि कार्यें करावीं असें सांगितलें आहे; व भाष्यकारांनीं एतयति, प्रथयति, म्रदयति, दवयति, प्रापयति इत्यादि उदाहरणें दिलीं आहेत. अप्रथीयान् या शब्दाच्या साधुत्वाविषयीं विवेचन करून भाष्यकारांनीं ' न प्रथीयान् ' या अर्थीं ' अप्रथीयान् ' शब्द समजावा, अपृथु याहून अप्रथीयान् शब्द होऊं शकत नाहीं असें सांगितलें आहे. ' प्रकृत्यैकाच् ' ( सू १६३)...... आत्माध्वानौ खे ( सू. १६३-१६९ ) या सूत्रांनीं टिलोपाचे अपवाद देऊन व बाह्य, कार्म, दाण्डिनायन हास्तिनायन आथर्वणिक इत्यादि निपातन शब्द सांगून सूत्रकारांनीं सहावा अध्याय पुरा केला आहे.

सहावा अध्याय समाप्त

---

**२८९. अङ्गनिमित्तकविभक्तिप्रत्ययादेशान्हिक ( अ. ७ पा १ आन्हिक १ ). अङ्गामुळें विभक्तिप्रत्ययांना होणारीं कार्यें.**

'युवोरनाकौ' ( सू. १ ) या सूत्राचें विवेचन करतांना अंगाधिकार चालू असल्यामुळें 'यु' अथवा 'वु' शेवटीं असलेल्या अंगाला अन व अक हे आदेश होऊं लागतील ते 'यु' व 'वु' या प्रत्ययांनाच व्हावे याकरितां 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' या परिभाषेचा भाष्यकारांनीं येथें उपयोग केला आहे. गोमती गोमत्यौ या ठिकाणीं नुमागम न व्हावा याकरितां 'विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणम्' म्हणजे 'विभक्तिनिमित्तक कार्य कर्तव्य असतांना लिंगविशिष्ट परिभाषा घेऊं नये' असें येथें वार्तिककारांनीं सांगितलें आहे व या परिभाषेचे अनेक उपयोग दाखविले आहेत. 'आयनेयीनीयियः०' या सूत्रानें फ ढ ख छ घ या एकाक्षरी प्रत्ययांना क्रमानें आयन् एय् ईन् ईय् इय् हे आदेश सांगितले आहेत: त्याप्रमाणेंच झ आणि ठ याही प्रत्ययांना 'झोन्तः' व 'ठस्येकः' या सूत्रांनीं अन्त् व इक् हे आदेश सांगितले आहेत. थ, ध आणि भ हे प्रत्ययांचे आरंभीं भाषेमध्यें दिसून येतात म्हणून त्यांना नामधारी प्रत्यय करून त्यांना कायमचे आदेश सांगितले नाहींत. अशा रीतीनें फ, ढ इत्यादि नामधारी प्रत्यय सांगण्यांत लाघवप्रतिपादन व इद्वर्णयोजन हे हेतू प्रामुख्यानें सूत्रकारांच्या मनांत असावे. कदाचित् पूर्ववैयाकरणांनींही हे प्रत्यय सांगितले असावे. 'अतो भिस ऐस्' ( सू ९ ) 'औङ आपः' ( सू. १८ ) अष्टाभ्य औश् ( सू. २१ ) या सूत्रांचें व्याख्यान भाष्यकारांनीं सूत्रव्याख्यानपर श्लोकवार्तिकें देऊन केलें आहे. 'युष्मदस्मद्भ्यां ङसोश्'...'साम आकम्' ( सू. २७-३४ ) या सूत्रांनीं युष्मद् व अस्मद् शब्दांना विभक्तिप्रत्ययांपूर्वी होणारे अनेक निरनिराळे आदेश सांगितले आहेत व हे शब्द लिंगरहित आहेत असें सांगितलें आहे; यावरून हे शब्द फारच पुरातन कालापासून लोकप्रयोगांत असावे व निरानिराळ्या देशांतील उच्चारण-वैशिष्ट्यामुळें त्यांच्या रूपांमध्यें विविधता आली असावी. 'समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' ( सू. ३७ ) या सूत्राचें विवेचन करतांना ल्यप् आदेश जरी बहिरङ्ग असला तरी तो सर्वांत पूर्वी करावा असें सांगितलें आहे. 'सुपां सुलुक्०' ( सू. ३९ ) या सूत्रानें वेदामध्यें आढळून येणारे विभक्तिप्रत्ययांचे आदेश सांगितले आहेत; हे आदेश वेदामध्यें ठिकठिकाणीं आढळून येत असल्यामुळें त्यांचें अवलोकन केलें असतां थोडक्यांत वैदिक भाषेतील सुबन्त शब्दांचें साधारण स्वरूप ध्यानांत येण्यासारखें आहे.

**२९०. विभक्तिप्रत्ययनिमित्तकाङ्गकार्यान्हिक ( अ. ७ पा. १ आन्हिक २ ). विभक्ति-प्रत्ययांमुळें मागील अंगाला होणारीं कार्यें.**

या आन्हिकांत सुप् व तिङ् या विभक्तिप्रत्ययांचे योगानें होणाऱ्या नुम् आगम, पुंवद्भाव, अनङ् आदेश व औ अस् इत्यादि अन्त्यादेश यांचें विवेचन केलें आहे. धातूला नुम् हा आगम उपदेशावस्थेंतच लागतो असें येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. अर्थात् नदि, इदि, निदि, इत्यादि धातू हे बन्ध्, मन्थ् वगैरेंप्रमाणें नन्द्, इन्द्, निन्द् असे नकारोपधच मूळचे असावे; पण पाणिनीनें कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना त्यांच्या नकाराचा लोप होत नाहीं हें दाखविण्याकरितां त्यांतील नकार गाळून इ पुढें जोडून उच्चारण केलें आहे व त्यांना नुम् आगम सांगितला आहे. 'शे मुचादीनाम्' ( सू. ५९ )...'विभाषा चिण्णमुलोः ( सू. ६९ ) या सूत्रांनीं कांहीं

विशिष्ट धातूंना, तसेंच 'उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः' (सू. ७०)...' इकोचि विभक्तौ' (सू. ७३) या सूत्रांनीं विशिष्ट प्रातिपदिकांना नुम् आगम विशिष्ट प्रत्ययांपूर्वी सांगितला आहे. या नुम् आगमाच्या प्रकरणामध्यें 'इकोचि विभक्तौ' (सू. ७३) या सूत्रानें नुम् न होतां भाषितपुंस्क नपुंसकलिंगी शब्दांचीं पुल्लिंगी शब्दांप्रमाणें रूपें व्हावीं याकरितां 'तृतीयादिषु०' या पुंवद्भाव सांगणाऱ्या सूत्रांतील पुंवद्भाव शब्दानें अर्थातिदेश घेऊन जो अर्थ घेतला असतां तो शब्द पुंल्लिंगींही चालतो अशा अर्थी असलेल्या शब्दाला पुंवद्भाव होतो अशी 'तृतीयादिषु०' या सूत्राची भाष्यकारांनीं व्याख्या केली आहे. 'तृज्वत् क्रोष्टुः' व 'स्त्रियां च' (सू. ९५,९६) या सूत्राची व्याख्या करतांना 'विभक्तौ' हें पद अनुवृत्तीनें येतें कां नाहीं याविषयीं श्लोकवार्तिक उद्धृत करून भाष्यकारांनीं सूत्रार्थ स्पष्ट केला आहे.

२९१. इडागमनिषेधान्हिक (अ. ७ पा. २ आन्हिक १). सिच् प्रत्ययापूर्वी धातूला वृद्धि व आर्धधातुक प्रत्ययांना इट् आगम.

'सिचि वृद्धिः परस्मैपदेपु'......' अतो हलादेर्लघोः' (सू. १–७) या सूत्रांनीं सिच् प्रत्ययापूर्वीं धातूला होणारी वृद्धि व तिचा निषेध सांगितल्यानंतर सूत्रकारांनीं धातूच्या पुढें असलेल्या वलादि आर्धधातुक प्रत्ययाला होणाऱ्या इट् आगमाचा विशिष्ट ठिकाणीं निषेध सांगितला आहे. सूत्रकारांनीं इट् आगमाचें विधान करणारीं सूत्रें सांगण्यापूर्वीं 'नेड् वशि कृति' वगैरे निषेध-सूत्रें (सू ८–३४) सांगितलीं आहेत यावरून 'एकाच उपदेशेनुदात्तात्' 'कृसृभृवृ०' (सू. १०–१३) इत्यादि निषेध सूत्रांनीं होणारा इट् आगमाचा बाध हा कोणत्याही इड्विधायक सूत्राचा बाध होतो असा सूत्रकारांचा अभिप्राय भाष्यकारांनीं सांगितला आहे. उपदेशीं एकाच् व अनुदात्त इत् असलेल्या अशा धातूंच्या पुढील वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इट् आगम होत नाहीं असें सामान्य विधान 'एकाच उपदेशे०' या सूत्रानें केलें आहे. या उपदेशीं एकाच् व अनुदात्तेत् धातूंचें संपूर्ण परिगणन भाष्यकारांनीं केलें आहे व तेंच कारिकाबद्ध परिगणन सिद्धान्तकौमुदी वगैरे ग्रंथांत मिळतें. आद्याक्षराकडे लक्ष न देतां अन्त्याक्षराकडे लक्ष देऊन क ख ग इत्यादि वर्णाप्रमाणें परिगणन करण्याची वहिवाट फार प्राचीन कालीं होती व ती बरीच शतकें चालू होती असें दिसतें. यानंतर भाष्यकारांनीं 'आर्धधातुकस्येड् वलादेः' (सू. ३५) हें एकच अधिकाररूप इडागमविधान करणारें सूत्र सांगून हें इडागमनिषेधान्हिक पुरें केलें आहे.

२९२. इडागमविधानान्हिक (अ. ७ पा. २ आन्हिक २) इट् आगमाचें विधान.

'स्नुक्रमोरनात्मनेपदनिमित्ते'......' किरश्च पञ्चभ्यः' (सू. ३६–७५) या सूत्रांनीं विशिष्ट धातूंच्या पुढील निरनिराळ्या वलादि आर्धधातुक प्रत्ययांना इडागम नित्य अथवा वैकल्पिक जसा प्रयोगांत उपलब्ध होतो तसा सूत्रकारांनीं सांगितला आहे. या इडागमविधायक सूत्रांमध्यें 'कृसृभृवृ०' या इडागमनिषेधसूत्राचें, तसेंच 'अचस्तास्वत्०' आणि 'ऋतो भारद्वाजस्य' (सू. ६१–६३) या इड्विधायक सूत्रांचें प्रयोजन वास्तविकरीत्या कांहीं नसतांनाही हीं सूत्रें सूत्रकारांनीं केलीं यावरून पुढील वैयाकरणांनीं केलेली इडागमाची व निषेधाची व्यवस्था क्रादिनियम या नांवानें प्रसिद्ध आहे. 'रुदादिभ्यः सार्वधातुके'......' ईडजनोर्ध्वे च' (सू. ७६-७८) या सूत्रांनीं रुद् वगैरे विशिष्ट धातूंच्या पुढील वलादि सार्वधातुक प्रत्ययाला इट् आगम सांगितला आहे. 'लिङः सलोपो०' ..'ईदासः' (सू. ७९–८३) या सूत्रांनीं विशिष्ट धातूंपुढील सार्वधातुक प्रत्ययांना विशिष्ट आदेश सांगितले आहेत. 'अष्टन आ विभक्तौ' 'रायो हलि'

( सू. ८४, ८५ ) या सूत्रांनीं अष्टन् व रै शब्द यांच्या अन्त्य वर्णाला आत्व सांगितल्यानंतर सूत्रकारांनीं युष्मद्, अस्मद्, त्यद्, यद्, तद्, किम्, अदस्, इदम् हीं सर्वनामें, त्याप्रमाणेंच त्रि, चतुर् हे संख्याशब्द व जरस् शब्द यांना विशिष्ट विभक्तिप्रत्यय पुढें असतांना विशिष्ट कार्यें सांगितलीं आहेत. शेवटीं 'मृजेर्वृद्धिः' ( सू. ११४ ) या सूत्रानें मृज् धातूच्या स्वराला विशिष्ट प्रत्यय पुढें असतांना वृद्धि सांगितल्यानंतर विशिष्ट तद्धित प्रत्यय पुढें असतांना पूर्वीच्या प्रातिपदिकांतील पहिल्या स्वराला वृद्धि सांगून सूत्रकारांनीं दुसरा पाद पुरा केला आहे.

**२९३. उत्तरपदकार्याह्निक ( अ. ७ पा. ३ आह्निक १ ). अंगांतील उत्तरपदाला होणारे वृद्धि वगैरे आदेश.**

'देविकाशिंशपा०' ( सू. १ ) या सूत्रानें ञित्, णित् किंवा कित् तद्धित प्रत्यय पुढें असतांना देविका, शिंशपा इत्यादि शब्दांच्या आदिस्वराला वृद्धि न होतां 'आ' आदेश होतो असें सांगितलें आहे; त्याप्रमाणेंच 'द्वारादीनां च' ( सू. २-९ ) इत्यादि सूत्रांनीं द्वार वगैरे शब्दांच्या आदिव्यंजनापुढें 'व' असल्यास 'व'च्या मागें औ, तसेंच 'य' असल्यास 'य'च्या मागें ऐ हे आगम सांगितले आहेत. या ऐ व औ आगमांवरून दिसून येतें कीं जोडाक्षरांतील दुसरें अक्षर अन्तस्थ असल्यास त्याचे पूर्वीं इ अथवा उ स्वर जोडून उच्चारण सुलभ व स्पष्ट करण्याची सामान्य जनतेची प्रवृत्ति शिष्ट लोकांच्या संस्कृत भाषेंतही प्रचलित होत चालली होती. उत्तरपदस्य ( सू १० ) हें अधिकारसूत्र करून त्यानंतर ( ११-३१ ) सूत्रांनीं उत्तरपदाच्या आदीला वृद्धि सांगितली आहे. साधारणपणें पाहिल्यास आदि-वृद्धि होणारें उत्तरपद हें पूर्वपदापेक्षां अर्थाच्या दृष्टीनें जास्त महत्त्वाचें दिसून येतें. 'प्राचां ग्रामनगराणाम्' ( सू. १४ ) या शब्दाचें व्याख्यान करतांना भाष्यकारांनीं गांवांचे ग्राम, नगर, संवाह व घोष असे चार प्रकार त्या वेळीं अस्तित्वांत होते तसेंच ग्राम व नगर यांमध्यें फार फरक नसला तरी लोक तो लक्षांत घेऊन प्रयोग करीत असत असें म्हटलें आहे. दोनही पदें सारखीं महत्वाचीं असतांना 'हृद्भगसिन्ध्वन्ते०' ( सू. १९ ) या व यापुढील सूत्रांनीं पूर्व व उत्तर या दोन्ही पदांच्या आदि स्वराला वृद्धि सांगितली आहे. 'हनस्तोऽचिण्णलोः'......'रुहः पोन्यतरस्याम्' ( सू. ३२-४३ ) या सूत्रांनीं णित् प्रत्यय -- विशेषतः णिच् प्रत्यय— पुढें असतांना धातूच्या शेवटच्या वर्णाला आदेश किंवा शेवटच्या वर्णापुढें आगम सांगितले आहेत. 'प्रत्ययस्थात्०'......'आदाचार्याणाम्' ( सू. ४४-४९ ) या सूत्रांनीं स्त्रीलिंगी टाप् प्रत्यय लागला असतां पूर्वी असलेलें अक्षर 'अक' असेल तर त्यांतील 'अ'काराला 'इ'कार विशिष्ट ठिकाणीं सांगितला आहे. साधारणपणें विचार केल्यास—अल्पार्थी क प्रत्यय लावलेला असो अथवा नसो—पुंलिंगीं नामापासून स्त्रीलिंगी नाम जर झालें असेल तर 'अका' याचे ऐवजीं 'इका' अशीं अक्षरें शेवटीं दिसून येतात.

**२९४. ह्रस्वगुणवृद्ध्याद्यङ्गकार्याह्निक ( अ. ७ पा. ३ आह्निक २ ) ह्रस्व, गुण वृद्धि वगैरे अङ्गकार्यें.**

'ठस्येकः' व 'इसुसुक्तान्तात् कः' ( सू. ५०, ५१ ) या सूत्रांनीं 'ठ' या नामधारि प्रत्ययाला सर्वसाधारण 'इक' आदेश पण पूर्वीच्या शब्दाच्या शेवटीं इस्, उस्, उ, ऋ, ऌ, अथवा त् असल्यास 'इक' च्या ऐवजीं 'क' आदेश होतो असें सांगितलें आहे. 'चजोः कु-घिण्यतोः'...'भोज्यं भक्ष्ये' ( सू. ५२-५९ ) या सूत्रांनीं साधारणतः चवर्गीय व्यञ्जनाला

कवर्गीय व्यञ्जन या स्वरूपानें ' कुत्व ' या नांवानें प्रसिध्द असलेले आदेश सांगितले आहेत. ' पाघ्राध्मास्था० ' व ' ज्ञाजनोर्जा ' ( सू. ७८, ७९ ), या सूत्रांनीं पा घ्रा वगैरे विवक्षित धातूंना शित् प्रत्यय पुढें असतांना होणारे पिब, जिघ्र वगैरे सर्वादेश सांगितले आहेत; व त्यानंतर ' मिदेर्गुण: '...गुणोऽपृक्ते ' ( सू. ८२–९१ ) सूत्रांनीं धातूच्या शेवटच्या अथवा उपान्त्य इक् स्वराला गुण सांगितला आहे. ' पुगन्तलघूपधस्य च ' ( सू. ८६ ) या सूत्राचें विवरण भाष्यकारांनीं श्लोकबद्ध व्याख्यानवार्तिकें उद्धृत करून फार मार्मिकपणें केलें आहे. या व्याख्यानाचा उपयोग कांहीं शतकें गेल्यानंतर व्याकरणाध्ययन केलेल्या शिष्यांची व विद्वानांची योग्यता व परीक्षा जेव्हां पूर्वपक्षोत्तरपक्षात्मक विवेचनपध्दतींतील प्रश्नोत्तरांवरून केली जाऊं लागली तेव्हां ज्यास्त करण्यांत येऊं लागला; व ' नामि ' ( सू. ६।४।३ ) व 'पुगन्तलघूपधस्य च ' ( सू. ७।३।८६ ) या सूत्रांवरील पूर्वपक्षोत्तरपक्षरूप विवेचन पंडितसभांमध्यें फारच प्रसिद्धीस आलें. ' अतो दीर्घो यञि ' ... ' सुपि च ' इत्यादि ( सू. १०१-१२० ) सूत्रांनीं प्रातिपदिकाला विशिष्ट सुप् प्रत्यय पुढें असतांना होणारे आदेश सांगितले आहेत.

**२९५ सामान्याङ्गकार्याह्निक ( अ. ७ पा. ४ आह्निक १ ) विशिष्ट ठिकाणीं होणारीं ह्रस्व गुण दीर्घ ईत्व वगैरे विशिष्ट कार्यें.**

मागील चार पादांमध्यें प्रत्ययामुळें अंगाला होणाऱ्या व अंगामुळें प्रत्ययाला होणाऱ्या ह्रस्व गुण, दीर्घ वृद्धि वगैरे सामान्यत: आढळून येणाऱ्या कार्यांचें सामान्यत: विधान केल्यानंतर या पादामध्यें सूत्रकारांनीं लिटाचे प्रयोग, लुङाचे प्रयोग, णिजन्ताच्या लुङाचे प्रयोग, यङ्लुगन्ताचे प्रयोग यांची सिद्धि करतांना विशिष्ट ठिकाणीं आढळून येणारीं ह्रस्व, गुण, दीर्घ ईत्व वगैरे कार्यें सांगितलीं आहेत. या कार्यांनीं सिद्ध होणारे प्रयोग भाषेमध्यें फार ठिकाणीं जरी आढळून आले नाहींत तरी सूत्रांचे पौर्वापर्य, विरोध, इत्यादिकांचें सूक्ष्म अवलोकन करून शुद्ध व शिष्टसंमत प्रयोगांचें यथायोग्य ज्ञान संपादन करण्याचे कामीं प्रस्तुत आह्निकांत भाष्यकारांनीं केलेलें विवेचन एका रीतीनें फार महत्वाचें आहे. या आह्निकांत या चौथ्या पादांतील एकंदर ९७ सूत्रांपैकीं पांचसहा सूत्रांचेंच भाष्यकारांनीं म्हणण्यासारखें विवेचन केलें आहे. ' णौ चङ्युपधाया ह्रस्वः ' ( सू. १ ) हें चङ्परक णिच् पुढें असतांना ह्रस्व सांगणारें सूत्र व ' नाग्लोपि० ' हें त्या ऱ्हस्वाचें निषेधसूत्र या दोन्हींचा यथायोग्य विचार करून णिजन्ताच्या लुङाचीं उदाहरणें निरनिराळ्या धातूंहून साधणें हें एका दृष्टीनें अत्यंत कठिण काम आहे. उदाहरणार्थ–कृत् धातूच्या णिजन्ताहून चङ् केला असतांना अचीकृतत् व अचिकीर्तत् अशीं दोन रूपें होतात किंवा अचीकृतत् व अचकीर्तत् अशीं दोन होतात याविषयी विद्वानांमध्यें तीव्र मतभेद दिसून येतो, काशिकाकारांनीं अचीकृतत् व आचिकीर्तत् अशीं दोन रूपें दिलीं आहेत.हीं णिजन्ताहून चङाची रूपें साधतांना द्वित्वापूर्वीं ह्रस्व करावयाचा, तसेंच णिजन्ताहून दुसरा णिच् केला तरी ह्रस्व करावयाचा, असें भाष्यकारांनीं स्पष्ट म्हटलें आहे. ' दयतेर्दिगि लिटि ' ( सू. ९ ) या सूत्राचें व्याख्यान करतांना दिगि आदेश हा द्वित्वाचा बाध करतो, पण ' अस्तेर्भूः ' ' चक्षिङः ख्याञ् ' ( सू. २।४।५२, ५४ ) इत्यादि सूत्रांनीं सांगितलेले भू व ख्या हें आदेश आर्धधातुक प्रत्ययाची विवक्षा असतांनाच होतात व ते झाल्यानंतर द्वित्व होतें असें येथें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. 'हलादिः शेषः' ( सू. ६७ ) या सूत्राच्या अर्थाचें भाष्यकारांनीं मार्मिक विवेचन केलें आहे.

**अंगाधिकार समाप्त.**

**२९६. द्वित्वादिपदकार्याह्निक. ( अ. ८. पा. १ आह्निक १ ). पदाला होणाऱ्या द्वित्वाचें विवेचन.**

पाणिनीनें सात अध्यायांमध्यें संज्ञा, समास, कृत्प्रत्यय, स्त्रीप्रत्यय, तद्धितप्रत्यय, स्वर व अङ्गकार्यें सांगून सुबन्त व तिङन्त पदांचें प्रतिपादन केल्यानंतर प्रस्तुत आठव्या अध्यायामध्यें पदांना होणारे द्वित्व, स्वर, दोन पदें जवळजवळ आल्यावर सांनिध्यामुळें होणारीं कार्यें, व उच्चारणवैशिष्ट्यामुळें वर्णांमध्यें होणारे बदल सांगितले आहेत. त्यांपैकीं संपूर्ण पदाचें द्विरुच्चारण केव्हां व कोणत्या अर्थीं होतें तें ' सर्वस्य द्वे '......' द्वन्द्वं रहस्य० ' (सू. १–१५) यांमध्यें सांगितलें आहे. ' सर्वस्य द्वे ' ( सू. १ ) या सूत्राचें व्याख्यान करतांना पद शब्दाची अनुवृत्ति असल्यामुळें ' सर्वस्य ' हा शब्द सूत्रामध्यें नसला तरी पदालाच द्वित्व होईल याविषयीं विवेचन करून 'सर्वस्य' या शब्दाची उपयुक्तता भाष्यकारांनीं दाखविली आहे; त्याप्रमाणेंच ' द्वे ' या पदानें आदेशरूप द्विर्वचन घेण्यापेक्षां द्विःप्रयोगरूप द्विर्वचन घेणें इष्ट आहे असें सूचित केलें आहे. द्वित्व केल्यानंतर पुढील भागाला सर्वनिघात होतो असें 'अनुदात्तं च ' ( सू. ३ ) या सूत्रानें सांगितलें आहे. ' नित्यवीप्सयोः ' ( सू. ४ ) या सूत्रांतील 'वीप्सा' या शब्दाचा ' साकल्यानें संबंध ' हा अर्थ आहे; व द्रव्याचा क्रियेशीं अथवा गुणांशीं संपूर्ण संबंध द्विर्वचन केलें असतां प्रतीयमान होतो असें येथें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. त्याप्रमाणेंच ' तर ' हा आतिशायिक प्रत्यय आधीं होतो किंवा नित्य अर्थीं द्विर्वचन आधीं होतें याविषयीं विचार करून वक्त्याच्या विवक्षेप्रमाणें प्रयोग होतो असें सांगून ' पचतिपचातितरां तिष्ठति,' व ' आढ्यतरमाढ्यतरं आनय ' हीं उदाहरणें दिलीं आहेत. ' प्रकारे गुणवचनस्य ' ( सू. १२) या सूत्रांतील ' गुणवचन ' या शब्दाच्या अर्थाबद्दल भाष्यकारांनीं मार्मिक विवेचन केलें आहे व ' गौर्वाहीकः ' या उदाहरणामध्यें ' गो ' हा शब्द प्रकार म्हणजे सादृश्य या अर्थानें युक्त असल्यामुळें गुणवचन जरी मानण्यांत आला तरी त्याला द्वित्व होत नाहीं असें सांगितलें आहे. वार्तिककारांनीं आनुपूर्व्य, चापल, आभीक्ष्ण्य इत्यादि अर्थींही द्वित्वाचें विधान केलें आहे. ' पदस्य ' व ' पदात् ' ( सू. १६–१७ ) हीं दोन अधिकारसूत्रें करून युष्मद् व अस्मद् शब्दांचे एकाक्षरी आदेश, आमन्त्रितसंज्ञक पद, अतिङन्त पदापुढील तिङन्तपद इत्यादि पदांना सूत्रकारांनीं सर्वनिघात सांगितला आहे व कांहीं अपवादस्थलेंही दिलीं आहेत.

**२९७. पदानुदात्तविवेचनाह्निक ( अ. ८ पा. १ आह्निक २ ) पदाच्या सर्वनिघाताला अपवाद.**

मागील आह्निकामध्यें विवक्षित ठिकाणीं पदाला सर्वनिघात सांगितला आहे; त्याला या आह्निकामध्यें ' गत्यर्थलोटा लृण्न चेत्० '...' तिङि चोदात्तवति ' ( सू. ५१–७१ ) या सूत्रांनीं कांहीं अपवादस्थलें दिलीं आहेत. त्यांपैकीं बहुतेक ठिकाणीं क्रियापदांनाच प्राप्त झालेल्या सर्वनिघाताचा प्रतिषेध सांगितला आहे. या सूत्रांपैकीं ' यद्वृत्तान्नित्यम् ' ( सू. ६६ ) हें विशेष महत्त्वाचें आहे. ' यद्वृत्तादनिघातः ' असें वाक्य ठिकठिकाणीं वेदभाष्यामध्यें व टीकांमध्यें आढळतें. ' पूजनात्पूजितमनुदात्तं० ' या सूत्राच्या पुढील सूत्रांमध्यें अनुदात्ताचें विधान केलें आहे; त्यांमध्यें ' गतिर्गतौ ' ( सू. ७० ) हें सूत्र विशेष महत्त्वाचें आहे. ' आमन्त्रितं पूर्वमविद्यमानवत् ' ( सू. ७२ ) या सूत्रानें आमन्त्रित पद हें स्वराच्या बाबतींत असून नसल्यासारखें समजावें असें विधान केलें आहे.

**सपादसप्ताध्यायी समाप्त.**

## त्रिपादी

### २९८. असिद्धत्वानुशासनान्हिक (अ. ८ पा. २ आन्हिक १). असिद्धत्वाचा अर्थ, उपयुक्तता व कांहीं अपवादस्थलें.

या आठव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादाच्या आरंभींच पाणिनीनें 'पूर्वत्रासिद्धम्' (सू. १) हें सूत्र करून राहिलेल्या तीन पादांमधील सूत्रें पूर्वीच्या सव्वासात अध्यायांतील सूत्रांना दिसत नाहींत, व त्याप्रमाणेंच या तीन पादांतील पूर्वी उच्चारलेल्या सूत्राला पुढें उच्चारलेलें सूत्र दिसत नाहीं असा दंडक घालून दिला आहे. अर्थात् या शास्त्रसमयाचें प्रयोजन 'विप्रतिषेधे परं कार्यम्' (सू. १।४।२) या शास्त्रसमयाप्रमाणें या तीन पादांतील सूत्रें जरी पर असलीं तरी तीं अदृश्य मानिलीं गेल्यामुळें पूर्वीच्या सव्वासात अध्यायांतील सूत्रांचा उपयोग झाल्यानंतरच या सूत्रांचा उपयोग करावयाचा हें आहे. या त्रिपादींतील कांहीं सूत्रांमध्यें प्रगृह्य, गुण, वृद्धि इत्यादि संज्ञाशब्द आढळतात; त्यांचा योग्य अर्थ समजून सूत्रार्थ करण्याकरितां वृद्धिरादैच्, अदेङ् गुणः, इको गुणवृद्धी, इदूदेद्०, तस्मिन्निति निर्दिष्टे०, तस्मादित्युत्तरस्य, मिदचोन्त्यात्परः, आद्यन्तौ टकितौ इत्यादि पूर्वीच्या सव्वासात अध्यायांतील सूत्रांची गरज लागते म्हणून या वृद्धिरादैच् इत्यादि सूत्रांच्या दृष्टीनें त्रिपादींतील सूत्रें सिद्ध मानावींच लागतात; व त्याकरितां 'कार्यकालं संज्ञापरिभाषम्' असा शास्त्रसिद्धान्त येथें भाष्यकारांनीं घालून दिला आहे. या सर्वसाधारण असिद्धत्वामुळें कांहीं थोड्या ठिकाणीं योग्य रूपसिद्धीला अडचण येते तिचा परिहार करण्याकरितां एकादेशस्वर, संयोगान्तलोप, प्लुति, सिज्लोप इत्यादि विधी पूर्वीच्या सव्वासात अध्यायांतील विधींच्या दृष्टीनें विशिष्ट प्रसंगीं सिद्ध समजले जातात असें वार्तिककारांनीं (सू. ८।२।६ वा. १–१५) म्हटलें आहे. त्याप्रमाणेंच, अपवादसूत्र पर असलें तरी तें सिद्ध समजून उत्सर्ग आणि अपवाद या दोन सूत्रांमध्यें तें पर म्हणून उपयोगांत आणण्याकरितां 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या व्यवस्थापक सूत्राचा उपयोग करावा लागतो व उत्सर्गसूत्र बाजूला सारावें लागतें. यांशिवाय इतर ठिकाणीं या प्रकरणांत 'विप्रतिषेधे परं०' या व्यवस्थापक सूत्राचा उपयोग करतां येत नाहीं. प्रातिपदिकाच्या शेवटीं असलेल्या नकाराचा लोप (सू. ७), मतुप् प्रत्ययांतील 'म'काराला 'व'कार (सू. ९–१४), कृप् वगैरे ठिकाणच्या 'र'ला 'ल' (सू. १८-२२), नुट् आगम (सू. १६), संयोगान्तलोप (सू. २३), सकाराचा लोप (सू. २४–२९), कुत्व (सू. ३०), हकाराला आदेश (सू. ३१–३५) व भष्भाव (सू. ३७) या महत्त्वाच्या कार्यांचें या आन्हिकामध्यें विवेचन केलें आहे.

### २९९. प्लुतविधानान्हिक (अ. ८ पा. २ आन्हिक २). निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला होणारे आदेश.

या आन्हिकामध्यें 'रदाभ्यां निष्ठातो नः०'... 'नसत्तनिषत्ता०' (सू. ४२–६१) या सूत्रांनीं निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला नकार, ककार, वकार इत्यादि विशिष्ट धातूंच्या पुढें विशिष्ट ठिकाणीं होणारे आदेश सूत्रकारांनीं सांगितले आहेत. 'अनुपसर्गात्फुल्लक्षीबकृशोल्लाघाः'

(सू. ५५) या सूत्रांतील कुश या निपातनाचें विवेचन मोठ्या मनोरंजक रीतीनें 'कुशेः क एष०' हा श्लोक देऊन भाष्यकारांनीं केलें आहे. हा श्लोक म्हणजे क्लिष्ट व्याकरणशास्त्र-विषयाचें भाष्यकारांनीं वेळोवेळीं जें सुगम व चटकदार विवेचन केलें आहे त्याचा सुंदर नमुना म्हणून देतां देईल. 'जगत्यनूना भवति हि रुचिरा' ही ओळ तर बहारीची आहे. 'पूर्णत्व म्हणजेच सौंदर्य व सौंदर्य म्हणजेच पूर्णता' हें तत्त्व या ठिकाणीं मोठ्या खुबीनें प्रतिपादन केलें आहे. 'Truth is Beauty; Beauty is Truth' ही Keats कवीची ओळ या ठिकाणीं आठवते. 'वित्तो भोगप्रत्यययोः' (सू. ५८) या सूत्राचें विवेचन करतांना भाष्यकारांनीं निरनिराळ्या गणांतील 'विद्' या धातूचीं निरनिराळीं निष्ठान्त रूपें कशीं होतात तें मजेदार श्लोकवार्तिकें देऊन सांगितलें आहे. 'ससजुषो रुः' (सू. ६६)......'सिपि धातोरुर्वा' (सू. ७४) या सूत्रांनीं पदाच्या शेवटच्या वर्णाला, विशेषतः सकाराला, होणारा रु म्हणजे रेफ आदेश सांगितला आहे. 'र्वोरुपधाया दीर्घ इकः'......'उपधायां च' (सू. ७६–७८) या सूत्रांनीं उपधासंज्ञक रेफ व 'व'कार यांना दीर्घ सांगितला आहे. अर्थात् या बाबतींत उणादि शब्द विचारांत घ्यावयाचे नाहींत हें भाष्यकारांनीं येथें पुन्हां सांगितलें आहे. 'वाक्यस्य टेः प्लुत उदात्तः' (सू. ८२) या सूत्रापासून पाद व आन्हिक संपेपर्यंत सूत्र-कारांनीं त्या वेळीं भाषेमध्यें प्रघातांत असलेल्या प्लुतोच्चारणाचें पर्यालोचन करून निरनिराळ्या प्रसंगीं होणाऱ्या प्लुताचे विधी (सू. ८२–१०८) सांगितले आहेत व भाष्यकारांनीं त्यांतील महत्त्वाच्या विधींचें विवरण केलें आहे. त्यांपैकीं 'प्रत्यभिवादेऽशूद्रे' (सू. ८३), 'दूराद् हूते च' (सू. ८४), 'गुरोरनृतो०' (सू. ८६) व 'तयोर्य्वावचि संहितायाम्' या सूत्रां-वरील विवरण महत्वाचें आहे.

### ३०० संधिकार्यान्हिक (अ. ८ पा. ३ आन्हिक १). रुत्व, रेफाला होणारे आदेश, पदाच्या शेवटच्या वर्णाला होणारे आदेश व विसर्गाला होणारे आदेश.

या आन्हिकांत रुत्व व पदान्तीं असलेल्या वर्णाला होणारे आदेश सूत्रकारांनीं सांगितले आहेत. हे आदेश साधारणपणें संधिकार्याप्रमाणेंच असल्यामुळें या आन्हिकाला संधिकार्यान्हिक म्हणतां येईल. 'मतुवसो रु०'...'कानाम्रेडिते' (सू. १–१२) या सूत्रांनीं विशिष्ट पदांच्या अन्त्य वर्णाला विशिष्ट पद किंवा वर्ण पुढें असतांना रु आदेश सांगितला आहे व त्याच्या पूर्वीं विकल्पानें अनुनासिक सांगितला आहे. त्यानंतर ढकार व रेफ पुढें असतांना अनुक्रमें ढकार व रेफ यांचा लोप सांगितल्यानंतर 'खरवसानयोः०' इत्यादि (सू. १५-२२) सूत्रांनीं 'रु'च्या रेफाला विशिष्ट ठिकाणीं विसर्ग, यकार व यकाराची लघुश्रुति अथवा लोप सांगितले आहेत. या यकाराचें लघुश्रुति उच्चारण शाकटायनानें सांगितलें आहे व शाकल्यानें यकाराचा लोप सांगितला आहे (सू. १८–१९). मगध प्रांतांतील अर्धमागधी प्राकृत भाषेमध्यें व्यंजनाचा लोप झाल्यावर त्याचे जागीं यकाराची लघुश्रुति दिसून येते; तर महाराष्ट्री प्राकृतांत व्यंजनाचा पूर्ण लोप दिसून येतो; यावरून शाकटायन हा पौर्वात्य वैयाकरण होता व शाकल्य हा उदीच्य वैयाकरण होता या विधानास एक प्रकारची पुष्टि मिळते. 'मोनुस्वारः' 'नपरे नः' (सू. २३-२७)' या सूत्रांनीं पदाच्या शेवटच्या मकाराला अनुस्वार, 'न'कार इत्यादि आदेश सांगितल्यांनतर, श्, ष् अथवा स् पुढें असतांना शेवटच्या ङकाराच्या पुढें क्, णकारापुढें ट्, सकार व नकार यांचे पुढें ध्, आणि नकारापुढें त् असे आगम सांगितले आहेत; त्याप्रमाणेंच, ङम् म्हणजे ङ् ण् न् पदाचें शेवटीं असून त्यांच्या पुढें स्वर आल्यास त्या स्वराचे मागें नेहमीं ङम्

म्हणजे इ ण् न् हे आगम अनुक्रमें जोडले जातात असें सूत्रकारांनीं सांगितलें आहे. सूत्रकारांचे स्वतःचे व भाष्यकारांचेही प्रयोग पाहिल्यास बहुशः हे आगम लाविलेले मुळींच दिसत नाहींत. यावरून सूत्रकार व भाष्यकार यांचे वेळीं आगमसहित उच्चारण शिष्टसंमत संस्कृत भाषेंत प्रचलित होऊं लागलें होतें व तसें सूत्रकार व भाष्यकार यांना पसंत होतें असें दिसतें. यानंतर 'विसर्जनीयस्य सः'......'अपदान्तस्य मूर्धन्यः' (सू. ३४–५५) या सूत्रांनीं विशिष्ट वर्ण मागें किंवा पुढें असतांना विसर्गाला सांगितलेल्या, सकार विसर्ग, जिह्वामूलीय, उपध्मानीय व षकार या आदेशांचें विवेचन करून भाष्यकारांनीं प्रस्तुत आन्हिक पुरें केलें आहे. 'द्विस्त्रिश्चतुरिति०' (सू. ४३) व नित्यं समासे०' (सू ४५) या सूत्रांवरील विवेचन संवादरूप कारिका देऊन मजेदार रीतीनें केलें आहे.

## ३०१. षत्वादेशान्हिक (अ. ८ पा. ३ आन्हिक २). षत्वादेशविचार.

'सहेः साडः सः' (सू. ५६) या सूत्रानें मागील आन्हिकांत सुरू केलेल्या षत्वादेशाचेंच विवेचन भाष्यकारांनीं या आन्हिकामध्यें चालू ठेविलें आहे. मागील आन्हिकांत पदान्तीं असलेल्या सकाराला षकार आदेश सांगणाऱ्या सूत्रांचें विवेचन केलें आहे; तर या आन्हिकांत **पदान्तीं नसलेल्या** व इण् किंवा कवर्ग यांपुढील आदेश अथवा प्रत्यय यांच्या सकाराला सांगितलेल्या षकाराचें विवेचन केलें आहे. अर्थात्, या बाबतींत उणादि प्रत्यय हे प्रत्यय म्हणून समजावयाचे नाहींत. भाष्यकारांनीं हें आन्हिक सुरू करतांनाही या आन्हिकांतील सूत्रांना उपयोगीं असलेलें 'अपदान्तस्य मूर्धन्यः' (सू. ५५) हें सूत्र मागील आन्हिकामध्यें घालून त्याचें विवेचन करून मागील आन्हिक पुरें केलें आहे. यावरून भाष्यकारांनीं आन्हिक-विभाग करतांना प्रकरणसमाप्तीकडे लक्ष न देतां अध्यापनाचे वेळीं प्रतिदिवशीं होणाऱ्या पाठसमाप्तीकडे ज्यास्त लक्ष दिलें आहे असें दिसून येतें. हा सकाराला होणारा षकार उच्चारणवैशिष्ट्याचाच एक प्रकार दिसून येतो. 'स्तौतिण्योरेव षण्यभ्यासात्' (सू ६१) या नियमसूत्राच्या उदाहरणांकडे लक्ष दिल्यास दोन अक्षरांमध्यें लागोपाठ दोन षकार न येतील अशा पद्धतीनेंच शब्दांचें उच्चारण होत असलें पाहिजे. 'उपसर्गात्सुनोतिसुवति०' (सू. ६५) या सूत्रानें उपसर्गांतील इण् वर्णाच्या पुढील व निस् या इण् वर्ण शेवटीं नसलेल्या उपसर्गापुढील सू, सो, स्तु, स्तुभ् वगैरे धातूंच्या सकाराला षत्व सांगितलें आहे. त्याप्रमाणेंच 'सदिरप्रतेः' (सू. ६६) स्तन्भेः (सू. ६७) इत्यादि सूत्रांनीं विशिष्ट उपसर्गांपुढील विशिष्ट धातूंच्या सकाराला षत्व सांगितलें आहे. हें उपसर्गनिमित्तक षत्व उपसर्गसंबद्ध धातूच्याच सकाराला करावें, तसेंच नामधातूंच्या सकाराला षत्व करूं नये, असें भाष्यकारांनीं स्पष्ट सांगितलें आहे. 'मत्स्योदके अनुस्यन्देते' या वाक्यांत मत्स्य हा कर्ता प्राणिरूप व उदक हा कर्ता अप्राणिरूप असल्यामुळें 'अनुविपर्यभिनिभ्यः०' (सू. ७२) या सूत्रानें षत्व करून 'अनुष्यन्देते मत्स्योदके' असा प्रयोग करावा किंवा 'अनुस्यन्देते०' असा प्रयोग करावा याविषयीं विचार केला असतां ईश्वरच हें सांगूं शकेल असें विनोदपूर्ण उत्तर भाष्यकारांनीं दिलें आहे. 'इणः षीध्वं०' इत्यादि दोन (सू. ७८, ७९) सूत्रांनीं व त्यानंतर 'समासेङ्गुलेः सङ्गः' इत्यादि (८०–१०९) सूत्रांनीं विशिष्ट उपसर्गांच्या पुढील विशिष्ट शब्दांच्या सकाराला षकार सांगितला आहे; व त्यानंतर 'न रपरसृपि०' 'सात्पदाद्योः' (सू. १०९, ११०) इत्यादि सूत्रांनीं षत्वाचा निषेध सांगून सूत्रकारांनीं हें षत्वप्रकरण समाप्त केलें आहे.

## २०२ णत्वादेशान्हिक (अ. ८ पा. ४ आन्हिक १). णत्व, श्चुत्व, ष्टुत्व, इत्यादि कार्यें.

या आन्हिकांत प्रथमतः 'रषाभ्यां नो णः समानपदे'......'क्षुभ्नादिषु च' (सू.१-३९) या सूत्रांनीं णत्वाचा विचार केल्यानंतर राहिलेल्या 'स्तोश्चुना श्चुः' इत्यादि (४०-६८) सूत्रांनीं जरी श्चुत्व, ष्टुत्व, द्वित्व, जश्त्व, चर्त्व, अनुनासिक, परसवर्ण, पूर्वसवर्ण, वर्णलोप, स्वरितविधान, व संवृतविधान या महत्त्वाच्या कार्यांचा विचार केला असला तरी प्रामुख्यानें णकारादेशाचें विवेचन केलें असल्यामुळें याला णत्वादेशान्हिक म्हणतां येईल. 'रषाभ्यां नो णः समानपदे' व 'अट्कुप्वाङ्०' (सू. १-२) या सूत्रांनीं र् अथवा ष् नकाराच्या पूर्वी असणें, आणि अट् प्रत्ययांतील वर्ण, क-वर्ग अथवा प-वर्ग यांतील व्यञ्जनें, तसेंच आङ् अथवा नुम्, यांपैकीं एकानें अथवा अनेकांनीं व्यवधान असलें तरी हरकत नसणें, या णत्वादेशाविषयींच्या महत्वाच्या बाबी सांगितल्या आहेत. सूत्रांत जरी र हें व्यंजन उच्चारलें असलें तरी ऋ या स्वरापुढीलही नकाराला णत्व होतें असें भाष्यकारांनीं सांगितलें आहे. या णत्वाचे बाबतींत 'समानपदे' या पदानें णत्वाचें निमित्त म्हणजे ऋ, ॠ, र्, ष् आणि 'न'कार हे एकाच पदामध्यें असणें जरूर आहे असें सूत्रकारांनीं सांगितलें आहे. विशिष्ट ठिकाणीं समानपद नसलें तरी णत्व होतें. अशा विशिष्ट ठिकाणांचें परिगणन सूत्रकारांनीं 'पूर्वपदात् संज्ञायामगः'...'वा निंसनिक्षनिन्दाम्' (सू.३-३३) या सूत्रांनीं केलें आहे; व 'न भाभूपूकमि०'......'क्षुभ्नादिषु च' (सू. ३४-३९) या सूत्रांनीं निषेधस्थलें सांगितलीं आहेत. या सूत्रांपैकीं 'पूर्वपदात्संज्ञायामगः' (सू. ३), 'प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च' (सू. ११), 'उपसर्गादसमासेपि णोपदेशस्य' (सू. १४), 'नेर्गदनद०' (सू. १७) हीं णत्वविधायक सूत्रें व 'नशेः षान्तस्य' (सू.३६) व 'क्षुभ्नादिषु च' (सू.३९) हीं निषेध-सूत्रें महत्वाचीं आहेत. षत्वाप्रमाणें णत्व सुद्धां प्रांतीय उच्चारणवैशिष्ट्याचाच शिष्टसंमत भाषेवर झालेला एक विशेष प्रकारचा परिणाम म्हटल्यास चालेल. 'स्तोः श्चुना श्चुः'......'यरोनुनासिके०' (सू. ४०-४५) या सूत्रांनीं षत्वणत्वांप्रमाणें श्चुत्व वगैरे वर्णविकाररूप कार्यें सांगितल्यानंतर सूत्रकारांनीं 'अचो रहाभ्यां द्वे'......'दीर्घादाचार्याणाम्' (सू. ४६-५२) या सूत्रांनीं 'ह' या व्यंजनाशिवाय इतर व्यंजनांना विशिष्ट ठिकाणीं द्वित्व व द्वित्वनिषेध सांगितले आहेत. हें द्वित्वही प्रांतीय शब्दोच्चारणाचा शिष्टसंमत भाषेवर एक प्रकारचा परिणाम आहे असें दिसतें. द्वित्वानंतर जश्त्व चर्त्व इत्यादि वर्णविकार सांगितले आहेत. अशा रीतीनें केवलपदांचें, समस्तपदांचें, व स्वरांचें स्वरूप शक्य तितक्या थोडक्यांत पण संपूर्णपणें स्पष्ट करून झाल्यानंतर सर्वांत शेवटीं उदात्तापुढील अनुदात्ताचें उच्चारण स्वरितरूपानें म्हणजे मध्यम स्वरूपानें होतें (सू. ६७), तसेंच भाषेमध्यें सर्वत्र 'अ' या लघु अकाराचें संवृतच उच्चारण होतें (सू. ६८) असें सांगून सूत्रकारांनीं आपलें अष्टाध्यायी-सूत्र पुरें केलें आहे; व भाष्यकारांनींही 'एकशेषनिर्देशाद्वा स्वरभिन्नानां भगवतः पाणिनेः सिद्धम्' हें वार्तिकवचन उद्धृत करून त्यामधील 'भगवतः पाणिनेः' या पदांनीं सूत्रकारांना श्रद्धांजलि अर्पण करून व सिद्धम् हा अन्त्यमंगलरूप शब्द उच्चारून आपला व्याकरणमहाभाष्य हा ३६००० श्लोकविस्तार असलेला ग्रंथ पुरा केला आहे.

**त्रिपादी व आठवा अध्याय समाप्त.**

---

## महाभाष्यकार व व्याकरणमहाभाष्य.

### ३०३. महाभाष्य ग्रंथाचें स्वरूप.

पाणिनीनें रूपसिद्धीकडे प्रामुख्यानें लक्ष देऊन शास्त्रशुद्ध व शिष्टोच्चारित शब्द कोणते व अपशब्द कोणते हें कळावें व शुद्ध शब्दांचें यथार्थ ज्ञान व्हावें या हेतूनें त्याचे वेळीं प्रचारांत असलेल्या संस्कृत भाषेचें उत्तम व्याकरण लिहिलें व त्याबरोबर वैदिक शब्दांचें व त्यांच्या स्वर-वैशिष्ट्याचें विवेचन करून वैदिक भाषेचेंही यथार्थ ज्ञान करून दिलें. पाणिनीनंतर थोड्याच कालानें त्याच्या लाघवपूर्ण अष्टाध्यायी ग्रंथाचें ठिकठिकाणीं अध्ययनाध्यापन चालू झालें व व्याख्यानाच्या सारांशस्वरूपाचीं वार्तिकें जशीं लिहिण्यांत आलीं त्याप्रमाणेंच कालान्तरानें भाषेमध्यें झालेला फरक लक्षांत घेऊन व प्रचारांत आलेल्या नवीन शब्दांकडे लक्ष देऊन पूरक वार्तिकेंही लिहिलीं गेलीं. महाभाष्यकारांनीं पाणिनीच्या सूत्रांचें, तसेंच वर वर्णन केलेल्या दोन्ही प्रकारच्या वार्तिकांचें पूर्ण परिशीलन करून व स्वतःही कांहीं इष्टिवचनें घालून सूत्रें व वार्तिकें यांचें यथासांग व्याख्यान व विवेचन करणारा विद्वत्तापूर्ण 'महाभाष्य' हा विद्वन्मान्य ग्रंथ लिहिला; व वेदाङ्ग म्हणून समजल्या जाणाऱ्या व्याकरणाला शास्त्राचें स्वरूप प्राप्त करून दिलें. वर दिलेल्या पंचाऐशीं आन्हिकांच्या चिकित्सात्मक विवेचनावरून सहज ध्यानांत येईल कीं महाभाष्याची रचना, विषयप्रतिपादनशैली व आन्हिकात्मक विभागणी हीं सर्व अत्यन्त नैसर्गिक स्वरूपाचीं आहेत. महाभाष्य हा पूर्वी विशिष्ट योजना ( plan ) करून व काण्डात्मक अथवा अध्यायात्मक अथवा अधिकरणात्मक विभाग कल्पून लिहिलेला स्वतंत्र ग्रंथ नाहीं. अष्टाध्यायीचा व्याख्यानरूप ग्रंथ असल्यामुळें फार तर अष्टाध्यायीची योजना तीच महा-भाष्याची योजना असें म्हणतां येईल. भाष्यकारांनीं आपल्या शिष्यांना ग्रंथ पढवीत असतांना दरेक दिवशीं कांहीं अष्टाध्यायी-सूत्रांचें विस्तृत विवरण केलें असावें व नंतर तेंच विवरण आन्हिकरूपानें लिहिलें असावें असें कांहीं ठिकाणीं चालू प्रकरण मध्येंच तोडून आन्हिक संपविल्यावरून, तर इतर कांहीं ठिकाणीं एक प्रकरण संपवून दुसऱ्या प्रकरणाला नाममात्र आरंभ करून आन्हिक संपविल्यावरून स्पष्ट दिसून येतें. महाभाष्यकारांनीं पूर्वीच्या व्याकरणग्रंथांचें सूक्ष्म अध्ययन करून व वैदिक व लौकिक प्रयोगांचा संपूर्ण अभ्यास करून महाभाष्य हा ग्रंथ रचिल्यामुळें त्यांत आला नाहीं असा व्याकरणशास्त्राचा कोणताच विषय राहिला नाहीं. याचा परिणाम साहजिकच असा झाला कीं, शाकटायन, आपिशलि, काश-कृत्स्न इत्यादि महावैयाकरणांनीं लिहिलेल्या व्याकरणग्रंथांचा कांहीं प्रांतामध्यें चालू असलेला अभ्यासही बंद होऊं लागला व सर्व भारतखंडभर पाणिनीय व्याकरणाचा अभ्यास जिकडे तिकडे चालू झाला.

### ३०४. महाभाष्याविषयीं वैदिकेतरदर्शनाभिमानी व पाणिनीयेतर वैयाकरण यांची अप्रीति.

महाभाष्य हा ग्रंथ पाणिनीच्या अष्टाध्यायीचें पाण्डित्यपूर्ण विवेचन या स्वरूपाचा जरी असला तरी त्यामध्यें बरेचसे नवे व स्वतंत्र व्याकरणविषयक विचार महाभाष्यकारांनीं समाविष्ट केले होते; व वेदग्रंथांच्या पूर्ण प्रामाण्याविषयीं उल्लेख करून ठिकठिकाणीं उदाहरणांकरितां वैदिक वाक्यें उद्धृत केलीं होतीं. त्यामुळें शब्दसिद्धि व शब्दस्वरूपनिरूपण यांशिवाय इतर गोष्टींचा विचार न करतां व कोणत्याही दर्शनाकडे किंवा शास्त्राकडे आपला कल न दाखवितां प्राधान्यानें लौकिक व आपाततः वैदिक भाषेतील शब्दांचें यथार्थ ज्ञान होऊन लौकिक व

वैदिक वाक्यांचा अर्थ योग्य रीतीनें कळावा या हेतूनें पूर्ण निःपक्षपातीपणानें लिहिलेला ग्रंथ हें अष्टाध्यायी ग्रंथाला असलेलें स्वरूप महाभाष्याला राहिलें नाहीं. वेदाभिमानी पतञ्जलि मुनींनीं जागोजागीं वैदिक वाक्यें उद्‌धृत करून लिहिलेला महाभाष्यग्रंथ वेदप्रामाण्य मान्य नसणाऱ्या बौद्ध जैन व इतर दर्शनकारांना न आवडणें साहजिकच होतें. कदाचित् कांहीं जुन्या वैयाकरण-संप्रदायांच्या अभिमानी विद्वानांमध्यें असहिष्णुता व मात्सर्यही उत्पन्न झालें असावें. याचा परिणाम असा झाला कीं, कांहीं कालानें म्हणजे साधारणतः दोनचार शतकांनंतर लोकांचें महाभाष्याकडे पूर्ण दुर्लक्ष झालें; व अष्टाध्यायिवर तसेंच पूर्वव्याकरणांवर आधारलेल्या चान्द्र शाकटायन कालाप वगैरे व्याकरणग्रंथांचा लोकांमध्यें फैलाव झाला व अष्टाध्यायीवरही लहान लहान स्वतंत्र वृत्तिग्रंथ लिहिले गेले. याविषयीं ज्यास्त विवेचन भर्तृहरीच्या कालखंडांत येईलच.

## ३०५. दंतकथांवर आधारलेला पतंजलीचा जीवनवृत्तान्त.

महाभाष्यकार पतंजलि मुनि यांच्या कालाविषयीं विद्वानांचें बहुतांशीं एकमत झालेंच आहे; व अंतर्गत आणि बाह्य पुराव्यांवरून इसवी सनापूर्वी दुसरें शतक हा त्यांचा काल देण्यांत येतो ( मागें पृष्ठ ७ परिच्छेद १० पहा ). त्यांच्या जीवनेतिहासाविषयीं माहिती परंपरागत दंतकथांवरून पुढें दिल्याप्रमाणें मिळते : गोनर्द देशामध्यें तपश्चर्या करणाऱ्या व लघुभाष्यग्रंथ लिहिणाऱ्या एका ऋषीच्या अंजलींत सायंकाळीं अर्घ्यदानाचे वेळीं लहान दिव्य बालकरूपानें त्यांचा अवतार झाला व त्यामुळें त्यांचें पतञ्जलि नांव ठेवण्यांत आलें; व त्यांनीं लघुभाष्याचा विस्तार या स्वरूपाचा महाभाष्य हा ग्रंथ लिहिला. हीच आख्यायिका दंतकथांची भर घालून विस्तृत रूपानें पतञ्जलिचरित नांवाच्या आधुनिक लघुकाव्यांत दिलेली आहे. शेषावर अधिष्ठित ध्यानस्थ भगवान् विष्णु शंकराचें ताण्डव नृत्य मनश्चक्षूंनीं पहात असतां तल्लीन झाल्यामुळें त्यांच्या भाराचा शेषाला फार त्रास झाला. ध्यान संपल्यानंतर शेषानें पृच्छा केली असतां शेषशायींनीं आपण शिवाचें ताण्डवनृत्य पाहत होतों असें सांगितलें. तें ऐकून शेषानेंही ताण्डवनृत्य पाहण्याची आपली इच्छा दर्शविली व शेषशायींनींही पृथ्वीतलावर पतञ्जलिरूपानें शेषाचा अवतार झाल्यावर ती इच्छा सफल होईल असें शेषाला आश्वासन दिलें.

## ३०६. शेषाचा पतञ्जलि रूपानें अवतार.

कांहीं कालानंतर शेषानें पृथ्वीतलावर चिदम्बरम् गांवाजवळच्या शान्तिपूर्ण सृष्टिसौंदर्य-युक्त तपोभूमींत अवतार घेण्याचें मनांत आणिलें व ज्या तापसीच्या प्रभावानें तें तपोवन अहिंसामय पुण्यस्थान झालें होतें त्या गोणिका नांवाच्या तापसीच्या अंजलींतून तो खालीं पडला व त्यानें बालमुनीचें रूप धारण केलें. गोणिकेनें तो निसर्गसुंदर तेजःपुञ्ज बालक पाहतांच पुत्रप्राप्तीकरितां केलेली आपली तपश्चर्या सफल झाली याबद्दल समाधान मानून त्या बालमुनीचें पतञ्जलि हें नांव ठेविलें. आपण परत भेटावयास येऊं असें गोणिकेला आश्वासन देऊन या बालकानें समुद्रतीरीं प्रयाण केलें व तेथें कडक तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न केलें; व ईश्वराच्या कृपेनें चिदम्बर गांवीं परत येऊन व्याघ्रभूति नांवाच्या वैयाकरणाच्या बरोबर मंदिरांत दिव्यदृष्टीनें ताण्डवनृत्य पाहिलें. नृत्याच्या शेवटीं शंकरानें पतञ्जलि मुनीला पाणिनिसूत्रांवर महाभाष्य

रचण्याची आज्ञा दिली. पतञ्जलि मुनीनें आज्ञा मान्य करून महाभाष्यरचनास व शिष्यांना त्याचा पाठ देण्यास सुरवात केली, व आपल्या सहस्रफणायुक्त देहाच्या तेजानें शिष्य दिपून न जावे म्हणून पडद्याआड बसून शिष्यांना पढवण्याचें काम चालू ठेविलें. याप्रमाणें तेहेतीस आन्हिकें झाल्यानंतर चौतिसाव्या 'वासरूप' आन्हिकाचा पाठ चालू असतां निरनिराळ्या मुखांनीं निरनिराळ्या शंकांचें निवारण करणाऱ्या गुरुजींना प्रत्यक्ष पाहण्याची शिष्यांना इच्छा अथवा दुर्बुद्धि झाली व त्यांनीं पडदा दूर सारला. पडदा दूर होतांच ते सर्व शिष्य भस्मसात् होऊन पडले. इतक्यांत त्या वेळीं बाहेर गेलेला एक शिष्य परत येतांना गुरुजींना दिसला व त्यांनीं जटाधारी तापसाचें रूप घेऊन त्याला सर्व महाभाष्य पढविलें; मात्र, शिष्यानें बाहेरून परत आल्यावर आचमनादि शौचसंपादन कृत्य न केल्यामुळें त्याला शाप देऊन राक्षसाचें रूप दिलें; व त्यानें शापांतून मुक्त होण्याविषयीं कळकळीची विनंति केल्यानंतर त्याला तुझ्याकडे वेळोवेळीं अध्ययनाकरितां जे जे शिष्य येतील त्यांना तूं 'पच्' धातूच्या निष्ठा–प्रत्ययान्ताचें रूप विचार व जो पक्वः असें उत्तर देईल त्याला तूं संपूर्ण महाभाष्य शिकव म्हणजे तूं शापांतून मुक्त होशील असें आश्वासन दिलें. यानंतर पतञ्जलि मुनींनीं योगसूत्रें रचून व चरकसंहितेचें प्रतिसंस्करण करून आपलें अवतारकृत्य संपविलें.

## ३०७. शेषाचा चन्द्रगुप्त रूपानें पुन्हां अवतार.

यानंतर थोड्याच कालांत शेषानें स्वतःच ब्राह्मणकुलांत अवतार घेऊन चन्द्रगुप्त नांव धारण केलें व राक्षसाची गांठ घेतली व राक्षसानें पच् धातूचें निष्ठान्त रूप काय हें विचारलें असतां 'पक्वः' असें उत्तर दिलें. राक्षसानेंही आपल्या गुरुजींच्या आज्ञेप्रमाणें चंद्रगुप्ताला सर्व महाभाष्य पढविलें. महाभाष्याचा पाठ घेत असतां दररोज पठनांत आलेला मजकूर वडाच्या पानावर कोरून लिहिण्याचा परिपाठ चंद्रगुप्तानें ठेवला होता. अध्ययन संपूर्ण झाल्यावर त्या वडांच्या पानांचा भारा वस्त्रांत गुंडाळून तो घरीं जाण्यास निघाला. एके दिवशीं वाटेंत भारा उशाशीं घेऊन तो झोपला असतां एका कोकरानें तीं पानें इतस्ततः उडवून टाकलीं; व तीं पानें गोळा करतां करतां चंद्रगुप्त थकून गेला व त्याला भूक लागली. इतक्यांत एक शूद्र जातीची स्त्री तेथें आली. तिनें त्याला लोणी खावयास दिलें व वडाचे पानावर समग्र महाभाष्य ग्रंथ लिहून एक ब्राह्मण येईल व त्यानें तुझ्याशीं लग्न लावल्यास तुम्ही दोघे सुखी व्हाल असें एका तापसानें मला सांगितल्यावरून मी आपणास मजबरोबर विवाह करण्याची विनंति करीत आहे असें ती म्हणाली. चंद्रगुप्तानें ती विनंति मान्य केली पण तिच्याशीं विवाह करण्यापूर्वी ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य या जातींच्या एक एक स्त्रीशीं प्रथम विवाह करून मग तिच्याशीं विवाह करण्यांत येईल असें तिला सांगितलें. नंतर तिला घेऊन तो आपल्या गांवीं गेला; व तेथें त्यानें चार जातींच्या चार स्त्रियांशीं लग्नें केलीं. त्याला प्रत्येकीपासून एक असे चार मुलगे झाले व त्यांचीं नावें त्यानें वर्णानुक्रमें वररुचि, विक्रम, भट्टि व भर्तृहरि अशीं ठेवलीं. यांपैकीं भर्तृहरीला त्यानें संपूर्ण महाभाष्य शिकविलें; पण तें त्यानें भर्तृहरि हा शूद्रस्त्रीचा मुलगा असल्यामुळें प्रत्यक्ष शिकविलें नाहीं; परंतु इतरांना शिकवीत असतांना भर्तृहरीला पाठ ऐकण्यास परवानगी दिली. कांहीं वर्षांनीं चन्द्रगुप्तानें हिमालयाकडे प्रयाण केलें व चतुर्थाश्रम स्वीकारून गोविंदभगवत्पूज्यपाद नांव धारण केलें व शंकराचार्यांना दीक्षा देऊन व विद्यादान करून आपलें द्वितीयावतारकृत्य संपविलें.

## ३०८. दाक्षिणात्य पतंजलिकथानकांतील ऐतिहासिक तथ्य.

वर दिलेल्या पतंजलीच्या जीवनवृत्तान्ताला दाक्षिणात्य पतञ्जलिकथानक असें नांव देतां येईल. या जीवनवृत्तान्तांतील ठळक आढळून येणाऱ्या गोष्टी म्हणजे ( १ ) शेषाचा पृथ्वीतलावर शंकराचें तांडवनृत्य पाहण्याकरितां पहिला अवतार व महाभाष्यविरचना, ( २ ) ब्राह्मणकुमार रूपानें दुसरा अवतार व भर्तृहरी व इतर शिष्यांना महाभाष्याचें अध्यापन, व ( ३ ) चतुर्थाश्रमीं श्रीशंकराचार्योना विद्यादान व दीक्षादान. पतञ्जलीचें हें दाक्षिणात्य जीवनवृत्त दन्तकथामूलक व केवळ काल्पनिकच आहे हें खरें; पण त्याचें सूक्ष्म परीक्षण केल्यास कांहीं ऐतिहासिक वृत्त प्रसृत दन्तकथांच्या मुळाशीं असण्याचा संभव आहे. महाभाष्यरचनेनंतर कांहीं थोड्या कालावधींतच भारतामध्यें बौद्धधर्माचा व जैन धर्माचा निरनिराळ्या पुष्कळ प्रांतांमध्यें खूपच प्रसार झाल्यामुळें व बौद्धमतावलम्बी व जैनमतावलम्बी विद्वानांनीं समजण्यास सुलभ अशा प्रकारचे पाणिनिसूत्रावर वृत्तिग्रंथ व इतरही व्याकरण-ग्रंथ रचिल्यामुळें पाणिनिसंप्रदायाचें उत्तरेकडील स्थान नाहींसें झालें; व दक्षिणेंत विशेषतः हल्लींच्या मद्रास इलाख्यांत त्याचा जोरानें प्रचार झाला. 'कालांतरानें साहजिकच दक्षिणेंतील वैयाकरणांना आपली गुरुशिष्यपरंपरा त्रिमुनींशीं मिळवावी अशी इच्छा झाली व त्यांनीं 'महाभाष्याचें अध्ययन अत्यंत कमी झालें व पर्वतदेशाहून कशीबशी महाभाष्याची एक प्रत मिळवून चंद्रानें महाभाष्याचें पुनरुज्जीवन केलें' या भर्तृहरीनें वाक्यपदीयांत दिलेल्या आख्यायिकेचा फायदा घेऊन महाभाष्यकार पतंजलीचा चिदंबरम् या व्याकरणाध्यापनकेन्द्राशीं संबंध जोडून दिला, चंद्रगुप्ताला शेषाचा अवतार म्हणून म्हटलें, व चंद्रगुप्तानें पर्वत प्रांतांत राहणाऱ्या राक्षसापासून महाभाष्याचें ज्ञान संपादन केलें अशी आख्यायिका तयार केली; इतकेंच नव्हे, तर याच्याही पुढें जाऊन भर्तृहरीला चंद्रगुप्ताचा पुत्र बनविलें. एकंदरींत पाहतां, पतञ्जलि हा एक मोठा मुनि होऊन गेला व त्यानें महाभाष्य रचिलें, कांहीं शतकांनीं महा-भाष्याचें अध्ययन उत्तरेकडे खंडित झालें तें इतकें कीं त्याची एकच प्रत उरली, चन्द्रा-चार्यांनीं त्याच्या अभ्यासास पुनः चालना दिली, व भर्तृहरीनें व्याकरणशास्त्रावर ग्रंथ रचून महाभाष्याध्ययनास स्थिरता आणून दिली इतकें ऐतिहासिक तथ्य या दन्तकथांच्या मुळाशीं आहे हें स्पष्ट दिसून येतें.

---

१ महाभाष्यग्रन्थाविषयीं वाक्यपदीयांतील पुढें दिलेले श्लोक विचारांत घेण्याजोगे आहेत:—

प्रायेण संक्षेपरुचीनल्पविद्यापरिग्रहान् । संप्राप्य वैयाकरणान् संग्रहेऽस्तमुपागते ॥
कृतेथ पतञ्जलिना गुरुणा तीर्थदर्शिना । सर्वेषां न्यायबीजानां महाभाष्ये निबन्धने ॥
अलब्धगाधे गाम्भीर्यादुत्तान इव सौष्ठवात् । तस्मिन्नकृतबुद्धीनां नैवावास्थित निश्चयः ॥
बैजिसौभवहर्यक्षैः शुष्कतर्कानुसारिभिः । आर्षे विप्लाविते ग्रन्थे संग्रहप्रतिकञ्चुके ॥
यः पतञ्जलिशिष्येभ्यो भ्रष्टो व्याकरणागमः । काले स दाक्षिणात्येषु ग्रन्थमात्रे व्यवस्थितः ॥
पर्वतादागमं लब्ध्वा भाष्यबीजानुसारिभिः । स नीतो बहुशाखत्वं चन्द्राचार्यादिभिः पुनः ॥
न्यायप्रस्थानमार्गोस्तानभ्यस्य स्वं च दर्शनम् । प्रणीतो गुरुणास्माकमयमागमसंग्रहः ॥
वर्त्मनामत्र केषांचिद्वस्तुमात्रमुदाहृतम् । काण्डे तृतीये न्यक्षेण भविष्यति विचारणा ॥

वाक्यपदीय २।४८४–४९१

## ३०९. पतंजलीचें जन्मस्थान, अध्ययनस्थान व निवासस्थान.

ऐतिहासिकदृष्ट्या पतंजलि हा एक अत्यंत तेजस्वी विद्वान् ब्राह्मण ग्रंथकार होऊन गेला. त्याचा जन्म गोनर्द देशांत झाला, त्याच्या आईचें नांव गोणिका होतें व त्यानें शकपूर्व दुसऱ्या शतकामध्यें व्याकरणमहाभाष्य हा ग्रंथ लिहिला. गोनर्द हें हल्लींच्या पंजाब प्रांताच्या एका भागाला नांव होतें असें कांहींचें मत आहे; इतर कांहीं विद्वान् गोनर्दीय हें छ प्रत्यय लावून नामसाधित झाल्यामुळें गोनर्द हा एक पूर्वेकडील देशविभाग होता असें म्हणतात. अयोध्येच्या जवळच्या एका प्रदेशाला गोनर्द हें नांव होतें; व हा प्रदेश इरावतीच्या (रावी नदीच्या) पुष्कळच पूर्वेस असल्यामुळें त्याला प्राग्देश म्हणतांही येतें. इतर कांहीं विद्वान् गोनर्द याचा प्राकृत उच्चार गोणड्ड गोण्ड असा होऊन हल्लींचा गोण्ड देश हाच गोनर्द देश असावा असें मानतात. कसेंही असो, पंजाब प्रांतांतील गान्धार, उदीच्य व वाहीक या देशांतील बारीकसारीक गांवें, खेडीं, तलाव इत्यादिकांचीं नांवें व माहिती त्यांच्या व्याकरणमहाभाष्य ग्रंथामध्यें आढळत असल्यामुळें, जन्म कोठेंही झाला असला तरी पतंजलि मुनींचें निवासस्थान, शिक्षणस्थान व अभ्यासस्थान विपाश् व रावी या नद्यांच्या उत्तरेस असावें हें निश्चित होतें. वेदग्रंथांचें त्यांचें अध्ययन उत्कृष्ट होतें हें त्यांनीं ठिकठिकाणीं संहिता, ब्राह्मण, आरण्यक, धर्मसूत्रें यांतून उद्धृत केलेल्या वाक्यांवरून सिद्ध होतें. त्या वेळच्या पुराण ग्रंथांचें व काव्यनाटकांचेंही त्यांनीं उत्तम ज्ञान संपादन केलें होतें. महाभाष्य लिहिण्यापूर्वी त्यांनीं लघुभाष्य लिहिलें असावें असें ठिकठिकाणीं आढळणाऱ्या व ग्रंथामध्यें मागें न आलेल्या विषयाला उद्देशून लिहिलेल्या 'उक्तं वा' या वचनावरून दिसून येतें असें कांहीं लोक म्हणतात; तर इतर कांहींचें मत ज्या ऋषींच्या अंजलींत पतंजलि मुनि प्रकट झाले त्या ऋषींनींच लघुभाष्य लिहिलें होतें असें आहे. (याविषयीं मागें प्रस्तावना परि. १, २ पृष्ठें ७१, ७२ पहा.)

## ३१०. महाभाष्य, योगसूत्रें व चरकप्रतिसंस्करण या ग्रंथांच्या कर्त्यांविषयीं विचार.

पतञ्जलि मुनींनीं महाभाष्याशिवाय योगसूत्रें रचिलीं व आयुर्वेदाच्या जुन्या चरकग्रंथाचें प्रतिसंस्करण केलें अशी लोकांमध्यें दृढ समजूत आहे. पण विद्वानांमध्यें याविषयीं तीव्र मतभेद आहे. बहुतेक आधुनिक विद्वानांचें मत चरकप्रतिसंस्करण करणारा व कनिष्क राजाच्या कन्येला रोगांतून मुक्त करणारा इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांतील पतंजलि हा महाभाष्यकार पतंजलीहून निराळा, त्याप्रमाणेंच इसवी सनाच्या तिसऱ्या अथवा चौथ्या शतकांतील योगसूत्रकर्ता पतञ्जलि या दोघांहूनही निराळा असें आहे. तिन्ही ग्रंथांचा कर्ता एकच पतंजलि या विषयीं 'योगेन चित्तस्य पदेन वाचां मलं शरीरस्य तु वैद्यकेन । योपाकरोत् तं प्रवरं मुनीनां पतञ्जलिं प्राञ्जलिरानतोऽस्मि' हा वैयाकरणकुलांमध्यें महाभाष्याच्या अध्ययनाला प्रत्यहीं सुरवात करतांना म्हटला जाणारा श्लोक प्रसिद्धच आहे. अशाच तऱ्हेचा पुराणांचें प्रवचन करण्यापूर्वी म्हटला जाणारा 'नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् । देवीं सरस्वतीं वाचं ततो जयमुदीरयेत्' हा श्लोक व त्याप्रमाणेंच 'नमः श्रीशंकरानन्दगुरुपादाम्बुजन्मने । सविलासमहामोहग्राहग्रासैककर्मणे" हा शांकरग्रंथांच्या अध्ययनापूर्वी पाठशालांमध्यें गुरु व शिष्य या सर्वांकडून म्हटला जाणारा श्लोक हे लोकांमध्यें प्रसिद्धच आहेत. 'योगेन चित्तस्य०' हा श्लोक

भोजकृतन्यायवार्तिकांत आढळतो; त्यावरून इसवी सनाच्या अकराव्या शतकामध्यें पतञ्जलि हा योगसूत्र, महाभाष्य व चरकप्रतिसंस्करण या तिहींचाही कर्ता एकच पतञ्जलि होता हें भोजराजानें आपलें मत प्रतिपादन केलें होतें हें दिसून येतें; इतकेंच नव्हे तर महाभाष्यकार पतंजलीच्याच धर्तीवर भोजराजानें व्याकरणावर सरस्वतीकण्ठाभरण, योगशास्त्रावर पातञ्जल-योगसूत्रवृत्ति व वैद्यकावर राजमृगाङ्क हे ग्रन्थ रचिले. नागेशभट्टांनीं मञ्जूषाग्रंथाच्या आरंभीं 'आप्तोपदेशरूपः शब्दः प्रमाणम् । आप्तो नाम अनुभवेन वस्तुतत्त्वस्य कार्त्स्न्येन निश्चयवान् । रागादिवशादपि नान्यथावादी यः सः इति चरके पतञ्जलिः' म्हणून पतञ्जलीचा उल्लेख केला आहे.

## ३११. योगसूत्र, महाभाष्य व चरकसंस्करण या तिन्ही ग्रंथांचे एककर्तृकत्वाविषयीं पुरावा.

'पातञ्जलमहाभाष्यचरकप्रतिसंस्कृतैः । मनोवाक्कायदोषाणां हन्त्रेऽहिपतये नमः' हा चरकटीकाकार चक्रवर्ती याच्या टीकेच्या आरंभींच 'तिन्ही ग्रंथांचा कर्ता एकच पतञ्जलि' असें प्रतिपादन करणारा श्लोक आढळून येतो. 'पातञ्जल' या शब्दाचा अर्थ या ठिकाणीं 'पतञ्जलीचा ( योगसूत्र ) ग्रंथ' हा आहे. या चरकटीकाकार चक्रवर्तीचा काल इसवी सन सोळावें शतक देण्यांत येतो व याचीं चक्रदत्त आणि चक्रपाणिदत्त अशीं नांवें आढळून येतात. या चक्रवर्तीनें प्रक्रियाकौमुदीवर टीका लिहिली आहे. या बाबतींत यापेक्षांही जरा अप्रत्यक्ष पण पूर्वकालच्या ग्रंथांत उपलब्ध असलेला पुरावा भर्तृहरीच्या वाक्यपदीयांतील 'कायवाग्बुद्धि-विषया ये मलाः समवस्थिताः । चिकित्सालक्षणाध्यात्मशास्त्रैस्तेषां विशुद्धयः' (वा. प. १।१४८) या श्लोकांत मिळतो. प्रस्तुत श्लोक हा भाष्यकारांच्या प्रशंसेचा द्योतक आहे हें पुञ्जराजांनीं आपण लिहिलेल्या वाक्यपदीयाच्या दुसऱ्या कांडांतील 'अलब्धगाधे गाम्भीर्याद् उत्तान इव सौष्ठवात्' या श्लोकाच्या टीकेमध्यें "तदेवं ब्रह्मकाण्डे 'कायवाग्बुद्धिविषया ये मलाः०' इत्यादिश्लोकेन भाष्यकारप्रशंसोक्ता इह चैवं भाष्यप्रशंसेति शास्त्रस्य शास्त्रकर्तुश्च टीकाकृता महत्तोपवर्णिता" या वाक्यानें स्पष्ट केलें आहे. यांशिवाय, महाभाष्याचा आरंभ 'अथ शब्दानुशासनम्' या वाक्यानें झाला आहे तसाच योगसूत्रांचा आरंभ 'अथ योगानुशासनम्' या वाक्यानें झाला आहे; 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' अथवा 'अथातो धर्मजिज्ञासा' यांसारख्या आरंभवाक्यानें झाला

---

१ या बाबतींत पुढील श्लोक विचारांत घेण्यासारखा आहे : 'शब्दानामनुशासनं विदधता पातञ्जले कुर्वता, वृत्तिं राजमृगाङ्कसंज्ञकमपि व्यातन्वता वैद्यके । वाक्चेतोवपुषां मलः फणिभृतां भर्त्रेव येनोद्धृतः तस्य श्रीरणरङ्गमल्लनृपतेर्वाचो जयन्त्युज्ज्वलाः.' (भोजकृतयोगसूत्रवृत्ति).

२ 'पातञ्जले महाभाष्ये कृतभूरिपरिश्रमः' या शब्देन्दुशेखराच्या प्रारंभींच्याच श्लोकाचें विवेचन करतांना टीकाकार भैरवमिश्र यांनीं 'प्रथमं पातञ्जलशब्दोपादानं बलवत्तरमङ्गलाय, महाभाष्यमात्रोक्तौ शारीरकसूत्रभाष्यस्यापि बोधः स्यादतः पातञ्जलपदम् । तावन्मात्रोक्तौ चरकेतिव्याप्तिरतो महत्पदम्' या वाक्यामध्यें चरकग्रंथाचा पतंजलि हा कर्ता होता असें स्पष्ट सुचविलें आहे. योगसूत्रांचा उल्लेख या ठिकाणीं 'पातञ्जले' या शब्दानें घ्यावा व 'पातञ्जले महाभाष्ये च' असा 'च' शब्दाचा अध्याहार येथें घ्यावा असें अभिनवचन्द्रिका, चिदस्थिमाला व ज्योत्स्ना या टीकांमध्यें टीकाकारांनीं आपलें स्पष्ट मत व्यक्त केलें आहे.

नाहीं हीही एक बाब येथें लक्षांत घेण्याजोगी आहे. आत्रेयसंहितेचें पतंजलि मुनींनीं फक्त प्रतिसंस्करणच केलें असल्यामुळें तेथें आरंभवाक्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. शिवाय, महाभाष्य व योगसूत्र या दोन्ही ग्रंथांमध्यें इष्ट देवतेला केलेलें मंगल आढळून येत नाहीं हीही येथें एक लक्षांत घेण्यजोगी गोष्ट आहे.

## ३१२. चरक शब्दाचा अर्थ.

चरकसंहितेचें मूळचें नांव आत्रेयसंहिता असें असावें; कारण, त्या संहितेचा कर्ता आत्रेय पुनर्वसु म्हणून दिला आहे, व आत्रेयानें अग्निवेशाला या आयुर्वेदसंहितेचा उपदेश केला असें संहितेंतच म्हटलें आहे. हे अग्निवेश व आत्रेय तक्षशिलेमध्यें समकालीन होते असें मानतात. या संहितेचें प्रथम संस्करण चरकानें केलें व दुसरें दृढबलानें केलें असें संहितेंतच सांगितलें आहे. चरक शब्दाचे कोठेंही निवास न करतां इतस्ततः हिंडणारा, हेर, मान्त्रिक, आयुर्वेदज्ञ वैद्य, वंशाग्रनर्तक इत्यादि अनेक अर्थ आहेत. चरक या वेदशाखेचा उल्लेख पाणिनीच्या सूत्रांत आला आहे (सू. ४।३।१०७; ५।१।११) व काशिकाकारांनीं चरक हें वैशम्पायनाचेंच दुसरें नांव होतें असें म्हटलें आहे (सू. ४।३।१०४ काशिकावृत्ति). कृष्णयजुर्वेदाची चरक नांवाची एक शाखा होती. तिचे अनुयायीही चरक नांवानें संबोधिले जात असत. आत्रेय-संहितेचें प्रतिसंस्करण करणारा चरक हा शेषाचा अवतार होता असेंही मागाहून मानण्यांत आलें. पतञ्जलि या नांवाचा उल्लेख चरकसंहितेमध्यें कोठेंही मिळत नाहीं. पतंजलीचेंच चरक हें नांव होतें असा पौर्वात्य देशीयांचा समज होता. थोडक्यांत दिलेल्या या सर्व वृत्तान्तावरून असें म्हणतां येणें शक्य आहे कीं चरकशाखेच्या अनुयायी एका विख्यात मांत्रिक आयुर्वेदज्ञ यायावर ब्राह्मणानें अग्निवेशसंहितेचें प्रतिसंस्करण केलें; व त्यानंतर आत्रेय अथवा अग्निवेश या दोघांचाही उल्लेख संहिताकार म्हणून न होतां चरकाचा उल्लेख होऊं लागला व त्या संहितेला चरकसंहिता म्हणून नांव प्राप्त झालें. हे चरक शाखेचे लोक साधारणतः आयुर्वेदज्ञ, मन्त्रज्ञ व नागाचे उपासक असत. या लोकांमध्यें कोणीही लोकोत्तरप्रतिभाशाली पुरुष झाला तर त्याला नागाचा अथवा शेषाचा अवतार मानण्यांत येणें साहजिकच होतें; व त्याप्रमाणेंच चरक हा शेषाचा अवतार होता असा प्रवाद लोकांमध्यें प्रसृत झाला. महाभाष्यकर्ता पतञ्जलि यालाही शेषाचा अवतार म्हणून समजण्यांत आलें. या दोनही सारख्या घटनांमुळें चरकसंहिताकर्ता चरक व महाभाष्यकर्ता पतञ्जलि हे एकच म्हणून समजण्यांत आलें असावें. कदाचित् चरक-शाखाध्यायी म्हणून चरक हें उपनांव धारण करणाऱ्या पतञ्जलि नांवाच्या प्रतिभाशाली ब्राह्मणानेंच दोनही ग्रंथ रचिले असावे.

## ३१३. योगसूत्रें, महाभाष्य व चरकप्रतिसंस्करण या ग्रंथांचें एककर्तृकत्व.

महाभाष्यामधील आरम्भींच दिलेल्या 'शं नो देवीरभिष्टये,' 'इषेत्वोर्जे त्वा,' 'अग्निमीळे पुरोहितम्,' व 'अग्न आयाहि' या चार वाक्यांपैकीं कृष्णयजुर्वेदाचें 'शं नो देवीः' हें वाक्य प्रथम दिलें असल्यामुळें भाष्यकार हे कृष्णयजुर्वेदाच्या चरक शाखेचे अनुयायी असावे. महाभाष्यां-तील अनेक उल्लेखांवरून पतञ्जलीनें सर्व भरतखंडभर प्रवास केला होता व त्याला आयुर्वेदाची बरीच माहिती होती असें दिसून येतें. दधित्रपुसं प्रत्यक्षो ज्वरः, नड्वलोदकं पादरोगः अशीं

वचनें महाभाष्यामध्यें आढळतात. पतञ्जलि हा पूर्वेकडील म्हणजे रावीनदीच्या पूर्वेकडील प्रयाग जवळच्या गोनर्द देशाचा रहाणारा होता, त्याचें अध्ययन तक्षशिलेमध्यें अथवा शलातुर (लाहोर) मध्यें झालें होतें, त्यानें सर्व देशभर प्रवास केला होता, व त्यानें आरंभीं आत्रेय संहितेचें परिष्करण केलें व नंतर महाभाष्य रचिलें व नंतर योगसूत्र रचिलें असें म्हणणें शक्य आहे. योगसूत्रामध्यें आर्ष प्रयोग नाहींत, प्रतिपाद्य विषय जरी समजावयास कठिण असला तरी इतर सूत्रांप्रमाणें सूत्राचा अर्थ करावयास कष्ट पडत नाहींत; तो सुलभ रीतीनें करतां येतो व अध्याहाराची जरूर लागत नाहीं. या इतर शास्त्रावरील सूत्रांशीं तुलना करतां दिसून येणाऱ्या योगसूत्राच्या वैशिष्ट्यामुळें योगसूत्रकर्ता मोठा वैयाकरण असावा व 'अथ योगानुशासनम्' या प्रथमसूत्राच्या शब्दरचनेवरून व 'प्रत्ययानुपश्य' (यो. सू. २।२०) या व्याकरणसूत्रासिद्ध नेहमीं न आढळणाऱ्या शब्दप्रयोगावरून योगसूत्रकर्ताही महाभाष्यकार पतञ्जलीच असावा असें म्हणणें शक्य आहे. अनेक शास्त्रांमध्यें उत्तम प्रतीची ग्रंथनिर्मिति प्रतिभासंपन्न गाढ विद्वानाला करितां येतें हें वाचस्पतिमिश्र, अभिनवगुप्त, माधवाचार्य, अप्पयदीक्षित, नागेश इत्यादि विद्वानांनीं केलेल्या ग्रंथकार्यावरून स्पष्ट होतें. फार काय, हल्लींच्याच काळांत गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांनींही व्याकरण वेदान्त, मीमांसा, धर्मशास्त्र इत्यादि शास्त्रांवर उत्तम ग्रंथनिर्मिति केली आहे; इतकेंच नव्हे, तर सर्वदर्शनसंग्रहासारख्या ग्रंथावर विचारपरिप्लुत टीका लिहितांना त्यांनीं आपला प्रत्येक दर्शनाचा सूक्ष्म अभ्यास व ज्ञान प्रकट केलें आहे.

## ३१४. महाभाष्यकारांच्या वेळची समाजस्थिति.

महाभाष्यकारांचा ग्रंथाभ्यास व ग्रंथनिर्मिति हीं शास्त्रीय असल्यामुळें त्यांमध्यें आलेल्या उल्लेखांवरून सर्वसाधारण समाजाच्या परिस्थितीचें आकलन करतां येणें शक्य नाहीं; तरी पण, वरच्या दर्जाच्या विशेषतः विद्याजीवी लोकांच्याबद्दल कांहीं विधानें करतां येतील. जाती व पोटजाती यांमध्यें समाजाची विभागणी त्यांचे कालीं झाली होती; या जाती जन्मावरून व धंद्यावरून पडलेल्या दोनही प्रकारच्या होत्या. वरचे वर्गांत मोडणाऱ्या विशेषतः विद्याजीवी लोकांचा उल्लेख गोत्रनांवांनीं व वडील मनुष्य जीवंत असल्यास युवनामांनीं केला जात असे. खालचे पातळींतील लोकांचा उल्लेख जीविकासाधनांवरून केला जात असे व त्यांतील विशिष्ट व्यक्तींचा उल्लेख आईच्या नांवापुढें सुत अथवा पुत्र शब्द जोडून केला जात असे. वरचे वर्गांत

---

१ या बाबतींत डॉ. मॅक्सम्यूलर यांनीं "Both Lassen and Garbe, seem inclined to accept the identity of the two Patañjalis, but this would force us to ascribe the most heterogeneous works to one and the same author" या शब्दामध्यें महाभाष्यकार पतंजलि व योगसूत्रकर्ता पतंजलि हे निराळे असण्याला 'अत्यन्तभिन्न अशा शास्त्रांवर एकाच मनुष्याला लिहितां येणें अशक्य आहे' असें कारण दिलें आहे. अत्यंत अपरिचित संस्कृत भाषेचें व शास्त्रांचें अध्ययन करणाऱ्या पाश्चात्य पंडितांच्या बाबतींत हें कारण देतां येईल; पण भारतीयांना अत्यंत विभिन्न अशा शास्त्रांचें अध्ययन करणें हें अशक्य नाहीं. आत्मकथनदोष पत्करून सांगावयाचें म्हटल्यास लेखकानेंही जैन दर्शनाचा व अर्धमागधी भाषेचा अभ्यास करून जैन दर्शनांतील विंशतिविंशिका ग्रंथाचें व जैनमन्त्रशास्त्रांतील भैरवपद्मावतीकल्प या ग्रंथाचें संपादन केलें आहे; व त्याप्रमाणेंच ज्योतिषशास्त्रावरील जैमिनिसूत्रावर संस्कृत टीका लिहिली आहे व वेदान्त व व्याकरण या विषयांचेंही अध्ययन व अध्यापन अनेक वर्षे केलें आहे.

स्त्रियांचे नांवाचा उल्लेख करण्याचा प्रसंग क्वचितच येई; व तो त्यांच्या विशिष्ट नांवानेंच केला जात असे. कधीं कधीं गोत्रनांवानेंही केला जात असे. खालचे वर्गांतील स्त्रियांना पुष्कळ वेळा त्यांचे ठिकाणीं आढळणाऱ्या कांहीं वैशिष्ट्यामुळें, किंवा कांहीं विशिष्ट प्रसंगामुळेंही विशिष्ट नांवें दिलीं जात असत. सामान्यतः लोकांचे ग्रामोद्योग व शेती हे दोनच मुख्य धंदे होते. महाभाष्यामध्यें कांहीं आयुधजीवी लोकांचाही उल्लेख आहे, त्यावरून कांहीं लढवय्या जातीही होत्या; व त्यांतील लोकांच्या सेनेच्या तुकड्या केल्या जात असत असें दिसतें. सिंधुप्रांतांतील घोड्यांचाही उल्लेख महाभाष्यामध्यें आढळतो. लोकांच्या निवासस्थानांपैकीं ग्राम, घोष, संवाह व नगर या चार मुख्य विभागांचा उल्लेख महाभाष्यामध्यें आढळतो. प्रत्येक गांव हें स्वयंपूर्ण असे व त्यामध्यें पांच प्रकारचे शिल्पी रहात असत. त्यांशिवाय त्यांचे पौरोहित्य करणारे वैदिक ब्राह्मण व त्यांचेवर अवलंबून राहणारे इतर लोकही असत. गांवकऱ्यांचें उत्पन्न साधारणतः व्याज, मालकी, फायदा, कर व नजराणा या पांच प्रकारचें असे. व्यापार शकटसार्थांनीं स्थलमार्गानें केला जात असे; फार काय मिरे, लवंगा वगैरे दूर देशाहून येणारे जिन्नसही स्थलमार्गानें आणले जात असत. मापें व वजनें कित्येक शतकांपूर्वीपासूनच चालू होतीं. विनिमय हा जिनसांनीं चालू असला तरी चांदीचीं अथवा सोन्याचीं नाणींहीं विनियमाचीं मुख्य साधनें होतीं हें कार्षापण, शतमान, वस्न, निमान इत्यादि शब्दांवरून सिद्ध होतें. 'षोडश माषाः कार्षापणम्' या वाक्यावरून मोठ्या उडदाच्या शेंगेंत सोळा उडीद निघत व त्यांच्या वजनाचें कार्षापण हें सोन्याचें, चांदीचें व तांब्याचेंही हल्लींच्या मोहोर, रुपया, ढब्बू पैसा, यांप्रमाणें नाणें होतें.

### ३१५. महाभाष्यकारांच्या वेळचीं ग्रंथसंपत्ति.

भाष्यकारांचे वेळीं अनेक धर्मपंथ प्रसृत होते व त्यांमध्यें नेहमीं विरोधवृत्ति दिसून येई हें 'श्रमणब्राह्मणम्' या भाष्यकारांना दिलेल्या उदाहरणावरून स्पष्ट दिसून येतें. ग्रंथसमृद्धि ही बहुतांशीं वैदिक व वेदमूलक शाखाग्रंथ, अंगग्रंथ, पुराणग्रंथ या प्रकारची असे. शास्त्रग्रंथनिर्मितीही चालू होती व त्याबरोबर कांहीं काव्यें नाटकें व कथाही लिहिल्या गेल्या होत्या. बौद्ध व जैन वाङ्मयाचा उल्लेख महाभाष्यामध्यें जरी आला नसला तरी पुष्कळ ग्रंथ पाली व अर्धमागधी या भाषांमध्यें लिहिले गेले होते. अर्थात् या ग्रंथांचें पठन व पाठन बौद्ध भिक्षू व जैनश्रमण हेच बहुश: करीत असत. देवतांच्या प्रतिमांची पूजा चालू झाली होती, मंदिरेंही बांधलीं जात होतीं व त्यांमध्यें देवतांच्या मूर्तींची व ऐतिहासिक विभूतींची पूजा चालू झाली होती. बहुजनसमाजाला पौराणिकांकडून व कीर्तनकारांकडून पूर्वेतिहासाचें, धर्मतत्त्वांचें तसेंच नीतितत्त्वांचेंही ज्ञान मिळत असे. शिवाय निरनिराळ्या कुटुंबांतील वैशिष्ट्यपूर्ण हकीगती वृद्धपुरुष व वृद्धस्त्रिया यांचेकडून तरुण पिढीला मिळत असत. नाट्यप्रयोग, नृत्यप्रयोग, व निरनिराळ्या कलांतील कौशल्यप्रदर्शन हीं करमणुकीचीं साधनें असत. एकंदरींत त्या वेळचा समाज हा साधारणतः सुखी व संपन्न होता असें दिसून येतें.

### ३१६. महाभाष्यकारांच्या वेळचे धर्मसंप्रदाय.

महाभाष्याचा काल म्हणजे मौर्य घराण्याचा शेवट व शुङ्ग घराण्याचा आरंभ. मौर्य घराण्यांतील शेवटचा राजा बृहद्रथ याला त्याचा सेनापति पुष्यमित्र यानें ठार केलें व त्याचें

राज्य कायीज केलें. राज्याची राजधानी पाटलिपुत्र शहर होतें. जरी आंध्र वगैरे देशांवर लहान लहान राजे साधारण स्वतंत्रपणें राज्य करीत असले तरी पुष्यमित्राच्या साम्राज्याचा विस्तार वंग देशापासून मालव देशापर्यंत, व पंजाबपासून नर्मदेपर्यंत होता. या पुष्यमित्रानें अश्वमेध यज्ञ केला त्यावेळीं पौरोहित्यकर्म पतंजलींकडे होतें असें 'इह पुष्यामित्रं याजयामः' या वाक्यावरून कांहीं लोक अनुमान काढतात. पतञ्जलीचे वेळीं आर्यसंस्कृति व आर्यविद्या यांचा सर्वत्र प्रसार झाला होता. बहुजनसमाजामध्यें अनेक ठिकाणीं—विशेषतः पूर्वेकडील मगध देशांत—जरी बौद्ध व जैन मतांचा प्रसार झाला होता तरी त्याचा परिणाम खालच्या दर्जाच्या बहुजनसमाजावर जातिविद्वेष अथवा धर्मविद्वेष या स्वरूपाचा झाला नव्हता. ज्याप्रमाणें निरनिराळ्या वैदिक दर्शनांच्या विद्वानांमध्यें एकमेकांत वादविवाद होत असत त्याप्रमाणेंच वैदिकदर्शनाभिमानी विद्वान् ब्राह्मण, विद्वान् बौद्ध भिक्षू, व विद्वान् जैन श्रमण यांमध्येंही चुरशीचे वादविवाद होत असत.

## ३१७. भाष्यकारांचे वेळची भौगोलिक परिस्थिति.

भाषादृष्ट्या त्या वेळीं भारताचे उदीच्य व प्राच्य असे दोन विभाग झाल्यासारखे होते. रावी नदीच्या पश्चिमेकडील व उत्तरेकडील विभागाला उदीच्य विभाग म्हणत; व दक्षिणेकडील व पूर्वेकडील विभागाला प्राक् विभाग म्हणत. उदीच्य विभागामध्यें सौवीर, वाहीक, गान्धार, यौधेय, कश्मीर इत्यादि देशांचा अंतर्भाव होत असे; प्राग्विभाग हा उदीच्य विभागाच्या मानानें फार विस्तृत होता व त्यामध्यें शूरसेन, मालव, सांकाश्यक, कोसल, विदेह, मगध, अङ्ग, कलिङ्ग, सुह्म, महाकोसल व दक्षिणापथ यांचा अंतर्भाव होत असे. 'प्रागुदञ्चौ विभजते०' या काशिकेमध्यें उद्धृत केलेल्या श्लोक-वार्तिकामध्यें हे विभाग दिले आहेत. प्राग्विभागाचा विस्तार भाष्यकारांचे वेळींही रावी ते ब्रह्मपुत्रा व हिमालय ते विन्ध्य असा मानिला जात असे हें 'न हि अन्यत्र (प्राचामन्यत्र) भरताः सन्ति' या वाक्यावरून स्पष्ट होतें. या सर्व प्रांतांतील मुख्य मुख्य नगरांना जोडणारे चांगले रस्ते होते व त्यावरून मालाची वाहतूक व्यापारी लोक करीत असत. साकेत, मथुरा, स्रुघ्न व पाटलिपुत्र या शहरांना जोडणाऱ्या रस्त्यांचा महाभाष्यामध्यें उल्लेखच आला आहे. या स्थलपथांशिवाय, पाण्यांतून म्हणजे नद्यांतून अथवा समुद्रविभागांतून नेआण होत असलेल्या मार्गांना वारिपथ म्हणत, अरण्यांतून जाणाऱ्या साधारण मार्गांना जङ्गलपथ म्हणत व डोंगरांतून जाणाऱ्या पाऊलवाटांना अविपथ म्हणत असत. पाटलिपुत्र हें त्या वेळचें राजधानीचें शहर होतें व मगधप्रांतही फार सुपीक होता. मगधाचे खालेखाल गंगा व यमुना या नद्यांमधील व या नद्यांच्या कांठचा विशेषतः उत्तरेकडचा प्रांतही सुपीक होता. या प्रांताला सांकाश्यक नांव देण्यांत येत असे. भाष्यकारांनीं 'सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतराः' असें एके ठिकाणीं उदाहरणवाक्य म्हणून दिलें आहे त्यावरून हें स्पष्ट होतें. उज्जयिनी, अवन्ती, स्रुघ्न, पाटलिपुत्र, साकेत, मथुरा व जित्वरी (व्यापारी लोकांच्या व्यवहारामध्यें संबोधिली जाणारी वाराणसी नगरी) या मोठ्या नगरांचा भाष्यकारांनीं उल्लेख केला आहे. पाटलिपुत्र जरी पुष्यमित्राच्या राजधानीचें शहर होतें तरी भाष्यकारांचे वेळीं पाणिनिपूर्वकालापासून विद्यास्थान असलेलें तक्षशिला हेंच विद्याकेन्द्र होतें व उदीच्य देशांतील भाषा हीच शिष्टसंमत संस्कृतभाषा असें समजलें जात असे. भाष्यकारांनीं आर्यावर्ताची व्याख्या दिली आहे व विद्येमध्यें व शिष्टसंमत भाषा व उच्चारण यांमध्यें उदीच्य

विभागाच्या तोडीचा म्हणून आर्यावर्ताचा उल्लेख केला आहे; त्यावरून भाष्यकारांचे वेळीं तक्षशिला हें जरी मुख्य विद्याकेन्द्र असलें तरी उज्जयिनी व वाराणसी हींही विद्याकेन्द्रें गणलीं जात असत. मगध प्रांत व त्यांतील वैशाली व पाटलिपुत्र हीं नगरें मात्र विशेषत: बौद्ध व जैन विद्यांच्या व पाली व प्राकृत ग्रंथांच्या अध्ययनाचीं केन्द्रें म्हणून समजलीं जात. पूर्वेकडे मगध, अङ्ग व कलिङ्ग, तसेंच उत्तरेकडे वाहीक, या प्रांतांतील संस्कृति, भाषा व उच्चारण हीं जरी कमी दर्जाचीं गणिलीं गेलीं असलीं तरी या देशांविषयीं अनादराची व तिरस्काराची भावना भाष्यकारांचे वेळीं नसावी. दक्षिणेकडील चेर, केरल व पाण्ड्य या प्रांतांचाही उल्लेख महाभाष्यामध्यें आला आहे. सौर्य या नांवाच्या हिमालयाच्या दोन शिखरांचा महाभाष्यामध्यें उल्लेख आला आहे पण तीं कोणतीं हें सांगता येत नाहीं.

## ३१८. महाभाष्यकारांच्या वेळची संस्कृतभाषा.

महाभाष्य या ग्रंथाचा विषय कितीही गंभीर व समजण्यास कठिण असला तरी भाष्यकारांची भाषा अत्यंत सुबोध व प्रसादयुक्त अशी आहे. 'अलब्धलाभे गांभीर्याद् उत्तान इव सौष्ठवात्' असें महाभाष्य ग्रंथाचें स्वरूप एका ओळींत भर्तृहरीनें स्पष्ट सांगितलें आहे. लोकांच्या दैनंदिन व्यवहारामध्यें प्रचारांत नसलेले शब्द महाभाष्यामध्यें मुळींच आढळून येत नाहींत. त्याप्रमाणेंच लांबलचक समास व श्लिष्टशब्द-रचना यांनाही भाष्यामध्यें स्थान नाहीं. भाष्यकारांचे वेळीं जरी पाली व प्राकृत भाषा बहुजनसमाजामध्यें प्रचारांत व व्यवहारांत असल्या, तरी त्यांमध्यें जैन व बौद्ध धार्मिक ग्रंथच लिहिले गेले होते. वाङ्मयाकरितां, विद्वानांच्या विचारविनिमयाकरितां, त्याप्रमाणेंच महत्त्वाचे उल्लेख व टिप्पणें याकरितां संस्कृतभाषाच प्रचारांत होती. वैदिक वाङ्मयही याच भाषेंत लिहिलें गेलें होतें. वेदग्रंथांमध्यें वेदग्रंथ जितका जुना त्या मानानें ज्यास्त आर्ष प्रयोग दिसून येत. वैदिक भाषा ही त्या वेळच्या प्रचारांत असलेल्या संस्कृत भाषेपेक्षां निराळी होती असें मानणें मुळींच सयुक्तिक होणार नाहीं. कारण, धातू व प्रातिपदिकें व त्यांना लागणारे कृत्प्रत्यय, तद्धितप्रत्यय, विभक्तिप्रत्यय व विभक्त्यर्थ हे दोन्ही भाषांमध्यें तेच होते व वाक्यांतील शब्दरचनाही तीच होती. पाणिनीनें या कारणामुळेंच वैदिकप्रयोगां-करितां निराळें प्रकरण केलें नाहीं. जीं कांहीं थोडीं वैदिक रूपें लौकिक भाषेंतील रूपांहून निराळीं दिसतील त्या रूपांचें स्पष्टीकरण करण्याकरितां त्यानें विशिष्ट सूत्रें केलीं आहेत; पण त्या सूत्रांची संख्या इतर सूत्रांच्या मानानें अगदींच कमी आहे. स्वरविचार मात्र एकाच ठिकाणीं सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादाचे शेवटीं व दुसऱ्या पादामध्यें पाणिनीनें केला आहे; पण भाषेमध्येंही त्या वेळीं शब्दांचें सस्वर उच्चारण होत असल्यामुळें व स्वरप्रकरणामध्येंही फक्त वेदामध्यें निराळे आढळून येणारे स्वर फारच थोड्या सूत्रांनीं दाखविले गेले असल्यामुळें स्वरप्रकरणाला वैदिक व्याकरणाचा एक भाग असें म्हणतां येणार नाहीं. णत्वप्रकरण, षत्वप्रकरण, इण्निषेधप्रकरण, अथवा इड्विधिप्रकरण यांप्रमाणें पाणिनीनें त्याविषयीं सर्व विधी एकामागून एक सांगितले आहेत, येवढेंच काय तें वैशिष्ट्य आहे.

## ३१९. महाभाष्यकारांच्या वेळचे व्याकरणग्रंथ.

भाष्यकारांच्या वेळच्या संस्कृत भाषेचीं पाणिनिपूर्व शाकटायन, आपिशलि, शाकल्य, भारद्वाज इत्यादि वैयाकरणानीं व्याकरणें केलीं होतीं; त्याप्रमाणेंच पाणिनीनंतर भाष्यकारांच्या पूर्वींही कलापि,

काशकृत्स्न, व्याघ्रपाद्, कुणरवाडव इत्यादि वैयाकरणांनीं व्याकरणें रचिलीं होतीं. या पाणिनि-व्याकरणांसारख्या व्याकरणांशिवाय पाणिनि-सूत्रांवरही भाष्यकारांपूर्वी कांहीं वैयाकरणांनीं वृत्ती लिहिल्या होत्या असें वेळोवेळीं भाष्यामध्यें आलेल्या अपर आह, अन्ये आहुः इत्यादि वाक्यांवरून स्पष्ट दिसून येतें.त्यांपैकीं कुणीच्या वृत्तीचा भाष्यामध्यें नामनिर्देशपूर्वक उल्लेख आला आहे. कांहीं वृत्तिकारांनीं पाणिनिसूत्रांचा भाष्यकारांनीं जो पाठ घेतला आहे त्यापेक्षां निराळा पाठभेद घेतला आहे; पण अशीं स्थळें फारच थोडीं आहेत. अष्टाध्यायीच्या शेवटीं 'दीर्घादाचार्याणाम्' (सू. ८।४।५२) या सूत्रानंतर अष्टाध्यायी-सूत्रपाठामध्यें दिलेल्या 'झलां जश् झशि'...अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः' (सू. ८।४।५३-५७) या पांच सूत्रांचे पूर्वीं 'अनुस्वारस्य ययि०'...'शश्छोटि' (८।४।५८-६३) हीं सहा सूत्रें भाष्यकारांनीं दिलीं आहेत असें हरिदीक्षितांनीं 'न पदान्त०' (सू. १।१।५८) या सूत्राचें विवेचन करतांना लघुशब्दरत्नामध्यें म्हटलें आहे; व भाष्यकारांच्या पाठाला 'भाष्यसंमताष्टाध्यायीपाठ' असें म्हटलें आहे. डॉ. कील्हॉर्न यांनीं मुद्रित केलेल्या प्रतींत काशिकाकार व सिद्धान्तकौमुदीकार यांनीं स्वीकारलेल्या अष्टाध्यायीसूत्रपाठाप्रमाणेंच पाठ मिळतो. हरिदीक्षित यांनीं भाष्यसंमत अष्टाध्यायीपाठ म्हणून निर्दिष्ट केलेला सूत्रपाठ काशी येथें मुद्रित केलेल्या प्रतींत सांपडतो. याविषयीं कांहीं विवेचन मागें परिच्छेद ६७ पृष्ठें १५६-१५७ यांमध्यें केलेंच आहे.

## ३२०. महाभाष्यकारांची लेखनपद्धति.

लोकोत्तरबुद्धियुक्त, प्रतिभाशाली व सर्वशास्त्राभ्याससंपन्न पतञ्जलि मुनींनीं आपल्या वेळच्या नैसर्गिक संस्कृत भाषेवर प्रभुत्व मिळवून महाभाष्य हा ग्रंथ रचिला असल्यामुळें त्यांतील भाषा सहजसुंदर, सरल, अर्थपूर्ण व प्रसादयुक्त अशी असणें साहजिकच आहे. निरनिराळ्या शास्त्रांतील सूत्रांवर विद्वानांनीं लिहिलेल्या अर्थव्याख्यानरूप विद्वत्तापूर्ण भाष्यांमध्यें महाभाष्याचें स्थान फारच वरच्या दर्जाचें आहे. भाषासौष्ठवाचे बाबतींत संस्कृत भाषेमध्यें शारीरभाष्यापेक्षांही महाभाष्य ज्यास्त सरस ठरतें. महाभाष्य हा शास्त्रीय ग्रंथ असल्यामुळें ठिकठिकाणीं पारिभाषिक शब्द व शास्त्रीय विवेचन जरी अपरिहार्य असलें तरी भाष्यकारांचें लिखाण परिचित लोकव्यवहारांत आढळणाऱ्या सरल निसर्गसुंदर बोलभाषेमध्यें लिहिलें गेलें असल्यामुळें शास्त्रीय व्युत्पत्ति असलेल्या संस्कृतज्ञाला तें वाचतांना कष्ट पडत नाहींत व कंटाळाही येत नाहीं. विषय-प्रतिपादनाची त्यांची शैली वाखाणण्याजोगी आहे. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे त्यांची भाषा सुबोध सरल व निसर्गरमणीय असून ठिकठिकाणीं तिच्यामध्यें वक्तृत्वाची छटा व संवादरूप वाक्यें यांनीं मोहकपणा व आकर्षकता आणिली आहे. प्रतिपाद्यविषय गंभीर व कठीण असल्यामुळें विषयप्रतिपादन लांबल्यास विनोदयुक्त वाक्यें घालून व समयोचित लौकिक दृष्टान्त देऊन त्यांनीं वाचकांची अर्थजिज्ञासा सारखी कायम ठेविली आहे.

## ३२१. महाभाष्यकारांची विषयनिरूपणपद्धति.

महाभाष्यकारांची विषयनिरूपणाची पद्धतीही अत्यंत साधी,संभाषणांमध्यें लोकांत आढळणारी अशीच आहे. कठिण विषयाचें प्रतिपादन करतांना 'इदमिह संप्रधार्यम्' अशा तऱ्हेच्या वाक्यानें भाष्यकार आरंभ करतात व पूर्वपक्षाचें निरूपण पूर्वपक्षकाराशीं तन्मय होऊन करतात; व नंतर 'विषम उपन्यासः' अशा तऱ्हेच्या वाक्यांनीं त्यावर उत्तर देण्यास आरंभ करून उत्तरपक्ष

मांडतात. मधून मधून ' किं वक्तव्यमेतत् । कथमनुच्यमानं गंस्यते ', अथवा 'अस्ति प्रयोजनमे-तत् । कथं तर्हि ' अशीं संवादात्मक वाक्यें घालून वाचकाचें विषयाकडचें लक्ष कायम ठेवतात. त्यांची उपसंहाराची पद्धतीही खरोखरीच वाखाणण्याजोगी आहे. कठिण व महत्त्वाच्या विषयांचें प्रतिपादन करतांना पूर्वपक्षोत्तरपक्ष केल्यावर दोन्ही बाजू निःपक्षपातीपणानें मांडून 'यथा न दोषस्तथास्तु ' असें म्हणून उत्तरपक्ष कोणता तें लक्षांत घेऊन सिद्धान्तपक्ष समजावयाचें काम ते वाचकाचेवरच सोंपवितात. कधीं कधीं 'गोनर्दीय आह' असें म्हणून दोन पक्षांतील ज्यास्त ग्राह्य पक्ष नजरेला आणतात. ' गोनर्दीय आह ' या वचनांतील गोनर्दीय शब्दानें भाष्यकार स्वतःचा उल्लेख करतात असें टीकाकारांचें मत आहे. भाष्यकार पुष्कळ वेळां सूत्रांवर आक्षेप घेणाऱ्या वार्तिकवचनांवर टीका करून ' यथान्यासमेवास्तु ' अशा वचनानें सूत्रकारांचें समर्थन करतात. कांहीं प्रसंगीं दोनही पक्ष ग्राह्य असल्यास दोनही पक्षांवरील आक्षेप मांडून त्यांचें निवारण करतात, व निर्णयात्मक स्वतःचें असें कोणतेंच मत सांगत नाहींत; किंवा सांगितल्यास ' उभयथा गोणिकापुत्रः ' अशा रीतीनें दोनही पक्षांचें समर्थन करतात. सर्व वादग्रस्त ठिकाणीं पूर्वपक्षात्मक व उत्तरपक्षात्मक विवेचन करतांना त्यांनीं पूर्ववैयाकरणांचीं मतें मांडलीं आहेत; व निर्णयात्मक मत देतांना लोकांतील प्रयोग पाहूनच किंवा सर्वसंमत व्याकरणविषयक मौलिक सिद्धांतांना अनुसरूनच निर्णय दिले आहेत. क्वचित् प्रसंगीं विवेचनाचे बाबतींत निर्णय देणें जरूर असूनही लोकप्रयोगांवरून निर्णय देणें शक्य नसल्यास ' देवा ज्ञातुमर्हन्ति', 'देव एव जानाति' अशा तऱ्हेचें विनोदात्मक उत्तर दिलें आहे. एकंदरींत पाहतां महाभाष्य ग्रंथ हा व्याकरणविषयक शास्त्रीय व्युत्पत्ति असलेल्या शिष्यांनींच अध्ययनास घेणें योग्य आहे व तसा तो घेतल्यास जसजसा तो वाचीत जावा तसतसा तो कंटाळवाणा न होतां ज्यास्त ज्यास्तच आकर्षक होत जातो; व व्याकरणासारख्या नीरस विषयाचें भाष्यकारांनीं केलेलें रमणीय प्रतिपादन वाचून जिज्ञासा वाढतच जाते. खरोखरीच हा ग्रंथ अलौकिक-बुद्धियुक्त प्रतिभाशाली सर्वतन्त्रनिष्णात पतंजलिमुनींनीं शिष्यांना पाठ देण्याकरितांच रचिलेला असावा व त्यांतील दरएक प्रकरण हें पाणिनिसूत्रांचें संपूर्ण ज्ञान असलेल्या बुद्धिवैभवशाली शिष्यास एकाच दिवसांत विषयग्रहण करतां येईल एवढेंच लिहून त्याला आन्हिक ही संज्ञा दिली असावी असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

## १२२. महाभाष्यकारांची व्याख्यानपद्धति.

महाभाष्य हा अष्टाध्यायीचें व्याख्यान या स्वरूपाचा जरी ग्रंथ असला तरी सूत्रांचा शब्दार्थ उदाहरणें व प्रत्युदाहरणें हीं वाचकवर्गाला अवगत आहेत असें गृहीत धरूनच तो लिहिला गेल्यामुळें त्यामध्यें सूत्रवृत्ति, उदाहरणें व प्रत्युदाहरणें आढळून येत नाहींत. सूत्रांचे अर्थ, उदाहरणें व प्रत्युदाहरणें देणारे अनेक वृत्तिग्रंथ भाष्यकारांचे वेळीं होते. भाष्यकारांच्या व्याख्यानपद्धतीचे साधारणतः तीन प्रकार होतात. सूत्रांचें प्रयोजन सांगणें, पदांचा योग्य अर्थ करून सूत्रार्थ निश्चित करणें, आणि सूत्रांची व्याप्ति वाढवून अथवा कमी करून सूत्रार्थाचें नियन्त्रण करणें. या तीन गोष्टी पुढें ठेऊन त्यांनीं सूत्रांचें व्याख्यान केलें आहे. सूत्राचें प्रयोजन सांगतांना ' किमुदाहरणम् ', ' अयं योगः शक्योऽवक्तुम् ' या तऱ्हेनें भाष्यकार सूत्रांच्या विवेचनास आरंभ करतात. पदांचा योग्य अर्थ करून सूत्रार्थनिश्चय करतांना 'अमुकं पदं किमर्थम्',

' कथमिदं विज्ञायते ' अशा वाक्यांनीं ते आरंभ करतात. सूत्रार्थाचें नियन्त्रण करणें झाल्यास ' एवं कर्तव्यम् ', ' इत्युपसंख्यानम् ', ' इति वक्तव्यम् ', ' इत्यस्य प्रतिषेधो वाच्यः ' अशा रीतीनें ते आरंभ करितात. वरील सर्व ठिकाणीं वरतीं निर्दिष्ट केलेल्या प्रकारचीं अवतरणें देऊन बहुशः ते वार्तिकवचनें देतात किंवा स्वतः वार्तिकवचनांसारखीं इष्टिवचनें देतात व त्यांचें स्पष्टीकरण करण्याकरितां व्याख्यानास आरंभ करतात. फारच थोड्या ठिकाणीं कोणत्याही वार्तिकवचनाशिवाय सूत्रविवेचनास त्यांनीं आरंभ केलेला दृष्टीस पडतो.

## ३२३. सूत्रकार व वार्तिककार यांचेकडे पाहण्याचा भाष्यकारांचा दृष्टिकोण.

इष्ट प्रयोग साधणें व अनिष्ट प्रयोगांचें निवारण करणें हे दोन मुख्य हेतू पुढें ठेऊन पाणिनीनें सूत्रें लिहिलीं व तशा रीतीनेंच सूत्रांचा अर्थ लावणें जरूर आहे असें भाष्यकारांचें स्पष्ट मत होतें. इष्ट उदाहरणें सूत्रानें साधणें कठिण होऊं लागलें तर योगविभाग करून किंवा पूर्वविप्रतिषेधानें तीं साधावीं व तसेंच सूत्रांनीं कांहीं अनिष्ट प्रयोग होऊं लागले तर ते शिष्टांना असंमत असल्यामुळें ' अनभिधानम् ' असा शेरा मारून त्यांचा परिहार करावा असें अनेक ठिकाणीं भाष्यकारांनीं प्रतिपादन केलें आहे. भाष्यामध्यें वरील सर्व प्रकारांनीं विवेचन करीत असतांना भाष्यकारांनीं कांहीं ठिकाणीं पूर्वाचार्यांचीं वार्तिकवचनेंही उद्धृत केलीं आहेत किंवा त्या विचाराचे पूर्वाचार्य अनेक असल्यास किंवा नामनिर्देश करणें शक्य नसल्यास ' अपर आहुः ' किंवा ' अपर आह ' म्हणून त्यांच्या मतांचें प्रतिपादन केलें आहे. वार्तिककारांचा कल पुष्कळ वेळां सूत्रप्रत्याख्यानाकडे किंवा सूत्रांतील कांहीं पदांची अनुपयुक्तता दाखविण्याकडे असल्यास भाष्यकार हे होतां होईल तों सूत्रकारांच्या उक्तीचें समर्थन करतात. परंतु एकंदरींत पाहिलें असतां सूत्रकारांकडे, तसेंच वार्तिककारांकडे पाहण्याचा भाष्यकारांचा दृष्टिकोण पूर्ण आदरयुक्त दिसून येतो; व कित्येक ठिकाणीं सूत्रकारांचा व वार्तिककारांचा निर्देश ' भगवान् ' उपपद लावून केलेला आढळतो. सूत्रवचनांचें समर्थन करतांना मात्र वार्तिककारांच्या वचनांचें खंडन करणें भाष्यकारांना जरूर पडतें व तसें त्यांनीं तें केलेंही आहे. फक्त ' एतदेकमाचार्यस्य मङ्गलार्थं मृष्यताम् ' व ' प्रमादकृतमाचार्यस्य शक्यमकर्तुम् या दोनच ठिकाणीं 'अनवधानामुळें सूत्रकारांनीं असें म्हटलें, तसें म्हणावयास नको होतें' अस प्रतिपादन केलें आहे. कांहीं ठिकाणीं सूत्राच्या शब्दांमध्यें बदल भाष्यकारांनीं सुचविला आहे; पण तेथेंही बदल केला असता तर चाललें असतें व लाघवानेंही प्रतिपादन झालें असतें; परंतु सूत्रकारांचें वचन अर्थाचें पूर्ण स्पष्टीकरण व्हावें या हेतूनें घातलें गेल्यामुळें सूत्रकारांनीं जसें सूत्र केलें तसेंच असण्यास कांहीं हरकत नाहीं असेंच म्हटलें आहे. भाष्याकारांच्या या सूत्रकारांविषयीं पूर्ण आदरयुक्त भावनेनें व होतां होईतों सूत्रकारांचीं वचनें आहेत तशींच ठीक आहेत अशा प्रतिपादनानें त्यांच्यामागून कांहीं शतकांनीं जेव्हां सूत्रपाठ निश्चित झाला त्या वेळीं त्यामध्यें वार्तिकवचनांना अनुसरून फारशी फिरवाफिरव केली गेली नाहीं.

## ३२४. भाष्यकारांचे व्याकरणविषयक मौलिक सिद्धान्त : शब्दनित्यत्वसिद्धान्त.

पाणिनीच्या सूत्रांचें व्याख्यान करतांना महाभाष्यकारांनीं कांहीं विशिष्ट मूलभूत सिद्धान्त ठरवून त्या दृष्टीनें सूत्रांचें संगतवार व्याख्यान केलें आहे. शब्द अर्थ आणि त्यांचा संबंध हे नित्य असतात अशा स्वरूपाचा शब्दनित्यत्वसिद्धान्त हा त्यांपैकीं अत्यंत महत्त्वाचा आहे 'सिद्धे शब्दार्थसंबंधे' या पहिल्याच वार्तिकाचें विवेचन करतांना या सिद्धान्ताचें भाष्यकारांनीं प्रतिपादन केलें आहे. शब्दनित्यत्वाची सप्रमाण सिद्धि भाष्यकारांनीं केली नाहीं,

उलट, व्याडीच्या संग्रहग्रंथांत प्रतिपादन केलेली शब्दनित्यत्व व शब्दानित्यत्व अशीं दोन्ही प्रकारचीं मतें त्यांनीं दिलीं आहेत. ठिकठिकाणचें विवेचन पाहिल्यास मात्र त्यांना शब्द-नित्यत्वपक्षच मान्य असावा असें दिसून येतें; कारण शब्दनित्यत्वाला अनुसरूनच त्यांनीं सूत्रांचें व्याख्यान जागोजागीं केलें आहे; व एखाददुसऱ्या ठिकाणीं पाणिनिसूत्रावरून शब्दाच्या अनित्यत्वाचें प्रतिपादन होत असलें तर तें गौण समजावें असें त्यानीं सुचविलें आहे. कार्य किंवा अनित्य शब्द हा ध्वनिरूपाचा असतो व अर्थप्रतिपादन करणारा हा त्यापेक्षां निराळा शब्द स्फोटरूपाचा असतो असें त्यांनीं म्हटलें आहे. हा स्फोट शब्द कोठें व कसा अभिव्यक्त होतो, त्याचे किती प्रकार आहेत इत्यादि प्रकारचें विवेचन भाष्यकारांनीं केलें नाहीं; त्याप्रमाणेंच त्याचें ज्ञान कोणत्या स्वरूपाचें व कसें होतें याचेंही विवेचन केलें नाहीं. कदाचित् तशा तऱ्हेचें विवेचन व्याडीच्या संग्रहांत असल्यामुळें त्यांनीं तें केलें नसावें. किंवा सूत्रव्याख्यानरूप आपल्या ग्रंथाला तें अप्रस्तुत म्हणून त्यांनीं तें भाष्यामध्यें टाळलें असावें. एकंदरींत पाहतां असें दिसून येतें कीं स्फोटस्वरूपाचें साकल्यानें विवेचन भाष्यकारांचे वेळीं झालें नसावें. कांहीं शतकांनंतर भर्तृहरीनें स्फोटसिद्धान्ताचें विस्तृत विवेचन करून व्याकरणशास्त्राला दर्शनाचें स्वरूप दिलें व लोकांमध्यें व्याकरणशास्त्राचें महत्त्व चांगलेंच वाढविलें.

## ३२५. ध्वनि व स्फोट यांमधील भेद.

महाभाष्यांतील उल्लेखांवरून जर स्फोटरूपी नित्यशब्दाचें ज्ञान मोक्षसाधन कसें होतें याचें विवेचन करावयाचें म्हटलें तर स्फोट व ध्वनी यांमधील भेद सांगणाऱ्या 'एवं तर्हि स्फोटः शब्दः, ध्वनिः शब्दगुणः' या भाष्यवचनाचें, त्याप्रमाणेंच माहेश्वरसूत्रांचें प्रयोजन सांगणाऱ्या 'वर्णज्ञानं वाग्विषयः यत्र च ब्रह्म वर्तते' या श्लोकाच्या स्वारस्याचें विवेचन करणें जरूर आहे. वरील वाक्यांवरून ध्वनी म्हणजे आवाज हा शब्दाचा केवळ गुण आहे, ध्वनीपेक्षां शब्द निराळा आहे व तो ध्वनीनें अभिव्यक्त होतो; घट पट यांचें उच्चारणरूप ध्वनी लहान, मोठे, सावकाश जलदी कसेही झाले तरी या ध्वनीपेक्षां शब्द हा निराळाच असतो व त्याची अन्तरिंद्रिय मनाला जाणीव येते; वेदरूपी वाणीमध्यें शब्दब्रह्म भरलेलें आहे व निर्दुष्ट वर्ण समजावे म्हणून माहेश्वरसूत्रांनीं वर्णोपदेश केला आहे; थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे शब्द-शास्त्र शिकण्यानें शुद्ध शब्दाचा प्रयोग केला जातो व वैदिक कर्मांचें ज्ञानपूर्वक अनुष्ठान केलें जातें व त्यामुळें स्वर्गरूप फल मिळतें असा भाष्यकारांचा सिद्धांत दिसून येतो. मीमांसकांच्या प्रमाणें भाष्यकारांच्या मतें स्वर्ग हाच परम पुरुषार्थ आहे आणि शुद्धशब्दज्ञान व शुद्धशब्द-प्रयोन यांमुळें तो प्राप्त होतो. व्याकरणामुळें शुद्ध शब्दांचें ज्ञान होतें व शुद्ध शब्दांचे प्रयोग केले जातात; म्हणून व्याकरणशास्त्राला मोक्षसाधन म्हणतां येतें.

## ३२६. शब्दार्थप्रतिपादनाचें स्वाभाविकत्व.

महाभाष्यकारांनीं प्रतिपादन केलेला शब्दनित्यत्वासारखाच दुसरा मौलिक सिद्धांत म्हणजे शब्दापासून होणाऱ्या अर्थज्ञानाचें स्वाभाविकत्व हा होय. 'अभिधानं पुनः स्वाभाविकम्' या वचनानें या सिद्धांताचा त्यांनीं वेळोवेळीं पुरस्कार केला आहे. शब्दापासून अर्थज्ञान होण्याला संकेत हा कारणीभूत असतो असें आलंकारिकांचें म्हणणें आहे; व 'अस्मात् पदात् अयमर्थो बोद्धव्यः इति ईश्वरेच्छा संकेतः' अशी संकेत शब्दाची त्यांनीं व्याख्या दिली आहे. आलंकारि-

कांनाही शब्दनित्यत्व मान्य आहे. ईश्वरेच्छारूप संकेतामुळें अर्थज्ञान होतें या म्हणण्याचा आणि शब्दार्थसंबंध नित्य आहे या म्हणण्याचा जवळजवळ अर्थ एकच असला तरी, ईश्वरेच्छारूप संकेतामुळें जसा भाषेंत असलेल्या शब्दांचा अर्थ कळतो त्याप्रमाणें मानुषेच्छासंकेतावरूनही शब्दार्थसंबंध अमलांत आणला जाऊन अभिप्रेत अर्थ कळूं शकेल असा आलंकारिकांच्या म्हणण्याचा रोख दिसतो असें म्हणतां येईल. भाष्यकारांनीं संकेताचा उल्लेखही केला नाहीं. त्यांच्या मतें भाषेमध्यें शिष्ट लोकांच्या प्रयोगांत असलेले तेवढेच शुद्ध शब्द आहेत व त्यांचीच सिद्धी पाणिनीच्या व्याकरणानें केली आहे. कांहीं शब्द व्याकरणसिद्ध जरी होऊं शकले तरी ते शिष्टप्रयोगांत नसल्यास त्या शब्दांवरून अर्थाचें अभिधान होत नाहीं असें समजून ते उपयोगांत आणूं नयेत असें भाष्यकारांचें म्हणणें आहे.

## ३२७. शब्दांचें अमर्यादित्व.

शब्दांचा विषय फार विस्तृत असल्यामुळें शिष्टसंमत भाषेमध्यें प्रचलित असलेले शब्द अगणित आहेत व त्यांचा उपदेश करणें शक्य नाहीं असें भाष्यकारांनीं "उद्देशश्च प्रातिपदिकानां नोपदेशः" या वाक्यानें स्पष्ट निदर्शित केलें आहे. निरनिराळ्या प्रांतांतील प्रयोगांमध्यें तसेंच निरनिराळ्या वेदशास्त्रांमध्यें आढळून येणाऱ्या अशा धातूंचें पाणिनीनें अवलोकन करून त्यांचें परिगणन धातुपाठामध्यें केलें आहे. प्रातिपदिकांचें परिगणन शक्यच नसल्यामुळें त्यानें केलें नाहीं. तद्धित प्रकरणामध्यें उल्लेख केलेल्या गणांची संख्याच ३०० चे वर जाते व गणांतील शब्दांची संख्या ७००० चे वर जाते. हे गणांतील शब्द त्यांहून इतर शब्द साधण्याकरितां दिले आहेत. यांशिवाय गणांत अनिर्दिष्ट असे असंख्य शब्द आहेत. धातुपाठांमध्यें दिलेल्या २००० धातूंनाही सर्वसाधारण २० कृदन्त प्रत्यय लावल्यास ४०,००० कृदन्त शब्द साधले जातात. या कृदन्त शब्दांनाही तद्धित प्रत्यय लागून अनेक तद्धितान्त शब्द साधले जातात. त्याप्रमाणेंच या २००० धातूंनाही १० लकारार्थीं तिङ् प्रत्यय लागून अनेक आख्यात शब्द तयार होतात. तसेंच या धातूंना सन्, क्यच्, क्यङ् वगैरे प्रत्यय लागून धातुसाधित धातूही तयार होतात व त्यावरूनही अनेक आख्यात शब्द तयार होतात. एकंदरींत भाष्यकारांच्या उक्तीप्रमाणें भाषेमध्यें असंख्य शब्द आहेत व त्यांचें परिगणन करणें अशक्यच आहे. जुन्या व नव्या कोशांचें अवलोकन केल्यास मूळ धातू व मूळ शब्दच कोशांत देणें शक्य आहे व तसे ते आढळतात. धातुसाधित धातू व त्याप्रमाणेंच नामसाधित नामें देणें शक्यही नाहीं; व तशीं कोशांमध्यें कोठें दिलेलींही नाहींत. एकंदरींत मानुष संकेताप्रमाणें नवे शब्द उपयोगांत येतात असें जरी मानलें तरी ते साधित शब्दांमधूनच घेतले जातात. शब्द नवीन प्रचारांत येणें याचा अर्थ अर्थाशीं असलेल्या नित्य संबंधासह नित्य शब्दाची अभिव्यक्तीच होय. एखादी संज्ञा दिली जाते किंवा एखादा नवीन शब्द प्रचारांत येतो याचा अर्थ त्या शब्दाचा अर्थाशीं असलेला नित्यसंबंध अभिव्यक्त करण्यास सुरवात होते असाच आहे. "संज्ञायामितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः" तसेंच "सिद्धन्तु नित्यशब्दत्वात्" या वार्तिकांवरील भाष्यांमध्यें भाष्यकारांनीं केलेल्या विवेचनावरून हें सर्व स्पष्ट होतें.

## ३२८. शब्दांचे चार प्रकार.

शब्दांचे नाम आख्यात उपसर्ग व निपात असे चार प्रकार पूर्व वैयाकरणांनीं व निरुक्तकारांनीं दिले आहेत ते सूत्रकारांना व भाष्यकारांना संमत आहेतच. 'प्रत्ययाशिवाय केवळ

प्रकृतीचा व प्रकृतीशिवाय केवळ प्रत्ययाचा प्रयोग करूं नये, या महत्वाच्या व्याकरणसिद्धान्ताच्या योगानें शब्दांचे सुप् अथवा तिङ् प्रत्यय लावूनच उच्चारण होणें अपरिहार्य असल्यामुळें शब्दांचे सुबन्त अथवा तिङन्त असे दोनच प्रकार सूत्रकारांनीं दिले आहेत. यांपैकीं नाम, उपसर्ग व निपात यांचा सुबन्तांमध्यें व करोति, अकार्षीत् इत्यादि आख्यातांचा ( क्रियापदांचा ) तिङन्तांमध्यें अन्तर्भाव होतो. पूर्व वैयाकरणांनीं "भावप्रधानमाख्यातम्" व "सत्त्वप्रधानानि नामानि" अशा आख्यात व नाम यांच्या दिलेल्या व्याख्या भाष्यकारांना मान्य आहेत. फक्त सत्त्व शब्दाचा त्यांनीं द्रव्य असा अर्थ केला आहे व द्रव्याची व्याख्या गुण ज्यावर रहातात तें द्रव्य ( सीदन्ति गुणाः अस्मिन् ) अशी केली आहे. सत्त्व शब्दाचें "सतो भावः सत्त्वम्" असें निर्वचन करून क्रियेलाही सत्त्व शब्द लागूं शकतो असें त्यांनीं गंमतीचें प्रतिपादन केलें आहे. यावरून जाति व व्यक्ति एकमेकांना सोडून ज्याप्रमाणें कधींच रहात नाहींत त्याप्रमाणें द्रव्य हें क्रियेशिवाय नसतें व क्रिया ही द्रव्याशिवाय नसते असें सुचविणें त्यांना अभिप्रेत असावें. क्रिया ही प्रत्यक्ष न दिसणारी अनुमानगम्य अशी आहे व ती द्रव्यावरच असते असें त्यांनीं "क्रिया नामेयं...... निर्लुठितः" ( महाभाष्य भाग ३, पृष्ठ २३९ ) या वाक्यांत स्पष्ट सांगितलें आहे. द्रव्य हें क्रियेशिवाय नसतें या म्हणण्याच्या मुळाशीं मात्र "द्रव्याला प्रथम अभिधान त्यावर दिसणाऱ्या क्रियेमुळेंच मिळतें" असें सुचविणें त्यांच्या मनांत असावें व एका तऱ्हेनें "नाम च धातुजमाह निरुक्ते" हा जुना नैरुक्तिकांचा सिद्धान्त स्वीकारण्यास हरकत नाहीं, फक्त तो मूळ धातु किंवा ती मूळची क्रिया स्मरणांतसुद्धां राहिली नसल्यामुळें व अनुभवांतही येत नसल्यामुळें व्याकरणशास्त्रकर्त्यांनीं सर्वच शब्द धातूंपासून सिद्ध होतात असा आग्रह धरूं नये असें भाष्यकारांनीं विवक्षित असावें.

**२२९. शब्दाचें द्रव्याभिधायित्व.**

कोणतेंही द्रव्य धर्मरहित केवळ द्रव्य असें कधींही राहूं शकत नाहीं. मन हें बाह्येंद्रियांपैकीं एक किंवा अनेक इंद्रियें यांचें द्वारां किंवा इंद्रियसंबंधाशिवाय स्वतः द्रव्याचें आकलन करीत असतें; व हें आकलन चालूं असतांना द्रव्यावर राहणाऱ्या गुणरूप व क्रियारूप धर्मांचें आकलन होत असतेंच. द्रव्याचें आकलन प्राधान्यानें होत असेल तर त्या द्रव्याच्या अभिधायक शब्दाला द्रव्यवचन असें म्हणतात; प्राधान्यानें गुणाचें आकलन होत असेल तर त्या द्रव्याच्या अभिधायक शब्दाला गुणवचन म्हणतात; व क्रियेचें आकलन होत असेल तर क्रियावचन म्हणतात गुण व क्रिया यांचें आकलन अत्यंत गुणीभूत असेल व विशिष्ट व्यक्तीचें आकलन प्रामुख्यानें असेल तर त्या द्रव्याच्या अभिधायक शब्दाला संज्ञाशब्द म्हणतात. जेव्हां द्रव्याचें ज्ञान प्रामुख्यानें होतें त्या वेळीं त्या द्रव्याच्या निरनिराळ्या ठिकाणीं दिसणाऱ्या समान आकृतीची कल्पनाही जागृत असते, म्हणून अशा द्रव्यवचन शब्दाला जातिवचन शब्दही म्हणतां येतें. शब्दाच्या प्रवृत्तीला अशा रीतीनें जाति, गुण, क्रिया व संज्ञा हीं चार निमित्तें होतात म्हणून या निमित्तांना प्रवृत्ति-निमित्त ही संज्ञा देण्यांत येते. भाष्यकारांच्या "चतुष्टयी शब्दानां प्रवृत्तिः" या वचनावरून हें स्पष्ट होतें. अशा रीतीनें जाति, गुण, क्रिया व संज्ञा हीं शब्दाचीं प्रवृत्तिनिमित्तें असलीं तरी शब्दाचा अर्थ द्रव्यरूपच असतो; व तसा तो असतांना कधीं जातीला प्राधान्य देऊन शब्दप्रयोग केला जातो तर कधीं व्यक्तीला प्राधान्य देऊन शब्दप्रयोग केला जातो हें भाष्यकारांच्या या वचनावरून स्पष्ट होतें.

### ३३०. शब्दार्थाचे पोटभेद व त्यांचा बोधक्रम.

भाष्यकारांनीं शब्दाचा अर्थ व बोध कशा क्रमानें होतो याचें विवेचन केलें आहे. कोणताही पदार्थ पाहिला असतां प्रथम त्याचे ठिकाणीं ठळकपणें आढळणाऱ्या जाति, गुण, क्रिया अथवा संज्ञा या धर्मांचा बोध होतो; त्यानंतर त्या धर्मानें युक्त अशा द्रव्यव्यक्तीचा बोध होतो; त्यानंतर लिंगाचा बोध होतो; व त्यानंतर संख्येचा बोध होतो. अशा रीतीनें आभ्यंतर धर्मासहित द्रव्याचा बोध झाल्यावर बाह्य वस्तूशीं अथवा क्रियेशीं असलेल्या त्याच्या संबंधाचा बोध होतो. हीच गोष्ट लक्षांत घेऊन आधुनिक वैयाकरणांनीं "पञ्चकं प्रातिपदिकार्थः" असें म्हटलें आहे. क्रियापदांचे बाबतींत मात्र क्रिया ही लिंगधर्मरहित असल्यामुळें लिंगाचा बोध होत नाहीं पण त्याऐवजीं कालाचा बोध होतो.

### ३३१. शब्दप्रयोगाविषयीं नियम.

शब्दांच्या प्रयोगाविषयीं विचार केल्यास केवळ प्रकृतीचा अथवा केवळ प्रत्ययाचा प्रयोग कधींही होत नाहीं हा मौलिक वैयाकरणसिद्धान्त भाष्यकारांनीं वेळोवेळीं सांगितला आहे. वेदवाक्यांचा निश्चित अर्थ करावा म्हणून वेदांतील पदांचा विचार करण्याकरतां व्याकरणशास्त्र प्रवृत्त झालें. वैयाकरणांना पदकार अशीही संज्ञा दिलेली कांहीं ग्रंथांमध्यें आढळते. व्याकरणशास्त्रानें पदार्थनिश्चय झाल्यावर वेदवाक्यांतील पदसमूहाचा अर्थ व तात्पर्यार्थ यांचा निश्चय करण्याकरितां मीमांसाशास्त्र प्रवृत्त झालें. त्यामुळें मीमांसाशास्त्राला वाक्यशास्त्र ही संज्ञा मिळाली; व व्याकरण, मीमांसा व न्याय या तीन शास्त्रांचे संपूर्ण अध्ययन ज्यानें केलें आहे त्याला पदवाक्यप्रमाणतत्वज्ञः असें म्हणण्याचा प्रघात पडला. वेदांतील पदांच्या विचाराकरितां व्याकरणशास्त्र प्रवृत्त झाल्यामुळें पाणिनीनें पद शब्दाचें विवेचन प्रथमतः केलें व सुप्-प्रत्ययान्त अथवा तिङ्-प्रत्ययान्त यांनाच पद म्हणावें अशी पद शब्दाची त्यानें शास्त्रोपयुक्त व्याख्या दिली; व प्रकृतिप्रत्ययविभाग सांगून आपल्या अष्टाध्यायीमध्यें साकल्यानें पद-विचार केला. पदांच्या एकमेकांशीं असलेल्या संबंधाचा जरी त्यानें कारकप्रकरणांत विचार केला असला तरी वाक्याविषयीं व वाक्यार्थाविषयीं त्यानें मुळींच विचार केला नाहीं. भाष्यकारांनीं 'सुप्तिङन्तं पदं' अशी पद शब्दाची व्याख्या देणाऱ्या सूत्रकारांचा अभिप्राय जाणून 'अपदं न प्रयुञ्जीत' अशा पूर्ववैयाकरणांनीं घालून दिलेल्या दंडकाचें प्रतिपादन केलें आहे.

### ३३२. प्रत्ययांचा लोप झाला असतां अर्थबोध.

वैदिक व लौकिक प्रयोग पाहिले असतां अव्ययांचे व कांहीं विशिष्ट व्यंजनान्त किंवा नपुंसकलिंगी शब्दांचे विभक्तिप्रत्यय न लागतां प्रथमा संबोधन व इतर विभक्तींचे प्रयोग उपयोगांत आलेले आढळून आल्यामुळें व 'सुप्तिङन्तं पदं' अशी पदाची स्वतः व्याख्या केल्यामुळें अशा ठिकाणीं पाणिनीला प्रत्ययाचा लोप सांगावा लागला; व विशिष्ट कारकार्थ नसतांना 'प्रातिपदिकार्थलिङ्ग०' या सूत्रानें प्रथमा विभक्तीचा प्रत्ययही सांगावा लागला. वास्तविक पाहतां विभक्तिप्रत्ययाचा लोप होतो असें ज्या ठिकाणीं सांगितलें आहे त्यांपैकीं बहुतेक ठिकाणीं द्विवचन किंवा बहुवचन असा विशिष्ट अर्थ नसतो तसाच कर्म, करण वगैरे कारकार्थ किंवा संबंध हा षष्ठ्यर्थ नसतो; तेथें केवळ प्रातिपदिकार्थच असतो. मोठमोठे लांबलचक समास-

वेदांमध्यें आढळत नाहींत व भाष्यकारांचे वेळेपर्यंत ते प्रचारांतही नव्हते. बोलण्याला नुकतीच सुरवात ज्यानें केली आहे असा बालक ज्याप्रमाणें संबद्ध दोन पदें संबंधवाचक प्रत्ययांशिवाय बोलतो व त्यांचा संबंध संदर्भ जाणणाऱ्या श्रोत्यांच्या मनांत ताबडतोब येतो त्याप्रमाणेंच समास, तद्धितवृत्ति व कृद्‌वृत्ति यांमध्यें संक्षिप्तवचनरूप स्थिती असल्यामुळें विभक्तिप्रत्यय दिसत नाहींत व पाणिनीनें त्यांचा लोप सांगितला आहे. संदर्भावरूनही सहज अर्थ कळण्यास अडचण येत असेल तर तशी समासवृत्ति तद्धितवृत्ति अथवा कृद्‌वृत्ति होऊं नये याकरितां 'सापेक्षमसमर्थं भवति' या पूर्व वैयाकरणांनीं घालून दिलेल्या दंडकाचा भाष्यकारांनीं जोरानं पुरस्कार केला आहे. त्याप्रमाणेंच अर्थज्ञान हें सुद्धां सुलभ व्हावें व त्याकरितां अवश्य तेवढेच शब्द उपयोगांत यावे या दृष्टीनें 'उक्तार्थानामप्रयोगः' याही पूर्ववैयाकरणांच्या दंडकाचा भाष्यामध्यें पुरस्कार केला आहे.

### ३३३. क्रियावचन शब्द.

आख्यात शब्द म्हणजे क्रियापदें किंवा तिङन्त शब्द यांचा क्रियावचन शब्दांमध्यें मुख्यत्वानें अंतर्भाव होतो व त्यांच्यापासून पदार्थामध्यें असलेल्या क्रियारूपी धर्माचा मुख्यत्वानें बोध होतो. कृदन्त शब्दापासूनही क्रियेचा बोध होतो पण तो प्रामुख्यानें होत नाहीं; क्रिया ही धर्मरूप असल्यामुळें धर्माशिवाय तिचा बोध होऊं शकत नाहीं; म्हणून क्रियाश्रयरूपानें द्रव्यप्रतिपादनाची आवश्यकता असतेच; व वाक्यामध्यें तें क्रियाश्रय द्रव्य नेहमीं कर्तृपदानें दाखविलें जातें; किंवा संदर्भानें अध्याहृत केलें जातें. क्रिया व क्रियाश्रय द्रव्य यांशिवाय वाक्याचा प्रयोग कधींही होत नाहीं. आख्यात शब्दामध्यें क्रियेचा मुख्यत्वानें बोध होत असल्यामुळें व क्रियेला लिंगकल्पनेचा योग कधींही होत नसल्यामुळें तिङन्त प्रयोग करतेवेळीं धातूला लिंगप्रत्यय लागत नाहींत. "भावप्रधानमाख्यातम्" या वाक्यांतील भाव शब्दाचा क्रिया असा सर्वसाधारण अर्थ आधुनिक वैयाकरणांनीं दिला आहे.[1] भाष्यकारांनीं भाव शब्दाची व्याख्या अथवा अर्थाचें विवेचन केलें नाही. "भावे" (सू. ३।३।१८) या सूत्राच्या व्याख्यानावरून क्रिया हा अर्थ त्यांना अभिप्रेत असावा असें दिसतें. कृ, भू, अस् या धातूंनीं दाखविलेल्या क्रियेला सामान्यभाव, व पच्, हन्, गम् वगैरे धातूंतील क्रियेचे बाबतींत एक सामान्य करणरूप किंवा भवनरूप सामान्यभाव, व पाक, वध, गमन यांसारखा विशेषभाव असे दोन भाव भाष्यकारांना अभिप्रेत असावे.

### ३३४. भाव शब्दाचा अर्थ.

पदार्थामध्यें आढळून येणाऱ्या व क्षणोक्षणीं पदार्थाच्या आंतर आणि बाह्य स्वरूपांत बदल घडवून आणणाऱ्या धर्माला भाव ही संज्ञा दिलेली दिसते. भाव शब्दाचा पदार्थाचें अस्तित्व हा व्युत्पत्तिसिद्ध अर्थ होतो व या पदार्थाच्या अस्तित्वाचें जे जनन, अस्तित्व विपरिणाम, क्षय, वृद्धि, व नाश हे सहा धर्म त्यांना भाव ही संज्ञा दिली आहे. या धर्माच्या चालू स्थितीला भाव हें नांव देण्यांत येतें. उदाहरणार्थ, चूल पेटविणें, चुलीवर भांडें ठेवणें, व त्यांत पदार्थ विवक्षित वेळ ठेवणें या सर्व क्रिया जोंपर्यंत चालू आहेत तोंपर्यंतच्या अवस्थेचें

'पचति' या रूपानें वर्णन केलें जातें. पाक, पक्ति व पचन या शब्दांतही भाववाचकच प्रत्यय आहेत व या शब्दांचाही वरील क्रियांचा समूह हाच अर्थ आहे; व याच अर्थीं भाववाचक प्रत्यय लावले आहेत. तरी पण या भावाला द्रव्याप्रमाणें लेखण्यांत येतें व म्हणून या कृदन्त शब्दांना लिंगप्रत्यय व सुप् विभक्तिप्रत्यय लागतात असें भाष्यकारांनीं "कृदभिहितो भावो द्रव्यवद् भवति" या वाक्यांत सांगितलें आहे. गत्वा, गन्तुम् इत्यादि ठिकाणीं जरी कृत् प्रत्ययानें भावाचें प्रतिपादन होत असलें तरी त्या कृत्प्रत्ययान्त शब्दाला लिंग व विभक्ति प्रत्ययांचा योग होत नाहीं याचें कारण जरा वरवर रीतीनेंच "कृदभिहितो भावो द्रव्यवत् कदाचिन्न भवति" असें भाष्यकारांनीं दिलें असलें तरी वास्तविक पाहतां त्या ठिकाणीं त्या कृदन्त शब्दांना अव्ययस्वरूप प्राप्त झाल्यामुळें विभक्तिप्रत्ययांचा लोप झाला आहे. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें करोति, पचति इत्यादि ठिकाणीं क्रियेला प्राधान्य असल्यामुळें व क्रियेला लिंगाचा योग नसल्यामुळें लिंगप्रत्यय लागत नाहींत. पाक, पक्ति, पचन इत्यादि ठिकाणीं क्रियेला गौणत्व व द्रव्याला प्राधान्य असल्यामुळें विभक्तिप्रत्यय लागतात व लिंगप्रत्यय लोकसंकेताप्रमाणें लागतात. लिंग हें लोकप्रयोगावर अवलंबून असतें हा वैयाकरण सिद्धान्त आहे व भाष्यकारांनीं त्याचें निरूपण "लोकाश्रयत्वात् लिङ्गस्य" असें अनेक ठिकाणीं केलें आहे. पचन, पक्ति व पाक या ठिकाणीं जरी प्रत्ययाचा अर्थ भाव म्हणजे क्रियासमूह असला तरी अन-प्रत्ययान्त शब्दाहून क्रियासमूहाच्या आरंभावस्थेचा प्राधान्यानें बोध होतो; ति-प्रत्ययान्त शब्दानें क्रियासमूहाच्या मध्यावस्थेचा प्राधान्यानें बोध होतो; व अ-प्रत्ययान्त शब्दानें क्रियासमूहाच्या अन्त्यावस्थेचा प्राधान्यानें बोध होतो असें लोकप्रयोगांवरून साधारणतः दिसून येतें.

## १३५. वार्तिककारांनीं दिलेले प्रातिपदिकांचे नऊ प्रकार.

पूर्ववैयाकरणांनीं शब्दांचे नाम, आख्यात उपसर्ग व निपात असे चार प्रकार केले आहेत. पाणिनीनें शास्त्रदृष्ट्या सोईस्कर असे सुबन्त व तिङन्त असे दोनच प्रकार केले आहेत; व उपसर्ग आणि निपात यांची सुबन्तांमध्यें गणना केली आहे सुबन्त पदांमधील मूळ प्रकृतीला त्यानें प्रातिपदिक ही संज्ञा दिली आहे; तसेंच तिङन्त पदांतील मूळ प्रकृतीला त्यानें धातु ही संज्ञा दिली आहे. यावरून पाणिनीला प्रातिपदिक व धातू अशा दोनच पदप्रकृती अभिप्रेत असाव्या असें दिसून येतें. शब्दांच्या विशिष्ट तऱ्हेच्या अर्थावरून शब्दांचे आणखी पुष्कळ पोटभेद होऊं शकतात; व निरनिराळ्या संज्ञांच्या रूपानें वार्तिककारांनीं त्यांचें निदर्शन केलें आहे. "आ कडारात् एका संज्ञा" (सू. १।४।१) या सूत्रावरील वार्तिकामध्यें एकामागून एक अशा क्रमानें यांतील बऱ्याच संज्ञा सांगितल्या आहेत. या वार्तिकांतील "अर्थवत् प्रातिपदिकम्" "गुणवचनं च", "समास-कृत्-तद्धित-अव्यय सर्वनाम-असर्वलिङ्गा जातिः", "संख्या", "एकद्रव्योपनिवेशिनी संज्ञा" हीं वार्तिकें या बाबतींत महत्त्वाचीं आहेत. या वार्तिकांचें व्याख्यान करतांनां भाष्यकारांनीं पूर्वीच्या संज्ञेचा पर संज्ञेनें बाध होतो असें म्हटलें असल्यामुळें गुणवचनसंज्ञेचा समास, तद्धित इत्यादि संज्ञांनीं बाध होतो. "गुणवचनं च" या वार्तिकामध्यें 'च' हा शब्द घातल्यामुळें गुणवचन संज्ञा प्रातिपदिक संज्ञेचा बाध करीत नाहीं. या संज्ञा विचारांत घेतल्या असतां प्रातिपदिकांचे गुणवचन, सर्वनाम, अव्यय, तद्धितान्त, कृदन्त, समास, जाति, संख्या व संज्ञा असे नऊ प्रकार होतात. प्रातिपदिकांशिवाय धातू हा एक निराळाच प्रकार असल्यामुळें भाषेतील शब्दांचे एकंदर दहा प्रकार होतात.

## ३३६. गुणवचन शब्द व द्रव्यवचन शब्द.

जाति व गुण या शब्दांचे अर्थ भाष्यकारांनीं "वोतो गुणवचनात्" (सू. ४।१।४४) या सूत्राचें विवेचन करतांना पूर्व वैयाकरणांनीं दिलेले श्लोक उद्धृत करून स्पष्ट केले आहेत. द्रव्यावर नेहमीं अवलंबून असणारा, विजातीय अनेक द्रव्यांवर दिसणारा, व स्वभावतःच द्रव्यांपेक्षां निराळा असा गुण शब्दाचा अर्थ दिला आहे; व श्वेत, कृष्ण, कोमल, मृदु, कठिन वगैरे गुणवचन शब्दांचीं उदाहरणें दिलीं आहेत. जातीचें स्वरूप सामान्यतः "आकृतिग्रहणा जातिः०" या वार्तिकानें अवयवसंस्थानाने जिचा बोध होतो ती जाति अशा रीतीनें सांगितलें आहे.(एकंदरीत पाहतां शब्दांचे द्रव्यवचन, गुणवचन, व क्रियावचन असे तीन प्रकार भाष्यकारांना अभिप्रेत असावे व त्याप्रमाणेंच गुण शब्दाच्या त्यांनीं दिलेल्या व्याख्येवरून ज्या शब्दांना गुणवचन म्हणतां येत नाहीं व क्रियावचनही म्हणतां येत नाहीं अशा सर्व शब्दांना द्रव्यवचन शब्द म्हणणें हेंही त्यांना अभिप्रेत असावें. नैयायिक व इतर शास्त्रकारांनीं वापरलेल्या द्रव्य या संज्ञेचा विचार केला असतां त्यांनीं धर्मापेक्षां निराळा धर्मिरूप जो पदार्थ त्याला द्रव्य म्हटलें आहे; व द्रव्यावर राहणाऱ्या धर्मांचे गुण व क्रिया असे दोन प्रकार केले आहेत. जगांतील सर्व पदार्थांचा त्यांनीं या द्रव्य, गुण व क्रिया यांमध्यें अंतर्भाव केला आहे. भाष्यकारांना हे तीन प्रकार मान्य आहेत हें त्यांच्या विवेचनावरून स्पष्ट होतें.) द्रव्यवचन, गुणवचन व क्रियावचन हे तीनही शब्द त्यांनीं वापरले आहेत; इतकेंच नव्हे, तर 'नैतत् क्रियावचनं, किं तर्हि द्रव्यवचनम्' या वाक्यानें द्रव्यवचन व क्रियावचन हे दोन प्रकार एकाच शब्दाचे बाबतींत न संभवणारे अत्यंत विभिन्न असे दाखविले आहेत. गुणवचन हा शब्द पाणिनीनें पांच वेळां वापरला आहे; व गुणाचें प्रतिपादन करणारा शब्द असा त्याचा अर्थ आहे. भाष्यामध्यें 'नैव द्रव्यवाची, किं तर्हि गुणवाची' अशा रीतीनें कोठेंही प्रतिपादन केलें नसलें तरी "उभयवचना ह्येते" असें विंशति, त्रिंशत् इत्यादि शब्द तसेंच शुक्ल, कृष्ण इत्यादि शब्द यांविषयीं विधान केलें असल्यामुळें भाष्यकारांना सुबन्तांचे द्रव्यवचन व गुणवचन असे दोन निरनिराळे प्रकार अभिप्रेत होते हें स्पष्ट दिसून येतें.

## ३३७. उपसर्ग व निपात यांना द्रव्यवचन म्हणण्याच्या शक्यतेचा विचार.

पाणिनीनें "अर्थवदधातु०" या सूत्रामध्यें धातू व प्रत्यय यांना प्रातिपदिक संज्ञेचा निषेध केला आहे. त्यामुळें त्यांना सुप् प्रत्यय लागत नाहींत व त्यांना 'सुबन्त' ही संज्ञा देतां येत नाहीं; व त्यामुळें पद संज्ञाही देतां येत नाहीं. धातूंहून तिङ् प्रत्यय होत असल्यामुळें क्रियापदांना तिङन्त म्हणून पद संज्ञा होते. प्रत्यय हे सुबन्त व तिङन्त यांपैकीं कोणत्याही प्रकारचे नसल्यामुळें त्यांना पदसंज्ञा होत नाहीं; व ते अर्थयुक्त असले तरी त्यांचा स्वतंत्र प्रयोग होत नाहीं. क्त्वायां क्त्वः आमः इत्यादि ठिकाणीं त्या त्या प्रत्ययांचा अनुकरण-रूपानें प्रयोग केला गेल्यामुळें त्यांना सुप् प्रत्यय लागलेले दिसतात. उपसर्ग व निपात यांना अर्थवत्त्व असल्यामुळें व त्यांना धातू व प्रत्यय यांच्या सारखा निषेध सांगितला नसल्यामुळें त्यांना प्रातिपदिक संज्ञा होते व त्यामुळें त्यांहून सुप् प्रत्यय होतात व सुबन्त म्हणून त्यांना पदसंज्ञा होते. वरतीं दिलेले प्रातिपदिकांचे नऊ प्रकार पाहिल्यास उपसर्ग व निपात यांची अव्ययांमध्यें गणना झाल्यामुळें त्यांना गुणवचन म्हणतां येत नाहीं; व क्रियावाचक धातूंपासून ते व्युत्पत्तिसिद्ध होत नसल्यामुळें त्यांना क्रियावचनही म्हणतां येणार नाहीं. अर्थात् जीं

प्रातिपदिकें गुणवचन नव्हेत तीं सर्व द्रव्यवचन अशी द्रव्यवचन शब्दाची व्याख्या केल्यास त्यांना द्रव्यवचन म्हणणें भाग पडतें. उपसर्ग व निपात यांच्या अर्थाचा विचार केल्यास त्यांचा द्रव्यरूप अर्थ दृष्टीस पडत नाहीं. कधीं गुणरूप तर कधीं क्रियारूप असाच अर्थ दृष्टीस पडतो. ‘उपसर्गाः क्रियायोगे’ (सू. १।४।५९) या सूत्रावरून उपसर्ग हे क्रियेचा विशेष दाखवितात असें सूत्रकारांचें मत दिसतें. क्रियेचा विशेष हा क्रियारूप होऊं शकत नाहीं; तो क्रियेचा गुण होऊं शकतो. प्र, परा इत्यादिकांना उपसर्गसंज्ञेची बाधक कर्मप्रवचनीय संज्ञा जेव्हां होते तेव्हां “अपपरी वर्जने” (सू. १।४।८८) इत्यादि सूत्रें पाहिलीं असतां कर्मप्रवचनीयांचा अर्थ गुणवचन अथवा क्रियावचन शब्दांच्या अर्थासारखा दिसून येतो. निपातांचाही अर्थ पाहिल्यास बहुतेक ठिकाणीं तो गुणवाचक किंवा क्रियावाचक शब्दांसारखा दिसून येतो. परंतु वर दिलेल्या वार्तिकवचनांचा अभिप्रेत अर्थ कांटेकोरपणानें विचारांत घेतल्यास उपसर्ग, कर्मप्रवचनीय व निपात यांना गुणवचन अथवा क्रियावचन यांपैकीं कोणतीही संज्ञा देतां येणार नाहीं. द्रव्यवचन ही संज्ञा सामान्य तऱ्हेची घेतल्यास त्यांना द्रव्यवचन म्हणतां येईल; किंवा द्रव्यवचन संज्ञा वार्तिककारांनीं दिली नाहीं म्हणून तिचा स्वीकार न केल्यास त्यांना अव्ययरूप शब्द म्हणून केवल प्रातिपदिक संज्ञा देतां येईल.

### ३३८. असत्त्व शब्दाचा अर्थ.

‘चादयोऽसत्त्वे’ (सू. १।४।५७) व ‘करणे च स्तोकाल्पकृच्छ्रकतिपयस्यासत्त्ववचनस्य’ (सू. २।३।३३) या सूत्रांतील ‘असत्त्व’ शब्दाच्या अर्थाविषयीं विचार केल्यास निपातांच्या अर्थाविषयीं आणखी एक निराळाच मार्ग दिसून येतो. ( उपसर्गांचा चादिशब्दांमध्यें सूत्रकारांनीं अंतर्भाव केला आहे व निपातांमधील पुष्कळसे निपात चादिशब्दांमध्येंच येतात. च वगैरे शब्दांना असत्त्व अर्थ असतांना निपात म्हणावें, अथवा सत्व अर्थ असल्यास निपात म्हणूं नये असा ‘चादयोऽसत्त्वे’ या सूत्राचा दोनही प्रकारचा अर्थ होतो.) असत्त्व शब्दांचाही अर्थ नञाचा ‘पूर्ण प्रतिषेध’ अर्थ घेऊन सत्त्वाभाव असा, किंवा ‘तद्भिन्न तत्सदृश’ अर्थ घेऊन सत्त्वभिन्न सत्त्वसदृश म्हणजे केवल धर्मरूप असा अर्थ करतां येईल. सत्त्व या शब्दाचा द्रव्य हा अर्थ करण्याची भाष्यकारांची वहिवाट आहे. ‘सतो भावः सत्त्वम्’ व ‘सीदन्ति गुणा यस्मिन् तत् सत्त्वम्’ अशा दोनही प्रकारांनीं सत्त्व शब्दाचें भाष्यकारांनीं निर्वचन केलें असल्यामुळें जगांतील अर्थयुक्त सर्व पदार्थांचा सत्त्वामध्येंच अंतर्भाव होतो व असत्त्व शब्दाचा सत्त्वरहित म्हणजे अर्थरहित असा अर्थ करावा लागतो. पण तसा अर्थ केल्यास असत्त्व अर्थ असतांना ज्यांना निपात संज्ञा सांगितली आहे अशा ‘च,’ ‘वा’ वगैरे शब्दांना ‘अर्थवत्०’ या सूत्रानें प्रातिपदिक संज्ञा होणार नाहीं; व त्यामुळें सुप् प्रत्यय न लागल्यामुळें पद संज्ञाही होणार नाहीं. ही अडचण लक्षांत घेऊनच वार्तिककारांनीं ‘निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वम्’ (सू. १।२।४५ वा. १२) हें वार्तिक केलें, व त्यामुळें निपातांना ‘पद’ ही संज्ञा झाल्यामुळें ‘पदस्य, पदात्’ (सू. ८।१।१६–१७) इत्यादि सूत्रांनीं सर्वनिघात वगैरे कार्यें करतांना निपातांचा अतिङन्तपद म्हणून उपयोग करतां येऊं लागला. )

### ३३९. उपसर्ग व निपात यांचें वार्तिककारांनीं प्रतिपादन केलेलें अनर्थकत्व.

वार्तिककारांनीं याप्रमाणें निपातांना प्रातिपदिक संज्ञा देऊन शास्त्रीय अडचणी दूर केल्या, तरी निपातांना दिलेल्या अनर्थक या विशेषणाचा त्यांच्या मनांत काय अर्थ असावा हें अनिर्णीतच राहिलें. भाष्यकारांनीं ‘अनर्थक’ शब्दाच्या अर्थाचें विवेचन केलें नाहीं;

एक निपातांना प्रातिपदिक संज्ञा देण्याचे उपयोग त्यांनीं सांगितले आहेत. अनर्थक म्हणजे पादपूरणार्थक शब्दांप्रमाणें अत्यंत अर्थरहित असा अर्थ घेणें शक्य नाहीं; कारण, लोक-व्यवहारामध्यें उपयुक्त शब्द म्हणून त्यांचा प्रयोग केलेला असतो. सत्त्व म्हणजे द्रव्य हें आणि असत्त्वामुळें द्रव्यभिन्न म्हणजे केवलधर्मस्वरूप असा असत्त्व शब्दाचा अर्थ करतां येईल. भाष्यकारांनीं म्हटल्याप्रमाणें (गुण हा गुणीशिवाय, त्याप्रमाणेंच गुणी हा गुणाशिवाय रहात नसतो असें जरी असलें तरी गुणीची म्हणजे धर्मीची अत्यंत अविवक्षा करून धर्मस्वरूपाची केवळ कल्पना केल्यास, साहचर्य विकल्प इत्यादि केवल धर्म हे च, वा इत्यादि निपातांचे अर्थ म्हणून समजतां येणें शक्य आहे;) व तसेच ते नंतरच्या वैयाकरणांनीं घेतले असावे असें दिसून येतें. ‘यदा तु धर्ममात्रं करणतया विवक्ष्यते न द्रव्यं, तदा स्तोकादीनामसत्त्ववचनता’ हें असत्त्व शब्दाचें काशिकाकारांनीं दिलेलें स्पष्टीकरण व ‘यद्योगाद् द्रव्यं स्तोकादिव्यपदेश-मासादयति ते गुणा धर्माः। उभयवचना ह्येते द्रव्यमाहुर्गुणं च शुक्लादिवत्। यदा गुणवचनास्तदा असत्त्ववचनता इत्यर्थः’ या शब्दांत हरदत्तांनीं केलेलें विवरण हीं दोनही या बाबतींत लक्षांत घेण्याजोगीं आहेत. ‘चादयोऽसत्त्वे’ या सूत्रावरील काशिकावृत्तीचें व्याख्यान करतांना हरदत्तांनीं पदमञ्जरीमध्यें सत्त्व व द्रव्य या शब्दांच्या अर्थाविषयीं फारच मार्मिक विवेचन केलें आहे.

## ३४०. उपसर्गांच्या अर्थाविषयीं विचार.

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें असत्त्व शब्दाचा धर्ममात्र म्हणजेच केवल धर्म असा अर्थ घेणें योग्य आहे; व च, वा इत्यादि निपातांचा तसा म्हणजे केवल धर्मस्वरूप अर्थ असतो हें स्पष्ट दिसतें. भाष्यकारांनीं शब्दांचा अर्थ अन्वयव्यतिरेकांवरून जाणावा असें म्हटलें आहे. सूत्रकारांनीं निरनिराळ्या प्रातिपदिकांचे, धातूंचे, प्रत्ययांचे, अव्ययांचे, उपसर्गांचे व कर्मप्रवचनीयांचे प्रसंगानें अर्थ दिले आहेत. त्यावरून वैदिक शब्द व शिष्टप्रयुक्त शब्द या सर्वांना अर्थ असतो असें सूत्रकारांचें मत स्पष्ट दिसून येतें. लौकिक प्रयोगामध्यें मात्र केवल धातू, केवल प्रातिपदिकें व केवल प्रत्यय यांचा स्वतंत्र प्रयोग केलेला कोठेंही आढळत नसल्यामुळें सूत्रकारांनीं त्यांना पद संज्ञा दिली नाहीं; सुबन्त व तिङन्त अशा शब्दांनाच पद संज्ञा दिली आहे. अर्थनिर्देशाशिवाय समासान्त वगैरे कांहीं प्रत्यय सूत्रकारांनीं दिले आहेत; त्यासंबंधीं भाष्यकारांनीं ‘अनिर्दिष्टार्थाः प्रत्ययाः स्वार्थे भवन्ति’ असें विधान करून ते प्रत्यय स्वार्थी म्हणजे प्रातिपदिकाच्या अर्थीं लाविले जातात असें म्हटलें आहे. कर्मप्रवचनीयांना सूत्रकारांनीं स्वतन्त्र अर्थ दिले आहेत. उपसर्गांना मात्र स्वतंत्र अर्थ कोठें दिलेले आढळत नाहींत. उपग्रहप्रकरणामध्यें (अ. १ पा. ३ सू. १२–९३) विशिष्ट उपसर्गांच्या पुढील विशिष्ट धातूंच्या पुढें परस्मैपद व आत्मने-पद प्रत्यय सांगतांना सूत्रकारांनीं विशिष्ट अर्थनिर्देश केला आहे; पण तो केवल उपसर्गांचा केला नाहीं; तर उपसर्गसहित धातूंचा अर्थनिर्देश केला आहे. भाष्यकारांनींही उपसर्गांचा धातूंशीं योग तिङ्प्रत्यय करण्यापूर्वी करावा किंवा नंतर करावा याविषयीं ‘उपपदमतिङ्’ (सू. २।२।१९) या सूत्रावरील भाष्यांत, तसेंच ‘गतिर्गतौ’ (सू. ८।१।७०) यावरील भाष्यांत ‘पूर्वं धातुः साधनेन युज्यते पश्चादुपसर्गेण’ ... धातूपसर्गयोरभिसंबन्धस्तमभ्यन्तरीकृत्य धातुः साधनेन युज्यते’ ही ओळ भाष्यकारांनीं लिहिली आहे व तिचें कैयटभट्टांनीं ‘ततश्च परमार्थतो धातूपसर्गसंघात एव क्रियावाची, पृथगुपदेशस्तु धातूपसर्गयोरडादिव्यवस्थार्थः। ततश्चान्तरङ्ग उपसर्गयोगो बहिरङ्गः साधनयोगः’ या वाक्यांनीं केलेलें विवरण लक्षांत घेण्याजोगें आहे. यावरून धातूला उपसर्ग

लागून निराळा अर्थ येतो तेव्हां तो निराळा अर्थ धातू व उपसर्ग मिळून दोघांचा असतो व तसा तो मनांत येण्याकरितां धातु व उपसर्ग यांचा योग तिङ्प्रत्यय जोडण्यापूर्वीच होतो असें भर्तृहरीचें व कैयटभट्टांचें मत आहे. नागेशांनीं मात्र उपसर्गाचा धातूशीं योग तिङ्प्रत्ययान्त रूप तयार झाल्यावरच होतो; उपसर्ग जवळ असतांना जो विशिष्टार्थ मनांत येतो तो विशिष्टार्थ धातूचाच असतो; फक्त तो दाखविण्याला उपसर्गाची मदत लागते म्हणून उपसर्ग जोडणें आवश्यक असतें, असें प्रतिपादन केलें आहे. या उपसर्ग-धातुयोगाचे बाबतींत कैयटमत जुनें म्हणून संबोधिलें जातें व नागेशांचें मत नवें म्हणून संबोधिलें जातें. दोन्ही वैयाकरणांनीं भाष्यकारांची वर दिलेली 'यरूवसौ०' ही पङ्क्ति आपल्या प्रतिपादनाला अनुकूल म्हणून घेतली आहे.

## ३४१. उपसर्गांचें अर्थद्योतकत्व.

धातूंचा उपसर्गाशीं योग तिङ् प्रत्यय लावण्यापूर्वीं होवो अगर नंतर होवो, उपसर्गामुळें धातूला निराळा अर्थ प्राप्त होतो हें खरें; या विशिष्ट अर्थाचे दोन भाग करून हा धातूचा अर्थ व हा उपसर्गाचा अर्थ असे निरनिराळे दाखवितां येत नाहींत; त्यामुळें उपसर्गाला विशिष्ट अर्थ सांगणें कठिण पडतें. शिवाय तसा जरी सांगितला—उदाहरणार्थ 'प्रति' याचा अर्थ 'मागें' किंवा 'अप' याचा अर्थ 'दूर'—तरी तो सर्वच ठिकाणीं तसा आढळून येत नाहीं; व जरी कांहीं ठिकाणीं येत असला तरी भाषेमध्यें धातूला सोडून उपसर्गाचा प्रयोग कधींही आढळत नाहीं. या सर्व गोष्टी विचारांत घेऊन भर्तृहरीनें द्योतकत्वसिद्धान्त प्रतिपादन करण्याला आरंभ केला. शब्दावरून अर्थ कसा मनांत येतो—अभिधेय म्हणजे वाच्य म्हणून, अथवा द्योत्य म्हणून, अथवा लक्ष्य म्हणून अथवा व्यङ्ग्य म्हणून—याविषयीं निरनिराळ्या शास्त्रकारांनीं भाष्यकारांच्या नंतर कित्येक वर्षांनीं आपआपले सिद्धान्त मांडले. पाणिनि, कात्यायन व पतंजलि या तिघांही वैयाकरणांनीं याबाबत सूक्ष्म विचार केला नाहीं व द्योतकत्वासारखा शब्दही वापरला नाहीं. पाणिनीनें निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या शब्दांचे अर्थ सांगितले आहेत त्यांचा विचार केल्यास अमुक शब्द अमुक अर्थ प्रतिपादन करतो येवढेंच सांगण्याचा त्याचा हेतु असतो. सर्वसाधारण शब्दांनीं केलेल्या अर्थप्रतिपादनाकडे लक्ष दिल्यास भर्तृहरीला प्रत्यय निपात व उपसर्ग यांनीं केलेल्या अर्थप्रतिपादनाच्या तऱ्हेमध्यें एक प्रकारचें वैशिष्ट्य आढळून आलें व त्यानें प्रत्यय निपात व उपसर्ग हे अर्थाचे द्योतक असतात, इतर शब्दांप्रमाणें अर्थाचे वाचक नसतात, असें वेळोवेळीं प्रतिपादन केलें आहे. या बाबतींत दुसऱ्या कांडामध्यें खुलासेवार विवेचन भर्तृहरीनें कारिका १६५–२०६ मध्यें दिलें आहे तें परिशीलन करण्याजोगें आहे. विशेषतः 'वाचिका द्योतिका वा स्युर्द्वित्वादीनां विभक्तयः' (वा. प. २।१६५), 'निपाता द्योतकाः केचित् पृथगर्थाभिधायिनः । आगमा इव केपि स्युः संभूयार्थस्य वाचकाः' (वा. प. २।१९४) या श्लोकांतील प्रतिपादन मननीय आहे. शब्दांच्या द्योतकत्वाचें प्रतिपादन व उपपत्ति हीं प्रथमतः भर्तृहरीच्या वाक्यपदीयामध्यें आढळतात. त्याचे पूर्वीं संग्रह या ग्रंथामधील उपलब्ध उताऱ्यांवरून संग्रहकार व्याडींनीं शब्दद्योतकत्वाचा बीजभूत सिद्धान्त मांडला असावा असें दिसतें. कैयटभट्ट, हरदत्त व नागेश यांनीं भर्तृहरिमताचा अवलंब करून उपसर्ग, निपात व प्रत्यय यांना स्वतःला अर्थ नसतो; प्रदीप जसा जवळच्या पदार्थाचें प्रकाशन करतो, त्याप्रमाणें हे उपसर्ग, निपात व प्रत्यय ज्या प्रकृतीला ते जोडले जातात त्या प्रकृतीचाच अर्थ दाखवून देतात असें म्हटलें आहे.

## ३४२. शब्दांचे द्रव्यवचन गुणवचन व क्रियावचन हे तीन प्रकार.

वर दिल्याप्रमाणें द्रव्यवचन, गुणवचन व क्रियावचन असे शब्दांचे तीन मुख्य प्रकार होतात. जातिवाचक शब्द, संज्ञावाचक शब्द, संख्यावाचक शब्द, अव्ययें, सर्वनामें, सामासिक शब्द, कृदन्त शब्द व तद्धित शब्द या सर्वांचा द्रव्यवचन शब्दांमध्येंच अंतर्भाव होतो असें वर सांगितलें आहे. जाति ही व्यक्तीशिवाय व व्यक्ती ही जातीशिवाय अर्थाभिधान कधींही करीत नसल्यामुळें जातिवाचक घट, पट वगैरे शब्दांना द्रव्यवचन म्हणतां येईल. संज्ञाशब्दही एका विशिष्ट व्यक्तीचेंच अभिधान करीत असल्यामुळें त्यांना द्रव्यवचन म्हणतां येईल. संख्यावाचक शब्दही संख्येय दाखवीत असल्यामुळें त्यांनाही द्रव्यवचन म्हणतां येईल कृदन्त शब्द हे धातुसाधित असल्यामुळें क्रियेचा अर्थ त्यांमध्यें अंतर्भूत असतो व तो कर्ता, कर्म, अधिकरण या द्रव्यरूप अर्थांना गुणीभूत झाल्यामुळें कृदन्त शब्दांना द्रव्यवचन म्हणतां येईल. पण क्रियाश्रय द्रव्यवचन म्हटलें असतां त्यांचें स्वरूप ज्यास्त स्पष्टपणानें कळून येईल. भावार्थी कृत् प्रत्यय लागून झालेल्या पाक, भजन, क्रिया इत्यादि सिद्ध क्रिया दाखविणाऱ्या शब्दांचा क्रिया हाच अर्थ असल्यामुळें त्यांना क्रियावचनच म्हणावें लागतें व भाष्यकारांनीं तसें म्हटलेंही आहे. पण त्यांना लिंगवचन प्रत्यय लागावे म्हणून भाष्यकारांनीं ‘ कृदभिहितो भावो द्रव्यवद् भवति ’ असा त्यांच्यावर द्रव्याचा अतिदेश केला आहे. हा अतिदेश शास्त्रसमयाकीरतां सामान्य अतिदेश म्हणून समजल्यास या शब्दांना द्रव्यवचनही म्हणतां येईल. महत्, गुरु, अणु, लघु, शुक्ल इत्यादि शब्द गुणवाचक शब्दांचींच उदाहरणें म्हणून देतां येतील. त्यांना भावार्थीं म्हणजे केवल धर्म या अर्थीं तद्धित प्रत्यय लागून साधलेले माहात्म्य, गौरव, अणिमा, लघिमा इत्यादि शब्द जरी गुणवाचक असले तरी त्यांचे बाबतींतही ते तद्धितान्त असल्यामुळें त्यांना गुणवचन कसें म्हणावें अशी शंका येते व तिचें निराकरण करावयाचें म्हटल्यास ‘ तद्धितान्त शब्द गुणवचन नसतात ’ या सामान्य नियमाला ‘ भावार्थी म्हणजे स्वभावार्थीं त्व, तल् वगैरे प्रत्यय लागल्यास गुणवाचकत्व कायम राहतें ’ असा अपवाद समजणें भाग पडतें. अशाच तऱ्हेची दुसरी अडचण म्हणजे शुक्लो घटः या ठिकाणीं शुक्ल शब्दाला मतुप् प्रत्यय लागून त्याचा लोप झाल्यावर शुक्लवर्णयुक्त या अर्थाचा शुक्ल शब्द होतो असें वार्तिककारांचें म्हणणें स्वीकारल्यास तद्धितान्त शुक्ल शब्द द्रव्यवाचक होईल; पण भाष्यकारांनीं त्याला गुणवचन असें म्हटलें आहे; एवढेंच नव्हे, तर “ गुणवचनानामाश्रयतो लिङ्गवचनानि भवन्ति ” असें विधान करून लिंगाचा खुलासा केला आहे. शुक्ल कृष्ण इत्यादि शब्दांविषयीं भाष्यकारांनीं ‘ उभयवचता होते ’ असें स्पष्ट म्हटलें आहे.

## ३४३. विशेषण-शब्दांचें अभिधायकत्व.

वरील सर्व गोष्टींचा विचार केल्यास असें दिसून येईल कीं द्रव्यवचन, गुणवचन व क्रियावचन या संज्ञा द्रव्य, गुण किंवा क्रिया यांचें मुख्यत्वानें अभिधान होत असल्यास लावल्या जातात. पाक, घट, मनुष्य, वृक्ष, देवदत्त, डित्थ या सर्व शब्दांना द्रव्यवचन शब्द म्हणतां येतें. शुक्ल, कृष्ण, लघु, गुरु, मृदु, रूप, रस, गन्ध, स्पर्श गौरव इत्यादि शब्दांना गुणवचन शब्द म्हणतां येतें. तसेंच, करोति, भवति, पचति इत्यादि तिङन्त शब्दांना क्रियावचन शब्द म्हणतां येतें. अभिहित अर्थाला द्रव्य, गुण व क्रिया हीं कारणीभूत असून अभिहित अर्थ हा मात्र गुणस्वरूप क्रियास्वरूप किंवा द्रव्यस्वरूप या तऱ्हेचा झाल्यास त्या अर्थाचें

प्रतिपादन करणाऱ्या शब्दाला द्रव्यमूलक गुणमूलक व क्रियामूलक या विशेषणांनीं युक्त गुणवचन, क्रियावचन, किंवा द्रव्यवचन म्हणतां येईल. या बाबतींत वाक्यामध्यें आढळणाऱ्या सामानाधिकरण्याकडे लक्ष देऊन समानाधिकरण दोन किंवा अधिक शब्द असल्यास त्यांतील मुख्य शब्दाचें अभिधायकत्व प्रथम ठरवावें; व त्याप्रमाणें विशेषण शब्दांना अभिधायकत्व द्यावें असें सुचवावेंसें वाटतें. अर्थात्, या धोरणाचा अवलंब केल्यास शुक्लो घटः या ठिकाणीं शुक्ल हा शब्द घटाशीं समानाधिकरण असल्यामुळें भाष्यकारांच्या प्रतिपादनाविरुद्ध त्याला द्रव्यशब्द म्हणावें लागतें. कदाचित् हाच अभिप्राय मनांत धरून वार्तिककारांनीं या शब्दांना द्रव्यशब्द बनविण्याकरितां " गुणवचनेभ्यो मतुप् " असें वार्तिक करून मतुप् प्रत्ययाचा लुक् सांगितला असावा व नागेशभट्टांनीं भाष्यकारांनीं सांगितलेल्या गुणवचनत्वाचें समर्थन करण्याकरितां मतुप् प्रत्ययाचा लुक् झाल्यास शब्दाची मूळची स्वरूपकल्पना कायम राहते व शुक्लः पटः, कृष्णो घटः इत्यादि ठिकाणीं शुक्ल व कृष्ण हे शब्द गुणवाचकच आहेत असें म्हटलें आहे. एकंदरींत पाहतां, शब्दांचे द्रव्यवचन, गुणवचन व क्रियावचन हे भेद भाष्यकारांचे वेळीं उपयोगांत आले; व शब्दांचें द्योतकत्व व वाचकत्व असें दोन प्रकारचें स्वरूप भाष्यकार व त्यानंतरच्या वैयाकरणांनीं प्रतिपादित केलें. याविषयीं साङ्ग विचार करणें झाल्यास " आकडारादेका संज्ञा " ( सू. १।४।१ ) " उपपदमतिङ् " ( सू. २।२।१८ ) " वोतो गुणवचनात् " ( सू. ४।१।४४ ) " गतिकारकोपपदात् कृत् " ( सू. ६।२।१४२ ) " एक तद्धिते च " ( सू. ६।३।६२ ) या सूत्रांवरील भाष्य प्रदीप व उद्योत यांतील विवेचन फारच विचार करण्याजोगें आहे.

## ३४४. महाभाष्यानंतर संस्कृतभाषेची स्थिति व व्याकरणविषयक घडामोडी.

पाणिनिप्रक्रियेवर व्याकरणमहाभाष्यासारखा उत्कृष्ट विद्वत्ताप्रचुर व अन्तिमव्याख्यानस्वरूपाचा ग्रंथ लिहिला गेल्यानंतर कित्येक वर्षें नव्हे, तर कांहीं शतकें व्याकरणशास्त्रावर आणखी इतर ग्रंथ लिहिले न जाणें हें क्रमप्राप्त व साहजिकच होतें. शिवाय, पतंजलीनंतर अल्पावधींतच न्याय, वेदांत, मीमांसा सांख्य, योग, इत्यादि शास्त्रांवर व दर्शनांवर सूत्रव्याख्यानरूप अधिकृत भाष्यग्रंथ व टीकाग्रंथ लिहिले गेले. दर्शनग्रंथांचें अधिकृतरीत्या धार्मिक स्वरूप असल्यामुळें स्वाभाविकच त्यांच्या अभ्यासाकडे लोकांची अधिकच प्रवृत्ति झाली, व व्याकरणाच्या अध्ययनाकडे दिवसानुदिवस लोकांचें लक्ष कमी होत गेलें. संस्कृत भाषेचें बोलभाषा हें स्वरूप नाहींसें होऊन सामान्य जनांमध्यें प्रचलित असलेल्या प्राकृत व पाली या भाषांमध्यें ग्रंथ रचिले गेले; इतकेंच नव्हे, तर, संस्कृत वेदग्रंथांचा व शास्त्रवाङ्मयाचा अभ्यास करण्यापूर्वी संस्कृतभाषेचें कामापुरतें अध्ययन करणें जरूर पडूं लागलें. त्यांतच सामान्य जनतेला भाषाज्ञानासाठीं विद्वानांनीं पाणिनीचीच प्रक्रिया घेऊन अष्टाध्यायीपेक्षां सोपीं चान्द्र, कातन्त्र, जैनेन्द्र वगैरे व्याकरणें रचिल्यामुळें पाणिनीय व्याकरणाध्ययनाकडे लोकांची प्रवृत्ति जवळजवळ नाहींशीच झाली. पाणिनीय अष्टाध्यायीला वेदाङ्ग म्हणून स्थान मिळाल्यामुळें अष्टाध्यायीसूत्रपाठ मात्र मुखपरंपरेने जसाच्या तसा कायम राहिला. वरील कारणांमुळें महाभाष्याध्ययनाचा कालांतरानें जवळजवळ लोपच झाला व हस्तलिखितेंही नाहींशीं झालीं. हीच गोष्ट भर्तृहरीनें आपल्या वाक्यपदीयाच्या दुसऱ्या कांडाच्या शेवटीं नमूद केली आहे. पाणिनीय व्याकरणाचें व महाभाष्याचें अध्ययन पुनः चालू करण्याचें श्रेय भर्तृहरीलाच आहे.

## ३४५. कातन्त्र व्याकरण.

कातन्त्र अथवा कालाप नांवाचेंही व्याकरण ह्याच कालांत लिहिलें गेलें. हें कातन्त्र व्याकरण हल्लीं बिहार, बंगाल वगैरे पूर्वेच्या प्रांतांत प्रचलित आहे. हें व्याकरण किंवा त्याचें मूलस्वरूप दुसरें व्याकरण जरी असलें तरी तें पाणिनिपूर्वकालीं होतें असें म्हणण्यास पाणिनि-सूत्रांचा प्रत्यक्ष पुरावा नाहीं. भाष्यकारांनीं 'कलाप्यश्वत्थ०' या सूत्राचें विवरण करतांना 'कालाप' व त्याचेबरोबर दिलेल्या 'माहावार्तिक' या उदाहरणांवरून कलापि नांवाचा ग्रंथकार पाणिनिपूर्व-कालीं होता; व त्याच्याच ग्रंथावर पुढें कालाप अथवा कातन्त्र हें व्याकरण अधिष्ठित झालें असें म्हणतां येणें शक्य आहे कातंत्र या शब्दाचा अर्थ लहान तंत्र म्हणजे शास्त्र असा आहे. शिवाय पाणिनीनें न दिलेल्या, पण जुन्या वैयाकरणांच्या संज्ञा म्हणून महाभाष्यामध्यें ज्यांचा उल्लेख आढळतो त्या अद्यतनी, श्वस्तनी, परोक्षा वगैरे संज्ञा कातंत्र व्याकरणामध्यें आढळत असल्यानें वरील विधानास एक प्रकारची पुष्टि मिळते. हल्ली उपलब्ध असलेलें कातंत्र व्याकरण-मात्र पाल्यकीर्तिकृत शाकटायन व्याकरणासारखें फार अर्वाचीन नाहीं. भाष्यकारांनंतर चार पांच शतकांतच तें रचिलें असावें. यांतील सूत्रें कारिकामय आहेत. या कालाप अथवा कातंत्र व्याकरणाचा कर्ता म्हणून शर्ववर्म्याचा उल्लेख नंतरच्या ग्रंथांत आढळून येतो. शर्व-वर्म्यानें स्वतः या व्याकरणावर वृत्ति लिहिली व त्यानंतर यावर बरेच वृत्तिग्रंथ व टीकाग्रंथ लिहिले गेले. या कातंत्र व्याकरणाचा कृदन्त भाग हा कात्यायनानें लिहिला अशी समजूत आहे. कथासरित्सागरामध्यें सातवाहन नृपतीच्या आज्ञेनुसार हें व्याकरण शर्ववर्म्यानें लिहिलें अशी आख्यायिका आहे. अर्थात् हा सातवाहन प्रख्यात शालिवाहन नृपतीपेक्षां निराळा असें मानण्यांत येतें. कार्तिकेयानें या व्याकरणाचा उपदेश केला म्हणून या व्याकरणाला कौमार असेंही नांव देण्यांत येतें. या व्याकरणाची रचना ऐन्द्र व्याकरणाप्रमाणें प्रकरणात्मक आहे. या व्याकरणाचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे यामध्यें संज्ञा फारच थोड्या आहेत व कांहीं ठिकाणीं सूत्रांचेबरोबरच उदाहरणें दिलीं आहेत. ही उदाहरणांसहित सूत्रोच्चारणाची पद्धत वार्तिककार कात्यायन यांच्या वार्तिकामध्यें कांहीं ठिकाणीं आढळते. गरुडपुराणांत या व्याकरणाचा संक्षेप दिलेला आढळतो. कातन्त्राचा बंगालमध्यें पुष्कळ प्रचार आहे. गुजरातमध्येंही याचा प्रचार कांहीं शतकांपूर्वी बराच असावा. अनहिलवाडा पट्टण येथील हस्तलिखित ग्रंथसंग्रहालयामध्यें या व्याकरणाच्या व यावरील अनेक वृत्तींच्या टीकांच्या व पञ्जिकांच्या उत्तम हस्तलिखित प्रती उपलब्ध आहेत.

## ३४६. चान्द्र व्याकरण.

चान्द्र व्याकरण हें चंद्रगोमी नांवाच्या बौद्धधर्मीय आचार्यांनीं लिहिलें आहे. हें व्याकरण सूत्रमय आहे व पुष्कळ अंशीं पाणिनीच्या सूत्रावर आधारलेलें आहे. हा चंद्रगोमी वंगदेशचा रहाणारा पौर्वात्य व्याकरणपरंपरेचा वैयाकरण होता. तो बौद्धमतावलंबी होता असें मानण्यांत येतें. तरी पण त्यानें आपलें व्याकरण लिहिण्यांत पाणिनीची पद्धती स्वीकारली आहे. अर्थात् आपलें व्याकरण सुलभ व्हावें म्हणून पाणिनीच्या सूत्रक्रमांत योग्य ते बदल त्यानें केले आहेत; व त्या कामीं महाभाष्याचा उपयोग केला आहे. त्यानें संज्ञाप्रकरण पार गाळून टाकलें आहे; व लोकांतील संज्ञा जशाच्या तशाच घेतल्या आहेत. प्रत्याहारसूत्रें शाकटायना-

प्रमाणें तेरा केलीं आहेत. काशिकेमध्यें वैदिकपरंपरागत पाणिनिसूत्रपाठापेक्षां कांहीं थोडीं ज्यास्त सूत्रें सांपडतात व कांहीं पाठभेद आढळतात; ते चांद्र व्याकरणांतून घेतले असावे असा समज आहे. महाभाष्याचें पुनरुज्जीवन चंद्राचार्यांनीं केलें असें भर्तृहरीनें म्हटलें आहे. हे चंद्राचार्य व चंद्रगोमी एकच असण्याचा संभव पुष्कळ आहे. चान्द्र व्याकरणाचा सारांश अग्निपुराणाच्या २४८–२५८ अध्यायांमध्यें मिळतो. या चांद्र व्याकरणालाही उपसर्गवृत्ति, शिक्षा, कोश, अध्यायत्रयात्मक उणादिसूत्रपाठ, धातुपाठ, गणपाठ, लिंगानुशासन हीं उपांगें आहेत. धातूंची संख्या साधारणपणें पाणिनीनें दिलेल्या धातूंच्या संख्येच्या निम्मी आहे. कारण, बरेचसे धातू पाणिनीच्या नंतर चंद्रगोमीच्या काळापर्यंत संस्कृत ही बोलभाषा नाहींशी झाल्यामुळें प्रचाराबाहेर गेले असावे या व्याकरणाचे सहा अध्याय उपलब्ध आहेत. कदाचित् वैदिकी प्रक्रिया असलेले दोन अध्याय लुप्त झाले असण्याचा संभव आहे. कदाचित् चंद्रगोमी बौद्धमतावलंबी असल्यामुळें त्यानें ते लिहिलेही नसावे. बौद्ध पंडित पाणिनीय व्याकरणाचा अभ्यास करीत असले व त्यांना तें जरी उपयुक्त व पसंत असलें तरी वैदिकी प्रक्रिया ही पाली आगमग्रंथांना अनुपयुक्त म्हणून ते वैदिकी प्रक्रियेचा अभ्यास करीत नसावे.

### ३४७. जैनेन्द्र व्याकरण.

जैनेन्द्र व्याकरण हेंही पाणिनिसूत्रावर आधारलेलें व्याकरण याच काळांत लिहिलें असावें. महावीरानें इंद्राला या व्याकरणाचा उपदेश केला अशी एक आख्यायिका असली तरी पूज्यपाद देवनंदी यानें तें पांचव्या शतकांत रचिलें अशी सर्वसाधारण समजूत आहे. हेंही व्याकरण पाणिनिसूत्रांवर आधारलेलें आहे. काशिकाकारांनीं जिनेन्द्र व्याकरण म्हणून ज्याचा उल्लेख केला आहे तें हेंच असावें. या व्याकरणामध्यें व म्हणजे प्रथमा, ह म्हणज अव्ययीभाव, स म्हणजे तत्पुरुष, दी म्हणजे दीर्घ, घ म्हणजे ह्रस्व अशा तऱ्हेच्या संकेत-संज्ञा दिल्या आहेत. या व्याकरणाचीं संस्करणें (Versions) दाक्षिणात्य व औदीच्य अशीं उपलब्ध आहेत. या व्याकरणामध्यें एकशेष प्रकरण नाहीं. अर्थात्, जात्यभिधानपक्षीं एकशेष अनावश्यक आहे असें मत भाष्यकारांनीं आपल्या पूर्वींच्या वैयाकरणांचें म्हणून दिलें आहे. या जैनेन्द्र व्याकरणांत सिद्धसेनदिवाकर, प्रभाचंद्र, समंतभद्र वगैरे प्रसिद्ध जैन ग्रंथकर्त्यांचा उल्लेख केला आहे. ईश्वरकृष्णांचाही उल्लेख या व्याकरणांत मिळतो. जैनेन्द्र व्याकरणाचे उल्लेख अनेक जैन ग्रंथांत मिळतात. काशिकेंतही या व्याकरणाचा उल्लेख आहे. साधारणपणें इ. स. चें पाचवें शतक हा देवनंदीचा काल समजला जातो. कांहीं टीकाकारांनीं या जैनेन्द्र व्याकरणाचाच ऐन्द्र व्याकरण म्हणून उल्लेख केला आहे. परंतु जैनेन्द्र व्याकरण हें प्राचीन ऐन्द्र व्याकरणापेक्षां अगदीं निराळें व त्याच्याशीं असंबद्ध असून पाणिनिसूत्रावरच आधारलेलें आहे. दैवेन्द्र व दैव हीं नांवें याच व्याकरणाला दिलीं असण्याचा संभव आहे. या व्याकरणावर देवनंदीनें स्वतः न्यासवृत्ति लिहिली आहे; व धातुपाठ, गणपाठ, लिंगानुशासन यांची जोड दिली आहे. जैन ग्रंथांतील उल्लेखांवरून याच सुमारास सन्मति-तर्क ग्रंथ लिहिणाऱ्या सिद्धसेनदिवाकर नांवाच्या महापंडितांनीं एक व्याकरण ग्रंथ रचिला असावा असें दिसून येतें. सिद्धसेनदिवाकर हे जैन साधु ( क्षपणक ) असल्यामुळें क्षपणक-व्याकरण म्हणून ज्याचा उल्लेख मिळतो तो याच व्याकरणाला उद्देशून असावा असें दिसतें. ‘ धन्वन्तरिः क्षपणकः० ’ या श्लोकामधील क्षपणक शब्द या सिद्धसेनदिवाकरांनाच उद्देशून असणें शक्य आहे.

---

# भर्तृहरि-कालखंड (इ. स. ५००–६५०)

## ३४८. भर्तृहरीच्या वेळीं उपलब्ध असलेले व्याकरणग्रंथ.

वरतीं निर्दिष्ट केलेल्या व्याकरणग्रंथांपैकीं शाकटायन व्याकरण हें भर्तृहरिकालखंडांत जुनें पाणिनिपूर्वीच लिहिलेलें उपलब्ध होतें. त्याप्रमाणेंच ऐन्द्र, आपिशल, काशकृत्स्न, शाकल्य इत्यादि व्याकरणेंही उपलब्ध होतीं. या वर दिलेल्या व्याकरण-ग्रंथांशिवाय या भर्तृहरिकालखंडांत भर्तृहरीच्या पूर्वीं कांहीं प्रकीर्ण स्वरूपाचे व्याकरणविषयक ग्रंथही लिहिले गेले. पाणिनिसूत्रांवर दुर्विनीत चुल्लिभट्टि, निल्लूर यांनीं वृत्तिग्रंथ लिहिले असें काशिका वगैरे ग्रंथांतील उताऱ्यांवरून दिसून येतें. तसेंच भाष्यकारांपूर्वीं कुणिवृत्ति, माथुरीवृत्ति, श्वोभूतिवृत्ति, वाररुचीवृत्ति वगैरे कांहीं वृत्ती लिहिल्या होत्या हें महाभाष्यांतील उल्लेखांवरून दिसून येतें. यांशिवाय सूत्रार्थविवरणरूप अनेक श्लोकवार्तिकेंही उपलब्ध होतीं. शान्तनवानें रचिलेलीं फिट् सूत्रें व शाकटायनप्रणीत म्हणून समजलेलीं उणादि सूत्रेंही उपलब्ध होतीं. हीं उणादि सूत्रें कात्यायनानें रचिलीं असा कांहीं वैयाकरणांचा समज आहे. पञ्चपादात्मक व दशपादात्मक अशीं दोन तऱ्हेचीं उणादि सूत्रें उपलब्ध आहेत; त्यांतील एक शाकटायनानें व दुसरें कात्यायनानें रचिलें असण्याचा सभव आहे. नदिकेश्वराच्या म्हणून प्रसिद्ध असलेल्या कारिका याच कालखंडांत लिहिलेल्या असाव्या महाभाष्यदीपिकेमध्यें भर्तृहरीनें अन्ये, अपरे, केचित् इत्यादि शब्दांनीं कांहीं ग्रंथकारांचा उल्लेख अनेक ठिकाणीं केला आहे. त्यांपैकीं कांहीं वर निर्दिष्ट केलेल्यांपैकीं असणें शक्य आहे; व कांहीं भाष्यावर टीका लिहिणारेही असणें शक्य आहे.

## ३४९. प्राचीन व अर्वाचीन शाकटायन–शब्दानुशासन.

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें पतंजलि व भर्तृहरि यांच्या मध्यंतरींच्या कालांत सुलभ व लोकप्रिय व्याकरण ग्रंथ पुष्कळच झाले; परंतु त्यांतील चन्द्रगोमीनें केलेलें चान्द्र व्याकरण, शर्ववर्म्यानें सुधारून वाढविलेलें कातन्त्र अथवा कालाप व्याकरण, देवनन्दीनें केलेलें जैनेन्द्र व्याकरण, व कात्यायनानें केलेलें पाली व्याकरण हीं आज उपलब्ध आहेत. पाणिनीच्या सूत्रांत शाकटायनाचा उल्लेख मिळतो व शाकटायनकृत शब्दानुशासन नांवाचा हल्लीं एक व्याकरणग्रंथ उपलब्धही आहे. परंतु या ग्रंथाची सूत्ररचना, इतर ग्रथांचे उल्लेख, रूपसिद्धि, इत्यादिकांचें अवलोकन केलें असतां हा ग्रंथ पुष्कळच अर्वाचीन (साधारणपणें दहाव्या अकराव्या शतकांत लिहिलेला) आहे असें दिसून येतें. कांहीं अर्वाचीन ग्रंथांत या शब्दानुशासन ग्रंथकर्त्याचें पाल्यकीर्ति असेंही नांव आढळून येतें. प्रस्तुत उपलब्ध शाकटायन-शब्दानुशासन हा ग्रंथ कितीही नवा असला तरी पूर्वेकडील प्रांतांत शाकटायन नांवाचा एक मोठा वैयाकरण पाणिनिपूर्वकालीं होऊन गेला व त्याचें व्याकरण पाणिनिकालीं उपलब्ध होतें हें निश्चित. कदाचित् उणादिसूत्रकर्ता शाकटायन म्हणून उद्योतकार नागेशभट्टांनीं ज्याचा उल्लेख केला आहे त्यानेंच शब्दानुशासन व उणादि-सूत्रें पाणिनिपूर्वकालीं रचिलीं असावीं. हल्लीं उपलब्ध असलेला शाकटायन-शब्दानुशासन हा ग्रंथ संज्ञाकरण, अनुबंधकल्पना, सूत्ररचना, प्रकरणविभाग इत्यादि बाबतींत कितीही पाणिनीच्या व्याकरणासारखा असला, किंबहुना चान्द्रव्याकरणासारखा त्यावर अधिष्ठित जरी असला, तरी त्यामध्यें प्राचीन शाकटायनकृत व्याकरणांतील बराचसा भाग उद्धृत केलेला आहे असें दिसून येतें; व त्यामुळेंच या पाल्यकीर्तिकृत व्याकरणाला शाकटायन-शब्दानुशासन असें नांव दिलें असावें. भर्तृहरीच्या वेळीं, अर्थात्, जुनें शाकटायन-व्याकरण उपलब्ध असलें पाहिजे.

## ३५०. भर्तृहरीचा काल.

इतके व्याकरणग्रंथ असूनही इतर शास्त्रें व दर्शनें यांचेकडे लोकांचें लक्ष ज्यास्त गेल्यानें व चान्द्र, जैनेन्द्र, कातन्त्र वगैरे सुलभ व्याकरणांचा ज्यास्त प्रसार झाल्यानें पाणिनीय व्याकरणशास्त्र मागें पडलें व त्याचें पुनरुज्जीवन भर्तृहरीनें उत्तम प्रकारें केलें. भर्तृहरीच्या कालाविषयीं बराच मतभेद आहे. इत्सिंग या चिनी प्रवाशानें इ. स. ६९१ च्या सुमारास लिहिलेल्या प्रवासवृत्तांतामध्यें 'भर्तृहरी व धर्मपाल या दोन बौद्ध पंडितांनीं पे-इ-ण नांवाचा ग्रंथ लिहिला व ४० वर्षांपूर्वी भर्तृहरी दिवंगत झाला' असें म्हटलें आहे. त्यावरून इ. स. चें सातवें शतक हा भर्तृहरीचा जीवनसमय मानण्यांत येतो; व त्याला बाह्य पुराव्यांवरून पुष्कळसा आधारही मिळतो. कुमारिलभट्टांनीं श्लोकवार्तिक व तन्त्रवार्तिक या ग्रंथांमध्यें भर्तृहरीच्या मताचें खंडन केलें आहे. त्याप्रमाणें बौद्धपंडित धर्मकीर्ति यानेंही भर्तृहरीच्या मतावर आक्षेप घेतले आहेत. सिद्धसेनदिवाकर नांवाच्या जैन पंडितानें लिहिलेल्या सन्मतितर्कावर द्वादशारनयचक्र नांवाची टीका लिहिणाऱ्या मल्लवादीनें भर्तृहरीचे गुरुजी वसुरात यांचा उल्लेख केला आहे. या वसुरातांनीं वसुबंधूंच्या अभिधर्मकोशावर कडक टीका केली व ती सहन न झाल्यामुळें वसुबंधूनें वसुरातांशीं वादविवाद केला व त्यांना जिंकून बत्तीस अध्याय असलेला त्यांचा व्याकरणाचा ग्रंथ नष्ट केला अशी आख्यायिका आहे. हा वसुरात चंद्रगोमीचा प्रत्यक्ष शिष्य होता अशीही आख्यायिका आहे. चंद्रगोमीनें महाभाष्यकारांच्या 'अरुणद् यवनो माध्यमिकाम्' या महाभाष्यांत दिलेल्या उदाहरणासारखेंच "अरुणद् गुप्तो हूणान्" असें उदाहरण आपल्या ग्रंथांत दिलें आहे. तोरमाण नांवाच्या हूण राजाचा पराभव करणाऱ्या पांचव्या शतकांतील स्कन्दगुप्ताचा हा उल्लेख असावा असें मानण्यांत येतें. या सर्व गोष्टी विचारांत घेतां इ. स. च्या चौथ्या अगर पांचव्या शतकांत सिद्धसेन-दिवाकर, त्यानंतर मल्लवादी, व त्याचे समकालीन पाणिनिसूत्रावर वृत्ति लिहिणारे चंद्रगोमीचे शिष्य वसुरात, त्यानंतर त्यांचे शिष्य म. म. भर्तृहरि, त्यानंतर महाबौद्धपंडित दिङ्नाग, त्यानंतर महामीमांसक कुमारिलभट्ट, त्यानंतर उद्योतकर व त्यानंतर धर्मकीर्ति असा या सर्व पंडितांचा कालक्रम देतां येणें शक्य आहे.

## ३५१. भर्तृहरीच्या कार्याचें महत्त्व.

इत्सिंगच्या उल्लेखांवरून इ. स. ६५१ हा भर्तृहरीचा काल असावा असें दिसत असलें तरी महानैयायिक दिङ्नागानें भर्तृहरीच्या कारिकांपैकीं कांहीं कारिका उद्धृत केल्या असल्यामुळें भर्तृहरी हा दिङ्नागापूर्वी इ. स. च्या सहाव्या शतकांत होऊन गेला असावा असें कांहीं लोक मानतात. शतकत्रयाचा कर्ता जरी राजा भर्तृहरी म्हणून निराळा असला व भट्टिकाव्याचाही कर्ता भट्टि म्हणून संबोधिला जाणारा निराळाच भर्तृहरी असला तरी वाक्यपदीय, वाक्यपदीयवृत्ति, व महाभाष्यदीपिका हे ग्रंथ एकाच व्यक्तीनें लिहिले आहेत यांत संशय नाहीं. पे-इ-ण हा ग्रंथ भर्तृहरी व धर्मपाल या दोघांनीं मिळून लिहिला व भर्तृहरी हा बौद्धमतावलंबी होता असें इत्सिंगनें प्रतिपादन केलें आहे. 'दसपइण्णा' हें नांव ज्याप्रमाणें दशप्रकीर्णक या जैनग्रंथाचें आहे त्याप्रमाणेंच वाक्यपदीयाच्या तिसऱ्या कांडाला प-इ-ण (प्रकीर्ण) हें नांव देण्यांत आलें असलें तरी शब्दब्रह्माचा कंठरवानें पुरस्कार करणारा महामीमांसक भर्तृहरी हा बौद्धधर्मीय नव्हता. गौडपादाचार्यांच्या ग्रंथावर जशी बौद्धदर्शनग्रंथांची व विचारसरणीची छाप दिसून येते तशीच छाप जरी वाक्यपदीय या ग्रंथावर आढळून आली तरी दोन्ही ग्रंथांचे प्रणेते गौडपाद व भर्तृहरी पूर्ण आस्तिक व अद्वैत वेदांताचे पुरस्कर्ते होते यांत शंका नाहीं

भर्तृहरीनें शब्दाद्वैताचें प्रतिपादन केलें आहे; गौडपादानें मायाद्वैताचें प्रतिपादन केलें आहे. न्याय व मीमांसा या शास्त्रांचाही भर्तृहरीनें पूर्ण अभ्यास केला होता असें महाभाष्यप्रदीपिकेंतील उल्लेखांवरून स्पष्ट दिसून येतें. पूर्ववैयाकरणांनीं घातलेल्या पायावर पाणिनीनें मंदिर बांधलें अशी कल्पना केल्यास त्या मंदिराचें सर्वांगपरिपूर्ण काम वार्तिककारांनीं केलें व महाभाष्यकारांनीं त्यांतील सर्व कलाकुसरीचें काम करून त्याला उत्तम सजावट देऊन कळस चढविला; पण मंदिरांत मूर्तिस्थापनेचें काम व्हावयाचें राहिलें व तेथें शब्दब्रह्मरूप मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेचें काम भर्तृहरीनें उत्तम प्रकारें केलें.

## ३५२. भर्तृहरीच्या अर्थग्रंथानें व्याकरणाची परिपूर्ति.

शब्दानुशासन या दृष्टीनें महाभाष्यकारांची कामगिरी सर्वश्रेष्ठ होती व महाभाष्यकारांचें वचन म्हणजे अंतिम निर्णय ( Final word ) असें योग्य रीतीनें मानिलें जात होतें यांत शंका नाहीं. शब्दार्थविवेचनही भाष्यामध्यें जागोजागीं दृष्टोस पडतें; पण भाष्यकारांनीं शब्दार्थविवेचनपर स्वतंत्र ग्रंथ अथवा प्रबंध लिहिला नाहीं. कदाचित् पाणिनीच्या कालींच लिहिलेला व्याडीचा संग्रहग्रंथ भाष्यकारांचे वेळीं प्रचारांत असावा व त्यांत प्रामुख्यानें शब्दार्थाचें विवेचन आल्यामुळें भाष्यकारांनीं त्यावर स्वतंत्र ग्रंथ लिहिला नसावा. भर्तृहरीनें मात्र संग्रहग्रंथ व महाभाष्य यांतील शब्दार्थविवेचनाचा पूर्ण अभ्यास करून त्रिकांडात्मक वाक्यपदीय हा ग्रंथ लिहिला व व्याकरणशास्त्रांतील राहिलेलें काम संपविण्याचें पूर्ण श्रेय घेतलें असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. या बाबतींत पुढील दंतकथा लक्षांत घेण्याजोगी आहेः— एकदां राजदरबारांत व्याकरणशास्त्रामध्यें सर्वोत्तम ग्रंथ म्हणजे एकच व तो व्याकरणमहाभाष्य हाच ( अहो भाष्यम् अहो भाष्यम् ) असे पंडितांचे उद्गार सभेमध्यें हजर असलेल्या भर्तृहरीला सहन झाले नाहींत; व त्यानें उठून ‘ अहो वयम् , अहो वयम् ’ असे उद्गार काढले; त्यावर पंडितांनीं ‘आपण कोण एवढे मोठे आहां’ असा वेचक प्रश्न केल्यावर भर्तृहरीनें ‘मां अदृष्ट्वा गतः स्वर्गं अकृतार्थः पतञ्जलिः’ असे थोडक्यांत मार्मिक उत्तर दिलें. कवींच्या व ग्रंथकर्त्यांच्या कार्याविषयीं अशा दंतकथा पुष्कळ आहेत व त्यांचे सारांशरूप श्लोक लोकांचे स्मरणांत आहेत. महाकवि कालिदासाविषयीं ‘ कविर्दण्डी कविर्दण्डी कविर्दण्डी न संशयः । अहं रण्डे अहं रण्डे त्वमेवाहं न संशयः ॥ ’ हा श्लोक प्रसिद्धच आहे. तसाच महापंडित जगन्नाथांविषयीं ‘गेरणाविति सूत्रार्थं भगवान् वेत्ति पाणिनिः । अहं च भाष्यकृद् वेत्ति वृत्तिकृद् वेत्ति वा न वा ॥ ’ हाही श्लोक ऐकण्यांत येतो. त्याप्रमाणेंच महाविद्वान् नागेशभट्टांविषयीं ‘ अत्र विषये पण्डितनागेशाः प्रमाणम् । कोयं भारवाहो नागेशः । सोऽहमेव । ’ असा संवाद प्रसिद्धच आहे.

## ३५३. वाक्यपदीयाचें प्रथम काण्ड ( ब्रह्मकाण्ड ).

भर्तृहरीनें लिहिलेल्या सर्व ग्रंथांमध्यें वाक्यपदीय हा सर्वांत श्रेष्ठ ग्रंथ समजला जातो. व्याकरणशास्त्राचें शब्दसिद्धि हें अंग विचारांत घेतल्यास व्याकरण-महाभाष्य हा जसा सर्वांत श्रेष्ठ ग्रंथ समजला जातो त्याप्रमाणेंच शब्दार्थविवेचनाचे बाबतींत वाक्यपदीय हा सर्वांत श्रेष्ठ ग्रंथ समजला जाण्यास हरकत नाहीं. अर्थात्, त्यांतील सर्व सिद्धान्त महाभाष्यावर अधिष्ठित व भाष्यवार्तिकवचनांशीं सुसंगत असेच आढळून येतात. या वाक्यपदीयाचीं तीन कांडें हल्लीं उपलब्ध आहेत व तो मूळचाही त्रिकांडात्मकच असावा. शब्दार्थाचा विचार हा वाक्यपदीयाचा प्रतिपाद्य विषय आहे. मीमांसा, सांख्य, योग, जैन, बौद्ध इत्यादि दर्शनांच्या अभ्यासामुळें व्याकरणशास्त्र हें अनुपयुक्त शास्त्र समजलें जाऊं लागलें होतें. भर्तृहरीनें व्याकरणशास्त्राची

उपयुक्तता प्रस्थापित केली इतकेंच नव्हे तर शब्दार्थज्ञान साकल्यानें झाल्यास शब्दब्रह्मस्वरूप प्राप्त होते असें व्याकरणाध्ययनाचें फल सांगून व्याकरणशास्त्राला दर्शनाचें स्वरूप प्राप्त करून दिलें ज्याप्रमाणें निरुक्ताला 'व्याकरणस्य कात्स्न्र्यम्' असें म्हटलें जातें त्याप्रमाणेंच एका दृष्टीनें भर्तृहरीच्या वाक्यपदीयाला 'मीमांसाव्याकरणयोः कात्स्न्र्यम्' असें म्हणतां येईल. या ग्रंथाच्या पहिल्या काडाला 'ब्रह्मकांड' हे नांव दिलें आहे. त्यामध्यें शब्दाच्या स्वरूपाचा साकल्यानें विचार केला आहे. वेदग्रंथाचा योग्य अर्थ समजण्यास मीमांसा, व्याकरण, व निरुक्त हीं तीन उपयुक्त शास्त्रें समजलीं जातात. त्यांपैकीं मीमांसा व व्याकरण यांची शब्दशास्त्रामध्यें गणना होते. वेदप्रतिपादित विधींचें यथासांग अनुष्ठान केल्यामुळें स्वर्गप्राप्ति होते असें वेदग्रंथांत मुख्यत्वानें सांगितलें आहे; त्यावरून वेदवाक्य हेंच परमतत्त्व असा सिद्धान्त निघतो; व 'तत्त्वज्ञान्मोक्षः' या सर्व दर्शनग्रंथांतील सूत्रभूत मूलसिद्धान्तानुसार शब्दतत्त्व-ज्ञानानें मोक्ष कसा मिळूं शकतो हें सांगणें क्रमप्राप्त होतें; व भर्तृहरीनें पहिल्या कांडामध्यें, 'शब्द नित्य आहे व नित्य शब्द हेंच परब्रह्माचें स्वरूप आहे' असा सिद्धान्त मांडून मोक्ष-प्राप्तीचा उपाय थोडक्यांत सांगितला आहे. या ब्रह्मकांड नांवानें प्रसिद्ध असलेल्या प्रथम कांडामध्यें व्याकरणाचें महत्त्व प्रथमतः सांगितल्यानंतर शब्दाचें अनादिनित्यत्व सिद्ध केलें आहे. त्यानंतर प्रमाणांचें स्वरूप सांगून आगमप्रमाण हेंच मुख्य प्रमाण घ्यावें व त्याला विरुद्ध नसल्यास इतर प्रमाणेंही घ्यावीं असें सांगितलें आहे. त्यानंतर स्फोटाच्या स्वरूपाचें वर्णन करून तो शब्दानें म्हणजे ध्वनीनें कसा अभिव्यक्त होतो तें सांगितलें आहे. महा-भाष्याच्या पस्पशाह्निका प्रमाणें ब्रह्मकांड हें वाक्यपदीयाची एका दृष्टीनें प्रस्तावनाच आहे असें म्हणतां येईल.

### ३५४. वाक्यपदीयाचें द्वितीय कांड ( वाक्यकांड ).

वाक्य–कांड नांवानें प्रसिद्ध असलेल्या दुसऱ्या कांडामध्यें वाक्याच्या निरनिराळ्या प्रकारांचें वर्णन करून वाक्याचें अखंड-स्फोटात्मक स्वरूप भर्तृहरीनें सिद्ध केलें आहे. शब्द हा पूर्ण अनवयव आहे असें सांगून पदस्फोट, वर्णस्फोट वगैरे स्फोट केवळ लाक्षणिक स्वरूपाचे आहेत असें त्यानें सांगितलें आहे. त्यानंतर शब्दार्थाचें विवेचनास आरंभ करून उपसर्ग, निपात, अव्ययें इत्यादि शब्दांपासून अर्थाचें ज्ञान कसें होतें तें सांगितलें आहे; व पदवादाचें खंडन करून वाक्यस्फोट प्रस्थापित केला आहे. एकामागुन एक अशा क्रमानें वर्णांचें व पदांचें उच्चारण जरी होत असलें व शेवटचा वर्ण उच्चारल्याबरोबर जरी अर्थ मनांत येत असला तरी पदांना स्वतंत्र अर्थ असतो व पदसमूहाचा जो अर्थ तोच वाक्यार्थ हें मीमांसक-मत भर्तृहरीला मान्य नाहीं वाक्याचा पूर्ण उच्चार झाल्याबरोबर पदसमूहाच्या अर्थापेक्षां निराळा एक संघटितार्थ प्रतिभाशक्तीमुळें मनांत उद्भूत होतो. या संघटितार्थाला भर्तृहरीनें 'वाक्य-स्फोट' हें नांव दिलें आहे. सोईकरितां वर्णस्फोट, पदस्फोट, इत्यादि आठ प्रकारचे स्फोट वैयाकरण मानीत असले व त्या प्रकारांचें वैशिष्ट्य जरी दाखवीत असले तरी ते सर्व गौण स्फोटच आहेत; परमार्थस्वरूपाचा स्फोट एकच व तो अखंडवाक्यस्फोट आहे. वेदामध्यें व लोकामध्यें वाक्यें जरी अनेक असलीं व त्यामुळें अखंडवाक्यस्फोट आपाततः जरी अनेक दिसले तरी वास्तविक पहातां स्फोट हा एकच आहे. हाच स्फोट दिक्, काल, व्यक्ति इत्यादि उपाधींमुळें निरनिराळा भासतो; व लोकामध्यें अनुभवही तसाच येतो. 'गां आनय' हे शब्द कानीं पडल्याबरोबर त्या शब्दांशीं नित्यसंबद्ध असा बाह्यस्फोट स्वरूपाचा एक अर्थ मनांत

येतो. त्यानंतर लागलींच प्रकरणानुरूप विशिष्ट गाईचें विशिष्ट ठिकाणाहून आणणें विवक्षित आहे अशा स्वरूपाचा जो एक संघटितार्थ मनांत उद्भूत होतो त्याला आंतरस्फोट म्हणतात. हा आंतरस्फोटही कर्णेंद्रियांना अग्राह्य अशा वर्णांशीं संबद्ध असतो. 'गां आनय,' 'गाय आण,' 'Bring the cow' या तीन वाक्यांतील वर्णांची आनुपूर्वी व बाह्यस्फोट जरी निराळे असले तरी आंतरस्फोट एकच आहे व हा आन्तरस्फोट वर्णांशी असंबद्ध केवल मनानें ग्रहण केला जाणारा असा आहे. अर्थात्, हा स्फोट दिक् काल इत्यादि उपाधींनीं युक्त आहे. याचे पलीकडे उपाधिरहित शब्दब्रह्मरूप स्फोट आहे. याप्रमाणें स्फोटस्वरूपाचें प्रतिपादन केल्यानंतर भर्तृहरीनें उपसर्ग व निपात यांच्या अर्थाचें विवेचन करून वाक्यकांड पुरें केलें आहे. पाणिनीनें जरी शब्दांचे सुबन्त व तिङन्त असे दोनच प्रकार केले असले तरी पूर्व वैयाकरणांनीं अर्थाकडे लक्ष देऊन केलेले नाम, आख्यात, उपसर्ग व निपात हे चार प्रकार वैयाकरणांना मान्य होते. त्यांपैकीं 'भावप्रधानमाख्यातम्' व 'सत्त्वप्रधानानि नामानि' हीं लक्षणें सर्वमान्य असल्यामुळें त्यांचें ज्यास्त विवरण न करतां प्रत्यय, कर्मप्रवचनीय, उपसर्ग, व निपात यांना कशा प्रकारचा अर्थ अस्तो व त्याचें द्योतकत्वानें कसें प्रतिपादन केलें जातें याचा भर्तृहरीनें विचार केला आहे.

## ३५५. वाक्यपदीयाचें तृतीय कांड ( प्रकीर्णकांड ).

वाक्यपदीयाच्या तिसऱ्या कांडांत अनेक प्रमुख व्याकरणविषयांचें विवेचन केलें आहे. शब्दसिद्धि हें ध्येय ठेऊन लिहिलेल्या पाणिनिसूत्रांमध्यें प्रकृतिप्रत्ययविभागाकडे लक्ष देऊन रूपसिद्धि केली आहे व प्रत्यय सांगतांना दरेक ठिकाणीं प्रत्ययांचे अर्थ सांगितले आहेत. प्रकृती अनंत असल्यामुळें त्यांचे अर्थ सांगतां आले नसले तरी क्रियावाचक धातुस्वरूप प्रकृतींची संख्या फार मोठी नसल्यामुळें धातुपाठामध्यें सर्व धातूंचे अर्थ सांगून पाणिनीनें परिगणन केलें आहे. त्याप्रमाणेंच अव्ययें, निपात, सर्वनामें यांचेंही प्रसंगोपात्त परिगणन केलें आहे प्रातिपदिकांचें परिगणन अशक्य असल्यामुळें त्यानें तें कलें नाहीं; तरी पण ज्या वेळीं विशिष्ट अर्थीं असलेल्या शब्दांहूनच विशिष्ट प्रत्यय होत असेल अशा सर्व ठिकाणीं प्रकृतींचेही अर्थ सांगितले आहेत. आतां या अर्थाचे किती प्रकार आहेत, ते कशा रीतीनें प्रतिपादित होतात, तसेंच अष्टाध्यायीच्या निरनिराळ्या सूत्रांमध्यें ते कशा रीतीनें समजावे हें विवेचन भर्तृहरीनें तिसऱ्या कांडामध्यें करून पाणिनिसूत्रांना, किंबहुना, त्यावरील भाष्यग्रंथालाही एक प्रकारची पुरवणीच जोडली आहे. कांहीं ठिकाणीं पाणिनिसूत्रांचाही निर्देश केला आहे; तर कांहीं ठिकाणीं प्रकरणांचा निर्देश केला आहे. या बाबतींत भर्तृहरीची कामगिरी एक प्रकारें जैनसूत्रग्रंथांवर लिहिलेल्या निर्युक्तिकारांच्या कामगिरीप्रमाणें आहे असें म्हणतां येईल. भर्तृहरीनें पदार्थविवेचनरूप तिसऱ्या कांडाचे समुद्देश नांवाचे चौदा विभाग केले आहेत व अर्थाकडे पाहिल्यास या तिसऱ्या कांडाला एक प्रकारचें पद्धतशीर शब्दार्थव्याकरण म्हणूनही संबोधतां येणें शक्य आहे.

## ३५६. तृतीय कांडांतील समुद्देशांना आधार.

पाणिनिसूत्राच्या पहिल्या पांच अध्यायांतील अर्थात्मक विचार वाक्यपदीयाच्या तिसऱ्या कांडामध्यें आला आहे; सहाव्या, सातव्या व आठव्या अध्यायामध्यें साधारणत: अंगांना व प्रत्ययांना होणारीं कार्यें व त्यांचें पौर्वापर्य यांचेंच विवेचन असल्यामुळें

त्यांत फारसा अर्थविचार नाहीं. भर्तृहरीनें कृद्वृत्तीविषयीं विचार केला नाहीं. कदाचित् धातूला निरनिराळे प्रत्यय लागून नामसिद्धि हें कृद्वृत्तीचें स्वरूप असल्यामुळें कृद्वृत्तीविषयीं अर्थप्रतिपादनदृष्ट्या विवेचन करण्यासारखें कांहीं नाहीं हेंही कृद्वृत्ती वगळली जाण्याचें कारण असावें. तिसऱ्या कांडांतील चौदा समुद्देशांपैकीं जातिसमुद्देश, द्रव्यसमुद्देश, संबंधसमुद्देश, हे व्याडीच्या संग्रहग्रंथावर आधारलेले असावे. गुणसमुद्देश, क्रियासमुद्देश, साधनसमुद्देश दिक्समुद्देश व कालसमुद्देश हे त्या बाबतींतील वार्तिकवचनें व त्यांचें भाष्यकारांनीं केलेलें व्याख्यान यांवर आधारलेले दिसतात. दिक्समुद्देश व कालसमुद्देश यांना संग्रहग्रंथही आधार असण्याचा संभव आहे; कदाचित् भर्तृहरीनें आपल्या वेळीं बीजरूपानें प्रसृत असलेल्या स्फोटवादाचें प्रतिपादन करणाऱ्या कांहीं ग्रंथांवर ते आधारलेले असावे. कालसमुद्देशाला भाष्यकारानीं केलेलें विवेचनही सहायभूत झालें असावें. पुरुषसमुद्देश, संख्यासमुद्देश, उपग्रह-समुद्देश व लिंगसमुद्देश हे पाणिनीचीं पुरुषसंज्ञा, संख्यासंज्ञा, व परस्मैपद आत्मनेपद संज्ञा सांगणारीं सूत्रें व 'स्त्रियाम्' (पा. सू. ४।१।३) हें सूत्र यांवर व यांवरील भाष्यवार्तिक-प्रतिपादनावर आधारलेले असावे. चौदावा वृत्तिसमुद्देश पाणिनीच्या ताद्धित प्रकरणांतील विशिष्ट सूत्रांवर व भाष्यविवेचनावर आधारलेला आहे. कांहीं विशिष्ट ठिकाणीं पाणिनिसूत्रांचा स्पष्ट उल्लेखच आहे. 'विशेषणानां च अजातेः', 'अतिशायने०'. 'स्त्रियाम्,' 'उपमितं व्याघ्रा-दिभिः०'. "समासाच्च०' "प्रकारवचने थाल्" आणि " तत्र तस्येव " या सूत्रांवर भर्तृहरीनें केलेलें विवेचन म्हणजे एक प्रकारचें विवरणरूप व्याख्यानच आहे असें स्पष्ट प्रत्ययास येतें. हें विवेचन म्हणजे पाणिनिसूत्रांवर एक विशिष्ट प्रकारची वृत्तीच आहे असें म्हणतां येईल. कदाचित् या तऱ्हेची गद्यात्मक वृत्ति त्यानें विवक्षित सूत्रांवरच केली असेल व ती संपूर्ण नसल्याकारणानें तिला भागवृत्ति असें नांव पडलें असेल; व त्या भागवृत्तीवरच कांहीं शतकां-नंतर विमलमतीनें दुसरी भागवृत्ती रचिली असेल. तिसऱ्या कांडाच्या पहिल्या दोन समुद्देशां-मध्यें भर्तृहरीनें जात्यभिधानपक्ष व व्यक्त्यभिज्ञानपक्ष यांविषयीं विचार केला आहे. तिसऱ्या समुद्देशामध्यें शब्दार्थसंबंधाचें विवेचन केल्यानंतर 'तत्' यानें ज्याचें प्रतिपादन केलें जातें तें द्रव्य अशी द्रव्य शब्दाची व्याख्या देऊन प्रातिपदिकार्थ व धात्वर्थ यांविषयीं विवेचन केलें आहे. चौथ्या व पांचव्या समुद्देशांमध्यें द्रव्य व गुण यांचा विचार केला आहे व त्यानंतर द्रव्यस्वरूप-प्रतिपादनाच्या कामीं उपयुक्त अशा दिक्, साधन, क्रिया, व काल यांचें सहा सात आठ व नऊ या समुद्देशांमध्यें विवेचन केलें आहे. यानंतर १० ते १३ या समुद्देशांमध्यें क्रियापदांचीं पुरुष, संख्या, व पदें व नामांचें लिंग व संख्या यांचा विचार करून शेवटीं चौदाव्या वृत्ति-समुद्देशामध्यें वृत्तिविषयक विवेचन करून त्यानें आपला वाक्यपदीय ग्रंथ पुरा केला आहे.

## ३५७. वाक्यपदीयावर टीकाग्रंथ.

वाक्यपदीयांतील अनेक उतारे नंतरच्या वैयाकरणांनीं घेतलेले आढळतात. कैयटभट्टांनीं तर आपल्या विधानाच्या समर्थनार्थ भर्तृहरीच्या वाक्यपदीयांतील श्लोक अनेक ठिकाणीं दिले आहेत; इतकेंच नव्हे तर महाभाष्यावरील आपला 'प्रदीप' ग्रंथ लिहिण्याचे कामीं 'नदी ओलांडून जाण्यासाठीं जसा पुलाचा उपयोग होतो तसा भाष्याब्धि तरून जाण्याच्या कामीं भर्तृहरीनें बांधलेल्या सेतूचा मला उपयोग झाला' या अर्थाचें 'तथापि हरिबद्धेन सारेण ग्रन्थसेतुना' या पद्यार्धांत विधान करून भर्तृहरीच्या ग्रंथाचा आधार घेतल्याबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त केली आहे. " विस्तरेण तु भर्तृहरिणा० ", " यथोक्तं हरिणा ग्रहणाग्रहणे० ", " निपातानां च

द्योतकत्वं० '' इत्यादि अनेक ठिकाणीं त्यानें भर्तृहरीचा उल्लेख केला आहे. मम्मटानें वाक्यपदीयांतील उतारा म्हणून 'नहि गौः स्वरूपेण गौः०' हें गद्यवाक्य उद्धृत केलें आहे; पण तें वाक्यपदीयांत सांपडत नाहीं. भर्तृहरीनें वाक्यपदीयावर स्वतः वृत्ति लिहिली आहे; तिच्यामध्यें हें वाक्य असण्याचा संभव आहे. भर्तृहरीच्या स्वोपज्ञ वृत्तीशिवाय वाक्यपदीयावर पुञ्जराज यांनीं लिहिलेली 'प्रकाश' नांवाची वृत्ति व हेलाराज यांनीं लिहिलेली टीका या प्रसिद्ध आहेत. अर्थगांभीर्ययुक्त व सूत्रपद्धतीनें लिहिलेल्या कारिकांचें अर्थज्ञान सुलभ होण्यास पुञ्जराजांची टीका फार उपयुक्त आहे. या टीकेमध्यें कुन्तक, भामह, वामन, हेमचंद्र इत्यादि सुप्रसिद्ध संस्कृत कवींचीं वचनें उद्धृत केलीं आहेत. कुमारिलभट्टांच्या श्लोकवार्तिकांतील कांहीं श्लोकही पुञ्जराज यांनीं उद्धृत केले आहेत. पहिल्या कांडावर शब्दप्रभा नांवाची एक वृत्ति आहे; पण ती अप्रकाशित आहे. यांशिवाय फुल्लराज व वृषभदेव यांनीही वाक्यपदीयावर टीका लिहिल्या आहेत व नुकतीच सूर्यनारायण शुक्ल यांनीं भावप्रदीप नांवाची ब्रह्मकांडावर वृत्ति लिहिली आहे.

### ३५८. महाभाष्यदीपिका.

भर्तृहरीनें महाभाष्यावर महाभाष्यदीपिका नांवाची वृत्ति लिहिली आहे. ही वृत्ती अद्याप मुद्रित नाहीं; हस्तलिखित प्रतीही एक दोनच उपलब्ध आहेत; व त्यांमध्येंही पहिलें पृष्ठ नाहींसें झालें आहे; व ग्रंथही पहिल्या पादाच्या पंचावनाव्या सूत्रापर्यंतच सांपडतो. महाभाष्यदीपिकेंतील सुंदर उतारा 'सोऽयं पुष्पराशिः फलितः०' नागेशांनीं आपल्या उद्द्योतांत दिला आहे व तो दुसऱ्या आन्हिकाच्या शेवटीं लेखकाजवळ असलेल्या दीपिकेच्या हस्तलिखित प्रतीमध्यें सांपडतो. लेखी प्रती अत्यंत अशुद्ध आहेत व ग्रंथाचें मुद्रण करणें दरेक पृष्ठावर बऱ्याच ठिकाणीं शुद्धी केल्याशिवाय करणें अशक्य आहे; तरी पण संशोधन करून ही टीका मुद्रित करण्याचा लेखकाचा मानस आहे. ही टीका महाभाष्यावरील उपलब्ध असलेल्या टीकांमध्यें जुन्यांत जुनी आहे. महाभाष्याची लेखनशैली कितीही प्रसादयुक्त असली तरी, व कैयटानें दरेक संशयस्थलीं भाष्यकारांचा अभिप्राय जरी योग्य रीतीनें दाखविला असला तरी कांहीं ठिकाणीं भाष्याच्या विषयगांभीर्यामुळें कैयटानें दाखवलेलाच भाष्यकारांचा अभिप्राय आहे काय असा संशय राहतो व त्या ठिकाणीं भर्तृहरीच्या दीपिकेची खरी उपयुक्तता आहे. ही टीका जरी विद्वत्तापूर्ण असली तरी भर्तृहरीनें या टीकेंत भाष्यांतील बहुतेक वाक्यांचें थोडक्यांत स्पष्टीकरण केलें आहे. कांहीं थोड्याच ठिकाणीं विस्तृत स्पष्टीकरण आढळतें. दुर्दैवानें ही टीका केवळ सात आन्हिकांपर्यंतच मिळते. या महाभाष्यदीपिकेंत भर्तृहरीनें ''केचिन्मन्यन्ते, अन्ये मन्यन्ते, अन्ये आहुः, अपरे आहुः'' अशा रीतीनें जागोजागीं नामनिर्देश न करतां इतर वैयाकरणांनीं दिलेल्या स्पष्टीकरणांचा उल्लेख केला आहे. त्याप्रमाणेंच सांख्य, मीमांसा, वैद्यक इत्यादि निरनिराळ्या शास्त्रांतील मतांचा उल्लेख स्पष्टीकरणाकरितां केला आहे. व्याडि, वाक्यकार, वाजप्यायन, चरक, याज्ञवल्कीय या नांवांनीं निरनिराळ्या ग्रंथकारांचा उल्लेख केला आहे. त्याप्रमाणेंच तैत्तिरीय भारद्वाजीय इत्यादि शाखांचा व निरुक्त, आश्वलायनसूत्र, मैत्रायणीयकल्प, बह्वृचसूत्रभाष्य इत्यादि ग्रंथांचाही उल्लेख केला आहे. महाभाष्यदीपिका व वाक्यपदीय यांमध्यें बऱ्याच ठिकाणीं विचारसाम्य दिसून येतें. कैयटानें वाक्यपदीय व महाभाष्यदीपिका या दोहींचाही उपयोग वेळोवेळीं केला आहे. वर निर्दिष्ट केलेला नागेशांनीं दिलेला उतारा दीपिकेंत मिळतो यावरून ही महाभाष्यदीपिका भर्तृहरीचीच कृति आहे हें निश्चितपणें म्हणतां येतें.

### ३५९. भागवृत्ति ग्रंथाच्या कर्त्याविषयीं विचार.

वाक्यपदीय, वाक्यपदीयटीका व महाभाष्यदीपिका यांशिवाय भागवृत्ति या नांवाचा पाणिनिसूत्रांवरील वृत्तिग्रंथ भर्तृहरीनें लिहिला आहे असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. या भागवृत्तीचा उल्लेख पुरुषोत्तमदेवानें भाषावृत्तीमध्यें अनेक ठिकाणीं केला आहे. तसेंच कैयट, सीरदेव, माधव, हरदत्त, उज्ज्वलदत्त, शरणदेव, भट्टोजी दीक्षित यांच्या ग्रंथांतही भागवृत्तीचे उल्लेख मिळतात. या प्रमुख प्रमुख वैयाकरणांनीं केलेल्या या उल्लेखांवरून भागवृत्ति ही भर्तृहरीची कृति आहे असें मानावेंसें वाटतें; परंतु याउलट भागवृत्तीमध्यें काशिकेचा उल्लेख मिळतो. भागवृत्तीचा कर्ता भर्तृहरी नसून विमलमति नांवाचा होता असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. वरील सर्व विवेचनावरून फार तर एवढें म्हणतां येईल कीं भर्तृहरीनें पाणिनिसूत्रावर एक वृत्ति लिहिली असावी. ती दरेक सूत्रावर न लिहितां विशिष्ट व महत्त्वाच्या सूत्रांवरच त्यानें लिहिली असल्यामुळें तिला भागवृत्ति हें नांव पडलें असावें व विमलमति वगैरे विद्वानांनीं तिच्यांत भर घालून तिचें संस्करण केलें असावें. या भागवृत्तीसंबंधानें "काशिकाभागवृत्त्योश्चेत् सिद्धान्तं बोद्धुमस्तु धीः । तदा विचिन्त्यतां भ्रातः भाषावृत्तिरियं मम ॥" हा श्लोक पुरुषोत्तमदेवानें आपल्या भाषावृत्तीच्या शेवटीं दिला आहे. वरील श्लोकावरून काशिका व भागवृत्ति या एके काळीं सारख्या प्रमाणभूत समजल्या जात होत्या; व त्यांतील संशयस्थलांचें व्याख्यान पुरुषोत्तम देवानें भाषावृत्तींत केलें आहे असें दिसून येतें.

### ३६०. शब्दज्ञानाचें मोक्षसाधनत्व.

भर्तृहरीनें शब्दनित्यत्वाचें प्रतिपादन करून व स्फोटरूपी नित्य शब्दाचें परब्रह्मस्वरूप सांगून व्याकरणशास्त्राला दर्शनाचें स्वरूप दिलें आहे हें मागें सांगितलेंच आहे. या स्फोटवादाच्या उत्पत्तीविषयीं विचार केल्यास त्याचें मूळ उपनिषद् ग्रंथांमध्यें व भगवद्गीतेमध्यें आढळून येतें. 'ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत' 'ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्' इत्यादि वाक्यें उद्गीथोपासनेनें मोक्षाचें प्रतिपादन कण्ठरवानें करतात. ओम् या अक्षरामध्यें सर्व अखंड परब्रह्म भरलें आहे व भोंवतालींच्या पदार्थजाताच्या विविध हालचालींकडून पूर्णपणें मन काढून बेंबीच्या देठापासून जर प्रणवाचा उद्घोष पुरुष करूं लागला तर सर्व पिंडब्रह्मांडाच्या ऐक्याचें त्याला एक प्रकारचें संवेदन होतें; व मुक्तीला मुख्य कारणीभूत जी मनाची निश्चल सर्वाद्वैतभावना ती प्रणवाद्वैतसाक्षात्कारानें घडून आल्यामुळें उद्गीथोपासना ही मोक्षसाधन आहे असें 'ओमित्येतदक्षरम्०' तसेंच 'ओमित्येकाक्षरम्०' या ग्रंथांचें तात्पर्य आहे. व्याकरणाच्या शिक्षाग्रंथांमध्यें शब्दोत्पत्तीचें वर्णन केलें आहे व परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी असे वाणीचे चार प्रकार वर्णिले आहेत. त्यांपैकीं फक्त वैखरी वाणीचें बाह्येन्द्रियांनीं ज्ञान होतें; बाकीच्यांचें फक्त आंतरसंवेदनच होतें हें 'चत्वारि वाक्परिमिता पदानि०' या श्लोकावरून स्पष्ट होतें.

### ३६१. वाणीचे परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी हे चार प्रकार.

मुखांतील निरनिराळ्या स्थानांतून वायूच्या प्रेरणेनें कंठांतील विशुद्ध चक्रापासून बाह्य शब्द उत्पन्न होतो व तो पदसमूहात्मक असतांना त्यापासून अर्थज्ञान होतें ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. परंतु कंठापासून मुखापर्यंत असलेल्या निरनिराळ्या स्थानांमध्यें ही बाह्य प्रेरणा होण्याचें पूर्वी हृदयामध्यें व नाभिस्थानामध्यें आन्तरप्रयत्नही होत असतो व ह्या ठिकाणींही कर्णेन्द्रियाला अग्राह्य असा विशिष्ट शब्दही उत्पन्न होत असतो. त्यांपैकीं वैखरी वाणी नांवाच्या बाह्य शब्दाच्या निकट पूर्वीचा मध्यमा वाणी म्हणून संबोधिलेला अस्पष्ट शब्द हृदयामधील

अनाहत चक्रापासून उद्गम पावतो व कर्णेन्द्रियानें ऐकल्या जाणाऱ्या शब्दासारखेंच वर्णानुपूर्वीसहित शब्दसमूहात्मक असें त्याचें स्वरूप असतें. या मध्यमा वाणी नांवाच्या शब्दाच्या पलीकडे तो शब्द उत्पन्न होण्यास साधनभूत प्रेरणा उत्पन्न होत असते; या प्रेरणेला बहुतांशीं नियोग अथवा विधि यांच्यासारखें अर्थस्वरूप असतें. तरी पण ती शब्दाशीं निकट संबद्ध असल्यामुळें व वायूची प्रेरणा करून आन्तर शब्द व त्यानंतर बाह्य शब्द उत्पन्न करण्याचें ती साधन असल्यामुळें तिला वाक् असें नांव दिलें आहे. या वाणीला पश्यन्ती वाक् असें म्हणतात; व तिचें स्वरूप अखंडवाक्यस्फोटात्मक असतें. याही पश्यन्ती वाणीच्या पलीकडे मूलभूत प्रेरणाशक्ती असते; ती प्राण्याची प्राणभूत शक्तीच असते व तिचें स्थान मूलाधार चक्रांतील कुण्डलिनी हें आहे. निरनिराळ्या बाह्य शब्दांचें वैखरी, मध्यमा, पश्यन्ती व परा या क्रमानें ज्ञान होतां होतां सर्व पिंडब्रह्मांडीं भरलेल्या नादब्रह्मरूप शब्दाचें परा वाणीनें अखंड ज्ञान होणें हाच स्फोटब्रह्मसाक्षात्कार व मोक्षाचें परम साधन आहे असें शब्दब्रह्मवादाचें थोडक्यांत स्वरूप आहे.

## ३६२. भर्तृहरीनें प्रतिपादन केलेलें तत्त्वज्ञान.

हल्लीं रेडियोचे जसे विक्षेप ( Broadcasting ) व ग्रहण ( Receiving ) असे दोन प्रकार दृष्टीस पडतात व ते जसे जरूर असतात व त्यांमध्यें शब्दापासून उत्पन्न होणारी व पुनः शब्द तयार करणारी अशी एक प्रकारची शक्ती असते त्याप्रमाणेंच शब्दोत्पत्तीविषयीं विचार केल्यास परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी या चार प्रकारच्या वाणी क्रमानें उत्पन्न होतात व शेवटचीचेंच कर्णेन्द्रियानें ज्ञान होतें. शब्दज्ञानाचा विचार केल्यास वैखरी, मध्यमा, पश्यन्ती व परा या क्रमानें शब्दज्ञान होतें व तें होतांना बाह्य स्फोट व आंतर स्फोट यांची अभिव्यक्ति या वैखरी व मध्यमा वाणींनीं होत असते. पिंडब्रह्मांडामध्यें भरलेल्या परा वाणी स्वरूपाच्या शक्तीचें काल, दिक्, कारक, इत्यादि निरनिराळ्या उपाधींनीं नियंत्रण झालें आहे व त्यामुळेंच जगांतील वस्तूंचें निरानिराळ्या प्रकारांनीं ज्ञान होतें; व त्यांचें निरनिराळ्या प्रकारचें स्वरूप दृष्टीस पडतें. नित्यशब्दरूपीं परब्रह्मच शब्दार्थरूपानें परिणाम पावतें व त्यापासून सर्व जगाची उत्पत्ति होते व त्यांतच सर्व जगाचा लय होतो. " शब्दस्य परिणामोऽयं इत्याम्नायविदो विदुः । छन्दोभ्य एव प्रथममेतद् विश्वं व्यवर्तत " (वा. प. १।१२१ ) हा भर्तृहरीचा श्लोक व त्यावरील टीकेमध्यें उदधृत केलेलें ' वागेव विश्वा भुवनानि जज्ञे वाच इत् सर्वममृतं यच्च मर्त्यम् ' हें वाक्य यांवरून ' शब्दब्रह्मापासून हें जग उत्पन्न होतें व त्यांतच विलीन होतें ' हें भर्तृहरीचें मत स्पष्ट दिसून येतें. वरील श्लोकांत परिणाम व विवर्त हे दोन्ही शब्द एकाच अर्थी वापरले आहेत हें लक्षांत घेण्यासारखें आहे. या शब्दब्रह्मरूपीं परमार्थतत्वाची ' काल ' या स्वरूपाची शक्ति अनेक अवांतर शक्तींनीं युक्त आहे. कालशक्ति ही सर्वांत श्रेष्ठ आहे व तिच्याच नियंत्रणाखालीं सर्व शक्ती राहतात. ' काल ' शक्तीच्या प्रतिबन्ध व अभ्यनुज्ञा या साह्यभूत शक्तींनीं शब्दब्रह्म हें सृष्टीच्या आरंभीं जगरूपीं परिणाम पावतें व प्रलयकालीं कालशक्ति ही शब्दब्रह्मांत लीन झाल्यामुळें सर्व जगाचाही शब्दब्रह्मांत लय होतो. शब्दब्रह्म हें स्फोटरूप आहे व सर्व जग हें त्याचा परिणाम अथवा विवर्त आहे हें भर्तृहरीच्या या स्फोटसिद्धान्ताचें थोडक्यांत स्वरूप आहे. ' स्फुटयते अर्थः अस्मात् स्फोटः ' अशी स्फोट शब्दाची व्याख्या टीकाकारांनीं दिली आहे. वर थोडक्यांत वर्णन केलेल्या भर्तृहरीच्या सिद्धान्ताला स्फोटवाद म्हणण्यांत येतें; व त्यानें प्रतिपादन केलेल्या दर्शनाला शब्दाद्वैत म्हणण्यांत येतें.

---

## काशिकाकालखंड ( इ. स. ६५०–१००० )

### ३६३. काशिकाकालखंडांतील प्रमुख वैयाकरण.

भर्तृहरीच्या कालखंडांत भर्तृहरीनें स्वतः व्याकरणशास्त्रावर वाक्यपदीयासारखा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला. चान्द्र, कातन्त्र व जैनेन्द्र हींही व्याकरणें त्या कालांत लिहिलीं गेलीं व त्यांशिवाय शाकटायन व ऐन्द्र व्याकरण हीं प्राचीन व्याकरणें त्या कालांत अस्तित्वांत होतीं. भर्तृहरी-नंतरच्या काशिकाकालखंडांत व्याकरणशास्त्रावर स्वतंत्र असे ग्रंथ लिहिले गेले नाहींत; पण पाणिनीच्या सूत्रपाठावर काशिकेसारखी उत्कृष्ट वृत्ति लिहिली गेली; व त्याप्रमाणेंच इतरही व्याकरणग्रंथांवर महत्त्वाचे वृत्तिग्रंथ लिहिले गेले. इ स. ६५० ते १००० पर्यंतच्या या काशिकाकालखंडाला 'वृत्तिकालखंड' असें म्हटलें असतांनाही चालेल. काशिका हा व्याकरण शास्त्रांतील मान्य ग्रंथ जयादित्य व वामन या दोघांनीं मिळून लिहिला असें समजण्यांत येतें. या ग्रंथाचा जयादित्यानें कोणता भाग लिहिला व वामनानें कोणता भाग लिहिला याविषयीं विद्वानांमध्यें मतभेद असले तरी साधारणपणें पहिले पांच अध्याय जयादित्यानें व पुढील तीन वामनानें लिहिले असें समजलें जातें. पुरुषोत्तमदेव, सीरदेव, हरदत्त वगैरे नंतरच्या ग्रंथकारांनीं मात्र काशिकावचनें उद्धृत केलीं असतांना जयादित्याचा एकट्याचाच उल्लेख पुष्कळ ठिकाणीं केला आहे. भाषावृत्तीमध्यें पुरुषोत्तम देवानें काशिका व भागवृत्ति यांमधील मतभेद दाखविले आहेत व ते दाखवितांना काशिकेचा वामनवृत्ति म्हणून स्पष्ट उल्लेख केला आहे.

'बोपदेवमहाग्राहग्रस्तो वामनदिग्गजः ।
कीर्तेरेव प्रसङ्गेन माधवेन विमोचितः'

या वैयाकरणकुलामध्यें प्रसिद्ध असलेल्या श्लोकांत काशिकाकारांचा वामन या नांवानें उल्लेख केलेला स्पष्टच आहे. हा काशिकाकार वामन काव्यालंकारसूत्रवृत्ति वगैरे ग्रंथांचा कर्ता जो वामन त्यापूर्वीचा व त्याहून निराळा हें स्पष्टच आहे. हेमचन्द्र, हरिभद्र व मल्लवादी यांनीं उल्लेख केलेला 'विश्रान्त-विद्याधर' या ग्रंथाचा कर्ता वामनही निराळाच समजला जातो.

### ३६४. काशिकावृत्ति.

इत्सिंग यानें आपल्या प्रवासवर्णनांत भर्तृहरीनंतर लवकरच काशिकावृत्ति लिहिणारा जयादित्य हा इ. स. ६६१ त निवर्तला असें लिहिलें आहे; व अंतर्गत व बाह्य पुराव्यावरून काशिकारचनेचा काल साधारणपणें इ. स. ६५० ( सातव्या शतकाचा मध्य ) मानण्यास कांहीं हरकत नाहीं. काशी नगरीमध्यें हा ग्रंथ लिहिला गेल्यामुळें याला 'काशिका' हें नांव दिलें गेलें असा विद्वानांचा समज आहे. या ग्रंथामध्यें पाणिनिसूत्रांतील कांहीं थोड्या सूत्रांचा पाठ जरा बदलून लिहिला आहे; तर कांहीं थोडीं सूत्रें नवीनच दिलीं आहेत; व तीं चान्द्र व्याकरणांत सांपडणारीं आहेत. काशिकावृत्तीमध्यें दरेक पाणिनिसूत्राचें थोडक्यांत स्पष्टीकरण दिलें आहे व उदाहरणें भाष्यामधून किंवा पूर्वी लिहिलेल्या वृत्तींवरून बहुशः उद्धृत केलीं आहेत. भाषा सुगम आहे व विवेचनही पाण्डित्यपूर्ण कठिण व पूर्वोत्तरपक्षात्मक रीतीनें केलेलें नसल्या-मुळें पाणिनीय व्याकरणशास्त्रामध्यें प्रवेश मिळण्यास काशिका हा ग्रंथ फारच उपयुक्त आहे. काशिकाकार हा बौद्ध होता या समजुतीनें म्हणा, किंवा चान्द्र व्याकरणांतून त्यानें कांहीं सूत्रें घेतलीं आहेत म्हणून म्हणा, किंवा कांहीं ठिकाणीं भाष्यकारांच्या वचनाविरुद्ध व कांहीं ठिकाणीं

त्यांचेविषयीं पूर्णादरयुक्त लिखाण केलें नसल्यामुळें म्हणा, जरीं काशिकावृत्ति ही पुष्कळ उपयुक्त असली तरी त्या वृत्तीबद्दल वैयाकरणकुलामध्यें फारशीं आदरयुक्त भावना होती असें दिसून येत नाहीं; व पठनपाठनामध्येंही—विशेषत: सिद्धान्तकौमुदी लिहिल्यानंतर—तिचा विशेष प्रचार राहिला नाहीं.

## ३६५. काशिकावृत्तीचें महत्व.

पाणिनिसूत्रांवर कुणि, निर्लूर वगैरे वृत्तिकारांनीं लिहिलेल्या जुन्या वृत्ती असल्या तरी, त्याप्रमाणेंच भर्तृहरि अथवा विमलमति यांपैकीं कोणीहि लिहिलेली भागवृत्ति पठनपाठन-संप्रदायांत असली तरी, पाणिनिसूत्रांचे अध्ययनाला काशिकावृत्तीची फार मदत झाली, व प्रक्रियाकौमुदी आणि सिद्धान्तकौमुदी यांच्या कालापर्यंत सात आठ शतकें वैयाकरणकुलांमध्यें तिचें स्थान अढळ राहिलें. या काशिकावृत्तीवर आठव्या शतकांत जिनेन्द्रबुद्धि यांनीं काशिका-विवरणपञ्जिका (न्यास) व अकराव्या शतकांत हरदत्त या महापंडितानें पदमञ्जरी या उत्कृष्ट विद्वत्तापूर्ण टीका लिहून तिला भूषित केलें. जिनेन्द्रबुद्धि या बौद्ध पंडितांचा कैयट व हरदत्त यांनीं उल्लेख केला असल्यामुळें न्यास या ग्रंथाचा काल काशिकेनंतर लौकरच नववें किंवा दहावें शतक मानण्यांत येतो. जिनेन्द्रबुद्धीनें लिहिलेल्या न्यासापूर्वी 'न्यास' या नांवाचे व्याकरणशास्त्रावर कांही ग्रंथ लिहिले गेले होते; व भामह व माघ या कवींनीं केलेले उल्लेख या जुन्या न्यासांविषयींच असावे. जिनेन्द्रबुद्धीच्या न्यास या ग्रंथावर मैत्रेयरक्षित यांनीं बाराव्या शतकाच्या आरंभीं तंत्रप्रदीप या नांवाची टीका लिहिली व म. म. मल्लिनाथ यांनीं चौदाव्या शतकाच्या आरंभीं न्यासोद्योत या नांवाची टीका लिहिली. मैत्रेयरक्षित यांच्या तंत्रप्रदीपावरही उद्योतनप्रभा व आलोक ह्या टीका लिहिल्या गेल्या. इंदुमित्र या पंडितांनीं न्यासावर अनुन्यास नांवाचा ग्रंथ लिहिला. महान्यास नांवाच्या टीकेचा उज्ज्वलदत्तांनीं उल्लेख केला आहे. जिनेन्द्रबुद्धीच्या न्यासावर जरी अनेक व्याख्यानग्रंथ लिहिले गेले तरी दोनतीनशे वर्षांनंतर विशेषतः हरदत्तांनीं पदमंजरी टीका लिहिल्यानंतर या न्यास ग्रंथाचें अध्ययन मागें पडलें; व त्याला कारण कांहीं अंशीं न्यासकार व न्यासाचे बहुतेक टीकाकार हे बौद्धमतावलंबी असणें हें शक्य आहे.

## ३६६. चान्द्र, कातन्त्र जैनेन्द्र व शाकटायन व्याकरणांवरील वृत्तिग्रंथ.

काशिकाकारांनीं पाणिनिसूत्रांवर जशी काशिकावृत्ति लिहिली त्याप्रमाणेंच चान्द्र, कातन्त्र व जैनेन्द्र याही व्याकरणांवर या कालखंडांत विद्वानांनीं वृत्ती लिहिल्या व त्यांच्याही अभ्यासास चांगली मदत केली. चान्द्र व्याकरणावर चंद्रगोमीनें स्वतः एक वृत्ति लिहिली होतीच. त्याशिवाय आनंददत्तानेंही एक वृत्ति लिहिली व कश्यपानें एक वृत्ति लिहिली अशा दोन वृत्तींचा उल्लेख मिळतो. कातन्त्र व्याकरणाचा प्रचार पुष्कळ ठिकाणीं असल्यामुळें त्यावर अनेक वृत्ती व पञ्जिका लिहिल्या गेल्या. त्यांपैकीं दुर्गसिंहानें लिहिलेली वृत्ति प्रसिद्धच आहे; ती या काशिकाकालखंडांत काशिकेपूर्वीं कांहीं वर्षें लिहिली गेली असावी. जैनेन्द्र व्याकरणावरही देवनन्दीनें स्वतः लिहिलेल्या न्यास या वृत्तीशिवाय अभयनंदीनें या कालांत एक वृत्ति लिहिली. जैनेन्द्र व्याकरणाच्या दक्षिणेकडील संस्करणावर याच सुमारास सोमदेवानें लघुवृत्ति लिहिली. शाकटायनाच्या जुन्या व्याकरणावर आधारलेलें शाकटायनशब्दानुशासन म्हणून नंतर प्रसिद्धीस

आलेलें व्याकरण याच सुमारास पाल्यकीर्ति यानें लिहिलें. या पाल्यकीर्तीला 'श्रुतकेवलिदेशिक' (जवळजवळ तीर्थंकरासारखाच) हें उपपद लावलें गेलें आहे. आपण सुधारून वाढविलेल्या शब्दानुशासनावर पाल्यकीर्तीनें स्वतःच एक टीका लिहिली व त्यानंतर थोडक्यांच काळांत अमोघवर्ष या पंडितानें अमोघावृत्ति या नांवाची एक टीका लिहिली व प्रभाचंद्रांनीं अमोघावृत्तीवर न्यास नांवाची टीका लिहिली. शाकटायनशब्दानुशासन हें अध्ययनास सुबोध व्हावें ह्या हेतूनेंच पाल्यकीर्तीनें मुख्यतः लिहिलें असल्यामुळें त्यांत वैदिक व्याकरण नाहीं व शिक्षेचीही जोड नाहीं. कदाचित् पाल्यकीर्ति हा जैन पंडित असल्यामुळें त्यानें हीं उपांगें जोडलीं नसावीं. शिवसूत्रें मात्र तेरा घेतलीं आहेत व तीं प्राचीन शाकटायन-व्याकरणावरून घेतलीं असावीं. परिभाषा, गणपाठ, धातुपाठ, उणादि सूत्रांचे चार अध्याय, लिंगानुशासन हीं उपांगें जोडलेलीं आहेत. ह्या शाकटायनशब्दानुशासनावर यशोवर्मदेव यानें चिंतामणि नांवाची टीका लिहिली व या चिंतामणीवर समंतभद्र व अजितसेन यांनीं टीका लिहिल्या. अभयनन्दी नांवाच्या विख्यात जैन पंडितानें शाकटायनाचें निराळें संस्करण केलें व तें प्रक्रियासंग्रह या नांवानें प्रसिद्ध आहे. हा पाल्यकीर्ति (शाकटायन) श्वेतांबर व दिगंबर या दोन संप्रदायांमधील यापनीय संप्रदायाचा होता असें मानण्यांत येतें.

### ३६७. वामनाचें विश्रान्तविद्याधर व्याकरण.

वरील ग्रंथांशिवाय या कालखंडामध्यें पाणिनिसूत्रांपैकीं अथवा शाकटायनसूत्रांपैकीं निवडक सूत्रें घेऊन किंवा त्यासारखींच सूत्रें रचून देशपरिस्थित्यनुरूप अनेक सुलभ व्याकरणें लिहिलीं गेलीं व त्यांचा त्या त्या विशिष्ट देशांमध्यें प्रसारही झाला. वामनाच्या विश्रान्तविद्याधर नांवाच्या व्याकरणाचा उल्लेख हैम शब्दानुशासनामध्यें मिळतो; गणरत्नमहोदधीमध्यें वर्धमानानें सहृदयचक्रवर्ती म्हणून वामनाचा उल्लेख केला आहे. या व्याकरणावर मल्लवादीनें न्यास नांवाची टीका लिहिली असाही उल्लेख मिळतो. हा मल्लवादी सिद्धसेनदिवाकराच्या सन्मतितर्कावर टीका लिहिणाराच मल्लवादी असेल तर हा वैयाकरण वामन बराच पूर्वीं होऊन गेलेला असला पाहिजे; व तो काशिकाकर्ता वामनच असण्याचा संभव आहे. ज्याप्रमाणें 'अनुशाकटायनं सर्वे वैयाकरणाः' असा जैन पंडितामध्यें व्याकरणग्रंथांसंबंधीं प्रवाद आहे त्याप्रमाणेंच 'अनुमल्ल वादिनं सर्वे तार्किकाः' असा प्रवादही ऐकण्यांत येतो. 'परेत्र पाणिनीयज्ञाः, केचित् कालापकोविदाः। एके विश्रान्तविद्याः स्युरन्ये संक्षिप्तसारकाः' या वैयाकरणकुलांमध्यें ऐकण्यांत येणाऱ्या श्लोकांत पाणिनीय, कालाप, विश्रान्तविद्याधर, व संक्षिप्तसार या चार व्याकरणांचा उल्लेख गुरुशिष्यपरंपरांमध्यें पठनपाठनाकरितां लोकांत प्रसिद्ध व्याकरणें म्हणून आला आहे. त्यावरून काशिकाकार वामनानेंच 'विश्रान्तविद्या' अथवा 'विद्या' हें टोपणनांव असलेलें विश्रान्तविद्याधर व्याकरण लिहिलें असावें असें वाटतें. विश्रान्तविद्याधर या नांवावरूनही व्याकरणविद्या मागें पडलेल्या कालामध्यें तिचा उद्धार करण्याकरितां हें व्याकरण लिहिलें गेलें असावें असें दिसतें.

## कैयटकालखंड ( इ. स. १०००–१४०० )

### ३६८. कैयटकालखंडांतील प्रमुख वैयाकरण.

भर्तृहरीनें महाभाष्याचें पुनरुज्जीवन केलें व काशिकाकारांनीं पाणिनिसूत्रांवर उत्तम वृत्ति लिहून महाभाष्याचे अध्ययनास लागणारी पूर्वतयारी व शास्त्रीय व्युत्पत्ति होण्याचें साधन निर्माण केलें. हें सर्व झालें तरी महाभाष्याच्या कठिन फक्किकांचा अर्थ दुर्बोधच राहिला व तो कैयटभट्टांनीं विशद करून महाभाष्याचे पाङ्क्त अध्ययनाला बहुमोल मदत केली व महाभाष्याच्या अध्ययनाला स्थिरता आणून दिली. भर्तृहरीचे कालखंडामध्यें चान्द्र, कातन्त्र, जैनेन्द्र इत्यादि इतर व्याकरणें लिहिलीं गेलीं; त्यांवरही या कालखंडामध्यें वर्धमान, जिनप्रभ इत्यादि पंडितांनीं व्याख्या लिहिल्या व पाणिनिसूत्रावरही पुरुषोत्तमदेव, मैत्रेयरक्षित वगैरे पंडितांनीं कांहीं वृत्ती व सूत्रस्पष्टीकरणाकरितां साहाय्यभूत असे आणखी इतर ग्रंथ लिहिले. काशिकावृत्तीवरही या वेळीं कांहीं टीका लिहिल्या गेल्या. या कालखंडांतच भोजदेव, बुद्धिसागर बोपदेव व हेमचंद्र यांनीं पाणिनिव्याकरणासारखींच सुबोध व्याकरणें लिहिलीं व वाक्यपदीयावर पुञ्जराज व हेलाराज यांनींही विद्वत्तापूर्ण टीका लिहिल्या. एकंदरींत पाहतां या व्याकरणशास्त्राचे बाबतींत कैयटभट्टांचे कालीं व्याख्यानरूप बहुमोल ग्रंथसंपत्ति निर्माण झाली व लोकांची प्रवृत्ति व्याकरणाध्ययनाकडे ज्यास्त ज्यास्त होत चालली. या कालखंडाला एका तऱ्हेनें व्याख्यानकालखंड असेंही म्हणतां येणें शक्य आहे.

### ३६९. कैयटभट्टांचा महाभाष्यप्रदीप.

कैयटभट्ट हे काश्मीरचे राहणारे होते. इसवी सनाच्या अकराव्या शतकाचा उत्तरार्ध हा त्यांचा कार्यकाल समजण्यांत येतो. त्यांच्या वडिलांचें नांव जैयटभट्ट होते मम्मट व अल्लट हे त्यांचे बंधू समजले जात असत. महाभाष्यकारांनतर पाणिनिसूत्रांचें अध्ययन बौद्ध विद्वान करीत असत; पण महाभाष्याकडे त्यांचें दुर्लक्ष असे. महाभाष्यावर 'प्रदीप' नांवाची मुद्देसूद विद्वत्तापूर्ण टीका लिहून पाणिनिसंप्रदाय स्थिर पायावर उभारण्याचें काम कैयटभट्टांनीं केलें. महाभाष्यावर कैयटभट्टांपूर्वीं जरी भर्तृहरीनें वृत्ति लिहिली असली व कैयटभट्टानंतरही मैत्रेयरक्षित, पुरुषोत्तमदेव, नारायण शेष, विष्णु शेष, नीलकण्ठ वाजपेयी, कुमारतातार्य, रामकृष्णानन्द, लक्ष्मणसूरि इत्यादि वैयाकरणांनी जरी व्याख्या लिहिल्या असल्या तरी कैयटभट्टांच्या प्रदीपाचाच अभ्यास वैयाकरण कुलांमध्यें आजपर्यंत चालू आहे. कैयटभट्टांच्या प्रदीपानें खरोखरीच आपल्या नांवाप्रमाणें भाष्यकारांच्या गूढ अभिप्रायावर प्रकाश पाडला. कैयटभट्टांचा प्रदीप नसता तर कित्येक ठिकाणीं महाभाष्य दुर्बोधच राहिलें असतें अशा तऱ्हेचे उद्गार वैयाकरणकुलामध्यें कैयटभट्टांच्या प्रदीपासंबंधीं काढण्यांत येतात. कैयटांनीं महाभाष्यांतील पङ्क्तींचें नुसतें स्पष्टीकरण केलें एवढेंच नव्हे, तर भाष्यकारांनीं नुसत्या उल्लेख केलेल्या किंवा थोडक्यांत दिलेल्या शब्दनित्यत्व, स्फोटवाद, द्योतकत्व इत्यादि व्याकरणसिद्धांतांचें मुद्देसूद विवरण केलें. अनेक ठिकाणीं कैयटानीं भर्तृहरीच्या वाक्यपदीयाचा व महाभाष्यदीपिकेचा उपयोग केला आहे. महाभाष्यांतील नवान्हिकी भाष्याचें विवेचन करतांना महाभाष्यदीपिकेचा व त्यानंतर वाक्यपदीयाचा कैयटभट्टांनीं विशेष उपयोग केल्यामुळें महाभाष्यदीपिका हीं शेवटपर्यंत लिहिलीच गेली नसावी व आज जशी ती अपुरीच उपलब्ध आहे तशीच ती कैयटभट्टांचे वेळींही असावी. महाभाष्यामधील पाठान्तर म्हणून कैयटभट्टांनीं दिलेले पाठ भर्तृहरीच्या प्रदीपिकेमध्यें घेतलेले आढळतात.

## ३७०. कैयटांच्या महाभाष्यप्रदीपाचें महत्त्व.

भाष्यकारांनीं उदाहरणें म्हणून अनेक रूपें दिलीं आहेत व त्यांचें विवरण केलें आहे. कैयटभट्टांनींही ज्यास्त कठिण उदाहरणें देऊन त्यांचें विवेचन केलें आहे. भाष्याध्ययनानें व्याकरणशास्त्रावर प्रभुत्व मिळवतां आलें तर प्रदीपाध्ययनानें शास्त्रपाण्डित्य मिळवितां येतें व पूर्वपक्षोत्तरपक्षरूप वादविवादाला चांगलीच मदत मिळते असा वैयाकरणांमध्यें प्रवाद आहे. महाभाष्याचे अध्ययनाबरोबर प्रदीपाच्या अध्ययनाचाही प्रघात आहे. 'सुधे सुधेवारिवधात् सुराणां सुका रणे लाघवतश्च रामः । विशेषणे द्वे य इहादिकर्तुर्वेदेदधीतो स हि कैयटीयः ।।' हा श्लोक कैयटभट्टांच्या प्रदीपाचें अध्ययन काळजीपूर्वक झालें आहे किंवा नाहीं त्याची परीक्षा घेण्याकरितां जीं अनेक रूपें विचारण्यांत येत असत त्यांपैकीं दोन रूपांचा संग्रह करणारा श्लोक म्हणून वैयाकरणकुलांत उल्लेखिला जातो. या श्लोकांतील ' सुधे ' व ' सुकः ' ही प्रथमा एकवचनाचीं ' सुधिन्व् ' व ' सुकृण्व् ' या शब्दांचीं रूपें कैयटभट्टांनीं दिलीं आहेत व कैयटभट्टांच्या प्रदीपाचें अध्ययन केल्याशिवाय तीं समजणें अशक्य आहे असें वरील श्लोकाचें तात्पर्य आहे. कैयटभट्टांच्या प्रदीपाला 'कैयट' असेंच नांव पडलें हें 'तदुक्तं भाष्यकैयटयोः' या टीकाग्रंथामध्यें अनेक ठिकाणीं आढळणाऱ्या वाक्यांवरून स्पष्ट होतें. कैयटभट्टांच्या प्रदीपावरही चिन्तामणि, रामचन्द्रसरस्वती, नारायण, नागेश इत्यादि वैयाकरणांनीं लिहिलेल्या दहा बारा टीकांचा उल्लेख मिळतो. त्यावरून प्रदीपाच्या लोकप्रियतेची कल्पना येते. या सर्व टीकांमध्यें नागेशभट्टांचा उद्योत ही सर्वांमध्यें उत्तम टीका आहे. कांहीं वर्षांपूर्वींच समग्र उद्योत काशी व मुंबई या दोन ठिकाणीं प्रदीपासह मुद्रित झाला आहे; परंतु त्याचें उत्तम संस्करण होऊन दोन्ही ग्रंथांचें भाष्यासहित ज्यास्त पद्धतशीर मुद्रण होणें इष्ट आहे.

## ३७१. हरदत्तांची पदमञ्जरी.

कैयटभट्टांच्याच काळांत थोड्या वर्षांनंतर दक्षिणेकडे कैयटभट्टांच्या तोडीचे महावैयाकरण हरदत्तमिश्र नांवाचे होऊन गेले. हरदत्तांनीं अनेक शास्त्रांवर ग्रंथ लिहिले त्यांतील व्याकरणशास्त्रांतील काशिकाग्रंथावर लिहिलेली पदमञ्जरी टीका वैयाकरणांमध्यें सर्वश्रुतच आहे. महाभाष्यावर प्रदीप नांवाची सर्वमान्य टीका लिहून उत्तरेकडील देशांमध्यें ज्याप्रमाणें पाणिनीय व्याकरणाध्ययनाला कैयटभट्टांनीं स्थिरता आणून दिली त्याप्रमाणेंच काशिकेवर विद्वत्ताप्रचुर पदमञ्जरी टीका लिहून दक्षिणेकडील देशांमध्यें पाणिनीय व्याकरणाध्ययनाला हरदत्तांनीं स्थिरता आणून दिली. हरदत्त हे कावेरी नदीच्या कांठीं राहणारे द्राविड ब्राह्मण होते. कैयट व हरदत्त दोघांनींही आपल्या पूर्वींच्या व्याकरणग्रंथांचा — विशेषतः भर्तृहरीच्या ग्रंथांचा — संपूर्ण अभ्यास केला होता व दोघांनींही आपआपल्या ग्रंथांमध्यें भर्तृहरीनें प्रतिपादन केलेल्या सिद्धान्तांचा ठिकठिकाणीं उपयोग केला. कैयट व हरदत्त यांचे पूर्वी जिनेन्द्रबुद्धि नांवाच्या महावैयाकरणांनीं काशिकेवर न्यास नांवाची उत्तम वृत्ति लिहून काशिकाध्ययनाला चालना दिली होती. परंतु काशिकाकर्त्यांच्या सारखेच न्यासकारही बौद्धमतावलंबी होते, म्हणून वैदिकधर्माभिमानी लोकांमध्यें काशिकावृत्तीला मिळावयास पाहिजे तसें स्थान मिळालें नव्हतें. जिनेन्द्रबुद्धींनीं भाष्यांतील मतप्रणालीचा अवलंब करून न्यासवृत्ति लिहिल्यामुळें काशिका व भाष्य यांमध्यें दिसून येणारी असंगति नाहींशी झाली हें खरें; परंतु वैदिकधर्माभिमानी लोकांमध्यें काशिकाध्ययनाचा प्रसार हरदत्तांनींच केला. जिनेन्द्रबुद्धि यांच्या प्रतिपादनांत बहुश्रुतता

जागोजागीं दिसून येते तर हरदत्तांच्या प्रतिपादनांत गाढविद्वत्ता दिसून येते. या गाढविद्वत्ते-मुळेंच हरदत्तांना कैयटभट्टांच्या तोडीचें मानांचें स्थान मिळालें.

### ३७२. हरदत्तांची विद्वत्ता व आत्मश्लाघा.

जरी अनाठायीं नसली तरी हरदत्तमिश्रांचे अंगीं अहंमन्यता बरीच होती हें पदमंजरी-मध्यें ठिकठिकाणीं आढळणाऱ्या दर्पोक्तीवरून सहज दिसून येण्याजोगें आहे. ग्रन्थाच्या अगदीं आरंभींच 'यश्चिराय हरदत्तसंज्ञया विश्रुतो दशसु दिक्षु दक्षिणः' असे हरदत्तांनीं स्वतः-बद्दल उद्गार काढले आहेत; तसेंच आपण लिहिलेल्या वृत्तीबद्दल 'अविचारितरमणीयं कामं व्याख्याशतं भवतु वृत्तेः। हृदयंगमा भविष्यति गुणगृह्याणामियं व्याख्या' या श्लोकांतही 'काशिकेवर शेंकडों वृत्ती आहेत पण माझीच व्याख्या हृदयंगम आहे' असें म्हटलें आहे. स्वतः केलेल्या भाष्याभ्यासाविषयीं तर त्यांनीं 'संपूर्ण भाष्य हें आपणालाच एकट्याला कळलें आहे' अशा तऱ्हेचे विचार 'एवं प्रकटितोऽस्माभिर्भाष्ये परिचयः परः। तस्य निःशेषतो मन्ये प्रतिपत्तापि दुर्लभः' या श्लोकांत दिले आहेत; व त्याच्याही पुढें जाऊन 'प्रक्रियातर्क-गहनप्रविष्टो हृष्टमानसः। हरदत्तहरिः स्वैरं विहरन् केन वार्यते' या श्लोकामध्यें स्वतःला 'व्याकरणप्रक्रियारूपीं वनांत स्वैर संचार करणारा सिंह' असें म्हटलें आहे. या दर्पोक्तींना अनुलक्षूनच कीं काय 'अनधीते महाभाष्ये व्यर्था सा पदमञ्जरी।' या शब्दानीं 'पदमञ्जरीचें भाष्यापेक्षांही वरचें स्थान आहे' असें प्रतिपादन करणारें श्लोकार्ध देऊन त्यानंतर 'अधीते हि महाभाष्ये व्यर्था सा पदमञ्जरी' या श्लोकार्धांत 'भाष्य म्हटल्यावर पदमंजरी पाहिजे कशाला' या शब्दांनीं भाष्यापुढें पदमञ्जरीचें निरर्थकत्व प्रतिपादन केलें आहे. 'अनधीते०' हा श्लोक वैयाकरणकुलामध्यें शिष्यांना परिचित आहे.

### ३७३. पुरुषोत्तम देवांचे ग्रंथ.

या कैयट कालखंडांत महाभाष्यावरही अनेक विद्वानांनीं अनेक टीकाग्रंथ लिहिले; तसेंच व्याकरणांतील निरनिराळ्या प्रकरणांवरही प्रबंध व व्याख्यानग्रंथ लिहिले. या ग्रंथकारां-पैकीं बाराव्या शतकांतील पुरुषोत्तमदेव व मैत्रेयरक्षित यांची कामगिरी कैयट व हरदत्त यांचे खालोखाल विशेष उल्लेखनीय आहे. मैत्रेयरक्षितांनीं महाभाष्यलघुवृत्ति नांवाचा महाभाष्यावर विवेचनात्मक ग्रंथ लिहिला. त्याप्रमाणेंच पुरुषोत्तम देवांनींही प्राणपणा नांवाची टीका लिहिली. या दोन्ही ग्रंथांचा शरणदेव, सीरदेव इत्यादि वैयाकरणांनीं उल्लेख केला आहे. पुरुषोत्तमदेवांनीं व्याकरणशास्त्रावर कारककारिका, दुर्घटवृत्ति, भाषावृत्ति, उणादिवृत्ति, ज्ञापकसमुच्चय वगैरे अनेक उपयुक्त ग्रंथ लिहिले आहेत. वंगदेशच्या लक्ष्मणसेनानें आर्ष प्रयोगांशिवाय इतर प्रयोग समजण्याकरितां प्रचलित भाषेचें व्याकरण रचण्यास सांगितल्यावरून पुरुषोत्तमदेवानें पाणिनिसूत्रांवर स्वर व वैदिकी हीं प्रकरणें गाळून भाषावृत्ति नांवाचा ग्रंथ लिहिला असें सांगण्यांत येतें. भाषा म्हणजे बोलभाषा व तीवरील वृत्ति म्हणजे व्याकरण या अर्थानें या व्याकरणग्रंथाला भाषावृत्ति हें नांव साजेसेंच आहे. भाषावृत्तीला विद्वानांमध्यें विशेष स्थान मिळालें होतें असें नंतरच्या अनेक वैयाकरणांनीं जागोजागीं तिच्याविषयीं काढलेल्या उद्गारांवरून स्पष्ट दिसून येतें. पुरुषोत्तम देवांनीं स्वतः "काशिकाभागवृत्त्योश्चेत् सिद्धान्तं बोद्धुमस्ति धीः। तदा विचिन्त्यतां भ्रातः भाषावृत्तिरियं मम॥" या शेवटच्या श्लोकांत आपल्या वृत्तीला काशिका व भागवृत्ती यांचें स्वारस्य सांगणारी वृत्ति असें म्हटलें आहे.

## ३७४. मैत्रेयरक्षितांचे ग्रंथ.

मैत्रेयरक्षितांनींही विशिष्ट पाणिनिसूत्रांचीं अवतरणें घेऊन त्यांनीं साधल्या जाणाऱ्या कठिण रूपांची सिद्धि करणारा धातुप्रदीप नांवाचा ग्रंथ लिहिला. नंतरच्या ग्रंथांत रक्षित या नांवानें मैत्रेयरक्षितांचा उल्लेख पुष्कळ ठिकाणीं मिळतो. शरणदेवांनींही याच वेळीं साधण्यास कठीण अशा रूपांची सिद्धी ज्यामध्यें केली आहे असा दुर्घटवृत्ति नांवाचा ग्रंथ लिहिला. या शरणदेवांच्या दुर्घटवृत्ति नांवाच्या ग्रंथानें त्याच नांवाच्या दुसऱ्या दोन ग्रंथांना बाजूला टाकलें. शरणदेवाच्या दुर्घटवृत्तीचे उल्लेख नंतरच्या व्याकरणग्रंथांमध्यें पुष्कळच आढळतात. भर्तृहरीच्या वाक्यपदीयावर पांडित्यपूर्ण टीका लिहिणारे पुण्यराज व हेलाराज याच काळांत होऊन गेले. पुण्यराजांचा नागेशांनीं पुञ्जराज या नांवानें उल्लेख केला आहे. या ग्रंथकारांशिवाय धर्मकीर्ति या विद्वान् बौद्ध पंडितानें रूपावतार नांवाचा प्रकरणग्रंथ लिहिला.हा ग्रंथ पाणिनिसूत्रांवर आधारलेला आहे व तो रूपसिद्धीकरितांच लिहिला आहे. यांतील निरनिराळ्या प्रकरणांना संज्ञावतार, संहितावतार, या तऱ्हेची नांवें दिलीं आहेत. याच वेळीं विमलसरस्वती नांवाच्या पंडितानें रूपमाला नांवाचा पाणिनिसूत्रांवर आधारलेला ग्रंथ लिहिला. या ग्रंथांतील प्रकरणांना संज्ञामाला, सर्वनाममाला, स्त्रीप्रत्ययमाला अशा तऱ्हेचीं नांवें देण्यांत आलीं आहेत; व ग्रंथ जरी लहान असला तरी त्यांमध्यें अनेक लौकिक व वैदिक उदाहरणें साधिलीं आहेत.

## ३७५. भोजदेवांचें सरस्वतीकण्ठाभरण.

याच कालखंडांमध्यें साधारणपणें अकराव्या शतकांत भोजदेवांनीं सरस्वतीकण्ठाभरण नांवाचें व्याकरण लिहिलें व त्यावर वृत्ति लिहिली. हे व्याकरण नुकतेंच मुद्रित झालें आहे. सरस्वतीकण्ठाभरण या नांवाचा अलंकारग्रंथ या भोजराजांनीं लिहिलेला प्रसिद्धच आहे. विद्येचा पुरस्कार करणाऱ्या व विद्वानांना आश्रय देणाऱ्या धारानगरी राजधानींत राज्य करणाऱ्या या भोजराजांबद्दल अनेक आख्यायिका व दंतकथा सांगण्यांत येतात; व भोजप्रबन्ध वगैरे ग्रंथांमध्यें त्या ग्रथितही केल्या आहेत. सरस्वतीकण्ठाभरण व्याकरण हें पाणिनिसूत्रावर आधारलेलें सूत्रमय व्याकरण आहे. या व्याकरणाचे पाणिनीच्या 'अष्टाध्यायी' प्रमाणेंच आठ अध्याय आहेत. 'सिद्धिः क्रियादेः लोकात्' हें पहिलें सूत्र आहे; व धातु शब्दाची व्याख्या देणारें 'भूवादिः क्रियावचनो धातुः' हें दुसरें सूत्र आहे. सूत्रें पुष्कळशीं पाणिनीचींच घेतलीं आहेत. कांहीं सूत्रांमध्यें मागेंपुढें शब्द, प्रतिशब्द, विभक्तिव्यत्यय या तऱ्हेचे केवळ शाब्दिक फेरफार केले आहेत. प्रत्यय पाणिनीचेच पाणिनीच्या अनुबन्धांसह घेतले आहेत. शिवसूत्रें तींच आहेत. कात्यायनाचीं वार्तिकें, महाभाष्य व काशिका या ग्रंथांचा उत्तम अभ्यास करून ज्या ठिकाणीं पाणिनिसूत्रांना पुष्टि जोडणें इष्ट दिसलें त्या ठिकाणीं पुष्टि जोडून व समजण्यास सुलभ व आपल्या वेळच्या भाषेंतील प्रयोग समजण्यास उपयुक्त होईल अशा रीतीनें या व्याकरणामध्यें सूत्ररचना केली आहे; अध्यायक्रम पाणिनीप्रमाणें जरी असला तरी सूत्रक्रम फारच बदलला आहे. प्रकरणें तींच आहेत पण मागेंपुढें केलीं आहेत.गणपाठ व उणादिपाठ काढून टाकून सूत्रामध्येंच योग्य त्या शब्दांचा अंतर्भाव केला आहे. त्यामुळें सूत्रसंख्या पुष्कळच वाढली आहे. पाणिनीचे दोन अध्याय व्यापणारें संज्ञाप्रकरण या व्याकरणामध्यें एका अध्यायांत दिलें आहे. त्यानंतर उणादिप्रकरण दुसऱ्या अध्यायाच्या तीन पादांमध्यें पुरें केलें आहे व चौथ्या पादांत व तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या

पादामध्यें तिङ् व कृत् प्रत्यय दिले आहेत. तिसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या व तिसऱ्या पादांमध्यें समास दिल्यानंतर चौथ्या पादामध्यें स्त्रीप्रत्यय दिले आहेत. चौथ्या व पांचव्या अध्यायांमध्यें गणांचा सूत्रांमध्यें अंतर्भाव करून तद्धितप्रकरण फारच विस्तारानें दिलें आहे. सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादामध्यें अष्टाध्यायीप्रमाणेंच द्विर्वचन संप्रसारण इत्यादि कार्यांच्या विवेचनास आरंभ केला आहे व स्वरप्रकरण पुढें ढकलून अलुक् समास सांगून दुसरा पाद पुरा केला आहे. 'अङ्गस्य' या ऐवजीं 'प्रकृतेः' सूत्र घालून सहाव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादामध्यें अंगाधिकार सुरू केला आहे. व पदद्वित्व षत्व वगैरे कार्यें सातव्या अध्यायांत दिलीं आहेत. आठव्या अध्यायाच्या पाहिल्या दोन पादांमध्यें 'छन्दसि' असा अधिकार करून वैदिकी प्राक्रिया व वेदांमध्यें होणारे आदेश सांगितले आहेत; व तिसऱ्या पादामध्यें 'पूर्वत्रासिद्धम्' (८।३।३८) असेंच अधिकारसूत्र करून त्याचेपुढें सुबन्त व तिङन्त पदें तयार झाल्यावर होणारीं स्वरकार्यें व संधिकार्यें सांगितलीं आहेत; भोजदेवांनीं कामापुरता सर्व व्याकरणविषय एकत्रित आणून जरी साधारणरीत्या सुलभ व्याकरण रचिलें तरी लाघवाकडे लक्ष दिलें न गेल्यामुळें विस्तार वाढला; व महाभाष्यासारखा व्याख्यानग्रंथ नसल्यामुळें या व्याकरणाचा व्हावा तसा प्रसार झाला नाहीं. या व्याकरणावर दण्डनाथांनीं हृदयहारिणी व कृष्णलीलाशुकमुनींनीं पुरुषकार या टीका लिहिल्या आहेत.

## ३७६. हेमचन्द्राचार्य व त्यांचे ग्रन्थ.

याच कैयटकालखंडामध्यें कैयट व हरदत्त यांच्यानंतर थोड्याच कालावधींत जैन संप्रदायाचे महामुनि हेमचन्द्र होऊन गेले, व त्यांनीं व्याकरणशास्त्रावर 'सिद्धहेमचन्द्र' नांवाचा सर्वसंग्राहक व समजण्यास सुलभ असा व्याकरणग्रंथ लिहिला. हेमचन्द्राचार्यांचा जन्म गुजरात देशांत धंधुका गांवीं इ. स. १०८८ मध्यें (संवत् ११४५ कार्तिक शु. १५) मोढ वैश्य कुलामध्यें झाला. लहानपणापासूनच त्यांच्या बुद्धीची तीव्रता, अलौकिक ग्रहणशक्ति, उत्तम स्मरणशक्ति व त्याबरोबरच मनाची विरक्ति हे गुण दिसून आले. मुलाच्या जन्मापूर्वींच स्वप्नांत झालेल्या दृष्टान्तास अनुसरून हेमचन्द्राचार्यांच्या मातुःश्रींनीं हेमचन्द्रांना वयाचे पांचव्या वर्षींच देवचन्द्र मुनींचे हवालीं केलें. देवचन्द्रांनींही ताबडतोब हेमचन्द्रांना स्तंभनपुर (खंबायत) या गांवीं दीक्षा दिली व त्यांना सर्व जैनागमग्रंथ व शास्त्रग्रंथ पढविले. आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेमुळें हेमचन्द्रांनीं थोड्याच कालांत जुन्या वैयाकरणांनीं लिहिलेले सर्व व्याकरणग्रंथ वाचिले हें यास्क, आपिशलि, शाकल्य, पाणिनि, पतञ्जलि, देवनन्दि, जयादित्य वामन, शाकटायन, भर्तृहरि, भोज वगैरे प्रसिद्ध वैयाकरणांच्या त्यांनीं आपल्या 'शब्दानुशासन' व्याकरणांत केलेल्या उल्लेखांवरून स्पष्ट दिसून येतें. त्यांच्या अंगच्या लोकोत्तर गुणांमुळें, विद्वत्तेमुळें व ग्रंथकर्तृत्वामुळें ते वयाच्या बाविसाव्या वर्षीं इ. स. ११०९ मध्यें अन्हिलवाडा पट्टण या राजधानींत गच्छाधिपति झाले; इतकेंच नव्हे, तर राजपुत्र कुमारपाल यांनीं त्यांचें शिष्यत्व पतकरिलें व्याकरण, साहित्य, योग, तत्त्वज्ञान, अध्यात्मशास्त्र, न्यायशास्त्र इत्यादि विषयांवर त्यांनीं उत्तम ग्रंथरचना केली. त्यांनीं निरनिराळ्या विषयांवर सुमारें पंचवीस ग्रंथ रचिले. त्यांपैकीं शब्दानुशासन, काव्यानुशासन, छन्दोनुशासन, अभिधानाचिन्तामणि, देशीनाममाला, योगशास्त्र, द्व्याश्रयकाव्य, त्रिषष्टिशलाका पुरुषचरित हे ग्रंथ उपलब्ध व प्रसिद्ध आहेत ग्रंथलेखनकार्याबरोबरच अध्ययनाध्यापनकार्य अखंड चालू ठेवून कलिकालसर्वज्ञ हेमचन्द्र इ. स. ११७२ सालीं दिवंगत झाले.

### ३७७. हेमचंद्राचार्यांचें शब्दानुशासन.

राजे जयसिंह यांचे आज्ञेनुसार हेमचन्द्राचार्यांनीं पूर्वींच्या सर्व व्याकरणग्रंथांचें अवलोकन करून सिद्धहेमचन्द्र नांवाचें उत्तम व्याकरण रचिलें. याच व्याकरणाला हैम-शब्दानुशासन असेंही म्हणतात. या व्याकरणाचे आठ अध्याय आहेत. सूत्रांची अनुबंधांची व प्रतिपादनाची तऱ्हा पाणिनीच्या अष्टाध्यायीसारखीच आहे. रचना मात्र कातन्त्र व्याकरणासारखी प्रकरणात्मक आहे; व संज्ञा, संधि, नाम, कारक, समास, आख्यात, कृदन्त व तद्धित अशीं प्रकरणें दिलीं आहेत. हेमचन्द्र हे गच्छाधिपति असल्यामुळें व त्यांनीं हें व्याकरण जैन मुनींना व जैन संप्रदायांतील शिष्यांना उपयुक्त व्हावें या मुख्य हेतूनें लिहिलें असल्यामुळें यामध्यें वैदिकी प्रक्रिया व स्वर यांचें विवेचन नाहीं, पण त्याऐवजीं जैनागमांच्या प्राकृत भाषेचें व्याकरण लिहिलें आहे. आरंभापासून सातव्या अध्यायाच्या शेवटापर्यंत संस्कृत भाषेचें व्याकरण लिहून झाल्यावर त्यांनीं आठव्या अध्यायांत जैन आगमग्रंथांच्या आर्ष प्राकृत भाषेचें व्याकरण लिहून शौरसेनी, पैशाची, मागधी व अपभ्रंश या प्राकृतभाषांमध्यें दिसून येणाऱ्या प्रयोगवैशिष्ट्यांचेंही विवेचन केलें आहे. आठव्या अध्यायाचीं सुमारें एक हजार सूत्रें सोडल्यास, सात अध्यायांतील सूत्रांची संख्या साधारणत: पाणिनिसूत्रांच्या इतकीच होते. या व्याकरणाचा प्रचार साहजिकच गुजरातमध्यें पुष्कळ झाला. विशेषत: जैन संप्रदायामध्यें शाकटायन व्याकरण व जैनेन्द्र व्याकरण हीं दोन्ही हेमचन्द्रांच्या व्याकरणानें मागें पडलीं. या हैम शब्दानुशासनावर हेमचन्द्राचार्यांनीं स्वत: लघुवृत्ति व बृहद्वृत्ति या दोन वृत्ती लिहिल्या; व बृहन्न्यास नांवाची विस्तृत टीका लिहिली. धातुपाठ, उणादि, लिंगानुशासन इत्यादि पांच अंगांचीही या व्याकरणाला जोड आहे. या व्याकरणावर देवेन्द्रसूरींनीं लघुन्यास नांवाची टीका लिहिली, विनयविजयांनीं लघुप्रक्रिया लिहिली, व मेघविजयांनीं हैमकौमुदी लिहिली.

### ३७८. जौमार व्याकरण.

कैयटकालखंडाचे अखेरीस व प्रक्रियाकौमुदी, सिद्धान्तकौमुदी वगैरे ग्रंथ लिहिले जाण्यापूर्वी व्याकरणशास्त्रावर वर लिहिलेल्या ग्रंथांशिवाय कांहीं उल्लेखनीय ग्रंथ लिहिले गेले. वादीन्द्रचूडामणि क्रमदीश्वर नांवाच्या पंडितानें तेराव्या शतकाच्या अखेरीस संक्षिप्तसार नांवाचा सूत्रमय व्याकरणग्रंथ व त्यावर रसवती नांवाची वृत्ति लिहिली. जुमरनन्दी नांवाच्या पंडितानें या दोन्हींचें पूर्ण संशोधन व संस्करण केलें. हें संस्करण जौमार व्याकरण नांवानें प्रसिद्ध आहे. या व्याकरणाला गोईचंद्रांनीं परिशिष्ट जोडलें आहे. या व्याकरणामध्यें वैदिक प्रकरण नाहीं; पण प्राकृत प्रकरण घातलें आहे. यामध्यें चान्द्र व कातंत्र व्याकरणांचा उल्लेख आढळून येतो. या व्याकरणाचा थोडासा प्रसार हल्लीं बंगालमध्यें आहे. संक्षिप्तसाराची रचना भर्तृहरीच्या वाक्यपदीयासारखी आहे व त्यामध्यें तीन अध्याय आहेत. पहिल्या अध्यायांत संधि–प्रकरण, दुसऱ्या अध्यायांत तिङन्त प्रकरण, व तिसऱ्या अध्यायांत सुबन्त व तद्धित प्रकरणें व शेवटीं समास अशीं प्रकरणें आहेत. अनुभूतिस्वरूपाचार्य यांनींही याच कालखंडांत सारस्वतप्रक्रिया नांवाचा एक व्याकरणग्रंथ लिहिला. या व्याकरणाचीं मूलसूत्रें नरेन्द्र नांवाच्या वैयाकरणानें पूर्वीं लिहिलीं होतीं असें मानण्यांत येतें; व त्यांवर आधारलेला हा ग्रंथ सारस्वत–व्याकरण नांवानें प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ इसवी सनाच्या तेराव्या शतकांत लिहिलेला असावा. या ग्रंथावर क्षेमेन्द्रानें टिप्पणी लिहिली, व पुण्यराजांनीं एक टीका लिहिली. या सारस्वत–व्याकरणाचाही अभ्यास

काहीं प्रांतांत चालू आहे. भोजदेवांप्रमाणें नरेन्द्र हे सरस्वती देवीचे मोठे उपासक होते व तिनेंच मूळ सप्तशती (७००) सूत्राचा उपदेश नरेन्द्रांना केला असें मानण्यांत येतें. अनुभूतिस्वरूपाचार्यांच्या या सारस्वत व्याकरणामध्यें संज्ञा लोकांमध्यें प्रचलित अशाच घेतल्या आहेत. हें व्याकरण समजण्यास सुलभ असल्यामुळें याचा प्रचार हल्लीं काहीं ठिकाणीं चालू आहे. वाररुच नांवाचेंही व्याकरण याच कालांत वररुचि नांवाच्या वैयाकरणानें लिहिलें. उणादिसूत्रकर्ता वररुचि यानें 'वाररुचकारिका' म्हणून काहीं कारिका लिहिल्या होत्या व त्यांवर कारक, कृदन्त, तद्धित समास इत्यादि प्रकरणें रचून हें व्याकरण लिहिलें गेल्यामुळेंही या व्याकरणाला 'वाररुच' नांव देण्यांत आलें असण्याचा संभव आहे. चाङ्गुदास नांवाच्या बौद्धमतावलंबी वैयाकरणानेंही या कालांत अर्थविचारात्मक एक व्याकरण लिहिलें व त्यामध्यें सामान्यशब्द, सर्वनामें, कृदन्त शब्द, तद्धित शब्द, समास व कारक यांच्या अर्थाविषयीं विचार केला आहे. या व्याकरणाला 'चाङ्गु व्याकरण' म्हणण्यांत येतें. चौदाव्या शतकांत पद्मनाभ नांवाच्या वैयाकरणानें एक सुलभ व्याकरण लिहिलें व त्यावर एक सुलभ पञ्जिका लिहिली. हा पद्मनाभ मिथिला देशचा राहणारा होता व त्याच्या व्याकरणाला 'सुपद्म' ही संज्ञा देण्यांत आली. याच सुमारास कातन्त्र व पाणिनीय व्याकरणांप्रमाणें निरनिराळ्या कठिण रूपांची सिद्धि करणारें 'प्रयोगरत्नमाला' नांवाचें एक लहानसें व्याकरण लिहिण्यांत आलें. या व्याकरणांतील वर्णसमाम्नाय तन्त्रशास्त्रांतील वर्णसमाम्नायाला अनुसरून आहे. पुरुषोत्तमविद्यावागीश नांवाच्या मन्त्रशास्त्रज्ञानें हें रचिलें व याचा प्रचार कामरूप व वङ्ग देशांमध्यें पुष्कळ झाला.

## ३७९. बोपदेवांचें मुग्धबोध व्याकरण.

क्रमदीश्वरानंतर थोड्याच काळांत चौदाव्या शतकाच्या आरंभीं बोपदेव नांवाच्या पंडितानें मुग्धबोध व्याकरण लिहिलें. या व्याकरणांत लोकांमध्यें न आढळणाऱ्या औजढत्, औजिढत्, अचीकृतत्, अचिकीर्तत् इत्यादि रूपांच्या सिद्धीविषयीं प्रश्न उपस्थित करून कोणतें रूप शुद्ध समजावें याविषयीं चिकित्सात्मक विवेचन केलें आहे. कृत् धातूच्या लुङाच्या रूपांविषयीं विवेचन करतांना काशिकाकारांच्या सारख्या महापंडितांचें मत चुकीचें आहे असें बोपदेवांनीं प्रतिपादन केलें; पण लवकरच धातुवृत्तिकार माधवांनीं काशिकाकारांचें मतच बरोबर आहे असें सिद्ध केलें ही हकीगत मनोरंजक रीतीनें 'बोपदेवमहाग्राहग्रस्तो वामनदिग्गजः। कीर्तेरेव प्रसङ्गेन माधवेन विमोचितः॥' या श्लोकामध्यें वैयाकरण-संप्रदायांत प्रसिद्ध आहे. हा श्लोक शब्दकौस्तुभाच्या आठव्या आन्हिकाच्या शेवटीं उद्धृत केला आहे. मुग्धबोधाचा कर्ता बोपदेव हा देवगिरीच्या महादेव नांवाच्या राजाच्या वेळीं होऊन गेला; व त्यानें हेमाद्रि नांवाच्या सचिवाच्या प्रेरणेवरून मुग्धबोध, कविकल्पद्रुम, काव्यकामधेनु वगैरे व्याकरणग्रंथ लिहिले, परमहंसप्रिया नांवाची भागवतावर टीका लिहिली, व भागवतामधील अपाणिनीय शब्दांचें विवेचन केलें. बोपदेवानें संज्ञांचे बाबतींत व्हस्वाला स्व, दीर्घाला घें, गुणाला णु अशा रीतीनें लाघवाचा अवलंब केला आहे. मुग्धबोधावर विद्यानिवास नांवाची एक टीका लिहिली गेली, तिला उद्देशून वर (परिच्छेद ३६७ मध्यें) उद्धृत केलेल्या "परेत्र पाणिनीयज्ञाः०" या श्लोकामधील 'विश्रान्तविद्याः' याचे जागीं सांपडणारा 'विद्यानिवासाः' हा पाठ असूं शकेल. या 'मुग्धबोधा'चा वंग देशांत फार प्रसार झाला व त्याच्यावर अनेक टीका लिहिल्या गेल्या.

# कौमुदीकालखंड (इ. स. १४००–१६५०)

## ३८०. प्रकरणग्रंथांची आवश्यकता.

कैयटकालखंडांत अनेक लहान लहान व्याकरणग्रन्थ व अनेक टीकाग्रन्थ लिहिले गेले व लोकांची प्रवृत्ति व्याकरणशास्त्राध्ययनाकडे वळली; तसेंच काशिका वृत्तीवरही उत्तम टीका लिहिल्या गेल्यामुळें तिच्याहि अध्ययनाचा जिकडे तिकडे प्रसार झाला; तरीपण निरनिराळ्या प्रांतांमध्यें प्रांतीय बोलभाषांचा प्रसार ज्यास्त झाल्यामुळें व त्यांमध्यें ग्रंथसंपत्तीही निर्माण झाल्यामुळें संस्कृत भाषेचें सर्वसामान्य बोधभाषा हेंही स्थान डळमळलें व तिच्यामधील सुंदर ग्रंथांचें ज्ञान होण्याकरितां प्रथम व्याकरण शिकून भाषाज्ञान करून घेणें आवश्यक होऊन राहिलें. पाणिनीय व्याकरणाची श्रेष्ठता जरी कायम राहिली तरी भाषाज्ञानसंपादनाच्या दृष्टीनें काशिका व इतर व्याकरणग्रंथही जरा कठीणच भासूं लागले, व ऐन्द्र, कातन्त्र, हैम इत्यादि व्याकरणांतील प्रकरणात्मक विवेचनानें व्याकरणज्ञान सुलभ होतें असें अनुभवांत येऊं लागलें; त्यामुळें अष्टाध्यायी-सूत्रांचें प्रकरणात्मक संकलन करून प्रकरणग्रन्थ लिहिण्याकडे वैयाकरणांची दृष्टि वळली व वैयाकरणकुलांमध्यें प्रसिद्ध अशा शेष नांवाच्या कुलांतील विद्वान् रामचंद्र शेष यांनीं प्रक्रियाकौमुदी नांवाचा प्रकरणग्रंथ लिहिला व त्याच कुलांतील वैयाकरणांपासून विद्याप्राप्ति झालेल्या भट्टोजी दीक्षितांनीं सिद्धान्तकौमुदी हा ग्रंथ लिहिला. प्रक्रियाकौमुदीवर प्रामुख्यानें शेष वंशांतील विद्वानांनीं टीकाग्रंथ लिहिले. महाभाष्यावरही या कालीं अनेक टीका लिहिल्या गेल्या. यावरून या कालीं पाणिनीय व्याकरणाची लोकप्रियता चांगलीच प्रत्ययास येते.

## ३८१. प्रक्रियाकौमुदी.

प्रक्रियाकौमुदी हा ग्रंथ आंध्र देशांतील प्रख्यात 'शेष' नांवाच्या कुलांतील रामचंद्र शेष यांनीं लिहिला. इसवी सनाच्या पंधराव्या शतकांत हा ग्रंथ लिहिला असावा असें विद्वानांचें मत आहे व त्याला सबळ पुरावा म्हणून रामचंद्र शेष यांचे पुतणे कृष्णशेष यांनीं या ग्रंथावर लिहिलेल्या प्रकाश नांवाच्या टीकेची प्रत व नातू विठ्ठलशेष यांनीं आपल्या पितृव्यांनीं लिहिलेल्या प्रसाद नांवाच्या टीकेची प्रत या दोन्ही इ.स.च्या सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत लिहिलेल्या उपलब्ध आहेत असा देण्यांत येतो. प्रकरणरूप व्याकरणग्रंथरचना ही पाणिनिपूर्व कालापासून प्रचलित होती. प्रक्रियाकौमुदीपूर्वीं कैयटभट्टांचे कालखंडांत पाणिनिसूत्रांची निरनिराळ्या प्रकरणांत विभागणी करून रूपावतार, रूपमाला इत्यादि तीनचार प्रक्रियाग्रंथ लिहिले गेले. पण शास्त्रीय विवेचनाचे बाबतींत प्रक्रियाकौमुदी हा ग्रंथ त्या ग्रंथांपेक्षां ज्यास्त परिपूर्ण आहे; व त्यामध्यें बहुतेक पाणिनिसूत्रांचें व्याख्यान केलें आहे. ठिकठिकाणीं उदाहरणें दिलीं आहेत व अन्य व्याकरणांनीं साधल्या जाणाऱ्या व पाणिनि-व्याकरणानें साधल्या न जाणाऱ्या अशा रूपांचाही त्यांत समावेश केला आहे. व्याकरणशास्त्राच्या प्रवेशाला हा ग्रंथ पूर्वींच्या ग्रंथांपेक्षां ज्यास्त उपयुक्त झाल्यामुळें साहजिकच इतर व्याकरणें व इतर प्रकरणग्रंथ मागें पडले. या ग्रंथावर अनेक टीका लिहिल्या गेल्या. त्यांपैकीं वर उल्लेख केलेल्या प्रक्रियाप्रकाश व प्रक्रिया-प्रसाद या टीका ग्रंथकारांचा अभिप्रेत अर्थ समजावून देण्याच्या बाबतींत ज्यास्त उपयुक्त आहेत. चक्रपाणिदत्त यांनीं लिहिलेली प्रक्रियाप्रदीप हीही टीका उपयुक्त आहे. यांशिवाय अमृतस्मृति, प्रक्रियाव्याकृति, निर्मलदर्पण, तत्त्वचंद्र, प्रक्रियारंजन व प्रक्रियाविवरण याही टीकांचा उल्लेख व्याकरणग्रंथांमध्यें आढळतो.

## ३८२. सिद्धान्तकौमुदी.

प्रक्रियाकौमुदीनंतर साधारणतः दोनशें वर्षांनीं त्याच नमुन्यावर भट्टोजी दीक्षितांनीं पाणिनिसूत्रावर आधारलेला सिद्धान्तकौमुदी हा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ लिहिण्यांत भट्टोजी दीक्षितांनीं सर्व जुन्या प्रक्रियाग्रंथांचें परिशीलन केलें व संस्कृत भाषा शिकण्याकरितां सर्वांत उपयुक्त अशी पद्धति शोधून काढून तिचा अवलंब केला. प्रथमतः त्यांनीं वर्णसमाम्नाय, प्रत्याहार, संज्ञा व परिभाषा यांचें विवरण व्याकरणज्ञानास आवश्यक म्हणून केलें आहे. त्यानंतर वाक्यांतील शब्दांचें पृथक् ज्ञान होण्याकरितां पंचसन्धिप्रकरण लिहून नामांच्या रूपसिद्धीकरितां सुबन्तप्रकरण लिहिलें आहे. त्यानंतर स्त्रीप्रत्यय सांगून व अव्ययांचें परिगणन करून नामांची सिद्धी झाल्यावर नामांचा क्रियापदाशीं किंवा परस्परसंबंध दाखविणाऱ्या विभक्तिप्रत्ययांचें व त्यांच्या अर्थांचें विवेचन केलें आहे; व नंतर समासांचें व नामसाधित नामांचें विवेचन करून पूर्वार्ध संपविला आहे. उत्तरार्धामध्यें निरनिराळ्या धातूंचें दहा गणांमध्यें परिगणन करून तिङन्तांची (क्रियापदांची) सिद्धी केली आहे. त्यानंतर धातुसाधित व नामसाधित धातूंची सिद्धी करून व क्रियापदांचे काल व अर्थ यांचें विवेचन करून धातुसाधित नामांची सिद्धी केली आहे; व शेवटीं वेदांतील शब्दांचें वैशिष्ट्य व स्वर सांगून ग्रंथ संपूर्ण केला आहे. या ग्रंथाचें वैशिष्ट्य म्हणजे अष्टाध्यायींतील सर्व सूत्रांचा यांत संग्रह केला आहे व जुन्या काळची जुन्या ग्रंथांतील उदाहरणें न देतां, नवीं आपल्या वेळचीं प्रचलित उदाहरणें दिलीं आहेत. रूपसिद्धी होण्याकरितां, सूत्रांचा क्रम समजण्याकरितां व सूत्रांचा योग्य अर्थ कळण्याकरितां आवश्यक त्या ठिकाणींच विवेचनात्मक पंक्ती घातल्या आहेत. त्याप्रमाणेंच मागील सूत्रांतील पदांचा आवश्यक अध्याहार करून व परिभाषांचा उपयोग जरूर असेल तेथें करून प्रत्येक सूत्राचा थोडक्यांत पण परिपूर्ण अर्थ दिला आहे या ग्रंथाचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे यामध्यें सूत्रकार, वार्तिककार व भाष्यकार या त्रिमुनींना असंमत असलेलीं इतर वैयाकरणांनीं दिलेलीं उदाहरणें व नियम यांचा मळींच संग्रह केला नाहीं; इतकेंच नव्हे तर पाणिनिसूत्रावर आधारलेल्या काशिका व प्रक्रियाकौमुदी या ग्रंथांत दिलेलीं उदाहरणें व सूत्रार्थ भाष्यकारांना असंमत असल्यास त्यांवर स्पष्ट शब्दांत टीका केली आहे; व आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ महाभाष्याचें विवरण करणारा कैयटांचा प्रदीप व काशिकेवरील हरदत्तांची पदमंजरी टीका यांचा वेळोवेळीं उपयोग केला आहे. सिद्धान्तकौमुदीवरील टीकांमध्यें ‘ इति कैयटहरदत्तादयः ’ असा उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतो.

## ३८३. सिद्धान्तकौमुदीचें महत्व.

व्याकरणमहाभाष्य हा विद्वत्तापूर्ण ग्रंथ कितीही सुंदर व सुलभ भाषेमध्यें लिहिला गेला तरी विस्तारामुळें व प्रतिपाद्य विषयाच्या काठिन्यामुळें तो सामान्य जनांच्या आवाक्याबाहेरच राहिला; व शाकटायन, आपिशलि, चंद्रगोमी, इत्यादिकांच्या व्याकरणांचाच अभ्यास ज्यास्त चालूं राहिला. महाभाष्याचें पुनरुज्जीवन भर्तृहरीनें केलें; व त्याच वेळीं जयादित्य व वामन यांनीं पाणिनिसूत्रांवर काशिका वृत्ति लिहिली; ही वृत्ति कितीही उत्तम व उपयुक्त असली तरी विद्वत्तापूर्ण महाभाष्याकडे थोडें दुर्लक्ष करून व संग्राहक वृत्तीचा अवलंब करून आपलेवेळीं प्रचलित असलेल्या चान्द्र वगैरे व्याकरणांतील उदाहरणें साधण्याचा प्रयत्न केल्यामुळें व वृत्तिकार जयादित्य व वामन यांचा बौद्ध मताकडे कल असल्यामुळें वैदिक धर्मानुयायी विद्वानांच्या मनांत त्या वृत्तीविषयीं अत्यंतआदरयुक्त भावना नव्हती. साहजिकच हरदत्त या दाक्षिणात्य वैदिक धर्माभिमानी महापंडितानें काशिकेवर लिहिलेल्या पदमंजरीचा, तसेंच काश्मीरमधील

वदिक धर्माभिमानी महाविद्वान् कैयटभट्ट यांनीं लिहिलेल्या महाभाष्यप्रदीपाचा ज्यास्त ज्यास्त पुरस्कार मुख्य मुख्य व्याकरणविद्यालयांमध्यें झाला व त्याचाच पूर्ण आधार घेऊन व बोपदेवाच्या मुग्धबोध व्याकरणपद्धतीचा अवलंब करून भट्टोजी दीक्षितांनीं सिद्धान्तकौमुदी लिहिली. सिद्धान्तकौमुदीच्या विद्वत्तापूर्ण तथापि सुलभ लेखनपद्धतीमुळें व महाभाष्याच्या पूर्ण पुरस्कारामुळें इतर सर्व व्याकरणें मागें पडलीं; इतकेंच नव्हे, तर शेंदोनशें वर्षें प्रसाद, प्रदीप वगैरे उत्तम टीकांनीं जिचा पुष्कळच प्रसार झाला होता अशी प्रक्रियाकौमुदीही मागें पडली.

## ३८४. भट्टोजी दीक्षितांच्या कालाविषयीं मतभेद.

प्रक्रियाकौमुदीकारांच्याच शेषवंशांतील विद्वानांकडून विद्याधिगम झाला असतांनाही सडेतोडपणानें प्रक्रियाकौमुदी व त्यावरील टीका यांचेविरुद्ध वेळ आली असतां आपल्या मनोरमा, कौस्तुभ इत्यादि ग्रंथांमध्यें भट्टोजी दीक्षितांनीं विधानें केल्यामुळें प्रक्रियाकौमुदी-कारांच्या परंपरेंतील विठ्ठलशेष व जगनाथ या पंडितांना भट्टोजी दीक्षितांच्या कृतीचा राग आला व त्यांनीं भट्टोजी दीक्षितांचेवर गुरुद्रोहाचा शिक्का मारला; व सिद्धान्तकौमुदी व मनोरमा यांवर खंडनात्मक ग्रंथ लिहिले. रामेश्वरभट्टांचे नातू शंकरभट्ट यांचेकडून, तसेंच अप्पय दीक्षित यांचेकडून भट्टोजी दीक्षितांनीं विद्या संपादन केली असली तरी रामचंद्र शेषांचे पुतणे कृष्णशेष हे भट्टोजी दीक्षितांचे व्याकरणगुरु होते असें समजण्यांत येतें, पण तसें मानलें असतां भट्टोजी दीक्षितांचा काल-निर्णय करण्याला मोठी अडचण येते. प्रक्रियाकौमुदीकारांचे पुतणे व प्रत्यक्ष शिष्य व प्रक्रियाकौमुदीप्रकाश लिहिणारे कृष्णशेष यांच्या ग्रंथांची हस्त-लिखित प्रतच इसवीसनाच्या सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत लिहिली गेलेली उपलब्ध होत असल्यानें इ. स. १५०० च्या सुमारास शेषकृष्णांचा काल मानावा लागतो.; व भट्टोजी दीक्षित हे त्यांचे शिष्य असल्यामुळें भट्टोजींचा काल सोळाव्या शतकाचा पूर्वार्ध मानणें भाग पडतें. आतां भट्टोजी दीक्षितांचे गुरु शंकरभट्ट यांना अकबर बादशहानें सोळाव्या शतकाच्या शेवटीं पंडिताग्रणी ही पदवी दिली असल्यामुळें सतराव्या शतकाचा आरंभ हा भट्टोजींचा काल मानावा लागतो. शिवाय, भट्टोजी दीक्षितांचे नातू हरिदीक्षित यांचेपाशीं आपण अध्ययन केलें हें नागेशभट्टांनीं आपल्या ग्रंथांत स्पष्ट लिहिलें आहे. नागेशांना दीर्घायुष्य लाभलें व ते इ. स. १७७५ सालीं निवर्तले अशी जरी कल्पना केली तरी त्यांचा जन्म इ. स. १६७५ च्या पलीकडे नेतां येत नाहीं. त्यामुळें हरिदीक्षितांचा काल साधारणपणें १७ व्या शतकाचा उत्तरार्ध व भट्टोजी दीक्षितांचा काल १७ व्या शतकाचा आरंभ हाच मानावा लागतो.

## ३८५. भट्टोजी दीक्षितांच्या कालाविषयीं निर्णय.

या शंभर वर्षांच्या कालविसंगतीचें कारण कांहींतरी समजुतीचा घोटाळा हें असलेंच पाहिजे. जगन्नाथ पंडितांनीं भट्टोजीदीक्षितांचा उल्लेख "शेषवंशावतंसानां श्रीकृष्णपण्डितानां पादुकयोः प्रसादादासादितशब्दानुशासनाः तेषु च पारमेश्वरपदं प्रयातेषु तत्रभवद्भिः उल्लासितं प्रक्रियाप्रकाशं दूषणैर्मनोरमायामाकुल्यकार्षुः" या शब्दांमध्यें केला आहे, व भट्टोजींनींही शब्द-कौस्तुभामध्यें स्वतः "प्रक्रियाप्रकाशे गुरुचरणैरुक्तम्" असा उल्लेख केला आहे. या उल्लेखांचा मेळ घालण्यास उपाय म्हणजे ( १ ) भट्टोजींचे कृष्णशेष प्रत्यक्ष गुरु नव्हते पण शेष कुटुंबांतील कृष्ण नांवाचे प्रक्रियाकौमुदीप्रकाशकर्त्या कृष्णशेषांचे नातलग दुसरे कृष्णशेष हे गुरु मानणें हा आहे; किंवा ( २ ) 'पादुकयोः' या शब्दानें प्रकाशकार शेषकृष्णच गुरु, पण ते परंपरागुरु असें मानणें हा आहे, किंवा ( ३ ) शेषकृष्णांच्या प्रकाशाचें मूळ नांव प्रक्रियाकौमुदीवृत्ति

हें होतें; व प्रकाश नांवाची निराळी वृत्ति शेषकुलांतील वैयाकरणांनीं लिहिली व तिच्यावर भट्टोजींनीं टीका केली असें मानणें हा आहे. एकंदरींत पाहतां प्रक्रियाकौमुदीचा प्रसार साधारणतः इ. स. च्या पंधराव्या व सोळाव्या शतकांमध्यें पुष्कळच झाला होता व त्यावर टीकाही अनेक लिहिल्या गेल्या; पण सतराव्या शतकाच्या आरंभीं सिद्धान्तकौमुदीनें प्रक्रियाकौमुदीला मागें सारुन आपलें वर्चस्व स्थापलें असें दिसून येतें.

## ३८६. भट्टोजी दीक्षितांचा स्वभाव.

भट्टोजी दीक्षित हे महाराष्ट्रीय ब्राह्मण होते. जातीनें ते देशस्थ ब्राह्मण होते किंवा सारस्वत ब्राह्मण होते याविषयीं मतभेद आहे. कांहीं लोकांचे मतें ते आन्ध्र ब्राह्मण होते काशी हें त्यांचें निवासस्थान व अध्ययनस्थान होतें काशी येथें त्यांनीं अध्यापन करून मोठा शिष्यसंप्रदाय तयार केला होता. पूर्वींच्या सर्व व्याकरणग्रंथांचें त्यांनीं संपूर्ण अध्ययन केलें होतें हें त्यांच्या मनोरमा व शब्दकौस्तुभ या टीकांवरून स्पष्ट होतें. वर लिहिल्याप्रमाणें निर्भीडपणानें टीका करणें हा त्यांचा स्वभाव असल्यामुळें प्रक्रियाकौमुदी व प्रक्रियाप्रकाश यांतील कांहीं मतांचें त्यांनीं खंडन केलें म्हणून त्यांच्यावर इतर वैयाकरणांनीं गुरुद्रोहाचा शिक्का मारला होता. कदाचित् त्यांचा अतिशय तापट स्वभाव व शिष्यांना व इतर लोकांना कडकपणानें बोलणें हा वाग्दोष हींही त्यांनीं गुरुद्रोह केला या किंवदन्तीचा बहुजनसमाजामध्यें प्रसार होण्याचीं कारणें असावीं. शेषवंश हा वैष्णवमताभिमानी व भट्टोजी हे महाशैव असल्यामुळेंही या किंवदन्तीचा प्रचार होणें शक्य आहे. या गुरुद्रोहाचें प्रायश्चित्त म्हणून मृत्यूनंतर त्यांना पिशाच-योनी प्राप्त झाली होती; व ते काशीमध्यें आपल्या निवासस्थानीं ब्रह्मसमंध होऊन राहिले होते व ज्ञानेन्द्रसरस्वती नांवाच्या संन्यासी शिष्याला त्यांनीं ब्रह्मसमंध या स्वरूपांत राहूनच व्याकरण शिकविलें व त्याचें अध्ययन संपूर्ण झाल्यावर अतृप्त राहिलेली चतुर्थाश्रम घेण्याची आपली इच्छा त्याचेकडून दीक्षा घेऊन तृप्त केली, अशी आख्यायिका सांगण्यांत येते. या ज्ञानेन्द्रसरस्वतीलाच त्यांनीं आपल्या अध्यापनाचें सार म्हणून तत्त्वबोधिनी ही सिद्धान्तकौमुदीवर टीका लिहिण्यास सांगितलें व त्यानें ती लिहिली.

## ३८७. भट्टोजी दीक्षितांचे ग्रंथ.

भट्टोजी दीक्षितांनीं शब्दकौस्तुभ नांवाचा पाणिनिसूत्रांवर महाभाष्याच्या धर्तीवर विवरणस्वरूपाचा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ महाभाष्यांतील प्रतीकें घेऊन लिहिलेला नसला तरी त्यामध्यें महाभाष्यांतील महत्त्वाचा विषय विस्तृत रूपानें सांगितला आहे; व महाभाष्यांत विवरण न केलेल्या कांहीं मुद्यांचें विवरण केलें आहे; व महाभाष्यानंतर लिहिलेल्या ग्रंथांतील विवेचनाचा जरूर पडेल तेथें आधार घेतला आहे, व विवेचन नापसंत असलें तर त्याचें खंडन केलें आहे. या ग्रंथामध्यें महाभाष्यासारखेच आन्हिकात्मक विभाग दृष्टीस पडतात. हा ग्रंथ समग्र उपलब्ध होत नाहीं; पण तो आठही अध्यायांवर लिहिला असावा. दीक्षितांनीं प्रथमतः शब्दकौस्तुभ लिहून नंतर सिद्धान्तकौमुदी लिहिली असावी. सिद्धान्तकौमुदीवर प्रौढमनोरमा नांवाची त्यांनीं टीका लिहिली आहे. प्रौढमनोरमा या नांवावरून 'बालमनोरमा' नांवाचीही त्यांनी संक्षिप्त टीका लिहिली असावी असें मानण्यांत येतें. हल्लीं मुद्रित केलेली बालमनोरमा मात्र आधुनिक वैयाकरण वासुदेव दीक्षित या नांवाच्या तञ्जावरच्या रहिवाशी वैयाकरणांनीं सतराव्या शतकाच्या शेवटीं लिहिलेली आहे. सिद्धान्तकौमुदीचा संक्षेपरूप लघुकौमुदी हा ग्रंथ भट्टोजी दीक्षितांचे शिष्य वरदराज यांनीं लिहिला आहे व तो व्याकरणशास्त्रप्रवेशास अत्यंत उपयुक्त आहे.

व्याकरणशास्त्राचें सांग अध्ययन करणाऱ्याला सिद्धान्तकौमुदीचें अध्ययन अत्यंत जरूर असतें; पण ज्याला मुख्यतः इतर शास्त्रांचें सांग अध्ययन करावयाचें आहे त्याचें लघुकौमुदीचें अध्ययन केल्यानें कसेंबसें काम भागतें. याशिवाय मध्यमकौमुदी हा ग्रंथ रामशर्मा नांवाच्या वैयाकरणांनीं लिहिला आहे; पण अध्ययनसंप्रदायांत त्याला कोठें स्थान दिलेलें आढळून येत नाहीं. सिद्धान्तकौमुदीच्या उपलब्ध टीकांपैकीं प्रौढमनोरमा व तत्त्वबोधिनी या टीकांशिवाय रामकृष्ण-भट्टांची सुबोधिनी हीही टीका उपयुक्त आहे. परंतु सर्वांत सरस व उत्तम टीका भट्टोजींचे नातू हरिदीक्षित यांचे शिष्य नागेश यांनीं लिहिलेली लघुशब्देन्दुशेखर ही विद्वानांमध्यें अत्यंत प्रमाणभूत मानण्यांत येते; व तिचें अध्ययन केलेल्या वैयाकरणाला शेखरान्त अध्ययन केलेला वैयाकरण असें संबोधण्यांत येतें. भट्टोजी दीक्षितांनीं वैयाकरणसिद्धान्तकारिका नांवाचा अर्थ-विचारात्मक ग्रंथही लिहिला आहे व त्याच्या त्यावरील वैयाकरणभूषण या टीकेसह अध्ययनाचा प्रघातही आहे. भट्टोजी दीक्षितांनीं अद्वैतवेदान्तावर तत्त्वकौस्तुभ व धर्मशास्त्रावर कालनिर्णय प्रवरनिर्णय, त्रिस्थलीसेतु वगैरे अनेक ग्रंथ लिहिले आहेत.

३८८. कोण्डभट्टांचा वैयाकरणभूषण.

भट्टोजी दीक्षितांचेनंतर त्यांचे शिष्य व बंधु रंगोजीभट्ट यांचे चिरंजीव कोण्डभट्ट यांनीं वैयाकरणसिद्धान्तकारिकांवर विद्वत्तापूर्ण विवेचन करणारे वैयाकरणभूषण व वैयाकरणभूषणसार हे ग्रंथ लिहिले. व्याकरणशास्त्रावर अर्थग्रंथ फारच थोडे उपलब्ध आहेत. त्यांमधील भर्तृहरीच्या वाक्य पदीयाला प्रमाणभूत मानून व त्याचा आधार घेऊन वैयाकरणभूषण हा ग्रंथ कोण्डभट्टांनीं लिहिला. या ग्रंथामध्यें प्रत्ययांच्या अर्थांचे, प्रकृतींच्या अर्थांचें, पदांच्या अर्थांचें, व वाक्यांच्या अर्थांचें मार्मिक विवेचन केलें आहे; व इतर शास्त्रकारांच्या सिद्धांतांचें विवेचन करून वैयाकरण सिद्धान्त प्रतिपादन केले आहेत. अर्थगाम्भीर्यामुळें वैयाकरणभूषण हा ग्रंथ जरासा समजावयास कठिणच आहे. या ग्रंथाची कठिणता दूर करण्याकरितां विद्वद्रत्न शंकरशास्त्री मारुलकर यांनीं त्यावर आपले गुरुजी म.म. वासुदेवशास्त्री यांच्या मार्मिक विवेचनपद्धतीचा स्वीकार करून इतर शास्त्र-कारांच्या मतांचें स्पष्टीकरण करणारी व ग्रंथकारांचा अभिप्राय पूर्णपणें स्पष्ट करणारी 'शाङ्करी' नांवाची मार्मिक टीका नुकतीच लिहिली आहे. या टीकेमध्यें नागेशांनीं लिहिलेल्या मञ्जूषा ग्रंथाचाही ठिकठिकाणीं उपयोग केला आहे.

३८९. हरिदीक्षितांचे ग्रंथ.

भट्टोजी दीक्षित यांचे नातू हरिदीक्षित यांनीं प्रौढमनोरमेवर लघुशब्दरत्न व बृहत्-शब्दरत्न या नांवाच्या दोन टीका लिहिल्या. लघुशब्दरत्न हा बृहत्शब्दरत्नाचा संक्षेप आहे; प्रतीकेंही तींच आहेत; परंतु बृहत्शब्दरत्नामधील कांहीं प्रतीकें गाळल्यामुळें त्यांची संख्या कमी झाली आहे. दोन्ही ग्रंथांची भाषा सारखीच आहे. असें असूनही लघुशब्दरत्न ही टीका नागेशभट्टांनीं लिहिली व ती आपले गुरुजी हरिदीक्षित यांना अर्पण करून हरिदीक्षितांच्या नांवें ती प्रसिद्ध केली असा वैयाकरणकुलांमध्यें प्रवाद आहे. लघुशब्दरत्नामध्यें व बृहत्शब्द-रत्नामध्यें कांहीं महत्त्वाचे मतभेद असले, व लघुशब्दरत्न व लघुशब्देन्दुशेखर यांमध्यें कितीही जरी विचारसाम्य असलें तरी बृहत्शब्दरत्न व लघुशब्दरत्न हे दोनही ग्रथ हरि दीक्षित यांनींच लिहिले हें लघुशब्दरत्नामध्यें तद्धित प्रकरणांत व कृदन्त प्रकरणांत आलेल्या 'विस्तरस्तु अस्मत्कृते बृहत्शब्दरत्ने मदन्तेवासिकृतलघुशब्देन्दुशेखरमञ्जूषयोश्च द्रष्टव्यः'' या पंक्तीवरून स्पष्ट होतें. याविषयीं ज्यास्त विवेचन लेखकानें भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूट ॲनल्स भाग ३२ ( १९५२ ) यामधील लेखांत पृष्ठें २५८, २५९, २६० यांत केलें आहे.

# नागेश–कालखण्ड ( इ. स. १६५०–१९५३ )

## ३९०. नागेश कालखंडांतील ग्रंथांचें स्वरूप.

कौमुदीकालखंडामध्यें प्रक्रियाकौमुदी व सिद्धान्तकौमुदी यांसारखे प्रकरणग्रंथ निर्माण झाले व त्यांवर विद्वान् वैयाकरणांनीं टीका लिहिल्या; त्यामुळें प्रधानतः, तसेंच इतर शास्त्रांना आनुषांगिक म्हणून, व्याकरणशास्त्राचा अभ्यास प्रांतोप्रांतीं दरेक विद्यालयांत सुरू झाला. इतकेंच नव्हे तर व्याकरणशास्त्रांत योग्य प्रवेश मिळाल्यानंतरच इतर शास्त्रांचा अभ्यास सुरू करण्याची प्रथा पडली. वर दिलेल्या निरनिराळ्या व्याकरणांपैकीं पाणिनीय व्याकरणाचा अभ्यास जवळजवळ सर्व देशभर सुरू झाला व तो करण्याकरितां प्रारंभीं सिद्धान्तकौमुदी या ग्रंथाचें अध्ययन चालू झालें. प्रक्रियाकौमुदीचा प्रचार थोड्याच ठिकाणीं राहिला. इतर व्याकरणांपैकीं हैम व्याकरणाचा प्रचार गुजराथेंत व कातंत्र, सारस्वत व मुग्धबोध यांचा अभ्यास बंगालमध्यें चालू राहिला. देशामध्यें सर्वत्र राजकीय धामधूम व राज्यांची उलथापालथ चालू असल्यामुळें व काशी हें क्षेत्र म्हणून राजकीय धामधुमींपासून अलिप्त असल्यामुळें काशी हें शास्त्राध्ययनाचें केंद्र होऊन बसलें. त्याचे खालोखाल दक्षिणेमध्यें मराठी राज्यांत विद्येला उत्तेजन मिळाल्यामुळें महाराष्ट्र, विशेषतः पुणें, हें विद्येचें केंद्र झालें. भट्टोजी दीक्षितांचे कालानंतर व्याकरणशास्त्रांतील विद्वत्ताप्रचुर भाष्यान्त ग्रंथांचें अध्ययन, अध्यापन व नवीन ग्रंथांची निर्मिति काशीक्षेत्रीं झाल्यामुळें काशीला विशेष महत्व आलें व विद्वत्तेची परीक्षा मुख्यतः व्याकरणाध्ययनावरच होऊं लागली. राजदरबारांमध्यें, विद्यापीठांमध्यें, आचार्यपीठांमध्यें व विद्वत्सभांमध्यें साहजिकच पूर्वपक्षउत्तरपक्षरूपी वादाला उपयुक्त असे पांडित्यपूर्ण ग्रंथ लिहिले गेले व वादविवादाला पांडित्याची शोभा आणणारी न्यायशास्त्रांतील परिष्कारपद्धती व्याकरणविषयक चर्चेला लावण्यांत आली; इतकेंच नव्हे, तर वेदान्तविषयक व व्याकरणविषयक ग्रंथांवर न्यायपद्धतिपरिप्लुत अशा टीकाही विद्वदग्रणी लिहूं लागले. मधुसूदनसरस्वतींची अद्वैतसिद्धि ही टीका या बाबतींत चांगलें उदाहरण म्हणून देतां येईल.

## ३९१. नागेशांची ग्रंथसंपत्ति.

सतराव्या शतकाचे शेवटीं व अठराव्या शतकाचे आरंभीं काशीमध्यें नागेशभट्ट नांवाचे मोठे विद्वान् वैयाकरण होऊन गेले व त्यांनीं व्याकरणशास्त्रावर उत्तमोत्तम टीकाग्रंथ लिहिले; इतकेंच नव्हे, तर वेदान्त, अलंकार, मीमांसा इत्यादि शास्त्रांवरील मुख्य मुख्य ग्रंथांवर अधिकारयुक्त वाणीनें टीका लिहिल्या. नागेशांसंबंधीं उपलब्ध असलेली थोडीशी माहिती मागें (परि. ३३-३७ पृष्ठें २१-२४ मध्यें) दिलीच आहे. नागेशांनीं सिद्धान्त–कौमुदीवर विचारपरिप्लुत व उद्बोधक अशा लघुशब्देन्दुशेखर व बृहच्छब्देन्दुशेखर या टीका लिहिल्या. लघुशब्देन्दुशेखर ही टीका थोडक्यांत पण मुद्देसूद विवेचन करणारी असल्यानें ती अल्पावधींत फारच लोकप्रिय झाली; व तिच्यावर पांडित्यपूर्ण अशा टीका नागेशभट्टांच्या शिष्यांनीं व प्रशिष्यांनीं लिहिल्या. नागेशांचा दुसरा विद्वत्तापूर्ण ग्रंथ परिभाषेन्दुशेखर हा आहे. या ग्रंथामध्यें पाणिनिसूत्रांच्या यथायोग्य अर्थज्ञानाकरितां व उदाहरणसिद्धीकरितां उपयुक्त असे लोकसिद्ध तसेच ज्ञापकसिद्ध १३० चे वर न्याय देऊन नागेशांनीं त्यांचें उत्तम सोदाहरण विवेचन तीन विभागांमध्यें केलें आहे. परिभाषेन्दुशेखरांतील या १३० चे वर असलेल्या परिभाषांपैकीं

सुमारें ४० वार्तिककारांनीं दिलेल्या म्हणून आढळतात. सुमारें ६० पेक्षां ज्यास्त परिभाषा भाष्यामध्यें प्रतिपदोक्त दिल्या आहेत किंवा ज्ञापकानें सिद्ध केल्या आहेत. बाकींच्या परिभाषांपैकीं बऱ्याच परिभाषा भाष्यांत आढळत नसल्या तरी कैयटभट्टांच्या प्रदीपांत आढळतात. परिभाषेन्दुशेखरामध्यें ठिकठिकाणीं महाभाष्यामधील उतारेही थोडक्यांत दिले आहेत. हा ग्रंथ मुद्देसूद व अर्थपूर्ण असून अत्यंत लाघवयुक्त लिहिला गेल्यामुळें तो पुनः पुनः वाचल्याशिवाय त्यांतील अर्थाचें पूर्ण आकलन होत नाहीं. या परिभाषेन्दुशेखरावरही नागेशांच्या शिष्य प्रशिष्यांनीं अनेक टीका लिहिल्या आहेत. महाभाष्यप्रदीपावर उद्द्योत हा सर्वोत्तम ग्रंथ नागेशांनीं लिहून त्यामध्यें कैयटभट्टांनीं दिलेल्या विवरणांत कांहीं अस्पष्टता राहिली ती भरून काढून महत्त्वाचे ठिकाणीं मुद्देसूद विवेचन केलें आहे.

### ३९२. नागेशांची लघुमञ्जूषा, व परमलघुमञ्जूषा.

सिद्धान्तकौमुदी, परिभाषेन्दुशेखर व महाभाष्यप्रदीप यांचें व्याख्यानरूप विवेचन केल्यानंतर, महाभाष्य, वाक्यपदीय व वैयाकरणभूषण यांतील अर्थविचारांचें पूर्ण परिशीलन करून नागेशांनीं लघुमञ्जूषा व परमलघुमञ्जूषा हे अर्थग्रंथ लिहिले. या ग्रंथांमध्येंही थोडक्यांत पण मुद्देसूद लिहिण्याची नागेशांची पद्धती पूर्णपणें आढळून येते. नागेशांनीं इतर शास्त्रांवरही अनेक टीकाग्रंथ व निबंधग्रंथ लिहिले. त्यांचें ग्रंथलेखनाचें काम दीर्घकाल अविश्रान्त चाललें होतें, व लहानमोठे मिळून त्यांच्या ग्रंथांची संख्या शंभराचे वरांत जाते. या ग्रंथांची यादी निर्णयसागर छापखान्यांत छापलेल्या महाभाष्याच्या प्रस्तावनेंत दिली आहे. नागेशभट्टांच्या अनेक शिष्यांपैकीं त्यांचे परमशिष्य वैद्यनाथ पायगुंडे यांनीं परिभाषेन्दुशेखरावर गदा नांवाची टीका लिहिली आहे; व तिच्यांत नागेशांच्या अभिप्रायाचें पूर्ण विवेचन केलें आहे. महाराष्ट्रामध्यें या गदेचा प्रचार पुष्कळ झाला व डॉ. कीलहॉर्न यांनीं परिभाषेन्दुशेखरावरील आपल्या टीपांमध्यें जागोजागीं या टीकेंतून उतारे घेतले आहेत. नागेशांचे दुसरे परमशिष्य भैरवमिश्र यांनींही भैरवी नांवाची परिभाषेन्दुशेखरावर पांडित्यपूर्ण टीका लिहिली आहे.

### ३९३. नागेशांच्या ग्रंथांचें महत्व.

नागेशांची सिद्धान्तकौमुदीवरील विद्वत्तापरिप्लुत लघुशब्देन्दुशेखर ही टीका त्यांचे गुरुजी हरिदीक्षित व प्रगुरु भट्टोजी दीक्षित यांचेप्रमाणें भाष्यवार्तिकवचनांना धरूनच असली तरी मनोरमा व शब्दरत्न यांतील प्रतिपादनांपेक्षां कांहीं ठिकाणीं नागेशांनीं निराळ्या रीतीनें प्रतिपादन केल्यामुळें शेखरमताला नव्यमत असें नांव प्राप्त झालें आहे; व मनोरमाशब्दरत्नांतील प्रतिपादनाला प्राचीनमत ही संज्ञा देण्यांत आली आहे. नागेशभट्टांनंतर काशी, पुणें, ग्वाल्हेर, इन्दूर, धार, नाशिक, वाई इत्यादि ठिकाणीं चालू असलेल्या मोठमोठ्या व्याकरणपाठशालांमध्यें नागेशांच्या शिष्य-प्रशिष्यांनीं लघुशब्देन्दुशेखर व परिभाषेन्दुशेखर या दोनही शेखर ग्रंथांचें अध्यापन सुरू केलें व नव्यमताचा पुरस्कार केला. राजदरबार, आचार्यपीठें, विद्वत्सभा व विद्यापीठें यांमध्यें, तसेंच इतर लहानमोठ्या उत्सवप्रसंगीं विद्वानांची पारख पांडित्यपूर्ण पूर्वपक्षोत्तरपक्षरूप वादविवादांनीं होऊं लागली. अशा वेळीं न्याय, वेदान्त, मीमांसा इत्यादि शास्त्रांतील निरनिराळ्या विषयांवर वादविवाद होत असत; पण व्याकरणशास्त्राचा अभ्यास प्रथमतः सर्वांनींच केला असल्यामुळें व वेदान्त वगैरे शास्त्रांतील निष्णात पंडित हे वैयाकरणही असल्यामुळें व्याकरणशास्त्रावर पूर्वपक्षोत्तरपक्षरूप वादविवाद प्रामुख्यानें होत असत; व व्याकरण-महाभाष्यांत दिलेलें पूर्वपक्षोत्तरपक्षरूप प्रतिपादन झाल्यानंतर प्राचीन व नवीन या मतभेदांवर

अधिष्ठित असे वादविवाद चालत असत; व भाष्यान्त अध्ययन जागृत असलेलेच वैयाकरण अन्तिमनिर्णयात्मक विवेचन करीत असत. अशा वैयाकरणांना ठिकठिकाणीं सभापति ही संज्ञा असे व विद्वान् लोक हे ही संज्ञा आपल्या सभापांडित्यकौशल्यामुळें संपादन करीत असत. काशीमध्यें नागेशांना ही संज्ञा देण्यांत येत असे. त्याप्रमाणें पुण्यामध्यें नीलकंठशास्त्री थत्ते यांनाही ही संज्ञा देत असत.

## ३९४. सिद्धान्तकौमुदी, शब्दकौस्तुभ इत्यादि ग्रंथांवरील टीकाग्रंथ.

या नागेशकालखंडाचें एक वैशिष्टय सांगावयाचें म्हणजे नागेशांनंतर आजपर्यंत व्याकरण शास्त्रावर सर्व टीकाग्रंथच लिहिले गेले, नवीन ग्रंथ असा एकही लिहिला गेला नाहीं हें होय. नागेशांचेनंतर व्याकरणाध्ययन काशीक्षेत्रीं, तसेंच महाराष्ट्रांत, मध्यप्रांतांत, मध्यप्रदेशांत व दक्षिणभारतांत, अनेक ठिकाणीं व्याकरणपाठशालांमध्यें उत्तम रीतीनें होऊं लागलें. या सर्व ठिकाणीं नागेशांच्या ग्रंथांचा जोरानें पुरस्कार झाला. नागेशांच्या लघुशब्देन्दुशेखर, परिभाषेन्दुशेखर, मञ्जूषा व उद्द्योत यांमध्यें सर्व पाणिनीय व्याकरण आलें आहे व ज्यानें शेखराचें अध्ययन केलें नाहीं तो वैयाकरणच नव्हे असें विद्वान लोक म्हणूं लागले. त्याप्रमाणेंच आपल्या गुरुजींच्या सिद्धान्तकौमुदीचें स्वारस्य समजावून देऊन तिला मानाचें स्थान कोणीं दिलें असेल तर तें नागेशांनीं शेखर लिहून दिलें असेही उद्गार विद्वानांमध्यें निघूं लागले. नागेशांचे नंतर त्यांच्या शिष्य-प्रशिष्यांनीं त्यांच्या ग्रंथांचें अध्यापन करीत असतांना अध्यापनाचें सार म्हणून अनेक टीकाग्रंथ लिहिले. त्यांपैकीं मञ्जूषेवर पांच, उद्द्योतावर दोन, लघुशब्देन्दुशेखरावर पंधरा व परिभाषेन्दुशेखरावर सोळा टीका आज उपलब्ध आहेत. पाणिनिसूत्रांवर, तसेंच भट्टोजी दीक्षितांच्या सिद्धान्तकौमुदी, शब्दकौस्तुभ व वैयाकरण-सिद्धान्तकारिका यांवर, त्याप्रमाणेंच कोण्डभट्टांचें वैयाकरणभूषण यावरही या कालखंडांत नागेशांशिवाय अनेकांनीं व्याख्या लिहिल्या. पाणिनिसूत्रांवर विश्वेश्वरांनीं व्याकरणसुधामहानिधि, सदाशिवमिश्रांनीं गूढार्थदीपिनी, अन्नंभट्टांनीं सूत्रवृत्ति, धरणीधरांनीं वैयाकरणसर्वस्व, नारायण पंडितांनीं शब्दभूषण, रामचंद्रभट्ट तारे यांनीं पाणिनिसूत्रवृत्ति व ओरंभट्टांनीं व्याकरणदीपिका या नांवाच्या सूत्रवृत्ती लिहिल्या. सिद्धान्तकौमुदीवर भट्टोजींनीं स्वतः प्रौढमनोरमा लिहिली, व नागेशांनीं बृहत्शब्देन्दुशेखर व लघुशब्देन्दुशेखर या व्याख्या लिहिल्या हें मागें सांगितलेंच आहे. यांशिवाय अनन्त पंडितांनीं बालमनोरमा, नीलकंठांनीं वैयाकरणसिद्धान्तरहस्य, कृष्णमिश्रांनीं रत्नार्णव, रामकृष्णांनीं वैयाकरणसिद्धान्तरत्नाकर, तारानाथांनीं सरला, व वासुदेव दीक्षितांनीं बालमनोरमा या व्याख्या लिहिल्या. प्रौढमनोरमेवर कृष्णमिश्रांनीं कल्पलता ही व्याख्या लिहिली; व चक्रपाणिदत्त व जगन्नाथ यांनीं अनुक्रमें मनोरमाखंडन व मनोरमाकुचमर्दन हे मनोरमा ग्रंथांतील प्रतिपादनाचें खंडन करणारे ग्रंथ लिहिले; व या ग्रंथांना विद्वत्ताप्रचुर उत्तर म्हणूनच कीं काय हरिदीक्षितांनीं बृहच्छब्दरत्न व लघुशब्दरत्न हे ग्रंथ लिहिले. शब्दकौस्तुभावर नागेशांनीं विषमी, हरिवल्लभांनीं दर्पणा, कृष्णमिश्रांनीं भावदीप, बाळंभट्टांनीं उद्द्योत, व राघवेन्द्राचार्यांनीं प्रभा ह्या व्याख्या लिहिल्या. वैयाकरणसिद्धान्तकारिकांवर कोण्डभट्टांनीं वैयाकरणभूषण व वैयाकरणभूषणसार हे ग्रंथ लिहिले. वैयाकरणभूषणावरही वनमाली यांनीं मतोन्मज्जा नांवाची टीका लिहिली. तसेंच भूषणसारावरही हरिवल्लभांनीं लघुभूषणकान्ति, मन्तुदेवांनीं दर्पणा व भैरवमिश्रांनीं परीक्षा ह्या टीका लिहिल्या. यांशिवाय शांकरी नांवाचीही टीका विद्वद्रत्न शंकरशास्त्री माडलकर यांनीं लिहिली आहे हें मागें सांगितलेंच आहे.

## ३९५. नागेशांच्या ग्रंथांवरील टीकाग्रंथ.

नागेशांचे लघुशब्देन्दुशेखर व परिभाषेन्दुशेखर हे ग्रंथ इतके लोकप्रिय झाले कीं वैयाकरण कुलांमध्यें सिद्धान्तकौमुदी व मनोरमाशब्दरत्नांचें कारकान्त अध्ययन झाल्याबरोबर दोन्ही शेखरांचें अध्ययन करण्याची प्रथा पडली; व त्यानंतर नागेशांची मञ्जूषा व महाभाष्यांतील नवाह्निकी व अंगाधिकार यांचें अध्ययन झालें कीं व्याकरणाचें बारा वर्षांचें अध्ययन पुरें झालें असें लोक मानूं लागले. त्यानंतर अध्यापनाचें कार्य करतांना संपूर्ण महाभाष्य व व्याकरण शास्त्राचे राहिलेले इतर ग्रंथ यांचें परिशीलन वैयाकरण स्वतःच करूं शकत असत; व इतर शास्त्रांतील ग्रंथांचें अध्ययन स्वतःच करण्याची योग्यता अंगीं आल्यामुळें, त्यांचाही अभ्यास विद्वान् वैयकरण स्वतः करीत. फार तर, त्यांतील उच्च ग्रंथांचें अध्ययन त्या त्या शास्त्रांतील निष्णात पंडितांकडे करीत असत. नागेशभट्टांच्या शिष्यप्रशिष्यांनीं जागोजागीं नागेशभट्टांनीं केलेल्या ग्रंथांच्या अध्यापनाचें कार्य चालविलें व त्याबरोबरच कांहीं जणांनीं विवेचनाचें सार या प्रकारच्या टीका लिहिल्या हें मागें सांगितलेंच आहे. या टीकांमध्यें अध्यापकाचा मतप्रतिपादनाचा जसा कल असेल त्याप्रमाणेंच त्याच्या टीकेमध्यें वैशिष्ट्य आढळून येतें: कांहीं टीका मूळ ग्रंथाचा अर्थबोध सुलभ व्हावा म्हणून व्याख्यारूपाच्या लिहिलेल्या आहेत; कांहींमध्यें नागेशांनीं विशिष्ट पंक्ती कां लिहिल्या याविषयीं विवेचन केलें आहे; तर कांहींमध्यें पूर्वपक्षोत्तरपक्षरूप विवेचन केलें आहे; तर इतर कांहींमध्यें वादविवादामध्यें नैपुण्य मिळविण्यास उपयुक्त अशी परिष्कारपद्धती उपयोगांत आणिली आहे. अर्थात्, सर्व टीकांचा विषय एकच असल्यामुळें स्वाभाविकपणें प्रत्येक टीकेंत पुष्कळ विषयांवर एकाच तऱ्हेचें विवेचन दिसून येतें.

## ३९६. लघुशब्देन्दुशेखर व परिभाषेन्दुशेखर यांवरील टीकाग्रंथ.

नागेशांच्या ग्रंथांवर टीका लिहिणाऱ्या विद्वानांपैकीं बहुतेकांचीं नांवें मागें पृष्ठ १०० वर दिलेल्या विद्वद्वंशांत आलीं आहेत; व त्यांतील ठळकठळक विद्वानांचा अल्पपरिचय पृष्ठें २४-६० मध्यें दिलेलाच आहे. नागेशांचे परमशिष्य वैद्यनाथ पायगुंडे यांनीं लशब्देन्दुशेखरावर 'चिदस्थिमाला', परिभाषेन्दुशेखरावर 'गदा,' व उद्द्योतावर 'छाया' या टीका लिहिलेल्या प्रसिद्धच आहेत. भैरवमिश्र यांनीं शब्देन्दुशेखरावर 'चन्द्रकला' व परिभाषेन्दुशेखरावर 'भैरवी' या टीका लिहिल्या. उदयंकर पाठक यानीं लघुशब्देन्दुशेखरावर 'ज्योत्स्ना' व परिभाषेन्दुशेखरावर 'पाठकी' या टीका लिहिल्या. हरिनाथांनीं परिभाषेन्दुशेखरावर अकाण्डताण्डव, मन्तुदेवांनीं दोषोद्धरण, भीमभट्टांनीं भैमी, शंकरभट्टांनीं शांकरी, व लक्ष्मीनृसिंहांनीं त्रिशिखा या टीका लिहिल्या; यांशिवाय अम्बाकर्त्री नांवाच्या उपयुक्त टीकेचें अध्ययन करण्याचा प्रघात आहे. एकोणीसाव्या शतकाचें आरंभीं लघुशब्देन्दुशेखरावर सदाशिवभट्ट घुले यांनीं सदाशिवभट्टी, श्रीधर यांनीं श्रीधरी, राघवेन्द्राचार्य गजेन्द्रगडकर यांनीं विषमी, व भास्करशास्त्री अभ्यंकर यांनीं विवरण या टीका लिहिल्या. यानंतर परिभाषेन्दुशेखरावर काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे, बाळशास्त्री रानडे, गोपाळाचार्य कऱ्हाडकर यांनीं विद्वत्ताप्रचुर व्याख्या लिहिल्या. विष्णुशास्त्री भट्ट यांनीं विष्णुभट्टी या नांवाची व्याख्या लिहिली; तिचें गोपाळाचार्य कऱ्हाडकर यांनीं दुष्करदोच्छेद या नांवाची टीका लिहून खंडन लिहिलें; व त्याला विष्णुशास्त्री यांनीं चिच्चंद्रिका नांवाची उत्तरात्मक टीका लिहिली. यांशिवाय विश्वनाथ दण्डिभट्ट यांनीं दोन्ही शेखरांवर व्याख्या लिहिल्या. लघुशब्देन्दुशेखरावर इन्दिरापति यांनीं परीक्षा,

शिवनारायणशास्त्री यांनीं विजया, व गुरुप्रसादशास्त्री यांनीं वरवर्णिनी या व्याख्या लिहिल्या. परिभाषेन्दुशेखरावरही तात्याशास्त्री पटवर्धन, शिवकुमारशास्त्री व नित्यानंद पर्वतीय यांनींही पांडित्यपूर्ण व्याख्या लिहिल्या. गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांनीं वर दिलेल्या व्याख्यांपैकीं महत्वाच्या व्याख्यांचें परिशीलन करून लघुशब्देन्दुशेखरावर गूढार्थप्रकाश व परिभाषेन्दुशेखरावर तत्त्वादर्श या सुबोध असूनही विद्वत्तापूर्ण अशा व्याख्या लिहिल्या.

## २९७. पाश्चात्य विद्वानांची व्याकरणविषयक कामगिरी.

या नागेशकालखंडातील ग्रंथांचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे इंग्रजी जर्मन व फ्रेंच भाषांमध्यें पाश्चात्य विद्वानांनीं व्याकरणशास्त्राचें केलेलें अध्ययन, प्रमाणभूत जुन्या ग्रंथांचें संपादन, व त्यांचें चिकित्सात्मक अथवा परीक्षणात्मक विवेचन करून लिहिलेले लेख, या तीन प्रकारची कामगिरी हें होय. या परद्वीपस्थ विद्वानांचा भारतांतील पंडितांशीं परिचय होण्याला इंग्रजीमधून संस्कृत ग्रंथांचें अध्यापन करण्याकरितां निरनिराळ्या महाविद्यालयांमध्यें त्यांची झालेली नेमणूक ही बहुतांशीं कारणीभूत झाली; व आपले हातून अध्यापनाचें काम उत्तम रीतीनें व्हावें म्हणून त्या ग्रंथांचें उत्तम शास्त्रिवर्गाकडून त्यांनीं स्वतः अध्ययन केलें. या प्राध्यापकांशिवाय इतर खात्यांतील महत्त्वाच्या जागीं नेमणूक झालेल्या इंग्रजी अधिकाऱ्यांचा मोठमोठ्या भारतीय विद्वानांशीं परिचय घडून आल्यानंतर त्यांनाही भारतीय विद्यांचा अभ्यास करण्याची इच्छा झाली व त्यांनींही आपल्या आवडीच्या निरनिराळ्या शास्त्रांतील ग्रंथांचें अध्ययन केलें. या परद्वीपस्थ विद्वानांपैकीं मॅक्सम्यूलर, कोलब्रुक, बोथलिंक, कीलहॉर्न, बॅलंटाईन, वेबर, पीटरसन , मॅकडोनेल, विंटरनिट्झ इत्यादि व्यक्तींचीं नांवें सर्वविश्रुतच आहेत. व्याकरणशास्त्राध्ययनाचे बाबतींत डॉ. गोल्डस्टूकर[1], डॉ. कीलहॉर्न[2], डॉ. वेबर[3]; डॉ. बर्नेल. डॉ. बोथलिंक[4] इत्यादि विद्वानांची एकोणिसाव्या शतकांतील कामगिरी व डॉ. फॅडेगॉन[5], डॉ. थीमे[6], डॉ बुइस्कूल[7], डॉ. एजर्टन[8], डॉ. रनु[9] इत्यादि विद्वानांची या शतकांतील कामगिरी विशेष उल्लेखनीय आहे. डॉ. गोल्डस्टूकर यांचीं सर्वच मतें इतर पंडितांना फारशीं ग्राह्य वाटलीं नाहींत तरी त्यांनीं ऐतिहासिक दृष्ट्या चिकित्सात्मक बुद्धीनें केलेलें विवेचन व त्यांनीं काढलेलीं अनुमानें विचारांत घेण्यासारखीं आहेत. डॉ. बर्नेल यांनीं ऐन्द्रव्याकरणा ( Aindra School of Sanskrit Grammar ) वर उत्तम निबंध लिहून

---

१. "Pāṇini, his place in Sanskrit Literature" by Goldstücker पहा.

२. याविषयीं मागें परिच्छेद ६१ पृ. ४० पहा.

३. डॉ. वेबर यांनीं "Indische Studien" या नियतकालिकामध्यें अनेक व्याकरणाविषयक लेख लिहिले आहेत.

४. "Pāṇini's Grammatik" by Dr. Otto Böthlingk पहा.

५. "Studies on Pāṇini's Grammar" by Barend Faddegon पहा.

६. "Pāṇini and the Veda" by Paul Thieme पहा.

७. "The Tripādī" by Dr. H. E. Buiskool पहा.

८. "Buddhist Hybrid Sanskrit Grammar and Dictionary" by Dr. Franklin Edgerton पहा.

९. "Śaraṇadeva's Durghaṭavṛtti" Ed. by Dr. Renou पहा.

पाणिनिपूर्व वैयाकरणांच्या कामगिरीविषयीं उद्बोधनीय विचार प्रकट केले आहेत. त्याप्रमाणेंच, डॉ. वेबर यांनीं 'इंडिश स्टूडियेन' भाग १३ मध्यें वेळोवेळीं व्याकरणाच्या निवडक विषयांवर चर्चा केली आहे. डॉ. एगलिंग यांनीं 'कातन्त्र' व्याकरणाचें संस्करण व त्याप्रमाणेंच डॉ ऑपर्ट यांनीं शाकटायन व्याकरणाचें संस्करण करून, या व्याकरणांच्या अभ्यासाला चांगली मदत करून दिली आहे. पण या बाबतींत डॉ. कीलहॉर्न यांनीं व्याकरणांतील निरनिराळ्या विषयांवर लेख लिहून, व्याकरणमहाभाष्याचें उत्तम संस्करण करून, 'कात्यायन व पतञ्जलि' हा निबंध लिहूम व परिभाषेन्दुशेखराचें मुद्देसूद टिप्पणींसह इंग्रजी भाषांतर करून व्याकरणाध्ययनास सर्वांत उत्तम मदत केली आहे. या शतकामध्यें डॉ. फॅडेगॉन डॉ. थमि व डॉ. एजरटन यांनीं पाणिनीच्या व्याकरणावर निबंध लिहून उद्बोधक विचार प्रकट केले आहेत. त्याप्रमाणेंच डॉ रनु यांनीं शरणदेवाच्या दुर्घटवृत्तीचें व डॉ. लीबिश यांनी चांद्र व्याकरणाचें संस्करण केलें आहे. याशिवाय डॉ. मॅकडोनेल, डॉ. व्हिटने, डॉ. वाकरनागल, डॉ. बॉप, डॉ. पिशेल इत्यादिकांनीं व्याकरणग्रंथ लिहिले आहेत.

### ३९८. विसाव्या शतकांतील व्याकरणविषयाचा भारतांतील अभ्यास.

या विसाव्या शतकामध्यें मात्र व्याकरणविषयाचा अभ्यास मागें पडत चालला आहे. संस्कृत पाठशालांमध्यें महाभाष्यान्त अध्ययन केलेले कांहीं वृद्ध वृद्ध वैयाकरण हयात आहेत; पण उत्तरायुष्यामध्यें मानाच्या व धनाच्या स्थानाची आशा नसल्यामुळें कष्ट सोसून निरलसपणानें बारा किंवा अधिक वर्षे व्याकरणाचें अध्ययन करणारे बुद्धिमान् शिष्य त्यांना लाभत नाहींत. विद्यापीठांकडे पाहिल्यास पुष्कळशा विद्यापीठांमध्यें अभ्यासक्रमांत व्याकरण, न्याय, मीमांसा इत्यादि शास्त्रांना स्थानच नाहीं; व कांहीं विद्यापीठांनीं असलेलेंही स्थान काढून टाकलें आहे. अभ्यासू विद्यार्थ्यांची संख्या जरी कमी असली तरी विद्यापीठांमध्यें विद्यांना स्थान पाहिजे हें निर्विवाद आहे; कारण विद्येला स्थान असल्यासच त्या विद्येचें अध्ययन करण्याकडे प्रवृत्ती होते. विद्यालयें व महाविद्यालयें यांमध्यें, तसेंच विद्यापीठांतील अभ्यासक्रमांत व्याकरण विषयाला योग्य स्थान दिलेलें नाहीं. तौलनिक भाषाशास्त्र ( Comparative Philology ) भाषातत्त्वशास्त्र ( Linguistics ), भारतीयविद्याशास्त्र ( Indology ), प्राचीन भारतीय संस्कृति ( Ancient Indian Culture ) इत्यादि शास्त्रांचा अभ्यास निरनिराळ्या विद्यापीठांमध्यें चालू झाला आहे ही हल्लींच्या परिस्थितीला साजेशीच गोष्ट आहे. पण या प्रत्येक शास्त्रांतील अध्यापकानें व उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यानें व्याकरण व इतर शास्त्रांचें अध्ययन केलें नसल्यामुळें त्यांचें या विषयांचें ज्ञान खरें व तलस्पर्शी होत नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. स्वराज्यप्राप्तीनंतर हल्लीं ज्या त्या ठिकाणीं भारतीय संस्कृति व भारतीय विद्या यांचे रक्षणासाठीं संस्कृत भाषेचें अध्ययन होणें अत्यंत जरूर आहे इतकेंच नव्हे, तर संस्कृत ही राजव्यवहारभाषासुद्धां व्हावी असें कांहीं मोठमोठे लोक म्हणूं लागले आहेत. विद्यापीठांतील शिक्षणाची दिशा व लोकांची प्रवृत्ती पाहिल्यास मात्र आतांपर्यंत विशेष प्रगति झाली नाहीं; तरीपण लौकरच या दिशेनें कांहींतरी घडून येईल अशी आशा आहे.

### ३९९. व्याकरणविषयक नवीन ग्रंथनिर्मितीविषयीं विचार.

संस्कृतभाषा ही हल्लीं बोलभाषा नसल्यामुळें, व पाणिनीच्या व्याकरणामुळें तिला एक प्रकारचें स्थायिरूप आल्यामुळें व व्याकरणशास्त्रावरही महाभाष्य, प्रदीप, भूषण, मञ्जूषा व

कौमुदी यांसारखे उत्तम ग्रंथ लिहिले गेल्यामुळें व्याकरणशास्त्रांत नवी ग्रंथनिर्मिति आतां कोणती होणार अशी पृच्छा या बाबतींत होणें शक्य आहे; व या पृच्छेमध्यें कांहीं तथ्यही असणें शक्य आहे. तरी पण, ( १ ) पूर्वीच्या वैयाकरणांनीं लिहिलेल्या ग्रंथांचें उत्तम संस्करण व संपादन करणें, व ( २ ) त्या ग्रंथांचाच नव्हे तर त्याबरोबर त्या शास्त्रांतील इतर महत्त्वाच्या ग्रंथांचा संपूर्ण अभ्यास करून निबंधात्मक व विवेचनात्मक ग्रंथ [1]लिहिणें, तसेंच ( ३ ) बोलभाषेमध्यें अभ्यासू लोकांना उपयुक्त असे त्यांचे अनुवाद करणें, हीं तीन कार्यें विद्वानांनीं आज आपले अंगावर घेण्याजोगीं आहेत. काशी, कलकत्ता, पुणें, मुंबई, मद्रास, म्हैसूर इत्यादि अनेक ठिकाणीं ग्रंथसंपादनकार्य चालू आहे; पण जुने हस्तलिखित ग्रंथ मिळवून व त्यांचा सूक्ष्म अभ्यास करून त्या कार्यामध्यें ज्यास्त व्यवस्थेशीरपणा आणणें अत्यंत जरूर आहे. निबंधात्मक व विवेचनात्मक ग्रंथ लिहिण्यासही आज सुरुवात झाली आहे; व या बाबतींत डॉ. वेबर, डॉ. कीलहॉर्न, डॉ. भांडारकर यांसारख्या विद्वानांनीं जशी कामगिरी केली तशी डॉ. बेलवलकर डॉ. अग्रवाल[2], डॉ. रनु, डॉ. क्षितीशचंद्र[3] चक्रवर्ती, डॉ. प्रभातचंद्र चक्रवर्ती, डॉ टी. आर. चिंतामणि, श्री. पावटे, श्री. जयदेव शुक्ल इत्यादि विद्वान् लेखकही उल्लेखनीय कामगिरी करीत आहेत. अनुवादाच्या बाबतींतही डॉ. बसू यांनीं केलेला अष्टाध्यायीचा व सिद्धान्तकौमुदीचा इंग्रजीमध्यें अनुवाद व त्याप्रमाणेंच परिभाषेन्दुशेखराचा डॉ. कीलहॉर्ननें केलेला इंग्रजीमध्यें अनुवाद हे गेल्या शतकांतच झाले आहेत. परिभाषेन्दुशेखराचा मराठी अनुवाद श्री. वाडेगांवकर यांनीं कांहीं वर्षांपूर्वीं केला आहे. महाभाष्याच्या अनुवादासही कलकत्त्याचे क्षितीशचंद्र चट्टोपाध्याय व अन्नमलाई विद्यापीठाचे डॉ. पी. एस्. सुब्रह्मण्यशास्त्री यांनीं आरंभ केला आहे. लेखकाच्या मनांतही भर्तृहरीच्या महाभाष्यदीपिकेचें व गुरुवर्य वासुदेवशास्त्री यांच्या परिभाषेन्दुशेखरावरील तत्त्वादर्श टीकेचें संपादन करावयाचें आहे. व्याकरणविषयामध्यें नवीन ग्रंथ कोणत्या प्रकारचे होणें इष्ट व शक्य आहे हें सुचवावयाचें म्हटल्यास ( १ ) कातन्त्र, चान्द्र, शाकटायन, हैम, सारस्वत इत्यादि व्याकरणांचें त्या त्या व्याकरणपरंपरेंतील उपलब्ध सर्व ग्रंथांचें परिशीलन करून उत्तम संस्करण व विवेचन, ( २ ) पाणिनीच्या सूत्रांवरील वार्तिकवचनांचें परिशीलन, ( ३ ) पाणिनीनें दिलेल्या स्वर-विधींचें वेदग्रंथांमध्यें समीक्षण व त्याला अनुसरून वैदिक वाक्यांचा अर्थविचार, (४) उदात्तादि स्वरांचें पाणिनिसंमत उच्चारण व निरनिराळ्या शाखांचें अध्ययन करणाऱ्या वैदिकांचें हल्लीं उपलब्ध उच्चारण यांविषयीं विचार, ( ५ ) अन्य व्याकरणांची पाणिनीय व्याकरणाशीं तुलना, ( ६ ) शब्दार्थसंबंधविचार व शब्दापासून अर्थाचा बोध व त्यांविषयींच्या कल्पनांचा विकास,

---

१. डॉ. बेलवलकर यांनीं पुष्कळ वर्षांपूर्वीं 'Systems of Sanskrit Grammar' हा उद्बोधक निबंध लिहिला आहे.

२. डॉ. अग्रवाल यांनीं "India as known to Pāṇini" हें विचारपरिप्लुत पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे.

३. डॉ. क्षितिशचन्द्र चक्रवर्ती (चट्टोपाध्याय) यांनीं चान्द्रव्याकरणाचें संपादन नुकतेंच केलें आहे, व प्रा. बेचरदास हे तेंच कार्य करीत आहेत. डॉ. क्षितीशचन्द्र "मञ्जूषा" या नियतकालिकांतही मननीय लेख लिहीत असतात. श्री. पावटे यांनीं 'अष्टाध्यायी' वर व श्री. जयदेव शुक्ल यांनीं 'भर्तृहरी'वर चिकित्सात्मक निबंध लिहिले आहेत; व डॉ. टी. आर. चिंतामणि यांनीं भोजदेवांच्या सरस्वतीकण्ठाभरणाचें संपादन केलें आहे.

( ७ ) व्याकरणमहाभाष्यामध्यें व इतर शास्त्रांमध्यें आढळून येणाऱ्या परिभाषांचा व न्यायांचा विचार, ( ८ ) व्याकरणमहाभाष्यांत आढळणाऱ्या पण नागेशांनीं न दिलेल्या परिभाषांचें विवेचन, अशा तऱ्हेचे अनेक विषय ग्रंथनिर्मितीकरितां सुचवितां येण्यासारखे आहेत. अर्थात्, या विषयांवर उत्तम ग्रंथनिर्मिति करण्याकरितां व्याकरणविषयाचें तलस्पर्शी ज्ञान असणें अत्यंत आवश्यक आहे; व तें नसल्यास "अब्धिर्लङ्घित एव वानरभटैः किं त्वस्य गम्भीरतां आपातालनिमग्नपीवरतनुर्जानाति मन्थाचलः" या श्लोकार्धांत वर्णन केल्याप्रमाणें अशा तऱ्हेची ग्रंथनिर्मिति ही हलक्याच दर्जाची होणार.

४००. उपसंहार.

प्रस्तावना व टीपा यांसह प्रस्तुत व्याकरणमहाभाष्याचा मराठींत अनुवाद हा व्याकरणशास्त्रावर लिहिलेला एक नवीनच ग्रंथ समजण्यास कांहींही हरकत नाहीं. या ग्रंथानें व्याकरणविषयामधील ग्रंथांमध्यें एक महत्वाची भर घातली आहे; व एका तऱ्हेनें या विसाव्या शतकांत व्याकरणशास्त्रावर नवीन ग्रंथ निर्मितीला सुरवात झाली आहे. हल्लींच्या काळीं नुसती नवीन ग्रंथनिर्मितीच होण्यानें काम भागत नाहीं; तर ती उपयुक्त होण्यास हस्तलिखित प्रतींवरून जुन्या अथवा खपून गेलेल्या ग्रंथांचें संशोधन व संपादन, त्याप्रमाणेंच महत्वाच्या ग्रंथांचें प्रकाशन यांचीही तितकीच आवश्यकता आहे. नवीन ग्रंथनिर्मिती करण्याकरितां लेखकाचे अंगीं उत्तम शास्त्रीय विद्वत्ता, ग्रंथसंपादन करण्याचे कामाकरितां संपादकाचे अंगीं विशिष्ट शास्त्रावरील ज्ञान संपादन करण्याची तळमळ, तसेंच ग्रंथप्रकाशनाकरितां केवळ विद्याभिवृद्धि हा हेतु पुढें ठेवून प्रकाशकाकडून होणारा निरलस प्रयत्न, यांची अत्यंत आवश्यकता आहे. याबरोबरच हें काम करण्याऱ्या व्यक्ती अथवा संस्था यांचे ठिकाणीं अत्यंत निःस्वार्थीपणाची तितकीच जरूर आहे; संभावना, वेतन व नफा यांचेकडे दृष्टी ठेवून हीं कामें होणें शक्य नाहीं. प्रस्तुत ग्रंथाचे बाबतींत गुरुवर्य शास्त्रीबुवांनीं उत्तम ज्ञान संपादन करून व अविश्रांत परिश्रम घेऊन केलेला अनुवाद, लेखकानें गुरुजींकडून मिळालेल्या ज्ञानाचा उपयोग करून केवळ विद्याप्रेमानें केलेलें ग्रंथाचें संशोधन व संपादन, व त्याबरोबरच डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें केवळ विद्याभिवृद्धीकरितां त्याचें केलेलें प्रकाशन या तिहींची जोड झाल्यामुळेंच व्याकरणप्रेमी व व्याकरणाभ्यासी जनांच्या पुढें हा ग्रंथ येत आहे. वाचकवर्ग या ग्रंथाचा स्वीकार करून व अभ्यास करून व्याकरणशास्त्राच्या अभिवृद्धीला योग्य मदत करील अशी आशा आहे. केवळ विद्याभिवृद्धीकडे दृष्टी ठेवून प्रकाशनकार्य केल्याबद्दल डेक्कन एज्युकेशन सोसायटीचें हार्दिक अभिनंदन करून हा उपोद्घात पुरा करण्यांत येत आहे व ज्यांच्या कृपेनें हें कार्य तडीस गेलें त्या गुरुवर्य वासुदेवशास्त्री, प्रगुरु रामशास्त्री, व वृद्धप्रगुरु भास्करशास्त्री या गुरुत्रयीचे चरणीं आज गु. भास्करशास्त्री यांचे पुण्यतिथीचे शुभदिवशीं ( पौष कृष्ण सप्तमी, ता. २६ जानेवारी १९५७ या प्रजासत्ताकदिनीं ) अर्पण करण्यांत येत आहे.

इति श्रीगुरुचरणार्पणमस्तु ।

---

## परिशिष्ट १.

# उद्धृत केलेलीं वाक्यें व श्लोकवार्तिकें.

( कंसांतील आंकडे १ ते ६ भागांचे आहेत व बाहेरील आंकडे त्यांतील पृष्ठांचे आहेत. श्लोकवार्तिकें * खुणेनें दाखविलीं आहेत.)

आ

इ



ई



उ

ब



भ



म

ह

परिशिष्ट २

# परिभाषा व न्याय

कंसांतील आंकडे १ ते ६ भागांचे आहेत व बाहेरील आंकडे त्यांतील पृष्ठांचे आहेत.
* खुणेनें दाखविलेल्या परिभाषा परिभाषेन्दुशेखरामध्यें दिल्या आहेत.

---

## महाभाष्यामध्यें न दिलेल्या, परंतु महाभाष्यावरून ध्वनित होणाऱ्या, परिभाषेन्दुशेखरामध्यें दिलेल्या परिभाषा.

[ कंसांत दिलेले आंकडे परिभाषेंदुशेखरांतील अनुक्रमांकाचे आहेत. ]

अकृतव्यूहाः पाणिनीयाः (५६)
अनुदात्तेत्त्वलक्षणमात्मनेपदमनित्यम् (९३.४)
अपवादो यद्यन्यत्र चरितार्थस्तर्ह्यन्तरङ्गेण बाध्यते (६५)
अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सवं मन्यन्ते वैयाकरणाः (१२२)
अवयवप्रसिद्धेः समुदायप्रसिद्धिर्बलीयसी (९८)
आगमशास्त्रमनित्यम् (९३.२)
आतिदेशिकमनित्यम् (९३.६)
उपसंजनिष्यमाणनिमित्तोऽप्यपवाद उपसंजातनिमित्तमप्युत्सर्गं बाधते (६४)
एकयोगनिर्दिष्टानां सह वा प्रवृत्तिः सह वा निवृत्तिः (१७)
औपदेशिकप्रायोगिकयोरौपदेशिकस्यैव ग्रहणम् (१२०.२)
कार्यमनुभवन् हि कार्यी निमित्ततया नाश्रीयते (१०)
क्तल्युट्तुमुन्खलर्थेषु वासरूपविधिर्नास्ति (६८)
क्वचित् कृताकृतप्रसङ्गमात्रेणापि नित्यता (४६)
क्वचिदपवादविषयेऽप्युत्सर्गोऽभिनिविशते (५८)
क्वचिद्विकृतिः प्रकृतिं गृह्णाति (१२०.१)
गणकार्यमनित्यम् (९३.३)
चानुकृष्टं नोत्तरत्र (७८)
ज्ञापकसिद्धं न सर्वत्र (११६)
नञ्घटितमनित्यम् (९३.५)
पदगौरवाद् योगविभागो गरीयान् (१२१)
परान्नित्यं बलवत् (४२)
पर्यायशब्दानां लाघवगौरवचर्चा नाद्रियते (११५)
पूर्वपरनित्यान्तरङ्गापवादानामुत्तरोत्तरं बलीयः (३८)
प्रकृतिग्रहणे ण्यधिकस्यापि ग्रहणम् (९१)
प्रकृतिग्रहणे यङ्लुगन्तस्यापि ग्रहणम् (९३.९)
प्रत्ययग्रहणे चापञ्चम्याः (२४)
यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते तदप्यनित्यम् (४८)
योगविभागादिष्टसिद्धिः (११४)
लक्षणान्तरेण प्राप्नुवन् विधिरनित्यः (४५)
लादेशेषु वासरूपविधिर्नास्ति (६९)
लुग्विकरणालुग्विकरणयोरलुग्विकरणस्य (९०)
विधौ परिभाषोपतिष्ठते नानुवादे ( ९३.१० )
शब्दान्तरात्प्राप्नुवतः शब्दान्तरे प्राप्नुवतश्चानित्यत्वम् (४४)
श्तिपा शपानुबन्धेन निर्दिष्टं यद्गणेन च । यत्रैकाज्ग्रहणं चैव पञ्चैतानि न यङ्लुकि ॥ (१२०.३)
श्रुतानुमितयोः श्रुतसंबन्धो बलवान् (१०४)
संज्ञापूर्वकविधेरनित्यत्वम् (९३.१)
सर्वविधिभ्यो लोपविधिरङ्विधिश्च बलवान् (९३-७.८)
सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम् (१०३)

---

## परिशिष्ट ३

# महत्त्वाचे शब्द

( ) अशा कंसांतील आंकडे १ ते ६ भागांचे आहेत व बाहेरील आंकडे त्यांतील पृष्ठांचे आहेत.

[ ] अशा कंसांतील आंकडे शब्दाचे निरनिराळे अर्थ दाखविण्याकरितां आहेत.

भाष्यामध्यें ज्या स्थळीं शब्द आढळतात त्यांपैकीं फक्त कांहींच स्थळें दिलीं आहेत.

**अकथित** क्रियेनें अविवक्षित कर्मकारक (२) १५४ इ०

**अक्ष** [१] गाडीचा कणा [२] खेळण्याचा फासा [३] बेहडा. (१) ५९७

**अङ्ग** [१] पूर्वेकडील एका देशाचें नांव (अङ्गाः) (४) १८४.
[२] प्रत्यय जिच्याहून केला जातो ती प्रकृति (२) १३६-१४४

**अतिदेश** एका धर्मीवर दुसऱ्या पदार्थावरील धर्माची कल्पना (१) २१०

**अद्यतनी** वर्तमानकालाला पूर्ववैयाकरणांनीं दिलेली संज्ञा (२) ४६३, (५) ४६४

**अधिकरण** अर्थाचें अथवा धर्माचें स्थानभूत द्रव्य (२) ४४२ इ०
अधिकरणाचे तीन प्रकार (५) १०५

**अधिकार** अष्टाध्यायी सूत्रपाठामध्यें पुढें पठन केलेल्या सूत्रांपैकीं विवक्षित मर्यादेपर्यंत अनुवृत्त होणारें सूत्र किंवा सूत्राचा भाग (१) २९८, (२) ४२, (४) ९२.
अधिकाराचे तीन प्रकार (१) २९८ (२) ४२,४५ (४) ९२

**अधिकार्थवचन** अर्थवादवाक्य (२) २८५

**अनभिधान** सूत्रानें सिद्ध होत असतांनाही शिष्टांनीं केलेल्या प्रयोगांत न आढळणारा शब्द (२)३३६,४२०, (३) २४४,(४) ३३७, ३४०, ३५८, ३८६

**अनवस्था** विचारसरणीवरील दोषाचा एक प्रकार (२) २३७ (५) १८५

**अनिर्देश** अगमक निर्देश (२) ३६

**अनुदेश** आतिदेश (१) ३३७,४०१

**अनुवृत्ति** [१] पुढील सूत्रांत अध्याहार (१) ११२,२८२,५०३ इ०
[२] अनुकरण (१) ३८,४३९

**अनुषंग** उपधेचा ' न 'कार (१) २८८

**अन्तरंग** ज्यास्ती जवळचा या अर्थाचा पारिभाषिक शब्द (१) ३६१ (४) ३९२, ३९३ इ०

**अन्वाख्यान** पूर्वीच्या शास्त्रकारांनीं सांगितलेल्या गोष्टीचें पुनः कथन (१) ५०९ (२) २३६,२३८ इ०

**अन्वाचय** अप्रधान अथवा आनुषङ्गिक वस्तू (६) २२०

**अन्वादेश** पूर्वी प्रस्तुत असलेल्या पदार्थाचा पुनः निर्देश (२) ४७७ इ०

**अपकर्ष** मागील सूत्रांत पुढील सूत्रांतील पदाचा अध्याहार (४) ३२१

**अपवर्ग** कार्यसमाप्ति (२) ४०९

**अपशब्द** सूत्रांनीं सिद्ध न होणारे शब्द (१) ४७-५० (२) ४५१ इ०

**अप्रतिषेध** अनर्थक प्रतिषेध (१) १४५, २१७

**अभिजन** वाडवडिलांचा देश (४) २४४

**अभ्यावृत्ति** आवृत्ति. (४) ४८७, ४८८

**अयानय** फासेसोंगट्यांच्या खेळांतील एक

**प्रसव** प्रवृत्ति (१) ५९४ (४) १९–२०

**प्रसारण** संप्रसारण (१) १२९

**प्रसित** आसक्त (२) ४३४

**प्राय** लोक (५) ३०६

**प्रायभव** नेहमीं नसणारा, बहुत करून असणारा (४) २३३

**प्रेक्षापूर्वकारी** विचारशील मनुष्य (२) १६०

**बर्कर** बकरा (१) ५९८

**बर्बुर** बाभुळीचें झाड (१) २८३

**बहुव्रीहिवद्भाव** बहुव्रीहि समासाप्रमाणें समजणें (६) २७३

**ब्राह्मण्य** गौरवर्ण, सदाचार, कृष्णकेश इत्यादि ब्राह्मण चिन्हें (४) ३४७

**भारद्वाज** [१] भरद्वाज ऋषींनीं सांगितलेला विशिष्ट विधि (६) १३८
[२] उत्तरेकडील एका देशाचें नांव (४) २१९

**भाव** होत असलेली क्रिया (२) ११

**भाविनी** (संज्ञा) पुढें होणारी अपेक्षित (संज्ञा) (१) २७९

**भाषितपुंस्क** पुंल्लिंगबोधक (५) ३१२, (६) ७१

**भूतपूर्वगति** पूर्वीचें अस्तित्व विचारांत घेऊन प्रवृत्ति (५) २२१, (६) २०७

**भ्राज** (श्लोक) कात्यायनानें केलेले म्हणून समजण्यांत आलेले श्लोक (१) ५

**भ्रूकुंस** स्त्रीवेषधारी नट (४) १७

**मद्र** एका उत्तरेकडील प्रांताचें नांव (४) ४४६

**मन्दक** जरा विरजलेलें दहीं (२) २८७

**महानाम्नी** एक प्रकारचा ऋक्समूह (४) ३४१

**माथितिक** ताक व दहीं विकणारा (६) १९३

**माथुरी** ( वृत्ति ) मथुरा नगरीमध्यें माथुरानें रचिलेली अथवा सांगितलेली वृत्ति (४) २४७

**माष** (१) मासा (तोलण्याचें मान) [२] उडीद (१) ५९७

**मुक्तसंशयं** खात्रीनें, निःसंशय (४) २३३

**मौञ्ज** वाहीक देशाच्या जवळ असलेलें एक गांव (४) २१५

**मौदक** ऋक्समुदायात्मक एक वेदभाग (४) ८

**मौनिचिती** मुनिचितानें बसविलेली नगरी (४) ७९

**याज्या** यज्ञकर्म चालू असतां म्हटले जाणारे विशिष्ट मन्त्र (६) ३९५

**योगविभाग** इष्टसिद्धीकरतां सुचविलेला सूत्राचा विभाग (१) १२२, १८०, १८८, २१६, २२३, २३५, ३९३, ४११, (२) १४६, १९०, २६९, २७२, २८४, ४१८, ४३७, ४४९, (३) ११९, १३१, १४४, १४५, १५८, १५९, २०८ (४) ४२७ (५) २६२, २६३, ३०४, ३८१, ३८९, ४१३, ४२१, ४२९, ४३५, ४४३, ४८० (६) ९, २०, १०५, ११३, ११४, १६७, २१७, २१९, २२०, २४१, ३१८, ३४८, ३५७, ३९६, ४१५, ४५२, ४५४, इ.

**युक्तवद्भाव** प्रत्ययाचा लोप झाला असतांनाही प्रकृतीच्या अर्थाला अनुसरून लिङ्गवचनरूप कार्य करणें (१) ५५२

**यूष** यज्ञकर्मांतील एक पदार्थ (१) ९५

**योगाङ्ग** सूत्राचा भाग म्हणून समजलेलें पद (२) २६९

**राजन्य** राजघराण्यांतील पुरुष (४) १८४

**रीरिविधि** अकङ्, लोप, आनङ्, रीङ् आणि रिङ् आदेश (१) ३१७

**रूपतर्क** सुवर्णकार, सोनार (२) १८२

**रूपातिदेश** पूर्वस्वरूपप्राप्ति (६) ८७, ८९, २५४

**लक्षण** (१) जिच्यावरून एकादी गोष्ट वारंवार कळते अशी खूण (२) २०१, ४३२ [२] व्याकरणसूत्र (१) २७ इ०

**लौकिकवैदिक** लोकांतील व वेदांतील प्रयोग (१) १८, ४७६

---

# महत्त्वाचे शास्त्रसिद्धान्त



---

# विषयानुक्रमणी

## भाग १ ( अध्याय १ पाद १ आणि २ )

**आन्हिक १०–( ङित्किदतिदेशान्हिक सू. १।२।१–४४, पृ. ४६४-५२५ )**



**आन्हिक ११–( प्रातिपदिकसंज्ञान्हिक सू. १।२।४५–६३). पृ. ५२६-५६३**

## भाग २ ( अध्याय १ पाद ३ व ४; अध्याय २ संपूर्ण )

**आन्हिक १९–( समर्थान्हिक सू.२।१।१) पृ. २२५-२६२**



**आन्हिक २०–( अव्ययीभावसमासान्हिक सू.२।१।२–५०) पृ. २६३-२९७**

## भाग ३ ( अध्याय ३ )

# भाग ४ ( अध्याय ४ आणि ५ )

## भाग ५ ( अध्याय ६ )

**आन्हिक ६८— (दीर्घाद्यङ्गकार्यान्हिक ६।४।१।–२१ पृ. ३६८—३८५**

## भाग ६ (अध्याय ७ आणि ८)

आन्हिक ८२-(प्लुतविधानान्हिक सू. ८।२।४२-१०८ ) पृ. ३५८-४०२